ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीची ग्रंथमाला. पृष्ठें.

ग्रंथ २६ वा.

# तुकारामाची गाथा

## भाग १–२

प्रकाशक,

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.

मुंबई

"इंदुप्रकाश" छापखान्यांत छापिली.

इ. सन १९०३.

किंमत ३॥ रुपये.

# अनुक्रमणिका.

---

श्री.

# प्रकाशकांची प्रस्तावना.

तुकारामांचें नांव हें आह्मां महाराष्ट्रांचें बाळकडू आहे. लहानापासून थोरांपर्यंत, एकाद्या गांवढळ अक्षरशून्य माणसापासून तों थेट कै. न्यायमूर्ति रानडे, राजाराम शास्त्री बोडस, मंडलिक, तेलंग अशा लोकमान्य महान् विद्वानांपर्यंत, आणि भिक्षेकऱ्यांपासूनं तों थेट महाराजांपर्यंत सर्वांस तुकाराम सारखे मान्य झाले आहेत. तुकाराम महाराज इतके लोकमान्य होण्यास कारण त्यांचें साधुत्व होय. त्यांच्या अभंगांत आबालवृद्धांस, त्यांच्या त्यांच्यापरी उपयोगीं पडण्यासारखीं व्यवहारज्ञान, तत्वज्ञान, वेदांत नवविधाभक्ति, सदुपदेश हीं प्रकरणें ओतप्रत भरलीं आहेत. अशा थोर साधु पुरुषांच्या अभंगरूपानें प्रगट झालेल्या प्रासादिक वाणीचा लाभ महाराष्ट्र जनांस अल्पायासें मिळावा, आणि त्याचा प्रसार सर्वत्र व्हावा, अशा उद्देशानें आह्मी हें काम हातीं घेतलें, व तें बरेंच तडीस गेलें, याबद्दल सर्वशक्तिमान् जगन्नियंत्याचे आह्मी अत्यंत आभारी आहोंत.

तुकारामाच्या अभंगांच्या गाथा आजपर्यंत बऱ्याच निघाल्या आहेत. त्यांत अणखी नवी प्रत काढून तुह्मीं विशेष तें काय केलें, असा प्रश्न सहज कोणीही करील. ह्याचें उत्तर, आणखी आणखी आगगाड्या कशाला, आणखी आणखी शाळा कशाला, आणखी आणखी चांगले रस्ते कशाला, आणखी आणखी नवीं यंत्रें कशाला, आणखी आणखी लोकांस राजकीय अधिकार कशाला, इत्यादिकांच्या उत्तरांत आहे. आणि तें सर्वांस ठाऊक आहे. आधिभौतिक उन्नतीचें साहित्य जसें निरंतर वाढत्या प्रमाणावर पाहिजे आहे, तसें अध्यात्मिक उन्नतीचें साहित्यही वाढत्या प्रमाणावर असलें पाहिजे. आणखी, आमच्या तुकाराम महाराजांची वाणी ही त्या साहित्यांत प्रधान आहे. शिवाय, ह्या धर्मग्लानीच्या युगांत तिचें प्रयोजन पहिल्याही पेक्षां अधिक आहे; तें इतकें कीं, सध्याच्या काळीं प्रत्यक्ष तुकाराम पुनः अवतरले तर पाहिजेत आहेत, असें मोठमोठ्या विचारी पुरुषांस वाटत आहे. पण, तें कांहीं माणसाच्या हातचें नाहीं तेव्हां, निदान, तुकाराममहाराजांच्या वाणीचे तरी अवतार काढवतील तितके, काढवतील तितक्या रूपांनीं सिद्ध करावे, हें अवश्य कर्तव्य आहे.

तुकाराम महाराजांच्या अभंगाचें वर्णन पंतांनीं केलें आहे:—

ज्याच्या सदभंगातें सेवी जन जेविं बाल आम्यातें
घनसा ह्मणे भरावें सुरसें जें मुख करील आ ग्यां तें. १.

ज्याच्या होय अभंगावांचुनि होऊनि हरिकथा नाहीं
श्रोत्यांसि अभंगांहीं ती दे जशि माय हरिख थानांहीं. २.

त्याप्रमाणेंच वामनांनीं ह्मटलें आहे:—

अयाची वदे पूर्ण वेदांत वाणी
ह्मणावें कसें हो तयालागिं वाणी
परब्रह्मरूपी असा हा तुकावा
तयाचे तुकीं कोण दूजा तुकावा.

ह्याचा प्रत्यक्ष अनुभव, भजनामध्यें भाविक वारकरी मोठ्या प्रेमानें डुलत असतात, त्यांजकडे लक्षपूर्वक पाहिल्यानें पुष्कळ येतो. त्यांत चमत्कार असा दृष्टीस पडतो कीं, संतांच्या मुखांतून तुकाराम महाराजांचें नांव देवांच्या नांवाइतकें-किंबहुना त्यापेक्षां थोडें अधिकच येतें म्हटलें तरी चालेल. हें पुण्य सामान्य नव्हे.

आणखी तुकाराम महाराजांच्या अभंगांत विशेष गुण हा आहे कीं, ते ह्मणायास गोड, समजायास सोपे आणि कोटिक्रमास अत्यंत सयुक्तिक असे आहेत. त्याच्या योगानें असें होतें कीं, विषय स्वार्थाचा असो कीं परमार्थाचा असो, त्याच्या सिद्धीकरणास जसे पाहिजेत तसे दृष्टांत त्यांत सांपडतात. त्यांचा उपयोग अजाणांस आणि सुजाणांस सारखा करितां येतो, आणि विषयप्रतिपादन तेव्हांच मनांत भरतें. ह्यालाच आह्मी प्रसाद ह्मणतों. ह्या प्रसादाचा लाभ आमच्या देशबांधवांस होईल तितक्या सुलभतेनें करून देण्याचा आमचा हा प्रयत्न आहे.

हल्लीं तुकाराम महाराजांची गाथा दोन प्रकारची आढळते; एक साडेचार हजार अभंगांची, व दुसरी नऊ दहा हजारांची. दुसऱ्या गाथेंत तुकाराम महाराजांचे अभंग असून त्यांचे शिष्यांनीं व इतर मंडळीनें केलेले अभंगही त्यांत दाखल केलेले आहेत. फक्त तुकाराम महाराजांचेच अभंग ह्मणून संत मंडळींत जे प्रचलित आहेत, त्यांची संख्या साडेचार हजारांचीच आहे. कै. शंकर पांडुरंग पंडितांनीं शुद्ध करून टीपा दिलेली तुकाराम महाराजांची गाथा ४६४६ अभंगांची' कै. विष्णु शास्त्री पंडित, इंदुप्रकाशचे माजी मालक, यांनीं सरकारच्या उदार आश्रयाखालीं सन १८६९ मध्यें छापून प्रसिद्ध केली आहे. तिच्या प्रस्तावनेंत 'यापेक्षां जास्त अभंग सांपडत नाहींत' असें ह्मटलें आहे. सारांश, साडेचार हजार अभंगांचीच गाथा सर्वमान्य मानली आहे. व आजपर्यंत तुकारामांच्या अभंगांच्या ह्मणून जितक्या गाथा निघाल्या आहेत, तितक्या साडेचार हजार अभंगांच्याच आहेत. ह्मणून आह्मीही तोच क्रम स्वीकारला आहे मात्र

आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या गाथांत आह्मांस जीं न्यूनें वाटलीं, तीं काढण्याचा आह्मी होईल तितका प्रयत्न केला आहे.

सरकारच्या आश्रयाखालीं कै. विष्णुशास्त्री पंडित यांनी प्रसिद्ध केलेली गाथा विशेष शुद्ध मानलेली आहे, व त्याच गाथेची बहुतेक पुनरावृत्ति कै. रा. रा. तुकाराम तात्या व माडगांवकर यांनीं केलेली आहे. ही गाथा तपासून पहातां त्यांत अभंगांतील विषयवारीची किंवा प्रकरणांची शिस्त लावलेली मुळींच दिसत नाहीं. उदाहरणार्थ— ' कान्होबा देवाशीं भांडले ते अभंग ३७ ' असें मथाळ्यावर म्हटलें आहे, व त्याखालीं १४३५ अभंग दाखल केले गेले आहेत. असे प्रकार बरेच आहेत. तसेंच दुबार अभंग पुष्कळ आले आहेत. ते हेः—३५८७—३५६७; ३४४२—३८२७; ३२७२—४२०७. कांहीं ठिकाणीं अभंगांचा अनुक्रम चुकला आहे. आणि मुळाशी वर्णानुक्रमणिकेचा मेळ राहिलेला नाहीं. अशा प्रकारच्या कित्येक उणिवा त्या गाथांत राहिल्याचें आढळून आलें आहे. परंतु ती गाथा पुष्कळ शुद्ध व जुन्या भाषेस धरून तयार केलेली आहे. ही मोठ्या टाइपांत दोन भागांत छापलेली आहे, व तिची किंमत १० रुपये आहे, परंतु हल्लीं तिच्या प्रती विकत मिळत नाहींत. तुकाराम तात्या व माडगांवकर यांनीं छापलेल्या गाथांत प्रकरणाची थोडी बहुत सुधारणा केली आहे, परंतु दुबार झालेले अभंग बहुतेक तसेच राहिले आहेत. थोडे दिवसांपूर्वी इंदिरा प्रेसमध्यें छापलेली गाथा मात्र बरीच लोकांपुढें आली आहे. ह्या गाथेंत विषयवारीची व प्रकरणांची शिस्त बरीच चांगली लावली आहे, परंतु तीं प्रकरणें थोडीं विस्कळीत छापलीं गेलीं आहेत. शिवाय, दुबार झालेले अभंग तसेच राहिले असून सरकारी गाथेंत असलेले कित्येक अभंग तींत मुळींच आले नाहींत, असें आढळून आलें आहे. परंतु, प्रकरणें लावण्याचे कामीं यांनीं चांगलेच परिश्रम केले आहेत, याबद्दल रा. आवटे यांचें आह्मी अभिनंदन करितों.

वर आह्मी इतर गाथांतल्या ज्या उणिवा दाखविल्या आहेत, त्या दाखविण्यांत आमचा उद्देश त्यांचे दोष काढून त्यांजवर टीका करावी असा मात्र कोणीं समजूं नये. उलट आह्मी सदर प्रकाशकांचें मनापासून अभिनंदन करून आभार मानतों. कारण, त्यांनीं आपापल्या परी श्रम घेऊन हा लोकमान्य ग्रंथ होईल तितक्या चांगल्या स्वरूपांत बाहेर आणण्याचा प्रयत्न केला आहे, व सहस्रावधि मराठी वाचकांस त्याचा लाभ करून दिला आहे. ह्या गाथा जर उपलब्ध नसत्या, तर आह्मांस सुद्धां ही गाथा इतक्या शिस्तवार पद्धतीनें लोकांपुढें आणण्यास आणखी कित्येक वर्षें घालवावीं लागलीं असतीं.

वर दर्शविलेल्या चार गाथा आणि त्यांशिवाय तुकारामांचे भक्तांकडून आणि आमच्या हितचिंतक मित्रांकडून मिळालेली माहिती, यांच्या साह्यानेंच आह्मी ही गाथा आजच्या स्वरूपांत लोकांपुढें ठेवण्यास समर्थ झालों आहोंत. ह्या गाथेंत आह्मी ज्या विशेष सुधारणा केल्या आहेत त्या ह्या कीं,—वरील चारी गाथांची चालना करून दुबार असलेले असे जे अभंग आढळून आले, ते कमी केले आहेत, आणि विषयवारीची व प्रकरणांची शिस्त होईल तेवढी क्रमवार लावण्याचे श्रम घेतले आहेत. आमच्या मतानें ह्या विषयवारीच्या बाबतींत या पेक्षांही अधिक सुधारणा झाली पाहिजे आहे, परंतु तें काम एकाच वेळीं होण्यासारखें नाहीं. परमेश्वरकृपेनें ह्या गाथेची दुसरी आवृत्ति छापण्याचा प्रसंग आल्यास ह्या प्रसंगीं राहिलेल्या उणिवा दूर करून प्रकरणें व अभंगांचा अनुक्रम ह्याहीपेक्षां विशेष शिस्तवार लावण्याचा हेतु आहे.

सदर गाथेंतील विषयांचा व अभंगांचा अनुक्रम लावण्याचे कामीं कै. वे शा. सं. भास्कर सखाराम शास्त्री, बडोदें कन्याशाळेंतील संस्कृत शिक्षक, आणि श्रीमति सौ. काशीबाई हेरलेकर, बडोदें येथील कन्याशाळेच्या हेडमिस्ट्रेस, यांनीं फार श्रम घेतले, याबद्दल आह्मी त्यांचे आभारी आहोंत. तसेंच ज्या उपलब्ध गाथांचा या कामीं आह्मांस उपयोग झाला आहे, त्या गाथांच्या प्रकाशकांचे आणि ज्या आमच्या मित्रमंडळींनें आह्मांस वेळोवेळीं माहिती देऊन योग्य सूचना केल्या त्यांचे आह्मी ऋणि आहोंत. शेवटीं ज्या परमेश्वराचे कृपेनें आमच्या हस्तें हें काम तडीस गेलें, त्या जगन्नियंत्याचे आभार मानून ही अल्प प्रस्तावना येथें पुरी करतों.

प्रकाशक.

---

**सूचना**—ही गाथा छापतेवेळीं छापणारांचे नजर चुकीनें पृष्ठांकांचा अनुक्रम चुकला आहे. ह्मणजे ८० पृष्ठानंतर ८१ पृष्ठ छापावयाचें त्या ऐवजीं ९७ पृष्ठ छापलें गेलें आहे. परंतु अभंगांचा अनुक्रम बरोबर आहे. आणि पृष्ठांकांच्या अनुक्रमाच्या चुकीशिवाय त्यांत अभंगांची चूक नाहीं.

श्री.

# श्रीतुकाराम महाराजांचें अल्प चरित्र.

यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा ।
तत्तदेवावगच्छ त्वं ममतेजोंऽश संभवम् ॥ १ ॥

श्रीमद्भगवद्गीता.

चरित्रलेख हा आधींच उत्तम, तशांत साधुपुरुषांचा व त्यांतूनहि तुकाराममहाराजां सारख्यांचा, म्हणजे त्याची थोरवी काय वर्णावी ? महत्वाकांक्षी लेखणीनें तिकडेच धांव घेतली तर नवल नाहीं. ह्या मानवकोटींत आज अनंतकालापासून असंख्य जीव होऊन गेले व होतील, तथापि महाशय तुकाराम महाराजांसारखे थोर पुरुष क्वचितच आढळतील. ह्या मायभूमीला ज्यांनीं रत्नगर्भा हें ब्रीद मिळवून दिलें, अशांच्या वर्गांत ह्या महापुरुषाची गणना करितात. तेव्हां यांचें चरित्र म्हणजे सद्बोधाचा वैरागरच म्हणावयाचा.

तुकाराम महाराजांचें नांव आम्हां महाराष्ट्रीयांच्या ओळखीचें होण्यास त्यांचे अभंगच कारण होत. हे अभंग म्हणजे महाराष्ट्रवासीजनांस यांची एक बहुमोल शाश्वत देणगी असून, परमार्थमार्ग दाखविणारे दीप व भक्तिबोधामृताचे अक्षय्य वहाते, जिवंत झरेच होत; तुकारामांच्या अभंगांचा प्रभाव असा कांहीं विलक्षण आहे कीं, यांच्या म्हणण्याची सत्यता तत्काळ पटून, मन त्यांस सहज वश होतें व अंतःकरणांत यांजविषयीं अत्यंत आदर उत्पन्न होतो आणि असें अद्वितीय मनःसामर्थ्य ह्या पुरुषास कोठून प्राप्त झालें असावें, हें समजून घेण्याची उत्कट जिज्ञासा होते. ह्या अभंगांत तुकारामांचें अंतरंग अगदीं हुबेहुब प्रतिबिंबित झालें आहे. एकेका अभंगांत एकेक स्वतंत्र निवडक तत्त्व ग्रथित केलेलें कित्येक ठिकाणीं आढळतें. निरनिराळ्याकाळीं पृथ्वीच्या पाठीवर होऊन गेलेल्या महात्म्यांचीं नीतिधर्मविषयक उत्तमोत्तम तत्त्वें यांच्या अभंगांत हवीं तेथें स्पष्ट पहायास सांपडतात. पण त्यांत विशेष हें कीं, ह्यांची प्रति-

पादनशैली अगदीं निखालस स्वतंत्र असून, चित्तवेधक आहे. वेद, भगवद्गीता, भागवत, पौराणिक कथानकें, चरित्रें, नीतितत्त्वांचा उपदेश, लोकव्यवहारांतले निरनिराळे प्रसंग, आत्मचरित्र व भक्तिप्रणय इत्यादि अभंगांचे विषय असल्यामुळें, त्या त्या प्रसंगाची माहिती असल्यावांचून, अथवा कल्पना मनांत आणल्यावांचून कांहीं अभंग समजत नाहींत. ह्या सर्व अभंगांत तुकाराम महाराजांचें अंतरंग ठिकठिकाणीं अगदीं हुबेहुब प्रतिबिंबित झाल्यामुळें, त्यांचें चरित्र लिहिण्यास ह्यांतले पुष्कळ अभंग आधारभूत झाले आहेत.

तुकाराम महाराजांच्या चरित्रलेखनास साधनें म्हटलीं तर हे वरील अभंग, महीपति यांनीं भक्तलीलामृतांत दिलेलें वर्णन, व तुकारामांच्या वंशजांत प्रचलित असलेल्या दंतकथा एवढींच होत; व यांचेंच अवलंबन आजपर्यंतचे सर्व लेखक करीत आल्यामुळें, आम्हांसहि त्यांचेच अनुयायी व्हावें लागत आहे.

तुकाराम महाराजांचें घराणें मोरे या उपनांवानें प्रसिद्ध असून, त्यांचें मूळ ठिकाण देहू गांव होय. पुण्याजवळ सुमारें आठ कोसांवर इंद्रायणी नामक नदी आहे, तिच्या तीरीं हा गांव आहे. येथेंच तुकाराम व त्यांचे पूर्वज रहात आले. ह्या घराण्यांत पूर्वापार विठोबाची भक्ति चालू होती, तथापि तुकारामाचे आठवे पूर्वज जे विश्वंभर त्यांच्या वेळेपासून ही भक्ति वाढत जाऊन, तुकारामांच्या वेळीं ती अगदीं शिखरास जाऊन पोहोंचली असावी, असें दिसतें; कारण हल्लीं देहू मुक्कामीं जें विठोबाचें प्रसिद्ध देऊळ दिसतें, तें विश्वंभरांनींच बांधिलें असें ह्मणतात.

विश्वंभर हे लहान असतांच त्यांचे वडील निवर्तले. घरांत यांची आई व हे अशीं दोनच माणसें असत. ह्यामुळें यांस रीतभात लावणारी व कुलाचार शिकविणारी काय ती आईच. मोठे होतांच तिनें याचें लग्न करून दिलें. ह्यांच्या पूर्वजांचा धंदा व्यापार. तोच हे मोठ्या इमानानें व दक्षतेनें चालवीत. विश्वंभर हे स्वभावानें फार सुशील व नेहमीं संतुष्टवृत्ति असून, साधुसंतांविषयीं यांस मोठा आदर वाटत असे. इष्ट मित्र जमवून रात्रीं भगवद्भजन करणें, साधुसंतांचा मनापासून परामर्ष घेणें ह्या गोष्टी त्यांच्या मोठ्या आवडत्या असल्यामुळें, त्यांच्या द्रव्याचा यांत पुष्कळ व्यय होई. त्यावेळच्या तेथल्या बहुतेक घराण्यांतून पंढरपूरची वारी करण्याची चाल असे. तशीच मोऱ्यांच्या घराण्यांतहि होती. विश्वंभर मोठे झाले, असें पाहून त्यांच्या आईनें त्यांसहि वाडवडिलांच्या चालीप्रमाणें वारी करीत जाण्याविषयीं सांगितलें. उत्तम सुपीक जमीनींत जसा बीं

पेरायचा मात्र अवकाश, कीं पीक दाटलेंच समजा; तसें विश्वंभर हे आधींच जन्मतः प्रेमळ भक्त, त्यांत आणखीं आईची आज्ञा, ती होतांच जणुं काय त्यांच्या आधींच प्रेमपूर्ण हृदयांत भगवद्भक्तिवृक्षाचा अंकूर उगवून तो तत्काळ विस्तरूं लागला. विश्वंभर पंढरीच्या वारीस पहिल्यानें गेले होते, तेव्हां विठोबाच्या दर्शनानें व साधुसंतांच्या सहवासादिकांनीं त्यांच्या मनास फार सुख झालें. अंतर्यामीं भक्ति ठसली व परत येऊन, दर पंधरवड्यास वारी करण्याचा आपला निश्चय त्यानीं आइस कळविला व त्याप्रमाणें त्यांनीं सतत सोळा वाऱ्या केल्या. ह्यांचें चित्त भगवद्भक्तींत रमल्यामुळें प्रापंचिक व्यवसायांत सहजच थोडी हयगय होत गेली व त्यामुळें त्यांचे आप्तइष्ट त्यांस बोलूं लागले. कोणी यांस वाखाणीत व कोणी यांचा उपहास करीत. तरी पण विश्वंभर हे अत्यंत निश्चयी असल्यामुळें त्यांनीं हें सारें जुमानिलें नाहीं. शेवटीं सतराव्या खेपेस पंढरपुरास जाणार तों त्यांस स्वप्नांत येऊन श्री विठोबांनीं सांगितलें कीं, " वारी करण्याचें कारण नाहीं, मी येथेंच आलों आहें. " नंतर देहू मुक्कामीं अंब्याच्या वनांत विश्वंभरांस श्रीविठोबा रखुमाईच्या स्वयंभू मूर्ति भुईंत सांपडून दृष्टांताची प्रतीती आली. मग इंद्रायणीतीरीं लहानसें देवालय बांधून, मूर्तिस्थापना करून, ते तेथेंच भजन पूजन व पंढरीसारखा एकादशीचा उत्सव करूं लागले; आषाढी कार्तिकी एकादशीची पंढरपूरची वारी मात्र त्यांनीं आमरण सोडिली नाहीं.

पुढें कांहीं वर्षांनीं विश्वंभरांचें देहावसान झालें. ह्यांची बायको आमाबाई, व हरि व मुकुंद हे दोन मुलगे एवढाच कुटुंबपरिवार होता. आमाबाई ह्या भ्रताराप्रमाणेंच भक्तिनिष्ठ असत. त्यांनीं विश्वंभरांच्या मागें भजनपूजनक्रम अगदीं यथास्थित चालवून, मुलें वयांत येतांच त्यांचीं लग्नें करून दिलीं. विश्वंभराची घरची स्थिति चांगली होती.

हरि व मुकुंद हे दोघे मुलगे आईबापांसारखे भक्तिमान् नव्हते, त्यांस सामान्य जनांप्रमाणें ऐहिकसुखप्राप्तीची महत्वाकांक्षा असल्यामुळें क्षात्रधर्मानुरूप राहून प्रतिष्ठा व संपत्ति मिळविण्याच्या इच्छेनें आपल्या मातुश्रीच्या इच्छेविरुद्ध त्या उभयतांनीं फौजेंत हुद्याच्या जागा मिळवून ते एका राजाच्या पदरीं राहिले. पुढें तेथें स्वपराक्रमानें व राजकृपेनें ते मोठ्या योग्यतेस चढले व मातुश्रीसह लवकरच त्यांनीं आपल्या बायकांस नोकरीच्या गांवीं नेलें. आमाबाईना पूर्वापार विठ्ठलभक्तिपूजन अंतरल्यामुळें अतिशय वाईट वाटलें व त्या मुलांजवळ निरुपायास्तव राहिल्या. एकीकडे पुत्रमोह व एकीकडे विठ्ठल भजनपूजनाचा त्याग केल्याचा पश्चात्ताप, ह्या दुहीमुळें आमाबाईचें मन रात्रंदिवस

अस्वस्थ असे; त्यांस वारंवार स्वप्नें पडत, त्यांत विठोबा आपणांस परत देहूस बोलावीत आहे, पुत्रमोहास वश होऊं नये असें सांगत आहे, असें दिसे; परंतु मुलांचा त्यावर विश्वास नसे त्यामुळें त्यांस गप्प बसावें लागे. एकदां आमाबाईस असें स्वप्न पडलें कीं, विठोबाचा आपणांवर अतिशय कोप झाला आहे, व दोन्ही मुलगे युद्धांत रणांगणीं पडले असून त्यांच्या घराची व मालमत्तेची वाताहात झाली आहे. जाग्या होतांच आमाबाई मोठमोठ्यानें रडूं लागल्या. त्यांनीं मुलांस स्वप्न सांगितलें, पण त्यांना मुळींच खरें वाटलें नाहीं. आमाबाई मात्र अतिशय कष्टी झाल्या व त्यांना पश्चात्तापानें व हुद्रोगानें घेरून टाकलें.

थोडेसे दिवस लोटले नाहींत तोंच हें दुष्ट स्वप्न खरें झालें. राजावर परचक्र येऊन युद्ध झालें त्यांत हरि व मुकुंद यांनीं लढण्याची शिकस्त केली, पण त्या युद्धांत ते पडले. शत्रूच्या लोकांनीं गांवांत लूट मांडिली; त्यांत त्यांचें सर्वस्व लुटून नेलें. दोघी सुनांपैकीं धाकटी, मुकुंदाची बायको त्यावेळच्या क्षत्रियांच्या चालीप्रमाणें सती गेली. थोरली गरोदर होती म्हणून राहिली. ह्या अरिष्टानें आमाबाईच्या दुःखास पारच राहिला नाहीं, सुनेस बरोबर घेऊन त्या देहूस परत आल्या व तिला बाळंतपणासाठीं माहेरीं पाठविलें. आमाबाई ह्या आधींच भाविक व कोवळ्या मनाच्या, त्यांत पश्चात्तापांत दिवस घालविलेले व त्यांतच आणखी हा भयंकर प्रसंग आल्यामुळें त्यांच्या मनाची काय अवस्था झाली असेल हें कल्पनेनेंच जाणावें. संसारसुखाची पूर्ण निराशा व विठ्ठलभक्तित्यागाचा पूर्ण अनुताप मनांत सतत वसत असल्यामुळें त्या अगदीं विरक्त झाल्या व त्यांनीं तनमनधन रात्रंदिवस विठ्ठलसेवेस अर्पण करून, पूर्ववत् भजनपूजन सुरू केलें. आपल्या पुत्रमोहाच्या प्रायश्चित्तार्थ देवपूजन हाच जीविताचा एक हेतु समजून, त्यांतच त्या मरेपर्यंत राहिल्या. घरांत मिळविता पुरुष नसल्यामुळें खाण्यापिण्याचे हाल फार होऊन, आमाबाईचे डोळे गेले. तरी हें सारें त्यांनीं धैर्यानें सहन करून, भक्तिपरायणता ढळूं दिली नाहीं. तिकडे माहेरीं त्यांची सून प्रसूत होऊन पुत्र झाला, त्याचें नांव विठोबा ठेविलें. तो बोलता चालता होतांच सासूच्या दुखण्याचें वर्तमान ऐकून मुलास घेऊन ती देहूस येण्यास निघाली, पण ती येण्याच्या अगोदरच आमाबाई मृत्यु पावल्या होत्या.

नंतर विठोबासह आमाबाईची सून देहूसच राहिली व विठ्ठलभक्तीचा कुलाचार चालवूं लागली. मोठेपणीं विठोबास आईकडून पूर्वजांचा इतिहास समजला, त्या वेळेपासून

त्यांनीं पंढरीची वारी पुन: सुरू केली. ते आईस घेऊन दरवर्षी वारीस जात. ईश्वराच्या दयेनें विठोबांचें लग्न होऊन, संसार चांगला झाला, व वंशहि वाढला. यांचे पुत्र पदाजी, पदाजींचे शंकर, शंकरांचे कान्हया, व कान्हयांचे बोल्होबा. हे सर्व या कुळांत जन्मलेले पुरुष थोडे बहुत भक्तिनिष्ठ निपजले. तथापि बोल्होबा हे सर्वांत धर्मनिष्ठ होते. ह्या सर्व जणांनीं पंढरपूरची वार्षिक वारी कधीं चुकूं दिली नाहीं. बोल्होबा व त्यांची पत्नी कनकाई हीं उभयतां पूर्ण भगवद्भक्त व अत्यंत शुद्धाचरणी होतीं. पोटीं संतान नसल्यामुळें तीं उभयतां निराश व कष्टी असत व संतानप्राप्तीसाठीं नवसही करीत. अशा साधु दंपत्याची भक्तदयाळ परमेश्वर कधीं उपेक्षा करील काय ? त्यांजवर लवकरच त्याची उदार कृपादृष्टि वळली व कालांतरानें ह्या जोडप्यास तीन पुत्ररत्नें झालीं. त्यांचीं नांवें सावजी, तुकाराम व कान्होबा. भगवंतानें आपले मनोरथ असे सफळ केले, ह्मणून हें वृद्ध जोडपें कृतज्ञतेनें ईश्वरचरणीं विशेष लीन राहून सेवा करूं लागलें. सावजी, तुकाराम व कान्होबा हे तिघे पुत्र अनुक्रमें महादेव, विष्णु व ब्रह्मदेव यांच्या वरांमुळें झाले असें ह्मणत. त्यांत तुकाराम हे नामदेवाचे अवतार मानितात. नामदेव व तुकाराम यांचे अभंग ताडून पाहिले तर पुष्कळ साम्य दिसतें. अंतरंग, अतिशय भक्तिपरता व ईशप्रेमातुरता सारखी आहेसें कोणालाही दिसून येतें. नामदेवांस शतकोटि अभंग करावयाचे होते, त्यांतले पांच कोटि एकावन्न लक्ष बाकी होते त्यांची पूर्तता तुकारामांचा अवतार घेऊन केली असें म्हणतात. असा एक अभंग सरकारी गाथेंतल्या चरित्र वर्णनांत आढळतो:—

( विठोबाचें तुकारामांशीं स्वप्नांत भाषण. )

चाळीस लक्ष चौऱ्याणव कोटी । नव लक्ष लळित आलें शेवटीं ।
मग ( नामदेव ) आला वैकुंठीं । स्वइच्छा ॥
एकावन्न लक्ष पांच कोटी जाणें । शेष राहिले यांचें ( नामदेवांचें ) बोलणें ।
ते तूं वदें प्रसादवचनें । सप्रेम जीवन मी देतों ॥

महीपति.

वेदाचे अभंग केले श्रुतिपर । द्वादश सहस्र संहितेचे ॥ १ ॥
निरुक्त निघंट आणि ब्रम्हसूत्र । अवतार सहस्र उपग्रंथ ॥ २ ॥
अभंग ते कोटी भक्तिपर केले । ज्ञानपर केले तितुकेचि ।
पंचाहत्तर लक्ष वैराग्य वर्णिलें । नाम तें गाइलें तितुकेंचि ॥

साठी लक्ष केला बोधक जनांसी । वर्णिलें रूपासी तितुकेंचि
द्वादशसहस्र आत्मबोध केला । अनुभव घेतला एक कोटि ।
चौतीस सहस्र लक्ष कोटि पांच । सांगोनियां साच तुका गेला ॥

यांत वर्णिलेली संख्या पटत नाहीं व हा अभंग तुकारामांचा नसावा; कारण हा कोणत्याही गाथेंत आढळत नाहीं.

तुकारामांच्या बाळपणचा वृत्तांत फारसा कोठें आढळत नाहीं. पण एका गाथेंत त्यांचे बंधु कान्होबा यांचा एक अभंग दिला आहे, त्यांत बाळपणची एक आख्यायिका आहे ती अशी. शेतकऱ्यांच्या मुलांप्रमाणें तुकारामांसहि घरचीं गुरें राखणीस न्यावीं लागत. पण त्यांना तें काम फारसें आवडत नसे, ह्मणून ते कोठें एकीकडे जाऊन बसत. त्यांना लहानपणीं खेळ फारसे आवडत नसत. त्यांनीं बाळक्रीडेचें वर्णन करितांना खेळांविषयीं अभंग केले आहेत. तरी अगदीं लहानपणापासून विठ्ठलाच्या भजन पूजनाचा त्यांना नाद असून खेळहि त्याचाच आवडे. एके दिवशीं त्यांच्या सोबत्यांनीं कनकाईस येऊन सांगितलें कीं, तुमचा मुलगा गुरांजवळ नसतो; तो कोठें तरी एकीकडे जाऊन बसतो व आम्हांला गुरें राखावीं लागतात, तुम्ही त्याला कांहीं सांगा; रोज रोज त्याचें काम आम्हीं काय म्हणून करावें! हें ऐकून कनकाईस फार राग आला व त्या रागानें तुकारामास म्हणाल्या "तुझ्यानें एवढें कामसुद्धां धड होत नाहीं, तर उगाच जगलास कशाला? मरेनास का एकादाचा!" तुकारामांनीं हें सारें मुकाट्यानें ऐकून घेतलें व आपल्या सोबत्यांस जाऊन विचारूं लागला कीं, गड्यानों, आईनें मला मरायला सांगितलें आहे तर मरतात कसें तें तुम्हाला ठाऊक असलें तर मला सांगा. तेव्हां मुलांनीं आपल्या काठ्या तिरडीसारख्या बांधून त्यावर तुकारामांस निजवून नदी कांठीं वाळवंटांत नेऊन रेती उकरून पुरलें. व वर रेती लोटली व परत जावयास लागले. इतक्यांत त्यांस वाटलें कीं हा गुदमरेल, म्हणून परत वळूं लागले तों नदीस एकाएकीं पूर आला म्हणून ते तसेच पळून गेले संध्याकाळ झाली, गुरें घरीं आलीं, तरी मुलगा घरीं कां आला नाहीं म्हणून कनकाई काळजी करूं लागल्या व शेजारीं जाऊन मुलांस विचारूं लागल्या तों त्यांनीं सर्व सांगितलें; तें ऐकतांच मोठ्यानें रडत रडत त्यांनीं वाळवंटाकडे धांव घेतली व मुलास हाका मारूं लागल्या; तुकारामांनीं त्या खड्ड्यांतून ओ दिली! तेव्हां आईचा आनंद पोटांत मावेना. त्यांनीं धांवत जाऊन तुकारामांस बाहेर काढून पोटाशीं धरिलें व असें कां केलेंस

म्हणून मोठ्या ममतेनें विचारिलें. तेव्हां 'तूं मर म्हटलेंस ह्मणून मी मेलों' असें ते ह्मणाले. कनकाई जरी रागाच्या सपाट्यांत तेवढ्या वेळेपुरतें तसें बोलल्या तरी मागून त्यांना पश्चात्ताप झाला. पण थोडासा उशीर झाला असता, तर आज केवढा अनर्थ झाला असता! भगवंताच्या दयेनें आपला मुलगा आज आपणास परत मिळाला ह्मणून कृतज्ञ अंत:करणानें देवाची स्तुती करीत कनकाई मुलास आनंदानें घेऊन घरीं गेल्या. ह्या एका गोष्टीवरून सुद्धां तुकारामांच्या अंगचे भावी गुण प्रगट झालेले दिसतात. अतिशय आज्ञाधारकता, सहनशीलता, नम्रता, स्वार्थशून्यता व विलक्षण निर्भयता, हे सारे गुण पहाणारांस या एका गोष्टींत देखील दिसतात. ज्यांच्या हातून राष्ट्रशिक्षणाचें महत्कृत्य व्हावें अशी प्रभूची योजना, त्यांचा अंत तो अकालीं कां होऊं देईल? 'शुद्ध बीजा पोटीं। फळें रसाळ गोमटीं ॥' हें तुकारामाचेंच वचन आहे. बोल्होबा व कनकाई हें जोडपें मोठें सात्त्विक व भक्तिनिष्ठ त्यांत आणखीं भगवंतानें उत्तम पुत्रदान देऊन त्यांचें अभीष्ट पुरविलें, तेव्हां त्यांची भगवद्भजनवृत्ति विशेषच प्रकाशली. हे तिघे मुलगे उपजतच पवित्रसंस्काराचे, सदाचरणी आईबापांचे व त्यांच्याच सहवासांत वाढलेले मग ते उत्तम निपजले हें सांगणें नकोच. ह्यांच्या अंगचीं उत्तम लक्षणें बाळपणीं अनेक प्रसंगीं प्रकट होत असत. बोल्होबा पंढरीच्या वारीस अथवा कामाकाजास बाहेर गांवीं जात तेव्हां देवळांतील देवांची पूजा वगैरे धाकटे तुकाराम पहात. पण त्यांना तें काम इतकें प्रिय असे कीं, त्यांत किती वेळ गेला ह्याचेंही त्यांस भान राहत नसे, इतकी त्यांची वृत्ति पुजेंत तल्लीन होई. तसेंच वडील घरीं नसतां कोणी साधुसंत अतिथी आले तर त्यांचें आदरातिथ्य तुकाराम व त्यांचे भाऊ फार उत्तम करीत. त्यामुळें त्यांची ह्यांजवर तत्काळ प्रीति जडे व बोल्होबाजवळ ते मुलांच्या गुणांची तारीफ करीत तेव्हां त्यांसही मोठी धन्यता व अभिमान वाटे. ह्याप्रमाणें अनेक प्रसंग आल्यानें तुकारामांच्या अंगच्या उत्तम गुणांस चांगली दिशा लागून मोठेपणीं शोभणारें सर्व गोष्टींचें ज्ञान त्यांनीं लहानपणीं संपादन केलें. बोल्होबांचें चरित्र बारकाईनें पाहूं गेलें, तर असें दिसतें कीं, या भाविक पुरुषावर ईश्वराची विशेष कृपादृष्टि होती. त्यांची पत्नी त्यांच्याचसारखी असून, मुलेंही सदाचरणी. एवढेंच नव्हे, तर संसारांत सुख, द्रव्यप्राप्ति, धंद्यांत यश व लोकांत कीर्ति, हीं सर्व असून वर भगवद्भक्तिकडे मनाचा सतत ओढा असे! घरची सुस्थिति असल्यामुळें मुलांचीं लग्नकार्यें होऊन चांगल्या संपन्न घराण्याशीं सोयरिकी

जमल्या. बाल्होबा वृद्ध होत चालले, ह्मणून संसारसूत्रें पुत्रांच्या हातीं देण्याचें योजून त्यांस व्यापारसंसाराविषयीं माहिती करून देऊं लागले. परंतु वडील पुत्र सावजी यांचें चित्त संसारांत मुळींच नव्हतें, ते नेहमीं विरक्तवृत्ति असत, त्यांनीं संसार चालविण्याचें काम पत्करण्याची आपली इच्छा नाहीं असें वडिलांस कळविलें. तुकाराम ह्या वेळीं काय ते १३ तेराच वर्षांचे होते. त्यांजवरच हा प्रपंच येऊन पडला. ते लहान ह्मणून बोल्होबा त्यांस व्यापारउदीमाची, व संसार चालविण्याची माहिती देत असत. आईबापांचें ऐकून त्यांस, ज्ञानदेव, नामदेव, मुक्ताबाई आदि साधूंचे अभंग ह्मणतां येत असत. त्यांस लिहिण्या वाचण्याचें ज्ञान लहानपणीं करून दिलें असल्याचें कोठेंच आढळत नाहीं. पण पुढें मोठेपणीं त्यांनीं तें प्राप्त करून घेतलें असावें असें दिसतें. त्यांच्या अभंगांवरून त्यांच्या बुद्धीचा विकास चांगलाच झालेला दिसतो.

ह्यांची पत्नी रखमाबाई ह्यांस दम्याचा उपद्रव होता, ह्मणून पुण्यांत अप्पाजी गुळवे नांवाचे कोणी श्रीमंत व्यापारी होते त्यांची कन्या जिजाई ऊर्फ अवलाईशीं यांचें दुसरें लग्न करून दिलें. संसारपाश गळ्यांत पडून सुमारें चार वर्षें होई तों यांचें ठीक चाललें होतें. व्यापारांत फायदा व लोकांत प्रतिष्ठा मिळाल्यानें वृद्ध मातापितरांस अंतकाळीं मोठें समाधान वाटे. पण ही स्थिति अल्पकाळ टिकली. सतराव्या वर्षी त्यांचे आइबाप पांच सहा महिन्यांच्या आंत अंतरले व हळूहळू दुर्दशेस सुरवात झाली. तुकारामांचें अंतःकरण आधींच अतिशय कोंवळें, वय लहान व त्यांत आई व बाप दोघांचाहि अंत थोड्याच दिवसांत झालेला, तेव्हां त्या दुःखानें त्यांच्या मनास फारच धक्का बसला. भावंडादिकांच्या शोकानें त्यांचें हृदय दुभंग झालें. यास वर्ष लोटतें न लोटतें तों सावजींची पत्नी मरण पावली. ती एक तुकारामांच्या दुःखांत भर पडली, सावजी आधींच विरक्त, त्यांस संसारपाश मुळींच नको असे, पण पत्नी असेपर्यंत त्यांस प्रपंचत्याग करितां येईना, तो पाश देवानें आयताच तोडिला, मग प्रपंच बंधनांतून मोकळे होण्यास त्यांस उशीर कसला? ते लागलेच सर्वसंगपरित्याग करून तीर्थयात्रेस निघून गेले, ते जन्मांत पुनः परतच आले नाहींत. त्यांनीं उरलेलें आयुष्य साधुसंत सहवासांत व ईश्वर भजनांत घालविलें असें ह्मणतात. ते घरांत चित्त घालीत नसत, तरीही तुकारामांस त्यांचा मोठा आधार होता. असे हे एका मागून एक दुःखाचे प्रसंग लोटल्यामुळें तुकाराम अगदीं उदासीन झाले; त्यांचें चित्त संसारांतून

पार उडालें व नदीच्या ओघासारखें ईश्वराकडे वळलें. तें पुनः मागें फिरलें नाहीं. घरांत कुटुंब मोठें असून पोशिंदे कायते हेच, आणि चित्त तर संसारास विटलेलें, तेव्हां व्यापार धंदा, देणें घेणें सुरळीत चालेनासें झालें. आप्तइष्टानांही यांची वैराग्यवृत्ति कशी रुचणार ? तीं सामान्य माणसें ! तीं यांस कंटाळून गेलीं व नानाप्रकारें उपहास करूं लागलीं. खरोखर, भगवंताच्या ह्या विचित्र सृष्टींत जेवढे म्हणून चमत्कार आहेत, त्या सर्वांत साधु पुरुषांचा मूर्खांनीं केलेला छळ हा अत्यंत विलक्षण चमत्कार होय. कुटुंब चरितार्थ चालविण्यासाठीं द्रव्य मिळावें, म्हणून ते निरनिराळ्या प्रकारें उद्योग करीत, पण महागाई व दुष्काळामुळें त्या मेहनतीचें कांहीं एक चीज झालें नाहीं. दुष्काळ तर इतका भयंकर पडला होता कीं, धारण शेरावर येऊन बसली ! यांच्या विसाव्या वर्षीं त्यांची पहिली पत्नी रखमाबाई व त्यांचा पुत्र संतुजी हीं अन्न अन्न करून वारलीं. त्यांचेसाठीं तुकारामांनीं अन्नासाठीं दारोदार भिक्षा मागितली पण कोणी कांहीं घालीना. मरण हें आधींच भयंकर, त्यांतून अशा तऱ्हेनें आलेलें, मग मागें रहाणाऱ्या माणसांच्या जिवाला किती हळहळ वाटली असेल तिची कल्पनाच करणें बरें. पुढील वर्षीं घरांत चार गुरें होतीं तींहि मरून गेलीं व दिवाळें निघालें. दुर्दैव हात धुवून पाठीस लागल्यावर मनुष्य किती टिकाव धरणार ? प्रियजनांचा वियोग, संसाराचें वाटोळें, लौकिकाचा सत्यानाश, आप्तइष्टांच्या मर्मभेदक उपहासोक्ति, ह्या साऱ्या असह्य विपत्तींनीं तुकारामांची अवस्था अत्यंत हीन व करुणास्पद झाली व इहलोकच्या अनंत विषयांनीं यांजकडे पाठ फिरविली, तेव्हां यांच्या अनाथ व निराधार मनोवृत्तीस एकट्या भगवद्भक्तीनें मात्र शाश्वत थारा दिला. ही तुकारामांच्या आयुष्याच्या पूर्वार्धाची म्हणजे पहिल्या २१ वर्षांची हकीकत झाली. ‘ तुम्हांस वैराग्य कसें झालें ’ असें एकदां कांहीं संतांनीं विचारिलें, त्यास उत्तर म्हणून तुकारामांनीं हे अभंग म्हटले:—

याती शूद्र वंश केला वेवसाव । आदि तो हा देव कूळ पूज्य ॥ १ ॥
नये बोलों परि पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुम्हीं संतीं ॥ २ ॥
संवसारें जालों अति दुःखें दुःखी । मायबाप सेखीं क्रमिलिया ॥ ३ ॥
दुष्काळें आटिलें द्रव्यें नेला मान । स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली ॥ ४ ॥
लज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें । वेवसाय देखें तुटी येतां ॥ ५ ॥

देवाचें देऊळ होतें तें भंगलें । चित्तासी जें आलें करावेंसें ॥ ६ ॥
आरंभीं कीर्तन करीं एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥ ७ ॥
कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनियां ॥ ८ ॥
गाती पुढें त्यांचें धरावें धृपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥ ९ ॥
संतांचे सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥ १० ॥
टाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनि ॥ ११ ॥
वचन मानिलें नाहीं सुहृदांचें । समूळ प्रपंचें वीट आला ॥ १२ ॥
सत्य असत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमतां ॥ १३ ॥
मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥ १४ ॥
यावरि या जाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ १५ ॥
निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखविलें ॥ १६ ॥
बुडविल्या वह्या बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥ १७ ॥
विस्तारीं सांगतां बहुत प्रकार । होईल उशीर आतां पुरे ॥ १८ ॥
आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे ॥ १९ ॥
भक्ता नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसा कळों आलें ॥ २० ॥
तुका ह्मणे माझें सर्व भांडवल । बोलविले बोल पांडुरंगें ॥ २१ ॥

ऐका वचन हें संत । मी तों आगळा पतित ॥
काय काजें प्रीत । करितसां आदरें ॥ १ ॥
माझें चित्त मज ग्वाही । सत्य तरलों मी नाहीं ॥
एकां चिये वाहीं । एक देखीं मानिती ॥ २ ॥
बहु पीडिलों संसारें । मोडीं पुसें पिटीं ढोरें ॥
न पडतां पुरें । या विचारें राहिलों ॥ ३ ॥
सहज सरलें होतें कांहीं । द्रव्य थोडें बहु तेंही ॥
त्याग केला नाहीं । दिलें द्विजां याचकां ॥ ४ ॥
प्रियापुत्र बंधु । यांचा तोडिला संबंधु ॥
सहज जालों मंदु । भाग्यहीन करंटा ॥ ५ ॥
तोंड न दाखवे जना । शिरें सांदी भरें राणां ॥
एकांत तो आणां । तयासाठीं लागला ॥ ६ ॥

पोटें पीडिलें आहारें । दया नाहीं या विचारें ॥
बोलाविता बरें । सहज ह्मणे या साठीं ॥ ७ ॥
सहज वडिलां होती सेवा । ह्मणोनि पूजिलों या देवा ॥ ॥
तुका ह्मणे भावा । साठीं ह्मणी घ्या कोणी ॥ ८ ॥
बरें जालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥ १ ॥
अनुतापें तुझें राहिलें चिंतन । जाला हा वमन संवसार ॥ २ ॥
बरें जालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥ ३ ॥
बरें जालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥ ४ ॥
बरें जालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥ ५ ॥
बरें जालें तुझें केलें देवाईल । लेंकरें बाईल उपेक्षिलीं ॥ ६ ॥
तुका ह्मणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासीं जागरण ॥ ७ ॥

तुकारामांचें बहुतेक चरित्र ह्या अभंगांत प्रतिबिंबित झालें आहे. ह्याप्रमाणें अनेक ऐहिक संकटांनीं वैतागलेले तुकाराम अत्यंत विरक्त झाल्यामुळें त्यांच्या बायकोस व आप्तइष्टांस, कुटुंबाचा योगक्षेम पुढें कसा चालणार ही मोठी चिंता येऊन पडली. त्यांनीं त्यांस परोपरीनें समजुतीच्या गोष्टी सांगून पाहिल्या. आर्जव, गोडीगुलाबी, निर्भर्त्सना करून व तिरस्कार, धिःकार इत्यादि सर्व प्रकारानें बोलून पाहिलें, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. संसारांतून मन उठलें तें उठलेंच. लोकांचें सांगणें ते मुकाट्यानें ऐकून मात्र घेत, परत उत्तर कांहींच करीत नसत. एकटें बसून विचार करीत रहावयाचें हें त्यांनीं व्रत घेतलें होतें. ह्यास कोणी व्यत्यय करितील, ह्मणून ते एकदां गपचुप घरांतून निघून गेले व देहूहून दोन कोसांवर भांबनाथ ह्मणून डोंगर आहे तेथें जाऊन स्वस्थ व एकाग्र चित्तानें भगवंताचें ध्यान भजन करीत राहिले. अन्न पाण्याचीहि पर्वा केली नाहीं. हे असे एकाएकीं नाहींसे झालेले पाहून घरच्या माणसांस हुरहुर लागली, तेव्हां धाकटे बंधु कान्होबा त्यांच्या शोधास निघाले, ते फिरतां फिरतां सात दिवसांनीं भांबनाथास जाऊन पोहोंचले. मग त्यांस तुकाराम भेटले. त्या ठिकाणींच तुकारामांस ईश्वर दर्शन झालें, असें महीपतीनीं लिहिलें आहे. भगवद्दर्शन झालेल्या ठिकाणीं त्यांनीं पादुका स्थापन केल्या, त्या अद्यापि तेथें दिसतात. कान्होबांस भावाच्या भेटीनें अतिशय आनंद झाला. त्यांनीं मोठ्या आर्जवानें तुकारामांस परत घरीं यावें असें ह्मटलें. तेव्हां त्यांच्या आग्रहार्थ तुकाराम त्यांजबरोबर

घरीं येण्यास निघाले ते वाटेंत दुसऱ्या दिवशीं इंद्रायणीचे तीरीं बसले. व तेथेंच उभयतां बंधूंनीं सात दिवसांचा उपवास सोडला. नंतर कान्होबांकडून घरांतलीं खतें पत्रें तुकारामांनीं तेथें आणविलीं; व भावास ह्मणाले कीं, " ह्यांवरून लोकांकडे आपलें बरेंच येणें आहे असें दिसतें, पण तें वसूल करूं लागलों तर त्यांशीं शत्रुत्व होईल, ह्मणून त्या भरीस न पडतां हीं खतें इंद्रायणींत बुडवून टाकणें बरें. " परंतु कान्होबांस हें म्हणणें पसंत पडलें नाहीं. ते तुकारामांसारखे विरक्त झाले नव्हते. ह्मणून भावास अत्यंत विनयानें विनवूं लागले कीं, " मीं धाकटा, आपण वडील. आपणांस कांहीं सांगण्याचा अधिकार मला पोंहोंचत नाहीं; पण आपण वैराग्य धरिलें तसें माझें नाहीं, माझ्या मागें संसार आहे, तो कसा चालेल ? " तेव्हां तुकारामांनीं त्या खतापत्रांच्या दोन सारख्या वांटण्या करून, भावाची भावास देऊन आपली इंद्रायणीस अर्पण केली व सांगितलें कीं, " मला इतःपर संसार करणें नाहीं, चरितार्थ कसाहि चालो, भगवद्भजन हाच माझ्या जन्माचा कृतसंकल्प, तेव्हां आपलें दोघांचें जुळेलसें दिसत नाहीं, तुमचा विचार तुह्मीं पाहावा. " हें समजतांच कान्होबा आपला संसार वेगळा करून राहूं लागले.

देहूस परत आल्यावर तुकारामांनीं आपला नित्य क्रम ठेविला तो असा. सकाळीं इंद्रायणीस्नान करून वडिलांनीं बांधलेल्या विठोबाच्या देवळांत जाऊन पूजाअर्चा करावयाची, मग वनांत जावयाचें. देहूजवळ तीन कोसांवर भांडार पर्वतावर ते वारंवार जाऊन राहात. अगदीं मिताहार करून मुखानें अहर्निश भगवन्नामाचा घोष व एकांत विचार चालवीत असत. संध्याकाळीं परत आल्यावर रात्रीं विठोबाच्या देवळांत भजन करीत. त्यांस पोटासाठीं भिक्षा मागण्याचे प्रसंग फारच क्वचित येत. संसारत्याग केला तरी चरितार्थासाठीं उद्योगास मुळींच शिवायचें नाहीं असा कांहीं त्यांचा कृतनिश्चय नव्हता. भगवद्भजनास व्यत्यय न येतां एकाद दुसरा काम धंदा उचलण्यास ते राजी असत, कारण त्यांस भिक्षावलंबन अप्रिय वाटत असे. त्याविषयीं त्यांचा एक अभंग पुढें पहावा—

भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ॥ १ ॥
ऐसियासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥ २ ॥
देवापायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव ॥ ३ ॥
समर्पिला जीव । नाहीं तों हा व्यभिचार ॥ ४ ॥

जगा घालावें सांकडें । दीन होऊन बापुडें ॥ ५ ॥

होंचि अभाग्य रोकडें । मूळ आणि विश्वास ॥ ६ ॥

काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार ॥ ७ ॥

तुका ह्मणे सार । दृढ पाय धरावे ॥ ८ ॥

अशा निस्पृहवृत्तीचीं माणसें भिक्षेचा आदर कितपत करितील, हें कांहीं सांगायाला नकोच. त्यांच्या पत्नीच बहुतेक नेमानें त्यांस वाढून नेत, व मागाहून आपण अन्नग्रहण करीत. तुकाराम हे भगवद्भक्तजनांस आड न येतील अशीं कामें पत्करीत असत. त्यांनीं एकदां अदमण दाणे घेण्याचें कबूल करून एका शेतकऱ्याची शेतराखणी केली, ती गोष्ट चमत्कारिक व मनोवेधक आहे. एके दिवशीं ते इंद्रायणी तीरीं भजन करीत असतां एक शेतकरी त्यांस येऊन ह्मणाला कीं, " माझें शेत येथून जवळच आहे. त्यांत दाणा भरूं लागला आहे, व मला तर परगांवीं कामास जावयाचें आहे. तुह्मीं येथें भजन करीत बसतां, ते तेथेंच बसलां तर, अनायासें शेतास राखण होऊन, माझेंहि काम होईल व तुह्मांला मी राशीवर अदमण दाणे देईन ते तुमच्या लेंकरां-बाळांना खायला होतील. " तुकारामांनीं हो ह्मटलें, तेव्हां त्या शेतकऱ्यानें त्यांस शेतांत माळ्यावर नेऊन बसविलें, हातांत गोफण दिली, व बजाविलें कीं, शेताची चांगली जतन करा. नंतर तो आपल्या कामास निघून गेला. इकडे तुकाराम माळ्यावर बसून सतत भजनघोष चालवीत. धान्याच्या कणसांवर भुकेल्या पक्ष्यांच्या झुंडीच्या-झुंडी येऊन बसत, पण त्यांस तुकाराम कांहीं हांकवीत ना. त्यांस दयाबुद्धीमुळें असें वाटलें कीं, हे बिचारे निरुपद्रवी जीव भुकेला हवें तेवढें खाऊन जातील, ते उगीच चोरून कांहीं अधिक नेणार नाहींत, त्यांची पोटमार करणें हें पाप आहे. जीव तेथून सगळ्यांचा सारखाच, तेव्हां त्या बापड्यांस आपण खुशाल खाऊं द्यावें. तुकारामांनीं कांहीं काम पत्करल्यानें त्यांच्या कुटुंबास फार आनंद झाला. अवलाईवरच कुटुंबाच्या पोषणाचा भार पडे. तेव्हां त्या दाण्याची संसारास मदत होईल, ह्या भावी आनंदानें अन्न पोंचविण्याचें काम मोठ्या उल्हासानें बिनचूक वेळेवर करीत असतां, त्यांस कष्ट न वाटल्यास नवल नाहीं. तुकाराम राखणीस बसून एक महिना हा क्रम चालला तों शेताचा मालक परत आला, व शेत पहावयास जातो तों तेथें काय? शेत पाखरांनीं गच्च भरून गेलेलें. हें अरिष्ट पाहून, शेतकऱ्याचा संताप अनावर झाला. त्या आवेशांत तो तसाच माळ्याकडे गेला व तुकारामांस माळ्यावरून त्यानें

देवाचें देऊळ होतें तें भंगलें । चित्तासी जें आलें करावेंसें ॥ ६ ॥
आरंभीं कीर्त्तन करीं एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥ ७ ॥
कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनियां ॥ ८ ॥
गातीं पुढें त्यांचें धरावें ध्रुपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥ ९ ॥
संतांचें सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥ १० ॥
टाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनि ॥ ११ ॥
वचन मानिलें नाहीं सुहृदांचें । समूळ प्रपंचें वीट आला ॥ १२ ॥
सत्य असत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमतां ॥ १३ ॥
मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥ १४ ॥
यावरि या जाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ १५ ॥
निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखविलें ॥ १६ ॥
बुडविल्या वह्या बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥ १७ ॥
विस्तारीं सांगतां बहुत प्रकार । होईल उशीर आतां पुरे ॥ १८ ॥
आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे ॥ १९ ॥
भक्ता नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसा कळों आलें ॥ २० ॥
तुका ह्मणे माझें सर्व भांडवल । बोलविले बोल पांडुरंगें ॥ २१ ॥

ऐका वचन हें संत । मी तों आगळा पतित ॥
काय काजें प्रांत । करितसां आदरें ॥ १ ॥
माझें चित्त मज ग्वाही । सत्य तरलों मी नाहीं ॥
एकां चिये वाहीं । एक देखीं मानिती ॥ २ ॥
बहु पीडिलों संसारें । मोडीं पुरें पिटीं ढोरें ॥
न पडतां पुरें । या विचारें राहिलों ॥ ३ ॥
सहज सरलें होतें कांहीं । द्रव्य थोडें बहु तेंही ॥
त्याग केला नाहीं । दिलें द्विजां याचकां ॥ ४ ॥
प्रियापुत्र बंधु । यांचा तोडिला संबंधु ॥
सहज जालों मंदु । भाग्यहीन करंटा ॥ ५ ॥
तोंड न दाखवे जना । शिरें सांदी भरें राणां ॥
एकांत तो जाणां । तयासाठीं लागला ॥ ६ ॥

पोटें पीटिलों काहारें । दया नाहीं या विचारें ॥
बोलाविता बरें । सहज ह्मणें या साठीं ॥ ७ ॥
सहज वडिलां होती सेवा । ह्मणोनि पूजितों या देवा ॥ ॥
तुका ह्मणे भावा । साठीं झणी घ्या कोणी ॥ ८ ॥
बरें जालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥ १ ॥
अनुतापें तुझें राहिलें चिंतन । जाला हा वमन संवसार ॥ २ ॥
बरें जालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥ ३ ॥
बरें जालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥ ४ ॥
बरें जालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा ॥ ५ ॥
बरें जालें तुझें केलें देवाईल । लेंकरें बाईल उपेक्षिलीं ॥ ६ ॥
तुका ह्मणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासीं जागरण ॥ ७ ॥

तुकारामांचें बहुतेक चरित्र ह्या अभंगांत प्रतिबिंबित झालें आहे. ह्याप्रमाणें अनेक ऐहिक संकटांनीं वैतागलेले तुकाराम अत्यंत विरक्त झाल्यामुळें त्यांच्या बायकोस व आप्तइष्टांस, कुटुंबाचा योगक्षेम पुढें कसा चालणार ही मोठी चिंता येऊन पडली. त्यांनीं त्यांस परोपरीनें समजुतीच्या गोष्टी सांगून पाहिल्या. आर्जव, गोडीगुलाबी, निर्भर्त्सना करून व तिरस्कार, धिःकार इत्यादि सर्व प्रकारानें बोलून पाहिलें, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. संसारांतून मन उठलें तें उठलेंच. लोकांचें सांगणें ते मुकाट्यानें ऐकून मात्र घेत, परत उत्तर कांहींच करीत नसत. एकटें बसून विचार करीत रहावयाचें हें त्यांनीं व्रत घेतलें होतें. ह्यास कोणी व्यत्यय करितील, ह्मणून ते एकदां गपचुप घरांतून निघून गेले व देहूहून दोन कोसांवर भांबनाथ ह्मणून डोंगर आहे तेथें जाऊन स्वस्थ व एकाग्र चित्तानें भगवंताचें ध्यान भजन करीत राहिले. अन्न पाण्याचीहि पर्वा केली नाहीं. हे असे एकाएकीं नाहींसे झालेले पाहून घरच्या माणसांस हुरहुर लागली, तेव्हां धाकटे बंधु कान्होबा त्यांच्या शोधास निघाले, ते फिरतां फिरतां सात दिवसांनीं भांबनाथास जाऊन पोहोंचले. मग त्यांस तुकाराम भेटले. त्या ठिकाणींच तुकारामांस ईश्वर दर्शन झालें, असें महीपतीनीं लिहिलें आहे. भगवद्दर्शन झालेल्या ठिकाणीं त्यांनीं पादुका स्थापन केल्या, त्या अद्यापि तेथें दिसतात. कान्होबांस भावाच्या भेटीनें अतिशय आनंद झाला. त्यांनीं मोठ्या आर्जवानें तुकारामांस परत घरीं यावें असें ह्मटलें. तेव्हां त्यांच्या आग्रहार्थ तुकाराम त्यांजबरोबर

घरीं येण्यास निघाले ते वाटेंत दुसऱ्या दिवशीं इंद्रायणीचे तीरीं बसले. व तेथेंच उभयतां बंधूंनीं सात दिवसांचा उपवास सोडला. नंतर कान्होबांकडून घरांतलीं खतें पत्रें तुकारामांनीं तेथें आणविलीं; व भावास ह्मणाले कीं, " ह्यांवरून लोकांकडे आपलें बरेंच येणें आहे असें दिसतें, पण तें वसूल करूं लागलों तर त्यांशीं शत्रुत्व होईल, ह्मणून त्या भरीस न पडतां हीं खतें इंद्रायणींत बुडवून टाकणें बरें. " परंतु कान्होबांस हें म्हणणें पसंत पडलें नाहीं. ते तुकारामांसारखे विरक्त झाले नव्हते. ह्मणून भावास अत्यंत विनयानें विनवूं लागले कीं, " मी धाकटा, आपण वडील. आपणांस कांहीं सांगण्याचा अधिकार मला पोंहोंचत नाहीं; पण आपण वैराग्य धरिलें तसें माझें नाहीं, माझ्या मागें संसार आहे, तो कसा चालेल ? " तेव्हां तुकारामांनीं त्या खतापत्रांच्या दोन सारख्या वांटण्या करून, भावाची भावास देऊन आपली इंद्रायणीस अर्पण केली व सांगितलें कीं, " मला इतःपर संसार करणें नाहीं, चरितार्थ कसाहि चालो, भगवद्भजन हाच माझ्या जन्माचा कृतसंकल्प, तेव्हां आपलें दोघांचें जुळेलसें दिसत नाहीं, तुमचा विचार तुह्मी पाहावा. " हें समजतांच कान्होबा आपला संसार वेगळा करून राहूं लागले.

देहूस परत आल्यावर तुकारामांनीं आपला नित्य क्रम ठेविला तो असा. सकाळीं इंद्रायणीस्नान करून वडिलांनीं बांधलेल्या विठोबाच्या देवळांत जाऊन पूजाअर्चा करावयाची, मग वनांत जावयाचें. देहूजवळ तीन कोसांवर भांडार पर्वतावर ते वारंवार जाऊन राहात. अगदीं मिताहार करून मुखानें अहर्निश भगवन्नामाचा घोष व एकांत विचार चालवीत असत. संध्याकाळीं परत आल्यावर रात्रीं विठोबाच्या देवळांत भजन करीत. त्यांस पोटासाठीं भिक्षा मागण्याचे प्रसंग फारच क्वचित येत. संसारत्याग केला तरी चरितार्थासाठीं उद्योगास मुळींच शिवायचें नाहीं असा कांहीं त्यांचा कृतनिश्चय नव्हता. भगवद्भजनास व्यत्यय न येतां एकाद दुसरा काम धंदा उचलण्यास ते राजी असत. कारण त्यांस भिक्षावलंबन अप्रिय वाटत असे. त्याविषयीं त्यांचा एक अभंग पुढें पहावा—

भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ॥ १ ॥
ऐसियासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥ २ ॥
देवापायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव ॥ ३ ॥
समर्पिला जीव । नाहीं तों हा व्यभिचार ॥ ४ ॥

जगा चालावें सांकडें । दीन होऊन बापुडें ॥ ५ ॥
होंचे अभाग्य रोकडें । मूळ आणि विश्वास ॥ ६ ॥
काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार ॥ ७ ॥
तुका ह्मणे सार । दृढ पाय धरावे ॥ ८ ॥

अशा निस्पृहवृत्तीचीं माणसें भिक्षेचा आदर कितपत करितील, हें कांहीं सांगायाला नकोच. त्यांच्या पत्नीच बहुतेक नेमानें त्यांस वाढून नेत, व मागाहून आपण अन्नग्रहण करीत. तुकाराम हे भगवद्भक्तजनांस आड न येतील अशीं कामें पत्करीत असत. त्यांनीं एकदां अदमण दाणे घेण्याचें कबूल करून एका शेतकऱ्याचीं शेतराखणी केली ती गोष्ट चमत्कारिक व मनोवेधक आहे. एके दिवशीं ते इंद्रायणी तीरीं भजन करीत असतां एक शेतकरी त्यांस येऊन ह्मणाला कीं, " माझें शेत येथून जवळच आहे त्यांत दाणा भरूं लागला आहे, व मला तर परगांवीं कामास जावयाचें आहे. तुम्ही येथें भजन करीत बसतां, ते तेथेंच बसलां तर, अनायासें शेताचे राखण होऊन, माझेंहि काम होईल व तुह्मांला मी राशीवर अदमण दाणे देईन ते तुमच्या लेकरां-बाळांना खायला होतील. " तुकारामांनीं हो ह्मटलें, तेव्हां त्या शेतकऱ्यानें त्यांस शेतांत माळ्यावर नेऊन बसविलें, हातांत गोफण दिली, व बजाविलें कीं, शेताची चांगली जतन करा. नंतर तो आपल्या कामास निघून गेला. इकडे तुकाराम माळ्यावर बसून सतत भजनघोष चालवीत. धान्याच्या कणसांवर भुकेल्या पक्ष्यांच्या झुंडीच्या-झुंडी येऊन बसत, पण त्यांस तुकाराम कांहीं हांकवीत ना. त्यांस दयाबुद्धीमुळें असे वाटलें कीं, हे बिचारे निरुपद्रवी जीव भुकेला हवें तेवढें खाऊन जातील, ते उगीच चोरून कांहीं अधिक नेणार नाहींत, त्यांची पोटमार करणें हें पाप आहे. जीव येथून सगळ्यांचा सारखाच, तेव्हां ह्या बापड्यांस आपण खुशाल खाऊं द्यावें. तुकारामांनीं कांहीं काम पत्करल्यानें त्यांच्या कुटुंबास फार आनंद झाला. अवलाईवरच कुटुंबाच्या पोषणाचा भार पडे. तेव्हां त्या दाण्याची संसारास मदत होईल, ह्या भावी आनंदानें अन्न पोंचविण्याचें काम मोठ्या उल्हासानें विनचूक वेळेवर करीत असतां, त्यांस कष्ट न वाटल्यास नवल नाहीं. तुकाराम राखणीस बसून एक महिना हा क्रम चालला तों शेताचा मालक परत आला, व शेत पहावयास जातो तों तेथें काय ! शेत पाखरांनीं गच्च भरून गेलेलें. हें अरिष्ट पाहून, शेतकऱ्याचा संताप अनावर झाला. त्या आवेशांत तो तसाच माळ्याकडे गेला व तुकारामांस माळ्यावरून त्यानें

खालीं ओढून पुष्कळ मार देऊन शिव्यांची लाखोली वाहिली! व रागानें फणफणत त्यांस फरफरां ओढीत गांवकऱ्यांकडे घेऊन गेला. तुकाराम मुकाट्यानें हें सारें सहन करीत होते. गांवकऱ्यांनीं दोघांचेंहि ह्मणणें ऐकून घेतलें. त्यांत तुकारामांचें बोलणें ऐकून तर, त्या तसल्या वेळींसुद्धां त्यांस हंसू आलें! मग या तंट्याचा निकाल करण्यासाठीं शेतकऱ्यांस पिकाचा अदमास विचारून, त्याच्या सांगण्याप्रमाणें दोन खंडी दाण्याबद्दल तुकारामांकडून रोखा लिहवून घेऊन, त्यांनीं तो शेतकऱ्याचे हवालीं केला. पुढें ते शेताची स्थिति पहावयास जातात तों गांवकऱ्यांस अतिशय आश्चर्य वाटलें. कारण शेतांत पीक अतोनात लोटलें होतें! तें पाहून शेतकऱ्यास आपल्या उतावीळपणाबद्दल व संतापाबद्दल पश्चात्ताप होऊन दाण्याच्या लोभानें आपण रोखा परत देतों असें तो ह्मणूं लागला. परंतु गांवकऱ्यांनीं पूर्वींचाच न्याय कायम केला व शेतकऱ्यास रोख्याप्रमाणें २ खंडी दाणे देऊन बाकी पंधरा खंडी उरल्या त्या तुकारामांस नेण्यास सांगितल्या. परंतु ते नेईनात, ह्मणून तें धान्य तेथील देशपांडे महादाजीपंत यांनीं सांठवून ठेविलें. पुढें देहूस तुकारामांच्या पूर्वजांनीं बांधलेल्या विठोबाच्या देवळाचा जीर्णोद्धार करण्याच्या कामीं ते दाणे फारच उपयोगीं पडले. ह्या जीर्णोद्धाराचे वेळीं तुकाराम स्वतः हातांत कुदळ पावडें घेऊन एखाद्या मजुराप्रमाणें खपत होते.

ह्या आपल्या देवळांत प्रति एकादशीस ते मोठा उत्सव करीत असत. रात्रीं एखाद्या नामांकित हरिदासास बोलावून कीर्तन करवीत. व त्यावेळीं स्वतः मागें उभे राहून, टाळ, वीणा वाजवीत. कीर्तन झाल्यावर रात्रभर जागून भजन करीत व दुसरे दिवशीं शक्त्यनुसार ब्राह्मण भोजन घालून पारणा करीत. देवळांतली झाडलोट, सारवण, सारें स्वहस्तें करीत. पांथस्थांचा चांगला आदरसत्कार करून, भुकेल्या तान्हेल्यांस अन्नपाणी देत. कोणी प्रवासी आजारी पडला तर स्वहस्तें त्याची सेवाशुश्रूषा करून औषधपाण्याची तरतूद मायेनें करीत असत. साधुसंतांची सेवा मनोभावें करून, त्यांचा बोध अनन्यभावें ग्रहण करीत असत. वृद्ध, थकलेल्या दमलेल्या गरीबांचें ओझें उचलून साहाय्य देत. प्रवासी लोकांस वाटेनें उन्हाचा व तहानेचा भास होऊं नये, ह्मणून जागोजागीं पाण्याच्या घागरी भरून ठेवीत. कामास निरुपयोगी ह्मणून रानांत सोडून दिलेल्या गायबैलादि जनावरांचे हाल होऊं नयेत ह्मणून ते त्यांस स्वतः चारापाणी घालीत असत. अशी त्यांची भूतदया व समदृष्टि होती. ब्राह्मणांविषयीं पूज्यभाव फार म्हणून त्यांच्या येथें एखाद्या मजु-

राप्रमाणें राबत व झाडसारवणादि कामें करीत. ही सारी दगदग दिवसभर झाल्यामुळें अर्थांच त्यांस लवकर झोंप येई. पण तीमुळें त्यांच्या भजनाच्या प्रियकर्तव्यास अंतराय येई, म्हणून ते शेंडीस दोरी बांधून खुंटीस अडकवीत व अशा तऱ्हेनें झोंप टाळून भजनास खळ पडूं देत नसत. अशा अनेक गोष्टी लिहितां येतील. पुढें कांहीं काळानें त्यांस अशी इच्छा झाली कीं, आपण स्वतः कथा करावी. म्हणून त्यांनीं तो गुण संपादन करण्याचा यत्न सुरू केला. कोठें कथा आहे असें कळलें कीं जाऊन हरिदासांच्या मागें उभें राहून, ध्रुपद म्हणत जावें. असें करतां करतां त्यांच्या कानीं पुष्कळ कवनें पडत गेलीं. ते घरीं आल्यावर ऐकलेल्या गोष्टींचें चांगलें मनन करीत. मग नामदेव, कबीर, ज्ञानेश्वर, एकनाथ इत्यादि थोर साधूंचे ग्रंथ अवलोकन करून त्यांनीं त्यांचीं कवनें पाठ केलीं. रामायण, भागवत, योगवासिष्ठ, अमृतानुभव इत्यादि परमार्थपर ग्रंथांचें वाचन, पुराण, कथा श्रवण करून, भांडार डोंगरावर एकांतांत राहून कांहीं काळ मनन करून ज्ञानप्राप्ति करून घेतली. ते एकादशीव्रत आमरण करीत होते.

तुकाराम महाराजांस गुरुपदेश स्वप्नांतच झाला, त्याची हकीकत अशी. एकदां एके माघ शु० १० मीस गुरुवारीं पहांटे त्यांस स्वप्न पडलें. त्यांत सकाळच्या प्रहरीं आपण गंगास्नानास जात असतां एक ब्राह्मण भेटला असें त्यांनीं पाहिलें. त्यानें रामकृष्ण नाममंत्र दिला, व आपली गुरुशिष्य परंपरा सांगितली. " मूळ राघव चैतन्य, त्यांचे शिष्य केशव चैतन्य, यांचा शिष्य मी बाबाचैतन्य. " त्या ब्राम्हणास आपण घरीं भोजनास आणिलें, तों पत्नी जिजाबाई ह्या कांहीं रागांत अपशब्द बोलल्या, व म्हणून ब्राम्हण निघून गेला. हें स्वप्न पाहून तुकाराम जागे झाले. त्यावर त्यांचा एक अभंग आहे तो ह्याः—

सद्गुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥ १ ॥
सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥ २ ॥
भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजीं ॥ ३ ॥
कांहीं कळे उपजला अंतराय । ह्मणोनियां काय त्वरा जाली ॥ ४ ॥
राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥ ५ ॥
बाबाजी आपलें सांगितलें नाम । मंत्र दिला रामकृष्णहरि ॥ ६ ॥
माघशुद्ध दशमी पाहूनि गुरुवार । केला अंगीकार तुका ह्मणे ॥ ७ ॥

माझिया मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुराजा ॥ १ ॥
आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नव्हे गुंपा कांहीं कोठें ॥ २ ॥
जातीपुढें एक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥ ३ ॥
जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरू पांडुरंग ॥ ५ ॥
घालुनियां भार राहिलों निश्चिंतीं । निरविलें संतीं विठोबासि ॥ १ ॥
लावूनिया हातें कुरवाळिला माथा । सांगितलें चिंता न करावी ॥ २ ॥
कटींकर समचरण साजिरे । राहिला भीवरे तीरीं उभा ॥ ३ ॥
खुंटले सायास अणिकी या जीवा । धरिले केशवा पाय तुझे ॥ ४ ॥
तुज वाटे आतां तें करीं अनंता । तुका ह्मणे संतां लाज माझी ॥ ५ ॥
माझिये मनींचा जाणा हा निर्धार । जिवासी उदार जालों आतां ॥ १ ॥
तुजविण दुजें न धरीं आणिका । भय लज्जा शंका टाकियेली ॥ २ ॥
ठायींचा संबंध तुज मज होता । विशेष अनंता केला संतीं ॥ ३ ॥
जीवभाव तुझ्या ठेवियेला पायीं । हेंचि आतां नाहीं लाज तुह्मां ॥ ४ ॥
तुका ह्मणे संतीं घातला हावाला । न सोडीं विठ्ठला पाय आतां ॥ ५ ॥

तुकाराम हे जसे स्वसुखनिरभिलाषी होते, तसेच अतिशय परोपकारी स्वभावाचे होते. त्यांच्या दयाळू स्वभावाच्या अनेक गोष्टी त्यांच्या चरित्रांत आढळतात. 'उदार चरितानान्तु वसुधैव कुटुम्बकम्' हें वर्णन त्यांस अगदीं यथार्थ लागू होतें. त्यांचा द्वैत-भाव, अहंकार व आपपर बुद्धि अगदीं लुप्त झाल्यामुळें त्यांस दिसेल तें भगवंताचेंच रूप वाटे. कोणाशीं बोलावयाचें झालें कीं 'मायबाप' असें संबोधून बोलत, व होईल त्याला होईल तितकें साह्य करीत. एकदां एक जर्जर वृद्ध बाई तेल आणायास बाजारांत चालली होती, ती थोडेसें चालून थकून खालीं बसे, व थोड्या वेळानें उठून पुनः चालूं लागे. तिला पाहून तुकारामांस फार कळवळा आला, व मीं तुह्मांस उचलून पाठीवर नेतों असें ह्मणाले. तेव्हां बाई ह्मणाली कीं, एवढे पैसे घेऊन माझें तेल बाजारांतून आणून दे ह्मणजे झालें. तेव्हां त्यांनीं तिचें तेल आणून दिलें. त्या तेलाचा चमत्कार असा झाला कीं, तें पुष्कळ दिवस पुरलें. ही गोष्ट ह्मातारीच्या तोंडून ऐकतांच पुष्कळ भोळवट व टवाळ लोक आपलें तेल आणण्यास तुकारामांस सांगूं लागले. चांगुल-पणाचा भलत्याच तऱ्हेनें फायदा करून घेणाऱ्या लोकांना कोठेंहि पहा, कांहीं तोटा

नसतो. तुकारामांनीं मुकाट्यानें सर्वांचें काम करावें. असें होतां होतां, तेलाचे नळे फार झाल्यामुळें प्रत्येकाच्या पैशांचें स्मरण न राहून हिशेबांत घोटाळा झाला, तसें लोकांनीं हें काम सांगणें बंद केलें. कोणी तर यांस वेडेच ह्मणत, व हवें तें काम सांगत. बाजाराच्या दिवशीं एखाद्या हमालाप्रमाणें यांच्या डोक्यावर ओझें देऊन घरीं नेत व ओझें असह्य असलें तरी तुकाराम कांहीं कुरकुरत नसत. त्यांनीं खुशाल मुखानें भगवन्नामघोष करीत वाट सारावी ! त्यांस असें वाटेकीं, सर्वांतर्यामी विठ्ठल रखुमाई वसतात तेव्हां हें काम त्यांजप्रीत्यर्थच केल्यासारखें होय. त्यांची सामान्य जनांविषयीं जर ही बुद्धि, तर साधुसंतांविषयीं त्यांस केवढा प्रेमादर असेल बरें ? साधुसंतांच्या भेटीचा योग आला असतां, ते त्यांच्या सेवेंत एखाद्या दासाप्रमाणें राबत असत. ते भजनांत तल्लीन होऊन नाचूं लागले ह्मणजे त्यांच्या पाईं खडे रुतूं नयेत, ह्मणून आपल्या हातानें जागा साफसूफ करीत. दुसरें कोणी नसल्यास कीर्तनाचे वेळीं दिवटी हातीं धरून उभे राहीत. त्यांस उष्मा होऊं नये ह्मणून पंख्यानें वारा घालीत. कधीं कधीं त्यांच्या मागें उभे राहून धृपद धरीत व गाऊं लागत. तुळशी फुलांच्या माळा करून त्यांच्या गळ्यांत घालीत. कधीं कीर्तन चालतांना बाहेर बसून, त्यांचीं पादत्राणें संभाळीत. साधुसंतांचें पाद संवाहन करीत व प्रवासानें थकलेल्या भागलेल्यांचें पाय शेकून सुखशुश्रूषा करीत. कोणी कांहींहि मागावयास येवो, त्यांनीं कधीं ना ह्मटलें नाहीं. एकदां जिजाबाई न्हावयास बसल्या होत्या. त्यांनीं न्हाल्यावर नेसावयास आपलें एकचेंएक लुगडें धुवून खुंटीवर टेविलें होतें. इतक्यांत एक गरीब बाई येऊन तुकारामांपाशीं जुनें वस्त्र मागूं लागली. तेव्हां त्यांनीं आपल्या बायकोचें तें खुंटीवरलें लुगडें तिला देऊन टाकिलें. मनुष्यांप्रमाणेंच त्यांची इतर प्राण्यांवर देखील दया असे. ते पशुपक्षांस चारापाणी, व मुंग्यांस पीठसाखर घालीत. चालतांना किडामुंगी पायांखालीं सांपडूं नये ह्मणून ते फार जपून पावलें टाकीत चालत एकदां ते वाटेनें चालले असतां त्यांच्या अंगावर खंडोगणती डांस येऊन बसले, पण त्यांनीं त्यांस मुळींच उडवून न देतां खुशाल बसून यथास्थित रक्त खाऊं दिलें. शेवटीं वाटेनें जाणाऱ्यांना त्यांचीं दया येऊन त्यांनीं ते डांस हांकविले. एके वेळीं कांहीं पक्षी दाणे खात असतां तिकडून तुकाराम जाऊं लागले तेव्हां त्यांस भिऊन ते उडून गेले. तें पाहून त्यांस फार वाईट वाटलें. शेवटीं त्यांनीं असाच निश्चय केला कीं, पक्षी निर्भय होऊन, आपल्याजवळ येऊन भक्ष्य खाईपर्यंत येथून हलावयाचें नाहीं. मग ते बराच वेळ तेथेंच निचेष्ट बसून राहिले, तेव्हां ही अचेतन मूर्तिच आहे,

असें समजून, ते पक्षी त्यांच्या अंगावर येऊन खुशाल बसूं लागले, तेव्हां त्यांचें चित्त संतुष्ट झालें. या वेळचा त्यांचा एक अभंग आहे, तो हा:—

अवघीं भूतें साम्या आलीं । देखिलीं म्यां कैं होतीं ॥ १ ॥
विश्वास तो खरा मग । पांडुरंग कृपेचा ॥ २ ॥
माझी कोणी न धरो शंका । हो कां लोकां निर्द्वंद्व ॥ ३ ॥
तुका ह्मणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें ॥ ४ ॥

तुकारामांना संतसेवा ह्मणजे जीव कीं प्राण व संतसमागम ह्मणजे सुखाचें माहेरच वाटे, हें पूर्वीच सांगितलें आहे. ज्यांवर आपली अत्यंत प्रीति असते, त्यांच्या सारखेंच मनुष्य होत जातें किंवा असतें असें ह्मणतात. 'ज्याचें जया ध्यान । तेंचि होय त्याचें मन ॥' हें त्यांचेंच वचन आहे व तें कांहीं खोटें नव्हे; तुकाराम हे पराकाष्ठेचे संतभक्त व ईश्वरभक्त होते, तसेच ते मूर्तिमंत साधुपुरुष होते. हें पहावयाचें झालें तर त्यांच्याच दृष्टीनें पहातां येईल. त्यांनीं साधुलक्षणें सांगितलीं आहेत, तीं हीं:—

तरी संत ह्मणवावें । नेणे आपुलें परावें ॥ १ ॥
भूतमात्रीं हरी वीण । न पाहेचि दुजेपण ॥ २ ॥
प्रेम अंतरीं निःसीम । मुखीं ज्याचे रामनाम ॥ ३
तुका ह्मणे देहभाव । संतीं सोडियेला गांव ॥ ४ ॥
जे कां रंजले गांजले । त्यांसि ह्मणे जो आपले ॥ १ ॥

हीं सर्व चिन्हें त्यांच्या अंगीं परिपूर्ण होतीं, हें त्यांच्या चरित्रांत स्पष्ट दिसत आहे. सतत ईश्वरनामस्मरण व त्याचाच लोकांस उपदेश हीच त्यांची जन्माची देवघेव. त्यांस भक्तिपराङ्मुख लोकांची अतिशय कींव येई ह्मणून ते त्यांस कळकळीनें उपदेश करीत असत; व कोणी लक्ष्य दिलें नाहीं असें कधीं कधीं वाटे तेव्हां तिरस्कारानें बोलत, पण त्यांत हेतु एवढाच असे कीं, कोणीकडून तरी त्यांचें लक्ष्य ईश्वराकडे लागावें. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांस कविता करण्याविषयीं स्वप्न पडलें. त्याबद्दलचे अभंग असे आढळतात:—

नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें । सवें पांडुरंगें येऊनियां ॥ १ ॥
सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको ॥ २ ॥
माप टाकी सळ धरिली विठ्ठलें । थापटोनि केलें सावधान ॥ ३ ॥
प्रमाणाची संख्या सांगे शत कोटी । उरले शेवटीं लावी तुका ॥ ४ ॥

याल ठाव तरि राहेन संगती । संतांचे पंगती पायांपाशीं ॥ १ ॥
आवडीचा ठाव आलोंसें टाकून । आतां उदासीन न धरावें ॥ २ ॥
सेवटील स्थळ नीच माझी वृत्ति । आधारें विश्रांति पावईन ॥ ३ ॥
नामदेवापायीं तुक्या स्वप्नीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे ॥ ४ ॥

ह्याप्रमाणें तुकारामांस नामदेव व श्रीविठ्ठल यांनीं स्वप्नांत दृष्टांत देऊन कविता करण्यास सांगितल्यावर कांहीं काळानें ते कविता करूं लागले. नामदेवांच्या शतकोटी अभंगांपैकीं बाकी राहिलेले अभंग तुकारामांनीं करावे असें विठ्ठलांनीं सांगितलें. त्यांस कीर्तन स्वतः करण्याची गोडी लागली हें मागें सांगितलेंच आहे. अभंगादि करण्यापूर्वी ते भांडार पर्वतावर एकांतीं जाऊन ईश्वरविषयक विचार व चिंतन करीत बसत. हा त्यांचा क्रम बरेच दिवस चालू होता, त्यामुळें त्यांच्या पत्नींस फार त्रास होई. तुकाराम घरीं भोजनास न आले तर त्या त्यांस वाढून नेत अथवा पोंचवीत असत. दोनप्रहरच्या वेळीं अन्नाचें ताट व भोंपळाभर पाणी घेऊन त्या भांडार डोंगरावर जात असत. एके दिवशीं त्या ऐन उन्हांतून तळतळत चालल्या असतां, त्यांच्या पायांत एक करवंदीचा कांटा शिरला, त्यामुळें अगदीं कासावीस होऊन त्या बेशुद्ध पडल्या. भोंपळा लवंडून जाऊन सर्व पाणी सांडून गेलें व भाकरीची पांटी दुसरीकडे आदळली. बऱ्याच वेळानें त्या वाटेनें कोणी म्हातारा मनुष्य येऊन, त्यानें अवलाईची अवस्था पाहून डोळ्यांस पाणी लावून, वारा घालून त्यांस सावध केलें, व पायांतला तो मोठा थोरला खोल गेलेला कांटा युक्तीनें काढिला. मग अन्नाची पाटी सांवरून रिकामा भोंपळा घेऊन वाटेनें त्या लंगडत लंगडतच जाऊं लागल्या. वाटेंत पाणी कोठें मिळेल या विवंचनेंत त्या होत्या, इतक्यांत त्याच वृद्ध मनुष्यानें त्यांस पाणी आणून दिलें तें घेतलें व तुकारामांकडे जाऊन पोहोंचल्या. तुकारामांस त्यांच्या तोंडून झालेली हकीकत कळली तेव्हां त्यांस फार कळवळा आला व त्यांनीं अतःपर तुला असा त्रास होणार नाहीं, मीं घरींच येतों असें म्हटलें. पुढें ते असे दूर जाऊन बसले नाहींत.

हे कविता करूं लागले तेव्हां प्रथम श्रीकृष्णाची बालक्रीडा वर्णिली, तिचे (९००) अभंग लिहिले, असें महीपतींनीं म्हटलें आहे. ह्या नऊशें ओंव्या भागवतांतल्या दशमस्कंधाच्या आधारानें रचिल्या. त्यानीं नामदेवांचे पुष्कळ अभंग बारकाईनें अवलोकन केले होते; व पुढें त्यांसही अभंगच करावेसें वाटूं लागलें. कोऱ्या कागदांच्या वह्या करून, त्यांत ते केलेली कविता पहिल्या पहिल्यानें स्वहस्तें लिहून ठेवीत. त्यांस पहिल्यानें बाळबोध लिहिण्याची संवय नसल्यानें अक्षर वेडें वांकडें येई. कीर्तनाचे वेळीं ते

आपण रचलेले अभंग ह्मणूं लागले. असें होतां होतां त्यांच्या अंगीं शीघ्र कवित्व येऊन, त्यांस अगदीं आयत्या वेळीं भर कीर्तनांत इष्टतत्त्वावर अभंग करतां येऊं लागले. हे असे सहज रचलेले कांहीं अभंग अतिशय हृदयंगम झाले आहेत व त्यांवरून ह्यांची कवित्वशक्ति अद्भुत वाटल्यावांचून रहात नाहीं. निरनिराळ्या अभंगांतून जे जे रस असत, त्यांत श्रोतृजनांच्या मनोवृत्ति अगदीं तल्लीन होऊन पोहूं लागत, असा त्या अभंगांचा प्रभाव असे. ते पंढरीच्या वारीस नेमानें जात असत, तेव्हां तेथेंही आपल्या प्रेमळ व मधुर अभंगवाणीनें विठ्ठलास आळवीत, यामुळें तेथें जमलेल्या लोकांस अतिशय आश्चर्य व यांजविषयीं परम आदर वाटे. सत्य व शुद्ध आचरण, निस्पृह व नम्रवृत्ति, पूर्ण वैराग्य, प्राणिमात्रांविषयीं अत्यंत दयाशीलता, सदैव भक्तिरसानें उचंबळणारें प्रेमपूर्ण अंतःकरण व त्यांत आणखी विलक्षण प्रासादिक कवित्वसामर्थ्य, मग त्यांच्या त्या जिवंत अमृतवाणीनें श्रोतृजनांस दास करून सोडिलें तर त्यांत आश्चर्य कसलें ? आज अनेक शतकें लोटल्यावर देखील जी अभंगवाणी जिवंत वाटते, जिची आह्मां एकोणिसाव्या शतकांतल्या लोकांच्या मनांवर चमत्कारिक सत्ता वसते व पुढेंही तशीच बसेल यांत संशय नाहीं, ती त्यांची अमृतवाणी त्या वेळच्या भाविक व शुद्ध सरळ वृत्तींच्या लोकांस देहभान विसरवून तन्मय करून टाकी, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. ते भक्तीच्या भरांत असतां, कीर्तनप्रसंगीं एखादें मूळ वचन न आठवलें ह्मणजे नवा अभंग तेथल्या तेथें रचून ह्मणत; तेव्हां त्यांची ती रचना, रसभरीत वर्णन व ते मोठ्या उल्हासानें ह्मणतांना त्यांच्या स्वरांत प्रतिबिंबित झालेली त्यांच्या निर्मळ भजनमग्न अनन्य प्रेमळवृत्तींची छटा हीं सर्व श्रोत्यांस तटस्थ करीत; ही अद्भुत शक्ति पाहून लोकांस त्यांजविषयीं असें वाटे कीं, हा पुरुष अद्वितीय आहे. ह्यामुळें यांच्या कीर्तनास हजारों लोक येऊं लागले व त्यांची कीर्ति व त्यांचे अभंग सर्वतोमुखी झाले. त्यांचे अभंग पुष्कळ लोक उतरून ठेवीत असत. कृष्णावतारामुळें नंद, गौळणी, कंसादिकांचीं नांवेंहि जशीं अमर झालीं तसें अभंगामुळें तुकारामांचें व त्यांच्या शत्रूचें झालें आहे. असा त्यांचा लौकिक वाढत चालला असतां, चिंचवडचे मंबाजी गोसावी नांवाचे ब्राह्मण देहूस येऊन राहिले होते, त्यांस हें सहन न होऊन त्यांनीं तुकारामांस त्रास देण्याचा विचार चालविला. आपण साधु ब्राह्मण ह्मणवीत असून, आपणांस कोणी मान देत नाहीं, व तुकाराम शूद्र असून त्यांस लोक फार मानितात, त्यांच्या भजनास भावानें लोकांची मोठी गर्दी असते, हें पाहून मंबाजींच्या मनांत द्वेष व हेवा उत्पन्न झाला. तथापि त्यांचें उट्टें काढण्यास कांहीं निमित्त हवें, तें बरेच दिवस शोधूनहि मिळेना; ह्यामुळें

ते मनच्यामनीं जळत. त्यांनीं लौकिकार्थ कीर्तनास नांवाला यावें मात्र, पण मत्सरानें मन जळफळत असल्यामुळें त्यांस दुसरें कांहीं दिसत नसे. एकदां एके एकादशीस देहूस यात्रा भरली होती. विठोबाच्या देवळाच्या प्रदक्षिणेच्या वाटेवर, मंबाजींनीं बागेस कुंपण घातलें होतें त्याचीं कांटेरी झाडें आलीं होतीं; तीं वाटेंत होतीं, ह्मणून लोकांस त्रास होऊं नये या हेतूनें तुकारामांनीं उपटून टाकून वाट साफ केली. हें निमित्त मिळतांच, आधींच द्वेषानें जळणाऱ्या मंबाजीबुवांनीं तुकारामांस त्याच कांटेरी झुडपांनीं मरे मरे तो झोडपून काढिलें. एक काठी मोडली कीं दुसरी घ्यावी, असा क्रम, मारतां मारतां हात दुखून येई तों, सारखा चालला होता. शेवटीं दमल्यावर त्यांनीं तुकारामांस सोडिलें. त्यांच्या अंगाची मारानें अगदीं दुर्दशा झाली होती. ती अवलाईनीं व शिष्य मंडळीनीं शेक सुश्रूषा करून बरी केली. पण तुकारामांनीं हें सारें मुकाट्यानें सोशिलें. त्या दिवशीं कीर्तनास मंबाजी गोसावी आले नाहींत. तेव्हां तुकारामांनीं तपास केला तों ' अंग दुखत आहे, ह्मणून येववत नाहीं ' असा निरोप आला; त्यावर तुकाराम स्वतः त्यांच्या घरीं गेले, व "आपलीं झाडें उपटलीं हा अन्याय झाला, ह्मणून आपणांस राग येणें साहजिक आहे, व त्या भरांत आपण जें काय केलें तें योग्यच आहे; आतां हें सारें होण्यास मीं कारण झालों, त्याची क्षमा करावी व कीर्तनास चलावें." असें ह्मणून तुकाराम मंबाजीचें अंग रगडीत बसले. ह्या भाषणानें मंबाजीबुवा अगदीं खजील झाले, त्यांचा क्रोध अजिबात मावळला, ते उठून कीर्तनास आले व त्यावेळीं त्यांस तुकारामांनीं बोध केला. ह्या प्रसंगाचे सहा अभंग सांपडतात. खऱ्या भक्तिप्रेमानें अंगीं सहनशीलता व धैर्य देण्याची कशी शक्ति असते तें यावरून दिसतें. त्यांतला एकः—

न सोडीं न सोडीं न सोडी । विठोबा चरण न सोडीं ॥ १ ॥
भलतें जड पडो भारी । जीवावरी आगोज ॥ २ ॥
शत खंड देह शस्त्रधारी । करितां परी न भीयें ॥ ३ ॥
तुका ह्मणे केली आधीं । दृढ बुद्धी सावध ॥ ४ ॥

' वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि ' ह्या हृदयाच्या दोन्ही वृत्ति ह्यांत पहाव्या. मंबाजी बुवांस तुकारामांची ही विलक्षण नम्रता व क्षमाशीलता पाहून फार आश्चर्य व पराकाष्ठेची लाज वाटली. तुकारामांचा मायाळू स्वभाव, उदार व शुद्ध अंतःकरण पाहून पुष्कळ लोक त्यांचे भाविक शिष्य बनले. ते कथा भजन कीर्तनादि प्रसंगीं हजर राहून सहाय्य करीत. त्यांत दोघे विशेष प्रसिद्ध आहेत. गंगाधर मवाळ कडूसकर देशस्थ

ब्राह्मण व संताजी चाकणकर तेली हे दोघे संसाराविषयीं विरक्त असून रात्रंदिवस तुकारामांपाशीं रहात. त्यांनीं तुकारामांचे अभंग लिहून घेत जावे व कीर्तनांत मागें उभें राहून ध्रुपद धरीत जावें, असा नेम होता.

तुकारामांची पत्नी जिजाई ऊर्फ अवलाई ह्या पतिव्रता तर खऱ्याच; पण स्वभावानें तापट असून फारच तोंडाळ होत्या. त्यामुळें तुकारामांस वेळोवेळीं फारच त्रास सोसावा लागे. ह्या पतिपत्नींचे स्वभाव अगदीं परस्पर विरुद्ध होते. मनुष्य स्वभावांत सत्व, रज, तम, अथवा देवपण, मनुष्यपण व पशुपण ह्या तिन्हींचीं लक्षणें कमजास्त मानानें मिसळलेलीं असतात. त्यांत तुकारामांच्या अंगीं वरील तिन्हींपैकीं पहिल्या दोन वृत्तीच विकास पावल्या असून तिसरी नष्ट झाली होती. परंतु जिजाईचें उलटें होतें; त्यांच्या अंगीं दुसरी व तिसरी वृत्ति बळावली असून पहिलीचें अस्तित्व क्वचितच भासे व तेंहि अळवावरच्या पाण्याइतकें टिकत असे. पत्नी ही पतीचें अर्धांग, तेव्हां तुकारामांच्या आंगीं पशुवृत्तीस जेव्हां थारा मिळेनासा झाला, तेव्हां त्या बिचारीनें कदाचित् पत्नीच्या ठायीं येऊन वास केला असेल, कारण दुसरें इतकें हक्काचें व जवळचें स्थान कोठें मिळणार ? किंवा असेंही असेल कीं, तुकारामांच्या शुद्धसात्विक स्वभावामुळें दुष्टांचा त्रास त्यांस होऊं नये म्हणून अवलाई ह्या अशा तऱ्हेनें त्यांच्या संरक्षक असाव्या अशी विधात्याचीहि योजना असेल ! गुलाबपुष्पाला संभाळणाऱ्या कांट्यासारखीच कदाचित् ही योजना असावी. कारण कांहीं अंशीं तसें दिसतें. टवाळ व नीच लोक जेव्हां तुकारामास त्रास देत तेव्हां त्या तोंडानें व हातानेंहि चांगला समाचार घेत असें आढळतें. ह्या दोघांचें स्वभाव एकमेकांच्या उलट जात्याच असल्यामुळें एकाच परिस्थितीचे उभयतांवर भिन्न भिन्न परिणाम झाले. म्हणजे दारिद्य,दुष्काळ, लोकापवाद, प्रपंचभार इत्यादि तापांनीं उभयतांस दुःख भोगावें लागलें, तथापि तीं, तुकारामांच्याठायीं वैराग्य व ईश्वरप्रीति व भक्ति वाढविण्यास कारण झालीं, व जिजाईचा स्वभाव मात्र अधिक तापट, तिरसट, फटकळ व वैतागल्यासारखा झाला. त्यामुळें तुकारामांनीं कोणी साधुसंत, अतिथि, अभ्यागतांस सत्कार करण्याच्या बुद्धीनें घरीं आणलें असतां जिजाईनीं दुरुत्तरें करावीं, असें वारंवार होई. असल्या प्रसंगाच्या पत्नीच्या भाषणावर त्यांनीं कांहीं अभंगहि लिहून ठेविले आहेत.

अशाच एका प्रसंगीं अतिशय मन विटून गेल्यामुळें, तुकाराम गृहत्याग करून अरण्यवास पत्करून राहिले. कोणी अन्नपाणी आणून दिल्यास ग्रहण करावें, नाहीं तर वायु-

भक्षण करूनच रहावें. प्रातःकाळीं इंद्रायणीस्नान करून विठ्ठलाची पूजाअर्चा करून रानांत जावें, व रात्रीं भजनासाठीं परत यावें, असा क्रम दोन महिने चालला होता. इतक्यांत एके एकादशीस वाटेंत त्यांची व पत्नीची अकस्मात् गांठ पडली. जिजाई जरी अशा तापट व चंचल स्वभावाच्या होत्या तरी त्या वृत्तीचा अंमल त्यांच्यावर नसेल, तेव्हां त्या फार चांगल्या वागत असत. साऱ्या जगानें देवाप्रमाणें मानिलेला आपला पति, आपल्या तोंडाळपणानें कंटाळून, गृहत्याग करून गेला ही गोष्ट, रागाचा सपाटा निघून गेल्यावर त्यांच्या मनास खाऊं लागलीच होती. प्रत्यक्ष शत्रूंचीं मनें सुद्धां जर तुकारामांच्या अप्रतिम सद्गुणांनीं वश होत, तर जिजाई ही तर त्यांची बायको! तेव्हां त्यांच्या मनावर मुळींच परिणाम होणार नाहीं काय! वर सांगितल्याप्रमाणें त्या उभयतांची गांठ पडतांच जिजाईनीं 'आजपासून तुमचें वचन मी मानीन, घरीं चलावें,' असें नम्रत्वानें ह्मटलें, तेव्हां तुकाराम परत घरीं आले. भगवंताच्या ह्या विचित्र सृष्टींत भिन्न भिन्न स्वभावांचीं स्त्रीपुरुषें विवाहबंधनांनीं एकत्र होऊन, प्रपंचयात्रेस चाललेलीं सर्व काळीं सर्व देशांत आढळतात. ह्या अशा विचित्र जन्माच्या गांठी बांधण्याचा विधात्याचा हेतु काय असेल तो असो. तें गूढ पुरतेपणीं उकलण्यास आह्मां मानवांच्या बुद्धी अगदीं असमर्थ आहेत. पण एवढें मात्र खरें कीं, असल्या स्त्रीपुरुषांचे जन्मयोग पुरे पाडण्यास ईश्वरास पावलोपावलीं धांवून यावें लागत असेल, व अनेक कष्टहि होत असतील! असो. तुकाराम घरीं आले, त्याच रात्रीं पत्नीच्या स्वभावांत चांगला पालट झालेला पाहून, ती संधि दवडूं नये ह्मणून तुळशीवृंदावनाशीं बसून जिजाईस त्यांनीं सदुपदेश केला, व सर्वस्व दान करण्यास सांगितलें. याबद्दल त्यांचे १०-११ अभंग आहेत ते दुसरीकडे पहावे. (अंक ४४१०-४४४० ) त्यांस पूर्णबोध हें नांव आहे. ह्याप्रमाणें ह्या बोधाचा परिणाम अवलाईच्या मनावर अल्पकाळच राहिला, व तुकारामांनी तिचें लुगडें एका ह्मारणीस दिलें, ह्या निमित्तानें पुनः 'येरे माझ्या मागल्या' असें झालें. यांत नवल काय! 'जयाचा जो आहे प्रकृति गुण लोपे नच कदा' हीच गोष्ट जिजाबाईची. तापटपणा व चांगली बुद्धि कायम न टिकणें ह्याशिवाय जिजाईच्या अंगीं दुसरे कांहीं वाईट गुण नव्हते. ह्या दोन गुणांच्या अमलांतून त्या अलिप्त असत, तेव्हां त्यांची वागणूक अत्यंत सुशील स्त्रीसारखी असे. घरांत मिळण्यासारखें असेल तोंवर तुकारामांस अन्न पोंचविल्यावांचून त्या जेवीत नसत. त्या आपल्या पतीस, मुलांस व संसारास फार जपत असत; व त्यांचें आचरण अगदीं शुद्ध असे. नवऱ्याचा विरक्तपणा,

त्यांच्या स्वभावाच्या उलट असल्यामुळें, व मुलांबाळांस हवें तें वेळेवर न मिळाल्यामुळें त्यांचे हाल पाहून त्यांस पुष्कळ प्रसंगीं वाईट वाटे, त्या भरांत त्या तुकारामांस हवें तें बोलत; पण एरवीं त्यांजविषयीं जिजाबाईच्या मनांत चांगली भक्ति असे. व ही गोष्ट तुकारामही ओळखून होते. तुकाराम महाराजांच्या चरित्रलेखकांनीं जिजाईच्या स्वभावावर निरनिराळीं मतें दिलीं आहेत, पण आह्मांस त्या वादांत पडावेंसें वाटत नाहीं. स्वभावाला औषध नाहीं हें सर्वमान्य आहे; व भगवंताचा नेमानेम ह्मणून श्री तुकारामांनीं जर त्यास जन्मभर मान दिला तर आह्मींही तेंच मानून, तुकारामांचें अनुकरण करून त्यांच्या स्वभाववर्णनावर नम्रपणानें मूकवृत्ति धारण करावी हेंच योग्य होय, नव्हे कां ? तुकारामांस महादेव व विठोबा हे दोन मुलगे व काशी, भागीरथी व गंगा अशा तीन मुली होत्या. हीं सारीं जिजाबाईचींच मुलें. ह्यांतला महादेव हा लहानपणीं एकदां मुतखड्याच्या विकारानें फार आजारी होता. अवलाईनीं औषधें, भालदोऱ्या सर्व कांहीं करून पाहिलें, पण कशानेंहि गुण येईना. तुकाराम हे केवळ श्रीविठ्ठलावर भरंवसा ठेवीत. त्याची इच्छा असेल तें होवो, हाच त्यांचा मंत्र; हेंच त्यांचे औषधी उपाय. मुलगा तर अगदीं मरणोन्मुख झालेला. त्याच्या हाल अपेष्टा आईला अगदीं पाहवतना. त्या दुःखाच्या व वैतागाच्या भरांत तिनें विठ्ठलावर यथेच्छ तोंड सोडिलें. विठोबा देवास त्या नेहमीं 'काळ्या' असें ह्मणत असत. व त्याच्या नादीं तुकाराम लागले, ह्मणूनच संसाराचें वाटोळें झालें असें त्यांना वाटे. शेवटीं मुलाला नेऊन विठ्ठलमूर्तीवर आपटावा ह्मणजे त्याच्या यातना तरी एकदम संपतील असें ह्मणून त्या देवळांत गेल्या, व आतां आपटणार, तों असा चमत्कार झाला कीं 'तुझा मुलगा बरा झाला' असे शब्द त्यांच्या कानीं पडले, पहातात तों खरेंच. भक्तांची जीवप्राण जी भक्ति तिनें ज्याचें चित्त चोरलें आहे, तो तिला वश होऊन काय न करील ? मुलानें आपल्याला लघवी होते असें सांगितलें, तेव्हां आईनें त्यास उचलून बाहेर नेलें; पुष्कळ लघवी सुटून मुलगा रोगमुक्त झाला. नंतर त्यानें खावयास मागितलें व खाऊन झोंप घेऊन उठला, तो चांगला बरा झाला.

तुकारामांचा लौकिक हळूहळू चहूंकडे फैलावत चालला. त्यांजबरोबर श्रीविठ्ठल भोजन करितात ही गोष्ट ऐकून, पुण्याजवळच्या चिंचवड गांवचे महागणपतिभक्त चिंतामणि देव यांनीं हा चमत्कार प्रत्यक्ष पहायास मिळावा म्हणून तुकारामांस चिंचवडास येण्याची विनंति केली. ती मान्य करून तुकाराम तेथें गेले. तेव्हां त्यांच्या नुसत्या भाषणानेंच चिंतामणी देवांस त्यांची निःसीम भक्ति व निर्मळ अंतःकरण दिसून आलें,

व त्यांजवर भगवत्कृपा झाली आहे ह्याचेंहि कांहीं चिन्ह त्यांस दिसलें. भोजनाचे वेळीं तुकारामांनीं दोन पानें अधिक आणवून मांडिलीं, व चिंतामणि देवांस सांगितलें कीं, 'गणपतीस भोजनास बोलवावें;' परंतु देवांस तें सामर्थ्य नव्हतें, म्हणून त्यांच्यानें कांहीं झालें नाहीं. तेव्हां तुकारामांनीं श्रीविठ्ठलाची व गणपतीची स्तुति व आराधना करून, त्यांस प्रत्यक्ष भोजनास आणिलें. त्यावेळीं चिंतामणि देवास व तुकारामांस मात्र ह्या उभय देवांचें दर्शन घडलें. पंक्तींत इतर मंडळी पुष्कळ होती, पण त्यांस वाढलेलीं पानें रिकामीं झालेलीं मात्र दिसलीं, देव दिसले नाहींत. मग चिंतामणि देवांस अतिशय आनंद झाला व त्यांनीं तुकारामांस फार गौरविलें. तेव्हां आपल्या नम्र स्वभावानुरूप तुकारामांनीं चिंतामणि देवांची स्तुति केली. ती अशी:—

माझा स्वामी तुम्ही वागविलों लाय । तेथें मी पतित काय आलों ॥ १ ॥
तीर्थें तुमच्या चरणीं जाह्लीं निर्मळ । तेथें मी दुर्बळ काय [illegible] ॥ २ ॥
तुका म्हणे देवा द्विज वंद्य । मी तो काय निंद्य हीन याति ॥ ३ ॥

वरील प्रसंगाचे इतर अभंग मिळून पांच अभंग पान [illegible] वर दिलेले आहेत. तुकारामांस तिन्ही मुली होत्या हें वर म्हटलेंच आहे. त्या [illegible] झाल्या, तेव्हां शिवाईनीं त्यांच्या मागें फारच निकड लाविली. तेव्हां तुकारामांनीं, बाहेर जाऊन रस्त्यांत खेळत होते त्यांतले स्वजातीचे पाहून तीन मुलगे आणून त्यांस हळद लाविली, व [illegible] लग्नें लाविलीं. नंतर [illegible] दूधभात जेऊं घातला. कोणी [illegible] नवऱ्या मुलांच्या आईबापांस ही [illegible] ली, तेव्हां त्यांसहि मोठा आनंद झाला व आप्तइष्टांस बरोबर घेऊन ते तेथें आले, व चार दिवस सोहळा केला. [illegible] सामान वगैरे करण्याचे कामीं चांगलें साह्य केलें. ह्या जावयांचीं आडनांवें [illegible], गाडे व जांभुळकर अशीं होतीं.

पंढरपुरास एक ब्राह्मण आपणांस शास्त्रव्युत्पत्ति व्हावी ह्मणून उपास करीत होता, त्यास 'आळंदीस जावें' असा दृष्टांत झाला. तेव्हां तो तेथें जाऊन उपास करीत राहिला. नंतर ज्ञानेश्वरांनीं स्वप्नांत येऊन त्यास सांगितलें कीं, 'तुकारामांस शरण जावें ह्मणजे इच्छा पूर्ण होईल.' तुकाराम हे शूद्र, यांजकडे जाऊन काय होणार असें मनांत येऊन, ब्राह्मण आधींच निराश झाला. तथापि दृष्टांतवचनांस मान देऊन देहूपर्यंत आला. ज्ञानेश्वरांचे ठायीं अपूर्व योग्यता वसत असून, ब्राह्मण त्यांच्या आज्ञेनें ह्यिकडे येतो हें मोठें आश्चर्य वाटून, तुकारामांनीं त्याचा आदर करून त्यास अकरा अभंग करून दिले, व

एक प्रासादिक नारळ दिला. ही गोष्ट अगदीं सॉक्रेटिसासारखी दिसते. त्या पाश्चात्य साधूस देलफायच्या देवानें कौल दिला होता कीं, सॉक्रेटिस हा सर्व अथेन्स शहरांत शहाणा आहे. तें ऐकून त्यासही असाच चमत्कार वाटला होता. त्याच्या चरित्रांतल्या पुष्कळ गोष्टींशीं तुकारामांच्या चरित्राचेंही साम्य दिसतें; तें पाहून असें वाटतें कीं, निरनिराळ्या देशांत कालांतरानें झालेलेही एकाच पुरुषांचे अवतार असतात. तुकारामांनीं नारळ व अभंग दिले खरे, पण ब्राह्मणास संस्कृत व्युत्पत्तिज्ञान हवें असल्यामुळें हे प्राकृत अभंग न आवडून तो ते तेथेंच टाकून चालता झाला. तेव्हां तुकारामांनीं १३ अभंगांचें ज्ञानेश्वरांस पत्र लिहिलें. हे १३ व वरचे अभंग ( पान ९५६ यांत ) आढळतील. ते फारच मार्मिक आहेत.

त्या ब्राह्मणानें टाकलेल्या नारळाची व अकरा अभंगांची अशी गोष्ट सांगतात कीं, शिवाजी महाराजांच्या पुराणिकाच्या पदरीं राहिलेल्या कोंडोबा नांवाच्या एका ब्राह्मणास तुकारामांनीं पुढें ते अभंग व नारळ दिला. नारळांत पाहतात तों नुसतीं उत्तम पाणीदार मोत्यें भरलीं होतीं! कोंडोबांस पुढें त्या अभंगांच्या योगानें ज्ञानप्राप्ति होऊन त्यांची मोठी कीर्ति झाली असें ह्मणतात. अमदाबादच्या एका मोठ्या सावकारानें अभीष्ट सिद्ध्यर्थ ज्ञानेश्वरास एक लाख रुपयांच्या जवाहिराचा नवस केला होता. तो नवस फेडण्याच्या हेतूनें सावकार नारळ कोरून, उंचा मोत्यांनीं भरून आळंदीस घेऊन आला; तेव्हां त्यास दृष्टांत झाला कीं, नारळ तुकारामांस द्यावा. ह्मणून सावकारानें तो तुकारामांस अर्पण केला होता; व तोच नारळ तुकोबांनीं ब्राह्मणास दिला होता.

एक वेळ लोहगांवचे कोणी लोक देहू मुक्कामीं आले होते, त्यांस असें वाटलें कीं, तुकारामांस आपल्या गांवीं घेऊन जावें व त्यांचें कीर्तन भजन वगैरे ऐकावें. त्यांनीं तुकारामांस विनयानें आमंत्रण केलें, तें त्यांनीं मान्य करून लोहगांवीं जाऊन तेथें त्यांच्या मनाप्रमाणें भजन कीर्तन केलें. त्या लोकांनीं तेथें मोठा समारंभ करून पुष्कळ दिवस भजन कीर्तन सतत चालविलें होतें. तेथील अगदीं गरीब लोकसुद्धां तुकारामांस शिधासामुग्री देत व आदरानें त्यांचें कीर्तन आपापल्या घरीं करवीत व त्यांचा उपदेश ग्रहण करीत. ते लोहगांवीं असतांना एकदां परचक्राचा वेढा पडला होता, त्या वेळचे तीन अभंग पान ९८६ वर आहेत.

लोहगांवाहून देहूस परत आल्यावर तुकारामाची कीर्ति अधिकच वाढत चालली. दर्शन घेऊन त्यांचे चमत्कार पहावे हा पुष्कळ भाविक लोकांचा हेतु असे, त्यामुळें

अगदीं लांबलांबच्या गांवांहून लोकांच्या झुंडींच्या झुंडी येऊं लागल्या. तेव्हां कीर्तनावर कीर्तनें सुरू झालीं. त्यांची आंगची उत्तम कवित्व शक्ति अभ्यासानें व उल्हासानें अधिकच प्रकाशली, त्यामुळें त्यांच्या कीर्तनास अतिशय रंग चढे. 'बोले तैसा चाले,' निस्पृह, निर्भीड व स्पष्टवक्ते असून भक्तिरसानें तुडुंब भरलेलें त्यांचें अंतःकरण कीर्तनाचे वेळीं जेव्हां ईश्वर प्रेमानें अतिशय उचंबळूं लागे, तेव्हां समुद्र जसा चंद्रास भेटूं पहातो, तसा त्यांचा जीवात्मा परमात्म्यास भेटण्यास धांवतो आहे असा भास होई व श्रोतेही देहभान विसरून जात, व त्यांचें चित्त तुकारामांचे ठायीं लीन होई. ह्यांच्या कीर्तनास अनेक जातींचे लोक येत. पण विद्येच्या व जातीच्या वृथाभिमानामुळें ब्राह्मणांची समजूत त्यांजविषयीं अशी असे कीं, हा कुळंबट उगाच कांहीं तरी पाखांड माजवीत आहे, अशा प्रकारची बडबड ब्राह्मणमंडळी नेहमीं करीत. इतक्यांत पुण्याच्या ईशान्येस वाघोली नांवाचें खेडें आहे, तेथें रामेश्वरभट्ट ह्मणून एक राजमान्य विद्वान् ब्राह्मण होते; त्यांस तुकारामांची लोकप्रियता पाहून मत्सर उत्पन्न झाला, व त्यांनीं निश्चय केला कीं, याला कांहीं तरी शासन झालें पाहिजे. मग त्यांनीं गांवच्या अधिकाऱ्यांच्या मनांत तुकारामांविषयीं वैषम्य उत्पन्न करून त्यांजकडून देहूच्या पाटलास तुकारामांस हद्दपार करण्याचा हुकूम मिळवून दिला. तो तुकारामाच्या दृष्टीस पडतांच त्यांस मोठी चिंता उत्पन्न झाली कीं, हें पूर्वापार देवस्थान सोडून कसें जावें. प्राणाहून प्रिय अशा वडिलोपार्जित विठोबाच्या सेवेस अंतराय होणार याचें त्यांस अनिवार दुःख झालें.

हें सारें कृत्य रामेश्वरांचें, असें समजतांच तुकाराम त्यांस शरण गेले व तेथेंच त्यांनीं विठ्ठलभजन सुरू केलें. त्यांत श्रुतींचा अर्थ आलेला पाहून, रामेश्वरांचें पित्त अगदीं खवळलें व ते तुकारामांस ह्मणाले-"तूं शूद्र आणि श्रुत्यर्थ सांगतोस तो ऐकणें व सांगणें हीं दोन्ही नरकप्रद आहेत, ह्मणून तूं हें कवित्व करूं नको." तुकाराम ह्मणालेः—"श्रीपांडुरंगाच्या आज्ञेवरून मीं ही बडबड करीत आलों, पण आतां आपण द्विजवर्य आज्ञापित आहां, ह्मणून इतःपर कवित्व करणें सोडून देतों, पण आजपर्यंत केलेल्या कवितेचें काय करूं!" तेव्हा रामेश्वरांनीं तें बुडवून टाकण्यास सांगितलें. मग तुकाराम देहूस आले व श्रीविठ्ठलमूर्तीस हा वृत्तांत निवेदन करून त्यांनीं अभंगांच्या वह्या वरखालीं दगडी चिपांनीं रुमालांत बांधून इंद्रायणीच्या डोहांत बुडवून टाकिल्या, तेव्हां पुष्कळ भाविक लोकांस फार वाईट वाटलें, व विघ्नसंतोष्यांचा आनंदतरंग गगनांत मावेनासा झाला. मग चार पांच दिवसांनीं हे परोत्कर्षासहिष्णु वीर तुकारामांकडे येऊन मानभावीपणानें

ह्मणतात कीं, 'तुह्मीं पूर्वीं इंद्रायणींत खतें बुडवून संसार बुडविलात व आतां कवित्व बुडवून परमार्थासही मुकलांत. ना प्रपंच ना परमार्थ साधला. असलें हें जिणें काय कामाचें !" हें खोंचून बोलणें त्यांच्या आधींच हताश व भंगलेल्या चित्तास शल्यवत् होऊन त्यांनीं अन्नपाणी वर्ज्य केलें व देवळासमोर तुळशीवृंदावनाजवळच्या एका शिळेवर विठ्ठलकरुणा भाकीत पडून राहिले. ते तेरा दिवसपर्यंत ह्या कुशीचे त्या कुशीसुद्धां वळले नाहींत, मग हालण्याचालण्याचें नांव तें कशाला? तेरा दिवसांच्या उपवासानें व अंतर्यामींच्या अलोट दुःखाच्या वेदनांनीं शरीर अगदीं कृश होऊन डोळ्यांत प्राण उरला होता. जवळ गेलें ह्मणजे नामस्मरणाचा मंद ध्वनि ऐकूं येई व श्वासोच्छ्वासाचा भास होई, तेवढ्यावरून मात्र समजावें कीं हे जिवंत आहेत ! बाकी कांहीं उरलें नव्हतें. ही त्यांची अत्यंत करुणावह स्थिति पाहून त्यांच्या भक्तांचें चित्त फारच हळहळलें. तेरा दिवस लोटल्यावर रात्रीं ह्या भक्तांस देवाचा दृष्टांत झाला कीं, "तुकारामांचें कवित्व मीं पाण्यांत रक्षण केलें आहे. त्यांच्या वह्या उदईक पाण्यावर तरतांना दिसतील, पहांटेस जाऊन काढून आणाव्या." त्याप्रमाणें भक्तमंडळी पहाटे इंद्रायणी तिरीं जाऊन पहाते तों खरेंच ! अभंगांच्या वह्या डोहांत कोरड्या तरंगत होत्या, त्या काढून घेऊन त्यांनीं श्रीविठ्ठलाची व त्याच्या प्रेमळभक्ताची–तुकारामाची–पुष्कळ स्तुति केली व अगदीं उत्सुक अंतःकरणानें व मोठ्या उल्हासानें ते लागलेच तुकारामाकडे येऊन सद्गदित होऊन मोठ्या कळवळ्यानें ह्मणाले–"महाराज आपण महासाधु, आपल्या भक्तीला वश झालेल्या श्रीपाडुरंगानें आपल्या वह्या इंद्रायणीच्या डोहांत आजवर रक्षण करून आतांच आपणांस आणून दिल्या आहेत, त्या डोळे उघडून पहा." हे अमृताधिक शब्द ऐकून तुकारामांच्या त्या शुष्क व मृतवत् देहांत जशी कांहीं वीजच संचरावी, याप्रमाणें ते तत्काळ खाडकन् उठून बसले. वह्या पाहतांच त्या अनन्यप्रेममूर्ति भक्ताचें हृदय कृतज्ञता व आनंदानें उचंबळून गेलें, तो लोट अंतःकरणांत मावेनासा होऊन डोळ्यांवाटे आनंदाश्रूंचे पूर लोटले, व मुखानें अंतःकरणांत खचलेलें प्रेमभांडार, स्तुतिपर अभंगाच्या रूपानें रिक्त केलें, तो प्रसंग कोणती निर्जीव लेखणी चितरूं शकेल ? बारा वर्षें वनवास भोगून परत आलेल्या प्राणाधिक श्रीरामास पाहून कौसल्या देवीला झालेल्या आनंदाला तरी कांहीं मिति असेल ! पण हा आनंद तर अमुल होता. त्या वेळचे त्यांचे अभंग इतके प्रेमपूर्ण व भक्तिरसानें ओथंबलेले आहेत, कीं त्यांतले दोन येथें दिल्यावांचून मनास रहावतच नाहीं.

रूपें गोंविलें चित्त । पायीं राहिलें निश्चिंत ॥ १ ॥
तुह्मीं देवा अवघेची गोमटे । मुख देखतां दुःख न भेटे ॥ २ ॥
जाली इंद्रियां विश्रांति । भ्रमतां पीडत ते होतीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे भेटी । सुटली भवबंदाची गांठी ॥ ४ ॥

हा अभंग त्यांच्या मनोवृत्तीचें अंतःकरणावर उत्तम चित्र उठवितो; तें पाहून कसलाही मनुष्य घटकाभर विदेही बनून सच्चिदानंदरूपांत विलीनदास होऊन जातो. अशी त्या अभंगाची जबर, विलक्षण सत्ता अजून अनुभवास येते; तर त्या भाविक भक्तांस त्या वेळीं काय वाटलें असेल, याची कल्पना करावी.

तूं माउलीहून मायाळ । चंद्राहूनि शीतळ ॥ १ ॥
पाणियाहूनि पातळ । कल्लोळ प्रेमाचा ॥ २ ॥
देऊं काशाची उपमा । दुजी तुज पुरुषोत्तमा ॥ ३ ॥
ओंवाळूनि नामा । तुझ्यावरूनि टाकिलों ॥ ४ ॥
तुवां केलें रे अमृता । गोड त्याही तूं परता ॥ ५ ॥
पांचा तत्त्वांचा जनिता । सकळ सत्ता नायका ॥ ६ ॥
कांहीं न बोलोनि आतां । उगाच चरणीं ठेवितों माथा ॥ ७ ॥
तुका ह्मणे पंढरिनाथा । क्षमा करीं अपराध ॥ ८ ॥

हा अभंग कोणत्या सहृदय श्रोत्यांस व वाचकांस प्रेमवश करून भक्तिरसानें विरघळविणार नाहीं ? असो. तुकारामांस याच प्रसंगीं कांहीं साक्षात्कार झाल्याचें त्यांच्याच उद्गारांवरून दिसतें.

थोर अन्याय केला । तुझा अंत म्यां पाहिला ॥ १ ॥
जनाचिया बोला । साठीं चित्त क्षोभविलें ॥ २ ॥
भागविलासी केला सीण । अधम मी यातिहीन ॥ ३ ॥
झांकूनि लोचन । दिवस तेरा राहिलों ॥ ४ ॥
अवघें घालूनियां कोडें । तानभुकेचें सांकडें ॥ ५ ॥
योगक्षेम पुढें । तुज करणें लागेल ॥ ६ ॥
उदकीं राखिले कागद । चुकविला जनवाद ॥ ७ ॥
तुका ह्मणे ब्रीद । साच केलें आपुलें ॥ ८ ॥

तूं कृपाळु माउली । आह्मां दीनांची साउली ॥ १ ॥
न संरित आली । बाळवेशें जवळी ॥ २ ॥
माझें केलें समाधान । रूप गोजिरें सगुण ॥ ३ ॥
निववीलें मन । आलिंगन देऊनि ॥ ४ ॥
कृपा केली जनार्दनीं । पायीं ठाव दिला संतीं ॥ ५ ॥
कळों नये चित्तीं । दुःख कैसें आहे तें ॥ ६ ॥
तुका ह्मणे मी अन्यायी । क्षमा करीं वो माझे आई ॥ ७ ॥
आतां पुढें काई । तुज घालूं सांकडें ॥ ८ ॥
कापो कोणी माझी मान । सुखें पीडोत दुर्जन ॥
तुज होय सीण । तें मी न करीं सर्वथा ॥ १ ॥
चुकी जाली एकवेळ । मजपासूनि चांडाळ ॥
उभें करोनियां जळा । माझीं वह्या राखिल्या ॥ २ ॥
नाहीं केला हा विचार । माझा कोण अधिकार ।
समर्थासीं भार । नकळे कैसा घालावा ॥ ३ ॥
गेलें होऊनियां करोनियां मागें । नये बोलों तें वाउगें ।
पुढिलिया प्रसंगें । तुका ह्मणे जाणावें ॥ ४ ॥

भक्तीची सत्ता, दृढनिश्चय व अभिमान आणि कळवळा दाखविणारे हे अभंग फार हृदयंगम आहेत. त्यांत श्रीविठ्ठल बालरूपानें येऊन भेटून त्यांनीं आपलें सांत्वन केलें असें तुकारामांनीं ह्मटलें आहे. भगवंतानें बालरूपानें दर्शन देणें यांत फार अर्थ आहे. भक्ताची थोरवी व आपलें अनुपम वात्सल्य आपण लहान व नम्र होऊन जितकें उत्तम तऱ्हेनें दर्शविलें गेलें आहे, तितकें दुसऱ्या रूपानें साधणें नाहीं. त्यानें, ईश्वरास भक्ताचा आदर केवढा वाटतो, व भक्तिच्या अंगीं ईश्वरास वळविण्याचें केवढें सामर्थ्य आहे, व प्रेमाचें उत्तम लक्षण जें प्रियजनांच्या ठायीं नम्रता तीं सारीं यांत व्यक्त झालीं आहेत.

अशी अभंगांच्या वह्यांची हकीकत होते, तों तिकडे रामेश्वरभट्टांवर एकाएकीं कांहीं निराळाच प्रसंग गुदरला. पुण्यांत बागनाथ ह्मणून जागृत दैवत होतें, त्यावर रामेश्वरांची मोठी श्रद्धा असे. तेथें ते दर्शनास गेले असतां एका विहिरींत स्नानास उतरले. विहीर ज्या बागेंत होती तींत अनघडसिद्ध नांवाचे एक अवलिया उतरले होते व त्या विहिरींच्या

पाण्यानें निमाज पडण्याच्या वेळीं ते हातपाय तोंड धुत होते. त्या विहिरींत स्नान करून रामेश्वर बाहेर येतात तों एकाएकीं त्यांच्या अंगांत अतिशय दाह होऊं लागला. कोणी ह्मणतात पाणी गढूळ झालें ह्मणून फकीरानें शाप दिला कीं हें कृत्य करणाराचा दाह होवो. व कोणी ह्मणतात फकीरानें पाण्यावर कांहीं प्रयोग केला असावा,व कोणास वाटलें कीं, तुकारामांचें कवित्व द्वेषबुद्धीनें नष्ट करविलें ह्मणूनच असें झालें असावें. असे अनेकांचे अनेक तर्क होते. अंगावर सतत ओलीं वस्त्रें व पाण्याची धार धरून अनेक औषधोपचार करूनही जेव्हां रामेश्वरांचा दाह शमेनासा झाला तेव्हां ते अलंकापुरीस ह्मणजे आळंदीस जाऊन ज्ञानदेवाची आराधना करूं लागले. तेथें त्यांस तुकारामांस शरण जाण्याविषयीं दृष्टांत झाला व त्याच सुमारास तिकडे देहूस त्यांच्या अभंगांच्या वह्या पाण्यांतून वर आल्याचें वर्तमान चहूंकडे पसरून रामेश्वरांच्याही कानीं गेलें, तेव्हां तुकारामांशीं आपण द्वेष केल्याबद्दल त्यास फार पश्चात्ताप झाला. मग त्यांनीं तुकारामांची एका अभंगांत स्तुति करून तो शिष्याहातीं त्यांस पाठविला; ती हकीकत वाचून तुकारामांस त्यांच्या अवस्थेबद्दल वाईट वाटलें व त्यांनीं रामेश्वराकडे पुढील अभंग पाठविला.

चित्तशुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र हे न खाती सर्व तया ॥ १ ॥
विष तें अमृत अघात तें हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥ २ ॥
दुःख तें देईल, सर्व सुखफळ । होतील शीतळ अग्निज्वाळा ॥ ३ ॥
आवडेल जीवां जिवाचिये परी । सकळां अंतरीं एक भाव ॥ ४ ॥

हा अभंग वाचतांच इतके दिवसांचा रामेश्वरांच्या अंगाचा दाह तो तत्काळ शांत झाला. मग ते आळंदीहून तुकारामांस भेटावयास निघाले, तों वाटेंतच उभयतांची गांठ पडली. रामेश्वरांनीं कृतज्ञ अंतःकरणानें तुकारामांची पुष्कळ स्तुति केली व तुकारामांनीं आपल्या नेहमींच्या विनयवृत्तीनें त्यांशीं गर्वरहित व मोकळ्या मनानें भाषण केलें. मग दोघेही आळंदीस गेले व लवकरच तुकाराम देहूस परत आले. ही हकीकत घडल्यापासून रामेश्वर हे तुकारामांशीं पुढें निरंतर स्नेहभावानें वागून त्यांजवळच राहूं लागले. हा वरील अभंग कै. न्यायमूर्ति रानडे यांनीं आपल्या एका व्याख्यानास आधारभूत धरिला आहे. तुकारामांच्या अभंगानें रामेश्वरभट्टांचा दाह शमला, हें अनघडसिद्ध अवलियांस कळलें, तेव्हां त्यांस मोठा चमत्कार वाटून, ते तुकारामांस पहावयास आले, व त्यांच्या भेटीनें त्यांस फार आनंद व समाधान वाटलें.

एकदां तुकाराम महाराजांवर मोहित झालेली कोणी एक स्त्री कामवश होऊन एकांत पाहून त्यांजकडे आली होती. तेव्हां या साधुपुरुषानें तीस मातेसमान मानून व पुष्कळ सदुपदेश करून निरोप दिला. ज्यांनीं भक्ति हा आपला विषय करून मन ईश्वरास वाहिलें त्यांजपुढें विषयाचा तोरा किती ? ह्या प्रसंगांचे त्यांचे कांहीं अभंग आहेत. लोहगांवच्या लोकांवर तुकारामांचा फार लोभ असे व त्यांचीही तुकारामांवर तशीच भक्ति असे. त्यांस तेथलें आमंत्रण आलें ह्मणून तिकडे ते गेले होते. बरोबर भाऊ कान्होबा, रामेश्वरभट्ट, गंगाजीमवाळ व संताजी तेली हे व इतर कांहींजण सदोदित असत, ते भजनाचे वेळीं मागें उभे रहात व धृपद धरीत. कथा भजनाची एकसारखी झड लागली होती. तेथले लोक भक्ति रसास्वादानें अगदीं गुंग झाले होते, पण त्या गांवांत शिवजी कासार ह्मणून एक गृहस्थ होता तो मात्र तुकारामांची नेहमीं निंदा करी. इतक्यांत एकदां असें झालें कीं, एक दरिद्री ऋणपीडित ब्राह्मण तुकारामांस शोधीत तेथें आला. तो आळंदीस धरणें घेऊन बसला असतां त्यास दृष्टांत झाला कीं, तुकारामांकडे जावें ह्मणजे संकट दूर होईल. हें ऐकून तुकारामांनीं ब्राह्मणास अश्वासन दिलें व आपल्या भक्त व शिष्य मंडळींस साह्य करण्यास सांगितलें. त्यांनीं गांवच्या लोकांकडून मागून पैसा जमविला व ब्राह्मणाच्या कर्जाची भरपाई केली तेव्हां तो मोठ्या आनंदानें स्वदेशीं परत गेला. ही गोष्ट कासारास समजल्यावर त्याच्या मनाचा वाईट ग्रह बदलला व असल्या साधु पुरुषांचा द्वेष करणें गैर आहे असें त्यास वाटूं लागलें. पुढें कांहीं दिवसांनीं ह्या कासाराचे गुमास्ते छत्तीस बैल घेऊन मुंबईस कथील खरेदी करण्यास गेले होते ते परत येऊन पहातात् तों आणिलेलें कथील नसून रुपें आहे. त्याबद्दल मुंबईच्या व्यापाऱ्यांस विचारतां त्यांनीं 'कथीलच दिलें होतें,' असें कळविलें; तेव्हां कासार तुकारामाचा सल्ला घ्यावयास आला. त्यास तुकाराम ह्मणाले कीं तुझ्या सुदैवानें तुला हा अचिंत्य द्रव्यलाभ झाला आहे, त्याचा सद्व्यय कर. मग शिवाजीनें लोहगांवीं वाटसरू लोकांसाठीं एक मोठी विहीर बांधली व ब्राह्मणभोजनें घालून पुष्कळ दानधर्महि केला. ह्या विहिरीस कासारविहीर ह्मणतात. पण त्या कृपण कासारावर ह्या द्रव्यप्राप्तीचा विलक्षणच परिणाम घडला. त्याची वृत्ति धनलोभानें फुगून न जातां उलट तो कांहीं अंशीं विरक्त झाला व अक्षय्य तुकारामापाशीं येऊन बसूं लागला. ही त्याची वृत्ति पाहून त्याच्या बायकोस अगदीं चैन पडेना. आपला नवरा तुकारामाच्या नादीं लागून विरक्त बनत चालला, ह्मणून ती त्यांचा फार मत्सर करूं लागली. तिनें एके दिवशीं तुकारामांस घरीं बोलावून स्नानाच्या निमित्तानें त्यांच्या अंगावर खूप कढत पाण्याच्या

घागरी ओतिल्या. तेव्हां त्यांचें अंग अतिशय पोळलें. त्या वेळचा त्यांचा अभंग (४४३६) आहे; पुढें या बाईस कोड उठलें, तेव्हां तुकारामांस आंघोळ घालून भाजलें होतें, तेथली माती लाविल्यानें तें बरें झालें; तेव्हांपासून ती द्वेषभाव सोडून तुकारामांच्या भजनीं लागली.

अशा एकेक गोष्टी चहूंकडे प्रसिद्ध झाल्यामुळें तुकारामांचें दर्शन घेण्यास अनेक लोक येऊं लागले. शिवाजी महाराजांना त्यांची कीर्ति ऐकून भेट घ्यावी असें वाटूं लागलें तेव्हां त्यांनीं कारकुनाबरोबर नजराणा, घोडे, अबदागिरी व बराच लवाजमा देऊन, त्यांस भेटीस बोलाविलें. तेव्हां तुकारामांनीं कशाचाहि स्वीकार न करितां नम्रपणें ह्मटलें कीं, आह्मीं भगवंताचे दास, आह्मांस हें ऐश्वर्य कशाला? हें सारें तुमचें तुह्मी परत न्या! असें ह्मणून व शिवाजी राजांस व त्यांच्या अष्टप्रधानांस उपदेशपर असे सात अभंग कारकुनांस लिहून दिले. (पान ९८२ पहा). त्यांत सांगितलेली राजनीति पाहून आजकालचे मुत्सद्दी सुद्धां स्तब्ध होतात, अशी त्यांची योग्यता आहे. तुकाराम महाराजांचा भगवद्भजन हाच एक विषय होता, तरी त्यांच्या तोंडून राजनीतितत्त्वांचा उपदेश असा मासलेवाईक यावा हें कांहीं लहानसहान आश्चर्य नव्हे! हे अभंग व तुकारामांची निस्पृहता पाहून राजांस चमत्कार वाटला, व त्यांच्या मनांत तुकारामांविषयीं विशेषच आदर वाढला. त्यांस भेटीची उत्कंठा इतकी झाली कीं, बरोबर झेलकी शेलकी मंडळी घेऊन व पुष्कळसें जवाहीर व नजराणा घेऊन स्वारी तुकारामांकडे गेली, व जवाहिरानें भरलेलें तबक स्वहस्तें त्यांजपुढें ठेविलें. पण त्या निस्सीम भगवद्भक्ताचें चित्त लवमात्रहि चळलें नाहीं. त्यानें त्या चालून आलेल्या लक्ष्मीचा अगदीं मनापासून तिरस्कार केला. भगवदर्पिणी भक्तीच्या अक्षय्य ईश्वर प्रेमाचे माळ घातल्यामुळें दैवी संपत्ति ज्याच्या पायीं लोळत आहे, त्यांच्या पुढें या नश्वर संपत्तीची मातब्बरी काय? ती त्याला मृत्तिकेसमान भासली, व देवानें हा प्रसंग आपणांवर कां आणला? याचें वाईट वाटून अत्यंत केविलपणें जणुं काय 'प्रभो, किती अंत पहातोस हा माझा' असें ह्मणून कंटाळा व तिरस्कार दाखविला. शिवाजी महाराजांस हें पाहून अत्यंत आश्चर्य वाटलें. त्यांनीं तें सर्व जवाहिर धर्मार्थ दिलें व तुकारामाच्या भजनकीर्तनांत ते लीन झाले. त्यांच्या मनाला उपरति होऊन, राज्यकारभार प्रधानादिकांस सांगून त्यांनीं एकांत पत्करिला. सकाळीं जाऊन एकटें बसावें तें रात्रीं कीर्तनास यावें. हें त्यांच्या मातुश्रीस समजलें तेव्हां त्यांस फार वाईट

घातलें. आपला एकुलता एक मुलगा, पोटीं संतान नाहीं, अल्पवयी, शिरावर राज्य-भार आणि संसारांतून विरक्त झाला, तेव्हां पुढें गति काय होणार ही चिंता त्यांच्या हृदयास जाळूं लागली. त्यांनीं तुकारामांकडे येऊन मोठ्या आर्जवानें ही हकीकत सांगून मुलाचें लक्ष पूर्ववत् संसारास लागावें असा उपदेश करण्यास विनंति केली. तेव्हां तुकारामांनीं तें मान्य करून रात्रीं राजे कीर्तनास आलेले पाहून कर्मकांडाचें निरूपण केलें. तें इतकें रसभरित झालें कीं शिवाजीचें व श्रोत्यांचीं मनें द्रवलीं. वर्णाश्रमधर्म व कर्तव्यपालन हाच तरणोपाय असें त्यांनीं त्या कीर्तनांत प्रतिपादन केलें, तेव्हां राजांच्या मनांत हा बोध ठसून महाराष्ट्राच्या सुदैवानें त्यांनीं पुनः राज्यसूत्रें हातीं घेण्याचें मान्य करून, तुकारामांचा आशीर्वाद व प्रसाद ग्रहण करून ते आनंदानें परत राज्यांत गेले व आपल्या वृद्ध मातुश्रींस त्यांनीं निश्चिंत केलें.

नंतर चार महिने होतांच लोहगांवाहून तुकाराम परत देहूस आले. या वेळीं त्यांच्या हातून पुष्कळ चमत्कार घडले. दरिद्यास चमत्कारिक तऱ्हेनें लक्ष्मी प्राप्त होणें, मुक्यास वाचा, एकाचें अन्न अनेकांस पुरणें, हिंस्र पशु वश होऊन माणसाळणें, लोखंडाचें सोनें करणें, खाऱ्या विहिरीचें पाणी गोड होणें, अंधारांत अंगांतून तेज दिसणें, संपायाला झालेला पदार्थ पुष्कळ दिवस पुरणें, मेलेलें मूल जिवंत होणें, इत्यादि अनेक अद्भुत प्रकार महीपतींनीं वर्णिले आहेत, पण ते येथें देण्यास अवकाश नाहीं. ह्या सर्व चमत्कारांवर पुष्कळांचा विश्वास नसल्यामुळें अनेकांनीं अनेक मतें दिलीं आहेत, आह्मांस कांहीं ह्मणावयाचें नाहीं; तरी एवढें मात्र सांगितल्यावांचून रहावत नाहीं कीं—अनिवार भक्तीच्या अंगीं सामर्थ्यहि असतें, अथवा भक्तास वश होऊन ईश्वर त्यास तें देतो व त्या योगानें चमत्कारिक वाटणाऱ्या गोष्टी त्यांजकडून घडतात. त्यांची प्रतीति पहावयास जिज्ञासूंनीं स्वतः त्या योग्यतेस चढून मग मत द्यावें हें बरें.

तुकाराम आषाढीकार्तिकी एकादशीची पंढपुरची वारी नेमानें करीत असत असें मागें ह्मटलेंच आहे. एकदां त्यांची प्रकृति अतिशय अस्वथ होती, त्यामुळें त्यांस वारीस जाववेना, तेव्हां त्यांनीं श्रीपांडुरंगास छत्तीस अभंगांचें पत्र पाठविलें. त्यांत आपण येण्यास असमर्थ आहों हें दर्शवून, भगवंताची करुणा अतिशय प्रेमळ तऱ्हेनें भाकली आहे. (पान ९५८ पहा). हे अभंग वारकऱ्यांनीं पंढरपुरास श्रीविठ्ठलास दिले. तेथून ते परत येईपर्यंत तुकाराम अगदीं अस्वस्थ होते. त्यांस अगदीं चैन पडत नव्हतें. वार-

करी परत येतांच त्यांस त्यांनीं प्रेमभरांत दृढ आलिंगन दिलें व पंढरपुरचा सर्व समाचार ऐकून ते संतुष्ट झाले. त्या वेळीं पंढरीनाथांनीं तुकारामास देहूस येऊन दर्शन दिलें व त्यांजबरोबर भोजन केलें, अशी आख्यायिका आहे. भक्तकुलरमणी मिराबाई हिचा भगवंताचे ठायीं अनन्य भाव होता, त्याची आठवण हे अभंग पहातांच झाल्यावांचून रहात नाहीं. ईश्वरप्रेमाचें लक्षण खऱ्या भक्तांनीं असें वर्णिलें आहे कीं, प्रिया, पुत्र, मित्र, बंधु, सखा, मातापिता हीं सर्व अन्योन्य नातीं त्यांच्याठायीं संभवतात. त्याचा प्रत्यय देवी मिराबाईप्रमाणें तुकारामांच्या अभंगांत हवा तेथें आढळून येतो. व हीच भक्तीची रमणीयता होय. भगवंतास कधीं आई मानून, तर कधीं मूल समजून, कधीं दासाप्रमाणें तर कधीं सत्तेनें, कधीं लाडानें तर कधीं स्नेहानें, व कधीं प्राणप्रिय पतीचा विरह असह्य होऊन हृदयस्फोट होत असलेल्या विह्वल साध्वीच्या उद्गारांनीं, असें अनंत प्रकारांनीं आपल्या देवास आळविलें आहे. फार दिवस सासुरवासानें कांचलेल्या मुलीनें आईचें नांव घ्यावें, अथवा कसायाच्या हातांत सांपडलेल्या गाईनें दीनवाणीनें हंबरडा फोडावा, तसें प्रपंचतापानें गांजलेल्या व ईश्वरभेटीस विह्वळ व उत्सुक झालेल्या हृदयाचें चित्र यांच्या करुणारसपूर्ण अभंगांनीं रंगविलें आहे. मनुष्याला मनुष्यपण जें आहे, तें केवळ त्याच्या अंतःकरणानेंच आलें आहे. व अंतःकरणाची थोरवी, भक्ति व प्रेमामुळेंच आहे. कारण त्या गुणांत मनुष्यांस देवत्व आणण्याचें सामर्थ्य आहे. त्या भक्तीचा वा प्रेमाचा विषय ज्यांनीं भगवंत केला आहे, त्यांच्या त्या अनुपम हृदयनिधीच्या तरंगांत भगवंताच्या सृष्टींतलीं हवीं तीं हृदयंगम चित्रें पाहून घ्यावींत. यांच्या सर्व अभंगांत प्रेमळ भक्तिरसानें ओथंबलेले अभंग आहेत ते अक्षय्य व चित्तद्रावक आहेत. त्यांचा प्रभाव फार विलक्षण आहे असा अनुभव आल्यावांचून रहात नाहीं, म्हणूनच आम्ही असल्या अभंगांस 'जीवंत अभंग' म्हणतों. कोठें कोठें अभंगांतून यांस आपल्या पूर्वजन्मीची ओळख पटल्याचें दर्शविलेलें आढळतें. निष्कपट, निर्मळ, बालकांसारखें शुद्ध कोमल अंतःकरण, अत्यंत दयाळूवृत्ति, अभिमानशून्यता, स्वार्थाची ओळखही नसणें, अपार उदारता, उदात्त व गंभीर विचारशक्ति, अमर्याद निस्पृहता, अतिशय स्पष्ट वक्तृत्व, उत्तम कल्पकथा, निर्लोभता, निष्काम अनुपम भक्ति व भगवद्भजनीं तनमनधनाचें अर्पण व सदैव परमार्थ बोध, तत्परता हे यांचे मुख्य गुण त्यांच्या अभंगांत ठिकठिकाणीं वठले आहेत. वाचनानें अथवा श्रवणानें मनुष्यांचीं मनें अगदीं वश करून सोडण्याचा गुण या अभंगांत ओतप्रोत भरला आहे. त्यांची कविता मधुरस्मितासारखी सहज, सुंदर, मंगळ

गोड व बहुतेक सुलभ आहे. त्यांस सगुणोपासनेचीच भक्ति विशेष असे. एकदां एका निर्गुण वाद्याच्या आग्रहास्तव हे विवेकसिंधु श्रवण करण्यास गेले व तोंडावरून घुंगट घेऊन बसले. ब्राह्मण निरूपण करूं लागला तरीं हुंकार कांहींच मिळेना ह्मणून घुंगुट काढून पहातो तों तुकाराम कानांत घट्ट बोळे घालून मुखानें नामोच्चारण करीत बसलेले! तेव्हां त्यास फार क्रोध चढला. त्यांनीं सगुणोपासनेचा महिमा दाखवून आपणास निर्गुण भक्ति आवडत नाहीं असें सांगितलें. नंतर तो ब्राह्मणही यांचा अनुयायी झाला.

असेंच एकदां लोहगांवीं कीर्तनाचे वेळीं दोन दुराग्रही कर्ममार्गवादी संन्यासी बसले होते. त्यांचें नाममाहात्म्यवर्णन ऐकून त्यांचें पित्त खवळलें व त्यांनीं तुकारामां· वर फिर्याद केली. तेव्हां दादोजी कोंडदेवांनीं तुकारामांच्या कीर्तनाचा पुण्यास भर लोकसमूहांत योग आणून, संन्याशांसही बोलाविलें. तेव्हां तुकारामांचा भाव पाहून त्यास अनुताप होऊन ते तुकारामांस नम्र झाले. ते पुण्यास असतां शिवाजीराजे कीर्तनास येत असत, त्या पाळथीवर राहून यवनांनीं एकदां देवळाभोंवतीं गराडा घातला. तेव्हां तुकारामांनीं राजांस अभय आश्वासन दिलें, त्या बिकट प्रसंगांतून श्रीपांडुरंगकृपेनें त्यांची सुटका झाली. ती अशी कीं, कोणी इसम घोड्यावरून जातांना यवनांस दिसला, ते शिवाजी असें समजून, ते पाठलाग करीत गेले, इतक्यांत राजे सुखरूप निघून गेले. कोंडोपंत लोहोकरे नांवाच्या ब्राम्हणास तुकारामांनीं काशीयात्रा करविली त्याची हकी-कत मनोवेधक आहे. ब्राह्मण दरिद्री होता. त्यास तुकारामांनीं एक होन दिला होता व तो मोडून शेवटीं उरेल तो एक पैसा पदरीं बांधून ठेवण्यास सांगितलें. असें केलें ह्मणजे त्या पैशाचा पुनः होन होत असे. त्या रीतीनें त्यास यात्रा करण्यास हवें तितकें द्रव्य मिळालें. शेवटीं तो होन तुकारामांनीं परत घेतला. एकदां तुकारामांनीं आपल्या मांडीचें कातडें कापून दाखविलें तों, आंत पिंजलेल्या कापसासारखें दिसलें, रक्तमांस कांहीं नव्हतें. लोहगांवच्या लोकांवर परचक्र आल्यामुळें पुष्कळांचीं घरें, दारें नष्ट झालीं. कांहीं वाट फुटेल तिकडे गेले, कांहीं विरक्त होऊन होईल तें होवो ह्मणून तेथेंच राहिले, व थोडे तुकारामाच्या लोभानें देहूस येऊन राहिले. एकादशीस देहूस मोठा कीर्तनाचा उत्सव होई तेव्हां त्यांचे चौदाहि शिष्य हजर असत व आसपासहून पुष्कळ लोक येत असत. त्यांची तुकारामांवर अगदीं कायावाचामनें करून भक्ति जडली होती. असें होतां होतां तुकारामांनीं थोड्याच दिवसांनीं ‘ काया ’ ब्रह्म केली. ते भजनांत रंगून जाऊन देहभान विसरत, तेव्हां त्यांनीं आपली स्थिति वर्णिली आहे ती अशी.—

डोळां भरलें रुप । चित्ता पायां पें संकल्प ॥ १ ॥
अवघी घातली बांटणी । प्रेम राहिलें कीर्तनीं ॥ २ ॥
वाचा केली माप । रासीं हरिनाम अमुप ॥ ३ ॥
भरूनियां भाग । तुका बेसला पांडुरंग ॥ ४ ॥

आह्मीं भक्ति करितों ती स्वतः साठीं, स्वार्थासाठीं, लौकिकास्तव अथवा चाल आहे ह्मणून करीत असतों. पण तुकाराम हे भक्तीसाठींच भक्ति करीत व देवा साठींच देवास आळवीत. त्यांची भक्ति व प्रणय देवच होऊन राहिला होता, त्यामुळें देवाचीं लक्षणें त्यांचे अंगीं आलीं होतीं. तीं अशीं कीं, दुष्ट, मूर्ख, दरिद्री, रोगग्रस्त, दीन, श्रीमंत, गरीब, चांगले, वाईट, सर्वांशीं ममतेनें वागून हितचिंतीत व त्यांनीं सन्मार्गास लागून आयुष्य सफल करावें ह्मणून मनापासून उपदेश करीत.

फारवेळ दृष्टी आड झालेल्या आईसाठीं मूल जसें कावरें बावरें होतें, अथवा दुष्काळ-ग्रस्ताचा जीव जसा अन्नासाठीं कासावीस होतो, तशी यांची वृत्ती भगवद्रूपदर्शनासाठीं होत असे. सामान्य माणसें स्त्रीपुत्र, आप्तइष्ट, कामक्रोध, लोभमोह, भूकतहान इत्यादिकांच्या तापानें व्याकूळ होऊन वेडावतात, पण तुकाराम हे भक्तीनेंच कासावीस व वेडे होत. त्यांच्यांत व इतरांत दुसरा मोठा भेद आहे तो हा कीं दुष्ट, मूर्ख व अशक्त माणसांचा त्यांस कंटाळा व तिरस्कार न येतां उलट दयेनें त्यांचें मन कळवळे व त्यांत सद्बुद्धि यावी ह्मणून ते देवास विनवित.

पुढें पुढें तुकारामांस ऐहिक क्रमाचा अगदीं कंटाळा येऊन वैकुंठ पुरास जावेंसें वाटूं लागलें. शेवटीं शेवटीं तर त्यांनीं असें आरंभिलें होतें, कीं कवितेंतच जें बोलायाचें तें सर्व ह्मणावें, एरवीं भाषण करूं नये. वैकुंठास जातों असें ते वारंवार ह्मणत. शेवटीं विरोधी नाम संवत्सरांत शके १५७१ त वद्य द्वितीया सोमवारीं सकाळीं त्यांनीं आपल्या अनुयायांस अखेरचा उपदेश केला व पत्नीस निरोप धाडिला कीं, 'आह्मीं वैकुंठपुरास जातों, तर तुह्मीही बरोबर चलावें." परंतु त्यांनीं उलट कळविलें कीं, 'मीं पांच महिन्यांची गरोदर असून लेंकरें बाळें लहान आहेत. घरीं गुरें ढोरें आहेत, हा प्रपंचाचा पसारा टाकून येववत नाहीं." शिवाय हे नेहमींच वैकुंठास जातों ह्मणत. तेव्हां कोठें तरी जात असतील असें सर्वांस वाटलें.

अभंग ह्मणत ह्मणत ते देवास नमस्कार करून, देवळाबाहेर पडले. तेव्हां सर्व मंडळीस फार दुःख झालें. ते कोठें जाणार याची कोणासच कल्पना नव्हती. हिमालयाकडे

काशीयात्रेस आले असतील, असा तर्क होता. तथापि चौदा शिष्य व इतर मंडळी त्यांजबरोबर इंद्रायणीपर्यंत आली. तेथें त्यांनीं विराण्या ह्मणजे विहरिणीचे, सखिभावाचें अभंग ह्मणण्यास सुरवात केली. हे अभंग अतिशय हृदयद्रावक आहेत. आधींच भक्ति अलोट, त्यांत आणखीं उत्सुकता वाढून जगाचा कंटाळा आलेला, मग काय? आधीं मागें ह्मटलेला भक्तिप्रणय यांत तुडुंब भरून वहात आहे. परमेश्वर प्राणप्रिय पति व आपण एखाद्या स्त्रीप्रमाणें त्याजवर अनुरक्त होऊन त्याचा वियोग दुःसह झाला आहे असें चित्र ह्या अभंगांत आहे.

हे विहरणीचे अभंग सरतांच पुष्पक विमानांत बसून ब्रह्मा, विष्णु, महेश, आदि देव यक्ष गंधर्वगण आदि तेथें आलीं. हीं विमानांतली मंडळी व तुकारामांचे शिष्य ह्यांच्यांत मोठा ईश्वरनामघोष व जयजयकार चालला होता. विमानांचें व देवांचें तेज पाहून, माणसांचे डोळे दिपून गेले. इतक्यांत देवांनीं तुकारामांस विमानांत बसवून घेतलें व विमान चालूं लागलें, तेव्हां त्यांच्या घंटांचा मोठा नाद झाला. तो दिगंतरीं दुमदुमत राहिला. कांहीं वेळानें विमानाचा प्रकाश व घंटानाद गेला तेव्हां लोक डोळे उघडतात तों तुकाराम दिसेनात. ह्मणून सर्वजण शोक करूं लागले. त्यांची पत्नी व मुलगेही तेथें येऊन पोहोंचले, त्यांच्या विलापास काय पार? ही गोष्ट सोमवारीं सकाळीं झाली. भक्तमंडळी पुष्कळ वेळ वाट पहात राहिली कीं, थोड्या वेळानें तुकाराम परत येतील. पण तसें कांहीं झालें नाहीं. देहूस श्रीविठ्ठलाचे परमभक्त तुकाराम ह्मणून झाले ते अशा तऱ्हेनें गुप्त झाले.

इंद्रायणीच्या डोहांतून निघालेलें पुस्तक आहे. त्याची तुकारामाचे वंशज देहूस पूजा करीत असतात. त्यांत तुकाराम तीर्थास गेले असें स्वच्छ लिहिलें आहे तें असें:—

"शके १५७१ वीरोधीनां संवसरेः सीमगा वद्य द्वीतयाः वार सोमवारः ते दिवशीं प्रातःकाळीं तुकोबांनीं तीर्थास प्रयाणं केलें शुभ भवतुः मंगळं" ॥ ॥ ॥

कान्होबा तुकारामांचे बंधु यांनीं त्यावेळीं पुष्कळ अभंग केले आहेत. ते शोक, करुणा वैताग व त्वेष यांनीं परिपूर्ण असे आहेत. तुकाराम न भेटले तर प्राण देऊं अशा निग्रहानें हे चौदा भक्त सारखे तीन दिवस इंद्रायणीतीरीं बसून राहिले. तों पंचमीचे दिवशीं तुकारामाची टाळ व गोधडी वरून आभाळांतून खाली पडली तीं सर्व भक्त मंडळींनीं पाहून हें तुकाराम महाराजांचें शेवटचें दर्शन असें ह्मणून पूज्यभावानें समा-

धान पावले. रामेश्वर भट्टांच्या संमतीनें पंचमी हीच तुकाराम बुवांची पुण्यतिथि ठरविली. व त्या दिवसापासून ब्राह्मणसंतर्पण व भोजनोत्सव सुरू करून तिसरे दिवशी सप्तमीस लळित केलें व आनंदानें उत्सव पार पाडिला. हाच क्रम अद्याप त्याच्या पुण्यतिथीचा चालत आहे. तुकारामांचे मुलगे भगवद्भक्तच निपजले. त्यांची पत्नी ते वैकुंठास जाते वेळीं गरोदर होती त्यांस पुढें पुत्र झाला, त्याचें नांव नारायण ठेविलें. हे नारायण बुवा ह्या नांवानें प्रसिद्ध आहेत. यांस शिवाजी महाराजांनीं चार गांव इनाम करून दिले व विठोबाच्या देवळास शिखर बांधलें. नारायणबुवानीं एकदां सर्वस्वदान केलें व दूरदूरच्या यात्रा केल्या. तुकारामांचे अभंग त्यांनीं पठण केले होते व कथेंत योजीत असत. यांचें कीर्तननैपुण्य लोक फार वाखाणतात.

महिपति म्हणतात कीं, तुकाराम गुप्त झाल्यावर सुद्धां त्याच्या कांहीं भक्तमंडळीस त्यांचे प्रत्यक्ष वापरोक्ष दर्शन झालें आहे. त्यांची येलवाडीस दिलेली कन्या, एक सन्यासी, बहिणाबाई नांवाची एक ब्राह्मणी, सुदुंबऱ्यास राहाणारा एक लिंगाईत वाणी, व निळोबा गोसावी पिंपळनेरकर यांस त्यांचें दर्शन झाले आहे.

महाराष्ट्रीय जनांच्या सुदैवाने व भगवंताच्या कृपेनें, तुकारामासारख्या विभूति उत्पन्न होऊन त्यांनीं मायभूमीस अक्षय्य सौभाग्याचा टिळा लाविला; स्वतःचे तनमन झिजवून पुढिलांस अभंग रूपानें अमोल, अनंत, शाश्वत व अभंग बोधभांडार देऊन व मानवजन्म सार्थक्याची किंवा मोक्षसदनाची किल्ली स्वाधीन करून ठेवून गेले आहेत. हें सदैव स्मरणांत ठेवून भारतवासी जनांची तद्वत् वागणूक होवो, ह्या मायभूमीच्या पोटीं पुन्हा अशीं अद्वितीय सुपुत्र रत्नें जन्मास येऊन तिचा यशोदुंदुभि दशदिशा दुमदुमवोत व त्यांचें वर्णन करण्यांतच हा देह अक्षय्य झिजून विश्राम पावो एवढेंच चिंतून वाचकांस 'पुनरागमनायच' असें प्रार्थून ही नम्र लेखणी निरोप इच्छिते.

# तुकारामाच्या अभंगांची गाथा.

## भाग पहिला.

### मंगलाचरण.

॥ १ ॥

सुंदर तें ध्यान उभे विटेवरी । कर कटावरी ठेवूनियां ॥ १ ॥
तुळशीहार गळां कासे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि ध्यान ॥ २ ॥
मकरकुंडलें तळपती श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणि विराजत ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ४ ॥

॥ २ ॥

राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया ॥ १ ॥
कस्तुरीमळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ॥ २ ॥
मुगुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतलें सकळही ॥ ३ ॥
कासे सोनसळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाइयांनो ॥४॥
सकळही तुम्ही व्हागे एकीसवा । तुका म्हणे जीवा धीर नाहीं ॥ ५ ॥

॥ ३ ॥

समचरणदृष्टि विटेवरी साजिरी । तेथें माझी हरी वृत्ति राहो ॥१॥
आणीक नलगे मायिक पदार्थ । तेथें माझें आर्त्त नको देवा ॥ २ ॥
ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी । तेथें दुश्चित्त झणी जडों देसी ॥३॥
तुका ह्मणे ज्याचें कळलें आह्मां वर्म । जे जे कर्मधर्म नाशवंत ॥४॥

॥ ४ ॥

सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती । रखुमाईच्या पती सोयरिया ॥१॥
गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्व काळ ॥ २ ॥
विठो माउलिये हाचि वर देईं । संचरोनि राहीं हृदयामाजी ॥ ३ ॥
तुका ह्मणे कांहीं न मागें आणीक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥४॥

॥ ५ ॥

गरुडाचें वारिकें कासे पितांबर । सांवळें मनोहर कैं देखेन ॥ १ ॥
बरवया बरवंटा घनमेघ सांवळा । वैजयंती माळा गळां शोभे ॥ २ ॥
मुगुट माथां कोटि सूर्याचा झळाळ । कौस्तुभ निर्मळ शोभे कंठीं ॥३॥
ओतींव श्रीमुख सुखाचें सकळ । वामांगीं वेल्हाळ रखुमा देवी॥४॥
उद्धव अक्रूर उभे दोहींकडे । वर्णिती पवाडे सनकादिक ॥ ५ ॥
तुका म्हणे नव्हे आणिकां सारिखा । तोचि माझा सखा पांडुरंग ॥६॥

॥ ६ ॥

धणी न पुरे गुण गातां । रूप दृष्टी न्याहाळितां ॥ १ ॥ बरवा बरवा पांडुरंग । कांति सांवळी सुरंग ॥ २ ॥ सर्व मंगळाचें सार । सुख सिद्धीचें भांडार ॥ ३ ॥ तुका म्हणे सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥४॥

॥ ७ ॥

राहो आतां हेंचि ध्यान । डोळां मन लंपटो ॥ १ ॥ कोंडुकोंडुनि धरीन जीवें । देहभावें पूजीन ॥ २ ॥ होईल येणें कळसा आलें । स्थिरावलें अंतरीं ॥ ३ ॥ तुका म्हणे गोजिरिया । विठोबा पायां पडों द्या ॥ ४ ॥

॥ ८ ॥

आवडे हें रूप गोजिरें सगुण । पाहतां लोचन सुखावले ॥ १ ॥
आतां दृष्टीपुढें ऐसाचि तूं राहें । जों मी तुज पाहें पांडुरंग ॥ २ ॥
लांचावलें मन लागलीसे गोडी । तें जीवें न सोडीं ऐसें झालें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही मागावी लाडिवाळी । पुरवावी आळी मायबापें ॥ ४ ॥

॥ ९ ॥

गरुडावरि बैसोनि येतो जगजेठी । त्याचे चरणीं मिठी घालूं चला ॥१ ॥
सांवळें रूपडें देखिलें लोचनीं । शंख चक्र दोन्ही शोभताहे ॥ २ ॥
पीतांबर झळके हेचि त्याची खूण । वाकी रुणझुण करीताती ॥ ३ ॥
गरुड चपेटा येत असे नेटें । कस्तुरीमळवट शोभताहे ॥ ४ ॥
पदक एकावळी शोभताहे कंठीं । तुका म्हणे मिठी घालूं चला ॥ ५ ॥

॥ १० ॥

गुणा आला विटेवरी । पितांबरधारी सुंदर ॥ १ ॥ डोळे कान त्याच्या ठायीं । मन पायीं राहो हें ॥ २ ॥ निवारोनि जाय माया । ऐशी छाया जयाची ॥ ३ ॥ तुका म्हणे समध्यान । हे चरण सुकुमार ॥ ४ ॥

॥ ११ ॥

स्वामी तूंही कैसा न पडसी डोळां । सुंदर सांवळा घवघवीत ॥१॥
चतुर्भुज माळा रुळे एकावळी । कस्तुरी निढळीं रेखिलीसे ॥२॥
शंख चक्र गदा रुळे वैजयंती । कुंडलें तळपती श्रवणीं दोन्ही ॥३॥
तुका म्हणे स्वामी आतां दावीं पाय । पांडुरंगे माये कृपावंते ॥४॥

॥ १२ ॥

धरोनियां फरश करीं । भक्तजनांचीं विघ्नें वारी ॥१॥ ऐसा गजानन महाराजा । त्याचे चरणीं लाहो माझा ॥ २ ॥ सेंदुर शमी बहुप्रिय ज्याला । तुरा दूर्वांचा शोभला ॥३॥ उंदिर असे जयाचें वाहन । माथां जडितमुगुट पूर्ण ॥४॥ नागयज्ञोपवीत रुळे । शुभ्र वस्त्र शोभित साजिरें ॥ ५ ॥ भावमोदक हाराभरी । तुका भावें पूजा करी ॥ ६ ॥

---

## बालक्रीडा.

॥ १३ ॥

देवा आदिदेवा जगत्त्रयजीवा । परियेसीं केशवा विनंति माझी ॥१॥
माझी वाणी तुझे वर्णी गुण नाम । ऐसें देईं प्रेम कांहीं कळा ॥२॥
कळा तुजपाशीं आमुचें जीवन । उचित करून देईं आह्मां ॥३॥
आह्मां शरणागतां तुझाचि आधार । तूं तव सागर कृपासिंधु ॥४॥
सिंधु पायवाट होय तुझ्या नामें । जाळी महा कर्में दुस्तरें तीं ॥५॥
तीं फळें उत्तमें तुझा निजध्यास । नाहीं गर्भवास सेविलिया ॥६॥
सेविलिया रामकृष्ण नारायण । नाहीं त्या बंधन संसाराचें ॥७॥
संसार तो काय तृणवतमय । अग्नि त्यासि खाय क्षणमात्रें ॥८॥

क्षणमात्रें जाळी दोषाचिया राशी । निंद्य उत्तमासी वंद्य करी ॥९॥
करीं ब्रीद साच आपलें आपण । पतितपावन दीनानाथ ॥१०॥
नाथ अनाथांचा पति गोपिकांचा । पुरवी चित्तींचा मनोरथ ॥११॥
चित्तीं जें धरावें तुका ह्मणे दासीं । पुरविता होशी मनोरथ ॥१२॥

॥ १४ ॥

मनोरथ जैसे गोकुळींच्या जना । पुरवावी वासना तयापरी ॥१॥
ऋण फेडावया अवतार केला । अविनाश आला आकारासी ॥२॥
क्षीण झाला वसुदेव देवकीस । वधी बाळें कंस दुराचारी ॥३॥
दुराचारियासी नाहीं भूतदया । आपपर तया पापपुण्य ॥४॥
पुण्यकाळ त्यांचा राहिलासे उभा । देवकीच्या गर्भा देव आले ॥५॥
गर्भासी तयांच्या आला नारायण । तुटलें बंधन आपोआप ॥६॥
आपोआप बेड्या तुटल्या शृंखळा । बंदाच्या अर्गळा किलिया कोंडे॥७॥
कोंडमार केला होता बहु दीस । सोडवी निमिष न लगतां ॥८॥
नकळे तो त्यासी सांगितला भाव । आपणासी ठाव नंदाघरीं ॥९॥
नंदाघरीं जातां येतां वसुदेवा । नाहीं जाला गोवा सवें देव ॥१०॥
सवें देव तया आड नये कांहीं । तुका ह्मणे नाहीं भय चिंता ॥११॥

॥ १५ ॥

चिंता ते पळाली गोकुळाबाहेरी । प्रवेश भीतरी केला देवें ॥१॥
देव आला घरा नंदाचिया गांवा । धन्य त्याच्या दैवा दैव आलें ॥२॥
आलें अविनाश धरूनि आकार । दैत्याचा संहार करावया ॥३॥
करावया भक्तजनांचें पाळण । आले रामकृष्ण गोकुळासी ॥४॥
गोकुळीं आनंद प्रगटलें सुख । निर्भर हे लोक घरोघरीं ॥५॥
घरोघरीं झाला लक्ष्मीचा वास । दैन्यदारिद्र्यास त्रास आला ॥६॥
आला नारायण तयांच्या अंतरा । दया क्षमा नरां नारीलोकां ॥७॥
लोकां गोकुळींच्या झालें ब्रह्मज्ञान । केलियावांचून जपतपें ॥८॥
जपतपें काय करावीं साधनें । जंव नारायणें कृपा केली ॥९॥

केली नारायणें आपुली अंकित । तोचि त्यांचें हित सर्व जाणे ॥१०॥
सर्व जाणे एक विष्णु साच खरा । आणीक दुसरा नाहीं नाहीं ॥११॥
नाहीं भक्ता दुजें तिहीं त्रिभुवनीं । एका चक्रपाणी वांचूनियां ॥१२॥
याच्या सुखसंगें घेती गर्भवास । तुका ह्मणे आस त्यजूनियां ॥१३॥

॥ १६ ॥

यांच्या पूर्वपुण्या कोण लेखा करी । जिहीं तो मुरारी खेळविला ॥१॥
खेळविला जिहीं अंतर्बाह्यसुखें । मेळवूनि मुखें चुंबन दिलें ॥२॥
दिलें त्यांसी सुख अंतरींचें देवें । जिहीं एका भावें जाणितला ॥३॥
जाणितला तिहीं कामातुर नारी । कृष्ण भोगावरी चित्त ज्यांचें ॥४॥
ज्यांचें कृष्णीं तन मन जालें रत । गृह पति सुत विसरल्या ॥५॥
विष तयां जालें धन मान जन । वसविती वन एकांतीं त्या ॥६॥
एकांतीं त्या जाती हरिसी घेउनी । भोगइच्छाधणी फेडावया ॥७॥
वयाच्या संपन्ना तैसा त्यांकारणें । अंतरींचा देणें इच्छाभोग ॥८॥
भोग त्याग नाहीं दोन्ही जयापासीं । तुका ह्मणे जैसी स्फटिकाशिळा॥९॥

॥ १७ ॥

शिळा स्फटिकाची न पालटे भेदें । दाऊनियां छंदे जैसी तैसी ॥१॥
जैसा केला तैसा होय क्षणक्षणा । फेडावी वासना भक्तिभावें ॥२॥
फेडावया आला अवघियांची धणी । गोपाळ गौळणी मायबापा ॥३॥
मायबापा सोडविलें बंदीहुनी । चाणूर मर्दुनी कंसादिक ॥४॥
दिक नाहीं देणें अरिमित्रा एक । पूतना कंटक मुक्त केली ॥५॥
मुक्त केला मामा कंस महादोषी । बाळहत्या राशी पातकांच्या ॥६॥
पाप कोठें राहे हरी आठवितां । भक्ती द्वेषें चिंता जैसा तैसा ॥७॥
साक्षी तयापाशीं पूर्वील कर्माच्या । बांधला सेवेच्या ऋणें देव ॥८॥
देव भोळा धांवे भक्ता पाठोपाठीं । उच्चारितां कंठीं मागेंमागें ॥९॥
मानाचा कंटाळा तुका ह्मणे त्यासी । धांवे तो घरांसी भाविकांच्या॥१०॥

॥ १८ ॥

चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणिती । बांधवी तो हातीं गौळणीच्या ॥ १ ॥
गौळणिया गळां बांधिती घारणीं । पायां चक्रपाणी लागे तयां ॥ २ ॥
तयांघरीं रिघे चोरावया लोणी । रितें पाळतूनी शिरे माजी ॥ ३ ॥
माजी शिरोनियां नवनीत खाये । कवाड तें आहे जैसें तैसें ॥ ४ ॥
जैसा तैसा आहे अंतर्बाह्यात्कारीं । ह्मणऊनि चोरी नसंपडे ॥ ५ ॥
नसंपडे तया करितां खटपट । वाउगे बोभाट वर्माविण ॥ ६ ॥
वर्म जाणती त्या एकल्या एकटा । बैसतील वाटा निरोधूनी ॥ ७ ॥
निवांत राहिल्या निःसंग होऊनी । निश्चळ ज्या ध्यानीं कृष्णध्यान ॥ ८ ॥
न ये क्षणभरी योगियांचे ध्यानीं । धरिती गौळणी भाविका त्या ॥ ९ ॥
भाविका तयांसी येतो काकुलती । शाहाण्या मरती नसंपडे ॥ १० ॥
नलगे वेचावी टोली धनानांवें । तुका ह्मणे भावें चाड एका ॥ ११ ॥

॥ १९ ॥

चाड अनन्याची धरी नारायण । आपणासमान करी रंका ॥ १ ॥
रंक होती राजे यमाचिये घरीं । आचरणें बरीं नाहीं म्हूण ॥ २ ॥
नसंपडे इंद्रचंद्रब्रह्मादिकां । अभिमानें एका तिळमात्रें ॥ ३ ॥
तिळमात्र जरी होय अभिमान । मेरु तो समान भारदेवा ॥ ४ ॥
भार पृथिवीचा वाहिला सकळ । जड होती खळ दुष्ट लोक ॥ ५ ॥
दुष्ट अभक्त जे निष्ठुर मानसीं । केली हे तयांसी यमपुरी ॥ ६ ॥
यमदूत त्यासी करिती यातना । नाहीं नारायणा भजले जे ॥ ७ ॥
जे नाहीं भजले एका भावें हरी । तया दंड करी यमधर्म ॥ ८ ॥
यमधर्म ह्मणे तया दोषियांसी । कां रे केशवासी चुकलेती ॥ ९ ॥
चुकलेती कथा पुराणश्रवण । होते तुम्हां कान डोळे मुख ॥ १० ॥
कान डोळे मुख संतांची संगति । न धराच चित्तीं सांगितलें ॥ ११ ॥
सांगितलें संतीं तुह्मां उगवुनी । गर्भासी येऊनी यमदंड ॥ १२ ॥
दंडूं आह्मी रागें ह्मणे यमधर्म । देवा होय श्रम दुर्जनांचा ॥ १३ ॥

दुर्जनांचा येणें करूनी संहार । पूर्ण अवतार रामकृष्ण ॥ १४ ॥
रामकृष्णनामें रंगले जे नर । तुका म्हणे घर वैकुंठीं त्या ॥ १५ ॥

॥ २० ॥

वैकुंठींच्या लोका दुर्लभ हरिजन । तया नारायण समागमें ॥ १ ॥
समागम त्यांचा धरिला अनंतें । जिहीं चित्तवित्तें समर्पिलीं ॥ २ ॥
समर्थे तीं गाती हरीचे पवाडे । येर ते बापुडे रावराणे ॥ ३ ॥
रामकृष्णें केलें कौतुक गोकुळीं । गोपाळांचे मेळीं गाई चारी ॥ ४ ॥
गाई चारी मोहोरी पांवा वाहे पाठीं । धन्य जाळी कांठीं कांबळी ते ॥५॥
काय गौळियांच्या होत्या पुण्यरासी । आणीक त्या ह्मैसी गाई पशु ॥६॥
सुख तें अमुप लुटिलें सकळीं । गोपिका गोपाळीं धणीवरी ॥ ७ ॥
धणीवरी त्यासी सांगितली मात । जयाचे जे आर्त तयापरी ॥ ८ ॥
परी याचें तुह्मी आइका नवल । दुर्गम जो खोल साधनासी ॥ ९ ॥
शिक लावुनियां घालिती बाहेरी । पाहाती भीतरीं सवेंचि तो ॥१०॥
तोंडाकडे त्यांच्या पाहे कवतुकें । शिव्या देतां सुखें हांसतसे ॥ ११ ॥
हांसतसे शिव्या देतां त्या गौळणी । मरतां जपध्यानीं न बोलेतो ॥१२॥
तो जें जें करील तें दिसे उत्तम । तुका ह्मणे वर्म दावी सोपें ॥ १३ ॥

॥ २१ ॥

वर्म दावी सोपें भाविकां गोपाळां । वाहे त्यांच्या गळां पाले माळा ॥१॥
मान देती आधीं मागतील डाव । देवा तें गौरव माने सुख ॥ २ ॥
मानती ते मंत्र हमामा हुंबरी । सिंतोडिती वरी स्नान तेणें ॥ ३ ॥
वस्त्रें घोंगडिया घालूनियां तळीं । वरी वनमाळी बैसविती ॥ ४ ॥
तिहीं लोकांसी जो दुर्लभ चिंतना । तो धांवे गोधना वळतिया ॥ ५ ॥
त्यांच्या वचनाचीं पुष्पें वाहे शिरीं । नैवेद्य त्यांकरीं कवळ मागे ॥ ६ ॥
त्यांचिये मुखींचें हिरोनियां घ्यावें । उच्छिष्ट तें खावें धणीवरी ॥ ७ ॥
वरी माथां गुंफे मोरपिसांवेटी । नाचे टाळी पिटी त्यांच्या छंदें ॥ ८ ॥
छंदें नाचतील जयासवें हरी । देहभाव वरी विसरलीं ॥ ९ ॥

बिखरलीं वरी देहाची भावना । तेचि नारायणा सर्वपूजा ॥१०॥
पूजा भाविकांची न कळतां घ्यावी । न मागतां दावी निज ठाव ॥११॥
ठाव पावावया हिंडे मागें मागें । तुका ह्मणे संगें भक्तांचिया ॥ १२ ॥

॥ २२ ॥

भक्तजनां दिलें निजसुख देवें । गोपिका त्या भावें आलिंगिल्या ॥१॥
आलिंगिल्या गोपी गुणवंता नारी । त्यांच्या जन्मांतरीं हरि ऋणी ॥२॥
रुसलिया त्यांचें करी समाधान । करविता आपण क्रिया करी ॥ ३ ॥
क्रिया करी तुह्मां न वजे पासुनी । अवघिया जणी गोपिकांसी ॥४॥
गोपिकांसी ह्मणे वैकुंठींचा पती । तुह्मी माझ्या चित्तीं सर्व भावें ॥५॥
भाव जैसा माझ्या ठायीं तुह्मी धरा । तैसाचि मी खरा तुह्मांलागीं ॥६॥
तुम्हां कळों द्या हा माझा साच भाव । तुमचाचि जीव तुह्मां ग्वाही॥७॥
ग्वाही तुह्मां आह्मां असे नारायण । आपुलीच आण वाहतसे ॥ ८ ॥
सत्य बोले देव भक्तिभाव जैसा । अनुभवें रसा आणूनियां ॥ ९ ॥
यासी बुझाविता वेगळाल्या भावें । एकीचें हें ठावें नाहीं एकी ॥१०॥
एकी क्रिया नाहीं आवघियांचा भाव । पृथक हा देव घेतो तैसें ॥११॥
तैसें कळों नेदी जो मी कोठें नाहीं । अवघियांचे ठायीं जैसा तैसा १२॥
जैसा मनोरथ जये चित्तीं काम । तैसा मेघश्याम पुरवितो ॥१३॥
पुरविले मनोरथ गोपिकांचे । आणीक लोकांचे गोकुळींच्या ॥१४॥
गोकुळींच्या लोकां लावियेला छंद । बैसला गोविंद त्यांचे चित्तीं ॥१५॥
चित्तें हीं चोरुनी घेतलीं सकळा । आवडी गोपाळावरी तया ॥१६॥
तयासी आवडे वैकुंठनायक । गेलीं सकळीक विसरोनि ॥१७॥
निंदा स्तुति कोणी न करी कोणाची । नाहीं या देहाचि शुद्धि कोणा १८।
कोणासी नाठवे कन्या पुत्र माया । देव ह्मणुनि तया चुंबन देती ॥१९॥
देती या टाकून भ्रतारासी घरीं । लाज ते अंतरीं आथीच ना ॥२०॥
नाहीं कोणा धाक कोणाशीं कोणाचा । तुका ह्मणे वाचा काया मनें २१॥

॥ २३ ॥

मनें हरिरूपीं गुंतल्या वासना । उदास या सुना गौळियांच्या ॥ १ ॥
यांच्या भ्रतारांचीं धरूनियां रूपें । त्यांच्या घरीं त्यांपें भोग करी ॥२॥
करी कवतुक त्यांचें तयापरी । एका दिसे हरि एका लेक ॥ ३ ॥
एक भाव नाहीं सकळांच्या चित्तीं । ह्मणऊनि प्रीति तैसें रूप ॥४॥
रूप याचें आहे अवघेंचि एक । परि कवतुक दाखविलें ॥ ५ ॥
लेंकरूं न कळे स्थूळ कीं लहान । खेळे नारायण कवतुकें ॥ ६ ॥
कवतुक केलें सोंग बहुरूप । तुका म्हणे बाप जगाचा हा ॥ ७ ॥

॥ २४ ॥

जगाचा हा बाप दाखविलें मायें । माती खातां जाय मारावया ॥ १ ॥
मारावया तिनें उगारिली काठी । भुवनें त्या पोटीं चौदा देखे ॥ २ ॥
देखे भयानक झांकियेले डोळे । मागुता तो खेळे तियेपुढें ॥ ३ ॥
पुढें रिघोनियां घाली गळां कव । कळों नेदी माव मायावंत ॥४॥
मायावंत विश्वरूप काय जाणे । माझें माझें ह्मणे बाळ देवा ॥ ५ ॥
बाळपणीं रिठा रगडिला दाढे । मारियेलें गाढे कागबग ॥ ६ ॥
गळां बांधवूनी उखळासी दावें । उन्मळीं त्या भावें विमळार्जून ॥ ७ ॥
न कळे जुनाट जगाचा जीवन । घातलें मोहन गौळियांसी ॥ ८ ॥
शिंकीं उतरूनी खाय नवनीत । न कळे बहुत होय तरी ॥ ९ ॥
तरी दुधें डेरे भरले रांजण । खाय ते भरून दावी दुणी ॥ १० ॥
दुणी जाले त्याचा मानिती संतोष । दुभत्याची आस धरूनियां ॥ ११ ॥
आशाबद्धा देव असोनि जवळी । नेणती ते काळीं स्वार्थामुळें ॥ १२ ॥
मुळें याच देव नकळे तयांसी । चित्त आशापाशीं गोवियेलें ॥ १३ ॥
लेंकरूं आमचें म्हणे दसवंती । नंदाचिये चित्तीं तोचि भाव ॥ १४ ॥
भाव जाणावया चरित्र दाखवी । घुसळितां रवी डेरियांत ॥ १५ ॥
डेरियांत लोणी खादलें रिघोनि । पाहे तों जननी हातीं लागे ॥ १६ ॥
हातीं धरूनियां काढिला बाहेरी । देखोनियां करी चोज त्यासी ॥ १७ ॥

लिकवी विचार नेणें त्याची गती। होता कोणेरीति डेरियांत ॥१८॥
यासी पुत्रलोभें न कळे हा भाव। कळों नेदी माव देव त्यांसी ॥१९॥
त्यांसी मायामोहजाळ घाली फांसा। देव आपणसा कळों नेदी ॥२०॥
नेदी भाव राहों लोभिकांचे चित्तीं। जाणतांचि होतीं आंधळीं तीं ॥२१॥
आंधळीं तीं तुका म्हणे संवसारीं। जिहीं नाहीं हरी ओळखिला ॥२२॥

॥ २५ ॥

ओळखी तयांसी होय एका भावें। दुसरिया देवें न पविजे ॥ १ ॥
न पविजे कदा उन्मत्त जालिया। दंभ तोचि वांयां नागवण ॥ २ ॥
वनवास देवा कारणें एकांत। करावीं हीं व्रततपें याग ॥ ३ ॥
व्रत याग यांसी फळलीं बहुतें। होतीं या संचितें गौळियांचीं ॥४॥
यांसी देवें तारियेलें न कळतां। मागील अनंता ठावें होतें ॥५॥
होतें तें द्यावया आला नारायण। मायबापां ऋण गौळियांचें ॥६॥
गौळियांचें सुख दुर्लभ आणिकां। नाहीं ब्रह्मादिकां तुका ह्मणे ॥७॥

॥ २६ ॥

नेणतियांसाठीं नेणतां लहान। थिंकोनी भोजन मागे माये ॥१॥
माया दोनी यास बाप नारायणा। सारखी भावना तयावरी ॥२॥
तयावरी त्यांचा समचित्त भाव। देवकीवसुदेव नंद दोघे ॥३॥
घेउनियां एके ठायीं अवतार। एकीं केला थोर वाढवूनी ॥४॥
उणा पुरा यासी नाहीं कोणी ठाव। सारिखाची देव अवघियांसी ॥५॥
यासी दोनी ठाव सारिखे अनंता। आधील मागुता वाढला तो ॥६॥
वाढला तो सेवाभक्तिचिया गुणें। उपचारमिष्टान्नें करूनियां ॥ ७ ॥
करूनी सायास मेळविलें धन। तेंही कृष्णार्पण केलें तिहीं ॥८॥
कृष्णासी सकळ गाई घोडे ह्मैसी। समर्पिल्या दासीं जीवेंभावें ॥९॥
जीवेंभावें त्याची करिती ते सेवा। न विसंबती नांवा क्षणभरी ॥१०॥
क्षणभरी होतां वेगळा तयास। होती कासावीस प्राण त्यांचे ॥११॥
त्यांचे ध्यानीं मनीं सर्वभावें हरि। देह काम करी चित्त त्यापें ॥१२॥

त्यांचेचि चिंतन कृष्ण कोठें गेला । कृष्ण हा जेविला नाहीं कृष्ण ॥ १३ ॥
कृष्ण आला घरा कृष्ण गेला दारा । कृष्ण हा सोयिरा भेटो कृष्ण॥ १४ ॥
कृष्ण गातां ओंव्या दळणीं कांडणीं । कृष्ण हा भोजनीं पाचारिती॥ १५ ॥
कृष्ण तयां ध्यानीं आसनीं शयनीं । कृष्ण देखे स्वप्नीं कृष्णरूप ॥ १६ ॥
कृष्ण त्यांस दिसे आभास दुश्चिता । धन्य मातापिता तुका ह्मणे ॥ १७ ॥

॥ २७ ॥

कृष्ण हा परिचारी कृष्ण हा व्यवहारी । कृष्ण घ्या वो नारी आणिकी ह्मणे
ह्मणे कृष्णाविण कैसें तुह्मां गमे । विळ हा करमे वांयाविण ॥ २ ॥
वांयाविण तुह्मी पिटितां चावटी । घ्यागे जगजेठी क्षणभरी ॥ ३ ॥
क्षणभरी याच्या सुखाचा सोहळा । पाहा एकवेळा घेऊनियां ॥ ४ ॥
याचें सुख तुह्मां कळलियावरी । मग दारोदारीं न फिराल ॥ ५ ॥
लटिकें हें तुह्मां वाटेल खेळणें । एका कृष्णाविण अवघेंचि ॥ ६ ॥
अवघ्यांचा तुह्मी टाकाल सांगात । घेऊनी अनंत जाल राना ॥ ७ ॥
नावडे तुह्मांस आणीक बोलिलें । मग हें लागलें हरिध्यान ॥ ८ ॥
न करा हा मग या जीवा वेगळा । टोंकवाल बाळा आणिकांहीं ॥ ९ ॥
आणिकांहीं तुह्मां येती काकुलती । जवळी इच्छिती क्षण बैसों ॥ १० ॥
बैसों चला पाहों गोपाळाचें मुख । एकी एक सुख सांगतील ॥ ११ ॥
सांगे जंव ऐसी मात दसवंती । तंव त्या धरिती चित्तीं बाळा ॥ १२ ॥
बाळा एकी घरा घेऊनियां जाती । नाहीं त्या परती तुका ह्मणे ॥ १३ ॥

॥ २८ ॥

तुका ह्मणे पुन्हां न येती मागुत्या । कृष्णासी खेळतां दिवस गमे ॥ १ ॥
दिवस राती कांहीं नाठवे तयांसी । पाहतां मुखासी कृष्णाचिया ॥ २ ॥
याच्या मुखें नये डोळयांसी वीट । राहिले हे नीट तटस्थचि ॥ ३ ॥
तटस्थ राहिलें सकळ शरीर । इंद्रियें व्यापार विसरलीं ॥ ४ ॥
विसरल्या तान भूक घरदार । नाहीं हा विचार असों कोठें ॥ ५ ॥
कोठें असों कोण जाला वेळ काळ । नाठवे सकळ विसरल्या ॥ ६ ॥

विसरल्या आह्मी कोणीचे जातीच्या । वर्णाही चहूंच्या एक जाल्या ॥७॥
एक जाल्या तेव्हां कृष्णाचिया सुखें । निःशंक भातुकें खेळतील ॥८॥
खेळती भातुकें कृष्णाच्या सहित । नाहीं आशंकित चित्त त्यांचें ॥९॥
चित्तीं तो गोविंद लटिकें दळण । करिती हें जन करी तैसें ॥१०॥
जन करी तैसा खेळतील खेळ । अवघा गोपाळ करूनियां ॥११॥
करिती आपला अवघा गोविंद । जना साच फंद लटिका त्या ॥१२॥
त्यांनीं केला हरि सासुरे माहेर । बंधु हे कुमर दीर भावें ॥१३॥
भावना राहिली एकाचिया ठायीं । तुका ह्मणे पायीं गोविंदाचे ॥१४॥

॥ २९ ॥

गोविंद भ्रतार गोविंद मूळहारी । नामें भेद परि एकचि तो ॥ १ ॥
एकाचींच नामें ठेवियेलीं दोनी । कल्पितील मनीं यावें जावें ॥ २ ॥
जावें यावें तिहीं घरींचिया घरीं । तेथींची सिदोरी तेथें न्यावी ॥ ३ ॥
विचारितां दिसे येणें जाणें खोटें । दाविती गोमटें लोकां ऐसें ॥ ४ ॥
लोक करूनियां साच वर्तताती । तैशा त्या खेळती लटिक्याची ॥ ५ ॥
लटिकीं करिती मंगळदायकें । लटिकींच एकें एकां व्याही ॥ ६ ॥
व्याही भाई हरि सोयरा जावई । अवघियांच्या ठायीं केला एक ॥७॥
एकाशीच पावें जें कांहीं करिती । उपचार संपत्ति नाना भोग ॥ ८ ॥
भोग देती सर्व एका नारायणा । लटिक्या भावना व्याही भाई ॥ ९ ॥
लटिकाची त्यांनीं केला संवसार । जाणती साचार वेगळा त्या ॥१०॥
त्यांनीं मृत्तिकेचे करूनी अवघे । खेळतील दोघे पुरुषनारी ॥ ११ ॥
पुरुषनारी त्यांनीं ठेवियेलीं नांवें । कवतुक भावें विचरती ॥ १२ ॥
विचरती जैसें साच भावें लोक । तैसें नाहीं सुख खेळतीया ॥१३॥
त्यांनीं जाणितलें आपआपणया । लटिकें हें वायां खेळतों तें ॥१४॥
खेळतों ते आह्मी नव्हों नारीनर । ह्मणोनी विकार नाहीं तयां ॥१५॥
तयां ठावें आहे आह्मी अवघीं एक । ह्मणोनी निःशंक खेळतील ॥१६॥
तयां ठावें नाहीं हरिचिया गुणें । आह्मीं कोणकोणे काय खेळों ॥१७॥

काय खातों आह्मीं कासया सांगातें । कैसें हें लागतें नेणों मुखीं ॥१८॥
मुखीं चवी नाहीं वरी अंगीं लाज । वर्ण याती काज न धरिती ॥१९॥
न धरिती कांहीं संकोच त्या मना । हांसतां या जना नाइकती ॥२०॥
नाइकती बोल आणिकांचे कानीं । हरि चित्तीं मनीं बैसलासे ॥२१॥
बैसलासे हरि जयांचिये चित्तीं । तयां नावडती मायबापें ॥२२॥
मायबापें त्यांचीं नेती पाचारूनी । बळें परि मनीं हरि वसे ॥२३॥
वसतील बाळा आपुलाले घरीं । ध्यान त्या अंतरीं गोविंदाचें ॥२४॥
गोविंदाचें ध्यान निजलिया जाग्या । आणीक वाउग्या न बोलती ॥२५॥
न बोलती निजलिया हरिविण । जागृति स्वप्न एक जालें ॥ २६ ॥
एकविध सुख घेती नित्य बाळा । भ्रमर परिमळा लागीं तैसा ॥२७॥
तैसा त्यांचा भाव घेतला त्यापरी । तुका ह्मणे हरि बाळलीला ॥२८॥

॥ ३० ॥

लीलाविग्रही तो लेववी खाववी । यशोदा बैसवी मांडीवरी ॥ १ ॥
मांडीवरी भार पुष्पाचिये परी । बैसोनियां करी स्तनपान ॥ २ ॥
नभाचाही साक्षी पाताळापरता । कुर्वाळिते माता हातें त्यासी ॥ ३ ॥
हातें कुर्वाळूनी मुखीं घाली घास । पुरे ह्मणे तीस पोट धालें ॥ ४ ॥
पोट धालें मग देतसे ढेंकर । भक्तीचें तें फार तुळसीदळ ॥ ५ ॥
तुळसीदळ भावें सहित देवा पाणी । फार तें त्याहुनि क्षीरसागर ॥६॥
क्षीराचा कंटाळा असे एक वेळ । भक्तीचें तें जळ गोड देवा ॥७॥
देवा भक्त जिवाहुनी आवडती । सकळहि प्रीति त्यांच्याठायीं ॥८॥
त्यांचा हा अंकित सर्व भावें हरि । तुका म्हणे करी सर्व काज॥९॥

॥ ३१ ॥

जयेवेळीं चोरूनियां नेलीं वत्सें । तयालागीं तैसें होणें लागे ॥ १ ॥
लागे दोहीं ठायीं करावें पाळण । जगाचा जीवन मायबाप ॥ २ ॥
माय जाल्यावरी अवघ्या वत्सांची । घरीं वत्सें जीचीं तैसा झाला॥३॥
झाला तैसा जैसें घरींचे गोपाळ । आणिक सकळ मोहरी पांवे॥४॥

मोहरी पांवे सिंगें वाहिल्या काहाळा । देखिला सोहळा ब्रह्मादिकीं॥५॥
ब्रह्मादिकां सुख स्वप्नींहि नाहीं । तैसें दोहीं ठायीं वोसंडलें ॥ ६ ॥
वोसंडल्या क्षीर अमुप त्या गाई। जैसी ज्याची आई तैसा जाला॥७॥
लाघव कळलें ब्रह्मयासी याचें । परब्रह्म साचें अवतरलें ॥८॥
तरले हे जन सकळही आतां । ऐसें तो विधाता बोलियेला ॥९॥
लागला हे स्तुति करूं अनंताची । चतुर्मुख वाची भक्तिस्तोत्रें ॥१०॥
भक्तिकाजें देवें केला अवतार । पृथिवीचा भार फेडावया ॥११॥
पृथिवी दाटिली होती या असुरीं । ना साहवे वरी भार तये ॥१२॥
तया काकुलती आपल्या दासांची । तयालागीं वेंची सर्वस्वही ॥१३॥
स्वहित दासांचें करावयालागीं । अव्यक्त हें जगीं व्यक्ती आलें ॥१४॥
लेखा कोण करी त्यांचिया पुण्याचा । जयांसवें वाचा बोले हरी ॥१५॥
हरी नाममात्रें पातकांच्या रासी। तो आला घरासि गौळियांच्या॥१६॥
गौळियें अवघीं झालीं कृष्णमय । नामें लोकत्रय तरतील ॥१७॥
तरतील नामें कृष्णाचिया दोषी । बहुत ज्यांपाशीं होइल पाप ॥१८॥
पाप ऐसें नाहीं कृष्णनामें राहे । धन्य तोचि पाहे कृष्णमुख ॥१९॥
मुख माझें काय जो मी वर्णु पार । मग नमस्कार घाली ब्रह्मा ॥२०॥
ब्रह्मा नमस्कार घाली गोधनासी । कळला तयासी हाचि देव ॥२१॥
देवचि अवघा जालासे सकळ । गाई हा गोपाळ वत्सें तेथें ॥२२॥
तेथें पाहाणें जें आणीक दुसरें । मूर्ख त्या अंतरें दुजा नाहीं ॥२३॥
दुजा भाव तुका ह्मणे जया चित्तीं । रवरव भोगिती कुंभपाक॥२४॥

॥ ३२ ॥

कुंभपाक लागे तयासी भोगणें । अवघाचि नेणें देव ऐसा ॥१॥
देव ऐसा ठावा नाहीं जया जना । तयासी यातना यम करी ॥२॥
कळला हा देव तया साच खरा । गाई वत्सें घरा धाडी ब्रह्मा ॥३॥
ब्रह्मादिकां ऐसा देव अगोचर । कैसा त्याचा पार जाणवेल ॥४॥
जाणवेल देव गौळियांच्या भावें । तुका ह्मणे व्हावें संचित हें ॥५॥

॥ ३३ ॥

संचित उत्तम भूमि कसूनियां । जाऊं नेणे बांयां परि त्यांचें ॥१॥
त्यांचिया पिकासी आलीया घुमरी । आल्या गाईवरी आणिक गाई॥२॥
गाई दवडूनी घालिती बाहेरी । तंव ह्मणे हरी बांधा त्याही ॥३॥
त्याही तुह्मी बांधा तुमच्या सारिख्या । भोवंडा पारिख्या वाड्यांतूनी॥४॥
पारिख्या न येती कोणाचिया घरा । सूत्रधारी खरा नारायण ॥ ५ ॥
नारायण नांदे जयाचिये ठायीं । सहज तेथें नाहीं वालमेली ॥ ६ ॥
मेलीं हीं शहाणीं करितां सायास । नाहीं सुखलेश तुका ह्मणे ॥७॥

॥ ३४ ॥

तुका ह्मणे सुख घेतलें गोपाळीं । नाचती कांबळीं करुनी ध्वजा ॥१॥
करुनियां टिरी आपल्या मांदळ । वाजविती टाळ दगडाचे ॥ २ ॥
दगडाचे टाळ कोण त्यांचा नाद । गीत गातां छंद ताल नाहीं ॥३॥
ताल नाहीं गातां नाचतां गोपाळा । घननीळ सांवळा तयांमध्यें ॥४॥
मध्यें जयां हरि सुख तें आगळें । देह भाव काळें नाहीं तयां ॥ ५ ॥
तयांसी आळंगी आपुलिया करीं । जाती भूमीवरी लोटांगणीं ॥ ६ ॥
निजभाव देखे जयांचिये अंगीं । तुका ह्मणे संगीं क्रीडे तया ॥ ७ ॥

॥ ३५ ॥

तयांसवें करी काला दहींभात । सिदोऱ्या अनंत मेळवुनी ॥ १ ॥
मेळवुनी अवघियांचे एके ठायीं । मागें पुढें कांहीं उरों नेदी ॥२॥
नेदी चोरी करूं जाणे अंतरींचें । आपलें ही साचें द्यावें तेथें ॥ ३ ॥
द्यावा दहीं भात आपले प्रकार । तयांचा व्यवहार सांडवावा ॥ ४॥
वांटी सकळांसीं हातें आपुलिया । जैसें मागे तया तैसें द्यावें ॥५॥
द्यावें सांभाळूनी समतुक भावें । आपणहि खावें त्यांचें तुकें ॥ ६ ॥
तुक सकळांचें गोविंदाचे हातीं । कोण कोणे गति भला बुरा ॥ ७ ॥
राखी त्यास तैसें आपल्याला भावें । विचारूनी द्यावें जैसें तैसें ॥८॥
तैसें सुख नाहीं वैकुंठींच्या लोकां । तें दिलें भाविकां गोपाळांसी ॥९॥

गोपाळांचे मुखीं देऊनी कवळ । घांस माखे लाळ खाय त्यांची ॥१०॥
त्यांचिये मुखींचे काढूनियां घांस । झोंबतां हातांस खाय बळें ॥११॥
बळें जयाचिया ठेंगणें सकळ । तयातें गोपाळ पाडितील ॥१२॥
पाठीं उचलूनी वाहतील खांदीं । नाचतील मांदी मेळवूनी ॥१३॥
मांदी मेळवूनी धणी दिली आह्मां । तुका ह्मणे जमा केल्या गाई ॥१४॥

॥ ३६ ॥

केला पुढें हरि अस्तमाना दिसा । मागें त्यासरिसा थाट चाले ॥१॥
थाट चाले गाई गोपाळांची धूम । पुढें कृष्ण राम तयां सोयी ॥२॥
सोयी लागलिया तयांची अनंतीं । न बोलावितां येती मागें तया ॥३॥
तयाचिये चित्तीं बैसला अनंत । घेती नित्यानित्य तेंचि सुख ॥४॥
सुख नाहीं कोणा हरीच्या वियोगें । तुका ह्मणे जुगें घडी जाय ॥५॥

॥ ३७ ॥

जाय फाकोनियां निवडोनी गाई । आपलाली सोयी घराचिये ॥१॥
घराचिये सोयी अंतरला देव । गोपाळांचा जीव गोविंदापें ॥२॥
गोविंदें वेधिलें तुका ह्मणे मन । वियोगें ही ध्यान संयोगाचें ॥३॥

॥ ३८ ॥

संयोग सकळां असे सर्वकाळ । दुश्चित्त गोपाळ आला दिसे ॥१॥
गोपाळ गुणाचा ह्मणे गुणमय । निंबलोण माये उतरिलें ॥२॥
उतरूनी हातें धरी हनुवटी । ओंवाळुनी दिठी सांडियेली ॥३॥
दिठी घाली माता विश्वाच्या जनका । भक्तीचिया सुखा गोडावला ॥४॥
लहान हा थोर जीवजंतु भूतें । आपण दैवतें जाला देवी ॥५॥
देवी झोंसासुर मुंजिया खेचर । लहानहि थोर देव हरि ॥६॥
हरि तुका ह्मणे अवघा एकला । परि हा धाकुला भक्तीसाठीं ॥७॥

॥ ३९ ॥

भक्तीसाठीं केली यशोदेसी आळी । थिंकोनियां चोळी डोळे देव ॥१॥
देव गिळूनियां धरिलें मौन । माये म्हणे कोण येथें दुजें ॥ २ ॥

दुजें येथें कोणी नाहीं कृष्णाविण । निरुतें जाणोन पुसे देवा ॥३॥
देवापाशीं पुसे देव काय जाला । हांसें आलें बोला याचें हरी ॥४॥
यांचे मी जवळी देव तो नेणती । लटिकें मानिती साच खरें ॥५॥
लटिकें तें साच साच तें लटिकें । नेणती लोभिकें आशाबद्ध ॥६॥
सांग ह्मणे माय येरू वासी तोंड । तंव तें ब्रह्मांड देखे माजी ॥७॥
माजी जया चंद्र सूर्य तारांगणें । तो भक्तांकारणें बाळलीळा ॥ ८ ॥
लीळा कोण जाणे याचें महिमान । जगाचें जीवन देवादिदेव ॥ ९ ॥
देवें कवतुक दाखविलें तयां । लागती ते पायां मायबाप ॥ १० ॥
मायबाप ह्मणे हाचि देव खरा । आणीक पसारा लटिका तो ॥११॥
तोहि त्यांचा देव दिला नारायणें । माझें हें करणें तोहि मीच ॥१२॥
मीच ह्मणऊनी जें जें जेथें ध्याती । तेथें मी श्रीपति भोगिता तें ॥१३॥
तें मज वेगळें मी तया निराळा । नाहीं या सकळा ब्रह्मांडांत ॥१४॥
तद्भावना तैसें भविष्य तयाचें । फळ देता साचें मीच एक ॥१५॥
मीच एक खरा बोले नारायण । दाविलें निर्वाण निजदासां ॥१६॥
निजदासां खूण दाविली नीरुती । तुका म्हणे भूतीं नारायण ॥ १७ ॥

॥ ४० ॥

नारायण भूतीं न कळे जयांसी । तयां गर्भवासीं येणें जाणें ॥ १ ॥
येणें जाणें होय भूतांच्या मत्सरें । न कळतां खरें देव ऐसा ॥ २ ॥
देव ऐसा जया कळला सकळ । गेली तळमळ द्वेषबुद्धि ॥ ३ ॥
बुद्धीचा पालट नव्हे कोणे काळीं । हरि जळीं स्थळीं तयां चित्तीं ॥४॥
चित्त तें निर्मळ जैसें नवनीत । जाणिजे अनंत तयामाजी ॥ ५ ॥
तयामाजी हरि जाणिजे त्या भावें । आपलें परावें सारिखेंचि ॥ ६ ॥
चिंतनें तयाच्या तरती आणीक । जो हें सकळीक देव देखे ॥ ७ ॥
देव देखे तोही देव कैसा नव्हे । उरला संदेहे काय त्यासी ॥ ८ ॥
काया वाचा मनें पूजावे वैष्णव । ह्मणऊनी भाव धरूनियां ॥ ९ ॥
यांसी कवतुक दाखविलें रानीं । वोणवा गिळूनी गोपाळांसी ॥ १० ॥

गोपाळांसी डोळे झांकविले हातें । धरिलें अनंतें विश्वरूप ॥ ११ ॥
पसरूनी मुख गिळियेलें ज्वाळ । पाहाती गोपाळ बोटां सांदी ॥ १२ ॥
संधि सारूनियां पाहिलें अनंता । ह्मणती ते आतां कळलासी ॥ १३ ॥
कळला हा तुझा देह नव्हे देवा । गिळिला वोणवा आणीक तो ॥१४॥
तो तयां कळला आरुषां गोपाळां । दुर्गम सकळां साधनांसी ॥ १५ ॥
सीण उरे तुका ह्मणे साधनाचा । भाविकांसी साचा भाव दावी ॥१६॥

॥ ४१ ॥

भाव दावी शुद्ध देखोनियां चित्त । आपल्या अंकित निजदासां ॥ १ ॥
सांगे गोपाळांसी काय पुण्य होतें । वांचलों जळते आगी हातीं ॥ २ ॥
आजी आम्हां येथें राखियेलें देवें । नाहीं तरी जीवें न वांचतों ॥ ३ ॥
न वांचत्या गाई जळतों सकळें । पूर्वपुण्यबळें वांचविलें ॥ ४ ॥
पूर्वपुण्य होतें तुमाचिये गांठीं । बोले जगजेठी गोपाळांसी ॥ ५ ॥
गोपाळांसी ह्मणे वैकुंठनायक । भले तुह्मी एक पुण्यवंत ॥ ६ ॥
करी तुका ह्मणे करविता आपण । द्यावें थोरपण सेवकांसी ॥ ७ ॥

॥ ४२ ॥

काय आह्मां चाळविसी वायांविण । ह्मणती दुरून देखिलासी ॥ १ ॥
लावूनियां डोळे नव्हतों दुश्चित । तुज पराचित्त भाव होती ॥ २ ॥
होती दृष्टि आंत उघडी आमची । बाहेरी ते वांयांचि कुंची झाकूं ॥३॥
जालासि थोरला थोरल्या तोंडाचा । गिळियेला वाचा धूर आगी ॥४॥
आगी खातो ऐसा आमचा सांगाती । आनंदें नाचती भोंवतालीं ॥५॥
भोंवतीं आपणा मिळविलीं देवें । तुका ह्मणे ठावें नाहीं ज्ञान ॥ ६ ॥

॥ ४३ ॥

नाहीं त्याची शंका वैकुंठनायका । नेणती ते एकाविण दुजा ॥ १ ॥
जाणतियां सवें येऊं नेदी हरि । तर्कवादी दुरी दुराविले ॥ २ ॥
वादियासीं भेद निंदा अहंकार । देऊनियां दूर दुराविले ॥ ३ ॥
दुराविले दूर आज्ञाबद्ध देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥ ४ ॥
चित्तीं द्रव्यदारा पुत्रादिसंपत्ती । समान ते होती पशु नर ॥ ५ ॥

नरक साधिला विसरोनि देवा । बुडाले ते भवनदीमाजी ॥ ६ ॥
जिहीं हरिसंग केला संवसारीं । तुका ह्मणे खरी खेप त्यांची ॥ ७ ॥

॥ ४४ ॥

खेळींमेळीं आले घरा गोपीनाथ । गोपाळांसहित मातेपाशीं ॥ १ ॥
मातेपाशीं एक नवल सांगती । जाली तैसी ख्याती वोणव्याची ॥ २ ॥
ओवाळिलें तिनें करूनी आरती । पुसे दसवंती गोपाळांसी ॥ ३ ॥
पुसे पडताळुनी मागुती मागुती । गोपाळ सांगती कवतूक ॥ ४ ॥
कवतूक कानीं आइकतां त्यांचे । बोलतां ये वाचे वीट नये ॥ ५ ॥
नयन गुंतले श्रीमुख पाहतां । न साहे लवतां आड पातें ॥ ६ ॥
तेव्हां कवतूक कळों आलें कांहीं । हळूहळू दोहीं मायबापां ॥ ७ ॥
हळूहळू त्यांचें पुण्य जालें वाड । वारलें हें जाड तिमिराचें ॥ ८ ॥
तिमिर हें तेथें राहों शके कैसें । जालियां प्रकाशें गोविंदाच्या ॥ ९ ॥
दावी तुका ह्मणे देव ज्या आपणा । पालटे तें क्षणामाजी एका ॥ १० ॥

॥ ४५ ॥

काय आतां यासी ह्मणावें लेंकरूं । जगाचा हा गुरु मायबाप ॥ १ ॥
माया याची यासी राहिली व्यापून । कळों नये क्षण एक होतां ॥ २ ॥
क्षण एक होतां विसरलीं त्यासी । माझें माझें ऐसें करी बाळा ॥ ३ ॥
करी कवतुक कळों नेदी कोणा । योजूनी कारणा तोंचि खेळे ॥ ४ ॥
तें सुख लुटिलें वरींचिया घरीं । तुका ह्मणे परी आपुलाल्या ॥ ५ ॥

॥ ४६ ॥

आपुलाल्यापरी करितील सेवा । गीत गाती देवा खेळवूनी ॥ १ ॥
खेळ मांडियेला यमुने पाबळीं । या रे चेंडूफळी खेळूं आतां ॥ २ ॥
आणविल्या डांगा चवगुणां काठी । बैसोनियां वांटी गडिया गडी ॥ ३ ॥
गडी जंव पाहे आपणासमान । नाहीं नारायण ह्मणे दुजा ॥ ४ ॥
जाणोनी गोविंदें सकळांचा भाव । तयांसी उपाव तोचि सांगे ॥ ५ ॥
सांगे सकळांसी व्हा रे एकीकडे । चेंडू राखा गडे तुह्मी माझा ॥ ६ ॥
मज हा न लगे आणीक सांगाती । राखावी बहुतीं हाक माझी ॥ ७ ॥

माझे हाके हाक मेळवा सकळ । नव जा बरळ एकमेकां ॥ ८ ॥
एका समतुकें अवघेचि राहा । जाईल तो पाहा धरा चेंडू ॥९॥
चेंडू धरा ऐसें सांगतो सकळां । आपण निराळा एकलाचि ॥१०॥
चिंतूनियां चेंडू हाणे ऊर्ध्वमुखें । ठेलीं सकळीक पाहातचि ॥ ११ ॥
पाहातचि ठेलीं न चलतां कांहीं । येरू लवलाहीं ह्मणे धरा ॥ १२ ॥
धरावा तयानें त्याचें बळ ज्यासी । येरां आणिकांसी लाग नव्हे ॥१३॥
नव्हे काम बळ बुद्धि नाहीं त्याचें । न धरवे निंचें उंचाविण ॥ १४ ॥
विचारीं पडले देखोनी गोपाळ । या ह्मणे सकळ मजमागें ॥ १५ ॥
मार्ग देवाविण न दिसे आणिका । चतुर होत का बहुत जन ॥ १६ ॥
चतुर चिंतिती वहुत मारग । हरि जाय लाग पाहोनियां ॥ १७ ॥
यामागें जे गेले गोविंदा गोपाळ । ते नेले सीतळ पंथ ठायां ॥ १८ ॥
पंथ जे चुकले आपले मतीचे । तयांमागें त्यांचे तेचि हाल ॥ १९ ॥
हाल दोघां एक मोहरां मागिलां । चालतां चुकलां वाट पंथ ॥ २० ॥
पंथ पुढिलांसी चालतां न कळे । मागिलांनीं डोळे उघडावे ॥ २१ ॥
वयाचा प्रबोध विचार ज्या नाहीं । समान तो देहीं बाळकांसी ॥ २२ ॥
सिकविलें हित नाइके जो कानीं । त्यामागें भल्यांनीं जाऊं नये ॥ २३ ॥
नये तेंचि करी श्रेष्ठाचिया मना । मूर्ख एक जाणा तोचि खरा॥ २४ ॥
रानभरी जाले न कळे मारग । मग तो श्रीरंग आठविला ॥ २५ ॥
लाज सांडूनियां मारितील हाका । कळलें नायका वैकुंठींच्या ॥ २६ ॥
चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणिती । तया अति प्रीति गोपाळांची॥२७॥
गोपाळांचा धांवा आइकिला कानीं । सोयी चक्रपाणि पालविलें ॥ २८ ॥
सोयी धरूनियां आले हरीपासीं । लहान थोरांसी सांभाळिलें ॥ २९ ॥
सांभाळिलें तुका ह्मणे सकळांही । सुखी जाले तेही हरिमुखें ॥ ३० ॥

॥ ४७ ॥

मुखें सांगे त्यांसी पैल चेंडू पहा । उदकांत डोहाचिये माथां ॥ १ ॥
माथां कळंबाचे अवघडा ठायीं । दाविचेला डोहीं जळामाजी ॥ २ ॥

जळांत पाहतां आडतीये दृष्टी । ह्मणे जगजेठी ऐसें नव्हे ॥ ३ ॥
नव्हे साच चेंडू छाया दिसे आंत । खरा तेथें चित्त लावा वरी ॥ ४ ॥
वरी देखियेला अवघ्यांनीं डोळां । ह्मणती गोपाळा आतां कैसें ॥ ५ ॥
कैसें करूनियां उतरावा खालीं । देखोनियां भ्यालीं अवघीं डोहो ॥ ६ ॥
डोहो बहू खोल काळया भीतरी । सरलीं माघारीं अवघीं जणें ॥ ७ ॥
जयाचें कारण तयासीच ठावें । पुसे त्याच्या भावें त्यास हरि ॥ ८ ॥
त्यासी नारायण ह्मणे राहा तळीं । चढे वनमाळी झाडावरी ॥ ९ ॥
वरी जातां हरि पाहाती गोपाळ । ह्मणती सकळ आह्मी नेणों ॥ १० ॥
नेणों ह्मणती हें करितोसी काई । आह्मां तुझी आई देइल सिव्या ॥ ११ ॥
आपुलिया कानां ठेवूनियां हात । सकळीं निमित्य टाळियेलें ॥ १२ ॥
निमित्याकारणें रचिलें कारण । गेला नारायण खांदीवरी ॥ १३ ॥
खांदीवरी पाव ठेवियेला देवें । पाडावा त्या भावें चेंडू तळीं ॥ १४ ॥
तळील नेणती तुका म्हणे भाव । अंतरींचा देव जाणों नेदी ॥ १५ ॥

॥ ४८ ॥

नेदी कळों केल्याविण तें कारण । दाखवी आणून अनुभवा ॥ १ ॥
न पुरेसा हात घाली चेंडूकडे । ह्मणितलें गडे सांभाळावें ॥ २ ॥
सांभाळ करिता सकळां जीवांचा । गोपाळांसी वाचा ह्मणे बरें ॥ ३ ॥
बरें विचारुनी करावें कारण । ह्मणे नारायण बऱ्या बरें ॥ ४ ॥
बरें ह्मणऊनी तयांकडे पाहे । सोडविला जाय चेंडू तळा ॥ ५ ॥
तयासवें उडी घातली अनंतें । गोपाळ रडत येती घरा ॥ ६ ॥
येतां त्यांचा लोकीं देखिला कोल्हाळ । सामोरीं सकळ आलीं पुढें ॥ ७ ॥
पुसती ते मात आपआपल्यासी । हरिदु:खें त्यांसी न बोलवे ॥ ८ ॥
न बोलवे हरि बुडालासें मुखें । कुंटितील दु:खें उर माथे ॥ ९ ॥
मायबापें तुका ह्मणे न देखती । ऐसें दु:ख चित्तीं गोपाळांच्या ॥ १० ॥

॥ ४९ ॥

गोपाळां उभडु नावरे दु:खाचा । कुंठित हे वाचा जाली त्यांची ॥ १ ॥
जालें काय ऐसें न कळे कोणासी । ह्मणती तुह्मांपासीं देव होता ॥ २ ॥

देवासवें दु:ख न पवते ऐसें । कांहीं अनारिसें दिसे आजी ॥ ३ ॥
आजी दिसे हरि फांकला यांपाशीं । ह्मणऊनी ऐशी परी जाली ॥ ४ ॥
जाणविल्याविण कैसें कळे त्यांसी । शाहाणे तयांसी कळों आलें ॥ ५ ॥
कळों आलें तिहीं फुंद शांत केला । ठायींचाच त्यांला थोडा होता ॥ ६ ॥
होता तो विचार सांगितला जना । गोपाळ शाहाणा होता त्याणें ॥ ७ ॥
सांगे आतां हरि तुह्मां आह्मां नाहीं । बुडाला तो डोहीं यमुनेच्या ॥ ८ ॥
यासी अवकाश नव्हेचि पुसतां । जालिया अनंता कोण परी ॥ ९ ॥
परी त्या दु:खाची काय सांगों आतां । तुका ह्मणे माता लोकपाळा ॥ १० ॥

॥ ५० ॥

पाषाण फुटती तें दु:ख देखोनी । करितां गौळणी शोक लोकां ॥ १ ॥
काय ऐसें पाप होतें आह्मांपासीं । बोलती एकासी एक एका ॥ २ ॥
एकांचिये डोळां असूं बाह्यात्कारीं । नाहीं तीं अंतरीं जळतील ॥ ३ ॥
जळतील एकें अंतर्बाह्यात्कारें । टाकिलीं लेंकुरें कडियेहूनी ॥ ४ ॥
निवांतचि एकें राहिलीं निश्चिंत । बाहेरी ना आंत जीव त्यांचे ॥ ५ ॥
त्यांचे जीव वरी आले त्या सकळां । एका त्या गोपाळांवांचूनियां ॥ ६ ॥
वांचणें तें आतां खोटें संवसारीं । नव्हे भेटी जरी हरीसवें ॥ ७ ॥
सवें घेऊनियां चाललीं गोपाळां । अवघींच बाळा नर नारी ॥ ८ ॥
नर नारी नाहीं मनुष्याचें नांव । गोकुळ हें गांव सांडियेलें ॥ ९ ॥
सांडियेलीं अन्नें संपदा सकळ । चित्तीं तो गोपाळ धरुनी जाती ॥ १० ॥
तिरीं माना घालूनियां उभ्या गाई । तटस्थ या डोहीं यमुनेच्या ॥ ११ ॥
यमुनेच्या तिरीं झाडें वृक्ष वल्ली । दु:खें कोमाइलीं कृष्णाचिया ॥ १२ ॥
यांचें त्यांचें दु:ख एक जालें तिरीं । मग शोक करी मायबाप ॥ १३ ॥
मायबाप तुका ह्मणे सहोदर । तोंवरीच तीर न पवतां ॥ १४ ॥

॥ ५१ ॥

तीर देखोनियां यमुनेचें जळ । कांठींच कोल्हाळ करिताती ॥ १ ॥
कइवाड नव्हे घालावया उडी । आपणासी ओढी भय मागें ॥ २ ॥

मागें सरे माय पाउलापाउलीं । आपलेंच घाली धाकें अंग ॥ ३ ॥
अंग राखोनियां माय खेद करी । अंतरींचें हरी जाणवलें ॥ ४ ॥
जाणवलें मग देवें दिली बुडी । तुका ह्मणे कुडी भावना हे ॥ ५ ॥

॥ ५२ ॥

भावनेच्या मुळें अंतरला देव । शिरला संदेह भयें पोटीं ॥ १ ॥
पोटीं होतें मागें जीव द्यावा ऐसें । बोलिल्या सरिसें न करवे ॥ २ ॥
न करवे त्याग जीवाचा या नास । नारायण त्यास अंतरला ॥ ३ ॥
अंतरला बहु बोलतां वाउगें । अंतरींच्या त्यागेंविण गोष्टी ॥ ४ ॥
गोष्टी सकळांच्या आइकिल्या देवें । कोण कोण्याभावें रडती तीं ॥ ५ ॥
तीं गेलीं घरास आपल्या सकळ । गोधनें गोपाळ लोक माय ॥ ६ ॥
मायबापांची तो ऐसी जाली गति । तुका ह्मणे अंतीं कळों आलें ॥ ७ ॥

॥ ५३ ॥

आला त्यांचा भाव देवाचिया मना । अंतरीं कारणांसाठीं होता ॥ १ ॥
होता भाव त्यांचा पाहोनी निराळा । नव्हता पाताळा गेला आधीं ॥ २ ॥
आधीं पाठीमोरीं जालीं तीं सकळें । मग या गोपाळें बुडी दिली ॥ ३ ॥
दिली हाक त्याणें जाऊली पाताळा । जागविलें काळा भुजंगासी ॥ ४ ॥
भुजंग हा होता निजला मंदिरीं । निर्भर अंतरीं गर्वनिधि ॥ ५ ॥
गर्व हरावया आला नारायण । मिस या करून चेंडुवाचें ॥ ६ ॥
चेंडुवाचे मिसें काळया नाथावा । तुका ह्मणे देवा कारण हें ॥ ७ ॥

॥ ५४ ॥

काळयाचे मागे चेंडु पत्नीपाशीं । तेज:पुंज राशी देखियेला ॥ १ ॥
लावण्यपुतळा मुखप्रभाराशी । कोटि रवि शशी उगवले ॥ २ ॥
उगवला खांब कर्दळीचा गाभा । श्रीदें वांकी नभा देखे पायीं ॥ ३ ॥
पाहिला सकळ तिनें न्याहाळूनी । कोण या जननी विसरली ॥ ४ ॥
विसरु हा तीस कैसा याचा जाला । जीवाहूनी वाला दिसतसे ॥ ५ ॥
दिसतसे रूप गोजिरें लहान । पाहातां लोचन सुखावले ॥ ६ ॥
पाहिलें पर्तोनी काळा दुष्टाकडे । मग ह्मणे कुडें जालें आतां ॥ ७ ॥

आतां हा उठोनी खाईल या बाळा । देईल वेल्हाळा माय जीव ॥ ८ ॥
जीव याचा कैसा वांचे ह्मणे नारी । मोहिली अंतरीं हरिरूपें ॥ ९ ॥
रूपें अनंताचीं अनंतप्रकार । न कळे साचार तुका ह्मणे ॥ १० ॥

॥ ५५ ॥

ह्मणे चेंडू कोणें आणिला या ठाया । आलों पुरवाया कोड त्याचें ॥ १ ॥
त्याचें आइकोन निष्ठुर वचन । भयाभीत मन जालें तिचें ॥ २ ॥
तिची चित्तवृत्ति होती देवावरी । आधीं ते माघारी फिरली वेगीं ॥ ३ ॥
वेगीं मन गेलें भ्रताराचे सोयी । विघ्न आलें कांहीं आह्मांवरी ॥ ४ ॥
वरी उदकास अंत नाहीं पार । अक्षोभ सागर भरलासे ॥ ५ ॥
संचार करूनी कोण्या वाटे आला । ठायींच देखिला अवचिता ॥ ६ ॥
अवचिता नेणों येथें उगवला । दिसे तो धाकुला बोल मोठे ॥ ७ ॥
मोठ्यानें बोलतो भय नाहीं मनीं । केला उठवूनी काळ जागा ॥ ८ ॥
जागविला काळसर्प तये वेळीं । उठिला कल्लोळीं विषाचिये ॥ ९ ॥
यमुनेच्या डोहावरी आला ऊत । काळयाकृतांतधुधुकारें ॥ १० ॥
कारणें ज्या येथें आला नारायण । जालें दरुषण दोघांमध्यें ॥ ११ ॥
दोघांमध्यें झाले बोल परस्परें । प्रसंग उत्तरें युद्धाचिया ॥ १२ ॥
चिंतावला चित्तीं तोंडें बोले काळ । करीन सकळ ग्रास तुझा ॥ १३ ॥
जाला सावकाश झेंप घाली वरी । तंव हाणे हरि मुष्टिघातें ॥ १४ ॥
तेणें काळें त्यासी दिसे काळ तैसा । हरावया जैसा जीव आला ॥ १५ ॥
आठवलें काळा हाकारिलें गोत । मिळालीं बहुत नागकुळें ॥ १६ ॥
कल्हारीं संधांनीं वेष्टियेला हरि । अवघा विखारीं व्यापियेला ॥ १७ ॥
यांस तुका ह्मणे नाहीं भक्ताविण । गरुडाचें चिंतन केलें मनीं ॥ १८ ॥

॥ ५६ ॥

निजदास उभा तात्काळ पायापें । स्वामी देखे सर्पें वेष्टियेला ॥ १ ॥
लहानथोरें होतीं मिळालीं अपारें । त्याच्या धुधुकारें निवारलीं ॥ २ ॥
विषतां आपटी धरुनी धांवामधीं । एकाचेंचि वधी माथें पायें ॥ ३ ॥
एकीं जीव दिले येतांच त्या धाकें । येतील तीं एकें काकूलती ॥ ४ ॥

यथेष्ट भक्षिलीं पोट धाये वरी । तंव ह्मणे हरि पुरे आतां ॥ ५ ॥
आतां करूं काम आलों जयासाठीं । हरि घाली मिठी काळयासी ॥ ६ ॥
यासी नाथूनियां नाकीं दिली दोरी । चेंडू भार शिरीं कमळांचा ॥ ७ ॥
चालविला वरी बैसे नारायण । गरुडा आळंगून बहुडविलें ॥ ८ ॥
विसरु न पडे संवगड्या गाई । यमुनेच्या डोहीं लक्ष त्यांचें ॥ ९ ॥
त्यांच्या गोष्टी कांठीं बैसोनी सांगती । बुडाला दाविती येथें हरि ॥ १० ॥
हरीचें चिंतन करितां आठव । तुका ह्मणे देव आला वरी ॥ ११ ॥

॥ ५७ ॥

अवचित त्यांणीं देखिला भुजंग । पळतील मग हाउ आला ॥ १ ॥
आला घेऊनियां यमुने बाहेरी । पालवितो करीं गडियांसी ॥ २ ॥
गडियांसी ह्मणे वैकुंठनायक । या रे सकळीक मजपाशीं ॥ ३ ॥
मजपाशीं तुह्मां भय काय करी । जवळी या दुरी जाऊं नका ॥ ४ ॥
कानीं आइकिले गोविंदाचे बोल । ह्मणती नवल चला पाहों ॥ ५ ॥
पाहों आले हरी जवळ सकळ । गोविंदें गोपाळ आलिंगिले ॥ ६ ॥
आल्या गाई वरी घालितील माना । वोरसलें स्तना क्षीर लोटें ॥ ७ ॥
लोटतीं सकळें एकावरी एक । होऊनी पृथक कुर्वाळलीं ॥ ८ ॥
कुर्वाळलीं आनंदें घेती चारापाणी । तिहीं चक्रपाणी देखियेला ॥ ९ ॥
त्यांचपाशीं होता परी केली माव । न कळे संदेह पडालिया ॥ १० ॥
याति वृक्ष वल्ली होत्या कोमेलिया । त्यांसी कृष्णें काया दिव्य दिली ॥ ११ ॥
दिलें गोविंदें त्या पदा नाहीं नाश । तुका ह्मणे आस निरसली ॥ १२ ॥

॥ ५८ ॥

आस निरसली गोविंदाचे भेटी । संवसारा तुटी पुढिलीया ॥ १ ॥
पुढें पाठविलें गोविंदें गोपाळां । देऊनी चपळां हातीं गुढी ॥ २ ॥
हाका आरोळिया देऊनी नाचती । एक सादाविती हरि आला ॥ ३ ॥
आरंभीं पडिलीं होतीं तयां घरीं । संकीर्ण त्या नारी नरलोक ॥ ४ ॥
लोकां भूक तान नाहीं निद्रा डोळां । रूप वेळोवेळां आठविती ॥ ५ ॥

आहाकटा मग करिती गेलिया। आधीं ठावा तयां नाहीं कोणा ॥ ६ ॥
आधीं चुकी मग घडे आठवण । तुका ह्मणे जन परिचयें ॥ ७ ॥

॥ ५९ ॥

जननी हे ह्मणे आहा काय जालें । शरीर रक्षिलें काय काजें ॥ १ ॥
काय काज आतां हरिविण जिणें। नित्य दुःख कोणें सोसावें हें ॥ २ ॥
हें दुःख न सरे हरि न भेटे तों । प्राणासीचि जातों एका वेळे ॥ ३ ॥
एकवेळ जरी देखतें मी आतां । तरी जीवापरता न करितें ॥ ४ ॥
करितां हे मात हरीचें चिंतन । शुभ तो शकुन तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ६० ॥

शुभ मात तिहीं आणिली गोपाळीं। चेंडू वनमाळी घेउनि आले ॥ १ ॥
आली दारा देखे हरुषाची गुढी । सांगितली पुढी हरुषें मात ॥ २ ॥
हरुषली माता केलें निंबलोण । गोपाळां वरून कुरवंडी ॥ ३ ॥
गोपाळां भोंवतें मिळालें गोकुळ । अवघीं सकळ लहान थोरें ॥ ४ ॥
थोर सुख जालें ते काळीं आनंद । सांगति गोविंद वरी आला ॥ ५ ॥
आले वरी बैसोनियां नारायण । काळया नाथून वहन केलें ॥ ६ ॥
नगराबाहेरी निघाले आनंदें । लावूनियां वाद्यें नाना घोष ॥ ७ ॥
नारायणापुढें गोपाळ चालती । आनंदें नाचती गाती गीत ॥ ८ ॥
तंव तो देखिला वैकुंठींचा पति । लोटांगणीं जाती सकळही ॥ ९ ॥
सकळही एका भावें आलिंगिले । अवघियां जाले अवघे हरि ॥ १० ॥
हरिआलिंगनें हरिरूपें जालीं । आप विसरलीं आपणास ॥ ११ ॥
सकळांसी सुख एक दिलें देवें । मायबापभावें लोकपाळां ॥ १२ ॥
मायबाप देवा नाहीं लोकपाळ । सारिखीं सकळ तुका ह्मणे ॥ १३ ॥

॥ ६१ ॥

नेणे वर्ण धर्म जीं आलीं सामोरीं । अवघींच हरी आलिंगिलीं ॥ १ ॥
हरि लोकपाळ आले नगरांत । सकळांसहित मायबाप ॥ २ ॥
पारणें तयांचें जालें एका वेळे । देखिलें सांवळें परब्रह्म ॥ ३ ॥
ब्रह्मानंदें लोक सकळ नाचती । गुढिया उभविती घरोघरीं ॥ ४ ॥

घरोघरीं सुख आनंद सोहळा । सडे रंगमाळा चौकदारीं ॥ ५ ॥
दारीं वृंदावनें तुळसीचीं बनें । रामकृष्णगाणें नारायण ॥ ६ ॥
नारायण तिहीं पूजिला बहुतीं । नाना पुष्पयाती करूनियां ॥ ७ ॥
यांचें ऋण नाहीं फिटलें मागील । पुढें भांडवल जोडिती हीं ॥ ८ ॥
हीं नव्हतीं कधीं या देवा वेगळीं । केला वनमाळी सेवाऋणी ॥ ९ ॥
सेवाऋणें तुका ह्मणे रूपधारी । भक्तांचा कैवारी नारायण ॥ १० ॥

॥ ६२ ॥

नारायण आले निजमंदिरासी । जाले या लोकांसी बहुडविते ॥ १ ॥
बहुडविले बहु केलें समाधान । विसरू तो क्षण नका माझा ॥ २ ॥
मात सांगितली सकळ वृत्तांत । केलें दंडवत सकळांनीं ॥ ३ ॥
सकळां भातुक वांटिल्या साखरा । आपुलाल्या घरा लोक गेले ॥ ४ ॥
लोक गेले कामा गाईपें गोपाळ । वारली सकळ लोभापाठी ॥ ५ ॥
लोभ दावूनियां आपला विसर । पाडितो कुमर धनआशा ॥ ६ ॥
आशेचे बांधले तुका ह्मणे जन । काय नारायण ऐसा जाणे ॥ ७ ॥

॥ ६३ ॥

जाला कवतुक करिता गोकडें । आणीकही पुढें नारायण ॥ १ ॥
येऊनियां पुढें धरिला मारग । हरावया भाग इंद्रयाजीं ॥ २ ॥
इंद्रा दहीं दुध तूप नेतां लोणी । घेतलें हिरोनी वाटे त्यांचें ॥ ३ ॥
हिरोनी घेतल्या कावडी सकळा । ह्मणती गोपाळा बरें नव्हे ॥ ४ ॥
नव्हे तेंचि करी न भे कळिकाळा । तुका ह्मणे लीळा खेळे देव ॥ ५ ॥

॥ ६४ ॥

खेळ नव्हे बरा इंद्र कोपलिया । देव ह्मणे तयां भीऊं नका ॥ १ ॥
नका धरूं भय धाक कांहीं मनीं । बोले चक्रपाणि गौळियांसी ॥ २ ॥
गौळियांसी धीर नाहीं या वचनें । आशंकितमनें वेडावलीं ॥ ३ ॥
वेडावलीं त्यांस न कळतां माव । देवाआदिदेव नोळखतां ॥ ४ ॥
नोळखतां दुःखें वाहती शरीरीं । तुका ह्मणे वरी भारवाही ॥ ५ ॥

॥ ६५ ॥

भारवाही नोळखती या अनंता । जवळी असतां अंगसंगें ॥ १ ॥
अंगसंगें तयां न कळे हा देव । कळोनी संदेह मागुताला ॥ २ ॥
मागुती पडती चिंतेचिये डोहीं । जयाची हे नाहीं बुद्धि स्थिर ॥ ३ ॥
बुद्धि स्थिर होऊं नेदी नारायण । आशाबद्ध जन लोभिकांची ॥ ४ ॥
लोभिकां न साहे देवाचें करणें । तुका ह्मणे तेणें दुःखी होती ॥ ५ ॥

॥ ६६ ॥

दुःखी होती लोभें करावें तें काई । उडतील गाई ह्मैसी आतां ॥ १ ॥
आणिकही कांहीं होईल अरिष्ट । नाइके हा धीट सांगितलें २ ॥
सांगों चला याच्या मायबापांपाशीं । निघाले घरासी देवा रागें ॥ ३ ॥
रागें काला देतां न घेती कवळ । टोकवी गोपाळ क्रोधियांसी ॥ ४ ॥
क्रोध देवावरी धरियेला राग । तुका ह्मणे भाग न लभती ॥ ५ ॥

॥ ६७ ॥

भाग त्या सुखाचे वांकड्यां बोवड्यां । आपुलिया गड्यां भाविकांसी॥ १ ॥
भारवाही गेले टाकूनी कावडी । नवनीतगोडी भाविकांसी ॥ २ ॥
काला करूनियां वांटिला सकळां । आनंदें गोपाळांमाजी खेळे ॥ ३ ॥
खेळेंमेळें दहीं दुध तूप खाती । भय नाहीं चित्तीं कवणाचें ॥ ४ ॥
कवणाचें चाले तुका ह्मणे बळ । जयासी गोपाळ साह्य जाला ॥ ५ ॥

॥ ६८ ॥

जाणवलें इंद्रा चरित्र सकळ । वांकुल्या गोपाळ दावितात्ती ॥ १ ॥
तातडिया मेघा आज्ञा करी राव । गोकुळींचा ठाव उरों नेदा ॥ २ ॥
नेदाविया गाई ह्मणी वांचों लोक । पुरा सकळीक सिळाधारीं ॥ ३ ॥
धाक नाहीं आज्ञा गौळियांच्या पोरां । सकळीक मारा ह्मणे मेघां ॥४॥
ह्मणविती देव आपणां तोंवरी । जंव नाहीं वरी कोपलों मी ॥ ५ ॥
मीपणें हा देव न कळेचि त्यांसी । अभिमानें रासी गर्वाचिया ॥ ६ ॥
अभिमानराशि जयाचिये ठायीं । तुका ह्मणे तई देव दुरी ॥ ७ ॥

॥ ६९ ॥

देव त्यां फावला भाविकां गोपाळां । नाहीं तेथें कळा अभिमान ॥ १ ॥
नाडलीं आपल्या आपणचि एकें । संदेहदायकें बहुफारें ॥ २ ॥
फारें चाळविलीं नेदी कळों भाव । देवाआदिदेव विश्वंभर ॥ ३ ॥
विश्वासावांचूनी कळों नये खरा । अभक्तां अधीरा जैसा तैसा ॥ ४ ॥
जैसा भाव तैसा जवळी त्या दुरी । तुका ह्मणे हरि देतो घेतो ॥ ५ ॥

॥ ७० ॥

तो या साचभावें न कळेचि इंद्रा । ह्मणऊनी धारा घाली सिळा ॥ १ ॥
घाली धारा मेघ कडाडिला माथा । वरी अवचिता देखियेला ॥ २ ॥
देखती पाऊस बोलला गोपाळ । भ्याले हे सकळ विचारिती ॥ ३ ॥
विचार पडला विसरले खेळ । अन्याय गोपाळ ह्मणती केला ॥ ४ ॥
लागलेंसे गोड न कळे ते काळीं । तेणें वनमाळी आठविती ॥ ५ ॥
आतां काय कैसा करावा विचार । गोधनासी थार आपणिया ॥ ६ ॥
यांचिया विचारें होणार तें काई । तुका ह्मणे ठायीं वेडावलीं ॥ ७ ॥

॥ ७१ ॥

वेडावलीं काय करावें या काळीं । ह्मणे वनमाळी गोपाळांसी ॥ १ ॥
शिरीं धरूं गोवर्धन उचलूनी । ह्मणे तुह्मी कोणी भिऊं नका ॥ २ ॥
नका सांडूं कोणी आपला आवांका । मारितां या हाका आरोळिया ॥ ३ ॥
आशंकित चित्तें न वाटे त्यां खरें । धाकेंच ते बरें ह्मणती चला ॥ ४ ॥
चित्तीं धाक परि जवळी अनंत । तुका ह्मणे घात होऊं नेदी ॥ ५ ॥

॥ ७२ ॥

नेदी दुःख देखों दासां नारायण । ठेवी निवारून आल्या आधीं ॥ १ ॥
आधीं पुढें शुद्ध करावा मारग । दासांमागें मग सुखरूप ॥ २ ॥
पर्वतासी हात लाविला अनंतें । तो जाय वरतें आपेंआप ॥ ३ ॥
आपल्या आपण उचलिला गिरी । गोपाळ हे करी निमित्यासी ॥ ४ ॥
निमित्य करूनी करावें कारण । करितां आपण कळों नेदी ॥ ५ ॥

दीनाचा कृपाळू पतितपावन । हें करी वचन साच खरें ॥ ६ ॥
सांगणें न लगे सुखदुःख दासा । तुका ह्मणे ऐसा कृपावंत ॥ ७ ॥
॥ ७३ ॥
कृपावंतें हाक दिली सकळिकां । माजिया रे नका राहों कोणी ॥ १ ॥
निघाले या भेणें पाउसाच्या जन । देखे गोवर्धन उचलिला ॥ २ ॥
लाविले गोपाळ फेरीं चहूंकडे । हांसे फुंदे रडे कोणी धाकें ॥ ३ ॥
धाकें हीं सकळ निघालीं भीतरी । उचलिला गिरी तयाखालीं ॥ ४ ॥
तयाखालीं गाई वत्सें आलीं लोक । पक्षी सकळीक जीवजाति ॥ ५ ॥
जिहीं ह्मणविलें हरिचे अंकित । जातीचे ते होत कोणी तरी ॥ ६ ॥
जाति कुळ नाहीं तयासी प्रमाण । अनन्या अनन्य तुका ह्मणे ॥ ७ ॥
॥ ७४ ॥
त्यांसी राखे बळें आपुले जे दास । कळिकाळासी वास पाहों नेदी ॥ १ ॥
पाउस न येतां केली यांची थार । लागला तुषार येऊं मग ॥ २ ॥
येऊनी दगड बैसतील गिरी । वरुषला धारीं शिळांचिये ॥ ३ ॥
शिळांचिया धारीं वरुषला आकांत । होता दिवस सात एक सरें ॥ ४ ॥
एक सरें गिरि धरिला गोपाळीं । होतों मात्र बळी आह्मी ऐसे ॥ ५ ॥
ऐसें कळों आलें देवाचिया चित्ता । ह्मणे तुह्मी आतां हात सोडा ॥ ६ ॥
हांसती गोपाळ करुनी नवल । आइकोना बोल गोविंदाचे ॥ ७ ॥
दावितील डोया गुडघे कोपर । फुटले ते भार उचलितां ॥ ८ ॥
भार आह्मांवरी घालुनी निराळा । राहिलासी डोळा चुकवूनी ॥ ९ ॥
निमित्य अंगुळी लावियेली वरी । पाहों कैसा गिरी धरितोसी ॥ १० ॥
सिणले हे होते ठायींच्या त्या भारें । लटिकेंचि खरें मानूनियां ॥ ११ ॥
त्यांणीं अंत पाहों आदरिला याचा । तुका ह्मणे वाचा वाचाळ ते ॥ १२ ॥
॥ ७५ ॥
वाचाळ लटिके अभक्त जे खळ । आपुलें तें बळ वाखाणावें ॥ १ ॥
बळें हुंबरती सत्य त्यां न कळे । नुघडती डोळे आंधळ्यांचे ॥ २ ॥
आसुडिल्या माना हात पाय नेटें । तंव भार बोटें उचलिला ॥ ३ ॥

लटिकाचि आह्मीं सीण केला देवा । कळों आलें तेव्हां सकळांसी ॥ ४ ॥
आलें कळों तुका ह्मणे अनुभवें । मग अहंभावें सांडवले ॥ ५ ॥

॥ ७६ ॥

सांडवले सकळांचे अभिमान । आणिले शरण लोटांगणीं ॥ १ ॥
लोटांगणीं आले होऊनियां दीन । मग नारायण ह्मणे भलें ॥ २ ॥
भला आजी तुह्मी केला साच पण । गिरि गोवर्धन उचलिला ॥ ३ ॥
लागती चरणा सकळ ते काळीं । आह्मांमध्यें बळी तूंचि एक ॥ ४ ॥
एका तुजविण न यों आह्मी कामा । कळों कृष्णा रामा आलें आजी ॥ ५ ॥
आजिवरी आह्मां होता अभिमान । नेणतां चरणमहिमा तुझा ॥ ६ ॥
तुझा पार आह्मी नेणों नारायणा । नखीं गोवर्धना राखियेलें ॥ ७ ॥
राखियेलें गोकुळ आह्मां सकळांसी । दगडांच्या रासी वरुषतां ॥ ८ ॥
वर्णावें तें काय तुझें महिमान । धरिती चरण सकळही ॥ ९ ॥
सकळही तान विसरलीं भूक । सकळही सुख दिलें त्यांसी ॥ १० ॥
त्यांसी कळों आला वैकुंठनायक । तुका ह्मणे लोक निर्भर ते ॥ ११ ॥

॥ ७७ ॥

लोकां कळों आला देव आह्मांमधीं । टाकिली उपाधि तिहीं शंका ॥१॥
शंका नाहीं थोरां लहानां जीवांसी । कळला हा हृषीकेशी मग ॥२॥
मग मनीं झाले निर्भर सकळ । संगें लोकपाळ कृष्णाचिया ॥ ३ ॥
कृष्णाचिया ओंव्या गाणें गाती गीत । कृष्णमय चित्त झालें त्यांचें ॥४॥
त्यांसी ठावा नाहीं बाहेरील भाव । अंतरींच वाव सुख झालें ॥ ५ ॥
सुखें तया दीस न कळे हे राती । अखंड या ज्योती गोविंदाची ॥६॥
चिंतनेंचि धालीं न लगे अन्नपाणी । तुका ह्मणे मनीं समाधान ॥ ७ ॥

॥ ७८ ॥

समाधान त्यांचीं इंद्रियें सकळ । जयां तो गोपाळ समागमें ॥ १ ॥
गोविंदाचा जाला प्रकाश भीतरी । मग त्या बाहेरी काय काज ॥२॥
काज काम त्यांचे सरले व्यापार । नाहीं आपपर माझें तुझें ॥ ३ ॥

माया सकळांची सकळांही वरी । विषम तें हरि दिसों नेदी ॥ ४ ॥
दिसे तया आप परावें सारिखें । तुका ह्मणे सुखें कृष्णाचिया ॥ ५ ॥

॥ ७९ ॥

कृष्णाचिया सुखें भूक नाहीं तान । सदा समाधान सकळांचें ॥ १ ॥
कळलेंचि नाहीं झाले किती दिस । बाहेरील वास विसरलीं ॥ २ ॥
विसरु कामाचा तुका ह्मणे जाला । उद्वेग राहिला जावें यावें ॥ ३ ॥

॥ ८० ॥

जावें बाहेरी हा नाठवे विचार । नाहीं समाचार ठावा कांहीं ॥ १ ॥
कांहीं न कळे तें कळों आलें देवा । मांडिला रिघावा कवतूक ॥ २ ॥
कवतुकासाठीं भक्त देहावरी । आणिताहे हरि बोलावया ॥ ३ ॥
यासी नांव रूप नाहीं हा आकार । कळला साचार भक्तांमुखें ॥ ४ ॥
मुखें भक्तांचिया बोलतो आपण । अंगसंगें भिन्न नाहीं दोघे ॥ ५ ॥
दोघे वेगळाले लेखील जो कोणी । तयाचा मेदिनी बहु भार ॥ ६ ॥
तयासी घडलीं सकळही पापें । भक्तांचिया कोपें निंदा द्वेषें ॥ ७ ॥
द्वेषियाचा संग न घडावा कोणा । विष जेंवी प्राणा नाश करी ॥ ८ ॥
करितां आइके निंदा या संतांची । तया होती तेचि अधःपात ॥ ९ ॥
पतन उद्धार संगाचा महिमा । त्यजावें अधमा संत सेवीं ॥ १० ॥
संतसेवीं जोडे महालाभरासी । तुका ह्मणे यासी नाश नाहीं ॥ ११ ॥

॥ ८१ ॥

नाहीं नाश हरि आठवितां मुखें । जोडतील सुखें सकळही ॥ १ ॥
सकळही सुखें बोळलीं अंतरीं । मग त्या बाहेरी काय काज ॥ २ ॥
वेऊं विसरलीं बाहेरी गोपाळें । तल्लीन सकळें कृष्णसुखें ॥ ३ ॥
सुख तें योगियां नाहीं समाधीस । दिलें गाई वत्स पशु जीवां ॥४॥
वारला पाऊस केव्हां नाहीं ठावा । तुका ह्मणे देवावांचूनियां ॥५॥

॥ ८२ ॥

यांसी समाचार सांगतों सकळां । चलावें गोकुळा ह्मणे देव ॥ १ ॥
देव राखे तया आवडिया काळें । देव सुखफळें देतो दासां ॥ २ ॥

दासां दुःख देखों नेदी आपुलिया । निवारी आलिया न कळतां ॥ ३ ॥
नाहीं मेघ येतां जातां देखियेला । धारीं वरुषला शिळांचिये ॥ ४ ॥
एवढें भक्तांचें सांकडें अनंता । होय निवारिता तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ८३ ॥

काकुलती एकें पाहाती बाहेरी । तयां ह्मणे हरि वोसरला ॥ १ ॥
वोसरला मेघ आला होता काळ । बाहेरी सकळ आले लोक ॥ २ ॥
कवतुक जालें ते काळीं आनंद । कळला गोविंद साच भावें ॥ ३ ॥
भावें तयापुढें नाचती सकळें । गातील मंगळें ओंव्या गीत ॥ ४ ॥
गीत गाती ओंव्या रामकृष्णावरी । गोपाळ मोहोरी वाहाती पांवे ॥ ५ ॥
वत्सें गाई पशु नाचती आनंदें । वेधलिया छंदें गोविंदाच्या ॥ ६ ॥
चित्त वेधियेलें गोविंदें जयाचें । कोण तें दैवाचें तयाहूनी ॥ ७ ॥
तयाहूनी कोणी नाहीं भाग्यवंत । अखंड सांगात गोविंदाचा ॥ ८ ॥
गोविंदाचा संग तुका ह्मणे ध्यान । गोविंद ते जन गोकुळींचे ॥ ९ ॥

॥ ८४ ॥

गोकुळींची गति कोण जाणे परि । पाहों आला वरि इंद्रराव ॥ १ ॥
इंद्रापाशीं मेघ बोलती बडिवार । सकळ संहार करुनी आलों ॥ २ ॥
आतां जीव नाहीं सांगाया ते रानीं । पुरिलें पाषाणीं शिळाधारीं ॥ ३ ॥
रिता कोठें नाहीं राहों दिला ठाव । जल्पती तो भाव न कळतां ॥४॥
न कळतां देव बळें हुंबरती । साच ते पावती अपमान ॥ ५ ॥
माव न कळतां केली तोंडपिटी । इंद्र आला दृष्टी पाहावया ॥ ६ ॥
पाहातां तें आहे जैसें होतें तैसें । नाचती विशेषें तुका ह्मणे ॥ ७ ॥

॥ ८५ ॥

नाचतां देखिलीं गाई वत्सें जन । विस्मित होऊन इंद्र ठेला ॥ १ ॥
लागला पाऊस शिळांचिये धारीं । वांचलीं हीं परी कैसी येथें ॥ २ ॥
येथें आहे नारायण संदेह नाहीं । विघ्न केलें ठायीं निर्विघ्न तें ॥ ३ ॥
विचारितां उचलिला गोवर्धन । अवतार पूर्ण कळों आला ॥ ४ ॥

आला गौळियांच्या घरा नारायण । करितो स्तवन इंद्र त्यांचें ॥ ५ ॥
त्यांच्या पुण्या पार कोण करी लेखा । न कळे चतुर्मुखा ब्रह्मयासी ॥ ६ ॥
सीणतां जो ध्याना न ये एकवेळा । तो तया गोपाळां समागमें ॥ ७ ॥
समागमें गाई वत्स पुण्यवंता । देह कुर्वाळितां अंगसंग ॥ ८ ॥
संग जाला मायबापां लोकपाळा । आलिंगिती गळा कंठाकंठ ॥ ९ ॥
करिते हे झाले स्तुति सकळीक । देव इंद्रादिक गोविंदाची ॥ १० ॥
करितील वृष्टि पुष्पवरुषाव । देवाआदिदेव पूजियेला ॥ ११ ॥
पुष्पांजुळी मंत्रघोष जयजयकार । दुमदुमी अंबर तेणें नादें ॥ १२ ॥
नामाचा गजर गंधर्वाचीं गाणीं । आनंद भुवनीं न माये तो ॥ १३ ॥
तो सुखसोहळा अनुपम्य रासी । गोकुळीं देवासी दोहीं ठायीं ॥ १४ ॥
दोहीं ठायीं सुख दिलें नारायणें । गेला दरुपणें वैरभाव ॥ १५ ॥
भावना भेदाची जाय उठाउठी । तुका ह्मणे भेटी गोविंदाचे ॥ १६ ॥

॥ ८६ ॥

गोविंदाचें नाम गोड घेतां वाचे । तेथें हे कइंचे वैरभाव ॥ १ ॥
भावें नमस्कार घातले सकळीं । लोटांगणें तळीं महीवरी ॥ २ ॥
वरी हातबाहे उभारिली देवें । कळलीया भावें सकळांच्या ॥ ३ ॥
सकळही वरी बहुडविले स्थळा । चलावें गोपाळां ह्मणे घरा ॥ ४ ॥
राहिलीं हीं नाचों गोविंदाच्या बोलें । पडलीया डोलें छंदें हो तीं ॥ ५ ॥
छंद तो नावरे आपणा आपला । आनंदाचा आला होता त्यांसी ॥ ६ ॥
त्यांच्या तुका ह्मणे आनंदें सकळ । ठेंगणें गोपाळ समागमें ॥ ७ ॥

॥ ८७ ॥

समागमें असे हरि नेणतियां । नेदी जाऊं वांयां अंकितांसी ॥ १ ॥
अंकितां सावध केलें नारायणें । गोपाळ गोधनें सकळही ॥ २ ॥
सकळही जन आले गोकुळासी । आनंद मानसीं सकळांच्या ॥ ३ ॥
सकळांचा केला अंगीकार देवें । न कळतां भावें वांचवी त्यां ॥ ४ ॥
त्यां झाला निर्भर हरि आह्मांपाशीं । निवांत मानसीं निर्भर ते ॥ ५ ॥

निर्भर हे जन गोकुळींचे लोक । केले सकळीक नारायणें ॥ ६ ॥
नारायण भय येऊं नेदी गांवा । तुका ह्मणे नांवा अनुसरे त्या ॥ ७ ॥

॥ ८८ ॥

अनुसरे त्यासी फिरों नेदी मागें । राहे समागमें अंगसंगें ॥ १ ॥
अंगसंगें असे कर्मसाक्ष देव । जैसा ज्याचा भाव तैसा राहे ॥ २ ॥
फळपाकीं देव देतील प्राणीयें । तुका ह्मणे नये सर्वें कांहीं ॥ ३ ॥

॥ ८९ ॥

ये दशे चरित्र केलें नारायणें । रांगतां गोधनें राखिताहे ॥ १ ॥
हें सोंग सारिलें या रूपें अनंतें । पुढेंही बहुतें करणें आहे ॥ २ ॥
आहे तुका ह्मणे धर्म संस्थापणें । केला नारायणें अवतार ॥ ३ ॥

॥ ९० ॥

अवतार केला संहाराया दुष्ट । करिती हे नष्ट परपीडा ॥ १ ॥
परपीडा करी दैत्य कंसराव । पुढें तोही भाव आरंभिला ॥ २ ॥
लाविलें लाघव पाहोनियां संधि । सकळांही वधी दुष्टजनां ॥ ३ ॥
दुष्टजन परपीडक जे कोणी । ते या चक्रपाणी न साहती ॥ ४ ॥
न साहावे दुःख भक्तांचें या देवा । अवतार घ्यावा लागे रूप ॥ ५ ॥
रूप हें चांगलें राम कृष्ण नाम । हरे भवश्रम उच्चारितां ॥ ६ ॥
उच्चारितां नाम कंस वैरभावें । हरोनियां जीवें कृष्ण केला ॥ ७ ॥
कृष्णरूप त्यासी दिसे अवघें जन । पाहे तों आपण कृष्ण जाला ॥ ८ ॥
पाहिलें दर्पणीं आधिल्या मुखासी । चतुर्भुज त्यासी तोचि जाला ॥ ९ ॥
जालीं कृष्णरूप कन्या पुत्र भाज । तुका ह्मणे राज्य सैन्य जन ॥ १० ॥

॥ ९१ ॥

सैन्य जन हांसे राया जालें काई । वासपे तो ठायीं आपणासी ॥ १ ॥
आपणा आपण जयास तीं तैसीं । वैरभाव ज्यांसी भक्ति नाहीं ॥ २ ॥
नाहीं याचा त्याचा भाव एकविध । ह्मणऊनी छंद वेगळाले ॥ ३ ॥
वेगळाल्या भावें ते तया हांसती । तयास दिसती अवघीं हरि ॥ ४ ॥
हरिला कंसाचा जीवभाव देवें । द्वेषाचिया भावें तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ९२ ॥

द्वेषाचिया ध्यानें हरिरूप जाले । भाव हारपले देहादिक ॥ १ ॥
देहादिक कर्मे अभिमान वाढे । तया कंसा जोडे नारायण ॥ २ ॥
नारायण जोडे एकविध भावें । तुका ह्मणे जीवें जाणें लागे ॥ ३ ॥

॥ ९३ ॥

जीवभाव त्याचा गेला अभिमान । ह्मणऊनी जन हांसे कंसा ॥ १ ॥
सावध करितां नये देहावरी । देखोनियां दुरी पळे जन ॥ २ ॥
जन वन हरि झालासे आपण । मग हे लोचन झांकियेले ॥ ३ ॥
झांकूनी लोचन मौन्येंचि राहिला । नाहीं आतां बोलायाचें काम ॥ ४ ॥
बोलायासी दुजें नाहीं हें उरलें । जन कृष्ण झाले स्वयें रूप ॥ ५ ॥
रूप पालटलें गुण नाम याति । तुका ह्मणे भूतीं देव जाला ॥ ६ ॥

॥ ९४ ॥

जालों स्वयें कृष्ण आठव हा चित्तीं । भेदें भयवृत्ति उरली आहे ॥ १ ॥
उरली आहे रूप नांव दिसे भिन्न । मी आणि हा कृष्ण आठवतो ॥ २ ॥
तोंवरी हा देव नाहीं तयापासीं । आला दिसे त्यासी तोचि देव ॥ ३ ॥
देवरूप त्याची दिसे वरी काया । अंतरीं तो भयाभीत भेदें ॥ ४ ॥
भेदें तुका ह्मणे अंतरे गोविंद । साचें विण छंद वांयां जाय ॥ ५ ॥

॥ ९५ ॥

वांयां तैसे बोल हरिशीं अंतर । केले होती चार भयभेदें ॥ १ ॥
भेदभय गेलें नोळखे आपणा । भेटी नारायणा कंसा जाली ॥ २ ॥
जाली भेटी कंसा हरीशीं निकट । सन्मुखाचि नीट येरयेरां ॥ ३ ॥
येरयेरां भेटी युद्धाच्या प्रसंगीं । त्याचें शस्त्र अंगीं हाणितलें ॥ ४ ॥
त्याचें वर्म होतें ठावें या अनंता । तुका ह्मणे सत्तानायक हा ॥ ५ ॥

॥ ९६ ॥

नारायणें कंस चाणूर मर्दिला । राज्यीं बैसविला उग्रसेन ॥ १ ॥
उग्रसेन स्थापियेला शरणागत । पुरविला अंत अभक्ताचा ॥ २ ॥
अवघेंचि केलें कारण अनंतें । आपुलिया हातें सकळही ॥ ३ ॥

सकळही केलीं आपुलीं अंकित । राहे गोपीनाथ मथुरेसी ॥ ४ ॥
मथुरेसी आला वैकुंठनायक । झालें सकळीक एक राज्य ॥ ५ ॥
राज्य दिलें उग्रसेना शरणागता । सोडविलीं मातापिता दोन्ही ॥ ६ ॥
सोडवणें धांवे भक्ताच्या कैवारें । तुका ह्मणे करें शस्त्र धरी ॥ ७ ॥

॥ ९७ ॥

धरी दोहीं ठायीं सारखाचि भाव । देवकी वसुदेव नंद दोघे ॥ १ ॥
दोन्ही एके ठायीं केल्या नारायणें । वाढविला तिणें आणि व्याली ॥ २ ॥
व्याला वाढला हा आपल्या आपण । निमित्त्या कारणें मायबाप ॥ ३ ॥
माय हा जगाची बाप नारायण । दुजा करी कोण यत्न यासी ॥ ४ ॥
कोण जाणे याचे अंतरींचा भाव । कळों नेदी माव तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ९८ ॥

दीनाचा कृपाळू दुष्टजना काळ । एकला सकळ व्यापक हा ॥ १ ॥
हांसे बोले तैसा नव्हे हा अनंत । नये पराकृत ह्मणों यासी ॥ २ ॥
यासि कळावया एक भक्तिभाव । दुजा नाहीं ठाव धांडोळितां ॥ ३ ॥
धांडोळितां श्रुति राहिल्या निश्चित । तो करी संकेत गोपींसवें ॥ ४ ॥
गोपिकांची वाट पाहे द्रुमातळीं । मागुता न्याहाळी न देखतां ॥ ५ ॥
न देखतां त्यांसी उठे बैसे पाहे । वेडावला राहे वेळोवेळां ॥ ६ ॥
वेळोवेळां पंथ पाहे गोपिकांचा । तुका ह्मणे वाचा नातुडे तो ॥ ७ ॥

॥ ९९ ॥

तो बोले कोमळ निष्ठुर साहोनी । कोपतां गौळणी हास्य करी ॥ १ ॥
करावया दास्य भक्तांचें निर्लज्ज । कवतुकें रज माथां वंदी ॥ २ ॥
दिलें उग्रसेना मथुरेचें राज्य । सांगितलें काज करी त्याचें ॥ ३ ॥
त्यासी होतां कांहीं अरिष्ट निर्माण । निवारी आपण शरणागता ॥ ४ ॥
शरणागतां राखे सर्वभावें हरि । अवतार धरी तयांसाठीं ॥ ५ ॥
तयांसाठीं वाहे सुदर्शन गदा । उभा आहे सदा सांभाळीत ॥ ६ ॥
तळमळ नाहीं तुका ह्मणे चित्ता । भक्तांचा अनंता भार माथां ॥ ७ ॥

॥ १०० ॥

मारिले असुर दाटिले मेदिनी । होते कोण्या कोणी पीडीत ते ॥ १ ॥
ते हा नारायण पाठवी अघोरा । संतांच्या मत्सरा घातावरी ॥ २ ॥
वरिले ते दूतीं यमाचिये दंडीं । नुच्चारितां तोंडीं नारायण ॥ ३ ॥
नारायणनाम नावडे जयांसी । ते जाले मिरासी कुंभपाकीं ॥ ४ ॥
कुंभपाकीं सेल मान तो तयांचा । तुका ह्मणे वाचा संतनिंदा ॥ ५ ॥

॥ १०१ ॥

वास नारायणें केला मथुरेसी । वधूनी दुष्टांसी तये ठायीं ॥ १ ॥
ठायीं पितियाचे मानी उग्रसेना । प्रतिपाळी जनांसहित लोकां ॥ २ ॥
लोकां दुःख नाहीं मागील आठव । देखियेला देव दृष्टी त्यांणीं ॥ ३ ॥
देखोनियां देवा विसरलीं कंसा । ठावा नाहीं ऐसा होता येथें ॥ ४ ॥
येथें दुजा कोणी नाहीं कृष्णाविणें । ऐसें वाटे मनें काया वाचा ॥ ५ ॥
काया वाचा मन कृष्णीं रत जालें । सकळां लागलें कृष्णध्यान ॥ ६ ॥
ध्यान गोविंदाचें लागलें या लोकां । निर्भर हे तुका ह्मणे चित्तीं ॥ ७ ॥

॥ १०२ ॥

चिंतिलीं पावलें जयां कृष्णभेटी । एरवीं ते आटी वांयांविण ॥ १ ॥
वासना धरिती कृष्णाविणें कांहीं । सीण केला तिहीं साधनांचा ॥ २ ॥
चालविले डंबें एक अहंकारें । भोग जन्मांतरें न चुकती ॥ ३ ॥
न चुकती भोग तपें दानें व्रतें । एका त्या अनंतेंवांचूनियां ॥ ४ ॥
चुकवूनी जन्म दाखवी आपणा । भजा नारायणा तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ १०३ ॥

भजल्या गोपिका सर्व भावें देवा । नाहीं चित्तीं हेवा दुजा कांहीं ॥ १ ॥
दुजा छंदु नाहीं तयांचिये मनीं । जागृति सपनीं कृष्णध्यान ॥ २ ॥
ध्यान ज्यां हरीचें हरीसी तयांचें । चित्त ग्वाही ज्यांचें तैशा भावें ॥ ३ ॥
भाग्यें पूर्वपुण्यें आठविती लोक । अवघे सकळीक मथुरेचे ॥ ४ ॥
मथुरेचे लोक सुखी केले जन । तेथें नारायण राज्य करी ॥ ५ ॥

राज्य करी गोपीयादवांसहित । कमिलें बहुत काळ तेथें ॥ ६ ॥
तेथें दैत्यीं उपसर्ग केला लोकां । रचिली द्वारका तुका ह्मणे ॥ ७ ॥

॥ १०४ ॥

रचियेला गांव सागराचे पोटीं । जडोनी गोमटीं नानारत्नें ॥ १ ॥
रत्नें खणोखणीं सोनियाच्या भिंती । लागलीया ज्योति रविकळा ॥ २ ॥
कळा सकळही गोविंदाचे हातीं । मंदिरें निगुतीं उभारिलीं ॥ ३ ॥
उभारिलीं दुर्गे दारवंटे फांजी । कोटि चर्या माजी शोभलिया ॥ ४ ॥
शोभलें उत्तम गांव सागरांत । सकळांसहित आले हरि ॥ ५ ॥
आला नारायण द्वारका नगरा । उदार या शूरां मुगुटमणी ॥ ६ ॥
निवडीना याति समानचि केलीं । टणक धाकुलीं नारायणें ॥ ७ ॥
नारायणें दिलीं अक्षई मंदिरें । अभंग साचारें सकळांसी ॥ ८ ॥
सकळही धर्मशीळ पुण्यवंत । पवित्र विरक्त नारीनर ॥ ९ ॥
रचिलें तें देवें न मोडवे कवणा । बळियांचा राणा नारायण ॥ १० ॥
बळबुद्धीनें तीं देवाच सारिखीं । तुका ह्मणे मुखीं गाती ओंव्या ॥ ११ ॥

॥ १०५ ॥

गाती ओंव्या कामें करितां सकळ । हालवितां बाळें देवावरी ॥ १ ॥
ऋद्धिसिद्धि दासी दारीं ओळंगती । सकळ संपत्ति सर्वां घरीं ॥ २ ॥
घरीं बैसलिया जोडलें निधान । करिती कीर्तन नरनारी ॥ ३ ॥
नारीनर लोक धन्य त्यांची याति । जयांसी संगति गोविंदाची ॥ ४ ॥
गोविंदें गोविंद केले लोकपाळ । चिंतनें सकळ तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ १०६ ॥

कांहीं चिंता कोणा नाहीं कोणेविशीं । करी द्वारकेसी राज्य देव ॥ १ ॥
द्वारकेसी राज्य करी नारायण । दुष्ट संहारून धर्म पाळी ॥ २ ॥
पाळी देवआज्ञा ब्राह्मणांचा मान । अतीतपूजन वैष्णवांचें ॥ ३ ॥
अतीत अलिप्त अवघियां वेगळा । नाहीं हा गोपाळा अभिमान ॥ ४ ॥
अभिमान नाहीं तुका ह्मणे त्यासी । नेदी आणिकांसी धरूं देव ॥ ५ ॥

॥ १०७ ॥
धरियेलें रूप कृष्ण नाम बुंथी । परब्रह्म क्षिती उतरलें ॥ १ ॥
उत्तम हें नाम राम कृष्ण जगीं । तरावयालागीं भवनदी ॥ २ ॥
दीनानाथ ब्रिदें रुळती चरणीं । वंदितील मुनि देव ऋषि ॥ ३ ॥
ऋषीं मुनीं भेटी दिली नारायणें । आणीक कारणें बहु केलीं ॥ ४ ॥
बहु कासावीस झाला भक्तांसाठीं । तुका ह्मणे आटी सोसियेली ॥ ५ ॥
॥ १०८ ॥
सोसियेली आटी गर्भवास फेरे । आयुधांचे भारे वागवितां ॥ १ ॥
वाहोनी सकळ आपुलिये माथां । भार दासां चिंता वाहों नेदी ॥ २ ॥
नेदी काळाचिये हातीं सेवकांसी । तुका ह्मणे ऐसी ब्रीदावळी ॥ ३ ॥
॥ १०९ ॥
ब्रीदावळी ज्याचे रुळते चरणीं । पाउलें मेदिनी सुखावे त्या ॥ १ ॥
सुखावे मेदिनी कृष्णाचिये चाली । कुंकुमें शोभलीं होय रेखा ॥ २ ॥
होऊनी भ्रमर पाउलांचें सुख । घेती भक्त मुख लावूनियां ॥ ३ ॥
याचसाठीं धरियेला अवतार । सुख दिलें फार निज दासां ॥ ४ ॥
निजसुख तुका ह्मणे भक्तां ठावें । तिहींच जाणावें भोगूं त्यासी ॥ ५ ॥
॥ ११० ॥
भोगिला गोपिकां यादवां सकळां । गौळणी गोपाळां गाईवत्सां ॥ १ ॥
गाती धणीवरी केला अंगसंग । पाहिला श्रीरंग डोळेभरी ॥ २ ॥
भक्ति नवविधा तयांसी घडली । अवघींच केलीं कृष्णरूप ॥ ३ ॥
रूप दाखविलें होतां भिन्न भाव । भक्त आणि देव भिन्न नाहीं ॥ ४ ॥
नाहीं राहों दिलें जातां निजधामा । तुका ह्मणे आह्मांसहित गेला ॥ ५ ॥
॥ १११ ॥
गेला कोठें होता कोठूनियां आला । सहज व्यापला आहे नाहीं ॥ १ ॥
आहे साच भावें सकळव्यापक । नाहीं अभाविक लोकां कोठें ॥ २ ॥
कोठें नाहीं ऐसा नाहीं रिता ठाव । अनुभवी देव स्वयें जाले ॥ ३ ॥
जातों येतों आह्मी देवाचे सांगात । तुका ह्मणे गात देवनाम ॥ ४ ॥

॥ ११२ ॥

मना वाटे तैसीं बोलिलों वचनें । केली धीटपणें सलगी देवा ॥ १ ॥
वाणी नाहीं शुद्ध याति एक ठाव । भक्ति नेणें भाव नाहीं मनीं ॥ २ ॥
नाहीं जालें ज्ञान पाहिलें अक्षर । मानी जैसें थोर थोरी नाहीं ॥ ३ ॥
नाहीं मनीं लाज धरिली आशंका । नाहीं भ्यालों लोकां चतुरांसी ॥ ४ ॥
चतुरांच्या राया मी तुझें अंकित । जालों शरणागत देवदेवा ॥ ५ ॥
देवा आतां करीं सरतीं हीं वचनें । तुझ्या कृपादानें बोलिलों तीं ॥ ६ ॥
तुझें देणें तुझ्या समर्पूनी पायीं । जालों उतरायी पांडुरंगा ॥ ७ ॥
रंकाहूनी रंक दास मी दासांचें । सामर्थ्य हें कैचें बोलावया ॥ ८ ॥
बोलावया पुरे वाचा माझी कायी । तुका ह्मणे पायीं ठाव द्यावा ॥ ९ ॥

॥ ११३ ॥

चारी वेद ज्याची कीर्ति वाखाणिती । प्रत्यक्ष ये मूर्ति विठोबाची ॥ १ ॥
चहूं युगांचें हें साधन साधिलें । अनुभवा आलें आपुलिया ॥ २ ॥
एवढें करूनी आपण निराळा । प्रत्यक्ष हें डोळां दाखविलें ॥ ३ ॥
दावूनी सकळ प्रमाणांच्या युक्ति । जयजयकार करिती अवघे भक्त॥४॥
भक्ति नवविधा पावली मूळची । जनार्दननामाची संख्या जाली ॥ ५ ॥
नवसें ओंव्या आदरें वाचितां । त्याच्या मनोरथा कार्यसिद्धि ॥ ६ ॥
सीमा न करवे आणीक ही सुखा । तुका ह्मणे देखा पांडुरंगा ॥ ७ ॥

---

## गौळणी.

### प्रस्ताव.

॥ ११४ ॥

गाईन ते लीळा चरित्र पवाडे । राखिले संवगडे सहित गाई ॥ १ ॥
चोरिलें नवनीत बांधविला गळा । जे तुह्मीं गोपाळा छंद केले ॥ २ ॥
मोहिल्या गोपिका पांवयाच्या छंदें । केली ते गोविंदें क्रीडा गाऊं ॥ ३ ॥

मायबापा लाड दाखविलें कौतुक । तें या आणूं सुख अंतरासी ॥ ४ ॥ निर्दाळिले दुष्ट भक्तां प्रतिपाळी । ऐसा ह्मणों बळी आमुचा स्वामी ॥ ५ ॥ तुका ह्मणे सरसीं असों येणें बोधें । लागोनी संबंधें सर्वकाळ ॥ ६ ॥

## कृष्णजन्म.

॥ ११५ ॥

फिराविलीं दोनी । कन्या आणि चक्रपाणी ॥ १ ॥ जाला आनंदें आनंद । अवतरले गोविंद ॥ २ ॥ तुटलीं बंधनें । वसुदेवदेवकीचीं दर्शनें ॥ ३ ॥ गोकुळासी आलें । ब्रह्म अव्यक्त चांगलें ॥ ४ ॥ नंद दसवंती । धन्य देखिले श्रीपति ॥ ५ ॥ निशीं जन्मकाळ । आले अष्टमी गोपाळ ॥ ६ ॥ आनंदली मही । भार गेला सकळही ॥ ७ ॥ तुका ह्मणे कंसा । आट भोंविला वळसा ॥ ८ ॥

॥ ११६ ॥

कृष्ण गोकुळीं जन्मला । दुष्टां चळकांप सुटला ॥ १ ॥ होतां कृष्णाचा अवतार । आनंद करिती घरोघर ॥ २ ॥ सदा नाम वाचे गाती । प्रेमें आनंदें नाचती ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरती दोष । आनंदानें करिती घोष ॥ ४ ॥

॥ ११७ ॥

गोकुळींच्या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ १ ॥ बाळकृष्ण नंदा घरीं । आनंदल्या नरनारी ॥ २ ॥ गुढिया तोरणें । करिती कथा गाती गाणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे छंदें । येणें वेधिलीं गोविंदें ॥ ४ ॥

॥ ११८ ॥

अनंत ब्रह्मांडें उदरीं । हरि हा बाळक नंदा घरीं ॥ १ ॥ नवल केव्हडें केव्हडें । न कळे कान्होबाचें कोडें ॥ २ ॥ पृथ्वी जेणें तृप्त केली । त्यासी यशोदा भोजन घाली ॥ ३ ॥ विश्वव्यापक कमळापति । त्यासी गौळणी कडिये घेती ॥ ४ ॥ तुका ह्मणे नटधारी । भोग भोगून ब्रह्मचारी ॥ ५ ॥

॥ ११९ ॥

विटंबिलें भट । दिला पाठीवरी पाट ॥ १ ॥ खोटें जाणोनी अंतर । न साहेचि विश्वंभर ॥ २ ॥ तेंचि करी दान । जैसें आइके वचन ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवें । पूतना शोषियेली जीवें ॥ ४ ॥

॥ १२० ॥

देखिलासी माती खातां । दावियानें बांधी माता ॥१॥ जाली घेउनि कांबळी काठी । गाई वळी वेणू पाठीं ॥२॥ मोठें भावार्थाचें बळ । देव जाला त्याचें बाळ ॥३॥ तुका ह्मणे भक्तासाठीं । देव धांवे पाठोवाठीं ॥४॥

॥ १२१ ॥

बाळपणीं हरि । खेळे मथुरेमाझारी । पायीं घागरिया सरी । कडदोरा वांकी । मुख पाहे माता । सुख न माये चित्ता । धन्य मानव संचिता । वोडवलें आजी ॥ १ ॥ बाळ चांगलें वो । बाळ चांगलें वो । ह्मणतां चांगलें । वेळ लागे तया बोलें । जीवापरीस तें वाल्हें । मज आवडतें ॥ २ ॥ मिळोनियां याती । येती नारी कुमारी बहुती । नाहीं आठव त्यां चित्तीं । देहभाव कांहीं । विसरल्या घरें । तान्हीं पारठीं लेकुरें । धाक सांडोनियां येरें । तान भूक नाहीं ॥ ३ ॥ एकी असतील घरीं । चित्त तयापासीं परी । वेगीं करोनी वोसरी । तेथें जाऊं पाहे । लाज सांडियेली वोज । नाहीं फजितीचें काज । सुख सांडोनियां सेज । तेथें धांव घाली ॥ ४ ॥ वेधियेल्या बाळा । नर नारी या सकळा । बाळा खेळवी अबला । त्याही विसरल्या । कुमर कुमारी । नाभाव हा शरीरीं । दृष्टी न फिरे माघारी । तया देखतां हे ॥ ५ ॥ वैरभाव नाहीं । आपपर कोणी कांहीं । शोक मोह दुःख ठायीं । तया निरसलीं । तुका म्हणे सुखी । केलीं आपणासारिखीं । स्वामी माझा कवतुकें । बाळवेषें खेळे ॥ ६ ॥

## कृष्णाच्या बाळपणच्या खोड्या व गोपींची गाऱ्हाणीं.

॥ १२२ ॥

पाहाती गौळणी । तंव पालथी दुधाणी ॥१॥ ह्मणति नंदाचिया पोरें । आजी चोरी केली खरें ॥ २ ॥ त्याविण हे नासी । नव्हे दुसरिया ऐसी ॥ ३ ॥ सवें तुका मेळा । त्यानें अगुणा आणिला ॥ ४ ॥

॥ १२३ ॥

आतां ऐसें करूं । दोघां धरूनियां मारूं ॥ १ ॥ मग टाकिती हे खोडी । तोंडीं लागली ते गोडी ॥ २ ॥ कोंडूं घरामधीं । न बोलोनी जागो बुद्धी ॥ ३ ॥ बोलावितो देवा । तुका गडियांचा मेळावा ॥ ४ ॥

॥ १२४ ॥

याचा तंव हाचि मोळा । देखिला डोळा उदंड ॥ १ ॥ नेदी मग फिरों मागें । अंगा अंगें संचरे ॥ २ ॥ कां गा याची नेणां खोडी । जीभा जोडी करितसां ॥ ३ ॥ पांवरे तें बहु काळें । घोंगडेंही ठायींचें ॥ ४ ॥ अंगीं वसेचि ना लाज । न ह्मणे भाज कोणाची ॥ ५ ॥ सर्वसाक्षी अबोल्यानें । दुश्चित कोणे नसावें ॥ ६ ॥ तुका ह्मणे धरिला हातीं । मग निश्चिती हरीनें ॥ ७ ॥

॥ १२५ ॥

गौळणी आल्या वाज । ह्मणती या गे राखों आज । सांपडवूनी माज-। घरांत धरुनी कोंडूं । उघडें कवाड उभ्या काळोशाचे आड । साता पांचा एक भीड मौनेंचि ठेल्या ॥ १ ॥ नित्य सोंकवला नेदी । सांगों चित्त बोला । आतां सांपडतां याला । कोण सो[illegible] जीवें ॥ २ ॥ जाणोनियां हरी त्याच घरा आला चोरी । गडियां ठेवूनी बाहेरी पूर्वद्वारें शिरे । त्यांच्या भयाभीत चाले पिलंगत भोंवताले । पाहे तंव देखियेलें नवनीत पुढें ॥ ३ ॥ उतरोनी सिंकें । पाहे चाखोनियां निकें । गोड तेंचि एका एकें । हातीं लांबवितो । जाणे राखती तयांसी । तेथें अधिकचि नासी । माग लावी हात पुसी ।

चोरी जाणावया ॥ ४ ॥ जाणोनियां नारी मूळ वर्मद्वार धरी । मग कोंडूनी भीतरी । घरांत धरियेला । कां रे नागविसी । माझे मुलीं लागलासी । आणवीन तुजपासीं । मागें खादलें तें ॥ ५ ॥ दोहीं संधी बाहे । धरूनी नेती माते पाहे । काय नासी केली आहे । घरामाजी येणें । तुका ह्मणे सुख । त्याचें वाढों नेदी दुःख । दसवंली कवतुक । करुनी रंजविल्या ॥ ६ ॥

॥ १२६ ॥

कोंडिला गे माज । निरोधुनि द्वार । राखण तें बरें । येथें करा कारण ॥ १ ॥ हा गे हा गे हरि । करितां सांपडला चोरी । घाला गांठीं धरीं । जीवें माय त्रासाया ॥ २ ॥ तेंचि पुढें आड । तिचा लोभ तिला नाड । लावुनी चरफड । हात गोउनी पळावें ॥ ३ ॥ संशयाचें बिरडें । याचे निरसलें भेटीं । घेतली ते तुटी । आतां घेतां फावेल ॥ ४ ॥ तुका येतो काकुलती । वाउगिया सोड । यासीचि निवाड । आह्मी भार वाहिका ॥ ५ ॥

॥ १२७ ॥

कोणी सुना कोणी लेंकी । कोणी एकी सतंता ॥ १ ॥ अवघियांची जगनिंद । झाली धिंद सारखी ॥ २ ॥ अवघ्या अवघ्या चोरा । विना वरा मायबापा ॥ ३ ॥ तुका ह्मणे करा सेवा । आलें जीवावर तरी ॥ ४ ॥

॥ १२८ ॥

मिळोनी गौळणी देती यशोदे गाऱ्हाणीं । दहीं दूध तूप लोणी शिंकां नुरे कांहीं । मेळवूनी पोरें तेथें रिघे एकसरें । वेगीं आणोनी सामोरें तेथें लोणी खाय ॥ १ ॥ हरि सोंकला वो हरि सोंकला वो । सोंकला तो वारीं तुज लाज नाहीं तरी । आह्मां सांपडतां उरी तुज मज नाहीं ॥ २ ॥ तुज वाटतसे कोड यासी लागतसे गोड । काय हांसबेसी वेड तुज लागलें वो । आह्मी जाऊं तुजवरी पोरें चाळविल्या पोरी । काय सांगों भांडखोरी लाज वाटे आह्मां ॥ ३ ॥ मुख मळिण

वद्न उभा हाडतिये घोणे । तंव दसवंती ह्मणे आणा शीक लावूं। थोर आणिला कांटाळा घरींदारीं लोकपाळां । डेरा रिघोनी गुसळा तेथें लोणी खाय ॥ ४ ॥ मिळोनी सकळा दावें लावुनियां गळां। केशा बांधिती उखळा तेथें राहे उगा । बरा सांपडलासी हरी आजि-च्यानें करिसिल चोरी । डोळे घालूनियां येरी येरीकडे हांसे ॥ ५ ॥ फांकल्या सकळा उपडूनियां उखळा । मोडी वृक्ष विमळार्जुन दोन्ही। उठिला गजर दसवंती नव्हे धीर । धांवे तुकयाचा दातार आळंगिला वेगीं ॥ ६ ॥

॥ १२९ ॥

काय उणें कां करितोसी चोरी । किती सांगों तुज नाइकसी हरी ॥ पर परता तूं पळोनी जासी दुरी । अनावर या लौकिका बाहेरी वो ॥ १ ॥ माया करुणा हे करिते वहुत । किती सोसूं या जनांचे आघात । न पुरे अवसरु हेंचि नित्यानित्य । तूंचि सांडवीं करूनी स्थिर चित्त वो ॥ २ ॥ बहुत कामें मी गुंतलियें घरीं । जासी डोळा तूं चुकवूनी हरी ॥ करितां लाग न येसीच पळभरी । नाहीं साया-साची उरों दिली उरी वो ॥ ३ ॥ तुज ह्मणीयें मी न संगें अनंता। नको जाऊं या डोळियां परता ॥ नलगे जोडी हे तुजविण आतां । तुकया स्वामी कान्होबा गुणभरिता वो ॥ ४ ॥

॥ १३० ॥

गौळणी बांधिती धारणासी गळा । खेळे त्या गोपाळांमाजी ब्रह्म ॥ १ ॥
धांवोनियां मागे यशोदे भोजन । हिंडे रानोरान गाईपाठीं ॥ २ ॥
तुका ह्मणे सर्व कळा ज्याचे अंगीं । भोळेपणालागीं भीक मागे ॥ ३ ॥

॥ १३१ ॥

धन्य त्या गौळणी इंद्राच्या पूजनीं । नैवेद्य हिरोनी खातो कृष्ण ॥ १ ॥
अरे कृष्णा इंद्र अमर इच्छिती । कोण तयांप्रति येईल आतां ॥ २ ॥
तुका ह्मणे देव दाखवी विंदान । नैवेद्य खाऊन हांसों लागे ॥ ३ ॥

॥ १३२ ॥

तुह्मी गोपी बाळा मज कैशा नेणा। इंद्र अमरराणा ऱ्यांचि केला ॥१॥
इंद्र चंद्र सूर्य ब्रह्मा तिन्ही लोक । माझे सकळीक यमधर्म ॥ २ ॥
मजपासूनियां जाले जीव शिव । देवांचाही देव मीच कृष्ण ॥ ३ ॥
तुका ह्मणे त्यांसी बोले नारायण। व्यर्थ मी पाषाण जन्मा आलों ॥४॥

॥ १३३ ॥

गोरस घेऊनी सातें निघाल्या गौळणी । तंव ती कृष्णाची करणी काय करी तेथें । झाला पानसरा मिठी घातली पदरा । आधीं दान माझें सारा मग चाला पंथें ॥ १ ॥ सर जाऊं दे परता । मुळीं भेटलासी आतां । नाट लागलें संचिता । खेपा खुंटलिया ॥ २ ॥ आसुडी पदरा धरी आणीक दुसरा । येरी झोंबतील करा काय वेडा होसी । आलों गेलों बहु वेळां नेणों गोरा कीं सांवळा । सर परता गोवळा काय बोलतोसी ॥ ३ ॥ आह्मी येथें अधिकारी मागें केली तुह्मी चोरी । आतां कळलियावरी मागें केलें तयाचें । बोलिल्या हांसुनी आह्मी सासुरवासिनी । कां रे झोंबसी दुरूनी करीं मात कांहीं ॥ ४ ॥ वांयां परनारी कैशा धरिसी पदरीं । तयां कळलिया उरी तुज मज नाहीं। जडला जिव्हारीं फांकों नेदी तया नारी। जेथें वर्म तें धरी जाऊं पाहे तियेचें ॥ ५ ॥ तया हातीं सांपडल्या हाटीं पाटीं चुकाविल्या । कृष्णमिळणीं मिळाल्या त्याही न फिरती। तुका म्हणे खंती वांयां न धरावी चित्तीं । होतें तुमच्या संचितीं वोडवलें आजी ॥ ६ ॥

## गोपींचा विनोद व कृष्णाचे ठायीं त्यांची आसक्ति.

॥ १३४ ॥

हरी तुझी कांति रे सांवळी। मी रे गोरी चांपेकळी। तुझ्या दर्शनें होइन काळी। मग हें वाळी जन मज ॥ १ ॥ उगला राहें न करीं चाळा। तुज किती सांगों रे गोवळा । तुझा खडबड कांवळा। अरे

नंद बाळा आळगटा ॥२॥ तुझिये अंगीं घुरट घाणी । बहु खासी दुध तुप लोणी । घरिचें बाहेरिल आणोनी । मी रे चांदणी सकुमार ॥३॥ मज ते हांसतील जन । धिःकारिती मज देखोन । अंगीं तुझें देखोनी लक्षण । मग विटंबणा होईल रे ॥ ४ ॥ तुज लाज भय शंका नाहीं । मज तंव सज्जन पिशुन व्याही । आणीक मात बोलूं कांहीं । कसी भीड नाहीं तुज माझी ॥ ५ ॥ वचन मोडी नेदी हात । कळलें न साहेची मात । तुकयास्वामी गोपीनाथ जीवन्मुक्त करूनी भोगी ॥ ६ ॥

॥ १२५ ॥

धरिला पालव न सोडी माझा येणें । कांहीं करितां या नंदाचिया कान्हें । एकली न येतें मी ऐसें काय जाणें । कोठें भरलें अवघड या राणें रे ॥ १ ॥ सोडीं पालव जाऊं दे मज हरी । वेळ लागल्या रे कोपतील घरीं । सासू दारुण सासरा आहे भारी । तुज मज सांगतां नाहीं उरी रे ॥२॥ सख्या वशिया होत्या मजपाशीं । तुज फावलें रे फांकतां तयांसी । होतें अंतर तर सांपडतें कैसी । एकाएकीं अंगीं जडलासी रे ॥ ३ ॥ कैसी भागली हे करितां उत्तर । शक्ति मावळल्या आसुडितां कर । स्वामी तुकयाचा भोगिया चतुर । भोग भोगी त्यांचा राखे लोकाचार वो४

॥ १२६ ॥

कोठें मी तुझा धरूं गेलें संग । लावियेलें जग माझ्या पाठीं ॥ १ ॥ सर सर रे परता अवगुणाच्या गोवळा । नको लावूं चाळा खोटा येथें॥२॥ रूपाच्या लावण्यें नेली चित्तवृत्ति । न देखें भोंवतीं मी ते माझी ॥ ३ ॥ तुकयाचा स्वामी माझे जीवींच बैसला । बोलींच अबोला करूनियां ॥४॥

॥ १२७ ॥

कोणी एकी भुलली नारी । विकितां गोरस ह्मणे घ्या हरी ॥ १ ॥ देखिला डोळां बैसला मनीं । तोचि वदनीं उच्चारी ॥ २ ॥ आपुलियाचा विसर भोळा । गोविंद कळा कौतुकें ॥ ३ ॥ तुका ह्मणे हांसे जन । नाहीं कान ते ठायीं ॥ ४ ॥

॥ १३८ ॥

विरहतापें फुंदे छंद करिते जाती । हा गे तो गे सावधान सर्वेचि दुश्चिती । न सांभाळुनि अंग लोटी पाहे भोंवतीं । वेगळीच पडों पाहे कुळाहुनि याती ॥ १ ॥ खुंटलीसी जाली येथें अवघियांची गती । आपुलीं परावीं कोण नेणें भोंवतीं । त्यांचीं नांवें बोभे अहो अहो श्रीपति । नवलाव हा येरां वाटोनियां हांसती ॥ २ ॥ बाहेरीच धांवे रानां न धरीच घर । न कळे बंधना जाला तेणें संचार । विसरूनी गेली सासुरें कीं माहेर । एका अवलोकी एका पडिला विसर ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी अवघ्या राहा निश्चळा । न ये आतां येऊं येथें सर्वथा बळा । त्याचा त्याच्या मुखें अवघियांचा निर्वाळा ॥ बहुतां मतें येथें तर्कवाद निराळा ॥ ४ ॥

॥ १३९ ॥

मै भुली घरजानी बाट । गोरस बेचन आयें हाट ॥ १ ॥ कान्हा रे मनमोहन लाल । सबही बिसरूं देखें गोपाल ॥२॥ काहां पग डारूं देख आनेरा । देखें तों सब वोहिन घेरा ॥ ३ ॥ हुं तों थकित भैर तुका । भागा रे सब मनका धोका ॥४॥

॥ १४० ॥

हरिबिन रहियां न जाये जिहिरा । कबकी थाडी देखें राहा ॥ १ ॥ क्या मेरे लाल कवन चुकी भई । क्या मोहिपासिती बेर लगाई ॥ २ ॥ कोई सखी हरी जावे बुलावन । बार हि डारूं उसपर तन ॥ ३ ॥ तुका प्रभु कब देखें पाऊं । पासीं आऊं फेर न जाऊं ॥४॥

॥ १४१ ॥

भलो नंदाजीको डिकरो । लाज राखीलीन हमारो ॥ १ ॥ आगळ आवो देवजी कान्हा । मैं घर छोडी आहे ह्माना ॥२॥ उनसुं कळना नव्हे तो भला । खसम अहंकार दादुला ॥ ३ ॥ तुका प्रभु परबळ हरी । छपी आहे हुं जगाथी न्यारी ॥४॥

॥ १४२ ॥

घाली कवाड टळली वाड राती । कामें व्यापिली कां पडिली दुश्चित्ती । कोणे लागला गे सदैवेचे हातीं । आजी शून्य शेजे नाहीं दिसे पति वो ॥ १ ॥ बोले दूतिकेशीं राधा हें वचन । मशीं लाघव दाखवी नारायण । ह्मणे कोमळ परी बहु गे निर्गुण । याशीं न बोलें कळला मज पूर्ण वो ॥ २ ॥ धाडिलें गरुडा आणिलें हनुमंता । बैं पाचारिलें होउनि ये वो सीता । लाजिनली रूप न ये पालटितां । जाला भीमकी आपण राम सीता वो ॥ ३ ॥ सत्यभामा दान करी नारदासी । तें कळला वो मज हृषीकेशी । तुळे घालितां न ये कनक वो रासी । सम तुकें एक पान तुळसी वो ॥ ४ ॥ मज भुला पडली कैशापरी । आह्मां भोगूनी ह्मणे मी ब्रह्मचारी । दिली वाट यमुने माये खरी । तुह्मां आह्मां न कळे अद्यापवरी वो ॥ ५ ॥ जाणे जीवींचें सकळ नारायण । असे व्यापूनी तो न दिसे लपून । राधा संबोखिली प्रीती आलिंगून । तुका ह्मणे येथें भावचि कारण वो ॥६॥

॥ १४३ ॥

सात पांच गौळणी आलिया मिळोनी यशोदे गाऱ्हाणें देती कैसें । काय व्यालीस पोर चोरटें सिरजोर जनावेगळेंचि कैसें । दहीं दुध लोणी शिंकां नुरेचि कांहीं कवाड जैशाचें तैसें । चाळवूनी नाशिलीं कन्याकुमरें आमच्या सुनांसी लाविलें पिसें गे बाइये ॥१॥ अझुनी तरी यासी सांगें बरव्या परी नाहीं तरी नाहीं उरी जीवेसाटी । मिळोनी सकळै जणी करूं वाखा सखीं तुज मज होईल तुटी गे बाइये ॥ २ ॥ नेणें आपपर लौकिक वेव्हार भलते ठायीं भलतें करी । पाळतुनी घरीं आह्मी नसतां तेथें आपण संचार करी । सोगया चुंबन देतो आलिंगन आमच्या लोळे सेजाबाजावरी । शिंकीं कडा फोडी गोरसाचे डेरे धरितां न सांपडे करीं गे बाइये ॥३॥ आतां याची चाड नाहीं आह्मां भीड सांप-

डतां कोड पुरवूं मनींचें । सोसिलें बहु दिस नव्हता केला निस ह्मणुनि एकुलतें तुमचें । चरण खांबीं जीवें बांधेन सरिसा जवें न चले कांहीं याचें । अर्थ प्राण देतां न सोडीं सर्वथा भलतें हो या जिवाचें गे बाइये ॥४॥ घेउनी जननी हातीं चक्रपाणी देतसे गौळणी वेळोवेळां । निष्ठुर वाद ह्मणीं बोलाल सकळा क्षोभ जाइल माझ्या बाळा । जेथें लागे हात वाढतें नवनीत अमृताच्या कल्लोळा । देखोनि तुकयास्वामी देश देह-भाव विसरल्या सकळा गे बाइये ॥५॥

॥ १४४ ॥

या हो या चला जाऊं सकळा । पाहों हा सोहळा आजि वृंदा-वनींचा ॥ १ ॥ वाइला गोपाळें वेणुनाद पडे कानीं । धीर नव्हे मनीं चित्त जालें चंचळ ॥२॥ उरलें तें सांडा काम नका करूं गोवी । हेचि वेळ ठावी मज कृष्णभेटीची ॥ ३ ॥ निवतील डोळे याचें श्रीमुख पाहातां । बोलती तें आतां घरचीं सोसूं वाईट ॥४॥ कृष्णभेटी आड कांहीं नावडे आणीक । लाज तरी लोक मन जालें उदास ॥५॥ एका-एकीं चालियेल्या सादावीत सर्वे । तुका ह्मणे देवें रूपें केल्या तन्मय ॥६॥

॥ १४५ ॥

तुजसवें आह्मी अनुसरलों अबळा । नको अंगीं कळा राहों हरी-हीन देऊं ॥ १ ॥ सासुरवासा भीतों जीव ओढे तुजपाशीं । आतां दोहींविशीं लज्जा राखें आमुची ॥ २ ॥ न कळतां संग जाला सहज खेळतां । प्रवर्तली चिंता मागिलाचियावरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे असतां जैसें तैसें बरवें । वचन या भावें वेचूनियां विनटलों ॥ ४ ॥

॥ १४६ ॥

गाई गोपाळ यमुनेचे तटीं । येती पाणिया मिळोनि जगजेठी । चेंडू चौगुणा खेळती वाळवंटीं । चला चला ह्मणती पाहूं दृष्टी वो ॥१॥ ऐशा गोपिका त्या कामातुरा नारी । चित्त विव्हळ देखावया हरी । मिस पाणियाचें करितील घरीं । बारा सोळा मिळोनी परस्परीं वो ॥२॥

चिरें चोळिया त्यां धुतां विसरती । उर्ध्व लक्ष लागलें कृष्णमूर्ती । कोणा नाठवे कोण कुळ याती । जालीं तटस्थ सकळां नेत्रपातीं वो ॥३॥ दंतधावनाचा मुखामाजी हात । वाद्यें वाजती नाइके जनमात । करी श्रवण कृष्णवेणुगीत । स्वामी तुकयाचा पुरवी मनोरथ वो ॥४॥

॥ १४७ ॥

खेळतां मुरारी जाय सरोवरा तिरीं । तंव नग्नचि या नारी तेथें देखियेल्या । मांडिलें विंदान ख्याल सुखाचें संधान । अंग लपवूनी मान पिलंगत चाले ॥ १ ॥ ख्याल मांडिला रे ख्याल मांडिला रे । पायां पडतां रे न सोडी नेदी साउलां रे ॥२॥ साड्या साउलीं पातळें गोंडे कसणिया चोळ्या । बुंथी घेउनी सकळा कळंबावरी पळे । खांदी धरूनियां करीं दृष्टि घालोनि सामोरी । मे पाला वोढी वरी खदखदां हांसे ॥ ३ ॥ आनंदें कल्लोळ बाळा । खेळती सकळ देती उलटिया चपळ । एकी एकीहूनी हौस वेल सुर काडी । एकी उगविती कोडीं । नाना परीच्या निकडी खेळ मांडियेला ॥ ४ ॥ एकी आलिया बाहेरी पाहे लुगडें तंव नारी । ह्मणे नाहीं नेलें चोरीं काय जाणों केव्हां । केला सकळीं हाकारा तंव आलिया बाहेरा । आतां ह्मणतील घरां जावें कैशा परी ॥ ५ ॥ तंव हांसे वनमाळी वरी पाहोनि सकळी । लाजे रिघालिया जळीं मागें पुढें हात । लाज राखावी गोपाळा आह्मांजणींची सकळां । काय मागसी ये वेळा देऊं गुळवाटी ॥ ६ ॥ जोडोनियां कर या गे सकळी समोर । वांयां न बोलावें फार बडबड कांहीं । भातुकें भूषण नाहीं चाड नेघें धन । करा एक चित्त मन या गे मजपाशीं ॥ ७ ॥ एक एकीकडे पाहे लाज सांडुनियां राहे । ह्मणे चला आतां सये जाऊं तयापाशीं । जोडोनियां हात कैशा राहिल्या निवांत । तुका ह्मणे केली मात लाज राखिली तयांची ॥८॥

॥ १४८ ॥

ये रे कृष्णा खुणाविती खेळों भातुकें । मिळालिया बाळा एके ठायीं कवतुकें । कळों नेदी माया तें त्याचें त्यास ठाउकें । खेळतोंसें दावी लक्षलक्षापें मुकें ॥१॥ अखंडित चटे त्यांनीं लावियेला कान्हा । आवडे तया त्या वाहाती संकल्प मना । काया वाचा मनें रूपीं गुंतल्या वासना । एकांताचें सुख जाती घेउनियां राना ॥२॥ अवधियांचा जाणें जाला मेळासा हरी । मिळोनियां जावें तेथें तया भीतरी । कळों नेदी घरिंच्या करी गोवूनी चोरी । हातोहातीं नेती परपरत्या दुरी ॥३॥ आनंदें निर्भर आपणाशीं आपण । क्रीडतील बाळा त्यजिलें पारिखें जन । एकाएकीं तेथें नाहीं दुसरें भिन्न । तुका ह्मणे एका नारायणावांचून ॥४॥

॥ १४९ ॥

कान्हो एकली रे एकली रे । तुजसवें चुकलें रे । भय वाटे वनीं मज अबळा धाकली रे ॥ १ ॥ निघतां घरीं आई बा वारी । तुजसवें कां आलियें हरी ॥ २ ॥ लोक वाटा सांगती खोटा । परी मी चटा लागलियें ॥ ३ ॥ पिकल्या बोरी जालें सामोरी । जाणें कोठें राहिला हरी ॥ ४ ॥ आड खुंट जालिया जाळी । काय काय जाणों कान्हें मांडिली रळी ॥ ५ ॥ तुका ह्मणे जाऊं आलिया वाटा। पाहों हरी पायीं न मोडे कांटा ॥ ६ ॥

॥ १५० ॥

क्याला मज आयो वारितेसी घरा । खेळतों सोकरा नंदाचा मी ॥ १ ॥
बहु दिसीं जाली यासीं मज भेटी । आतां वाटे तुटी न परावी ॥ २ ॥
कोवळें बोलतो मना आवरतें । डोळियाचें पातें ढापवेना ॥ ३ ॥
आजी सकळांसी आलें चोलूनियां । कां गो पाठी वांयां पुलविली ॥ ४ ॥
तुमचें तें काय खोळंबलें काज । वल्या कां गो मज कोंडा घरीं ॥ ५ ॥
कयाचा धनी गोकुळनायक । सरा कांहीं एक बोलतों मी ॥ ६ ॥

॥ १५१ ॥

एकली वना चालली राना । चोरुनि जना घराचारी ॥ १ ॥ कोणी नाहीं संगी सवें । देहभावें उदास ॥ २ ॥ जाउनि पडे दुर्घट वनीं । श्वापदांनीं वेढिली ॥ ३ ॥ मार्ग न चले जातां पुढें । भय गाढें उदेलें ॥४॥ मागील मार्गे अंतरलीं । पुढील चाली खोळंबा ॥५॥ तुका ह्मणे चिंती यासी । हृदयस्थासी आपुल्या ॥६॥

॥ १५२ ॥

पडली घोर रजनी । संगी कोणी नसेचि ॥ १ ॥ पाहा हो कैसें चालविलें । पिसें गोवलें लावूनी ॥ २ ॥ कोठें लपविलें तें अंग । होता संग दिला तो ॥ ३ ॥ मज कधीं नव्हतें ठावें । दोही भावें वाटोळें ॥ ४ ॥ तुका ह्मणे कैंची उरी । दोहीपरी नाडिलें ॥ ५ ॥

॥ १५३ ॥

एकली राना गोविंदा सवें । गेलें ठावें तें जालें ॥ १ ॥ मज न ह्मणा न ह्मणा शिंदळी । नाहीं विषम जवळी आतळलें ॥ २ ॥ नव्हती देखिली म्यां वाट । ह्मणोनी हा धीट संग केला ॥ ३ ॥ भेणें मिठी दिधली गळां । सेजे जवळ दडालें ॥ ४ ॥ सलगी धरी पयोधर । साहाती करमुर सवें ॥ ५ ॥ आहेव मी गर्भीणपणें । हें सांगणें कां लागे ॥ ६ ॥ तुका ह्मणे सेवटा नेलें । संपादिलें उभयतां ॥ ७ ॥

॥ १५४ ॥

आतां न यें मागें । मी आलें याच्या रागें । काय माझें जगें । कोपोनियां करावें ॥ १ ॥ कां गो कलित्यां कोल्हाल । तुह्मी भलत्याच सकल । वेचाल ते बोल । झुटे होती बोलिले ॥ २ ॥ याचे भेटी माझें मन । स्वरूपीं ठाकले लोचन । वेगळें तें क्षण आतां होऊं नावरे ॥ ३ ॥ काज काम नको जालें । बीजें नावरे बोलिलें । याचिया भेदिलें । कामबाणीं अंतर ॥ ४ ॥ या वेगळें होणें । आतां

जळो तैसें जिणें । घेतलें तें मनें । आतां मागें न फिरे ॥ ५ ॥ आतां मोटी वार । माझी नका धरूं चार । तुकयाचा दातार । शेजे तो मी सुतलों ॥६॥

॥ १५५ ॥

होतें बहुत हें दिवस मानसीं । आजी नवस हे फळले नवसीं ॥ व्हावी भेटी ते जाली गोविंदासीं । आतां सेवा करीन निश्चयेसीं वो ॥१॥
स्थिर स्थिर मजचि साहे करा । बहु कष्ट सोसिल्या येरझारा ॥ येथें आड मज न साहावे वारा । देऊनि कपाट आलें तें दुसरें वारा वो॥२
मूळ सत्ता हे सायासाची जोडी । नेदी वेगळें होऊं एकी घडी ॥ नाहीं लौकिक स्मरला आवडी । आतां येणें काळें या वो लोभें वेडी वो ३॥
उदयीं उदय साधिला अवकाश । निश्चितीनें निश्चिती सावकाश ॥ धरिये गोडी बहुत आला रस। तुका ह्मणे हा मागुता न ये दिवस वो ॥४॥

॥ १५६ ॥

स्वयें सुखाचे जाले अनुभव । एक एकीपाशीं सांगतील भाव ॥ अवघ्यां अवघा हा कैसा नवलाव । सर्वसाक्ष तेथेंचि त्याचा जीव वो ॥१॥
आपआपणाशीं करिती नवल । परि वाद्यवाद न संडिती बोल ॥ एका मेघश्यामें जलधर वोल । रसीं उतावेिळ हृदय सखोल वो ॥ २ ॥
एक विषय तो सकळांचा हरि । त्याच्या आवडीनें आवडी इतरीं ॥ अंध बहिर हे प्रेतलोकाचारी । त्यांची कीर्ति गाइली पुराणांतरीं वो ॥३॥
स्तुति पराविया मुखें रुचिकर । प्रीतिपात्राच्या गौरवीं आदर ॥ परस्परें हें सादरा सादर । योग सज्जनाच्या सुखा नाहीं पार वो ॥४॥
भक्तिवल्लभ न तुटे चराचरीं । आप्त अनाप्त हे ऐशी ठेवी उरी ॥ दुरी जवळी संचिता ऐसें धरी । रंगा रंगा ऐसें होणें लागे हरि वो ॥५॥
तुका लाधला हें उच्छिष्ट भोजन । आला बाहेरी प्रेमें वोसंडून ॥ पडिलें कानीं त्या जीवाचें जतन।धरियेले एका भावें हृदयीं चरण वो॥६॥

॥ १५७ ॥

गोड लागे परी सांगतांचि नये । बैसे मिठी सये आवडीची ॥ १ ॥
वेधलें वो येणें श्रीरंगरंगें । मी हे माझीं अंगें हारपलीं ॥ २ ॥
परतेची ना दृष्टि बैसली ते ठायीं । विसावोनी पायीं ठेलें मन ॥३॥
तुकयाच्या स्वामीसवें जाली भेटी । तेव्हां जाली तुटी मागिलाची ॥४॥

॥ १५८ ॥

पाह्यावया मांजी नभा । दिसे शोभा चांगली ॥ १ ॥ बैसला तो
माझे मनीं । नका कोणी लाजवूं ॥ २ ॥ जीवा आवडे जीवाहूनी ।
नव्हे क्षण वेगळा॥३॥जालें विश्वंभरा ऐसी । तुकया दासी स्वामीची॥४॥

॥ १५९ ॥

आजी कां वो तूं दिससी दुश्चित्ती । ह्मणे एका मन लगे तुझ्या चित्तीं ॥
दिलें ठेवूं तें विसरसी हातीं । नेणों काय बैसला हरि चित्तीं वो ॥१॥
सरसर परती जालीस आतां भांड । कैसें दाखविसी जगासी या तोंड ॥
व्याली माय ते लाजविली रांड । नाहीं थार दो ठायीं जाला खंड वो ॥२॥
होतें तैसें तें उमटलें वरी । बाह्य संपादणी अंतरींची चोरी ॥ नाहीं
मर्यादा निःसंग बावरी । मन हें गोविंदीं देह काम करी वो ॥ ३ ॥
नाहीं करीत उत्तर कोणासवें । पराधीन भोजन दिलें खावें ॥
नाहीं अचळ सावरावा ठावे । देखों उदासीन तुज गे देहभावें वो ॥४॥
कोठें नेणों ह्मा फावला एकांत । सदा किलकिल भोंवतीं बहुत ॥
दोघे एकवाटा बोलावया मात । नाहीं लाज धरिली दिला हात वो ॥५॥
करी कवतुक खेळ खेळे कान्हा । दावी लाघव भांडवी सासुसुना ॥
परा भक्ति हे शुद्ध तुह्मी जाणा । तुका ह्मणे ऐसें कळों यावें जना वो ॥६॥

॥ १६० ॥

भरिला उलंडूनी रिता करी घट । मीस पाणियाचें गोविंदाची चट॥
चाले झडझडां उसंतूनी वाट । पाहे पाळतूनी उभा तोचि नीट वो॥ १॥
चाळा लावियेले गोप गोपीनाथें । जाणे आवडीचें रूप जेथें तेथें ॥

दावी बहुतांच्या बहुवेषपंथें । गुणातीतें खेळ मांडियेला येथें वो ॥२॥
मनीं आवडे तें करावें उत्तर । कांहीं निमित्ताचा पाहोनी आधार ॥
उगा राहे कां मारिसी कंकर । मात वाढविसी उत्तरा उत्तर वो ॥३॥
धरिली खोडी दे टाकोनियां मागें । नये विनोद हा कामा मशीं संगें॥
मिठी घालीन या जिवाचिया त्यागें । नाहीं ठाउकीं पडिलीं तुझीं सोंगें वो४
सुख अंतरींचें बाह्य ठसठसी । ह्मणे विनोद हा काय सोंग यासी ।
तुज मज काय सोयरीक ऐसी । नंदानंदन या थोरपण जासी वो ॥५॥
करी कारण तें कळों नेदी कोणा । सुख अंतरींचें बाह्य रंग जाणा ॥
मन मिनलें रे तुका ह्मणे मना । भोग अंतरींचा पावे नारायणा वो ॥६॥

॥ १६१ ॥

आजी नवल मी आलें येणें रानें । भेटी अवचिती नंदाचिया कान्हें॥
गोवी सांगती वो सकळही जन । होतें संचित आणियेलें तेणें वो ॥१॥
गेलें होऊनी न चले आतां कांहीं । साद घालितां जवळी दुजें नाहीं ॥
अंगीं जडला मग उरलें तें काई । आतां राखतां गुमान भलें बाई वो ॥२॥
बहुत कामें मज नाहीं आराणूक । एक सारितां तों पुढें उभें एक ॥
आजी मी टाकोनी आलें सकळीक । तंव रचिलें आणीक कवतुक वो॥३॥
चिंता करितां हरिली नारायणें । अंगसंगें मिनतां दोघेजणें ॥
सुखें निर्भर जालियें त्याच्या गुणें । तुका ह्मणे खुंटलें येणें जाणें वो ॥४॥

॥ १६२ ॥

याची सवे लागली जीवा । गोडी हेवा संगाचा ॥ १ ॥ परतें न सरवे दुरी । क्षण हरीपासूनि ॥ २ ॥ जालें तरी काय तंट । आतां चट न संडे ॥३॥ तुका ह्मणे चक्रचाळे । वेड बळें लाविलें ॥४॥

॥ १६३ ॥

हरिनें माझें हरिलें चित्त । भार वित्त विसरलें ॥ १ ॥ आतां कैसी जाऊं घरा । नव्हे बरा लौकिक ॥२॥ पारखियांसी सांगतां गोष्टी । घरची कुटी खातील ॥ ३ ॥ तुका ह्मणे निवांत राहीं । पाहिलें पाहीं परतूनी ॥ ४ ॥

॥ १६४ ॥

पडिली भुली धांवतें सैराट । छंद गोविंदाचा चोजवितें वाट ॥
मार्गे सांडोनी सकळ बोभाट । वंदीं पदांबुजें ठेवूनी ललाट वो ॥१॥
कोणी सांगा या गोविंदाची शुद्धि । होतें वहिलें लपाला आतां खांदीं ॥
कोठें आड आली हे देहबुद्धि । धांवा आळवीं करुणा कृपानिधी वो ॥२॥
मार्गे बहुतांचा अंतरला संग । मुळें जयाचिया तेणें केला त्याग ॥
पहिलें पाहातां तें हरपलें अंग । खुंटली वाट नाहींसें जालें जग वो ॥ ३ ॥
शोकें वियोग घडला सकळांचा । गेल्या शरण हा अन्याय आमुचा ॥
केला उद्धार रे घडल्या दोषांचा । जाला प्रगट स्वामी तुकयाचा वो ॥४॥

॥ १६५ ॥

आलियें धांवती धांवती भेट होईल ह्मण । तंव ते टळली वेळ वो माझा उरला सीण ॥ १ ॥ आतां काय करूं सांग वो मज भेटेल कैसा । हरिलागीं प्राण फुटे वो थोरी लागली आशा ॥ २ ॥ लाविला उशीर वहुतीं बहु ओढिती ओढा । सांभाळितां सांग असांग दुःख पावल्यें पीडा ॥ ३ ॥ जळो आतां संसारु वो कई शेवट पुरे । तुकयाच्या स्वामी गोपाळालागीं जीव झुरे ॥ ४ ॥

॥ १६६ ॥

नका कांहीं उपचार माझ्या शरीरा । करूं न साहावे मज बहु होतो उबारा । मनोजन्य व्यथा वेध जाला अंतरा । लवकरी आणा नंदाचिया कुमरा ॥ १ ॥ सखिया वेशिया तुह्मी प्राणवल्लभा । निवेदिला भाव आर्तभूत या लोभा । उमटली अंगीं वो सांवळी प्रभा । साच हे अवस्था कळे मज माझ्या क्षोभा ॥ २ ॥ नये कळों नेदावी हे दुजियासी मात । घडावा तयासी उत्कंठा एकांत । एकाएकीं साक्षी येथें आपुलें चित्त । कोण्या काळें होइल नेणों भाग्य उदित ॥ ३ ॥ स्वाद सीण देहभान निद्रा खंडन । पाहिले

तटस्थ उन्मळित लोचन । अवघें वोसाऊन ठरले तें चरण । तुका ह्मणे दर्शनापें आलें जीवन ॥४॥

॥ १६७ ॥

जीव खादला दैवतें । माझा येणें महाभूतें । झोंबलें निरुतें । कांहीं करितां न सुटे ॥ १ ॥ आतां करूं काय । न चले करितां उपाय । तुह्मां आह्मां सये । विघडाविघड केली ॥ २ ॥ बोलतां दुश्चिती । मी वो पडियलें भ्रांती । आठव हा चित्तीं । न ये ह्मणतां मी माझें ॥ ३ ॥ भलतेंचि चावळे । जना अवघिया वेगळे । नाठवती बाळें । आपपर सारिखें ॥ ४ ॥ नको बोलों सये । मज वचन न साहे । बैसाल त्या गाहे । उग्या वाचा खुंटोनी ॥ ५ ॥ तुह्मां आह्मां भेटी । नाहीं जाली जीवेंसाठीं । तुका ह्मणे दृष्टी । पाहा जवळी आहे तों ॥ ६ ॥

॥ १६८ ॥

जैशा तुह्मी दुरी आहां । तैशा राहा अंतरें ॥ १ ॥ नका येऊं देऊं आळ । अंगीं गोपाळ जडलासे ॥ २ ॥ अवघा हाचि राखा काळ । विकाळचि भोंवता ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज ऐशा । होतां पिशा जगनिंद्य ॥ ४ ॥

॥ १६९ ॥

येथील जे एक घडी । तये जोडी पार नाहीं ॥ १ ॥ किती त्यांचा सासुरवास । कैंचा रस हा तेथें ॥ २ ॥ अवघे दिवस गेले कामा । नाहीं जन्मा खंडण ॥ ३ ॥ तुका ह्मणे रतल्या जनीं । सोडा झणी कान्होबा ॥ ४ ॥

॥ १७० ॥

विचार करिती बैसोनि गौळणी । ज्या कृष्णकामिनी कामातुरा ॥ १ ॥
एकांतीं एकल्या एकाच सुखाच्या । आवडती त्यांच्या गोष्टी त्यांला ॥ २ ॥
तर्कवितर्किणी दुराविल्या दुरी । मौन त्या परिचारी आरंभिलें ॥ ३ ॥
कुशळा कवित्या कथित्या लोभिका । त्याही तेथें नका आह्मांपाशीं ॥ ४ ॥
बोलक्या वाचाळा कृष्णरता नाहीं । त्यां चोरोनी तिहीं खट केली ॥ ५ ॥

भेऊनियां जना एकी सवा जाल्या। वाती विझविल्या दाटो बळें ॥६॥
कृष्णसुख नाहीं कळलें मानसीं। निंदिती त्या त्यासी कृष्णरता ॥७॥
तो नये जवळी देखोनी कोल्हाळ। ह्मणउनि समेळ मेळविला ॥८॥
अंतरीं कोमळा बाहेरी निर्मेळा। तल्लीन त्या बाळा कृष्णध्यानीं ॥९॥
हरिरूपीं दृष्टि कानीं याच गोष्टी। आळंगिती कंठीं एका एकी ॥१०॥
न साहे वियोग करिती रोदना। भ्रमिष्ट भावना देहाचिया ॥११॥
विसरल्या मागें गृह सुत पती। अवस्था याचिती गोविंदाची ॥१२॥
अवस्था लागोनी निवळाचि ठेल्या। एका एकी जाल्या कृष्णरूपा ॥१३॥
कृष्ण ह्मणोनियां देती आलिंगन। विरहताप तेणें निवारेना ॥१४॥
ताप कोण वारी गोविंदावांचूनी। साच तो नयनीं न देखतां ॥१५॥
न देखतां त्यांचा प्राण रिघों पाहे। आजी कामास ये उसिर केला ॥१६॥
रित्या ज्ञान गोष्टी तया नावडती। आळिंगण प्रीति कृष्णाचिया ॥१७॥
मागें आह्मी कांहीं चुकलों त्याची सेवा। असेल या देवा राग आला १८॥
आठविती मागें पापपुण्यदोष। परिहार एकीस एक देती ॥१९॥
अनुतापें जाल्या संतप्त त्या बाळा। टाकिती विव्हळा धरणी अंग ॥२०॥
जाणोनी चरित्र जवळीच होता। आली त्या अनंता कृपा मग ॥२१॥
होऊनी प्रगट दाखविलें रूप। तापत्रयताप निवविले ॥२२॥
निवालेया देखोनी कृष्णाचें श्रीमुख। शोक मोह दुःख दुरावला ॥२३॥
साच भाव त्यांचा आणूनियां मना। आळंगितो राणा वैकुंठींचा ॥२४॥
हरिअंगसंगें हरिरूप जाल्या। बोलों विसरल्या तया सुखा ॥२५॥
व्यभिचारभावें भोगिलें अनंता। वर्तोनी असतां घराचारी ॥२६॥
सकळा चोरोनी हरि जयां चित्तीं। धन्य त्या नांदती तयामध्यें ॥२७॥
उणें पुरें त्यांचें पडों नेदी कांहीं। राखे सर्वां ठायीं देव तयां ॥२८॥
न कळे लाघव ब्रह्मादिकां माव। भक्तिभावें देव केला तैसा ॥२९॥
तुका ह्मणे त्यांचा धन्य व्यभिचार। साधिलें अपार निजसुख ॥३०॥

॥ १७१ ॥

हरिरता चपळा नारी । लागवरी न रिघती ॥ १ ॥ अवघ्या अंगें सर्वोत्तम । भोगी काम भोगता ॥ २ ॥ वाचा वाच्यत्वासी न ये । कोठें काय करावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा ऐशा । देवपिशा उदारा ॥४॥

॥ १७२ ॥

आलिंगन कंठाकंठीं । पडे मिठी सर्वांगें ॥ १ ॥ न घडे मागें परतें मन । नारायणा संभोगी ॥ २ ॥ वचनासी वचन मिळे । रिघती डोळे डोळियांत ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंतर्ध्यानीं । जीव जीवनीं विराल्या ॥४॥

॥ १७३ ॥

विषमाची शंका वाटे । सारिखें भेटे तरी सुख ॥ १ ॥ ह्मणऊनि चोरिलें जना । आल्या रानां एकांतीं ॥ २ ॥ दुजियासी कळों नये । जया सोय नाहीं हे ॥३॥ तुका ह्मणे मोकळें मन । नारायण भोगासी॥४॥

॥ १७४ ॥

धन्य बा ह्या ऐशा नारी । घरीं दारीं नांदती ॥१॥ चोरूनियां तुजपाशीं । येतां त्यांसी न कळतां ॥२॥ दोन्हीं ठायीं समाधान । सम काठिण बहुतचि ॥३॥ तुका ह्मणे जीवासाठीं । दुर्लभ भेटी ते देवा ॥४॥

॥ १७५ ॥

उदासीना पावल्या वेगीं । अंगा अंगीं जडलिया ॥ १ ॥ वेंटाळिला भोंवता हरी । मयूरफेरी नाचती ॥२॥ मना आले करिती चार । त्या फार हा एकला ॥३॥ तुका ह्मणे नारायणीं । निरंजनीं मीनलिया ॥४॥

॥ १७६ ॥

सोडियेल्या गांठी । दरुषणें कृष्णभेटी ॥१॥ करिती नारी अक्षवाणें । जीवभाव देती दानें ॥२॥ उपजल्या काळें । रूपें मोहिलीं सकळें ॥३॥ तुका तेथें वारी । एकी आडोनी दुसरी ॥४॥

॥ १७७ ॥

मुख डोळां पाहे । तैशीच ते उभी राहे ॥ १ ॥ केल्याविण नव्हे हातीं । धरोनि आरती परती ॥२॥ न धरिती मनीं । कांहीं संकोच दाटणी ॥३॥ तुका ह्मणे देवें । ओस केल्या देहभावें ॥४॥

॥ १७८ ॥

करूनी आरती । चक्रपाणी ओवाळिती ॥ १ ॥ आजी पुरले नवस । धन्य जाला हा दिवस ॥ २ ॥ पाहा वो सकळा । पुण्यवंता तुह्मी बाळा ॥ ३ ॥ तुका वाहे टाळी । उभा सन्निध जवळी ॥ ४ ॥

## विराण्या.

॥ १७९ ॥

वाळो जन मज ह्मणोत शिंदळी । परि हा वनमाळी न विसंबें ॥ १ ॥
सांडूनी लौकिक जालियें उदास । नाहीं भय आस जीवित्वाची ॥ २ ॥
नाइकें वचन बोलतां या लोकां । ह्मणे जालों तुका हरिरता ॥ ३ ॥

॥ १८० ॥

आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा । ह्मणोनी व्यभिचारा टेकलियें ॥ १ ॥
रात्रंदिस मज पाहिजे जवळी । क्षण त्या निराळी न गमे घडी ॥ २ ॥
नाम गोष्टी माझी सोय सांडा आतां । रातलें अनंता तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १८१ ॥

हाचि नेम आतां न फिरें माघारी । बैसलें शेजारीं गोविंदाचे ॥ १ ॥
घररिघी जालें पट्टराणी बळें । वरिलें सांवळें परब्रह्म ॥ २ ॥
बळियाचा अंगसंग जाला आतां । नाहीं भय चिंता तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १८२ ॥

नाहीं काम माझें काज तुह्मांसवें । होतें गुप्त ठावें केलें आतां ॥ १ ॥

---

१. "आतां ओवाळूं श्रीपती" असा पाठ पुष्कळ प्रतींतून आढळतो. परतु वर दिलेला पाठ संतमंडळांत प्रचलित आहे.

२. एका प्रतींत या अभंगाचा पहिला चरण "झालिया निःशंक फिटला कांसोटा । आतां मणगटा लावा चुना" असा असून पुढील दोन चरण 'हाचि नेम' इत्यादि वर दिल्याप्रमाणेंच आहेत. आणखी, वरील तिसऱ्या चरणांतील "नाहीं भय चिंता तुका ह्मणे" याच्या जागीं "रतलें अनंताचिये पायीं" असें असून, पांचवा चरण "तुका ह्मणे आह्मां नाहीं लाज आतां । भय धाक चिंता तुका ह्मणे" असा आहे.

व्यभिचार माझा पडिला ठाउका । न सर ती लोकांमाजी जालें ॥२॥
न धरावा लोभ कांहीं मजविशीं । जालें देवपिशी तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १८३ ॥

विसरलें कुळ आपुला आचार । पति भावे दीर घर सोय ॥ १ ॥
सांडिला लौकिक लाज भय चिंता । रातलें अनंता चित्त माझें ॥ २ ॥
मज आतां कोणी आळवाल ह्मणी । तुका ह्मणे कानीं बहिरी जालें ॥ ३ ॥

॥ १८४ ॥

न देखें न बोलें नाइकें आणीक । बैसला हा एक हरि चित्तीं ॥ १ ॥
सासुरें माहेर मज नाहीं कोणी । एक केलें दोन्ही मिळोनियां ॥ २ ॥
आळ आला होता आह्मी भांडखोरी । तुका ह्मणे खरी केली मात ॥ ३ ॥

॥ १८५ ॥

दुजा ऐसा कोण बळी आहे आतां । हरि या अनंतापासूनियां ॥ १ ॥
बळियाच्या आह्मी जालों बळिवंता । करूं सर्व सत्ता सर्वांवरी ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी जिवाच्या उदारा । झालों प्रीतिकरा गोविंदासी ॥ ३ ॥

॥ १८६ ॥

क्षणभरी आह्मी सोसिलें वाईट । साधिलें अवीट निजसुख ॥ १ ॥
सांडीमांडी मागें केल्या भरोवरी । अधिकाचि परी दुःखाचिया ॥ २ ॥
तुका ह्मणे येणें जाणें नाहीं आतां । राहिलों अनंताचिये पायीं ॥ ३ ॥

॥ १८७ ॥

आह्मां आह्मी आतां वडील धाकुटीं । नाहीं पाठीं पोटीं कोणी दुजें ॥ १ ॥
फावला एकांत एकविध भाव । हरी आह्मांसवें सर्व भोगी ॥ २ ॥
तुका ह्मणे अंगसंग एके ठायीं । असों जेथें नाहीं दुजें कोणी ॥ ३ ॥

॥ १८८ ॥

सर्व सुख आह्मी भोगूं सर्व काळ । तोडियेलें जाळ मोहपाश ॥ १ ॥
याचसाठीं सांडियेले भरतार । रातलों या परपुरुषाशीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां गर्भ नये धरूं । औषध जें करूं फळ नव्हे ॥ ३ ॥

॥ १८९ ॥
एका जिवें आतां जिणें जालें दोहीं। वेगळीक कांहीं नव्हे आतां ॥ १ ॥
नारायणा आह्मां नाहीं वेगळीक। पुरविली हे भाक सांभाळिली ॥ २ ॥
तुका ह्मणे झालें सायासाचें फळ। सरली ते वेळ काळ दोन्ही ॥ ३ ॥

॥ १९० ॥
ह्मसों रुसों आतां वाढवूं आवडी। अंतरींची गोडी अवीट ते ॥ १ ॥
सेवासुखें करूं विनोदवचन। आह्मी नारायण एकाएकीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी जालों उदासीन। आपुल्या आधीन केला पति ॥ ३ ॥

॥ १९१ ॥
मजसवें आतां येऊं नका कोणी। सासुरवासिनी बाइयांनो ॥ १ ॥
न साहवे तुह्मां या जनाची कूट। बोलती वाईट ओखटें तें ॥ २ ॥
तुका ह्मणे जालों उदास मोकळ्या। विचरों गोवळ्यासवें आह्मी ॥ ३ ॥

॥ १९२ ॥
शिकविलें तुह्मी तें राहे तोंवरी। मज आणि हरी वियोग तो ॥ १ ॥
प्रसंगीं या नाहीं देहाची भावना। तेथें या वचना कोण मानी ॥ २ ॥
तुका ह्मणे चित्तीं बैसला अनंत। दिसों नेदी नित्य अनित्य तें ॥ ३ ॥

॥ १९३ ॥
सांगतों तें तुह्मी आइकावें कानीं। आमुचे नाचणीं नाचूं नका ॥ १ ॥
जोंवरी या तुह्मां मागिलांची आस। तोंवरी उदास होऊं नका ॥ २ ॥
तुका ह्मणे काय वांयांविण धिंद। पति ना गोविंद दोन्ही नाहीं ॥ ३ ॥

॥ १९४ ॥
आजीवरी तुह्मां आह्मां नेणपण। कौतुकें खेळणें संग होता ॥ १ ॥
आतां अनावर जालें अगुणाची। करूं नये तेंचि करीं सुखें ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां बुडविलीं दोन्हीं। कुळें एक मनीं नारायण ॥ ३ ॥

॥ १९५ ॥
सासुरियां वीट आला भरतारा। इकडे माहेरा स्वभावेंचि ॥ १ ॥
सांडवर कोणी न धरिती हातीं। प्रारब्धाची गति भोगूं आतां ॥ २ ॥
न व्हावी ते जाली आमुची भंडाई। तुका ह्मणे काई लाजों आतां ॥ ३ ॥

॥ १९६ ॥

मरणाही आधीं राहिलों मरोनी । मग केलें मनीं होतें तैसें ॥ १ ॥
आतां तुह्मी पाहा आमुचें नवल । नका वेचूं बोल वांयांविण ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी भयाभीत नारी । कैसी संग सरी तुह्मां आह्मां ॥ ३ ॥

॥ १९७ ॥

परपुरुषाचें सुख भोगे तरी । उतरोनी करीं घ्यावें सीस ॥१॥ संवसारा आगी आपुलेनि हातें । लावूनी मागुतें पाहूं नये ॥ २ ॥ तुका ह्मणे व्हावें तयापरी धीट । पतंग हा नीट दीपावरी ॥३॥

॥ १९८ ॥

अइकाल परी ऐसें नव्हे बाई । न संडा या सोई भ्रताराची ॥१॥ नव्हे आराणूक लौकिकापासून । आपुल्या आपण गोविलें तें ॥ २ ॥ तुका ह्मणे मन कराल कठीण । त्या या निवडोन मजपाशीं ॥३॥

॥ १९९ ॥

आहांच वाहांच आंत वरी दोन्ही । न लगा गडणी आह्मां तैशा ॥१॥
भेऊं नये तेथें भेडसावूं कोणा । आवरूनी मना बंद द्यावा ॥२॥ तुका ह्मणे कांहीं अभ्यासावांचूनी । नव्हे हे करणी भलतीची ॥३॥

॥ २०० ॥

बहुतांच्या आह्मी न मिळों मतासी । कोणी कैसी कैसी भावनेच्या ॥१॥ विचार करितां वांयां जाय काळ । लटिकें तें मूळ फजितीचें ॥२॥ तुका ह्मणे तुह्मी करा घटापटा । नका जाऊं वाटा आमुचिया ॥३॥

॥ २०१ ॥

त्याचें सुख नाहीं आलें अनुभवा । कठीण हें जिवा तोंचिवरी ॥१॥
मागिलांचें दुःख लागों नेदी अंगा । अंतर हें संगा नेदी पुढें ॥ २ ॥
तुका ह्मणे सर्वविशीं हा संपन्न । जाणती महिमान श्रुति ऐसें ॥ ३ ॥

॥ २०२ ॥

न राहे रसना बोलतां आवडी । पायीं दिली बुडी माझ्या मनें ॥ १ ॥
मानेल त्या तुह्मी आइका स्वभावें । मी तों माझ्या भावें अनुसरलें ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी फिरावें बहुतीं । माझी तों हे गती जाली आतां ॥ ३ ॥

॥ २०३ ॥

न बोलतां तुह्मां कळों न ये गुज । ह्मणऊनी लाज सांडियेली ॥ १ ॥ आतां तुह्मां पुढें जोडितसें हात । नका कोणी अंत पाहों माझा ॥२॥ तुका ह्मणे आह्मी बैसलों शेजारीं । करील तें हरी पाहों आतां ॥ ३ ॥

॥ २०४ ॥

अखंड मुडतर । सासुरवास करकर ॥ १ ॥ याची जाली बोळवण । आतां न देखों तो शीण ॥ २ ॥ बहुतांची दासी । तये घरीं सासुरवासी ॥३॥ तुका ह्मणे मुळें । खंड जाला एका वेळें ॥४॥

॥ २०५ ॥

निरंजनीं एकटवाणें । संग नेणें दुसरा ॥१॥ पाहा चाळविलें कैसें । लावुनि पिसें गोवळें ॥ २ ॥ लपलें अंगें अंग । दिला संग होता तो ॥३॥ तुका ह्मणे नव्हतें ठावें । जालें भावें वाटोळें ॥४॥

## कृष्णाचे बाळपणांतील खेळ.

### गोरसाची चोरी.

॥ २०६ ॥

मेळवूनी सकळ गोपाळ । कांहीं करिती विचार ॥ १ ॥ चला जाऊं चोरूं लोणी । आजी घेऊं चंद्रधणी । वेळ लावियेला अझुणी । एका करितां गडे हो ॥२॥ वाट काढिली गोविंदीं । मागें गोपाळाची मांदी ॥३॥ अवघाचि वावरे । कळों नेदी कोणा फिरे ॥ ४ ॥ घर पाहोनि एकांताचें । नवविधा नवनीताचें ॥५॥ रिघे आपण भीतरी । पुरवी माथुलियाच्या हरी ॥६॥ बोलों नेदी ह्मणे स्थीर । खुणा दावी खा रे क्षीर ॥ ७ ॥ जोगावल्यावरी । तुका करितो चाकरी ॥ ८ ॥

॥ २०७ ॥

याल तर या रे लागें । अवघे माझ्या मागें मागें ॥ १ ॥ आजी देतों पोटभरी । पुरे ह्मणाल तोंवरी ॥ २ ॥ हळूहळू चला । कोणी कोणाशीं न बोला ॥३॥ तुका ह्मणे सांडा घाटे । तेणें नका भरूं पोटें ॥ ४ ॥

॥ २०८ ॥

शिंकें लावियेलें दुरी। होतों तिघांचे मी वरी ॥१॥ तुह्मी व्हारे दोहीं-कडे। मुख पसरूनी गडे ॥ २ ॥ वाहाती त्या धारा। घ्यारे दोहींच्या कोंपरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हातीं टोका। अधिक उणें नेदी एका ॥४॥

॥ २०९ ॥

पळाले ते भ्याड। त्यांसी येथें जाला नाड ॥१॥ धीट घेती धणीवरी। शिंकीं उतरितो हरी ॥ २ ॥ आपुलिया मतीं। पडलीं विचारीं तीं रितीं ॥ ३ ॥ तुका लागे त्या रे पायां। कैं पावाल या ठाया ॥ ४ ॥

॥ २१० ॥

धालें मग पोट। केला गड्यांनीं बोभाट ॥ १ ॥ ये रे ये रे नारा-यणा। बोलों अबोलण्या खुणा ॥ २ ॥ खांद्यावरी भार। तीं शिणती बहु फार ॥ ३ ॥ तुकयाच्या दातारें। नेलीं सुखी केलीं पोरें ॥ ४ ॥

## मातेशीं हट्ट व समाधान.

॥ २११ ॥

भोजनाच्या काळीं। कान्हें[1] मांडियेली आळी। काला करी वन-माळी। अन्न एकवटा देई निवडुनी। माते ह्मणतो जननी। हात पिटूनी मेदिनी। वरी अंग घाली ॥ १ ॥ कैसा आळी घेसी। नव्हे तेंचि करविसी। घेई दुसरें तयेसी। वारी ह्मणे नको ॥ २ ॥ आतां काय करूं। नये यासी हाणूं मारूं। नव्हे बुझावितां स्थिरू। कांहीं करिना हा। त्यांचि केलें एके ठायीं। आतां निवडूनी खाई। आह्मां जाचितोसी काई। हरिसी ह्मणे माता ॥३॥ त्याचें तयाकुन। कर-वितां तुटे भान। तंव जालें समाधान। उठोनियां बैसे। माते बरें जाणविलें। अंग चोरूनी आपुलें। तोडियेलें एका बोलें। कैसें सुख-दुःख ॥४॥ ताट पाळवें झाकिलें। होतें तैसें तेथें केलें। भिन्नाभिन्न

१ पुष्कळ प्रतींत 'कान्हो' असा पाठ आहे.

निवडिलें । अन्नें वेगळालीं । विस्मित जननी । भाव देखोनियां मनीं । ह्मणे नाहीं ऐसा कोणी । तुज सारिखा रे ॥ ५ ॥ हरुषली माये । सुख अंगीं न समाये । कवळूनी बाहे । देती आलिंगन । आनंद भोजनीं । तेथें फिटलीसे धणी । तुका ह्मणे कोणी । सांडा शेष मज ॥६॥

## गोपाळांबरोबर निरनिराळ्या प्रकारचे खेळ व काला.

॥ २१२ ॥

सोडियेल्या गाई नवलक्ष गोपाळीं । सवें वनमाळी चालियेला ॥ १ ॥
सुदिनसुवेळीं भाग्याच्या उदयीं । चरावया गाई वनामाजी ॥ २ ॥
गाईगोपाळांच्या संगें चाले हरि । क्रीडा नानापरी खेळताती ॥ ३ ॥
काठी कांबळीया मोहरीया पोंवा । सिदोरी गांजिवा खांद्यावरी ॥ ४ ॥
गोधनें सवंगडे खेळे नानापरि । आले भीमातीरीं वेणुनादा ॥ ५ ॥
तेथें उभा ठेला गोपाळांसहित । सिदोरिया सोडीत बैसे तेथें ॥ ६ ॥
तुका ह्मणे ज्यांनीं आणिल्या भाकरी । नेऊनियां हरीपुढें देती ॥ ७ ॥

॥ २१३ ॥

माझे गडी कोण कोण । निवडा भिन्न यांतुनी ॥१॥ आपआपणामध्यें मिळों । एक खेळों एकाशीं ॥२॥ घाबरियांच्या मोडा काड्या । धाडा भ्याडां वळतियां ॥३॥ तुका ह्मणे देवापाशीं । बिटाळशी नसावी ॥४॥

॥ २१४ ॥

झेला रे झेला वरचेवर झेला । हातिंचें गमावी तो पाठीं साहे टोला ॥१॥ त्रिगुणांचा चेंडू हातें झुगारी निराळा । वरिलिया मुखें मनें लावी तेथें डोळा ॥ २ ॥ आगळा होऊनि धरी वरिचिया वरी । चपळ तो जिंके गांढ्या ठके येरझारीं ॥३॥ हातीं सांपडलें उभें बैसों नेदी कोणी । सोरी मागें सोरी घेती ओणवें करूनी ॥४॥ डाई पडलिया सोसी दुःखाचे डोंगर । पाठीवरी भार भोंवताही उभा फेर ॥ ५ ॥ तुका ह्मणे सुख पाहे तयांचें आगळें । जिंकितो हरीसी कोणी एका तरी काळें ॥६॥

॥ २१५ ॥

अझुनि कां थीर पोरा न ह्मणसी किर । धरूनियां धीर लाजे बुर निघाला ॥१॥ मोकळा होतासी कां रे पडिलासी डाई । वरिलांचा भार आतां उतरेसा नाहीं ॥ २ ॥ मेळवूनि मेळा एकाएकीं दिली मिठी । कवळिलें एक बहु बैसविलीं पाठीं ॥३॥ तळील तें वरी वरील तें येतें तळा । न सुटे तोंवरी येथें गुंतलिया खेळा ॥४॥ सांडितां ठाव पुढें सईल धरी हात । चढेल तो पडेल ऐसी ऐका रे मात ॥५॥ तुका ह्मणे किती आवरावे हात पाय । न खेळावें तोंच बरें वरी न ये डाय ॥ ६ ॥

॥ २१६ ॥

गडी गेले रडी । कान्हो नेदीस तूं चढी ॥१॥ आह्मी न खेळों न खेळों । आला भाव तुझा कळों ॥ २ ॥ न साहावे भार । बहु लागतो उशीर ॥ ३ ॥ तुका आला रागें । येऊं नेदी मागें मागें ॥ ४ ॥

॥ २१७ ॥

या रे करूं गाई । जमा निजलेती काई । बोभाटानें आई । घरा गेल्या मारील ॥ १ ॥ घाला घाला रे कुकारे । ज्याची तेणेंचि मोहरे । एवढेंचि पुरे । केलियानें सावध ॥ २ ॥ नेणोनियां खेळा । समय समयाच्या वेळा । दुश्चिताजवळा । मिळालेती दुश्चित ॥३॥ तुका ह्मणे शीक । न धरितां लागे भीक । धरा सकळीक । मनेरी धांवा वळतियां॥४॥

॥ २१८ ॥

एकमेकीं घेती थडका । पाडी धडका देऊनी ॥१॥ एकमेकां पाठीवरी । बैसोनी करिती ढवाळी ॥२॥ हाताहात हाणे लाही । पळतां घाई चुकविती ॥ ३ ॥ तुका ह्मणे लपणी चपणी । एका हाणी पाठीवरी ॥ ४ ॥

॥ २१९ ॥

चला वळूं गाई । दूर अंतरल्या भाई ॥ १ ॥ खेळ खेळतां जाला शीण । कोण करी वणवण ॥ २ ॥ गाई हकारी कान्हया । ह्मणोनि लागती ते पायां ॥ ३ ॥ तुका ह्मणे द्यावें । नामसंकीर्तन बरवें ॥४॥

॥ २२० ॥

चला वळूं गाई । बैसों जेऊं एके ठायीं ॥ १ ॥ बहु केली वणवण । पायपिटी जाला सिण ॥ २ ॥ खांदीं भार पोटीं भूक । काय खेळा-याचें सुख ॥ ३ ॥ तुका ह्मणे धांवें । मग अवघें बरवें ॥ ४ ॥

॥ २२१ ॥

अवघे गोपाळ ह्मणती या रे करूं काला । काय काय कोणाची सिदोरी ते पाहों द्या मला । नका कांहीं मागें पुढें रे ठेवूं खरेंच बोला । वंची वंचला तोचि रे येथें भोंवडा त्याला ॥ १ ॥ घेतल्यावांचून झाडा रे नेदी आपुलें कांहीं । एकां एक ग्वाही बहुत देती मोकळें नाहीं । ताक सांडी येर येर रे काला भात भाकरी दहीं । आलें घेतों मध्यें बैसला नाहीं आणवीत तें ही ॥ २ ॥ एका नाहीं धीर तांतडी दिल्या सोडोनी मोटा । एक सोडितील गांठी रे एक चालती वाटा । एक उभा भार वाहोनि पाहे उगाचि खोटा । एक ते करूनि आगले आतां ऐसेंचि घाटा ॥ ३ ॥ एकीं स्थिरावल्या गाई रे एक वळत्या देती । एकांच्या फांकल्या वोढाळा फेरे भोंवतीं घेती । एकें चारावोरा गुंतलीं नाहीं जीवन चित्तीं । एक एका चला ह्मणती एक हुंबरी घेती ॥ ४ ॥ एकीं एकें वाटा लाविलीं भोळीं नेणतीं मुलें । आपण घरींच गुंतले साळा नासिलीं फुलें । गांठींचें तें सोडूं नावडे खाय आइतें दिलें । सांपडलें वेठी बोढी रे भार वाहतां मेलें ॥ ५ ॥ एक ते माया गुंतले घरीं बहुत काम । वार्ता ही नाहीं तयाची तया कांहींच ठावें । जैसें होतें शिळें संचित तैसें लागलें खावें । हातोहातीं गेलें वेचुनी मग पडिलें ठावें ॥ ६ ॥ एकीं हातीं पायीं पटे रे अंगीं लाविल्या राखा । एक ते सोलिव बोडके केली सपाट शिखा । एक ते आळसी तळीं रे वरी वाढिल्या काखा । सिदोरी वांचून बुद्धि रे केला अवघ्यां वाखा ॥ ७ ॥ तुका ह्मणे आतां कान्होबा आह्मां वांटोनी द्यावें । आहे

नाहीं आह्मांपाशीं तें तुज अवघेंचि ठावें । मोकलितां तुह्मी शरण आह्मीं कवणासी जावें । कृपावंतें कृपा केली रे पोट भरे तों खावें ॥ ८ ॥

॥ २२२ ॥

आह्मां निकट वासें । कळों आलें जैसें तैसें । नाहीं अनारिसें । कान्होबाचे अंतरीं ॥ १ ॥ पीडती आपुल्या भावना । जैसी जयाची वासना । कर्माचा देखणा । पाहे लीळा कौतुक ॥२॥ खेळ खेळे न पडे डाई । ज्याचा भार त्याच्या ठायीं । कोणी पडतील डाई । कोणी कोडीं उगविती ॥३॥ तुका ह्मणे कवळ । हातीं घेऊनि गोपाळ । देतो ज्यांचें बळ । त्यांसी तैसा विभाग ॥४॥

॥ २२३ ॥

काम सारूनी सकळ । आले अवघे गोपाळ । जाली आतां वेळ । ह्मणती आणा सिदोऱ्या ॥ १ ॥ देती आपुलाला झाडा । गाई बैसविल्या वाडां । दोंदिल बोवडा । वांकड्याचा हरि मेळीं ॥ २ ॥ आपुलालिये आवडी । मुद्रा बांधल्या परवडी । निवडूनियां गोडी । हरि मेळवी त्यांत तें ॥ ३ ॥ भार वागविला खांदीं । नव्हती मिळाली जो मांदी । सकळांचे संदी । ओझीं अवघीं उतरलीं ॥ ४ ॥ मागे जो तांतडी । त्यासी रागा येती गडी । तुझी कां रे कुडी । येथें मिथ्या भावना ॥ ५ ॥ एक एकाच्या संवादें । कैसे घाले ब्रह्मानंदें । तुका ह्मणे पदें । यारे वंदूं हरीचीं ॥ ६ ॥

॥ २२४ ॥

यमुने पावळीं । गडियां बोले वनमाळी । आणा सिदोऱ्या सकळी । काला करूं आजी । अवघें एके ठायीं । करूनी स्वाद त्याचा पाहीं । मजपाशीं आहे तेंही । तुह्मांमाजी देतों ॥ १ ॥ ह्मणती बरवें गोपाळ । ह्मणती बरवें गोपाळ । वाहाती सकळ । मोहरी पांवे आनंदें । खडकीं सोडियेल्या मोटा । अवघा केला एकवटा । काला करूनियां वांटा । गडियां देतो हरि ॥ २ ॥ एकापुढें एक । घाली

हात पसरी मुख । गोळा पावे तया सुख । अविकाचि वाटे । ह्मणती गोड आलें । ह्मणती गोड जालें । आणिक देई । नाहीं पोट धालें ॥ ३ ॥ हात नेतो मुखापासीं । येर आशा तोंड वासी । खाय आपण तयासी । दावी वांकुलिया । देऊनियां मिठी । पळे लागतील पाठीं । घरूनी काढितील ओंठीं । मुखामाजी खाती ॥ ४ ॥ ह्मणती ठकडा रे कान्हा । लावी घांसा भरी राणा । दुम करितो शहाणा । पाठोवाठीं तयाच्या । अवघियांचे खाय । कवळ कृष्णा माझी माय । सुरवर ह्मणती हाय हाय । सुखा अंतरलों ॥ ५ ॥ एक एका मारी । ढुंगा पाठी तोंडावरी । गोळा न साहावे हरि । ह्मणे पुरे आतां । येतो काकुलती । गोळा न साहावे श्रीपति । ह्मणे खेळों आतां नीती । सांगों आदरिलें ॥ ६ ॥ आनंदाचे फेरी । माजी घालुनियां हरी । एक घालिती हुंबरी । वाती सिंगें पावें । वांकडे बोवडे । खुडे मुडे एक लुंड । कृष्णा आवडती पुढें । बहु भाविक ते ॥ ७ ॥ करी कवतुक । त्यांचें देखोनियां मुख । हरी वाटतसे सुख । खदखदां हांसे । एक एकाचें उच्छिष्ट । खातां न मानिती वीट । केली लाजतां ही धीट । आपुलिया संगें ॥ ८ ॥ नाहीं ज्याची गेली भूक । त्याचें पसरवितो मुख । अवधियां देतो सुख । सारिखेंची हरी । ह्मणती भला भला हरी । तुझी संगति रे बरी । आतां चाळविसी तरी । न वजों आणिकां सवें ॥ ९ ॥ गाई विसरल्या चार । पक्षी श्वापदांचे भार । जालें यमुनेचें स्थिर । जळ वाहों ठेलें । देव पाहाती सकळ । मुखें घोटूनियां लाळ । धन्य ह्मणती गोपाळ । धिग जालों आह्मी ॥ १० ॥ ह्मणती कैसें करावें । ह्मणती कैसें करावें । यमुनाजळीं व्हावें । मत्स्य शेष घ्यावया । सुरवरांचे थाट । भरलें यमुनेचें तट । तंव आधिकाचि होंट । मटमटां वाजवी ॥ ११ ॥ आनंदें सहित । क्रीडा करी गोपीनाथ । ह्मणती यमुनेंत हात । नका धुऊं कोणी । ह्मणती जाणे जीवींचें । ह्मणती जाणे जीवींचें । लाजे त्यास येथें कैचें । शेष कृष्णाचें । लाभ

थोरिवे ॥ १२ ॥ धन्य दिवस काळ । आजी पावला गोपाळ । ह्मणती धालों रे सकळ । तुझियानि हातें । मानवले गडी । एक एकांचें आवडी । दहीं खादलें परवडी । धणीवरी आजी ॥ १३ ॥ तुझा संग बरवा । नित्य आह्मां द्यावा । ऐसें करूनी जीवा । नित्य देवा चालावें । तंव ह्मणे वनमाळी । घ्या रे काठिया कांबळी । आतां जाऊं खेळी मेळीं । गाई चारावया ॥ १४ ॥ तुका ह्मणे प्रेमें धालीं । कोणा न साहावे चाली। गाई गोपाळांसी केली । आपण यांसरी । आजी जाला आनंद । आजी जाला आनंद। चाले परमानंद । सर्वे आह्मांसहित ॥ १५ ॥

॥ २२५ ॥

बैसवूनी फेरी । गडियां मध्यभागीं हरी अवघियांचें करी । समाधान सारिखें ॥ १ ॥ पाहे तो देखे समोर । भोगी अवघे प्रकार । हरुषें झेली कर । कवळ मुखीं देती ते ॥२॥ बोले बोलतिया सवें । देतील तें त्यांचें घ्यावें । एक एका ठावें । येर येरा अदृश्य ॥३॥ तुका ह्मणे देवा । बहु आवडीचा हेवा । कोणाचिया जीवा । वाटों नेदी विषम ॥ ४ ॥

॥ २२६ ॥

"अवघियां दिला गोर । मज करे पाहीना" ॥१॥ फुंदे गोपाळ डोळे चोळी । ढुंगा थापली हाणे तोंडा ॥ २ ॥ आवडती थोर मोटे । मी रे पोरटें दैन्यवाणें ॥३॥ ह्मणे जाणों भाव । जीवींचा देव बुझावी ॥४॥

॥ २२७ ॥

हा गे माझा हातीं । पाहा कवळ सांगाती ॥ १ ॥ देवें दिला खातों भाग । कराल तर करा लाग ॥ २ ॥ धालें ऐसें पोट । वरी करूनियां बोट ॥ ३ ॥ तुका ह्मणे घरीं । मग कैंच्या या परी ॥ ४ ॥

॥ २२८ ॥

अवघेंचि गोड जालें ॥ मागीलये भरी आलें ॥ १ ॥ साह्य जाला पांडुरंग । दिला अभ्यंतरीं संग ॥ २ ॥ थडिये पावतां तो वाव । मागें वाहावतां ठाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे गेलें । स्वप्नींचें जागें जालें ॥ ४ ॥

॥ २२९ ॥

ज्यां जैसी आवडी त्यां तैसा विभाग। देत पांडुरंग तृप्ति जाली ॥ १ ॥ मुखींचें उच्छिष्ट हिरोनियां खातां । विस्मित विधाता देखोनियां ॥ २ ॥ दिलें जें गोपाळां तें नाहीं कोणासी । विस्मित मानसीं सुरवर ॥ ३ ॥ देव ऋषि मुनि सिद्ध हे चारण । शिव मरुद्गण चंद्र सूर्य ॥ ४ ॥ तुका ह्मणे आले सकळही सुरवर । आनंदें निर्भर पाहावया ॥ ५ ॥

॥ २३० ॥

घ्या रे भोंकरें भाकरी । दहीं भाताची सिदोरी । ताक सांडा दुरी असेल तें नयापें ॥ १ ॥ येथें यावें तैसें घ्यावें । थोडें परि निरें व्हावें । सांगतों हें ठावें । असों द्या रे सकळां ॥२॥ माझें आहे तैसें पाहे । नाहीं तरी घरा जाय । चोरोनियां माय । नवनीत आणावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे घरीं । माझें कोणी नाहीं हरी । नका करूं दुरी । मज पायां वेगळें ॥४॥

॥ २३१ ॥

आले सुरवर नानापक्षी जाले । सकळ अवतरले श्वापदवेषें ॥ १ ॥ श्वानस्वरूपी होऊनियां आले । उच्छिष्ट कवळ वेंचिताती ॥ २ ॥ होऊनियां दीन हात पसरिती । मागोनियां घेती उष्टावळी ॥ ३ ॥ अभिमान आड घालोनी बाहेरी । तयां ह्मणे हरि घ्या रे धणी ॥ ४ ॥ तुका ह्मणे धणी लाधली अपार । तया सुखा पार काय सांगों ॥५ ॥

॥ २३२ ॥

काल्याचिया आसे । देव जळीं जाले मासे । पुसोनियां हांसे । टिरी-सांगातें हात ॥१॥ लाजे त्यासी वांटा नाहीं । जाणे अंतरींचें तेंही । दीन होतां कांहीं । होऊं नेदी वेगळें ॥ २ ॥ उपाय अपाय यापुढें । खोटे निवडितां कुडे । जोडूनियां पुढें । हात उभे नुपेक्षी ॥३॥ तें घ्या रे सावकाशें । जया फावेल तो तैसें । तुका ह्मणे रसें । प्रेमाचिया आनंदें॥४॥

॥ २३३ ॥

आजी ओस अमरावती । काला पाहावया येती । देव विसरती । देहभाव आपुला ॥१॥ आनंद न समाये मेदिनी । चारा विसरल्या

पाणी । तटस्थ त्या ध्यानीं । गाई जाल्या श्वापदें ॥२॥ जें या देवांचें दैवत । उभें आहे या रंगांत । गोपाळांसहित । क्रीडा करी कान्होबा ॥ ३ ॥ तया सुखाची शिराणी । तींच पाउलें मेदिनी । तुका ह्मणे मुनी । धुंडितां न लाभती ॥ ४ ॥

॥ २३४ ॥

चला बाई पांडुरंग पाहूं वाळवंटीं । मांडियेला काला भोंवतीं गोपाळांची दाटी ॥ १ ॥ आनंदें कवळ देती एकामुखीं एक । न ह्मणती सान थोर अवघीं सकळीक ॥ २ ॥ हमामा हुंबरी पांवा वाजविती मोहरी । घेतल्यासे फेर माजी घालूनियां हरी ॥ ३ ॥ लुब्धल्या नारी नर अवघ्या पशुयाती । विसरलीं देहभाव शंका नाहीं चित्तीं ॥ ४ ॥ पुष्पांचा वरुषाव जाली आरतियांची दाटी । तुळसी गुंफोनियां माळा घालितील कंठीं ॥ ५ ॥ यादवांचा राणा गोपीमनोहर कान्हा । तुका ह्मणे सुख वाटे देखोनियां मना ॥ ६ ॥

॥ २३५ ॥

कंठीं धरिला कृष्णमणी । अवघा जनीं प्रकाश ॥ १ ॥ काला वांटूं एकमेकां । वैष्णवां निका संभ्रम ॥२॥ वांकुलिया ब्रह्मादिकां । उत्तम लोकां दाखवूं ॥३॥ तुका ह्मणे भूमंडळीं । आह्मी बळी वीर गाढे ॥४॥

॥ २३६ ॥

उपजोनियां पुढती येऊं । काला खाऊं दहींभात ॥ १ ॥ वैकुंठीं तों ऐसें नाहीं । कवळ कांहीं काल्याचें ॥ २ ॥ एकमेकां देऊं मुखीं । सुखीं घालूं हुंबरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाळवंट । बरवें नीट उत्तम ॥४॥

॥ २३७ ॥

होचि अनुवाद सदा सर्वकाळ । करुनियां गोपाळकाला सेवूं ॥ १ ॥ वोरसलें कामधेनूचें दुभतें । संपूर्ण आइतें गगनभरी ॥२॥ संत सनकादिक गोमट्या परवडी । विभाग आवडी इच्छेचिये ॥३॥ तुका ह्मणे मधीं घालूं नारायण । मग नव्हे सीण कोणा खेळें ॥४॥

॥ २३८ ॥

आतां हेंचि जेऊं हेंचि जेऊं । सर्वे घेऊं सिदोरी ॥ १ ॥ हरिनामाचा खिचडा काला । प्रेमें मोहिला साधनें ॥ २ ॥ चवीं चवीं घेऊं घास । ब्रह्मरस आवडी ॥३॥ तुका ह्मणे गोड लागे । तों तों मागे रसना ॥४॥

॥ २३९ ॥

कवळाचिया सुखें । परब्रह्म जालें गोरखें । हात गोवूनि खाय मुखें । बोटासांदीं लोणचें ॥ १ ॥ कोण जाणे तेथें । कोण लाभ कां तें । ब्रह्मादिकां दुर्लभ ॥ २ ॥ घाली हमामा हुंबरी । पांवा वाजवी मोहरी । गोपाळांचे फेरी । हरि छंदें नाचतसे ॥३॥ काय नव्हतें त्या घरीं खावया । रिघे लोणी चोरावया । तुका ह्मणे सर्वे तया । आह्मीही सोंकलों ॥ ४ ॥

॥ २४० ॥

अवघें अवघोकडे । दिलें पाहे मजकडे । अशा संवगडे । सहित थोरी लागली ॥ १ ॥ कां रे धरिला अबोला । माझा वांटा देई मला । सिदोरीचा केला । झाडा आतां निवडेना ॥२॥ भूक लागली अनंता । कां रे नेणसी जाणतां । भागलों वळितां । गाई सैरा ओढाळा ॥३॥ तुका करुणा भाकी । हरि पाहे गोळा टाकी । घेता जाला सुखी । भीतरी वांटी आणिकां ॥४॥

॥ २४१ ॥

आह्मी गोवळी गनटें । नव्हों जनांतील धाटें ॥१॥ सिदोरीचा करूं काला । एक वांटितों एकाला ॥२॥ खेळों आपआपणाशीं । आमचीं तीं आह्मांपाशीं ॥ ३ ॥ मिळालों नेणते । तुका कान्होबा भोंवते ॥ ४ ॥

॥ २४२ ॥

कां रे गमाविल्या गाई । आली वळती तुझी जाई । मागें आलें काई । एका तें कां नेणसी ॥१॥ केलास फजित । मागें पुढें ही बहुत । लाज नाहीं नित्य । नित्य दंड पावतां ॥२॥ बोला खोडा खिळ गाढी । ऐसा कोण तये काढी । धांवेल का पाढी । तुझी आधीं वोढाळा ॥३॥ चाल धांवें । मी ही येतों तुजसवें । तुका ह्मणे जंव । तेथें नाहीं पावली ॥४॥

॥ २४३ ॥

कान्होबा आतां तुह्मी आह्मीच गडे। कोणाकडे जाऊं नेदूं ॥ १ ॥ वाहीन तुह्मी भारशिदोरी। वळतीवरी येऊं नेदीं ॥२॥ ढवळे गाईचें दूध काढूं। एकएकल्यां ठोंबे मारूं ॥३॥ तुका ह्मणे टोकवूं त्यांला। जे तुझ्या बोला मानीत ना ॥ ४ ॥

॥ २४४ ॥

बहु काळीं बहु काळीं। आह्मी देवाचीं गोवळीं ॥ १ ॥ नाहीं विटों देत भात। जेऊं बैसवी सांगातें ॥२॥ बहु काळें बहु काळें। माझें पांघरे कांबळें ॥३॥ तुका ह्मणे नाहीं नाहीं। त्याचें आमचेंसें कांहीं ॥ ४॥

॥ २४५ ॥

बहु बरा बहु बरा। यासांगातें मिळे चारा ॥१॥ ह्मणोनी जीवें साटीं। घेतली कान्होबाची पाठी ॥ २ ॥ बरवा बरवा दिसे। समागम याचा निमिषें ॥३॥ पुढती पुढती तुका। सोंकला सोंकवितो लोकां ॥४॥

॥ २४६ ॥

घेती पाण्यासी हुंबरी। त्यांचें समाधान करी ॥ १ ॥ ऐसी गोपाळांची सवे। जाती तिकडे मागें धांवे ॥ २ ॥ स्थिरावली गंगा। पांगविली ह्मणे उगा ॥ ३ ॥ मोहरी पांवा काठी। तुका ह्मणे याजसाठीं ॥ ४ ॥

॥ २४७ ॥

वळी गाई धांवे घरा। आमच्या करी येरझारा ॥ १ ॥ नांव घेतां तो जवळी। बहु भला कान्हो वळी ॥२॥ नेदी पडों उणें पुरें। ह्मणे अवघेंचि बरें ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्ता। वाटे न व्हावा परता ॥ ४ ॥

॥ २४८ ॥

ह्मणती धालों धणीवरी। आतां नलगे शिदोरी। नये क्षणभरी। आतां यासी विसंबों ॥१॥ चाल चाल रे कान्होबा। खेळ मांडूं रानीं। बैसवूं गोठणीं। गाई जमा करूनी ॥२॥ न लगे जावें घरा। चुकलिया येरझारा। सज्जन सोयरा। मायबाप तूं आह्मां ॥३॥ तुका ह्मणे धालें पोट। आतां कशाचा बोभाट। पाहाणें ते वाट। मागें पुढें राहिली ॥४॥

॥ २४९ ॥

तुह्मिये संगती । जाली आमुची निश्चिंती ॥ १ ॥ नाहीं देखिलें तें मिळे । भोग सुखाचे सोहळे ॥२॥ घरीं ताकाचें सरोवर । येथें नवनीताचे पूर ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां । आह्मी न वजों दवडितां ॥ ४ ॥

॥ २५० ॥

कामें पीडिलों माया । बहु मागी नाहीं दया ॥ १ ॥ तुझ्या राहिलों आधारें । जालें अवघेंचि बरें ॥ २ ॥ तुझे लागलों संगती । आतां येतों काकुळती ॥३॥ तुका ह्मणे तुझ्या भिडा । कान्होबा हे गेली पीडा ॥४॥

॥ २५१ ॥

ब्रह्मादिकां न कळे खोळ । ते हे आकळ धरिली ॥१॥ मोहरी पांवा बाह् काठी । धांवे पाठीं गाईचे ॥२॥ उच्छिष्ट न लभे देवां । तें हें सदैवां गोवळ्यां ॥३॥ तुका ह्मणे जोड जाली । ते हे माउली आमुची ॥ ४॥

॥ २५२ ॥

कान्होबा तूं आलगट । नाहीं लाज बहु धीट । पाहिलें वाईट । बोलोनियां खोटें ॥ १ ॥ परि तूं न संडिसी खोडी । करिसी केली घडीघडी । पाडिसी रोकडी । तुटी माय आह्मांसी ॥२॥ तूं ठायींचा गोवळ । अविचारी अनर्गळ । चोरटा शिंदळ । ऐसा पिटूं डांगोरा ॥३॥ जरी तुझी आई । आह्मी घालूं सर्वा ठायीं । तुका ह्मणे तेंही । तुज वाटे भूषण ॥४॥

॥ २५३ ॥

नेणों वेळा काळ । धालों तझ्यानें सकळ ॥१॥ नाहीं नाहीं रे कान्होबा भय आह्मांपासीं । वळूनी पुरविसी गाई पोटा खावया ॥२॥ तुजपाशीं भये । हें तों बोलों परि नये ॥३॥ तुका ह्मणे बोल । आह्मां अनुभवें फोल ॥४॥

॥ २५४ ॥

पाहातां गोवळी । खाय त्यांची उष्टावळी ॥१॥ करिती नामाचें चिंतन । गडी कान्होबाचें ध्यान ॥२॥ आली धावी डाई । धांवे वळत्या मागें गाई ॥३॥ एके ठायीं काला । तुका ह्मणे भाविकाला ॥४॥

---

## वणव्यापासून गोपाळांचें संरक्षण व त्यांचीं प्रेमयुक्त भाषणें.

॥ २५५ ॥

ते काय पवाडे नाहीं म्यां ऐकिले । गोपाळ रक्षिले वनांतरीं ॥ १ ॥
मावेचा वोणवा होऊनी राक्षस । लागला वनास चहूंकडे ॥ २ ॥
गगनासी ज्वाळा लागती तुंबळ । गोधनें गोपाळ वेडावलीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तेथें पळावया वाट । नाहीं बा निपट ऐसें जालें ॥ ४ ॥

॥ २५६ ॥

धडकला अग्नि आह्मा येती वरी । गोपाळ श्रीहरी विनविती ॥ १ ॥
अरे कृष्णा काय विचार करावा । आला रे वोणवा जळों आतां ॥ २ ॥
अरे कृष्णा तुझें नाम बळिवंत । होय कृपावंत राख आतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे अरे कृष्णा नारायणा । गोपाळ करुणा भाकितिले ॥ ४ ॥

॥ २५७ ॥

अरे कृष्णा आह्मी तुझे निजगडी । नवनीत आवडी देत होतों ॥ १ ॥
अरे कृष्णा आतां राखें कैसें तरी । संकटा भीतरीं पडियेलों ॥ २ ॥
वरुषला इंद्र जेव्हां शिळाधारीं । गोवर्धन गिरी उचलिला ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझे पवाडे गोपाळ । वर्णिती सकळ नारायणा ॥ ४ ॥

॥ २५८ ॥

अरे कृष्णा तुवां काळिया नाथिला । दाढे रगडिला गिठासुर ॥ १ ॥
अरे कृष्णा तुवां पूतना शोपिली । दुर्बुद्धि कळली अंतरींची ॥ २ ॥
गोपाळ करुणा ऐसी नानापरी । भाकिती श्रीहरी तुजपुढें ॥ ३ ॥
तुझें नाम कामधेनु करुणेची । तुका ह्मणे त्यांची आली कृपा ॥ ४ ॥

॥ २५९ ॥

चहूंकडूनियां येती ते कल्लोळ । सभोंवते ज्वाळ जवळी आले ॥ १ ॥
सकुमार मूर्ति श्रीकृष्ण धाकुटी । घोंगडी आणि काठी खांद्यावरी ॥ २ ॥

व्हान लेकरूं होतें तें सगुण । विक्राळ वदन पसरिलें ॥ ३ ॥
थामाड तें एक गगनीं लागलें । एक तें ठेविलें भूमीवरी ॥ ४ ॥
तये वेळीं अवघे गोपाळही भ्याले । तुकेंही लपालें भेऊनियां ॥ ५ ॥

॥ २६० ॥

पैल आली आगी कान्हो काय रे करावें । न कळे तें कैसे आजी वांचों आह्मी जीवें ॥ १ ॥ धांव रे हरि सांपडलों संधी । वोणव्याचे मधीं बुद्धि कांहीं करावी ॥ २ ॥ अवचितां जाळ येतां देखियेला वरी। परतोनी पाहतां आधीं होतों पाठमोरी ॥ ३ ॥ सभोंवता फेर रीग न पुरे पळतां । तुका ह्मणे जाणसी तें करावें अनंता ॥ ४ ॥

॥ २६१ ॥

भिऊं नका बोल आकूनियां राहा डोळे । चालवील देव धाक नाहीं येणें वेळे ॥ १ ॥ बाप रे हा देवांचाही देव । कळों नेदी भाव काय करी करवी ते ॥ २ ॥ पसरूनी मुख विश्वरूप खाय जाळ । सारूनियां संधि अवघे पहाती गोपाळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी मागें भ्यालों वांयांविण । कळों आलें आतां या सांगातें नाहीं शिण ॥ ४ ॥

॥ २६२ ॥

श्रीमुख वोणवा गिळीत चालिलें । भ्यासुर वासिलें वदनांबुज ॥ १ ॥
विक्राळ त्या दाढा भ्यानें पाहावेना । धांवुनी रसना ज्वाळ गिळी ॥ २ ॥
जिव्हा लांब धांवे गोळा करी ज्वाळ । मोटें मुखकमळ त्यांत घाली ॥ ३ ॥
तुका ह्मणे अवघा वोणवा गिळीला । आनंद जाहाला गोपाळांसी ॥ ४ ॥

॥ २६३ ॥

गोपाळ प्रीतीनें कैसे विनविती । विक्राळ श्रीपति होऊं नको ॥ १ ॥
नको रे बा कृष्णा धरूं ऐसें रूप । आह्मां चळकांप सुटलासे ॥ २ ॥
होई बा धाकुटा श्याम चतुर्भुज । बैसोनियां गुज सुखें बोलों ॥ ३ ॥
वोणव्याच्या रागें मिळिशील आह्मां । तुका मेघश्यामा पायां लागे ॥ ४ ॥

॥ २६४ ॥

सांडियेलें रूप विक्राळ भ्यासुर । जालें सकुमार कोडिसवाणें ॥ १ ॥ श्याम चतुर्भुज मुकुट कुंडलें । सुंदर दंडलें नव बाळ ॥ २ ॥ गोपाळ ह्मणती कैसें रे बा कृष्णा । रूप नारायणा धरियेलें ॥ ३ ॥ कैसा वाढलासी विक्राळ जालासी । गटगटां ज्वाळांसी गिळियेलें ॥ ४ ॥ तुका ह्मणे भावें पुसती गोपाळ । अनाथवत्सल ह्मणोनियां ॥ ५ ॥

॥ २६५ ॥

बा रे कृष्णा तुझें मुख कीं कोमळ । कैसे येवढे ज्वाळ ग्रासियेले ॥ १ ॥
बा रे कृष्णा तुझी जिव्हा कीं कोवळी । होईल पोळली नारायणा ॥ २ ॥
बैसें कृष्णा तुझें पाहूं मुखकमळ । असेल पोळलें कोणे ठायीं ॥ ३ ॥
घोंगडिया खालीं घालूनियां तळीं । वरी वनमाळी बैसविती ॥ ४ ॥
तुका ह्मणे भावें आकळिला देव । कृपासिंधुराव त्रैलोक्याचा ॥ ५ ॥

॥ २६६ ॥

एक ह्मणती मुख वासीं नारायणा । पाहों दे वदना डोळेभरी ॥ १ ॥
वासूनियां मुख पाहाती सकळ । अवघे गोपाळ व्योमाकार ॥ २ ॥
ह्मणती गोपाळ वेडे हो हा देव । स्वरूपाचा ठाव न कळे याच्या ॥ ३ ॥
तुका ह्मणे अवघे विठोबाभोंवते । मिळाले नेणते लहान थोर ॥ ४ ॥

॥ २६७ ॥

एक ह्मणती कृष्णा वासिलें त्वां मुख । तेव्हां थोर धाक पडिला आम्हां ॥ १ ॥
गिळों लागलासी अग्नीचे कल्लोळ । आह्मी चळचळां कांपतसों ॥ २ ॥
ज्वाळांबरोबरी गिळशील आह्मां । ऐसें मेघश्यामा भय वाटे ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसे भाग्याचे गोपाळ । फुटकें कपाळ आमुचेंचि ॥ ४ ॥

॥ २६८ ॥

गोपाळांचें कैसें केलें समाधान । देऊनि आलिंगन निवविले ॥ १ ॥
ज्वाळांबरोबरी तुह्मां कां ग्रासीन । अवतार घेणें तुह्मांसाठीं ॥ २ ॥

निर्गुण निर्भय मी सर्वांनिराळा । प्रकृतिवेगळा गुणातीत ॥ ३ ॥ चिन्मय चिद्रूप अवघें चिदाकार । तुका ह्मणे पार नेणे ब्रम्हा ॥ ४ ॥

॥ २६९ ॥

नेणती तयांसी साच भाव दावी हरी । लाज नाहीं नाचे पांवा वाजवी मोहरी ॥ १ ॥ चला रे याच्या पायां लागों आतां । राखिलें जळतां महा आगीपासूनी ॥ २ ॥ कैसी रे कान्होबा एवढी गिळि-येली आगी । न देखों पोळला तुज तोंडीं कोठें अंगीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी कां रे करितां नवल । आमचा सिदोरी खातो त्याचें आलें बळ ॥ ४ ॥

॥ २७० ॥

त्यांनीं धर्णीवरी संग केला हरीसवें । देऊनी आपुलें तोचि देईल तें खावें ॥ १ ॥ न ठेवी आभार प्रेमाचा भुकेला । बहु दिवस संग हाचि निर्धार त्याला ॥ २ ॥ कान्होबा तूं जेवीं घासोघासीं ह्मणती । आरुष गोपाळें त्यांची बहु देवा प्रीति ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां जाऊं आपु-लिया घरा । तोय वांचविलें ऐसें सांगों रे दातारा ॥ ४ ॥

॥ २७१ ॥

गोपाळ ह्मणती कान्होबा या रे कांहीं मागों । आपुलाले आह्मी जीवींची आवडी सांगों । एक ह्मणती उगे रे उगे मागेंचि लागों । निजों नका कोणी घरीं रे आजी अवघेचि जागों ॥ १ ॥ जाणोनी नेणता हरि रे मध्यें उगाचि बैसे । नाइकोनी बोल आइके कोण को-णाचे कैसे । एक एकाच्या संवादा जाणे न मिळेचि ऐसें । पोटींचें होटा आणवी देतो तयांसी तैसें ॥ २ ॥ एक ह्मणती बहु रे आह्मी पीडिलों माया । नेदी दहींभातसिदोरी ताक घालिती पिया । तापलों बळितां गोधनें नाहीं जीवन छाया । आतां मागों पोटभरी रे याच्या लागोनी पायां ॥ ३ ॥ एक ह्मणती अरे तुमचें पोट तें किती । मागों गाई ह्मैसी घोडे रे धन संपत्ति हत्ती । देव गडी कान्हो आमुचा

आह्मां काय विपात । कन्याकुमरें दासी रे बाजावरी सुपती ॥ ४ ॥ एक ह्मणती बेटे हो कोण करी जतन । गाढव तैसेंचि घोडें रे कोण तयाचा मान । लागे भवरोग वाहतां खांदीं चवघे जण । हातीं काठ्या डोया बोडक्या हिंडों मोकळे राण ॥५॥ एक ह्मणती रानीं रे बहु सावजें फार । फाडफाडूं खाती डोळे रे पाय नेतील कर । राखोनि राखे आपणा ऐसा कइचा शूर । बैसोनी राहों घरीं रे कोण करी हे चार ॥ ६ ॥ घरीं बैसलिया बहुतें बहु सांगती काम । रिकामें कोण्यासि नावडे ऐसें आह्मांसी ठावें । चौघांमध्यें बरें दिसेसें तेथें नेमक व्हावें । लपोनी सहज खेळतां भलें गडियां सर्वे ॥ ७ ॥ एक ह्मणती गडी ते भले मिळती मता । केली तयावरी चाली रे बरी आपुली सत्ता । नसावें तें तेथें तैसे रे खेळ हाणिती लाता । रडी एकाएकीं गेलिया गोंधळ उडती लाता ॥ ८ ॥ एक ह्मणती खेळतां उगीं राहती पोरें । ऐसें काय घडों शके रे कोणी लहान थोरें । अवघीं येती रागा रे एका ह्मणतां वरें । संगें वाढे कलह हरावा एकाएकींच खरें ॥ ९ ॥ एक ह्मणती एकला रे तूं जासील कोठें । सांडी मांडी हें वाउगें तुझे बोलचि खोटे । ठायीं राहा उगे ठायींच कां रे सिणसी वाटे । अवघियांची सिदोरी तुझे भरली मोटे ॥ १० ॥ तुका ह्मणे काय काहण्या अरे सांगाल गोष्टी । चाटावे तुमचे बोल रे भुका लागल्या पोटीं । जागा करूं या रे कान्होबा मागों कवळ तांटीं । घाले गडी तुका ढेकर देतो विठ्ठल कंठीं ॥ ११ ॥

॥ २७२ ॥

हुंबरती गाये तयांकडे कान । कैवल्यनिधान देउनी ठाके ॥ १ ॥
गोपाळांची पूजा उच्छिष्ट कवळी । तेणें वनमाळी सुखावला ॥ २ ॥
चोरोनियां खाये दूध दहीं लोणी । भावें चक्रपाणि गोविला तो ॥ ३ ॥
निष्काम तो जाला कामासी लंपट । गोपिकांची वाट पाहात बैसे ॥ ४ ॥

जगत्राणी हृदयी तुळसीएकदळ । भावाचा सकळ विकिला तो ॥५॥ तुका ह्मणे हेंचि चैतन्य सांवळें । व्यापूनी निराळें राहिलेंसे ॥ ६ ॥

॥ २७३ ॥

आचरती कर्में । तेथें काळें धर्माधर्में ॥ १ ॥ खेळे गोवळियांसवें । करिती तें त्यांचें साहावें ॥२॥ यज्ञमुखें घांस । मंत्रपूजेसी उदास ॥३॥ तुका ह्मणे चोरी । योगियांही सवें करी ॥ ४ ॥

॥ २७४ ॥

एकाचिया घाट्या टोके । एका फिके उपचार ॥ १ ॥ ऐसी सवे गोवळिया । भाव तया पढियंता ॥ २ ॥ एकाचें तें उच्छिष्ट खाय । एका जाय ठकवूनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे बहु सोपें । बहु रूपें अनंत ॥४॥

॥ २७५ ॥

अधिकाचा मज कांटाळा । तुह्मां गोपाळां संगती ॥ १ ॥ काय नाहीं तुह्मांपाशीं । सकळांविशीं संपन्न ॥ २ ॥ उद्योगाचा नेघें भार । लागल्या सार पुरतें ॥ ३ ॥ तुका ह्मणे अधीर जिणें । नारायणें न करावें ॥ ४ ॥

॥ २७६ ॥

जालों आतां एके ठायीं । न वंचूं कांहीं एकमेकां ॥१॥ सरलों हें गे देउनि मोट । कटकट काशाची ॥२॥ सोडोनियां गांठीं पाहें । काय आहे यांत तें ॥३॥ तुका ह्मणे जालों निराळा । आतां गोपाळा देऊं बोभा ॥४॥

॥ २७७ ॥

बोळलीचा दोहूं पान्हा । मज कान्हा सांगितला ॥ १ ॥ घ्या जी हें गे क्षीर हातीं । निगुतीनें वाढावें ॥२॥ सांगितलें केलें काम । नव्हे धर्म सत्याचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नवें जुनें । ऐसें कोणें सोसावें ॥ ४ ॥

॥ २७८ ॥

येईल तें घेइन भागा । नव्हे जोगा दुसरिया ॥ १ ॥ आवडी ते

बुद्धी आणा । बहु गुणांसारिखी ॥२॥ मज येती डांगवरी । सर्वे हरी नसलिया ॥३॥ तुका ह्मणे रावया देवा । करीन सेवा सांगितली ॥४॥

॥ २७९ ॥

अंतरली खुटी भेटी । भय धरूनियां पोटीं । ह्मणतां जगजेठी । धांवे करुणाउत्तरीं ॥ १ ॥ बाप बळिया शिरोमणी । उताविळ या वचनीं । पडलिया कानीं । धांवा न करी आळस ॥ २ ॥ बळ दुनी शरणागता । स्वामी वाहों नेदी चिंता । आइतेंचि दाता । पंगतीस बैसवी ॥ ३ ॥ वाहे स्वांदीं पाववी घरा । त्याच्या करी येरझारा । बोबड्या उत्तरा । स्वामी तुकया मानवे ॥ ४ ॥

॥ २८० ॥

तुजसवें येतों हरी । आह्मां लाज नाहीं तरी । उचलिला गिरी । चांग तई वांचलों ॥ १ ॥ मोहा आतां खेळ । गाई गेल्या जाला वेळ । फांकल्या ओढाळ । नाहीं तोंचि आवरा ॥ २ ॥ चांग दैवें यमुनेसी वांचलों वुडतां । निलाजिरीं आह्मी नाहीं भय धाक या अनंता ॥ ३ ॥ खातों आगी माती । आतां पुरे हा सांगाती । भोंवतां भोंवेल । आह्मां वाटतें हें चित्तीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे उरी नाहीं तुज-सवें । शाहाणिया दुरी छंद भोळियां सवें ॥ ५ ॥

॥ २८१ ॥

नको आह्मांसवें गोपाळा । येऊं ओढाळा तुझ्या गाई ॥१॥ कोण धांवे त्यांच्या लागें । मागें मागें येरझारी ॥ २ ॥ न बैसती एके ठायीं । धांवती दाही दाहा वाटां ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं राख मनेरी । मग त्या येरी आह्मी जाणों ॥ ४ ॥

॥ २८२ ॥

मागायास गेलों सिदोरी । तुझ्या मायाघरीं गांजियलों ॥ १ ॥ तुजविणें ते नेदी कोणा । सांगतां खुणा जिवें गेलों ॥ २ ॥ वांयांविण

केली येरझार । आतां पुरे घर तुम्ही माया ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं आह्मां वेगळा । राहें गोपाळा ह्मणउनी ॥ ४ ॥

॥ २८३ ॥

काकुलती येतो हरी । क्षणभरी निवडितां ॥ १ ॥ तुमची मज लागली सवे । ठायींचे नवे नव्हों गडी ॥ २ ॥ आणीक बोलाविती फार । बहु थोर नावडती ॥ ३ ॥ भाविकें त्यांची आवडी मोठी । तुका ह्मणे मिठी घाली जिवें ॥ ४ ॥

## कालियामर्दन.

॥ २८४ ॥

वरता वेंघांनी घातली उडी । कळंबावुहीं यमुनेसी ॥ १ ॥ हरि बुडाला बोंब घाला । घरचीं त्यांला ठावा नाहीं ॥ २ ॥ भवनदीचा न कळे पार । कालिया माजी थोर विखार ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय वाउग्या हाका । हातींचा गमावुनियां थिंका ॥ ४ ॥

॥ २८५ ॥

अवघीं मिळोनि कोल्हाळ केला । आतां होतां ह्मणती गेला ॥ १ ॥ आपलिया रडती भावें । जयासवें जयापरी ॥ २ ॥ चुकलों आह्मी खेळतां खेळ । गेला गोपाळ हातींचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे धांवती वही । न घली उडी आंत कोणी ॥ ४ ॥

॥ २८६ ॥

भ्यालीं जिवा चुकलीं देवा । नाहीं ठावा जवळी तो ॥ १ ॥ आहाकटा करिती हाय । हात डोकें पिटिती पाय ॥ २ ॥ जवळी होतां न कळे आह्मां । गेल्या सीमा नाहीं दुःखा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हा लाघवी मोटा । पाहे खोटा खरा भाव ॥ ४ ॥

॥ २८७ ॥

कालिया नाथूनी आला वरी । पैल हरी दाखविती ॥ १ ॥ दुसरिया भावें न कळे कोणा । होय नव्हेसा संदेह मना ॥ २ ॥ रूपा भिन्न पालट जाला । गोरें सांवळेंसा पैं देखिला ॥ ३ ॥ आश्वासीत आला करें । तुका खरें ह्मणे देव ॥ ४ ॥

॥ २८८ ॥

हरि गोपाळांसवें सकळां । भेटे गळया गळा मेळवूनी ॥ १ ॥ भाविकें त्यांची आवडी मोठी । सांगे गोष्टी जीवींचिया ॥ २ ॥ योगियांच्या ध्याना जो नये । भाकरी त्यांच्या मागोनी खाये ॥ ३ ॥ तुका ह्मणे असे शाहाणियां दुरी । बोबडियां दास हाका मारी ॥४॥

॥ २८९ ॥

धांव कान्होबा गेल्या गाई । न ह्मणे मी कोण ही काई ॥ १ ॥ आपुलियांचें वचन देवा । गोड सेवा करीतसे ॥ २ ॥ मागतां आधीं द्यावा डाव । बळिया मी तो नाहीं भाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐशा सवें । अनुसरावें जीवेंभावें ॥ ४ ॥

॥ २९० ॥

आणीक काय थोडीं । परि तीं फार खोटीं कुडीं ॥ १ ॥ सदा मोकळींच गुरें । होती फजीत तीं पोरें ॥२॥ सदा घालिती हुंबरी । एक एकांचें न करी ॥ ३ ॥ तुका ह्मणे घरीं । माय वेळोवेळां मारी ॥४॥

॥ २९१ ॥

बहुतांचे संगती । बहु पावलों फजिती ॥ १ ॥ बरें केलें नंदबाळें । मागिलांचें तोंड काळें ॥२॥ माझा करितील तंटा । लपती आलिया बोभाटा ॥ ३ ॥ तुका ह्मणे काई । किती ह्मणों बाप आई ॥ ४॥

॥ २९२ ॥

धन्य तें गोधन कांवळी काष्ठिका । मोहरी पांवा निका श्रीद वांकी ॥१॥

धन्य तें गोकुळ धन्य ते गोपाळ । नर नारी सकळ धन्य जाल्या ॥ २ ॥
धन्य ते देवकी असवंती दोहींचें । वसुदेवनंदाचें भाग्य जालें ॥ ३ ॥
धन्य त्या गोपिका सोळा सहस्र बाळा । यादवां सकळां धन्य जालें ॥४॥
धन्य ह्मणे तुका जन्मा तींचि आलीं । हरिरंगीं रंगलीं सर्वभावें ॥ ५ ॥

---

## खेळ इत्यादिकांवरील रूपकें.

### टिपरी.

॥ २९३ ॥

खेळ मांडियेला वाळवंटीं घाई । नाचती वैष्णव भाई रे । क्रोध अभिमान केला पावटणी । एक एका लागतील पायीं रे ॥१॥ नाचती आनंदकल्लोळीं । पवित्र गाणें नामावळी । कळिकाळावरि घातलीसे कास । एक एकाहुनी बळी रे ॥२॥ गोपीचंदनउटी तुळसीच्या माळा । हार मिरवती गळां । टाळ मृदंग घाई पुष्पवरुषाव । अनुपम्य सुखसोहळा रे ॥३॥ लुब्धलीं नादीं लागली समाधी । मूढ जन नर नारी लोकां । पंडित ज्ञानी योगी महानुभाव । एकचि सिद्धसाधकां रे ॥४॥ वर्णाभिमान विसरली याती । एकएकां लोटांगणीं जाती । निर्मळ चित्तें जालीं नवनीतें । पाषाणा पाझर सुटती रे ॥ ५ ॥ होतो जयजयकार गर्जत अंबर । मातले हे वैष्णव वीर रे । तुका ह्मणे सोपी केली पायवाट । उतरावया भवसागर रे ॥ ६ ॥

॥ २९४ ॥

एके घाई खेळतां न पडसी डाई । दुचाळ्यानें ठकसील भाई रे । त्रिगुणांचे फेरी थोर कष्टी होसी । या चौघांची तरी धरीं सोई रे ॥१॥ लोक खेळोनियां निराळाची राहीं । सांडीं या विषयाची घाई रे ।

येणेंचि खेळें बळवंत होसी । ऐसें सत्य जाणें माझ्या भाई रे ॥ २ ॥
सिंपियाचा पोर एक खेळिया नामा । तेणें विठ्ठल बसवंत केला रे ।
आपुल्या संवगडिया सिकवुनी घाई । तेणें सतंतर फड जागविला रे ।
एक घाई खेळतां तो न चुकेचि कोठें । तया संतजन मानवले रे ॥ ३ ॥
ज्ञानदेव मुक्ताबाई वटेश्वर चांगा । सोपान आनंदें खेळती रे ।
कान्हो गोवारी त्यांनीं बसवंत केला । आपण भोंवतीं नाचती रे ।
सकळिकां मिळोनी एकीच घाई । त्याच्या ब्रह्मादिक लागती पायीं रे ४
रामा बसवंत कबिर खेळिया । जोडा बरवा मिळाला रे ।
यांचा संवगडियां एकचि घाई । तेथें नाद बरवा उमटला रे ।
ब्रह्मादिक सुरवर मिळोनियां त्यांनीं । तांही खेळ निवडिला रे ॥५॥
ब्राह्मणाचा पोर खेळिया एका भला । तेणें जन खेळकर केला रे ।
जनार्दन बसवंत करूनियां । तेणें वैष्णवांचा मेळ मिळविला रे ।
एकचि घाई खेळतां खेळतां । आपणचि बसवंत जाला रे ॥ ६ ॥
आणीक खेळिये होउनियां गेले । वर्णावया वाचा मज नाहीं रे ।
तुका ह्मणे गडे हो हुशारूनी खेळा । पुढिलांची धरूनियां सोई रे ।
एकचि घाई खेळतां जो चुकला । तो पडेल संसारडाई रे ॥ ७ ॥

॥ २९५ ॥

बाराही सोळा गडियांचा मेळा । सतरावा बसवंत खेळिया रे ।
अतिस पद राखों जेणें टिपरिया घाई । अनुहातें वायें मांदळा रे ॥१॥
नाचत पंढरिये जाऊं रे खेळिया । विठ्ठलरखुमाई पाहूं रे ॥ २ ॥
सा चहूं वेगळा अठराही निराळा । गाऊं वाजवूं एक चाळा रे ।
विसरती पक्षी चारा घेणें पाणी । तारुण्य देहभाव बाळा रे ॥ ३ ॥
आनंद तेथींचा मुकियासी वाचा । बहिरे ऐकती कानीं रे ।
आंधळ्यांसी डोळे पांगळांसी पाय । तुका ह्मणे वृद्ध होती तरणे रे ॥ ४ ॥

॥ २९६ ॥

दोन्ही टिपरीं एकचि नाद । सगुण निर्गुण नाहीं भेद रे ।

कुसरी अंगें मोडितील परी । मेळविती एका छंदें रे ॥ १ ॥ कांहींच न बजे वांयां रे । खेळिया एकचि बसवंत अवधियां रे । सम विषम तेथें होऊंच नेदी । जाणऊनी आगळिया रे ॥ २ ॥ संत महंत सिद्ध खेळतील घाई । तेच सांभाळी माझ्या भाई रे । हात हात राखोन हाणिती टिपऱ्या । टिपरें मिळोनि जाय त्याची सोई रे ॥३॥ विटाळाचें अवघें जाईल वांयां । काय ते शृंगारूनी काया रे । निवडूनी बाहेर काढिती निराळा । जो न मिळे संतांचिया घाई रे ॥ ४॥ प्रकाराचें काज नाहीं सोडीं लाज । नि:शंक होऊनियां खेळें रे । नेणतीं नेणतींच एकें पावलीं मान । विठ्ठल नामाचिया बळें रे ॥ ५ ॥ रोमांच गुढिया डोलविती अंगें । भावबळें खेळविती सोंगें रे । तुका ह्मणे कंठ सद्गदित दाटे । या विठोबाच्या अंगसंगें रे ॥ ६ ॥

॥ २९७ ॥

या रे गडे हो धरूं घाई जाणतां ही नेणतां । नाम गाऊं टाळी वाहूं आपुलिया हिता ॥ १ ॥ फावलें तें घ्या रे आतां प्रेमदाता पांडुरंग । आजी दिवस सोनियाचा वोडवला रंग ॥ २ ॥ हिंडती रानोरान भुजंगांत कांट्यावन । सुख तयांहून आह्मां गातां नाचतां रे॥ ३॥तुका ह्मणे ब्रह्मादिकां सांवळें दुर्लभ सुखा । आजी येथें आलें फुका नाम मुखा कीर्तनीं४

॥ २९८ ॥

भीमातीरीं एक वसलें नगर । त्याचें नांव पंढरपुर रे ॥ तेथील मोकासी चार भुजा त्यासी । बाइला सोळा हजार रे ॥ १ ॥ नाचत जाऊं त्याच्या गांवा रे खेळिया । सुख देईल विसावा रे ॥ पुढें गेले ते निधाई जाले । वाणितील त्याची सीमा रे ॥ २ ॥ बळिया आगळा पाळी लोकपाळां । रीघ नाहीं कळिकाळा रे ॥ पुंडलीक पाटील केली कुळवाडी । तो जाला भवदु:खा वेगळा रे ॥ ३ ॥ संतसज्जनीं मांडिलीं दुकानें । जया जें पाहिजे तें आहे रे ॥ भुक्तिमुक्ति फुकाच साठीं । कोणी तयाकडे न पाहे रे ॥ ४ ॥ दोन्हीच हाट

भरले घनदाट । अपार मिळाले वारकरी रे ॥ न वजों ह्मणती आह्मी वैकुंठा । जिहीं देखिली पंढरी रे ॥ ५ ॥ बहुत दिस होती मज आस । आजी घडलें सायासीं रे ॥ तुका ह्मणे होय तुमचेनी पुण्यें । भेटी तया पायांसी रे ॥ ६ ॥

॥ २९९ ॥

पंढरी चोहटा मांडियेला खेळ । वैष्णव मिळोनी सकळ रे । टाळ टिपरी मांदळे एक नाद रे । जाला बसंवत देवकीचा बाळ रे ॥ १ ॥ चला तें कवतुक भाई रे । पाहों डोळां कामीं गुंतलेती काई रे । भाग्यवंत कोणी गेले सांगातीं । ऐसें सुख त्रिभुवनीं नाहीं रे ॥ २ ॥ आनंदाचे वाद सुखाचे संवाद । एक एका दाखविती छंद रे । साही अठरा चारी घालूनियां घाई । नाचती फेरी टाळशुद्ध रे ॥३॥ भक्तीचीं भूषणें मुद्रा आभरणें । शोभती चंदनाच्या उट्या रे । सत्व सुंदर कास घालूनि कुसरी । गर्जती नाम बोभाटीं रे ॥ ४ ॥ हरि हर ब्रह्मा तीर्थांसहित भीमा । देव कोटी तेहतीस रे । विस्मित होऊनि ठाकले सकळ जन । अमरावती केली ओस रे ॥ ५ ॥ वाणितील थोरी वैकुंठींची परी । न पवे पंढरीची सरी रे । तुकयाचा दास ह्मणे नका आळस करूं । सांगतों नरनारींस रे ॥ ६ ॥

विटूदांडू ॥ ३०० ॥

सारा विटूदांडू । आणीक कांहीं खेळ मांडूं ॥१॥ बहु अंगा आले डाव । स्थिर नाहीं कोठें पाव॥२॥कोली हाणे टोला । झेली तेणें तो गोविला॥३॥ एकमेकां हाका मारी । सेल जाळी एक धरी ॥४॥ गाजी आलें नांव । फेर न चुकेचि धांव॥५॥पुढें एक पाटी । एक एकें दोघां आटी॥६॥एका सोस पोटीं । एक धांवे हात पिटी॥७॥तुका ह्मणे आतां।खेळ मोडावा परता॥८॥

मृदंग पाख्या ॥ ३०१ ॥

मागें पुढें पाहें सांभाळूनी दोनी ठाय । चुकावूनी जाय गडी

राखे गडियांसी ॥ १ ॥ मुरडे दंडा दोहीं तोंडें गडियां सावध करी । बेठबिचासंगें तया हाल तुजवरी ॥ २ ॥ गडियां गडी वांटुनी देई । ज्याचा सोडी तेचि ठायीं ॥३॥ अगळ्या बळें करील काय । तुज देणें लागे डोय ॥ ४ ॥ नवां घरीं पाउला करीं । सांपडे तो वेठें धरीं ॥ ५ ॥ जिंकोनी डाव करीं । टाहो सत्ता आणिकांवरी ॥ ६ ॥ सांपडोनी डाई बहु । काळ गुंतलासी ॥ ७ । बळिया गडी फळी । फोडी न धरितां त्यांसी ॥ ८ ॥ चुकांही जो खाय मिळोनी अंगीं जाय । गुंतलासी काय तुका ह्मणे अझूनी ॥ ९ ॥

॥ ३०२ ॥

पाहा रे तमासा तुमचा येथें नव्हे लाग । देईन तो भाग आलियाचा बाहेरी ॥ १ ॥ जागा रे गोपाळांनो ठायीं ठायीं जागा । चाहुलीनें भागा दूर मजपासूनी ॥ २ ॥ न रिघतां ठाव आह्मां ठावा पाळतियां । भयातीत वांयां तेथें काय चांचपा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हातां चढे जीवाचिये साटीं । मिटक्या देतां गोड मग लागतें शेवटीं ॥ ४ ॥

॥ ३०३ ॥

हाई घालूनियां पोरें । त्यांचीं गुरें चुकाविलीं ॥ १ ॥ खेळ खेळतां फोडिल्या डोया । आपण होय निराळा॥२॥मारिती माया घेती जीवा । नाहीं कींव अन्यायें ॥३॥ तुका कान्होबा मागें । तया अंगें कळों आलें ॥ ४ ॥

सुतुतू ॥ ३०४ ॥

जीवशिवाच्या मांडुनि टाला । अहं सोहं दोन्ही भेडती भला॥१॥ चाली सुतुतू फिरोनि पाही आपुणासी । पाही पळिया तो मागिला तुटी पुढिलासी ॥२॥ खेळिया तो हाल सांभाळी । धुम घाली तो पडे पाताळीं॥३॥ बळिया गांव्या तोचि खेळे । दम पुरे तो वेळोवेळां खेळे ॥ ४ ॥ हातीं पडे तोचि ढांग । दम पुरे तो खेळिया चांग॥५॥मागें पुढें पाहे तो जिंके । हातीं

पडे तोचि आधार फिके ॥ ६ ॥ आपल्या बळें खेळे रे भाई । गडियाची सांडोनी सोई॥ ७॥तुका ह्मणे मी खेळिया नव्हें जिकडे पडे त्याचि सवें॥८॥

हाल ॥ ३०५ ॥

यमुने तटीं मांडिला खेळ । ह्मणे गोपाळ गडियांसी ॥१॥ हाल महाहाल मांडा । वाउगी सांडा मोकळी ॥२॥ नांवें ठेवूनि वांटा गडी । न वजे रडी मग कोणी ॥३॥ तुका ह्मणे कान्हो तिळतांदळया । जिंके तो करी आपुला खेळ्या ॥४॥

॥ ३०६ ॥

बळें डाई न पडे हरी । बुद्धि करी शाहाणा तो ॥ १ ॥ मोकळें देवा खेळों द्यावें । सम भावें सांपडावया ॥ २ ॥ येतो जातो वेळोवेळां । न कळे कळा सांपडती ॥३॥ तुका ह्मणे धरा ठायींच्या ठायीं । मिठी जीवीं पायीं घालूनियां ॥४॥

हुंबरी ॥ ३०७ ॥

तुशीं कोण घाली हुंबरी । साही पांगल्या अठरा चारी ॥ १ ॥ सहस्र मुखावरी हरी । शेष शिणविलें ॥२॥ चेंडुवासवें घातली उडी । नाथिला काळिया देऊनी बुडी ॥३॥ अशुद्ध पीतां करुणा नाहीं । तुवां मावशी ही मारियेली ॥४॥ रावणाचें घर बुडविलें सारें । त्याचीं रांडापोरें मारियेलीं ॥५॥ जाणों तो ठावा आहेसी आह्मां । तुवां आपुला मामा मारियेला ॥६॥ याशीं खेळतां नाश थोरू । तुकया स्वामी सारंगधरू ॥७॥

हमामा ॥ ३०८ ॥

मशीं पोरा घे रे वार । तुझें बुजीन खालील द्वार ॥ १ ॥ पोरा हमामा रे हमामा रे ॥ २ ॥ मशीं हमामा तूं घालीं । पोरा बरी सांभाळीं खालीं ॥ ३ ॥ तरीच मशीं बोल । पोरा जिव्हाळ्याची ओल ॥ ४ ॥ मशीं घेतां भास । जीवा मीतूंपणा नाश ॥५॥ मज सवें

सारा। पण आरूं नेदी घरा ॥ ६ ॥ आमुचिये रंगीं। दुजें तगेना ये संगीं ॥ ७ ॥ तुक्यासवें भास। हरी जीवा करी नास ॥ ८ ॥

॥ ३०९ ॥

हमामा रे पोरा हमामा रे। हमामा घालितां ठकलें पोर। करी येरझार चौऱ्याशीची ॥ १ ॥ पहिले पहारा रंगासी आलें। सोहं सोहं हें वार घेतलें। देखोनि गडी तें विसरलें। डाई पडिलें आपणचि ॥२॥ दुसऱ्या पहारा मद्दा आवंडें। हमामा घाली छंदछंदें। दिस वाढे तों गोड वाटे। परि पुढें नेणें पोर काय होतें तें ॥ ३ ॥ तिसऱ्या पहारा घेतला वार। अहंपणें पाय न राहे स्थिर। सोस सोस करितां डाई पडसी। सत्य जाणें हा निर्धार ॥४॥ चौथ्या पहारा हमामा। घालिसी कांपविसी हातपाय। मुऱ्यापाटिलाचा पोर यम। त्याचे पडसील डाई ॥५॥ हमामा घालितां भ्याला तुका। त्यानें सांडिली गड्याची सोई। यादवांचा मूळ एक विठोबा। त्यासवें चारितो गाई ॥ ६ ॥

फुगड्या ॥ ३१० ॥

फुगडी फू फुगडी घालितां उघडी राहे। लाज सांडोनी एक एकी पाहे ॥१॥ फुगडी गे अवघें मोडी गे। तरीच गोडी गे संसार तोडी गे ॥ २ ॥ मागें जें शिकली होतीस पोटीं। तेंचि विचारूनी आतां उच्चारी ओठीं ॥ ३ ॥ त्रिगुणांची वेणी तुझे उडते पाठीं। सावरूनी धरी घाली मूळबंदीं गांठी ॥ ४ ॥ आगळें पाउल जिंके एकाएक। पावसी मान हे मानवती तिन्ही लोक ॥ ५ ॥ तुका ह्मणे तुजमजमध्यें एक भाव। सम तुकें वार घेऊं पावों उंच ठाव ॥ ६ ॥

॥ ३११ ॥

फुगडी फू सवती माझे तूं। हागुनी भरलें धू तुझ्या ढुंगा तोंडावरी थू ॥ १ ॥ फुगडी घेतां आली हरी। ऊठ जावो जगनोवरी ॥ २ ॥ हात पाय बेंबळ जाती। ढुंगण घोळितां लागे माती ॥ ३ ॥ साव

पांच आणल्या हरी । बांचूनी फाय तगसी पोरी ॥ ४ ॥ सरला यम पांगळे पाय । अझुनी बरी घोळिसी काय ॥ ५ ॥ तुका ह्मणे अझुन तरी । सांगितलें तें गधडी करी ॥ ६ ॥

लखोटा ॥ ३१२ ॥

लये लये लखोटा । मूळबंदी कासोटा । भावा केलें सांहें । आतां माझें पाहें ॥ १ ॥ हातोहातीं गुंतली । जीवपणा मुकली । धीर माझा निका । सांडीं बोल फिका ॥ २ ॥ अंगीकारी हरि । नको पडों फेरी लाज धरीं भांडे । जग झोडी रांडे ॥ ३ ॥ बैस भावासाठीं । ऐक माझ्या गोष्टी । केला सांडीं गोहो । येथें धरीं मोहो ॥४॥ पाठमोरा डोल । आवरी तें बोल । पांगलोस वाळा । पुढें अवकळा ॥५॥ आतां उभी ठायीं । उभाउभीं पाहीं । नको होऊं डुकरी । पुढें गाढव कुतरीं ॥ ६ ॥ नाम केलें खरें । आपुलें म्यां बरें । तुका ह्मणे येरी । पांगविल्या पोरी ॥ ७ ॥

कोडें. ॥ ३१३ ॥

कोडें रे कोडें ऐका हें कोडें । उगवूनि फार राहे गुंतोनियां थोडें ॥ १ ॥ पुसतसे सांगा मी हें माझें ऐसें काई । रुसूं नका नुगवे तो झवे आपुली आई ॥ २ ॥ सांगतों हें मूळ कांहीं न धरावी खंती । जालें जीवो मेलें मरो प्रारब्धा हातीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे अभिमान सांडावा सकळीं । नये अंगावरी वांयां येऊं देऊं कळी ॥ ४ ॥

॥ ३१४ ॥

नुगवे तें उगवून सांगितलें भाई । घालूनियां ताळा आतां शुद्ध राखा घाई ॥१॥ आतां कांहीं नाहीं राहिलें । म्यां आपणा आपण पाहिलें ॥२॥ कमाईस मोल येथें नका रीस मानूं । निवडूं नये मज कोणा येथें वानूं॥३॥ तुका ह्मणे पदोपदीं कान्हो वनमाळी । जयेजत मग खेवटिला एक वेळीं ४

आडसण दळण ॥ ३१५ ॥

शुद्धीचें सारोनी भरियेली पाळी । भरडोनी वोंगळी नाम केलें ॥१॥

आखसोनी शुद्ध करीं वो साजणी। सिद्ध कां पापिणी नासियेलें ॥२॥
सुपीं तोंचि पाहें धड उगटिलें। नव्हतां नासिलें जगझोडी ॥३॥
सुपीं तोंचि आहे तुज तें आधीन। दळिल्या जेवण जैसें तैसें ॥४॥
सुपीं तोंचि संग घेई धडफुडी। एकसा गघडी नास केला ॥५॥
दळितां आवळे तुज कां न कळे। काय गेले होळे कान तुझे ॥ ६ ॥
सुपीं तोंचि वोज न करितां सायास। पडसी सांदीस तुका ह्मणे ॥७॥

दळण ॥ ३१६ ॥

शुद्ध दळणाचें सुख सांगों कांई। मानवित सईबाई तुज ॥ १ ॥
शुद्ध तें वळण लवकरी पावे। हालवितां निवे अष्टांग तें ॥ २ ॥
शुद्ध हें जेवितां तन निवे मन। अल्प त्या इंधन बुडा लागे ॥ ३ ॥
शुद्ध त्याचा पाक सुचित चांगला। अविट तयाला नाश नाहीं ॥४॥
तुका ह्मणे शुद्ध आवडे सकळां। भ्रतार वेगळा न करी जीवें ॥ ५ ॥

कांडण ॥ ३१७ ॥

सिद्ध करूनियां ठेविलें कांडण। मज सांगातीण शुद्ध बुद्धि गे ॥ १ ॥
आठव हा धरीं मज जागें करीं। मागिले पाहारीं सेवटींचा गे ॥२॥
सम तुकें घाव घालीं वो साजणी। मी तुज मिळणी जंव मिळें ॥३॥
एक करी पाखडी दुसरी निवडी। नि:शेष तिसडी ओज करी ॥४॥
सरलें कांडण पाकसिद्धि करी। मेळवण क्षिरीसाकरेचें ॥ ५ ॥ उद्धव
अक्रूर बंधु दोघेजण। बाप नारायण जेवणार ॥ ६ ॥ तुका ह्मणे मज
माहेरीं आवडी। ह्मणोनी तांतडी मूळ केलें ॥ ७ ॥

॥ ३१८ ॥

सावडीं कांडण ओवी नारायण। निवडे आपण भूस सार ॥१॥ मुसळ
आधारीं आवरूनी धरीं। सांवरोनी थिरीं घाव घालीं ॥२॥ वाजती कां-
कणें अनुहात गजरें। छंद माहियेरे गाऊं गीति ॥ ३ ॥ कांडितां कांडण
नव्हे भाग शीण। तुजमजपण निवडे तों ॥ ४ ॥ तुका ह्मणे रूप उमटे
आरिसा। पाक त्या सारिसा शुद्ध जाला ॥ ५ ॥

डांका ॥ ३१९ ॥

चौक भरियेला आसनीं पाचारिली कुळस्वामिनी । वैकुंठवासिनि ये धांवोनी झडकरी ॥ १ ॥ रंगा येई वो विठाई सांवळिये डोळसे । तुझें श्रीमुख साजिरें तें मी केधवां देखेन ॥ २ ॥ रजतमधुपारती । पंचप्राणांची आरती । अवघी सारोनी आइती । ये धांवती झडकरी ॥३॥ मन मारोनियां मेंढा । आशा मनसा तृष्णा सुटी । भक्तिभाव नैवेद्य ताटीं । भरोनि केला हाकारा ॥४॥ डांका अनुहात गजरे । येऊनि अंगासी संचरे । आपुला घेउनि पुरस्कार । आरोग्य करीं तुकयासी ॥५॥

॥ ३२० ॥

साच माझा देव्हारा । भाक ठेवा भाव खरा । त्रिगुणांचा फुलवरा । आणा विनति सांगतों ॥ १ ॥ माझें दैवत हें रंगीं । नाचे वैष्णवांच्या संगीं । भरलें मग अंगीं । निवाड करी दोहींचा ॥२॥ तुझें आहे तुजपासीं । परि तूं जागा चुकलासी । चिवडूनियां नासी । तुझ्या घरिच्यांनीं केली ॥३॥ आतां न पडे ठावें । यांचूनियां माझ्या देवें । अंधकार व्हावें । नासु ठाव शोधावा ॥४॥ आंधळ्यासी डोळे । देते पांगुळासी पाय । वांजा पुत्र फळे । नवस पुरविते विठाई ॥ ५ ॥ उगविलीं कोडीं । मार्गे कितेकांचीं बापुडीं । तुका ह्मणे घडी । न लगे नवस द्या आधीं ॥६॥

॥ ३२१ ॥

विनति घातली अवधारीं । मज देई वो अभय करीं । पीडिलों खेचरीं । आणीक वारी नांवांची ॥ १ ॥ रंगा येई वो एकला रंग वोडवला । हरिनाम उठिला गजर केला हाकारा ॥२॥ देवांचे दैवतें । तुज नमिलें आदिनाथें । ये वो कृपावंते । भोगा माझ्या धांवत ॥ ३ ॥ न लवीं आतां वेळ । आइत सारिली सकळ । तुका ह्मणे कुळ । आमुचिये दैवते ॥ ४ ॥

॥ ३२२ ॥

माझा देव्हारा साचा । नाहीं आणीक कोणाचा । त्रिभुवनीं याचा । ठसा न लगे पुसावें ॥ १ ॥ या रे लोटांगणीं । कांहीं करा विनवणी । करील झाडणी । भूत काढी संसार ॥ २ ॥ पडिले विषयांचे गोंधळीं ।

ते त्रिगुण आकळी । हरिनाम आरोळी । कानीं पडतां ते उठी ॥ ३ ॥ घेतला अहंकारें । काम क्रोध या मत्सरें । पळती प्रेमभरें । अवघे ठाव सांडूनी ॥ ४ ॥ घेतलासे पुरा । माया ममता आसरा । अवघ्या एक सरा । पळती रंग देखोनी ॥ ५ ॥ तुका ह्मणे धावा भाव । फिटेल मनींचा संदेह । आणीक न लगे ठाव । कांहीं कोठें हिंडावे ॥ ६ ॥

॥ ३२३ ॥

पुढें येते देवी । तिची जती चालों धावी । मागील झाडावी । झाडा मान आसही ॥ १ ॥ एकवीरा आली आंगा । आतां निवारील रोगा । माझ्या भक्तापाशीं सांगा । पूजा भावें करावी ॥ २ ॥ मेंढा मारावा लोवाळ । पूजा पावली सकळ । तुह्मीं केलें बळ । मग मी ठायीं न पडें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मुळीं । लागली ते आली कुळीं । वंदुनी सकळीं । जीवेंभावें ओवाळा ॥ ४ ॥

॥ ३२४ ॥

अवघ्या ज्येष्ठा देवी कोण पूजनाचा ठाव । धरितांचि भाव कोठें नाहींसें आलें ॥ १ ॥ दिसे सारिखें सारिखें । परि तें कारणीं पारिखें । तळीं गेलें देखें । वरी टोले न साहाती ॥ २ ॥ पट एका शिरीं । यथाविधीनें त्या येरी । बसकोळ्या घागरी डेरे रांझण गाडग्यां ॥ ३ ॥ तुका ह्मणे माना । येथें कोणी रुसावें ना । आपुलाल्या स्थानां । जेथें त्याचि शोभल्या ॥ ४ ॥

॥ ३२५ ॥

खेचर खहतर । काळ कांपती असुर । नांदे भीमातीर । पंढरपुरपाटणीं ॥ १ ॥ आतां करी कां रे हाकारा । सहस्रनामें एकसरा । दवडिते खेचरा । अंगसंगें वरूनी ॥ २ ॥ सीते आली झडपणी । राहाणें वासुगीच्या वनीं । पावली जननी । झोंटि मोकळिया केशी ॥ ३ ॥ लाविलें कावरें । प्रल्हादा हैसासुरें । आली एकसरें । । दांत खात रंगासी ॥ ४ ॥ वसुदेवाचीं बाळें । सात खावलीं ज्या काळें । आली भोगवेळे । तया कारणें तेथें ॥ ५ ॥ पांडवें बापुडीं । बाज केलीं फिरती वेडीं । धांवोनियां काढी । अंगसंगें ब्रह्मविळीं ॥ ६ ॥ नामाचें चिंतन । तेथें धांवते आपण ।

न विचारितां हीण । भाव देखे जयाचा ॥ ७ ॥ कुळींची कुळदेवता । तुका ह्मणे आह्मां माता । काय भय भूतां । काळ यमदूतांचें ॥ ८ ॥

॥ ३२६ ॥

देवी देव जाला भोग सरला यावरी । सांगाया दुसरी ऐसी नाहीं उरली ॥ १ ॥ हरिनाम देवनाम तुह्मी गाऊनियां जागा । पेंठवणी मागा नका ठेवूं लिगाड ॥ २ ॥ शेवटीं सुताळी बरवी वाजवावी डांक । ताळा घाली एक सरलियाचे शेवटीं ॥ ३ ॥ गुंडाळा देव्हारा मान देती मानकरी । तुका ह्मणे बरीं आजी कोडीं उगविलीं ॥ ४ ॥

गोंधळ ॥ ३२७ ॥

राजस सुंदर बाळा । पाहों आलिया सकळा वो ॥ बिंबीं बिंबोनि ठेली । माझी परब्रह्म वेल्हाळा वो ॥ कोटि रविशशि माझी । दरब्रह्म वेल्हाळा वो ॥१॥ राजस विठाबाई । माझें ध्यान तुझें पायीं वो ॥ त्यजूनियां चौर्‍यांसी । लावी आपुलिये सोई वो ॥२॥ सकुमार साजिरी । कैसीं पाउलें गोजिरीं वो ॥ कंठीं तुळसीमाळा । उभी भीवरेच्या तिरीं वो ॥ दंत हिरया ज्योति । शंखचक्र मिरवे करीं वो ॥ ३ ॥ निर्गुण निराकार । वेदां न कळेचि आकार वो ॥ शेषादिक श्रमले । श्रुती न कळे तुझा पार वो ॥ उभारोनी बाहे । भक्तां देत अभयकर वो ॥४॥ येऊनी पंढरपुरा । अवतरली सारंगधरा वो ॥ देखोनी भक्ति भाव । वोरसली अमृतधारा वो ॥ देऊनी प्रेमपान्हा । तुकया स्वामीनें ।किंकरा वो ॥ ५ ॥

॥ ३२८ ॥

सुदिन सुवेळ । तुझा मांडिला गोंधळ वो ॥ पंच प्राण दिवटे । दोनी नेत्रांचे हिलाल वो ॥ १ ॥ पंढरपुरनिवासे । तुझे रंगीं नाचत असें वो ॥ नवस पुरवीं माझा । मनींची जाणोनियां इच्छा वो ॥ २ ॥ मांडिला देव्हारा । तुझा त्रिभुवना माझारी वो ॥ चौक साधियेला । नाभीकळस ठेविला वरी वो ॥ ३ ॥ बैसली देवता । पुढें वैष्णवांचें गाणें वो ॥ उद्गारें गर्जती । कंठीं तुळसीचीं भूषणें वो ॥ ४ ॥

स्यानंदाचे ताटीं । धूप दीप पंचारती वो ॥ ओवाळिली माता । विठाबाई पंचमूर्ती वो ॥ ५ ॥ तुझें तुज पावलें । माझा नवस पुरवीं आतां वो ॥ तुका ह्मणे राखें । आपुलिया शरणागता वो ॥ ६ ॥

॥ ३२९ ॥

ऐक बाई तुज वो कांहीं सांगतें शकुन । निजलिया भुग होसी आगें ह्मणऊन ॥ १ ॥ मान्य माझें केलें सांगतें एका बोलें । न येतां हे भलें कळों कोणा लोकांसी ॥ २ ॥ सांगतें गुण जीवींची खुण एक माझी मात । बैस एका भावें माझे हातीं दे वो हात ॥ ३ ॥ बरवा घरचार तुज सांपडला ठाव । फळ नाहीं पोटीं येथें दिसे खोटा भाव ॥ ४ ॥ आहे तुझे हातीं एका नवसाचें फळ । भावा करीं साह्य बहु अठरांच्या वळें ॥ ५ ॥ करीं लागपाठ चित्त वित्त नको पाहों । अवई तो चुडा तुज भोगईल ना हो ॥ ६ ॥ कुळींची हे मुळी तुझे लागलीसे देवी । पडिला विसर नेदी फळ नाहीं ठावी ॥ ७ ॥ तुका ह्मणे नांद सुखें धरी आठवण । माझ्या यंती कोणी त्यांचा राख बहु मान ॥ ८ ॥

वाघा ॥ ३३० ॥

अनंत जुगाचा देव्हारा । निजबोधांचा घुमारा । अवचिता भरला वारा । या मल्लारी देवाचा ॥ १ ॥ शुद्धसत्वाचा कवडा मोठा । बोधबिरडें बांधला गांठा । गळां वैराग्याचा पट्टा । वाटा दावूं या भक्तीच्या ॥ २ ॥ हृदय कोटंबा सांगातें । घोळ वाजवूं अनुहातें । ज्ञानभंडाराचें पोतें । रितें नव्हे कल्पांतीं ॥ ३ ॥ लक्ष चौऱ्याशीं घरें चारी । या जन्माची केली वारी । प्रसन्न जाला देव मल्लारी । सोहंभावीं राहिलों ॥ ४ ॥ या देवाचें भरतां वारें । अंगीं प्रेमाचें फेंफरें । गुरूगुरू करी वेडे चारें । पाहा तुकें भुंकविलें ॥ ५ ॥

सौऱ्या ॥ ३३१ ॥

बेसन गेलें निष्काम आलें नर नव्हे नारी । आपल्या तुटी पारख्या भेटी सौरियांचे फेरी ॥ १ ॥ त्याचा वेध लागला छंद हरि गोविंद

वेळोवेळां । आपुलेमार्गें हांसत रागें सावळें घालिती गळां ॥ २ ॥ जन बेवा भीर्ते तोंडा आमुच्या भांडपणा । कर कटीं भीमा तटीं पंढरीचा राणा ॥ ३ ॥ वेगळ्या याति पडिलों खंतीं अवघ्या एका भावें । टाकियेली चाड देहभावें जीवें शिवें ॥ ४ ॥ सकळांमधीं आगळी बुद्धि तिची करूं सेवा । वाय तुंबामूढासवें भक्ती नाचों भावा ॥ ५ ॥ ह्मणे तुका टाक रूंका नाचों निर्लज्जा । वहु जालें सुख काम चुकलों या काजा ॥ ६ ॥

॥ ३३२ ॥

आणिकां उपदेशूं नेणे नाचों आपण । मुंढा वांयां मारगेली वांयां हांसे जन ॥ १ ॥ तैसा नव्हे चाळा आवरीं मन डोळा । पुढिलांच्या कळा कवतुक जाणोनी ॥ २ ॥ बाहिरल्या वेषें आंत जसें तसें । ह्माकलें तों बरें पोट भरे तेणें मिसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे केला तरी करीं शुद्ध भाव । नाहीं तरी जासी वांयां हा ना तोसा ठाव ॥ ४ ॥

॥ ३३३ ॥

टाक रूका चाल रांडे कां गे केली गोवी । पुसोनियां आलें ठाव ह्मणोनी देतें सोवी ॥१॥ आतां येणें छंदें नाचों विनोदें । नाहीं या गोविंदें माझें मजसी केलें ॥२॥ कोरडे ते बोल कां गे वेचितेसी वांयां । वर्ते करूनी दावीं तुझ्या मुळींचिया ठाया ॥ ३ ॥ याजसाठीं म्यां दोर धरियेला हातीं । तुका ह्मणे तुह्मा गांठी सोडायाची खंती ॥४॥

॥ ३३४ ॥

मोकळी गुंते रिती कुंथे नाहीं भार दावें । घेडवाडा बैसली खांडा घेतली आपुल्या भावें ॥ १ ॥ ऐका वाई लाज नाहीं आणिकां त्या गरतीची । समाधानीं उंच स्थानीं जाणे सेवा पतीची ॥ २ ॥ न बोलतां करीं चिंता न मारितां पळे । दादला सेजे नावडे निजे जगझोडीचे चाळे ॥ ३ ॥ देखत आंध बहिर कानीं बोल बोलतां मुकें । तुका ह्मणे पतन सोयरीं ऐसीं जालीं एकें ॥ ४ ॥

॥ ३३५ ॥

आलें चला काजळ घाला तेल फणी करा । दिवाणदारीं बैसले पारीं नाचों फेर धरा ॥१॥ या साहेबांचें जालें देणें वेळोवेळां न लगे येणें। आतां हाटीं काशासाठीं हिंडों पाटी दुकानें ॥२॥ अवघ्या जणी मुंढा घणी नाचो एकें घाई। सरसावलें सुख कैसा चाळा एकेठायीं ॥३॥ तुका ह्मणे बोळगों एका तोड चिंता माया । देऊं उद्गार आतां जाऊं मुळींचिया ठाया ॥ ४ ॥

॥ ३३६ ॥

सौरी सुर जालें दूर डोर घेतला हातीं । माया मोह सांडवलें तीही लोकीं जालें सरती ॥१॥ चाल विठाबाई अवघी पांज देई । न धरीं गुज कांहीं वाळवंटीं सांपडतां ॥ २ ॥ हिंडोनि चौऱ्याशी घरें आलें तुझ्या दारा । एक्या रुक्यासाठीं आंचवलें संसारा ॥३॥ लाज मेली शंका गेली नाचों महाद्वारीं। भ्रांति सावलें फिटोनि गेलें आतां कैंची उरी ॥ ४ ॥ जालें भांडी जगा सांडी नाहीं भीड चाड । घालीन चरणीं मिठी पुरवीन जीवींचें तें कोड ॥ ५ ॥ तुका ह्मणे रुका करी संसारतुटी । आतां तुह्मां आह्मां कैसी जाली जीवें साटी ॥ ६ ॥

॥ ३३७ ॥

सम सपाट वेसनकाट निःसंग झालें सौरी । कुडपीयेला देश आतां येऊं नेदीं दुसरी ॥ १ ॥ गाऊं रघुरामा हेंचि उरलें आह्मां । नाहीं जीवसमा वित्तगोतासहित ॥ २ ॥ ठाव झाला रिता झाकूनि काय आतां । कोणासवें लाज कोण दुजा पाहतां ॥ ३ ॥ सौरीयांचा संग आह्मां दुरावलें जग । भिन्न जालें सुख भाव पालटला रंग ॥ ४ ॥ लाज भय ह्मणी नाहीं तजियेलीं दोन्ही । फिराविला वेष नव्हों कोणाचीच कोणी ॥ ५ ॥ तुका ह्मणे हा आह्मां वेष दिला जेणें। जना प्रचित सवें असों एकपणें ॥ ६ ॥

॥ ३३८ ॥

नव्हे नरनारी संवसारीं अंतरलों । निर्लेज्ज निष्काम जना वेगळेचि ठेलों ॥ १ ॥ चाल रघुरामा ने आपुल्या गांवा । तुजविण आह्मां कोण सोयरा सांगाती ॥ २ ॥ जनवाद लोकनिंद्य पिशुनाचे चेरे । साहूं तुजसाठीं अंतरलीं सहोदरें ॥ ३ ॥ बहुतां पाठीं निरोप ह्मटीं पाठविला तुज । तुका ह्मणे आतां सांडुनि लौकिक लाज ॥ ४ ॥

॥ ३३९ ॥

नीट पाट करूनी थाट । दावितसे तोरा । आपणाकडे पाहो कोणी निघाली बाजारा ॥ १ ॥ ते सौरी नव्हे निकी । भक्तीविण फिकी ॥ २ ॥ चांग भांग करूनी सोंग । दावी माळा मुद्री । रुक्याची आस धरूनी । हालवी ती फुद्री ॥ ३ ॥ थोर घरीं करी फेरी । तेथें नाचे बरी । जेथें निघे रुका । तेथें हालवी टिरी ॥ ४ ॥ आंत मांग बाहेर चांग । सौरी ती नव्हे तेग । तुका दास नटतसे । न करी त्याचा संग ॥ ५ ॥

॥ ३४० ॥

चाल माझ्या राघो । डोंगरीं दिवा लागो ॥ १ ॥ घर केलें दार केलें । घरीं नाहीं वरो । सेजारणी पापिणीचीं । पांच पोरें मरो ॥ २ ॥ घरीं पांच पोरें । तीं मजहूनी आहेत थोरें । पांचांच्या बळें । खादलीं बावन केळें ॥ ३ ॥ घर केलें दार केलें । दुकान केला मोटा । पाटाची राणी । धांगडधिंगा तिचा मोटा ॥ ४ ॥ दुकान केला मोटा । तर पदरीं रुका खोटा । हिजडा ह्मणसी जोगी । तर सोळा सहस्र भोगी । तुका ह्मणे वेगीं । तर हरि ह्मणा जगीं ॥ ५ ॥

॥ ३४१ ॥

जन्मा आलिया गेलिया परी । भक्ति नाहीं केली । माझें माझें ह्मणोनियां । गुंतगुंतों मेलीं ॥ १ ॥ येथें कांहीं नाहीं । ठव गुरूच्या पायीं । चाल रांडे टाकीं रुका । नको करूं बोल । गुरुविण मार्ग नाहीं । करिसी तें फोल ॥ २ ॥ खाउनी जेउनी लेउनी नेसुनी ।

ह्मणती आह्मी बऱ्या । साधु संत घरा आल्या । होती पाठमोऱ्या ॥ ३ ॥ वाचोनी पढोनी जाले शाहाणे । ह्मणती आह्मी संत । परनारी देखोनी त्यांचें । चंचळ जालें चित्त ॥ ४ ॥ टिळा टोपी घालूनी माळा । ह्मणती आह्मी साधु । दयाधर्म चित्तीं नाहीं । ते जाणावे भोंदु ॥ ५ ॥ कलियुगीं घरोघरीं । संत जाले फार । वीतिभरी पोटासाठीं । हिंडती दारोदार ॥६॥ संत ह्मणती केली निंदा । निंदा नव्हे भाई । तुका असे अनन्यें भावें । शरण संतां पायीं ॥७॥

गांवगुंड ॥ ३४२ ॥

आह्मी जालों गांवगुंड । अवघ्या पुंड भूतांसी ॥ १ ॥ दुसरें तें खेळों आलें । एका बोलें तो मियां ॥ २ ॥ अवघियांचा येऊं लाग । नेदूं अंग शिवाया ॥ ३ ॥ तुका ह्मणे ग्युंटूं नाद । जिंतूं वाद सर्वांनें ॥ ४ ॥

जोगी ॥ ३४३ ॥

जग जोगी जग जोगी । जागजागे बोलती ॥१॥ जागता जगदेव । राखा कांहीं भाव ॥२॥ अवघा क्षेत्रपाळ । पूजा सकळ ॥३॥ पूजापत्र कांहीं । फळ पुष्प तोय ॥४॥ बहुतां दिसां फेरा । आला या नगरा ॥५॥ नका घेऊं भार । धर्म तोचि सार ६। तुका मागे दान । ना जी अनन्य।७।

सरवदा ॥ ३४४ ॥

एका गा ए भाई । सरवदा सांगतो काई । येथें नाडेल माई । दोघां पुत्रांची । तें कविती तिची विटंबना । अवघ्या प्रसिद्ध जना । एक न मारितां शाहाणा । तो जाणा सुख न पवे ॥ १ ॥ आणीक ऐका गा ए । सरवदा सांगतो काय । खरेंचि बोले तो जाय । नरकामध्यें अधोगती । हें चौघांच्या मुखें । मना आणावें सुखें । अवघीं चुकती दुःखें । खोटें बोला नरनारी ॥ २ ॥ आणीक नाडेल एक जाण । सरवदा बोलतो वचन । जागें माझें चित्त ह्मणोन । पडिलें खान त्या घरीं । ह्मणोन न ह्मणा माझें कांहीं । निजीं निजा सुखें ठायीं । यत्न होईल तई । चोराठायीं विश्वास ॥ ३ ॥ आणीक एकी परी ।

सरवदा सांगतो थोरी। दुःख पावेल नारी। पतिव्रता यामधीं। पांचांनीं धिधली हातीं। ह्मणोनि न मनावी निश्चिती। परपुरुषीं होय रती। सुखगती ते पावे ॥ ४ ॥ आणीक एकी परी। सरवदा सांगतो तें करीं। दान देतां जो न वारी। नव्हे भला भला तो। तुका ह्मणे आई। येथें नांव काई। सांगसी तें ठायीं। मरो रांडेचें ॥५॥

दरवेस ॥ ३८५ ॥

अल्ला करे सो होय बाबा करतारका सिरताज। गाऊ बछरे तिस चलावे यारी बाधो न सात ॥१॥ ख्याल मेरा साहेबका बाबा हुवा करतार। व्हांटें आघे चढे पीठ आपे हुवा असवार ॥२॥ जिकिर करो अल्लाकी बाबा सबल्यां अंदर भेस। कहे तुका जो नर बुझे सोहि भया दरवेस ॥३॥

मलंग ॥ ३८६ ॥

नजर कर सो हि जिके बाबा दुरथी तमासा देख। लकडी फांसा लेकर बैठा आगले ठकण भेख ॥१॥ काहे भुला एक देखत। आंखो मार तहांगो बाजार ॥ २ ॥ दमरी चमरी जो नर भुला। सोत आघो हि लत खाये ॥ ३ ॥ नहि बुलावत किसे बाबा आप हि मत जाये। कहे तुका उस असाके संग फिरफिर गोते खाये ॥ ४ ॥

डांईफोडा ॥ ३८७ ॥

तम भज्याय ते बुरा जिकीर ते करे। सीर काटे ऊर कुटे ताहां सब हरे ॥ १ ॥ ताहां एक तु ही ताहां एक तु ही। ताहां एक तुहीं रे बाबा हमें तुझें नहीं ॥२॥ दिदार देखो भुले नहीं किशे पछाने कोये। सचा नहीं पकडू सके झुटा झुटे रोये ॥ ३ ॥ किसे कहे मेरा किन्हे सात लिया भास। नहीं मेलो मिले जीवना झुटा किया नास ॥४॥ सुनो भाई कैसा तोही। होय तैसा होय। बाट खाना अल्ला कहना एकबारां तो ही ॥ ५ ॥ भला लिया भेक मुंढे। आपना नफा देख। कहे तुका सो ही संका। हाक अल्ला एक ॥ ६ ॥

बेयगोळी ॥ ३४८ ॥

अल्ला देवे अल्ला दिलावे अल्ला दारु अल्ला खिलावे । अल्ला बगर नहीं कोये अल्ला करे सोहि होये ॥ १ ॥ मर्द होये वो खडा फीर नामर्दकुं नहीं धीर । आपने दिलकुं करना खुसी तीन दामकी क्या खुमासी ॥२॥ सब रसोंका किया मार । भजनगोली एकहि सार । इमान तो सब ही सखा । थोडी तो भी लेकर ज्या ॥ ३ ॥ जिन्हो पास नीत सोये । वो हि बसकर तिरोवे । सांतो पांचो मार चलावे । उतार सो पीछे खावे ॥ ४ ॥ सब ज्वानी निकल जावे । पीछे गधडा मटी खावे । गांवढाळ सो क्या लेवे । हगवनी भरी नहीं धोवे ॥५॥ भेरी दारु जिन्हें खाया । दिदार दरगां सोहीं पाया । तल्हे मुंढी घाल जावे । बिगारी सोवे क्या लेवे ॥ ६ ॥ वजारका बुझे भाव । वो हि पुसता आवे ठाव । फुकट वाटु कहे तुका । लेवे सोहि लें हिसखा ॥७॥

मुंढा ॥ ३४९ ॥

संबाल यारा उपर तलें दोन्हो मारकी चोट । नजर करे सो ही राखे पश्वा जावे लुट ॥ १ ॥ प्यार खुदाई रे बाबा जिकिर खुदाई ॥२॥ उडे कुदे ढुंग नचावे आगल भुलन प्यार । लटबड खडबड कांहेकां खचलावत भार ॥ ३ ॥ कहे तुका चलो एका हम जिन्होंके सात । मिलावे तो उसे देना तो ही चढावे हात ॥ ४ ॥

॥ ३५० ॥

सब संबाल भ्याने लौंढे खडा केऊं गुंग । मदिरथी मता हुवा भुलि पाडी भंग ॥ १ ॥ आपसकुं संबाल आपसकुं संबाल । मुंढे खुब राख ताल । मुथिवोहि बोला नहीं तो करूंगा हाल ॥२॥ आवलका तो पीछें नहीं मुदल बिसर जाय । फिरते नहीं लाज रंडी गधे गोते खाय ॥ ३ ॥ जिन्हो खातिर इतना होता सो नहीं तुझे बेफाम । उचा जोरो लिया तुंबा तुंबा बुरा काम ॥ ४ ॥ निकल जावे चिकल जोरो मुंढे दिलदारी । अवानीकी छोड दे बात फिर एक तारी ॥ ५ ॥ कहे तुका फिसल रुका मेरेको दान देख । पकड धका गांडगुढघी मार चलाऊं आलेख ॥ ६ ॥

॥ ३५१ ॥

आवल नाम आल्ला बडा लेते भुल न जाये । इलाम त्याकालजमुपरताही तुंब बजाये ॥ १ ॥ आल्ला एक तुं नबी एक तुं ॥ २ ॥ काटतें सिर पावों हातनहीं जीव डराये । आगले देखे पिछले बुझे । आपें हजुर आयें ॥३॥ सब सबरी नचाव म्याने । खडा आपनी सात । हात पावों रखते ज-बाब । नहीं आगली वात ॥४॥ सुनो भाई वजार नहीं । सबहि निरचे लाव । नन्हा बडा नहीं कोये एक ठोर मिलाव ॥५॥ एक तार नहीं प्यार । जीवतनकी आस । कहे तुका सो हि मुंढा राखलिये पायेनपास ॥ ६ ॥

पाईक ॥ ३५२ ॥

पाईक ह्मणे जोतिला सिद्धांत । शूर धरी मात वचन चित्तीं ॥ १ ॥
पाईकावांचून नव्हे कधीं सुख । प्रजांमध्यें दुःख न सरे पीडा ॥ २ ॥
तरि व्हावें पाईक जिवाचे उदार । सकळ त्यांचा भार स्वामी वाहे ॥ ३ ॥
पाइकीचें सुख जया नाहीं ठावें । धिग त्यांनीं ज्यावें वांयांविण ॥ ४ ॥
तुका ह्मणे एका क्षणाचा करार । पाईक अपार सुख भोगी ॥ ५ ॥

॥ ३५३ ॥

पाईकीचें सुख पाईकासी ठावें । ह्मणोनियां जीवें केली साटी ॥ १ ॥
येतां गोळ्या बाण साहिले भडमार । वर्षतां अपार वृष्टि वरी ॥ २ ॥
स्वामीपुढें व्हावें पडतां भांडण । मग त्या मंडण शोभा दावी ॥ ३ ॥
पाईकांनीं सुख भोगिलें अपार । शूर आणि धीर अंतर्बाहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे या सिद्धांताच्या खुणा । जाणे तो शाहाणा करी तो भोगी ॥५॥

॥ ३५४ ॥

पाईक तो जाणे पाइकीचा भाव । लाग पगें ठाव चोरवाट ॥ १ ॥
आपणां राखोनी ठकावें आणीक । घ्यावें सकळीक हरूनियां ॥ २ ॥
गेऊं नेदी लाग लागों नेदी माग । पाईक त्या जग स्वामी मानी ॥ ३ ॥
ऐसें अन केलें पाइकें पाईक । जया कोणी भीक न घालिती ॥ ४ ॥
तुका ह्मणे ऐसे जयाचे पाईक । बळिया तो नाईक त्रैलोकींचा ५

॥ ३५५ ॥

पाईकांनीं पंथ चालविल्या वाटा । पारख्याचा सांटा मोडोनियां ॥ १ ॥
पारखिये ठायीं घेऊनियां खाणें । आपलें तें जन राखियेलें ॥ २ ॥
आधारेंविण जें बोलतां चावळे । आपलें तें कळे नव्हे ऐसें ॥ ३ ॥
सांडितां मारग मागिती पाईक । आणिकांसी शीक लागावया ॥ ४ ॥
तुका ह्मणे विश्वा घेऊनी विश्वास । पाईक तयास सुख देती ॥ ५ ॥

॥ ३५६ ॥

पाईक तो प्रजा राखोनियां कुळ । पारखिया मूळ छेदी दुष्टा ॥ १ ॥
तो एक पाईक पाईकां नाईक । भाव सकळीक स्वामिकाजीं ॥ २ ॥
तृणवत तनु सोनें ज्या पाषाण । पाईक त्या भिन्न नाहीं स्वामी ॥ ३ ॥
विश्वासावांचूनी पाईकासी मोल । नाहीं मिथ्या बोल बोलिलिया ॥ ४ ॥
तुका ह्मणे नये स्वामी उणेपण । पाईका जतन करी त्यासी ॥ ५ ॥

॥ ३५७ ॥

धनी ज्या पाईका मानितो आपण । तया भितें जन सकळीक ॥ १ ॥
जिवाचे उदार शोभती पाईक । मिरवती नाईक मुगुटमणि ॥ २ ॥
आपुलिया सत्ता स्वामीचें वैभव । भोगिती गौरव सकळ सुख ॥ ३ ॥
कमाईचीं हीणें पडिलीं उदंडें । नाहीं तया खंड येती जाती ॥ ४ ॥
तुका ह्मणे तरी पाईकीच भली । थोडीबहुत केली स्वामिसेवा ॥ ५ ॥

॥ ३५८ ॥

पाईकपणें खरा मुशारा । पाईक तो खरा पाइकीनें ॥ १ ॥
पाईक जाणे मारितें अंग । पाइकासी भंग नाहीं तया ॥ २ ॥
एके दोहीं घरीं घेतलें खाणें । पाईक तो पणें निवडला ॥ ३ ॥
करूनी कारण स्वामी यश द्यावें । पाईका त्या नांवें खरेपण ॥ ४ ॥
तुका ह्मणे ठाव पाईकां निराळा । नाहीं स्वामी स्थळा गेल्याविण ॥ ५ ॥

॥ ३५९ ॥

उंच नीच कैसी पाईकाची ओळी । कोण गांढे बळी निवडिले ॥ १ ॥
स्वामिकार्जी एक सर्वस्वें तत्पर । एक ते कुचर आशाबद्ध ॥ २ ॥
प्रसंगावांचूनी आणिती आविर्भाव । पाईक तो नांव मिरवी वांयां ॥ ३ ॥
गणतीचे एक उंच नीच फार । तयांमध्यें शूर विरळा थोडे ॥ ४ ॥
तुका ह्मणे स्वामी जाणे त्यांचा मान । पाईक पाहोन मोल करी ॥ ५ ॥

॥ ३६० ॥

एकाच स्वामीचे पाईक सकळ । जैसें बळ तैसें मोल तया ॥ १ ॥
स्वामिपदीं एकां ठाव उंच स्थळीं । एक तीं निराळीं जवळी दुरी ॥ २ ॥
हीन कमाईचा हीन आन ठाव । उंचा सर्व भाव उंच पद ॥ ३ ॥
पाईकपणें तो सर्वत्र सरता । चांग तरी परता गांढ्या ठाव ॥ ४ ॥
तुका ह्मणे मरण आहे या सकळां । भेणें अवकळा अभयें मोल ॥ ५ ॥

॥ ३६१ ॥

प्रजी तो पाईक ओळीचा नाईक । पोटासाठीं एकें जैशीं तैशीं ॥ १ ॥
आगळें पाऊल आणिकांसी तरी । पळती माघारीं तोडिजेती ॥ २ ॥
पाठीवरी घाय ह्मणती फटमर । धडा अंगें शूर मान पावे ॥ ३ ॥
घेईल दरवडा देहा तो पाईक । मारी सकळीक सर्व हरी ॥ ४ ॥
तुका ह्मणे नव्हे बोलाचें कारण । कमाईचा पण सिद्धी पावे ॥ ५ ॥

॥ ३६२ ॥

जातीचा पाईक ओळखे पाईका । आदर तो एका त्याचे ठायीं ॥ १ ॥
धरितील पोटासाटीं हतियेरें । कळती तीं खरें वेठीचींसीं ॥ २ ॥
जातीचें तें असे खरें घायडाय । पारखिया काय पाशीं लोपे ॥ ३ ॥
तुका ह्मणे नमूं देव म्हूण जना । जालियांच्या खुणा जाणतसों ॥ ४ ॥

जोहार ॥ ३६३ ॥

मायबाप जोहार जी जोहार । सारा साधावया आलों वेसकर ॥ १ ॥
मागील पुढील करा झाडा । नाहीं तरी खोडा घालिती जी ॥ २ ॥

फांकूं नका रजू जालियावांचून । सांगा जी कोण धरिती घण्या ॥ ३ ॥
आजी मायबाप करा तडामोडी । उद्यां कोण घडी राहेना हो ॥ ४ ॥
तुका ह्मणे कांहीं न चले ते बोली । अखरते साळीं झाडा घेती ॥ ५ ॥

॥ ३६४ ॥

येऊं द्या जी कांहीं वेसकरास । आंतून बाहेर वोजेचा घास ॥ १ ॥
जों यावें तों हातचि रिता नाहीं । कधीं तरी कांहीं द्यावें घ्यावें ॥ २ ॥
तुका ह्मणे उद्यां लावीन मनेरा । जे हे दारोदारां भोंवतीं फिरा ॥ ३ ॥

कावडे ॥ ३६५ ॥

आहा रे भाई । प्रथम नमूं तो विनायक । ठेवूनि गुरुचरणीं मस्तक । वदेल प्रसादिक वाणी । हरिहरांचे पवाडे ॥ १ ॥ माझी ऐसी श्रीदावळी । दासें दासत्वें आगळी । पान्हेरीनें मार्ग मळी । जीवन घ्या रे कापडि हो ॥ २ ॥ जें या सीतळाहुनी सीतळ । पातळाहुनी जें पातळ । प्रेमामृत रसाळ । तें हें सेवा अहो भाग्याचे ॥ ३ ॥ जिंकाल तरी जिंका रे अभिमान । दवडाल तरी दवडा लज्जा आणि मान । धराल ते धरा शंभूचे चरण । दावाल पण ऐसा दात्रा तो ॥ ४ ॥ काळा घेऊं नेदी वाव । आला तो राखों भावडाव । शुद्ध सत्वीं राखोनी भाव । ह्मणा महादेव हरिहर वाणी गर्जो द्या ॥ ५ ॥ पराविया नारी माउली समान । परधनीं बाटों नेदीं मन । जीवित्व तें तृणासमान । स्वामीकाजीं जाण शूर ह्मणों तया ॥ ६ ॥ शक्ति वेचाविया परउपकारा । खोटें खोट्याचा पसारा । सत्य तें भवनदीचा तारा । आळस तो न करा येथें अहो सांगतों ॥ ७ ॥ व्रत करा एकादशी सोमवार । कथा पूजन हरिजागर । पुण्य तें असे गांवां नाचतां बहु फार । पुन्हा बोलिला संसार नाहीं नाहीं सत्यत्वें ॥ ८ ॥ संग संतांचा करितां बरवा । उत्तमोत्तम कीर्तीचा ठेवा । पंथ तो सुपंथें चालावा । उगवा वासना लिगाड ॥ ९ ॥ तुका चालवितो कावडी । प्रवृत्ति निवृत्ति चोखडी । पुढती पुढती अधिक गोडी । भरूनि कळस भजन आवडी केशवदास नटतसे ॥ १० ॥

॥ ३६६ ॥

आह्मा आह्मा रे भाई । हें अन्नदानाचें सत्र । पव्हे घातली सर्वत्र । पंथीं अवघे पंथ मात्र । इच्छाभोजनाचें आर्त पुरवावया ॥१॥ यावें तेणें घ्यावें । न सरेसें केलें सदाशिवें । पात्र शुद्ध पाहिजे बरवें । मंगळभावें सकळ हरि ह्मणा रे ॥२॥ नव्हे हें कांहीं मोकळें । साक्षी चौघांचिया वेगळें । नेदी नाचों मताचिया बळें । अणु अणोरणीया आगळें । महदि महदा साक्षित्वें हरि ह्मणा रे ॥३॥ हे हरिनामाची आंबिली । जगा पोटभरी केली । विश्रांति कल्पतरूची साउली । सकळां वर्णां सेवितां भली । ह्मणा हरहर महादेव ॥४॥ तुका हरिदास तराळ । अवघे हाकारी सकळ । या रे वंदूं शिखरातळ । चैत्रमास पर्वकाळ महादेवदर्शनें ॥५॥

॥ ३६७ ॥

आह्मा रे भाई । नमो उदासीन जाले देहभावा । आळविती देवा तया नमो ॥१॥ नमो तीर्थपंथें चालती तयांसी । येती बोळविती त्यांसी नमो ॥२॥ नमो तयां संतवचनीं विश्वास । नमो भावें दास्य गुरूचें त्यां ॥३॥ नमो तया मातापित्यांचें पाळण । नमो त्या वचन सत्य वदे ॥४॥ नमो तया जाणे आणिकांचें सुखदुःख । राखे तान भूक तया नमो ॥५॥ परोपकारी नमो पुण्यवंता । नमो त्या दमित्या इंद्रियांसी ॥६॥ तुका ह्मणे नमो हरिचिया दासा । तेथें सर्व इच्छा पुरलीसे ॥ ७ ॥

॥ ३६८ ॥

आह्मा रे भाई । तयावरी माझी श्रीदावळी । भ्रष्ट ये कळी क्रियाहीन ॥१॥ थुंका थुंका रे त्याच्या तोंडावरी । वाणिली ते थोरी दवडा यांयां बाहेरी ॥२॥ बाइलेचा दास पित्रांस उदास । भीक भिकाऱ्यास नये दारा ॥३॥ विद्याबळें वाद करूनियां छळी । आणिकांची फळी मोडोनियां ॥४॥ गांवींचिया देवा नाहीं दंडवत । ब्राह्मण अतीत पूजेचि ना ॥५॥ सर्वकाळ करी संतांचिया निंदा । स्वप्नींही गोविंदा आठ-

वांना ॥६॥ खासेमध्यें धन पोटासी बंधन। नेणे ऐसा दानधर्म कांहीं ॥७॥ तुका ह्मणे नटे दावूनियां सोंग । लवों नेदी अंग भक्तिभावें ॥ ८ ॥

॥ ३६९ ॥

आह्मा रे भाई। गंगा नव्हे जळ। वृक्ष नव्हे वड पिंपळ। तुळसी रुद्राक्ष नव्हे माळ। श्रेष्ठ तनु देवाचिया ॥१॥ समुद्र नदी नव्हे पैं गा। पाषाण ह्मणों नये लिंगा। संत नव्हती जगा। मानसा त्या सारिखे ॥२॥ काठी ह्मणों नये वेतु। अन्न ह्मणों नये सांतु। राम राम हे मातु। नये ह्मणों शब्द हे ॥३॥ चंद्र सूर्य नव्हती तारांगणें। मेरु तो नव्हे पर्वतासमान। शेष वासुकी नव्हे सर्प जाण। विखारांच्या सारिखे ॥४॥ गरुड नव्हे पाखरूं। ढोर नव्हे नंदिकेश्वरू। झाड नव्हे कल्पतरू। कामधेनु गाय न ह्मणावी॥५॥ कूर्म नव्हे कासव। सुकर नव्हे वराह। ब्रह्मा नव्हे जीव। स्त्री नव्हे लक्ष्मी ॥६॥ गवाक्ष नव्हे हाड। पाटाव नव्हे कापड। परीस नव्हे दगड। सगुण ते ईश्वरीचे ॥७॥ सोनें नव्हे धातु। मीठ नव्हे रेतु। नाहीं नाहीं चर्मातु। कृष्णाजिन व्याघ्रांबर ॥८॥ मुक्ताफळें नव्हती गारा। खड्याऐसा नव्हे हिरा। जीव नव्हे सोइरा। बोळवीजे स्वइच्छेनें ॥९॥ गांव नव्हे द्वारावती। रणछोड नव्हे मूर्ति। तीर्थ नव्हे गोमती। मोक्ष घडे दर्शनें ॥१०॥ कृष्ण नव्हे भोगी। शंकर नव्हे जोगी। तुका पांडुरंगीं। हा प्रसाद लाधला ॥ ११ ॥

वासुदेव ॥ ३७० ॥

राम राम दोनी अक्षरें। सुलभ आणि सोपारें। जागा मागिले पाहारे। सेवटिचें गोड तेंचि खरें गा ॥१॥ राम कृष्ण वासुदेवा। जाणवी जनासी। बाजवी चिपळिया। टाळ घागऱ्याघोषें गा ॥२॥ गाय वासुदेव वासुदेवा। भिन्न नाहीं आणिका नांवा। दान जाणोनियां करीं आवा। न ठेवीं उरीं कांहीं ठेवा गा ३ एक वेळा जाणविती। धरूनियां राहा चित्तीं। नेचें भार सांडीं काया हाबीं। नीज घेऊनी फिरती गा ॥ ४ ॥ सुपात्रीं सर्व भाव। मी तों सर्व वासुदेव। जाणती कृपाळु संत महानुभाव। जया

भिन्न भेद नाहीं ठाव गा ॥ ५ ॥ शूर दान जीवें उदार । नाहीं वासुदेवीं विसर । कीर्ति वाढे चराचर । तुका ह्मणे तया नमस्कार गा ॥ ६ ॥

॥ ३७१ ॥

बोल बोले अबोलणे । जागें बाहेर आंत निजेलें । कैसें घरांत घरकुल केलें । नेणों अंधार ना उजेडलें गा ॥ १ ॥ वासुदेव करितों फेरा । वाडियांत बाहेर दारा । कोणी कांहीं तरी दान करा । जाव नेदा तरी जातों माघारा गा ॥ २ ॥ हातीं टाळ दिंडी मुखीं गाणें । गजर होतो बहु मोठ्यानें । नाहीं निवडिलीं थोरलाहानें । नका निजों भिकेच्या भेणें गा ॥ ३ ॥ मी वासुदेव तत्वता । कळों येईल विचारितां । आहे ठाउका सभाग्य संतां । नाहीं दुजा आणीक मागता गा ॥ ४ ॥ काय जागाचि निजलासी । सुनें जागवूनि दारापासीं । तुझ्या हितासाठीं करीं व्यास व्यासी । भेटी न घेसी वासुदेवासी गा ॥ ५ ॥ ऐसें जागविलें अवघें जन । होतें संचित तिहीं केलें दान । तुका ह्मणे दुबळीं कोण कोण । गेलीं वासुदेवा विसरून गा ॥ ६ ॥

॥ ३७२ ॥

रामकृष्ण गीती गात । टाळ चिपळ्या वाजवीत । छंदें आपुलिया नाचत । नीज घेऊनी फिरत गा ॥ १ ॥ जनीं वनीं हा अवघा देव । वासनेचा हा पुसावा ठाव । मग बोळगनी वासुदेव । ऐसा मनीं वसूं द्यावा भाव गा ॥ २ ॥ निज दासाची थोर आवडी । वासुदेवासी लागली गोडी । मुखीं नाम उच्चारी घडोघडीं । ऐसी करा हे वासुदेवजोडी गा ॥ ३ ॥ अवघा मारूनी सेवट जाला । प्रयत्न न चले कांहीं केला । जागा होई सांडुनि झोपेला । दान देई वासुदेवाला गा ॥ ४ ॥ तुका ह्मणे रे धन्य त्याचें जिणें । जिहीं घातलें वासुदेवा दान । त्याला न लगे येणें जाणें । जालें वासुदेवीं राहणें गा ॥ ५ ॥

पांगुळ ॥ ३७३ ॥

पांगुळ जालों देवा नाहीं हात ना पाय । बैसलों जयावरी सैराट तें जाय । लोटितां कूप कांटी । खुंट दरडी न पाहे । आधार नाहीं मज कोणी ।

बाप ना माये ॥१॥ दाते हो दान करा। जातें पंढरपुरा। न्या मज तेथवरी। अखमाचा सोयरा ॥२॥ हिंडतां गव्हानें गा। शिणलों दारोदारीं। न मिळेचि दाता कोणी। जन्मदुःखातें वारी। कीर्ति हे संतां मुखीं। तोचि दाखवा हरी। पांगळां पाय देतो। नांदे पंढरपुरीं ॥ ३ ॥ या पोटाकारणें गा। जालों पांगिला जना। न सरेचि बापमाय भीक नाहीं खंडणा। पुढारा ह्मणती एक। नया नाहीं करुणा। श्वान हें लागे पाठीं। आशा बहु दारुणा ॥४॥ काय मी चुकलों गा। मागें नेणवे कांहीं। न कळेचि पापपुण्य। तेथें आठव नाहीं। मी माजी भुललों गा। दीप पतंगासोयी। द्या मज जीवदान। संत महानुभाव कांहीं ॥५॥ दुर्गेनि आलों मी गा। दुःख जालें दारुण। यावया येथवरी। होतें हेंचि कारण दुर्लभ भेटी तुह्मां। पायीं जालें दरुषन। विनविनो तुका संतां। दोन्ही कर जोडून ॥ ६ ॥

॥ ३७४ ॥

देश वेष नव्हे माझा। सहज फिरत आलों। करूं सत्ता कवणावरी। कोठें स्थिर राहिलों। पाय डोळे ह्मणतां माझे। तिहीं कैसा मोकलिलों। परदेशी नाहीं कोणी। अंध पांगुळ जालों ॥१॥ आतां माझी करीं चिंता। दान देई भगवंता। पाठीं पोटीं नाहीं कोणी। निरवीं सज्जन संता ॥२॥ चालतां वाट पुढें। भय वाटतें चित्तीं। बहुत जणें गेलीं। नाहीं आलीं मागुतीं। न देखें काय जालें। कान तरी ऐकती। बैसलों संधिभागीं। तुज धरूनि चित्तीं ॥३॥ भाकितों करुणा गा। जैसा सांडिला ठाव। न भरे पोट कधीं। नाहीं निश्चळ पाव। हिंडतां भागलों गा। लक्ष चौऱ्याशीं गांव। धरूनी राहिलों गा। हाचि वसता ठाव ॥४॥ भरंवसा काय आतां। कोण आणि अवचिता। तैसीच जाली कीर्ति। तया मज बहुतां। ह्मणऊनी मारीं हाका। सोयी पावें पुण्यवंता। लागली भूक थोरी। तूंचि कृपाळू दाता ॥५॥ संचित सांडवलें। कांहीं होतें जवळी। वित्त गोत पुत माया। तुटली हे लागावळी। निष्काम जालों देवा। होतें माझे कपाळीं। तुका ह्मणे तूंचि आतां। माझा सर्वस्वें बळी ॥ ६ ॥

आंधळा ॥ ३७५ ॥

देखत होतों आधीं मागें पुढें सकळ । मग हे दृष्टि गेली वरी आलें पडळ । तिमिर कोंदलेंसें वाढे वाढतां प्रबळ । भीत मी जालों देवा । काय ज्याल्याचें फळ ॥१॥ आतां मज दृष्टि देई । पांडुरंगा मायबापा । शरण आलों आतां । निवारूनियां पापा । अंजन लेववूनी । करीं मारग सोपा । जाईन सिद्धपंथें । अवघ्या चुकतील खेपा ॥२॥ होतसे खेद चित्ता । कांहीं नाठवे विचार । जात होतों जनामागें । तोही सांडिला आधार । हे ना तोसा ठाव झाला । अवघा पडिला अंधार । फिरलीं माझीं मज । कोणी न देती आधार ॥३॥ जोंवरी चळण गा । तोंवरी ह्मणती माझा । मानिती लाहान थोर । देहसुखाच्या काजा । इंद्रियें मावळलीं । आला बागुल आजा । कैसा विपरीत जाला । तोचि देह नव्हे दुजा ॥४॥ गुंतलों या संवसारें । कैसा जालोंसें अंध । मी माझें वाढवूनी । मायातृष्णेचा बाध । स्वहित न दिसेचि । केला आपुला वध । लागले काळ पाठीं । सवें काम हे क्रोध ॥५॥ लागती चालतां गा । गुणदोषाच्या ठेंसा । सांडिली वाट मग । जालों निगाळा कैसा । पाहातों वाट तुझी । थोर करूनि आशा । तुका ह्मणे वैद्यराजा । पंढरीच्या निवासा ॥६॥

॥ ३७६ ॥

सहज मी आंधळा गा निजनिराकार पंथें । वृत्ति हे निवृत्ति जाली जन न दिसे तेथें । मी माझें हारपलें ठायीं जेथींच्या तेथें । अदृश्य तेंचि जालें कांहीं दृश्य जें होतें ॥१॥ सुखी मी निजलों गा शून्य सारूनी तेथें । त्रिकूटशिखरीं गा दान मिळे आइतें ॥२॥ टाकिली पात्र झोळी धर्म अधर्म आशा । कोल्हाळ चुकविला त्रिगुणांचा वोळसा । न मागों मी भीक आतां हाचि झाला भरंवसा । वोळली सत्रावी गा तिणें पुरविली इच्छा ॥३॥ उर्ध्वमुखें आळविला सोहं शब्दाचा नाद । अरूप जागविला दाता घेऊनी छंद । घेऊनी आला दान निजतत्व निजबोध । स्वरूपीं मेळविलें नांव ठेविला भेद ॥४॥ शब्द हा बहुसार उपकाराची राशी । ह्मणोनि चाल-

विला मार्गे येतील त्यांसी । मागोनी आली वाट सिद्ध ओळीची तैसी । तरले तरले गा आणीक ही विश्वासी ॥५॥ वर्म तें एक आहे दृढ धरावा भाव । जाणीवनागवण नेदी लागों ठाव । ह्मणोनि संग टाकीं सेवीं अद्वैत भाव । तुका ह्मणे हाचि संतीं मार्ग केला उपाव ॥६॥

॥ ३७७ ॥

आंधळ्या पांगळ्यांचा एक विठोबा दाता । प्रसवला विश्व तोचि सर्व होय जाणता । घडी मोडी हेळामात्रें पापपुण्य संचिता । भवदुःख कोण वारी तुजवांचुनि चिंता ॥१॥ धर्म गा जागो तुझा तूंचि कृपाळू राजा । जाणसी जीवींचें गा न मागतां सहजा ॥२॥ घातली लोळणी गा पुंडलीकें वाळवंटीं । पंढरी पुण्य ठाव नीरे भींवरे तटीं । न देखें दुसरें गा जाली अनन्यदृष्टि । वोळला प्रेमदाता केली अमृतवृष्टि ॥३॥ आ-णीक उपमन्यू एक बाळ धाकुटें । न देखे न चलवे जना चालते वाटे । घातली लोळणी गा हरिनाम बोभाटे । पावला त्याकारणें धांव घातली नेटें ॥४॥ वैसांनी खोळी शुक राहे गर्भ आंधळा । शीणला येरझारी दुःख आठवी वेळा । मागील सोसिलें तें ना भी ह्मणे गोपाळा । पावला त्याकारणें लाज राखिली कळा ॥५॥ न देखे जो या जना तया दावी आपणा । वेगळा नरकदुःख्या सोडी सांडवी धना । आपपर तेंही नाहीं बंधुवर्ग सज्जना । तुकया तेचि परी जाली पावें नारायणा ॥६॥

॥ ३७८ ॥

भगवंता तुज कारणें सलों जीताचि कैसी । निष्काम वृद्धि ठेली चळण नाहीं तयासी । न चलती हात पाय दृष्टि फिरली कैसी । जाणतां न देखों गा क्षर आणि अक्षरासी ॥१॥ विठोबा दान दे गा तुझ्या सारिखें नाना । कीर्ति हे वाखाणिली थोर वाढली सीमा ॥२॥ भुक्ति मुक्ति तूंचि एक होसि सिद्धीचा दाता । ह्मणोनि सांडवली शोक भय लज्जा चिंता । सर्वस्वें त्याग केला धांव घातली आतां । कृपादान देई देवा येउनि सामोरा आतां ॥ ३ ॥ संसारसागरू गा भवदुःखाचें मूळ । जनवाद

अंथरूण माजी केले इंगळ । इंद्रियें वज्रघातें तपे उष्ण वरी जाळ । सोसिलें काय करूं दुर्भर हे चांडाळ ॥ ४ ॥ तिहीं लोकीं तुझें नाम वृक्ष पल्लव शाखा । वेंघलों बरि खोडा भाव धरूनी टेंका । जाणवी नरनारी जागो धर्म लोकां । पावती पुण्यवंत सोई आमुचिये हाका ॥५॥ नाठवे आपपर आतां काय बा करूं। सारिखा सोइसवा हारपला विचारु। घातला योगक्षेम तुज आपुला भारु । तुकया शरणांगता देई अभयकरु ॥६॥

---

## त्रोटक चरित्रें व त्रोटक प्रकरणें.

---

### भावसामर्थ्य.

#### मत्स्यावतार ॥ ३७९ ॥

ब्रह्मयाचे वेद शंखासुरें नेले । त्यासाठीं धरिलें मत्स्यरूप ॥ १ ॥
तेणें आत्मा नव्हता नेला ब्रह्मांडासी । काय ब्रह्मयासी नव्हतें ज्ञान ॥२॥
परि तेणें धांवा केला आवडीनें । जाले नारायण कृपासिंधु ॥ ३ ॥
तुका ह्मणे विठोबा मी नामधारक । पोसणें सेवक भेटी देई ॥ ४ ॥

#### कूर्मावतार ॥ ३८० ॥

देवीं आणि दैतीं सिंधु घुसळिला । भार पृथ्वीस जाला साहावेना ॥ १ ॥
जालासी कासव धरिली पाठीवरी । चिंता तुज हरी सकळांची ॥ २ ॥
तये काळीं देव करितांनी स्तुति । कृपाळु श्रीपति ह्मणोनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसे उदंड पवाडे । ज्यासी सहस्र तोंडें सिणला तोही ॥ ४ ॥

#### वराहावतार ॥ ३८१ ॥

हिरण्याक्ष दैत्य मातला जे काळीं । वरदानें बळी शंकराच्या ॥ १ ॥
इंद्रपदराज्य घेतलें हिरोनी । देवा चक्रपाणी ह्मणती धांव ॥ २ ॥
तई पांडुरंगा शूकर जालेती । तया दैत्यपती मारियेलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे ज्यांचीं राज्यें त्यांसी दिलीं । ऐसी तूं माउली पांडुरंगा ॥४॥

## नृसिंहावतार ॥ ३८२ ॥

प्रल्हादाकारणें नरसिंह आलासी । त्याचिया बोलासी सत्य केलें ॥ १ ॥
राम कृष्ण गोविंद नारायण हरि । गर्जे राजद्वारीं भक्तराज ॥ २ ॥
विठ्ठल माधव मुकुंद केशव । तेणें दैत्यराव दचकला ॥ ३ ॥
तुका ह्मणे तयाकारणें सगुण । भक्ताचें वचन सत्य केलें ॥ ४ ॥

॥ ३८३ ॥

नामाचें सामर्थ्य कां रे दवडिसी । कां रे विसरसी पवाडे हे ॥ १ ॥
खणखणां हाणती खर्गे प्रल्हादासी । न रुपे अंगासी किंचितही ॥२॥
राम कृष्ण हरि ऐसी मारी हांक । तेणें पडे धाक वळियासी ॥ ३ ॥
असो या सामर्थ्ये ऐसिया कीर्तीची । आवडी तुक्याची भेटी देई ॥४॥

॥ ३८४ ॥

वाटीभर विष दिलें प्रल्हादासी । निर्भय मानसीं तुझ्या बळें ॥ १ ॥
भोक्ता नारायण केलें तें प्राशन । प्रतापें जीवन जालें तुझ्या ॥ २ ॥
नामाच्या चिंतनें विषाचें तें आप । जाहालें देखत नारायणा ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसे तुझे बडिवार । शिणला फणीवर वर्णवेना ॥ ४ ॥

॥ ३८५ ॥

अग्निकुंडामाजी घातला प्रल्हाद । तरी तो गोविंद विसरेना ॥ १ ॥
पितियासी ह्मणे व्यापक श्रीहरि । नांदतो मुरारी सर्वां ठायीं ॥ २ ॥
अग्निरूपें माझा सखा नारायण । प्रल्हाद गर्जून हांक मारी ॥ ३ ॥
तुका ह्मणे अग्नि जाहाला शीतळ । प्रताप सबळ विठो तुझा ॥ ४ ॥

॥ ३८६ ॥

कोपोनियां पिता बोले प्रल्हादासी । सांग हृषीकेशी कोठें आहे ॥ १ ॥
येरु म्हणे काष्ठीं पाषाणीं सकळीं । आहे वनमाळी जेथें तेथें ॥ २ ॥
खांबावरी लात मारिली दुर्जनें । खांबीं नारायण ह्मणतांचि ॥ ३ ॥
तुका ह्मणे कैसा खांब कडाडिला । ब्रह्मा दचकला सत्यलोकीं ॥ ४ ॥

॥ ३८७ ॥

डळमळिला मेरु आणि तो मांदार । पाताळीं फणिवर डोई झाडी ॥१॥
लोपे तेजें सूर्य आणीक हा चंद्र । कांपतसे इंद्र थरथरां ॥ २ ॥
ऐसें रूप उग्र हरीनें धरीलें । दैत्या मारियेलें मांडीवरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे भक्तांकारणें श्रीहरि । बहु दुराचारी निर्दाळिले ॥ ४ ॥

वामनावतार ॥ ३८८ ॥

बहुत कृपाळु दीनाचा दयाळू । जगीं भक्तवत्सलू नाम तुझें ॥ १ ॥
मानियेला चित्तीं बळीचा उपकार । अझूनी त्याचें द्वार राखसील ॥२॥
काय त्याच्या भेणें बैसलासी द्वारीं । नाहीं तुज हरी कृपा बहु ॥ ३ ॥
तुका ह्मणे भक्तजनाची ममता । तुह्मांसी अनंता अलोलिक ॥ ४ ॥

## पुरु कुश दैत्यांच्या त्रासापासून दुर्वासऋषीची मुक्तता.

॥ ३८९ ॥

पांडुरंगा तुझे काय वाणूं गुण । पवाडे हे धन्य जगीं तुझे ॥ १ ॥
दंडिलें दुर्वासा सुरा असुरानें । तो आला गाऱ्हाणें सांगावया ॥ २ ॥
बळीचिये द्वारीं तुह्मी बैसलेति । दुर्वास विनंती करी भावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे कृपासागरा श्रीहरी । तुह्मी भक्तांवरी प्रेमछाया ॥ ४ ॥

॥ ३९० ॥

दुर्वासया स्वामी गुंतलों भाकेसी । पुसा जा बळीसी निरोप द्यावा ॥१॥
त्याचे अज्ञेविण आह्मां येतां नये । द्वारपाळ राहे होऊनियां ॥ २ ॥
पुसे दुर्वासया बळीसी जाऊनी । येरु ह्मणे ह्मणी बोलों नका ॥ ३ ॥
तुका ह्मणे केला अन्यत्राचा त्याग । तेव्हां पांडुरंग सखा जाला ॥ ४ ॥

॥ ३९१ ॥

बळी ह्मणे आजी दुर्वासया स्वामी । मागों नका तुह्मी नारायण ॥ १ ॥
बहुतां प्रयासीं जोडला श्रीहरी । बैसविला द्वारीं राखावया ॥ २ ॥
परतला दुर्वास मग हो तेथूनी । चिंतातुर मनीं उद्वेगला ॥ ३ ॥
काय तूं एकाचा आहेसी अंकित । होई कृपावंत तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ३९२ ॥

त्रैलोकींचा नाथ सकळांचा आधार। बळिचें तुवां घर धरियेलें ॥ १ ॥
आह्मां मोकलिलें कोणां निरविलें। कोणा हातीं दिले तिन्ही लोक ॥२॥
अनाथांचा बंधु दासांचा कैवारी। ब्रिदें तुह्मीं हरी जाती वांयां ॥३॥
तुका ह्मणे ऐसें बोलिला दुर्वास। वाटला संतोष पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ३९३ ॥

बोलिले ते देवऋषी दुर्वासया। जाय पुसावया मागत्यानें ॥ १ ॥
मागुता दुर्वास पुसे बळिराया। निरोप जावया देई देवा ॥ २ ॥
बळी ह्मणे त्यासी जाय मी न ह्मणें। जाईल नारायण लागलाची ॥ ३ ॥
मजपाशीं राहे कोठें तरी जाय। तुका ह्मणे पाय न सोडीं मी ॥ ४ ॥

॥ ३९४ ॥

दुर्वासें निरोप आणिला ये रीती। मग वाढलेती नारायणा ॥ १ ॥
ठेविलें चरण बळीचिये द्वारीं। शिर अंगावरी लांबविलें ॥ २ ॥
पाडियेलें द्वार द्वारावतियेसी। वरी हृषीकेशी निघालेती ॥ ३ ॥
तेथूनियां नाम पडिलें द्वारका। वैकुंठनायका तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ३९५ ॥

मुरु कुश दोन्ही मारिले असुर। दुर्वास ऋषीश्वर सुखी केला ॥१॥
मारियेला मुरु ह्मणोनी मुरारी। नाम तुझें हरी पडियेलें ॥ २ ॥
पूर्वीहुनी ऐसा भक्तप्रतिपाळ। केला त्वां सांभाळ नारायणा ॥ ३ ॥
तुका ह्मणे येचि वेळे काय जालें। कां सोंग धरिलें मोहनाचें ॥ ४ ॥

पिंगळा गणिका ॥ ३९६ ॥

व्यभिचारिणी गणिका कुंटणी। विश्वासचि मनीं राघोबाचा ॥ १ ॥
ऐसी ही पापिणी वाहिली विमानीं। अचळ भुवनीं ठेवियेली ॥२॥
पतितपावन तिहीं लोकीं ठसा। कृपाळु कोंवसा अनाथांचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे विठोबाची धरा सोय। आणिक उपाय नेणों किती ॥ ४ ॥

गजेंद्रमोक्ष ॥ ३९७ ॥

गजेंद्र तो हस्ती सहस्र वरुषें । जळामाजी नक्रें पीडिलासे ॥ १ ॥
सुहृदीं सांडिलें कोणी नाहीं साहे । अंतीं वाट पाहे विठो तुझी ॥२॥
कृपेच्या सागरा माझ्या नारायणा । तया दोघांजणां तारियेलें ॥३॥
तुका ह्मणे नेलें वाहूनी विमानीं । मीही आइकोनी विश्वासलों ॥४॥

## दामाजीपंताचें चरित्र.

॥ ३९८ ॥

दामाजीपंताची रसद गुदरली । लज्जा सांभाळिली देवरायें ॥ १ ॥
तयाचें चरित्र परिसा हो सादरें । करितों नमस्कार संतजनां ॥२॥
मंगळवेढा असे वस्ति कुटुंबेंसी । व्यापारी सर्वांसी मान्य सदा ॥३॥
कर्म काय करी ठाणाचा हवाला । तों कांहीं पडला कठिण काळ ॥४॥
धान्याचीं भांडारें होतीं तीं फोडिलीं । पंढरी रक्षिली दुष्काळांत ॥५॥
दुबळीं अनाथ तींही वाचविलीं । राष्ट्रांत ते जाली कीर्ति मोठी ॥६॥
मुजुम करीत होता कानडा ब्राह्मण । फिर्याद लिहून पाठविली ॥ ७ ॥
अविंदाचें राज्य बेदरीं असतां । कागद पाहतां तलब केली ॥ ८ ॥
दामाजीपंतासी धरोनि चालविलें । इकडे या विठ्ठलें माव केली ॥९॥
विकते धारणे सवाईचें मोल । धान्याचें सकळ द्रव्य केलें ॥ १० ॥
दामाजीपंताच्या नांवें अर्जदास्त । लिहून खलेती मुद्रा केली ॥ ११ ॥
विठो पाडेवार भक्तां साह्य जाला । बेदरासी गेला रायापासीं ॥१२॥
जोहार मायबाप पुसती कोठील । तंव तो ह्मणे स्थळ मंगळवेढें ॥१३॥
दामाजीपंतांनीं रसद पाठविली । खलेती ओतिली अर्जदास्त ॥ १४ ॥
देखोनियां राजा संतोष पावला । ह्मणे व्यर्थ त्याला तलब केली ॥१५॥
काय तुझें नांव पुसती यंत्रधारी । तो ह्मणे बेगारी विठा कीं जी ॥ १६ ॥
पावल्याचा जाब द्यावा मायबाप । करोनि घेतों माप ह्मणती ते ॥ १७ ॥
पावल्याचा जाब दिधला लिहून । तसरीफ देऊन पाठविला ॥ १८ ॥
छत्री घोडा शिबिका आभरणांसहित । दिला सर्वें दूत पाठवूनी ॥१९॥

वाटे चुकामुक जाली याची त्यांची । ते आले तैसेची मंगळवेढा ॥२०॥
दामाजीपंतासी बेदरासी नेलें । राजा ह्मणे जालें कवतुक ॥ २१ ॥
काल गेला विठा बेगारी देऊन । तसरीफ देऊन जाब दिला ॥ २२ ॥
काय तुमचें काज सांगा जी सत्वर । बोला जी निर्धार वचनाचा ॥ २३ ॥
कैंचा विठा कोण पाठविला कधीं । काढोनियां आधीं जाब दिला ॥२४॥
पाहातांचि जाब हृदय फुटलें । नयन निद्दारले राजा देखे ॥ २५ ॥
सांवळें सकुमार रूप मनोहर । माथां तेणें भार वाहियेला ॥ २६ ॥
दामाजीपंतासी रायें सन्मानिलें । तो ह्मणे आपुलें कर्म नव्हे ॥ २७ ॥
आतां तुमची सेवा पुरे जी स्वामिया । शिणविलें सखया विठोबासी ।२८
निरोप घेऊनी आला स्वस्थळासी । उदास सर्वांसीं होता जाला ॥ २९ ॥
दामाजीपंतांनीं सेविली पंढरी । ऐसा त्याचा हरि निकटवृत्ति ॥ ३० ॥
तुका ह्मणे विठो अनाथ कैवारी । नुपेक्षी हा हरि दासालागीं ॥ ३१ ॥

---

# रामचरित्र

## सीतेचा शोक.

॥ ३९९ ॥

अशोकाच्या वनीं सीता शोक करी । कांहो अंतरले रघुनाथ दुरी । येउनि गुंफेमाजी दुष्टें केली चोरी । कांहो मज आणिलें अवघड लंकापुरी ॥ १ ॥
सांगा वो त्रीजटे सखिये ऐसी मात । देईल कां नेदी भेटी रघुनाथ । मन उतावीळ जाला दुरी पंथ । राहों न सके प्राण माझा कुडी आंत ॥२॥
काय दुष्ट आचरण होतें म्यां केलें । तीर्थ व्रत होतें कवणाचें भंगीलें । गाईवत्सा पतीपुरुषा विघडिलें । न कळे वो संचित चरण अंतरले ॥३॥
नाडियेलें आशा मृगकांतिसोनें । धाडिलें रघुनाथा पाठिलागे तेणें । उलं-घिली आज्ञा भाव काय मी जाणें । देखुनी सूनाट घेउनि आलें सुनें ॥४॥
आईं मूळ मारग लाग अणीक सोये।एकाविण नामें रघुनाथाच्या माये।उ-

पटी पक्षिया एक देउनि पायोंउदकवेळ्यामध्यें तेथें चाले काये ॥५॥ जन-काची नंदिनी दु:खें ग्लानी थोरी।चुकली कुरंगिणी मेळा तैशापरी। संमोखी त्रीजटा स्थिर स्थिर वो करी। घेईल तुकयास्वामी राम लंकापुरी ॥६॥

## रावणाचा वध.

॥ ४०० ॥

पैल आला राम रावणासी सांगती । काय निद्सुरा निजलासी भूपति ॥ १ ॥ अवघे लंकेमाजी जाले रामाचे दूत । व्यापिलें सर्वत्र बाहेरी भीतरी आंत ॥ २ ॥ अवघे अंगलग तुझे वधियेले वीर । होई शरणागत किंवा युद्धासी सादर ॥ ३ ॥ तुका ह्मणे एक्या भावें रामासी भेटी । करूनी घेई आतां संवंधेंसीं तुटी ॥ ४ ॥

॥ ४०१ ॥

समरंगणा आला । रामें रावण देखिला ॥१॥ कैसे भीडतील दोन्ही । नांव सारूनियां रणीं ॥ २ ॥ प्रेमसुखाचें संधान । बाणें निवारती बाण ॥ ३ ॥ तुकयांस्वामी रघुनाथ । वर्म जाणोनि केली मात ॥ ४ ॥

॥ ४०२ ॥

केला रावणाचा वध । अवघा तोडिला संबंध ॥१॥ लंकाराज्य बिभीषणा । केली चिरकाळ स्थापना ॥ २ ॥ औदार्याची सीमा । काय वर्णू रघुरामा ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझा दाता । रामें सोडविली सीता ॥ ४ ॥

रामराज्य ॥ ४०३ ॥

आनंदले लोक नरनारी परिवार । शंखभेरीतुरें वाद्यांचे गजर ॥१॥ आनंद जाला अयोध्येसी आले रघुनाथ । अवघा जयजयकार आळंगिला भरत ॥ २ ॥ करिती अक्षवाणें ओंवाळिती रघुवीरा । लक्ष्मीसहित लक्ष्मण दुसरा ॥ ३ ॥ जालें रामराज्य आनंदलीं सकळें । तुका ह्मणे गाईवत्सें नरनारी बाळें ॥ ४ ॥

॥ ४०४ ॥

जालें रामराज्य काय उणें आह्मांसी । धरणी वरी पीक गाई वोळल्या हैसी ॥ १ ॥ राम वेळोवेळां आह्मी गाऊं ओवियें । दळितां कांडितां

जेवितां गे बाइये ॥ २ ॥ स्वप्नींही दुःख कोणी न देखे डोळां । नामाच्या गजरें भय सुटलें काळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे रामें सुख दिधलें अपुलें । तयां गर्भवासीं येणें जाणें खुंटलें ॥ ४ ॥

## रामाचा व त्याच्या नामाचा महिमा.

॥ ४०५ ॥

रामा वनवास । तेणें वसे सर्व देश ॥ १ ॥ केलें नामाचें जतन । समर्थ तो नव्हे भिन्न ॥ २ ॥ वनांतरीं रडे । ऐसे पुराणीं पवाडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऋषिनेम । ऐसा कळोनी कां भ्रम ॥ ४ ॥

॥ ४०६ ॥

रामरूप केली। रामें कौसल्या माउली ॥ १ ॥ राम राहिला मानसीं । ध्यानीं चिंतनीं जयासी ॥ २ ॥ राम होय त्यासी । संदेह नाहीं भरंवसा ॥ ३ ॥ अयोध्येचे लोक । राम जाले सकळीक ॥४॥ स्मरतां जानकी । रामरूप जाले कपि ॥५॥ रावणेंशीं लंका । राम आपण जाला देखा ॥ ६ ॥ ऐसा नित्य राम ध्याय । तुका वंदी त्याचे पाय ॥ ७ ॥

॥ ४०७ ॥

साही शास्त्रां अतिदुरी । तो परमात्मा श्रीहरि । तो दशरथाचे घरीं । क्रीडतो राम ॥ १ ॥ शिवाचें निजध्येय । वाल्मीकाचें निजगुह्य । तो भिल्लटीचीं फळें खाय । श्रीराम तो ॥ २ ॥ योगियांचे मनीं । नातुडे चिंतनीं । तो वानरांचे कानीं । गोष्टी सांगे ॥ ३ ॥ चरणें शिळा उद्धरी । नामें गणिका तारी । तो कोळिया घरीं । पाहुणा राम ॥४॥ क्षणएक सुरवरा । नातुडे नमस्कारा । तो रिसां आणि वानरां । क्षेम दे राम ॥ ५ ॥ राम सांवळा सगुण । राम योगियांचें ध्यान । राम राजीवलोचन । तुका चरण वंदितो ॥ ६ ॥

॥ ४०८ ॥

रामराम उत्तम अक्षरें । कंठीं धरिलीं आपण शंकरें ॥ १ ॥ कैसीं तारक उत्तम तिहीं लोकां । हळाहळ शीतळ केलें शिवा देखा ॥ २ ॥

हाचि मंत्र उपदेश भवानी । तिच्या चुकल्या गर्भोदियोनि ॥ ३ ॥ जुनाट नागर नीच नवें । तुका ह्मणे म्यां वरिलें जीवें भावें ॥ ४ ॥

॥ ४०९ ॥

अहल्या जेणें तारिली रामें । गणिका परलोका नेली नामें ॥ १ ॥ रामहरे रघुराजहरे । रामहरे महाराजहरे ॥ २ ॥ कंठ शीतळ जपतां शूळपाणी । राम जपतां अविनाश भवानी ॥ ३ ॥ तारक मंत्र श्रवण काशी । नाम जपतां वाल्मीक ऋषि ॥ ४ ॥ नामजप बीजमंत्र नळा । सिंधु तरती ज्याच्या प्रतापें शिळा ॥ ५ ॥ नामजप जीवन मुनि-जना । तुकयास्वामी रघुनंदना ॥ ६ ॥

॥ ४१० ॥

तारी ऐसें जड । उदकावरी जो दगड ॥ १ ॥ तो हा न करी तें काई । कां रे लीन न व्हा पायीं ॥ २ ॥ शिळा होती मनुष्य जाली । ज्याच्या चरणाचे चाली ॥ ३ ॥ वानरां हातीं लंका । घेवविली ह्मणे तुका ॥ ४ ॥

॥ ४११ ॥

मी तों अल्प मतिहीन । काय वर्णू तुझे गुण । उदकीं तारिले पाषाण । हें महिमान नामाचें ॥ १ ॥ नाम चांगलें चांगलें । माझे कंठीं राहो भलें । कपिकुळ उद्धरिलें । मुक्त केलें राक्षसां ॥ २ ॥ द्रोणागिरि कपि हातीं । आणविला सीतापति । थोर केली ख्याति । भरतभेटीसमयीं ॥ ३ ॥ शिळा होती मनुष्य जाली । थोर कीर्ति वाखाणिली । लंका दहन केली । हनुमंतें काशानें ॥ ४ ॥ राम जानकीजीवन । योगियांचें नि-जध्यान । राम राजीवलोचन । तुका चरण वंदितो ॥ ५ ॥

॥ ४१२ ॥

राम ह्मणतां तरे जाणता नेणता । हो का यातिभलता कुळहीन ॥ १ ॥ राम ह्मणतां न लगे आणीक सायास । केले महादोष तेही जळती ॥ २ ॥ राम ह्मणे तया जवळ नये भूत । कैंचा यमदूत ह्मणतां राम ॥ ३ ॥ राम ह्मणतां तरे भवसिंधु पार । चुके येरझार ह्मणतां राम ॥ ४ ॥ तुका ह्मणे हें सुखाचें साधन । सेवीं अमृतपान एका भावें ॥ ५ ॥

॥ ४१३ ॥

राम ह्मणतां रामचि होइजे। पदीं बैसोन पदवी घेइजे ॥१॥ ऐसें सुख वचनीं आहे। विश्वासें अनुभव पाहें ॥२॥ रामरसाचिया चवी। आन रस रुचती केवीं ॥३॥ तुका ह्मणे चाखोनी सांगें। मज अनुभव आहे अंगें ॥४॥

॥ ४१४ ॥

राम ह्मणे ग्रासोग्रासीं। तोचि जेविला उपवासी ॥१॥ धन्य धन्य तें शरीर। तीर्थाव्रतांचें माहेर ॥२॥ राम ह्मणे करितां धंदा। सुखसमाधि त्या सदा ॥३॥ राम ह्मणे वाट चाली। यज्ञ पाउलापाउलीं ॥४॥ राम ह्मणे भोगीं त्यागीं। कर्म न लिंपे त्या अंगीं ॥५॥ ऐसा राम जपे नित्य। तुका ह्मणे तो जीवन्मुक्त ॥६॥

हनुमंतस्तुति ॥ ४१५ ॥

केली सीताशुद्धि। मूळ रामायणा आधीं ॥ १ ॥ ऐसा प्रतापी गहन। सुरां सकळ मोहन ॥२॥ जाऊनी पाताळा। केली देवीची अवकळा ॥३॥ राम लक्षुमण। नेले आणिले चोरून ॥ ४ ॥ जोडूनियां कर। उभा सन्मुख समोर ॥ ५ ॥ तुका ह्मणे जपें। वायुसुता जाती पापें ॥ ६ ॥

॥ ४१६ ॥

हनुमंत महाबळी। रावणाची दाढी जाळी ॥ १ ॥ तया माझा नमस्कार। वारंवार निरंतर ॥ २ ॥ करोनी उड्डाण। केलें लंकेचें शोधन ॥ ३ ॥ जाळियेली लंका। धन्य धन्य ह्मणे तुका ॥ ४ ॥

॥ ४१७ ॥

काम घातला बांदोडी। काळ केला देशधडी ॥१॥ तया माझें दंडवत। कपिकुळीं हनुमंत ॥ २ ॥ शरीर वज्राऐसें। कवळी ब्रह्मांड जो पुच्छें ॥ ३ ॥ रामरायाच्या सेवका। शरण आलों ह्मणे तुका ॥ ४ ॥

॥ ४१८ ॥

शरण शरण जी हनुमंता। तुज आलों रामदूता ॥१॥ काय भक्तीच्या त्या वाटा। मज दावाव्या सुभटा ॥२॥ शूर आणि धीर। स्वामिकाजीं तूं सादर ॥ ३ ॥ तुका ह्मणे रुद्रा। अंजनीचिया कुमरा ॥ ४ ॥

शिवावर अभंग ॥ ४१९ ॥

काय धर्म नीत । तुम्हां शिकवावें हित ॥१॥ अवघें रचियेलें हेळा। लीळा ब्रह्मांड सकळा ॥२॥ नाम महादेव। येथें निवडला भाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे वेळे । माझें तुम्हां कां न कळे ॥ ४ ॥

॥ ४२० ॥

भांडावें तें गोड । पुरे सकळ ही कोड ॥१॥ ऐसा घरींचा या भोळा। ठावा निकटां जवळां ॥ २ ॥ हाक देतां दारीं । येती जवळी सामोरीं ॥३॥ तुका ह्मणे शिवें । मागितलें हातीं द्यावें ॥४॥

सेनावर अभंग ॥ ४२१ ॥

सेत करा रे फुकाचें । नाम विठोबारायाचें ॥ १ ॥ नाहीं वेठी जेवा सारा। जाहाती नाहीं ह्मणियारा ॥२॥ सारिक नाहीं रे दुसरा। धनी सारा तुझा तूं ॥ ३॥ जपतप नांगरणी। न लगे आटी दुनवणी ॥४॥ कर्म कुळवणी। न लगे धर्मपाळी दोन्ही ॥ ५ ॥ ज्ञानपाभारी ती फणी। न लगे करावी पेरणी ॥६॥ बीज न लगे मांचिताचें। पीक पिकलें ठायींचें ॥ ७ ॥ नाहीं यमाचें चोरटें। विठ्ठल पारोऱ्याच्या नेटें ॥८॥ पीक न वजे हा भरवसा। करी उद्योग तो पिसा ॥ ९ ॥ सराई सर्व काळ। वांयां न वजे घटिकापळ ॥१०॥ प्रेम पिकलें अपार। नाहीं सांटवावया थार ॥११॥ ऐसी जोडी जो चुकला। तुका ह्मणे धिग त्याला ॥१२॥

॥ ४२२ ॥

वोणव्या सोंकरीं। सेत खादलें पाखरीं ॥१॥ तैसा खाऊं नको दगा। निदसुरा राहुनी जागा ॥ २ ॥ चोरासवें वाट। चालोनि केलें तळपट ॥३॥ डोळे झांकूनी राती। कूपीं पडे दिवसा जोती ॥ ४ ॥ पोसी वांज गाय। तेथें कैंची दूध साय ॥५॥ फुटकी सांगडी। तुका ह्मणे न पवे थडी ॥६॥

॥ ४२३ ॥

सेत आलें सुगी सांभाळावे चारी कोन। पिका आलें परी केलें पाहिजे जतन ॥१॥ सोंकरीं सोंकरीं विसावा तोंवरी।नको खाऊं उभें आहे तों ॥२॥

गोफणेसी गुंडा घालीं पागोऱ्याच्या नेटें । पळती हाहाकारें अवघीं पाखरांचीं थाटें ॥३॥ पेटवूनी आगटी राहें जागा पालटूनि । पडिलिया मानी बळ बुद्धि व्हावीं दोनी ॥ ४ ॥ खळे दानें विश्व सुखी करीं होतां रासी । सारा सारूनियां ज्याचे भाग देई त्यासी ॥ ५ ॥ तुका ह्मणे मग नाहीं आपुलें कारण । निज आलें हातां भूस सांडिलें निकण ॥ ६ ॥

घोंगड्याचे अभंग ॥ ४२४ ॥

ठकिलें काळा मारिली दडी । दिली कुडी टाकोनियां ॥१॥ पांघुरलों बहु काळें । घोंगडें वळें सांडवलें ॥ २ ॥ नये ऐसा लाग वरी । परतें दुरी लपालें ॥३॥ तुका ह्मणे आड सेवा । लाविला हेवा धांदली ॥ ४ ॥

॥ ४२५ ॥

घोंगडियांचा पालट केला । मुलांमुलां आपुल्यांत ॥१॥ कान्होबा तो मीच दिसें । लाविलें पिसें संवगडियां ॥२॥ तो बोलें मी उगाच बैसें।अनारिसें न दिसे ॥३॥ तुका ह्मणे दिलें सोंग । नेदी व्यंग जाऊं देऊं ॥ ४ ॥

॥ ४२६ ॥

खेळों लागलों सुरकवडी । माझी घोंगडी हारपली ॥१॥ कान्होबाचे पडिलों गळां।येई गोपाळा देई झाडा॥२॥मी तो हागे उघडा जालों।अवघ्या आलों बाहेरी ॥३॥ तुका ह्मणे बुद्धिकाची। नाहीं ठायींची मजपाशीं ॥४॥

॥ ४२७ ॥

घोंगडियांची एकी राशी । त्याचपाशीं तेंही होतें ॥ १ ॥ माझियाचा माग दावा । केला गोवा उगवों द्या॥२॥ व्हावें ऐसें निसंतान। घेईन आन तुजपाशीं ॥३॥ तुका ह्मणे लाहान मोठा । सांडा ताठा हा देवा ॥ ४ ॥

॥ ४२८ ॥

नाहीं तुझें उगा पडत गळां। पुढें गोपाळा जाऊं नको ॥१॥ चाहाड तुझे दाविन घरीं । बोलण्या उरी नाहीं ऐसी ॥२॥ तुझां आह्मां पडदा होता। खरला आतां सरोबरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे उरती गोठी । पहिली मिठी न सुटे ॥ ४ ॥

॥ ४२९ ॥

तुह्मां आह्मां उरी तोंवरी। जनाचारी आहे तैसी ॥ १ ॥ माझें घोंगडें टाकुन देई । एके ठायीं मग असों ॥ २ ॥ विरोधानें पडे तुटी । कपट पोटीं नसावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं जाणता हरी । मज बेव्हारीं बोलविसी ॥ ४ ॥

॥ ४३० ॥

मुळींचा तुह्मां लागला चाळा । तो गोपाळा न संडा ॥ १ ॥ द्यावें त्याचें देणेंचि नाहीं । येचि वाहीं देखतसों ॥ २ ॥ माझी तरी घोंगडी मोठी । गांडीची लंगोटी सोडीस ना ॥ ३ ॥ तुका ह्मणे म्यां सांडिली आशा । हुंगिला फांसा येथूनियां ॥ ४ ॥

॥ ४३१ ॥

घोंगडियास घातली मिठी । न सोडी साटी केली जीवें ॥ १ ॥ हां गे चोर धरा धांवा कोणी । घरांत राहाटे चहूं कोनीं ॥ २ ॥ नोळखवे म्यां धरिला हातीं । देहा दीप माय लाविली वाती ॥ ३ ॥ न पावे धांवणें मारितो हाका । जनाचारीं तुका नागवला ॥ ४ ॥

॥ ४३२ ॥

आतां मी देवा पांघरों काई । भिकेचें तेंहि उरेचि ना ॥ १ ॥ सदैव दुबळें नेणे चोर । देखोनि सुनाट फोडितो घर ॥ २ ॥ नाहीं मजपाशीं फुटकी फोडी । पांचांनीं घोंगडी दिली होती ॥ ३ ॥ तुका ह्मणे जना वेगळें जालें । एकचि नेलें एकल्याचें ॥ ४ ॥

॥ ४३३ ॥

मी माझें करीत होतों जतन । भीतरिल्या चोरें घेतलें खान ॥ १ ॥ मज आल्याविण आधींच होता । मज न कळतां मजमाजी ॥ २ ॥ घोंगडें नेलें घोंगडें नेलें । उघडें केलें उघडेंचि ॥ ३ ॥ तुका ह्मणे चोरटाचि जाला साव । सहजचि न्याय नाहीं तेथें ॥ ४ ॥

॥ ४३४ ॥

घोंगडें नेलें सांगों मी कोणा । दुबळें माझें नाणीती मना ॥ १ ॥
पुढें तें मज न मिळे आतां । जवळी सत्ता दाम नाहीं ॥ २ ॥
झेटे महाजन ऐका कोणी । घोंगडियाची करा शोधणी ॥ ३ ॥
घोंगडियाचा करा बोभाट । तुका ह्मणे जंव भरला हाट ॥ ४ ॥

॥ ४३५ ॥

माझें घोंगडें पडिलें ठायीं । माग तया पायीं सांपडला ॥ १ ॥
चोर तो भला चोर तो भला । पाठिसी घातला पुंडलिकें ॥ २ ॥
चोर कुठोरी एकेचि ठायीं । वेगळें पाहावें न लगे कांहीं ॥ ३ ॥
आणिकांचींही चोरलीं आधीं । माझें तयामधीं मेळविलें ॥ ४ ॥
आपल्या आपण शोधिलें तिहीं । करीन मीही तेचि परी ॥ ५ ॥
तुका ह्मणे माझें हितची जालें । फाटकें जाऊन धडकें आलें ॥ ६ ॥

---

## शाक्तावर अभंग.

॥ ४३६ ॥

टेंवकारूनी दृष्टि लावुनियां रंग । दावी झगमग डोळ्यांपुढें ॥ १ ॥
ह्मणती शिष्यासी लागली समाधि । लटकीची उपाधि झकविती॥२॥
दीपाचिया ज्योती कोंडियेलें तेज । उपदेश सांजरात्रीमाजी ॥ ३ ॥
रांगोळिया चौक शृंगारुनी वोजा । आवरण पूजा यंत्र करी ॥ ४ ॥
पडदा लावोनियां दीप चहूं कोनीं । बैसोनि आसनीं मुद्रा दावी॥५॥
नैवेद्यासी ह्मणे करावें पक्वान्न । पात्रासी दिव्यान्न परवडी ॥ ६ ॥
आला उपदेश कवळ घ्या रे मुखीं । आपोशम शेखीं बुडविलें ॥७॥
पाषांड करोनी मांडिली जीविका । बुडवी भाविकां लोकांप्रती ॥८॥
कायावाचामनें सोडवी संकल्प । गुरु गुरु जप प्रतिपादी ॥ ९ ॥
शुद्ध परमार्थ बुडविला तेणें । गुरुत्वभूषणें भोग भोगी ॥ १० ॥
विधीचा ही लोप बुडविला वेद । शास्त्रांचा हि बोध हरविला॥११॥

योगाची धारणा नाहीं प्राणायाम। सांडी यम नेम नित्यादिक ॥१२॥
वैराग्याचा लोप हरिभजनीं विक्षेप। वाढविलें पाप मतिलंडें ॥१३॥
तुका ह्मणे गेलें गुरुत्व गुखाडी। पूर्वजांसी धाडी नरकवासा ॥१४॥

॥ ४३७ ॥

शाक्त गधडा जये देशीं। तेथें राशी पापाच्या ॥ १ ॥ सुकृताचा उद्दो केला। गोंधळ घाला इंद्रियें ॥ २ ॥ क्रोधरूपें वसे काम। तीर्थ नाम जपतसे ॥ ३ ॥ मद्यभक्षण मांगिणजाती। विटाळ चित्तीं सांटविला ॥४॥ स्तवूनियां पूजी रांड। न लजे भांड दाढीसी॥५॥ तुका ह्मणे भगवती। नेईल अंतीं आपणापें ॥ ६ ॥

॥ ४३८ ॥

राजा प्रजा द्वाड देश। शाक्त वास करिती तो ॥ १ ॥ अधर्मांचें उबड पिके। धर्म रंक ते गांवीं ॥ २ ॥ न पिके भूमि कांपे भारें। मेघ वारें पीतील॥ ३ ॥ तुका ह्मणे अवघीं दुःखें। येती सुखें वस्तीसी ॥ ४ ॥

॥ ४३९ ॥

ऐसें कलियुगाच्या मुळें। जालें धर्मांचें वाटोळें ॥ १ ॥ सांडूनियां रामराम। ब्राह्मण ह्मणती दोमदोम ॥२॥ शिवों नये तीं निळीं। वस्त्रें पांघरती काळीं ॥३॥ तुका ह्मणे वृत्ति। सांडुनि गदा मागत जाती ॥४॥

॥ ४४० ॥

अवघ्या पापें घडला एक। उपासक शक्तीचा ॥ १ ॥ त्याचा विटाळ नको अंगा। पांडुरंगा माझिया ॥ २ ॥ काम क्रोध मद्य अंगीं। रंगला रंगीं अवगुणी ॥३॥ करितां पाप न धरी शंका। ह्मणे तुका कोणीही॥४॥

॥ ४४१ ॥

वारितां बळें धरितां हातीं। जुलुमें जाती नरकामधीं ॥ १ ॥ रंडी-दासाप्रति कांहीं। उपदेश तोही चालेना ॥२॥ जन्म केला वाताहात। थोर घात ये ठायीं ॥३॥ तुका ह्मणे पंढरीनाथा। तुझी कथा दूषिती ॥४॥

॥ ४४२ ॥

शाक्तांची शूकरी माय । विष्ठा खाय विदीची ॥ १ ॥ तिची त्या पडली सवे । मार्गे धांवे ह्मणोनी ॥ २ ॥ शाक्तांची गाढवी माय । भुंकत जाय वेसदारा ॥ ३ ॥ तुका ह्मणे शिंदळीचे । बोलतां वाचे निंद्य ते ॥४॥

॥ ४४३ ॥

हरिहर सांडूनी देव । धरिती भाव क्षुल्लकीं ॥ १ ॥ ऐका त्यांची विटंबणा । देवपणा भक्तांची ॥२॥ अंगीं कवडे घाली गळां । परडी कळाहीन हातीं ॥३॥ गळां गांठा हिंडे दारीं । मनुष्य परी कुतरीं तीं ॥ ४ ॥ माथां सेंदुर दांत खाती । जेंगट हातीं सटवीचें ॥ ५ ॥ पूजिती विकट दोंद । पशु सोंड गजाची ॥ ६ ॥ ऐशा छंदें चुकलीं वाटा । भाव खोटा भजन ॥ ७ ॥ तुका ह्मणे विष्णुशिवा । वांचुनि देवा भजती ते ॥८॥

॥ ४४४ ॥

कांथासाटीं जालें ज्ञान । तेणें जन नाडिलें ॥ १ ॥ काम क्रोध बुचबुची । भुंके पुची ज्यालीची ॥ २ ॥ पूजेलागीं द्रव्य मागे । काय सांगे शिष्यातें ॥३॥ तुका ह्मणे कैंचें ब्रह्म । अवघा भ्रम विषयांचा ॥ ४ ॥

॥ ४४५ ॥

सांडूनियां पंढरीराव । कवणातें ह्मणों देव ॥ १ ॥ बहु लाज वाटे चित्ता । आणीकांतें देव ह्मणतां ॥ २ ॥ सांडूनियां हिरा । कोणें वेंचाव्या त्या गारा ॥३॥ तुका ह्मणे हरिहर । ऐसी सांडूनियां धुर॥४॥

॥ ४४६ ॥

बहुतें गेलीं वायां । न भजतां पंढरीराया ॥ १ ॥ करिती कामिकांची सेवा । लागोन मागोन खात्या देवा ॥ २ ॥ अवघियांचा धनी । त्यासी गेलीं विसरोनी ॥३॥ तुका ह्मणे अंतीं । पडती यमाचिया हातीं ॥४॥

॥ ४४७ ॥

असो आतां ऐसा धंदा । तुज गोविंदा आठवूं ॥ १ ॥ रक्षिता तूं होसी जरी । तरि काय येरीं करावें ॥२॥ काया वाचा मन पायीं । राहे ठायीं करूं तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे गाइन गीतीं । रूप चित्तीं धरूनियां ॥ ४ ॥

॥ ४४८ ॥

नाहीं आह्मी विष्णुदास । करीत आस कोणांची ॥ १ ॥ कां हे नष्ट करिती निंदा । नेणों सदा आमुची ॥२॥ असों भलते ठायीं मनें । समाधानें आपुल्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे करूं देवा । तुह्मी सेवा धंदा तो ॥४॥

## नाटाचे अभंग.

॥ ४४९ ॥

प्रथमारंभीं लंबोदर । सकळ सिद्धींचा दातार । चतुर्भुज फरशधर । न कळे पार वर्णितां ॥ १ ॥ तो देव नटला गौरीबाळ । पायीं बांधोनी घागऱ्या घोळ । नारदतुंबरसहित मेळ । सुटला पळ विघ्नांसी ॥ २ ॥ नटारंभीं थाटियला रंग । भुजा नाचवी हालवी अंग । सेंदुरविलेपनें चांग । मुगुटीं नाग मिरविला ॥ ३ ॥ जया मानवती देव ऋषि मुनि । पाहातां न पुरे डोळियां धणी । असुर जयाच्या चरणीं । आदि अवसानीं तोचि एक ॥ ४ ॥ सकळां सिद्धींचा दातार । जयाच्या रूपा नाहीं पार । तुका ह्मणे आमुचा दातार । भवसागर तारील हा ॥ ५ ॥

॥ ४५० ॥

प्रथम नमन तुज एकदंता । रंगीं रसाळ वोडवीं कथा । मति सौरस करीं प्रबळता । जेणें फिटे आतां अंधकार ॥ १ ॥ तुझिये कृपेचें भरितें । आणिक काय राहिलें तेथें । मारग सिद्धाच्यानि पंथें । पावविसी तेथें तूंचि एक ॥ २ ॥ आरंभा आदि तुझें वंदन । सकळ करितां कारण । देव ऋषि मुनि आदिकरून । ग्रंथ पुराण निर्माणी ॥ ३ ॥ काय वर्णू तुझी गति । एवढी कैंची मज मति । दीनानाथ तूज ह्मणती । करीं सत्य वचन हेंचि आपुलें ॥ ४ ॥ मज वाहावतां मायेच्या पुरीं । बुडतां डोहीं भवसागरीं । तुजवांचुनि कोण तारी । पाव झडकरी तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४५१ ॥

श्रीअनंता मधुसूदना । पद्मनाभा नारायणा । जगव्यापका जनार्दना । आनंदघना अविनाशा ॥ १ ॥ सकळदेवाधिदेवा । कृपाळुवा जी केशवा । महानंदा महानुभावा । सदाशिवा सहजरूपा ॥ २ ॥ चक्रधरा विश्वंभरा । गरुडध्वजा करुणाकरा । सहस्रपादा सहस्रकरा । क्षीरसागरा शेषशयना ॥ ३ ॥ कमलनयना कमळापती । कामिनीमोहना मदनमूर्ती । भवतारका धरित्या क्षिती । वामनमूर्ती त्रिविक्रमा ॥ ४ ॥ अगा ये सगुणा निर्गुणा । जगज्जनित्या जगज्जीवना । वसुदेवदेवकीनंदना । बाळरांगणा बाळकृष्णा ॥ ५ ॥ तुका आला लोटांगणीं । मज ठाव द्यावा जी चरणीं । हेंचि करीतसें विनवणी । भवबंधनीं सोडवावें ॥ ६ ॥

॥ ४५२ ॥

अगा ये मधुसूदना माधवा । अगा ये कमळापती यादवा । अगा श्रीधरा केशवा । अगा बांधवा द्रौपदीच्या ॥ १ ॥ अगा विश्वव्यापका जनार्दना । गोकुळवासी गोपिकारमणा । अगा गुणनिधि गुणनिधाना । अगा मर्दना कंसाचिया ॥ २ ॥ अगा सर्वोत्तमा सर्वेश्वरा । गुणातीता विश्वंभरा । अगा निर्गुणा निराकारा । अगा आधारा दीनाचिया ॥ ३ ॥ अगा उपमन्युसहाकारा । अगा शयना फणिवरा । अगा काळकृतांत असुरा । अगा अपारा अलक्षा ॥ ४ ॥ अगा वैकुंठनिवासा । अगा अयोध्यापति राजहंसा । अगा ये पंढरीनिवासा । अगा सर्वेशा सहजरूपा ॥ ५ ॥ अगा परमात्मा परमपुरुषा । अगा अव्यया जगदीशा । अगा कृपाळुवा आपुल्या दासा । तोडीं भवपाशा तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ४५३ ॥

अगा ए सांवळ्या सगुणा । गुणनिधिनाम नारायणा । आमची परिसा विज्ञापना । सांभाळीं दीना आपुलिया ॥ १ ॥ बहु या उदराचे कष्ट । आह्मांसी केलें कर्मभ्रष्ट । तुमची चुकविली वाट । करीं वटवट या निमित्त्यें ॥ २ ॥ जालों पांगिला जनासी । संसाराची आंदणी दासी ।

न कळे कधीं सोडविसी । दृढपाशीं बहु बांधलों ॥३॥ येथें तों नये आठव कांहीं । विसावा तो क्षण एक नाहीं । पडिलों आणिके प्रवाहीं । हित तों कांहीं दिसेचि ना ॥४॥ जीवित्व वेचिलें वियोगें । हिंडतां प्रवास वाउगें । कांहीं व्याधि पीडा रोगें । केलिया भोगें तडातोडी ॥५॥ माझा मीच जालों शत्रु । कैंचा पुत्र दारा कैंचा मित्रु । कासया घातला पसरु । अहो जगद्गुरु तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ४५४ ॥

क्षीराब्धिवासा शेषशयना । लीळाविग्रहा गोपिकारमणा । सगुण-स्वरूप भक्तभूपणा । गुणनिधाना गुप्तरूपा ॥ १ ॥ अनंत अवतार धरितिया । अखंडस्वरूपा करुणालया । अमरपाळका देवराया । हरीं भवभया भक्तांचिया ॥२॥ सर्वव्यापका सर्वातीता । गजेंद्ररक्षका वैकुंठनाथा । भोळ्या भक्तांसी सौख्यदाता । तुजविण सर्वथा असेचि ना ॥ ३ ॥ चित्त-चाळका चैतन्यघना॥भक्तकैवारी असुरमर्दना । भक्ताभिमानी नारायणा । जगज्जीवना पांडुरंगा ॥४॥ ब्रह्मादिकांचा निजजनिता । सकळकारण अकर्ता । अणुरेणुव्याप्यभरिता । पावन पतिता तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४५५ ॥

वासुदेवा दीनानाथा । कमललोचना श्रीअच्युता । निजभक्तांसी सौख्यदाता । तुजविण सर्वथा असेचि ना ॥१॥ विठ्ठला अनंता विश्वपती । विराट्स्वरूपा वामनमूर्ती । ब्रह्मादिकर्ता वैकुंठपती । अगम्यस्थिति वेदशास्त्रा ॥२॥ अद्वैतअखंडभरिता । विश्वबाहु अपरिमिता । विश्वचक्षु विश्वदेवता । आदिपिता ब्रह्मयाचा ॥३॥ भक्ताधीना भवभयभंगा । परम-पुरुषा पांडुरंगा । अनादि अखिलअंतरंगा । संगा असंगा वेगळाचि ॥४॥ हें विराट्स्वरूप भोळिया भक्तांसी । सर्वथा न कळे हृषीकेशी । सगुण रूप धरूनी त्यांसी । लावीं भजनासी तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४५६ ॥

देवा तूं आमचा कृपाळ । भक्तप्रतिपाळ दीनवत्सळ । माय तूं माउली स्नेहाळ । भार सकळ चालविसी ॥१॥ तुज लागली सकळ

चिंता । राखणें लागे वांकडें जातां । पुढती निरविसी संतां । नव्हे विसंबतां धीर तुज ॥२॥ आह्मां भय चिंता नाहीं धाक । जन्म मरण कांहींएक । आला इहलोकीं परलोक । आलें सकळैकवैकुंठ ॥ ३ ॥ न कळे दिवस कीं राती । अखंड लागलीसे ज्योति । आनंदलहरीची गति । वर्णू किती तया सुखा ॥४॥ तुझिया नामाचीं भूषणें । तों यें मज लेथविलीं लेणें । तुका ह्मणे तुझिया गुणें । काय तें उणें एक आह्मां ॥५॥

॥ ४५७ ॥

देवा तूं कृपाकरुणासिंधु । होसी मायबाप आमचा बंधु । जीवनसिद्धि साधनसिंधु । तोडिसी भवबंधु काळपाश ॥ १ ॥ शरणागता वज्रपंजर । अभयदाना तूं उदार । सकळां देवा तूं अगोचर । होसी अविकार अविनाश ॥ २ ॥ भागलीं स्तुति करितां फार । तेथें मी काय तें गव्हार । जाणावया तुझा हा विचार । नको अंतर देऊं आतां ॥ ३ ॥ नेणें भाव परि ह्मणवीं तुझा । नेणें भक्ति परि करितों पूजा । आपुल्या नामाचिया काजा । तुज केशीराजा लागे धांवणें ॥४॥ तुझिया बळें पंढरीनाथा । जालों निर्भर तुटली व्यथा । घातला भार तुझिया माथां । न भीं सर्वथा तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४५८ ॥

ऐसी हे गर्जवूं वैखरी । केशव मुकुंद मुरारी । राम कृष्ण नामें बरीं । हरी हरी दोष सकळ ॥ १ ॥ जनार्दना जगजीवना । विराटस्वरूपा वामना । महदादि मधुसूदना । भवबंधना तोडितिया ॥२॥ चक्रपाणी गदाधरा । असुरमर्दना वीर्यवीरा । सकळमुगुटमणि शूरा । अहो दातारा जगदानिया ॥ ३ ॥ मदनमूर्ती मनमोहना । गोपाळगोपिकारमणा । नटनाट्यकौशल्य कान्हा । अहो संपन्ना सर्वगुणें ॥४॥ गुणवंता आणि निर्गुणा । सर्वसाक्षी आणि सर्वजाणा । करोनी अकर्ता आपणा । नेदी अभिमाना आतळों ॥ ५ ॥ कासयानें घडे याची सेवा । काय एक समर्पावें या देवा । वश्य तो नव्हे वांचूनी भावा । पाय जीवावेगळे न करी तुका ॥ ६ ॥

॥ ४५९ ॥

विठ्ठल भीमातीरवासी । विठ्ठल पंढरीनिवासी । विठ्ठल पुंडलिकापासीं । कृपादानाविशीं उदार ॥ १ ॥ विठ्ठल स्मरणा कोंवळा । विठ्ठल गौरवीं आगळा । आधार ब्रह्मांडा सकळा । विठ्ठल लीळाविग्रही ॥२ उभाचि परि न मानी सीण । नाहीं उद्धरितां भिन्न । समर्थाचे घरीं एकचि अन्न । आर्तभूता क्षणोक्षणा सांभाळी ॥ ३ ॥ रुचीचे प्रकार । आणिताती आदरें । कोठें ही न पडे अंतर । थोरां थोर धाकुट्यां धाकुटा ॥४॥ करितां बळ धरितां नये । झोंबतां डोळे मनेंच होय । आपुल्या उद्देशाची सोय । जाणे हृदयनिवासी ॥५॥ पान्हा तरी आल्या अंतर तेथें । तों नाहीं भरिलें रितें । करितों सेवन आइतें । तुका चित्तें चित्त मेळवूनी ॥ ६ ॥

॥ ४६० ॥

विठ्ठल आमचें जीवन । आगमनिगमाचें स्थान । विठ्ठल सिद्धीचें साधन । विठ्ठल ध्यान विसावा ॥ १ ॥ विठ्ठल कुळींचें दैवत । विठ्ठल वित्त गोत चित्त । विठ्ठल पुण्य पुरुषार्थ । आवडे मात विठ्ठलाची २ विठ्ठल विस्तारला जनीं । सप्तही पाताळें भरूनी । विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं । विठ्ठल मुनिमानसीं ॥ ३ ॥ विठ्ठल जीवाचा जिव्हाळा । विठ्ठल कृपेचा कोंवळा । विठ्ठल प्रेमाचा पुतळा । लावियेलें चाळा विश्व विठ्ठलें ॥ ४ ॥ विठ्ठल बाप माय चुलता । विठ्ठल भगिनी आणि भ्राता । विठ्ठलेंविण चाड नाहीं गोता । तुका ह्मणे आतां नाहीं दुसरें ॥५

॥ ४६१ ॥

तुळसीमाळा घालुनी कंठीं । उभा विटेवरी जगजेठी । अवलोकोनी पुंडलीका दृष्टी । असे भीमातटीं पंढरीराय ॥ १ ॥ भुक्तिमुक्ति जयाच्या कामारी । रिद्धिसिद्धि वोळगती द्वारीं । सुदर्शन घरटी करी । काळ कांपे दुरी धाकें तया ॥ २ ॥ जगज्जननी असे वामभागीं,

भीमकी शोभली अर्धांगीं । जैसी विद्युल्लता झमके मेघीं । दर्पणें अंगीं मदा दोष ॥ ३ ॥ सुखसागर परमानंदु । गोपीगोपाळां गोधनां छंदु । पक्षिश्वापदां जयाचा वेधु । वाहे गोविंदु पांवा छंदें ॥ ४ ॥ मुखमंडित चतुर्भुजा । मनमोहन गरुडध्वजा । तुका ह्मणे स्वामी माझा । पावे भक्तकाजा लवलाहीं ॥ ५ ॥

॥ ४६२ ॥

सेंदुरीं हें देवी दैवतें । कोण तीं पुजी भुतेंकेतें । आपुल्या पोटा जीं रडतें । मागती शितें अवदान ॥ १ ॥ आपुले इच्छे आणिकां पीडी । काय तें देईल बराडी । कळों ही आली तयाची जोडी । अल्प रोकडी बुद्धि अधरा ॥ २ ॥ दासीचा पाहुणेर उखीतें । धणी देईल आपुल्या हातें । करुणाभापण उचितें । हें तों रितें सतंत शक्तिहीन ॥३॥ काय तें थिल्लरींचें पाणी । ओठ न भिजे न फिटे धणी । सीण तरीं आर्दी अवसानीं । क्षोभे पुरश्चरणीं दिलें फळ ॥ ४ ॥ विलेपनें बुजविती तोंड । भार खोल वाहाती उदंड । करविती आपणयां दंड । ऐसियास भांड ह्मणे देव तो ॥ ५ ॥ तैसा नव्हे नारायण । जगव्यापक जनार्दन । तुका ह्मणे त्याचें करा चिंतन । वंदूं चरण येती सकळें ॥६॥

॥ ४६३ ॥

बरवें जालें आलों जन्मासी । जोड जोडिली मनुष्य देहा ऐसी । महालाभाची उत्तम रासी । जेणें सर्व सुखासी पात्र होइजे ॥ १ ॥ दिलीं इंद्रियें हात पाय कान । डोळे मुख बोलावया वचन । जेणें तूं जोडसी नारायण । नासे जीवपण भवरोग ॥ २ ॥ तिळेंतिळ पुण्य सांचा पडे । तरि हें बहुतां जन्मीं जोडे । नाम तुझें वाचेसी आतुडे । समागम घडे संतांचा ॥ ३ ॥ ऐसिये पावविलों ठायीं । आतां मी काई होऊं उतराई । येवढा जीव ठेवीन पायीं । तूं माझे आई पांडुरंगे ॥ ४ ॥ फेडियेला डोळियांचा कवळ । धुतला गुणदोषांचा मळ । खवूनी स्तनीं केलों सीतळ । निजविलों बाळ निजस्थानीं ॥ ५ ॥

नाहीं या आनंदासी जोडा। सांगतां गोष्टी लागती गोडा। आल्या आकारा आमुच्या वाडा। तुका ह्मणे भिडा भक्तांचिया ॥ ६ ॥

॥ ४६४ ॥

बरें जालें आजीवरी। नाहीं पडिलों मृत्यूचे आहारीं। वांचोन आलों एथवरी। उरलें तें हरी तुह्मां समर्पण ॥ १ ॥ दिला या काळें अवकाश। नाहीं पावलें आयुष्य नाश। कार्या कारण उरलें शेष। गेलें तें भूस जावो परतें ॥ २ ॥ बुडणें खोटें पावतां थडी। स्वप्नीं जाली ओढाओढी। नासली जागृतीची घडी। साच जोडी शेवटीं गोड घास ॥ ३ ॥ तुह्मांसी पावविली हांक। तेणें निरसला धाक। तुमचें भातें हें कवतुक। जे शरणागत लोक रक्षावे ॥ ४ ॥ रवीच्या नांवें निशीचा नाश। उदय होतांचि प्रकाश। आतां कैंचा आह्मां दोष। तूं जगदीश कैवारी ॥ ५ ॥ आतां जळो देह सुख दंभ मान। न करीं याचें साधन। तूं जगदीश नारायण। आलों शरण तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ४६५ ॥

मागुता हाचि जन्म पावसी। भोगिलें सुखदुःख जाणसी। हें तों न घडे रे सायासीं। कां रे अंध होसी जाणोनियां ॥ १ ॥ लक्ष चौऱ्याशी न चुके फेरा। गर्भवासीं यातना थोरा। येऊनी पडसी संदेहपुरा। वोळसा थोरा मायाजाळीं ॥ २ ॥ पशु काय पापपुण्य जाणती। उत्तम मध्यम भोग भोगिती। कांहीं एक उपजतां मरती। बहिरीं अंध होती पांगुळ मुकीं ॥ ३ ॥ नरदेह निधान लागलें हातीं। उत्तम सार उत्तम गति। होईन देवचि ह्मणती ते होती। तरि कां चित्तीं न धरावें ॥ ४ ॥ क्षण एक मन स्थिर करूनी। सावध होई डोळे उघडोनी। पाहें वेद बोलिले पुराणीं। तुका विनवणी करीतसे ॥ ५ ॥

॥ ४६६ ॥

जंव हें सकळ सिद्ध आहे। हात चालावया पाये। तंव तूं आपुलें स्वहित पाहें। तीर्थयात्रे जायें चुकों नको ॥ जंव काळ असे दुरी

ठेला । तंव तूं हरिगुण गायें आइक वहिला । मनीं भाव धरूनी भला । न वंचें त्याला चुकों नको ॥ २ ॥ जोडोनी धन न घालीं माती । ब्रह्मवृंदें पूजन यती । सत्य आचरण दया भूतीं । करीं सांगाती चुकों नको ॥ ३ ॥ दशा यौवन बाणली अंगीं । पांगिला नव्हें विषयसंगीं । काम क्रोध लोभ मोह त्यागीं । राहें संतसंगीं चुकों नको ॥ ४ ॥ मग तेथें न चले कांहीं । सत्ता संपदा राहेल ठायींच्या ठायीं । पुढें संचित जाईल ग्वाही । तुका ह्मणे तेही यमआज्ञा ॥ ५ ॥

॥ ४६७ ॥

शरीर दुःखाचें कोठार । शरीर रोगाचें भांडार । शरीर दुर्गंधीची थार । नाहीं अपवित्र शरीरा ऐसें ॥१॥ शरीर उत्तम चांगलें । शरीर सुखाचें घोंसुलें । शरीरें साध्य होय केलें । शरीरें साधलें परब्रह्म ॥२॥ शरीर विटाळाचें आळें । मायामोहपाशजाळें । पतन शरीराच्या मुळें । शरीर काळें व्यापिलें ॥ ३ ॥ शरीर सकळही शुद्ध । शरीर निर्धीचाही निध । शरीरें तुटे भवबंध । वसे मध्यें भोगी देव शरीरा ॥ ४ ॥ शरीर अविद्येचा बांधा । शरीर अवगुणाचा रांधा । शरीरीं वसे बहुत बाधा । नाहीं गुण सुधा एक शरीरीं ॥ ५ ॥ शरीरा सुख नेदावा भोग । न द्यावें दुःख न करीं त्याग । नव्हे वोखटें ना चांग । तुका ह्मणे वेग करीं हरिभजनीं ॥ ६ ॥

॥ ४६८ ॥

बहुत जाचलों संसारीं । वसें गर्भीं मातेच्या उदरीं । लक्ष चौऱ्याशी योनिद्वारीं । जालों भिकारी याचक ॥ १ ॥ जिणें पराधीन आणिकां हातीं । दृढ पाशीं बांधलों संचितीं । प्रारब्ध क्रियमाण सांगाती । भोवंडिती सत्ता आपुलिया ॥२॥ न भरे पोट नाहीं विसांवा । नाहीं नेम एक ठाव गांवा । नाहीं सत्ता न फिरे ऐसी देवा । लाही जीवा खापरीं तडफडी ॥ ३ ॥ काळ बहुत गेले ऐसिया रीतीं । आणीक पुढेंही नेणों किती । खंडणा नाहीं पुनरावृत्ति । मज कल्पांतीं तरी वेगळें ॥ ४ ॥ ऐसें

दु:ख कोण हरील माझें। कोणा भार घालूं आपुलें ओझें । भवसिंधुतारक नाम तुझें। धांवसी काजें आडलिया ॥५॥ आतां धांव घालीं नारायणा।म- अकारणें रंका दीना।गुण न विचारीं अवगुणा।तुका करुणा भाकीतसे॥६॥

॥ ४६९ ॥

संसारसिंधु हा दुस्तर । नुलंघवे उलंघितां पार । बहुत वाहाविलें दूर । न लगेचि तीर पैलथडी ॥ १ ॥ किती जन्म जाला फेरा । गणित नाहीं जी दातारा । पहिलों आवर्ती भोंवरा । बहुता थोरा वोळसिया ॥ २ ॥ वाढलों परि नेणती बुद्धि। नाहीं परतली धरिली शुद्धि । मग म्यां विचारावें कधीं । ऐसी संधि सांडूनियां ॥ ३ ॥ अनेक खाणीं आहार निद्रा। भयमैथुनाचाचि थारा । बाळत्व तारुण्य जरा। प्रधान पुरा भोग तेथें ॥ ४ ॥ ऐसीं उलंघूनी आलों स्थळें । बहु भोवंडिलों काळें । आतां हें उगवावें जाळें । उजेडाचे बळें दिव- साच्या ॥५॥ सांडीन या संसाराची वाट । बहु येणें भोगविले कष्ट । दावी सत्या ऐसें नष्ट । तुका ह्मणे भ्रष्ट जालों देवद्रोही ॥ ६ ॥

॥ ४७० ॥

विषयओढीं भुललें जीव । आतां यांची कोण करील कींव । नुपजे नारायणीं भाव । पावोनी ठाव नरदेह ॥ १ ॥ कोण सुख धरोनी संसारीं । पडोनी काळाचे आहारीं । माप या लागलें शरीरीं । जा- ळियावरी सळे ओढिती ॥२॥ बापुडीं होतील सेवटीं । आयुष्यासवें जालिया तुटी। भोगिले मागें पुढेंही कोटी। होईल भेटी जन्मासी ॥३॥ जुंतिले घाणां बांधोनि डोळे । मागें जोडी आर तेणेंही पोळे । चा- लिलों किती तें न कळे। दु:खें आरंबळे भूक तान ॥४॥ एवढें जयाचें निमित्त । प्रारब्ध क्रियमाण संचित । तें हें देव मानूनी अनित्य । न करिती नित्य नामस्मरण ॥५॥ तुका ह्मणे न वेंचतां मोल। तो हा यासी महाग विठ्ठल । वेंचितां फुकाचेचि बोल। केवढें खोल अभागिया॥६॥

॥ ४७१ ॥

इतुकें करीं भलत्या परी । परद्रव्य परनारी । सांडुनी अभिलाष अंतरीं । वर्ते वेव्हारीं सुखरूप ॥१॥ न करीं दंभाचा सायास । शांती राहें बहुवस । जिव्हे सेवीं सुगंधरस । न करीं आळस रामनामीं॥२॥ जनमित्र होई सकळांचा । अशुभ न बोलावी वाचा । संग न धरावा दुर्जनाचा । करीं संतांचा सायास ॥ ३ ॥ करिसी देवाविण आस । अवघी होईल निरास । तृष्णा वाढविसी बहुवस । कधीं सुखास न पवसी ॥ ४ ॥ धरूनी विश्वास करीं धीर । करितां देव हाचि नि-र्धार । तयाचा वाहे योगक्षेमभार । नाहीं अंतर तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४७२ ॥

कैसी करूं तुह्मी सेवा । ऐसें सांगावें जी देवा । कैसा आणूं अनु-भवा । होशी ठावा कैशापरी ॥ १ ॥ कर्मभ्रष्ट माझें मन । नेणें जप तप अनुष्ठान । नाहीं इंद्रियांसी दमन । नव्हे मन एकविध ॥ २ ॥ नेणें यातीचा आचार । नेणें भक्तीचा विचार । मज नाहीं संतांचा आधार । नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ ३ ॥ न सुटे मायाजाळ । नाहीं वैराग्याचें बळ । न जिंकवती सबळ । काम क्रोध शरीरीं ॥ ४ ॥ आतां राख कैसें तरी । मज नुपेक्षावें हरी । तुह्मीं ब्रीदें चराचरीं । तैसीं साच करीं तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४७३ ॥

काय आह्मी भक्ति करणें कैसी । काय एक वाहावें तुह्मांसी । अवघा भरोनी उरलासी । वाणीं खाणीं रसीं रूपीं गंधीं ॥ १ ॥ कसें करूं इंद्रियां बंधन । पुण्यपापाचें खंडण । काय व्रत करूं आचरण । काय तुजविण उरलें तें ॥२॥ काय डोळे झांकूनियां पाहूं । मंत्रजप काय ध्याऊं । कवणे ठायीं धरूनी भाव । काय तें वाव तुजविण ॥३॥ काय हिंडों कवण दिशा । कवणे ठायीं पाय ठेवूं कैसा । काय तूं नव्हेसी न कळे ऐसा।काय मी कैसा पाहों आतां॥४॥तुझिया नामाची सकळ।पूजा अर्चन मंत्र माळ । धूप दीप नैवेद्य फळ तांबूल । घेऊं पुष्पांजुळ तुका ह्मणे ॥५॥

॥ ४७४ ॥

आले हो संसारा तुह्मी एक करा । मुक्तिमारग हळूचि धरा । काळदंड कुंभयातना थोरा । कां रे अघोरा दृष्टकसी ना ॥१॥ नाहीं त्या यमासी करुणा । बाहेर काढितां कुडी प्राणा । ओढाळ सांपडे जैं धान्या । चोर यातना धरिजेतां ॥२॥ नाहीं दिलें पावेल कैसा । चालतां पंथ तेणें वळसा । नसेल ठाउकें ऐकतो कैसा । नेती बंद जैसा धरोनियां ॥३॥ क्षण एक नागीवा पायीं । न चलवे तया करितां कांहीं । ओढिती कांटवणा सोई । अग्निस्तंभीं बाही कवटाळविती ॥ ४ ॥ देखोनी अंगें कांपती । तये नदीमाजी चालविती । लागे ठाव न लगे बुडविती । वरी मारिती यमदंड ॥ ५ ॥ तानभूक न साहावे वेळ । तो राखिती कितीएक काळ । पिंड पाळूनी कैसा सीतळ । तो तप्तभूमीं ज्वाळ लोळविती ॥ ६ ॥ ह्मणउनी करा कांहीं सायास । व्हावेल तर व्हारे उदास । करवेल तर करा नामघोष । सेवा भक्तिरस तुका ह्मणे ॥ ७ ॥

॥ ४७५ ॥

हेंचि भवरोगाचें औषध । जन्म जरा तुटे व्याध । आणीक कांहीं नव्हे बाध । करील वध षड्वर्गा ॥ १ ॥ सांवळें रूप ल्यावें डोळां । सा चौ अठरांचा गोळा । पदर लागों नेदी खळा । नाममंत्रमाळा विष्णुसहस्र ॥ २ ॥ भोजना न द्यावें अन्न । जेणें चुके अनुपान । वरीच घेतल्याचा गुण । होईल जाण सत्यभाव ॥ ३ ॥ नये निघों आपुलिया घरा । बाहेर लागों नये वारा । बहु बोलणें तें सारा । संग दुसरा वर्जावा ॥ ४ ॥ पास तें एक द्यावें वरी । नवनीताची होईल परी । होईल गुसळिलें तें निवारी । सार भीतरी नाहीं तया ॥ ५ ॥ न्हावें अनुतापीं पांघरें दिशा । स्वेद निघों दे अवघी आशा । होसील मागें होतासी तैसा । तुका ह्मणे दशा भोगीं वैराग्य ॥ ६ ॥

॥ ४७६ ॥

अवघ्या दशा येणें साधती । मुख्य उपासना सगुणभक्ति । प्रगटे हृदयींची मूर्ति । भावशुद्धि आणोनियां ॥१॥ बीज आणि फळ हरीचें नाम । सकळ पुण्य सकळ धर्म । सकळां कळांचें हें वर्म । निवारी श्रम सकळही ॥२॥ जेथें कीर्तन हें नामघोष । करिती निर्लज्ज हरीचे दास । सकळ वोथंबले रस । तुटती पाश भवबंधाचे ॥ ३ ॥ येती अंगा वसती लक्षणें । अंतरीं देवें धरिलें ठाणें । आपणचि येती तयाचे गुण । जाणें येणें खुंटे वस्तीचें ॥ ४ ॥ न लगे सांडावा आश्रम । उपजले कुळींचे धर्म । आणीक न करावे श्रम । एक पुरे नाम विठोबाचें ॥ ५ ॥ वेदपुरुष नारायण । योगियांचें ब्रह्म शून्य । मुक्त आत्मा परिपूर्ण । तुका ह्मणे सगुण भोळ्या आह्मां ॥ ६ ॥

॥ ४७७ ॥

होतों तें चिंतीत मानसीं । नवस फळले नवसीं । जोडिले नारायणा ऐसी । अविट ज्यासी नाश नाहीं ॥ १ ॥ धरिले जीवीं न सोडीं पाय । आलें या जीवित्वाचें काय । कैं हे पाविजेती ठाय । लाविली सोय संचितानें ॥ २ ॥ मज तों पडियेली होती भुली । चित्ताची अपसव्य चाली । होती मृगजळें गोवी केली । दृष्टि उघडली बरें जालें ॥३॥ आतां हा सिद्धी पावो भाव । मध्यें चांचल्यें न व्हावा जीव । ऐसी तुह्मां भाकीतसें कींव । कृपाळुवा जगदानिया ॥ ४ ॥ कळों येतें आपुले बुद्धी । ऐसें तों न घडतें कधीं । केवढे आघात ते मधीं । लज्जा रिद्धी उभी आड ठाके ॥ ५ ॥ कृपा या केली संतजनीं । माझी अळंकारिली वाणी । प्रीति हे लाविली कीर्तनीं । तुका चरणीं लोळतसे ॥ ६ ॥

॥ ४७८ ॥

बरवा झाला वेवसाव । पावलों चिंतिलाची ठाव । दृढ पायीं राहिला भाव । पावला जीव विश्रांति ॥ १ ॥ बरवा फळला शकुन । अ-

वचा निवारिला सीण । तुमचें आलिया दृढघण । जन्ममरण नाहीं आतां ॥ २ ॥ बरवें जालें आलों या ठाया । होतें संचित ठायींचा पाया । देहभाव पालटली काया । पडली छाया ब्रह्मींची ॥ ३ ॥ जोडिलें हें न सरे धन । अविनाश आनंदघन । अमूर्तमूर्ति मधुसूदन । समचरण देखियेले ॥ ४ ॥ जुनाट जुगादिचें नाणें । बहुता काळाचें ठेवणें । लोपलें होतें पारिखेपणें । ठावचळण चुकविला ॥ ५ ॥ आतां या जीवाचियासाठीं । न सुटे पडलिया मिठी । तुका ह्मणे सीणलों जगजेठी । न लवीं दिठी दुसऱ्याची ॥ ६ ॥

॥ ४७९ ॥

चांगलें नाम गोमटें रूप । निवती डोळे हरती ताप । विठ्ठल विठ्ठल हा जप । प्रगट स्वल्प अति सार ॥ १ ॥ शस्त्र हें निर्वाणींचा बाण । निकट समय अवसान । कोठें योजेल दशदान । खंडी नारायण दुःख चिंतनें ॥ २ ॥ सकळ श्रेष्ठाचें मत । पावे सिद्धी पाववी अनंत । ह्मणोनी व्हावें शरणागत । आहे उचित एवढेंचि ॥ ३ ॥ ह्मणोनी रुसलों संसारा । सर्प विखार हा पांढरा । तुजशीं अंतर रे दातारा । याचि दावेदारानिमित्त ॥ ४ ॥ येणें मज भोगविल्या खाणी । नसता छंद लाविला मनीं । माजलों मी माझे भ्रमणीं । जाली बोडणी विटंबना ॥ ५ ॥ पावलों केलियाचा दंड । खाणी भोगिल्या उदंड । आतां केला पाहिजे खंड । तुका दंडवत घाली देवा ॥ ६ ॥

॥ ४८० ॥

ताप हें हरण श्रीमुख । हरी भवरोगा ऐसें दुःख । अवलोकितां उपजे सुख । उभें सन्मुख दृष्टीपुढें ॥ १ ॥ न पुरे डोळियांची धणी । सखोल कृपेचीच खाणी । स्तवितां न पुरे वेदवाणी । तो हा समचरणी कृपानिधि ॥ २ ॥ रामकृष्णध्यान वामननारसिंही । उग्र आणि सौम्य कांहींच नाहीं । सांपडे भरलीये वाही । भाव शुद्ध पाहीं याचें आवुडें ॥ ३ ॥ गुणगंभीर चतुर सुजाण । शूर धीर उदार नारायण ।

व्यापक तरी त्रिभुवन । मनमोहन लावण्य हें ॥ ४ ॥ ठाण हें साजिरें सुंदर । अविनाश अविकार । अनंत आणि अपार । तो हा कटीं कर धरिताहे ॥ ५ ॥ जयाची वाणी सुमनमाळा । परमामृतजिव्हाळा । अनंता अंगीं अनंत कळा । तुका जवळा चरणसेवक ॥ ६ ॥

॥ ४८१ ॥

अखंडक्षीराब्धी भरितें आलें । अध्यात्मविद्येचें भांडार उघडिलें । सूर्यकोटीस तेज फांकलें । ध्यानीं प्रगटलें भक्तांचिया ॥ १ ॥ अनादि ब्रह्मज्ञानाचें गुज । श्रवणीं अवचित पडिलें सहज । परम निर्वाणाचें बीज । गुंढाळिलें निजसर्वभाग्यें ॥ २ ॥ मंत्र महामंत्र मंगळनिधि । सत्संगदर्शन प्रगटलें आधीं । वैराग्यविवेकाची बुद्धि । नामामृतसिद्धी साधिलें तें ॥ ३ ॥ क्षमा दया शांतीचें निजसुख । सच्चित्सुखें बोलला पुंडलीक । अनंतसुखाचा हारिख । उगवला देख पंढरिये ॥ ४ ॥ नेणें भवभक्तीची निरपेक्षता । नेणें भूतदयेची ममता । तुका ह्मणे पंढरीनाथा । संग साधुसंतां देईं आतां ॥ ५ ॥

॥ ४८२ ॥

हरि तैसे हरीचे दास । नाहीं तयां भय मोह चिंता आस । होऊनि राहाती उदास । बळकट कांस भक्तीची ॥ १ ॥ धरूनी पाय त्यजिलें जन । न लगे मान मृत्तिकाधन । कंठीं नामामृताचें पान । न लगे आन ऐसें जालें ॥ २ ॥ वाव तरी उदंडच पोटीं । धीर सिंधु ऐसे जगजेठी । कामक्रोधा न सुटे मिठी । गिन्हे तरी वेठीं राबविती ॥ ३ ॥ बळें तरी नागवली काळा । लीन तरी सकळांच्या तळा । उदार देहासी सकळां । जाणोनी कळा सर्व नेणते ॥ ४ ॥ संसार तो तयांचा दास । मोक्ष तो पाहातसे वास । रिद्धिसिद्धि देशवटा त्रास । न शिवती यास वैष्णवजन ॥ ५ ॥ जन्ममृत्युस्वप्नांसारिखें । आप त्यां न दिसे पारखें । तुका ह्मणे अखंडित सुखें । वाणी वदे मुखें प्रेमामृताची ॥ ६ ॥

॥ ४८३ ॥

मज ते हांसतील संत । जींहीं देखिलेसी मूर्तिमंत । ह्मणोनी उद्वेगलें चित्त । आह्माच भक्त ऐसा दिसें ॥ १ ॥ ज्यानीं ज्यां वर्णिवेती कैसे । पुढें एकीं स्तुति केली असे । तेथूनी जीव निघत नसे । ऐसिये आसे लागलोंसें ॥ २ ॥ कासया पाडिला जी धडा । उगाचि वेडा आणि वांकडा । आह्मां लेंकरांसी पीडा । एक मागें जोडा दुसऱ्याचा ॥३॥ सांगा कोणाचा अन्याय । ऐसें मी धरीतसें पाय । तूं तंव समचि सकळां माय । काय अन्याय एक माझा ॥ ४ ॥ नये हा जरी कारणा । तरी कां व्यालेती नारायणा । वचन द्यावें जी वचना । मज अज्ञाना समजावीं ॥५॥ बहुत दिवस केला बोभाट । पाहातां श्रमलों ते वाट । तुका ह्मणे विस्तारलें ताट । काय वीट आला नेणों स्वामी ॥ ६ ॥

॥ ४८४ ॥

कां हो माझा मानियेला भार । ऐसा दिसतसे फार । अनंत पावविलीं उद्धार । नव्हेचि थार मज शेवटीं ॥१॥ पाप बळिवंत गाढें । तुजही राहों सकतें पुढें । मागील कांहीं राहिलें ओढें । नवल केवढें* देखियेलें ॥ २ ॥ काय मानिती संतजन । तुमचें हीनत्ववचन । कीं वृद्ध जाला नारायण । न चले पण आधील तो ॥ ३ ॥ आतां न करावी चोरी । बहुत न धरावें दुरी । पडदा काय घरच्या घरीं । धरिलें दुरी तेव्हां धरिलें ॥ ४ ॥ नको चाळवूं अनंता । कासया होतोसी नेणता । काय तूं नाहीं धरीत सत्ता । तुका ह्मणे आतां होई प्रगट ॥ ५ ॥

॥ ४८५ ॥

दास्य करी दासांचें । उणें न साहे तयाचें । वाढिलें ठायींचें । भाणें टाकोनियां धांवे ॥१॥ ऐसा कृपेचा सागर । विटे उभा कटीं कर । सर्वस्वें उदार । भक्तांलागीं प्रगटे ॥ २ ॥ हृदयीं श्रीवत्सलांछन । मिरवी भक्तांचें भूषण । नाहीं तयाचा सीण । सुख धरिलें लातेचें ॥३॥ सत्य-

---

* ' कोडें ' असा कांहीं प्रतींत पाठ आहे.

भामा दान करी । उजुर नाहीं अंगीकारी । सेवकाच्या शिरीं । धरूनी आले पादुका ॥४॥ राखे द्वारवंटा बळीचा । सारथी जाला अर्जुनाचा । दास सेवकांचा । होय साचा अंकित ॥५॥ भिडे न बोलवें पुंडलीकाशीं । उभा मर्यादा पाठीशीं । तुका ह्मणे ऐसी । कां रे न भजा माउली ॥ ६ ॥

॥ ४८६ ॥

चांगला तरी पूर्णकाम । गोड तरी याचेंचि नाम । दयाळू तरी अवघा धर्म । भला तरी दासा श्रम होऊं नेदी ॥१॥ उदार तरी लक्ष्मीयेसी । झुंझार तरी कळिकाळासी । चतुर तरी गुणांचीच रासी । जाणता तयासी तो एक ॥ २ ॥ जुनाट तरी बहु काळा । न कळे जयाची लीळा । नेणता गोवळीं गोवळा । लाघवी अवळाभुलवणा ॥ ३ ॥ गांढ्या तरी भावाचा अंकित । बराडी तरी उच्छिष्टाची प्रीत । ओंगळ तरी कुब्जेशीं रत । भ्याड अनंत बहु पापा ॥ ४ ॥ खेळ तो येणेंचि खेळावा । नट तो येणेंचि आवगावा । लपोनी जीवीं न कळे जीवा । धरितां देवा नातुडसी ॥ ५ ॥ उंच तरी बहुतचि उंच । नीच तरी बहुतचि नीच । तुका ह्मणे बोलिलों साच । नाहीं अहाच पूजा केली ॥ ६ ॥

॥ ४८७ ॥

अखंडकर्मा कर्मप्रकाशका । मजसाठीं कां रे जालासी मुका । धर्माधर्मप्रतिपाळका । सर्वचाळका सर्वातीता ॥ १ ॥ न देखसी वर्णाश्रममर्यादा । त्याचा सर्वस्वें करिसी कामधंदा । कधीं न लाजसी तूं गोविंदा । कां रे मुकुंदा बोल आतां ॥ २ ॥ मत्स्यकूर्मादि अवतारासाठीं । श्रमले असतील जगजेठी । करितां घडमोड सृष्टी । जालासी कष्टी काय जाणें ॥ ३ ॥ किती म्यां विनवावें श्रीपती । पुन्हा पुन्हा यावें काकुळती । पुरे आतां तुह्मी संगति । करुणामूर्ती काय जालें ॥४॥ काय म्यां तुजसी करावें आतां । कां रे कोपलासी पंढरीनाथा । सकळ निवारिता । पावन पतिता तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४८८ ॥

तूंचि अनाथाचा दाता । दु:ख मोह नासावया चिंता । शरण आलों तुज आतां । तारीं कृपावंता मायबापा ॥ १ ॥ संतसंगति देईं चरणसेवा । जेणें तुझा विसर न पडावा । हाच भाव माझिया जीवा । पुरवीं देवा मनोरथ ॥ २ ॥ मज भाव प्रेम देईं कीर्ति । गुण नाम वर्णावया स्तुति । विघ्ना सोडवूनी हातीं । विनंति माझी परिसावी हे ॥ ३ ॥ आणीक कांहीं नाहीं मागणें । सुखसंपत्तिराज्यचाड धनें । सांकडें न पडे तुज जेणें । दुजें भक्तीविण मायबापा ॥ ४ ॥ जोडोनियां कर पायीं ठेवीं माथा । तुका विनवी पंढरीनाथा । रंगीं वोडवावी रंगकथा । पुरवीं देवा मनोरथा ॥ ५ ॥

॥ ४८९ ॥

तुझिया पार नाहीं गुणां । माझी अल्प मति नारायणा । भवतारका जी सुजाणा । एक विज्ञापना पायांपाशीं ॥ १ काय जाणावें म्यां दीनें । तुझिये भक्तीचीं लक्षणें । धड तें तोंड धुऊं नेणें । परि चिंतनें काळ सारीं ॥२॥ न लवीं आणीक कांहीं पिसें । माझिया मना वांयां जाय ऐसें । चालवीं आपुल्या प्रकाशें । हातीं सरिसें धरोनियां ॥ ३ ॥ तुज समर्पिली काया । जीवेंभावें पंढरिराया । सांभाळीं समविषम डाया । करीं छाया कृपेची ॥ ४ ॥ चतुर तरी चतुरां राव । जाणता तरी जीवांचा जीव । न्यून तो कोण एक ठाव । आरूप भाव परि माझा ॥५॥ होतें तें माझें भांडवल । पायांपें निवेदिले बोल । आदरा ऐसें पाविजे मोल । तुका ह्मणे साच फोल तूं जाणसी ॥ ६ ॥

॥ ४९० ॥

बरवें जालें लागलों कारणीं । तुमचे राहिलों चरणीं । फेडीन संतसंगती धणी । गर्जइल गुणीं वैखरी ॥ १ ॥ न वंचे शरीर सेवेसी । काया वाचा आणि मनेसीं । जालों संतांची आंदणी दासी । केला याविशीं निर्धार ॥ २ ॥ जीवनीं राखिला जिव्हाळा । जालों मी

भजर्नीं निराळा । पंचभूतांचा पुतळा । सहज लीळा वर्ततसे ॥ ३ ॥ जयाचें जया होईल ठावें । लाहो या साधियेला भावें । ऐसें होतें राखियलें जीवें । येथूनी देवें भोवहुनी ॥ ४ ॥ आस निरसली ये खेपे । अवघे पंथ जाले सोपे । तुमचे दीनबंधु कृपें । दुसरें कांपे सत्ताधाकें ॥ ५ ॥ अंकिलेपणें आनंदरूप । आतळों नये पुण्य पाप । मारूनी ठेविले संकल्प । तुका ह्मणे आपेंआप एकाएकीं ॥ ६ ॥

॥ ४९१ ॥

हातींचें न संडावें देवें । शरण आलों जीवेंभावें । आपुलें ऐसें ह्मणावें । करितों जीवें निंबलोण ॥ १ ॥ बैसतां संतांचे संगतीं । कळों आलें कमळापती । आपुलीं कोणीच नव्हती । निश्चय चित्तीं दृढ जाला ॥ २ ॥ येती तुझिया भजना आड । दाविती प्रपंचाचें कोड । कनिष्ठीं रुचि ठेवूनि गोड । देखत नाड कळतसे ॥ ३ ॥ मरती मेलीं नेणों किती । तोचि लाभ तयाचे संगती । ह्मणोनि येतों काकुलती । धीर तो चित्तीं दृढ द्यावा ॥ ४ ॥ सुखें निंदोत हे जन । न करीं तयांशीं वचन । आदिपिता तूं नारायण । जोडी चरण तुमचे ते ॥ ५ ॥ आपलें आपण न करूं हित । करूं हें प्रमाण संचित । तरी मी नष्टाचि पतित । तुका ह्मणे मज संत हांसती ॥ ६ ॥

॥ ४९२ ॥

न पवे सन्निध वाटते चिंता । वरि या बहुतांची सत्ता । नुगवे पडत जातो गुंता । कर्मा बळिवंता सांपडलों ॥ १ ॥ बहु भार पडियेला शिरीं । मी हें माझें मजवरी । उघड्या नागविलों चोरीं । घरिच्याघरीं जाणजाणतां ॥ २ ॥ तुज मागणें इतुलें आतां । मज या निरवावें संतां । जाला कंठस्फोट आळवितां । उदास आतां न करावें ॥ ३ ॥ अति हा निकट समय । मग म्यां करावें तें काय । दिवस गेलिया ठाकईल छाय । उरईल हाय रातीकाळीं ॥ ४ ॥ होईल संचिताची सत्ता । अंगा येईल पराधीनता । ठाव तो न दिसे लपतां । बहुत चिंता प्रवर्तली ॥ ५ ॥

ऐसी या संकटाचे संधी। धांव बाळाची कृपानिधी। तुका ह्मणे माझी बळबुद्धि। सकळ सिद्धि पाय तुझे ॥ ६ ॥

॥ ४९३ ॥

सर्व सुखाचिया आशा जन्म गेला। क्षण मुक्ती यत्न नाहीं केला। हिंडतां दिशा सीण पावला। माया वेष्टिला जीव माझा ॥१॥ माझें स्वहित नेणती कोणी। कांहीं न करितां मजवांचूनी। सज्जन तंव सुख-मांडणी। नेणती कोणी आदि अंत ॥२॥ काय सांगों गर्भींची यातना। मज भोगितां नारायणा। मांस मळमूत्र जाणा। तुज क्षणक्षणा ध्यात असें ॥३॥ मज चालतां प्रयाणकाळीं। असतां न दिसती जवळी। मृत्तिके मृत्तिका कवळी। एकले मेळीं संचिताचे ॥४॥ आतां मज ऐसें करीं गा देवा। कांहीं घडे तुझी चरणसेवा। तुका विनवीतसे केशवा। चालवीं दावा संसारें ॥५॥

॥ ४९४ ॥

तरि म्यां आळवावें कोणा। कोण पुरवील वासना। तुजवांचूनी नारायणा। लावीं स्तना कृपावंते ॥ १॥ आपुला न विचारीं सीण। न धरी अंगसंगें भिन्न। अंगीकारिलें राखे दीन। देई जीवदान आवडीचें ॥२॥ माझिया मनासी हे आस। नित्य सेवावा ब्रह्मरस। अखंड चरणींचा वास। पुरवीं आस याचकाची ॥३॥ माझिया संचिताचा ठेवा। तेणें हे वाट दाविली देवा। एवढ्या आदराचा हेवा। मागें सेवादान आवडीनें ॥४॥ आळवीन करुणावचनीं। आणीक गोड न लगे मनीं। निद्रा जागृति आणि स्वप्नीं। धरिलें ध्यानीं मनीं रूप ॥५॥ आतां भेट न भेटतां आहे। किंवा नाहीं ऐसें विचारूनी पाहें। लागला झरा अखंड आहे। तुका ह्मणे साहे केलें अंतरीं॥६।

॥ ४९५ ॥

कोण सुख धरोनी संसारीं। राहों सांग मज वा हरी। अवघ्या नाशिवंता परी। थिता दुरी तूंही अंतरसी ॥ १ ॥ प्रथम केला गर्भीं वास। काय ते सांगावे सायास। दुःख भोगिलें नवही मास। आलों

जन्मास येथवरी ॥ २ ॥ बाळपण गेलें नेणतां । तारुण्यदशे विषय-व्यथा । वृद्धपणीं प्रवर्तली चिंता । मरें मागुता जन्म धरीं ॥ ३ ॥ क्षण एक तोही नाहीं विसावा । लक्ष चौऱ्याशीं घेतल्या धांवा । भोवंडिती पाठीं लागल्या हांवा । लागो आगी नांवा माझ्या मीपणा ॥४॥ आतां पुरे ऐसी भरोवरी । रंक होऊनी राहेन द्वारीं । तुझा दास मी दीन कामारी । तुका ह्मणे करीं कृपा आतां ॥ ५ ॥

॥ ४९६ ॥

काय मी उद्धार पावेन । काय कृपा करील नारायण । ऐसें तुह्मी सांगा संतजन । करा समाधान चित्त माझें ॥१॥ काय हें खंडईल कर्म । पारुषतील धर्माधर्म । कासयानें तें कळे वर्म । ह्मणऊनी श्रम वाटतसे ॥२॥ काय हो स्थिर राहेल बुद्धि । कांहीं अरिष्ट न येल मधीं । धरिली जाईल ते शुद्धि । शेवट कधीं तो मज न कळे ॥३॥ काय ऐसें पुण्य होईल गांठीं । घालीन पायीं देवाचे मिठी । मज तो कुरवाळील जगजेठी । दाटईन कंठीं सद्गदित ॥४॥ काय हे निवतील डोळे । सुख तें देखोनी सोहळे । संचित कैसें तें न कळे । होतील डोहळे वासनेसी ॥५॥ ऐसी चिंता करीं सदा सर्वकाळ । रात्रीदिवस हेचि तळमळ । तुका ह्मणे नाहीं आपुलें बळ । जेणें फळ पावें निश्चयेंसी ॥ ६ ॥

॥ ४९७ ॥

माझा तंव खुंटला उपाव । जेणें तुझे आतुडती पाव । करूं भक्ति तरि नाहीं भाव । नाहीं हातीं जीव करणेविशीं ॥१॥ धर्म करूं तरि नाहीं चित्त । दान देऊं तरि नाहीं वित्त । नेणें पुजों ब्राह्मण अतीत । नाहीं भूतदया पोटा हातीं ॥२॥ नेणें गुरुदास्य संतसेवन । जप तप अनुष्ठान । नव्हे वैराग्य वनसेवन । नव्हे दमन इंद्रियांसी ॥३॥ तीर्थ करूं तरि मन नये सवें । व्रत करूं तरि विधि नेणें स्वभावें । देव जरि आहे ह्मणों मजसवें । तरि आपपरावें न वंचे ॥४॥ ह्मणोनि जालों शरणागत । तुझा दास मी अंकित । यास कांहीं न लगे संचित । जालों निश्चिंत तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४९८ ॥

न बोलसी तेंही कळलें देवा। लाजसी आपुलिया नांवा। तुज मी नाहीं घालीत गोवा। भीड केशवा कासयाची ॥ १ ॥ उतरीं आपुला हा पार। मजशीं बोलोनी उत्तर। माझा तुज नव्हे अंगीकार। मग विचार करीन मी ॥ २ ॥ दात्या आणि मागत्यासी। धर्मनीति तरी बोलिली ऐसी। यथानशक्ति टाकेल तैसी। बाधी दोघांसी विन्मुखता ॥ ३ ॥ ह्मणोनी करितों मी आस। तुझिया वचनाची वास। धीर हा करूनी सायास। न टळें नेमास आपुलिया ॥ ४ ॥ तुझें म्यां घेतल्यावांचून। न वजें येथूनी वचन। हाचि माझा नेम सत्य जाण। आहे नाहीं ह्मण तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४९९ ॥

ऐक पांडुरंगा एक मात। कांहीं बोलणें आहे एकांत। आह्मां जरी तारील संचित। तरी उचित काय तुझें ॥१॥ उसनें फेडितां धर्म तो कोण। काय तया मानवेल जन। काय गा मिरवूनी भूषण। वांयां थोरपण जनामध्यें ॥२॥ अन्न जरी न मिळे तयासी देणें। आगांतुक पात्र उचित दान। उपकार तरी धनमंत्रीपणें। जरी देणें घेणें नाहीं आशा ॥३॥ शूर तो तयासी बोलिजे जाणा। पाठीशीं घालूनी राखे दीना। पार पुण्या नाहीं त्या भूषणा। ऐक नारायणा वचन हें ॥४॥ आतां पुढें बोलणें तें काई। मज तारिसी तरीच सही। वचन आपुलें सिद्धी नेई। तुका ह्मणे तई मज कळसी ॥ ५ ॥

॥ ५०० ॥

सुख या संतसमागमें। नित्य दुणावे तुझिया नामें। दहन होती सकळ कर्में। सर्वकाळ प्रेमें डुल्लतसों ॥१॥ ह्मणोनी नाहीं कांहीं चिंता। तूंचि आमुचा मातापिता। बहिणी बंधु आणि चुलता। आणिकां गोतां सर्वांठायीं ॥२॥ ऐसा हा कळला निर्धार। माझा तुज न पडे विसर। असती देऊनियां धीर। बाह्य अभ्यंतर मजजवळी ॥ ३ ॥ दुःख तें कैसें नये

स्वप्रासी । भुक्तिमुक्ति जाल्या कामारी दासी । त्यांचें वर्म तूं आह्मांपाशीं । सुखें राहिलासी प्रेमाचिया ॥४॥ जेथें तुझ्या कीर्तनाचा घोष । जळती पापें पळती दोष । काय तें उणें आह्मां आनंदास । सेवूं ब्रह्मरस तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ५०१ ॥

अल्प भाव अल्प मति । अल्प आयुष्य नाहीं हातीं । अपराधाची वोळिलों मूर्ति । अहो वेदमूर्ति परियेसा ॥ १ ॥ किती दोषा देऊं परिहार । गुणदोषें मळिलें अंतर । आदि वर्तमान भविष्याकार । गेला अंतपार ऐसें नाहीं ॥ २ ॥ विविध कर्म चौऱ्याशी फेरा । त्रिविध भोग या शरीरा । कर्मकोठार पांजरा । जन्मजरामरण-सांठवण ॥ ३ ॥ जीवा नाहीं कुडीचें लाहातें । ये भिन्न पंचभूतें । रचतें खचतें संचितें । असार रितें फळकट ॥४॥ पुत्र पत्नी सहोदर । मायबाप गोताचा पसर । मिळतां काष्ठें लोटतां पूर । आदळीं दूर होती खल्लाळीं ॥५॥ ह्मणोनी नासावें अज्ञान । इतुलें करीं कृपादान । कृपाळू तूं जनार्दन । धरूनी चरण तुका विनवी ॥ ६ ॥

॥ ५०२ ॥

मी तंव अनाथ अपराधी । कर्महीन मतिमंदबुद्धि । तुज म्यां आठविलें* नाहीं कधीं । वाचे कृपानिधी मायबापा ॥ १ ॥ नाहीं ऐकिलें गाइलें गीत । धरिली लाज सांडिलें हित । नावडे पुराण बैसले संत । केली बहुत परनिंदा ॥ २ ॥ केला करविला नाहीं उपकार । नाहीं दया आली पीडितां पर । करूं नये तो केला व्यापार । वाहिला भार कुटुंबाचा ॥ ३ ॥ नाहीं केलें तीर्थाचें भ्रमण । पाळिला पिंड करचरण । नाहीं संतसेवा घडलें दान । पूजावलोकन मूर्तीचें ॥ ४ ॥ असंगसंग घडले अन्याय । बहुत अधर्म उपाय । न कळे हित करावें तें काय ।

---

* ‘ पाठविलें ’ असा पुष्कळ प्रतींत पाठ आहे.

नवे बोलूं आठवूं तें ॥ ५ ॥ आप आपण्या घातकर । शत्रू जालों मी दावेदार । तूं तंव कृपेचा सागर । उतरीं पार तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ५०३ ॥

जेणें हा जीव दिला दान। तयाचें करीन चिंतन । जगज्जीवन नारायण । गाईन गुण तयाचे ॥ १ ॥ जो या उभा भींवरेच्या तिरीं । कट धरूनियां करीं । पाउलें समचि साजिरीं । अंतरीं धरोनी राहेन ॥ २ ॥ जो या असुरांचा काळ । भक्तजनप्रतिपाळ । खेळे हीं लाघवें सकळ । तयाच्या भाळ पायांवरी ॥३॥ जो या गोपाळांच्या मेळीं । खेळु खेळे वनमाळी । रसातळा नेला बळी । राहे पाताळीं स्वामी माझा ॥ ४ ॥ जो हा लावण्यपुतळा । जयाचे अंगीं सकळ कळा । जयाचे गळां वैजयंतीमाळा । तया वेळोवेळां दंडवत ॥ ५ ॥ जयाचें नाम पाप नासी । लक्ष्मी ऐसी जयाची दासी । तो हा तेजःपुंज रासी । सर्वभावें त्यासी तुका शरण ॥ ६ ॥

॥ ५०४ ॥

आतां येणें बळें पंढरीनाथ । जवळी राहिला तिष्ठत । पाहातां न कळे जयाचा अंत । तोचि हृदयांत घालूं आतां ॥ १ ॥ विसरोनी आपुला देहपणभाव । नामेंचि भुलविला पंढरीराव । न विचारी याती कुळ नांव । लागावया पाव संतांचे ॥ २ ॥ वर्म वर्म आलें आमुचिया हातां । हिंडावें धुंडावें न लगतां । होय अविनाश सहाकारी दाता । चतुर्भुज संतां परि धाकें ॥ ३ ॥ होय आवडी सानें थोर । रूप सुंदर मनोहर । भक्तिप्रिय लोभापर । करी आदर याचकपणें ॥ ४ ॥ तें वर्म आलें आमुच्या हाता । ह्मणोनी शरण निघालों संतां । तुका ह्मणे पंढरीनाथा । न सोडीं आतां जीवें भावें ॥ ५ ॥

॥ ५०५ ॥

आतां माझा नेणों परतों भाव । विसावोनि पायीं ठेविला जीव । सकळां लाभांचा हा ठाव । ऐसा त्र जाला चित्ताठायीं ॥ १ ॥

मांडवल गांठीं तरी विश्वास। आलों तों जालों निश्चयें दास। न पाहें मागील ते वास। पुढती सोस सेवेचाचि ॥ २ ॥ आहे तें निवेदिलें सर्व। मी हें माझें मोहियला गर्व। अकाळीं काळ अवघें पर्व। जाला भरंवसा कृपेलाभाचा ॥ ३ ॥ वेव्हारीं वेव्हारा अनंत। नाहीं यावांचुनी जाणत। तरी हें समाधान चित्त। लाभ हानि नाहीं येत अंतरा ॥ ४ ॥ करूनी नातळों संसारा। अंग भिन्न राखिला पसारा। कळवळा तो जीवनीं खरा। बीजाचा थारा दुरी आघात ॥ ५ ॥ बहु मतापासूनि निराळा। होऊनी राहिलों सोंवळा। बैसला रूपाचा कळवळा। तुका ह्मणे डोळां लेइलों तें ॥ ६ ॥

॥ ५०६ ॥

आतां धर्माधर्मा कांहीं उचित। माझें विचारावें हित। तुज मी ठाउका पतित। शरणागत परि जालों ॥ १ ॥ येथें राया रंका एकी सरी। नाहीं भिन्नाभिन्न तुमच्या घरीं। पावलों पाय भलत्यापरी। मग बाहेरी न घालावें ॥ २ ॥ ऐसें हें चालत आलें मागें। नाहीं मी बोलत वाउगें। आपुलिया पडिल्या प्रसंगें। कीर्ति हे जगें वाणिजेते ॥ ३ ॥ घालोनियां माथां बैसलों भार। सांडिला लौकिक वेव्हार। आर्धी हे विचारिली थार। अविनाशपर पद ऐसें ॥ ४ ॥ येथें एक वर्म पाहिजे धीर। परि म्यां लेखिलें असार। देह हें नाशिवंत जाणार। धरिलें सार नाम तुझें ॥ ५ ॥ केली आराणूक सकळां हातीं। धरावें धरिलें तें चित्तीं। तुका ह्मणे सांगितलें संतीं। देई अंतीं ठाव मज देवा ॥ ६ ॥

॥ ५०७ ॥

आतां तुज कळेल तें करीं। तारिसी तरी तारीं मारीं। जवळी अथवा दुरी धरीं। घालीं संसारीं अथवा नको ॥ १ ॥ शरण आलों नेणतपणें। भाव आणि भक्ति कांहींच नेणें। मतिमंद सर्वज्ञानें। बहु रंक उणें रंकाहुनी ॥ २ ॥ मन स्थिर नाहीं माझिये हातीं। इंद्रियें

थांबतां नावरती। सकळ खुंटलिया युक्ति। शांति निवृत्ति सबळी नाहीं ॥ ३ ॥ सकळ निवेदिला भाव। तुझिये पायीं ठेविला जीव। आतां करीं कळे तो उपाव। तूंचि सर्व ठाव माझा देवा ॥ ४ ॥ राहिलों धरूनि विश्वास। आधार नेटीं तुझी कास। आणीक नेणें मी सायास। तुका ह्मणे यास तुझें उचित ॥ ५ ॥

॥ ५०८ ॥

आतां मी न पडें सायासीं। संसारदुःखाचिये पाशीं। शरण रिघेन संतांसी। ठाव पायापाशीं मागेन त्यां ॥ १ ॥ न कळे संचित होतें काय। कोण्या पुण्यें तुझे लाधले पाय। आतां मज न विसंबे माय। मोकलूनी धाय विनवीतसें ॥ २ ॥ बहुत जाचलों संसारें। मोहमायाजाळाच्या विखारें। त्रिगुण येतील लहरें। तेणें दुःखें थोरें आक्रंदलों ॥ ३ ॥ आणीक दुःखें सांगों मी किती। सकळ संसारस्थिति। न साहे पाषाण फुटती। भय कांप चित्तीं भरलासे ॥ ४ ॥ आतां मज न साहवे सर्वथा। संसारगंधीची हे वार्ता। जालों वेडा असोनी जाणता। पावें अनंता तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ५०९ ॥

आतां मज धरवावी शुद्धि। येथूनी परतवावी बुद्धि। ऱ्यावें सोडवूनी कृपानिधी। सांपडलों संधीं काळचक्रीं ॥ १ ॥ करिसील तरी नव्हे काई। राईचा डोंगर पर्वत राई। आपुले करुणेची साई। करीं वो आई मजवरी ॥ २ ॥ मागील काळ अज्ञानपणें। सरला स्वभावें त्या गुणें। नेणें आयुष्य जालें उणें। पुढील पेणें अंतरलें ॥ ३ ॥ आतां मज वाटतसे भय। दिवसेंदिवस चालत जाय। येथें म्यां येऊनी केलें काय। नाहीं तुझे पाय आठविले ॥ ४ ॥ करूनी अपराध क्षमा। होतील केले पुरुषोत्तमा। आपुले नामीं द्यावा* प्रेमा। सोडवीं

* 'घ्यावा' असा पुष्कळ प्रतींत पाठ आढळतो.

श्रमापासूनियां ॥ ५ ॥ हृदय वसो तुमच्या गुणीं । ठाव हा पायांपें चरणीं । करूं हा रस सेवन वाणी । फिटे तों धणी तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ५१० ॥

आतां पावेन सकळ सुखें । खादलें कदा तें न देखें । अवघें सरलें पारिखें । सकळ देखें माहियेरें ॥१॥ जवळी विठ्ठलरखुमाई । बहिणी बंधु बाप आई । सकळ गोताचीच साई । पारिखें काई ऐसें नेणिजे ॥ २ ॥ जगदाकारीं जाली सत्ता । वारोनी गेली पराधीनता । अवघें आपुलेंचि आतां । लाज आणि चिंता दुऱ्हावली ॥ ३ ॥ वावरे इच्छा वसे घरीं । आपुले सत्तेचे माहेरीं । करवी तैसें आपण करीं । भीड न धरीं चुकल्याची ॥ ४ ॥ सोसिला होता सासुरवास । बहुतांचा बहुत दिवस । बहु कामें पुरविला सोस । आतां उदास आपुल्यातें ॥ ५ ॥ करिती कवतुक लाडें । मज बोलविती कोडें । मायबाप उत्तरें गोडें । बोले बोबडें पुढें तुका ॥ ६ ॥

---

## आशीर्वाद.

॥ ५११ ॥

आशीर्वाद तया जाती । आवडी चित्तीं देवाची ॥ १ ॥ कल्याण तें असे क्षेम । वाढे प्रेम आगळें ॥ २ ॥ भक्तिभाग्य गांठी धन । त्या नमन जीवासी ॥३॥ तुका ह्मणे हरिचे दास । तेथें आस सकळ॥४॥

॥ ५१२ ॥

तयासाठीं वेचूं वाणी । आइकों कानीं वारता ॥ १ ॥ क्षेम माझे हरिजन । समाधान पुसतां त्यां ॥ २ ॥ परत्रींचे जे सांगाती । त्यांची याती न विचारीं ॥३ ॥ तुका ह्मणे धैर्यवंतें । निर्मळ चित्तें सरवीं तीं ॥ ४ ॥

॥ ५१३ ॥

अभय उत्तर संतीं केलें दान । जालें समाधान चित्त तेणें ॥ १ ॥ आतां प्रेमरसें न घडे खंडण । धावें कृपादान नारायणा ॥ २ ॥

आलें जें उचित देहविभागासी । तेणें पायांपाशीं उभीं असों ॥ ३ ॥ तुका ह्मणे करी पूजन वैखरी । बोबडा उत्तरीं गातों गीत ॥ ४ ॥

॥ ५१४ ॥

असो मंत्रहीन क्रिया । नका चर्या विचारूं ॥ १ ॥ सेवेमधीं जमा धरा । कृपा करा शेवटीं ॥ २ ॥ विचारूनि ठाया ठाव । येथें भाव राहिला ॥ ३ ॥ आतां तुकयापाशीं हेवा । नाहीं देवा तांतडी ॥ ४ ॥

॥ ५१५ ॥

जीवेंसाटीं यत्नभाव । त्याची नाव बळकट ॥ १ ॥ पैल तीरा जातां कांहीं । संदेह नाहीं भवनदी ॥ २ ॥ विश्वासाची धन्य जाती । तेथें वस्ती देवाची ॥३॥ तुका ह्मणे भोळियांचा । देव साचा अंकित ॥४॥

---

## एकाखडी.

॥ ५१६ ॥

करावा कैवाड । नाहीं तरी आला नाड ॥ १ ॥ स्मरा पंढरीचा देव । मनीं धरोनियां भाव ॥ २ ॥ खचविलें काळें । उगवा लवलाहें जाळें ॥३॥ गजर नामाचा । करा लवलाहें वाचा ॥ ४ ॥ घरटी चक्रफेरा । जन्म-मृत्यूचा भोंवरा ॥ ५ ॥ नानाहत्यासांची जोडी । तृष्णा करी देश-धडी ॥ ६ ॥ चरणीं ठेवा चित्त । ह्मणवा देवाचे अंकित ॥ ७ ॥ छंद नानापरी । कळा न पविजे हरी ॥ ८ ॥ जगाचा जनिता । भु-क्तिमुक्तीचाही दाता ॥ ९ ॥ ह्मणी माझें माझें । भार वागविसी ओझें ॥१०॥ यांची कां रे गेली बुद्धि । नाहीं तरायाची शुद्धि॥११॥ टणक धाकुलीं । अवघीं सरती विठ्ठलीं ॥ १२ ॥ ठसा त्रिभुवनीं । उ-दार हा शिरोमणी ॥ १३ ॥ डगमगी तो वांयां जाय । धीर नाहीं गोता खाय ॥ १४ ॥ ढळों नये अरी । लाभ धरींचिया घरीं ॥ १५ ॥ नाहीं ऐसें राहे । कांहीं नासिवंत देहे ॥ १६ ॥ तरणा भाग्यवंत ।

नटे हरिकीर्तनांत ॥ १७ ॥ थडी टाकी पैलतीर । आहे ठोके होय बीर ॥ १८ ॥ वृथा तिर्थे नांव। अहंकार आय अंव ॥ १९ ॥ धनधान्य हेवा । नाडे कुटुंबाची सेवा ॥ २० ॥ नाम गोविंदाचें। घ्या रे होंचि भाग्य साचें ॥ २१ ॥ परउपकारा । वेंचा शक्ति निंदा वारा ॥ २२ ॥ फळ भोग इच्छा। देव आहे जैसा तैसा ॥ २३ ॥ बरवा ऐसा छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ २४ ॥ भविष्याचे माथां॥ भजन न थावें सर्वथा ॥ २५ ॥ माग लागला न संडीं । आळसें माती घाली तोंडीं ॥ २६ ॥ यश कीर्ति मान । तरी जोडे नारायण ॥ २७ ॥ रवि लोपे तेजें । जरी हारपे हें दुजें ॥ २८ ॥ लकार लाविला । असतां नसतांचि उगला ॥ २९ ॥ वासनेची धाडी। बंद खोड्या नाड्या बेडी ॥ ३० ॥ सरतें न कळे। काय झांकियेले डोळे ॥ ३१ ॥ खंती ते न धरा। होणें गाढव कुतरा ॥ ३२ ॥ सायासाच्या जोडी। पिकें काढियेल्या पेडी ॥ ३३ ॥ हातीं हित आहे । परि न करिसी पाहें ॥ ३४ ॥ अळंकार लेणें। ल्या रे तुळसीमुद्राभूषणें ॥ ३५ ॥ ख्याति केली विष्णुदासीं। तुका ह्मणे पाहा कैसी ॥ ३६ ॥

---

## श्लोकरूपी अभंग.

॥ ५१७ ॥

तुजवांचुनी मागणें काय कोणा । महीमंडळीं विश्वव्यापकजना ।
जीवभावना पूरवूं कोण जाणे । तुजवांचुनी होत कां रावराणे ॥ १ ॥
नसे मोक्षदाता तिहींमाजि लोकां । भवतारकु तुजवांचूनि एका । मनीं
मानसीं चिंतितां रूपनाम । पळे पाप ताप भयें नासे काम ॥ २ ॥
हरी नाम हें साच तूझें पुराणीं । हरी हातिचें काळगर्भादियोनी ।
करूं मुखवाणी कैसी देशधडी। तुजवांचुनी वाणितां व्यर्थ गोडी ॥ ३ ॥
खवभंजना व्यापका लोक तिन्ही । तुज वाणितां श्रमला शेषफणी ।
असो आवें जीव तुझ्या सर्व पायीं। तुजें मागणें आणीक व्यर्थ काई ॥ ४ ॥

दिनानाथ हे साक्ष तूझी अनाथी । दिनें तारिलीं पातकी थोर दोषी ।
तुका राहिला पायिं तो राख देवा । असें मागतसे तुझी चरणसेवा ॥५॥

॥ ५१८ ॥

उभा भींवरेच्या तिरीं राहिलाहे । असे सन्मुख दक्षिणे मूख वाहे ।
महापातकांसी पळ कांप थोर । कैसे गर्जती घोष हे नामवीर ॥१॥
गुणगंभीर हा धीर हास्यमुख । वदे वदनीं अमृत सर्वसूख । लागलें
मुनिवरां हें गोड चित्तीं । देहभावना तुटलियासि खंती ॥ २ ॥ ठसा
घातला ये भूमिमाजी थोर । इच्छादाना हा द्यावयासी उदार । जया
बोळगती सिद्धि सर्वठायीं । तुझें नाम हें चांगलें गे विठाई ॥ ३ ॥
असे उघडा हा विटेवरि उभा । कटसूत्र हें धरुनी भक्तिलोभा । पुढें
वाट दावी भवसागराची । विठो माउली हे सिद्धसाधकांची ॥ ४ ॥
करावे गुह्य धरा पंथ आधीं । जया पार नाहीं सुखा तेंच साधीं ।
म्हणे तुका पंढरीस सर्व आलें । असे विश्व हें जीवनें त्याचि ज्यालें ॥५॥

॥ ५१९ ॥

धना गुंतलें चित्त माझें मुरारी । मन घेउनी हिंडवी दारोदारीं । मरे
हिंडतां न पुरे यासि कांहीं । मही ठेंगणी परि तें तृप्त नाहीं ॥ १ ॥ न
दिसे शुद्ध पाहतां निजमती । पुढें पडिलों इंद्रियां थोर घातीं । जिवा
नास त्या संगती दंढ बेडी । हरी शीघ्र या *दुष्टसंगासि तोडीं ॥ २ ॥
असीं आणिकें काय सांगों अनंता । मोहो पापिणी *दुष्टमायाममता ।
क्रोध काम यातना थोर करी । तुजवांचुनी सोडवी कोण हरी ॥ ३ ॥
निज देखतां निज हे दूरि जाये । निद्रा आळस दंभ या भीत आहें ।
तयां वस्ति देहीं नको देउं देवा । तुजवांचुनी आणिक नास्ति हेवा ॥४॥
करीं घात पात शंका लाज थोरी । असे सत्य भाव बहू भक्ति दूरी ।
नको मोकलूं दीनबंधु अनाथा । तुका वीनवी ठेवुनी पायिं माथा ॥५॥

* पुष्कळ प्रतींत 'दुष्ट' याबद्दल 'दृष्ट' असा सब्द आढळतो व तो 'दुष्ट' याचाच अपभ्रंश असावा असें वाटतें; 'दुष्ट–दुष्ट–दृष्ट.'

॥ ५२० ॥

पैल सांवळें तेज पुंजाळ कैसें । सिरीं तुबिंलीं साजिरीं मोरपीसें ॥ हरे त्यासि गे देखतां ताप माया । भजा गे भजा यादवा योगिराया ॥ १ ॥ जया कामिनी लुब्धल्या सहस्रसोळा । सुकुमार ह्या गोपिका दिव्य बाळा । शोभे मध्यभागीं कळा चंद्रकोटी । रुपा मीनली साजिरी माळ कंठीं ॥ २ ॥ असे यादवां श्रेष्ठ हा चक्रपाणी । जया वंदिती कोटि तेहेतीस तीन्ही । महाकाळ हे कांपती दैत्य ज्यासी । पाहा सांवळें रूप हें पापनासी ॥ ३ ॥ कसीं पाउलें साजिरीं कुंकुमाचीं । कसी वीट हे लाधली दैवांची । जया चिंतितां अग्नि हा शांति नीवे । धरा मानसीं आपला देहभाव ॥ ४ ॥ मुनी देखतां मुग्ध हें चित्त ध्याय । देह मांडला भाव हा बापमाय । तुक्या लागलें मानसीं देवपीसें । चित्त चोरटें सांवळें रूप कैसें ॥ ५ ॥

॥ ५२१ ॥

असे नांदतु हा हरी सर्वजीवीं । असे व्यापुनी अग्नि हा काष्ठ तेवीं । घटीं बिंबलें बिंब हें ठायिठायीं । तया संगती नासु हा त्यासि नाहीं ॥ १ ॥ तन वाटितां क्षीर हें होत नाहीं । पशू भक्षितां पालटे तेंचि देहीं । तया वर्म तो जाणता एक आहे । असे व्यापक व्यापुनी अंतर्बाहे ॥ २ ॥ फळ कर्दळीं सेवटीं येत आहे । असे शोधितां पोकळीमाजि काये । धीर नाहीं तें वाउगें धीग झालें । फळ पुष्प ना यत्न ते व्यर्थ गेलें ॥ ३ ॥ असे नाम हें दर्पणें सिद्ध केलें । असे बिंब तें या मळा आड ठेलें । कसें शुद्ध नाहीं दिसे माजि रूप । नका वाढवूं सीण हा पुण्यपाप ॥ ४ ॥ करा वर्म ठावें नका सोंग वांयां । तुका वीनवीतो पडों काय पायां । तुज पुत्रदारा धन वासना हे । मग ऊरलें शेवटीं काय पाहें ॥ ५ ॥

॥ ५२२ ॥

मना सांडिं हे वासना दुष्ट खोडी । मती मानसीं एक हे व्यर्थ गोष्टी । असे हीत माझें तुज कांहीं एक । धरीं विठ्ठलीं प्रेम हें फार्कि

सूख ॥ १ ॥ ऐसा सर्व भावें तुज शरण आलों । देहदुःख हें भो-
गितां फार भ्यालों । भवतारितें दूसरें नाहीं कोणी । गुरु होत कां
देव तेहेतीस तीन्ही ॥ २ ॥ जना वासना हे धना थोरि आहे । तुज
लागली संगती तेचि सोये । करीं सर्व संगी परि त्यागु ठायीं ।
तुका वीनवीतो मस्तक ठेवूनि पायीं ॥ ३ ॥

---

## ओव्या.

॥ ५२३ ॥

पहिली माझी ओवी ओवीन जगत्र । गाईन पवित्र पांडुरंग ॥ १ ॥
दुसरी माझी ओवी दुजें नाहीं कोठें । जनीं वनीं भेटे पांडुरंग ॥२॥
तिसरी माझी ओवी तिळा नाहीं ठाव । अवघाचि देव जनीं वनीं ॥३॥
चवथी माझी ओवी वैरिलें दळण । गाईन निधान पांडुरंग ॥ ४ ॥
पांचवी माझी ओवी माझिया माहेरा । गाईन निरंतरा पांडुरंगा ॥५॥
साहावी माझी ओवी साहाही आटले । गुरुमूर्ति भेटले पांडुरंग॥६॥
सातवी माझी ओवी आठवे वेळोवेळां । बैसलासे डोळां पांडुरंग ॥७॥
आठवी माझी ओवी अठ्ठावीस युगें । उभा चंद्रभागे पांडुरंग ॥८॥
नववी माझी ओवी सरलें दळण । चुकलें मरण संसारींचें ॥ ९ ॥
दाहावी माझी ओवी दाहा अवतारा । न यावें संसारा तुका ह्मणे ॥१०॥

॥ ५२४ ॥

पांडुरंगा करूं प्रथम नमन । दुसरें चरणा संतांचिया ॥ १ ॥ त्याच्या
कृपादानें कथेचा विस्तारु । बाबाजीसद्गुरुदास तुका ॥ २ ॥ काय माझी
वाणी मानेल संतांसी । रंजवूं चित्तासी आपुलिया ॥ ३ ॥ या मनासी
लागो हरिनामाचा छंद । आवडी गोविंद गावयासी ॥ ४ ॥ सीण जाला
मज संसारसंभ्रमें । सीतळ या नामें जाली काया ॥ ५ ॥ या सुखा
उपमा नाहीं द्यावयासी । आलों आकारासी निर्विकार ॥ ६ ॥ नित्य धांवे
वेधें नामाचा गजर । घोष जयजयकार आइकतां ॥ ७ ॥ तांतडी ते

काय हरिगुण गाय । आणीक उपाय दुःखमूळ ॥ ८ ॥ मूळ नरकाचें राज्य मदें माते । अंतरे बहुत देव दुरी ॥ ९ ॥ दुरी अंतरला नामनिंदकासी । जैसें गोचिडासी क्षीर राहे ॥ १० ॥ हे वाट गोमटी वैकुंठासी जातां । रामकृष्णकथा दिंडी ध्वजा ॥ ११ ॥ जाणते तयांनीं सांगितलें करा । अंतरासी वारा आडूनियां ॥ १२ ॥ यांसी आहे ठावें परि अंध होती । विषयाची खंती वाटे जना ॥ १३ ॥ नाहीं त्या सुटलीं द्रव्य लोभ माया । भस्म दंड छाया तरुवराची ॥ १४ ॥ चित्त ज्याचें पुत्रपत्नीबंधूवरी । सुटेल हा परि कैसें जाणा ॥ १५ ॥ जाणते नेणते करा हरिकथा । तराल सर्वथा भाक माझी ॥ १६ ॥ माझी मज असे घडली प्रचित । नसल पतित ऐसा कोणी ॥ १७ ॥ कोणी तरी कांहीं केलें आचरण । मज या कीर्तनेंविण नाहीं ॥ १८ ॥ नाहीं भय भक्ता तराया पोटाचें । देवासी तयाचें करणें लागे ॥ १९ ॥ लागे पाठोवाटी पाहे पायांकडे । पीतांबरें खडे वाट झाडी ॥ २० ॥ डिंकोनियां कां रे राहिले हे लोक । हेंचि कवतुक वाटे मज ॥२१॥ जयानें तारिले पाषाण सागरीं । तो ध्या रे अंतरीं स्वामी माझा ॥ २२ ॥ माझिया जीवाची केली सोडवण । ऐसा नारायण कृपाळू हा ॥ २३ ॥ हाचि माझा नेम हाचि माझा धर्म । नित्य वाचे नाम विठोबाचें ॥ २४ ॥ चेतवला अग्नि तापत्रयज्वाळ । तो करी शीतळ रामनामें ॥ २५ ॥ मना धीर करीं दृढ चित्तीं धरीं । तारील श्रीहरी मायबाप ॥ २६ ॥ बाप हा कृपाळू भक्तां भाविकांसी । घरीं होय दासी कामारी त्या ॥२७॥ त्याचा भार माथां चालवी आपुला । जिहीं त्या दिधला सर्व भाव ॥२८॥ भावेंविण जाणा नाहीं त्याची प्राप्ति । पुराणें बोलती ऐसी मात ॥२९॥ मात त्याची जया आवडे जीवासी । तया गर्भवासीं नाहीं येणें ॥३०॥ यावें गर्भवासीं तरीच विष्णुदासीं । उद्धार लोकांसी पूज्य होती ॥३१॥ होती आवडते जीवाचे ताइत । त्यां घडी अच्युत न विसंबे ॥३२॥ भेदाभेद नाहीं चिंता दुःख कांहीं । वैकुंठ त्या ठायीं सदा वसे ॥३३॥

वसे तेथें देव सदा सर्वकाळ । करिती निर्मळ नामघोष ॥३४॥
संपदा तयांची न सरे कल्पांतीं । मेळविला भक्ती देवलाभ ॥३५॥
लाभ तयां जाला संसारा येऊनी । भगवंत ऋणी भक्ती केला ॥३६॥
लागलेंसे पिसें काय मूढ जना । काय नारायणा विसरलीं ॥३७॥
विसरलीं तयां थोर जाली हाणी । पचविल्या खाणी चौऱ्यासीच्या ॥३८॥
शिकविलें तरी नाहीं कोणा लाज । लागलीसे भाज धन गोड ॥३९॥
गोड एक आहे अविट गोविंद । आणीक ते छंद नासिवंत ॥४०॥
तळमळ त्याची कांहीं तरी करा । कां रे निदसुरा बुडावया ॥४१॥
या जनासी भय यमाचें कां नाहीं । सांडियेलीं तिहीं एकराज्यें ॥ ४२ ॥
जेणें अग्निमाजी घातलासे पाव । नेणता तो गव जनक होता ॥ ४३ ॥
तान भूक जिहीं साहिले आघात । तया पाय हात काय नाहीं ॥ ४४ ॥
नाहीं ऐसा तिहीं केला संवसार । दुःखाचे डोंगर तोडावया ॥ ४५ ॥
याच जन्में घडे देवाचें भजन । आणीक हें ज्ञान नाहीं कोठें ॥ ४६ ॥
कोठें पुढें नाहीं घ्यावया विसांवा। फिरोनि या गांवा आल्याविण॥४७॥
विनवितां दिवस बहुत लागती । ह्मणउनि चित्तीं देव धरा ॥ ४८ ॥
धरा पाय तुह्मी संतांचे जीवेंसी । वियोग तयांसी देवा नाहीं ॥ ४९ ॥
नाहीं चाड देवा आणीक सुखाची । आवडी नामाची त्याच्या तया॥५०॥
त्याचींच उच्छिष्ट बोलतों उत्तरें । सांगितलें खरें व्यासादिकीं ॥ ५१ ॥
व्यासें सांगितलें भक्ति हेंचि सार । तरावया पार भवसिंधु ॥ ५२ ॥
तरावया जना केलें भागवत । गोवळ गोपी भक्त माता पिता ॥ ५३ ॥
तारूनियां खरे नेली एक्यासरें । निमित्तें उत्तरें ऋषीचिया ॥ ५४ ॥
यासी वर्म ठावें भक्तां तरावया । जननी बाळ माया राखे तान्हें॥५५॥
तान्हेलें भुकेलें ह्मणे वेळोवेळां । न मागतां ळळा जाणोनियां ॥ ५६ ॥
जाणोनियां वर्म देठ लावियेला । द्रौपदीच्या बोलासवें धांवे ॥ ५७ ॥
धांवे सरवता धेनू जैसी वत्सा । भक्तालागीं तैसा नारायण ॥ ५८ ॥
नारायण व्हावा हांव जया जीवा । धन्य त्याच्या दैवा पार नाहीं ॥५९॥

पार नाहीं सुखा तें दिलें तयासी । अखंड वाचेसी रामनाम ॥६०॥
रामनाम दोनी उत्तम अक्षरें । भवानीशंकरें उपदेशिलीं ॥६१॥
उपदेश करी विश्वनाथ कानीं । वाराणसी प्राणी मध्यें मरे ॥६२॥
मरणाचे अंतीं राम ह्मणे जरी । न लगे यमपुरी जावें तया ॥६३॥
तयासी तो ठाव कैलास वैकुंठीं । वसे नाम कंठीं सर्वकाळ ॥६४॥
सर्वकाळ वसे वैष्णवांच्या घरीं । नसे क्षणभरी स्थिर कोठें ॥६५॥
कोठें नका पाहों करा हरिकथा । तेथें अवचिता सांपडेल ॥६६॥
सांपडे हा देव भाविकांचे हातीं । ब्राह्मणें मरती तरी नाहीं ॥६७॥
नाहीं भलें भक्ति केलियावांचूनी । अहंता पापिणी नागवण ॥६८॥
नागवलों ह्मणे देव मी आपणा । लाभ दिला जना ठकलों तो ॥६९॥
तोचि देव येर नव्हे ऐसें कांहीं । जनार्दन ठायीं चहूं खाणी ॥७०॥
खाणी भरूनियां राहिलासे अंत । बोलावया मात ठाव नाहीं ॥७१॥
ठाव नाहीं रिता कोणी देवाविण । ऐसी ते सज्जनसंतवाणी ॥७२॥
वाणी बोलूनियां गेले एक पुढें । तयासी वांकुडें जातां ठके ॥७३॥
ठका नाहीं अर्थ ठाउका वेदांचा । होऊनी भेदाचा दास ठेला ॥७४॥
दास ठेला पोट अर्थ दंभासाठीं । ह्मणउनि तुटी देवासवें ॥७५॥
सवें देव द्विजातींहीं दुराविला । आणिकांचा आला कोण पाड ॥ ७६ ॥
पाड करूनियां नागविलीं फार । पंडित वेव्हार खळवादी ॥ ७७ ॥
वादका निंदका देवाचें दर्शन । नव्हे जाला पूर्ण षड्कर्मी ॥ ७८ ॥
षड्कर्मी हीन रामनाम कंठीं । तयासवें भेटी सत्य देवा ॥ ७९ ॥
देवासी आवडे भाविक जो भोळा । शुद्ध त्या चांडाळा करुनि मानी ॥८०॥
मानियेला नाहीं विश्वास या बोला । नाम घेतां मला युक्ति थोडी ॥८१॥
युक्ति थोडी मज दुर्बळाची वाचा । प्रताप नामाचा बोलावया ॥ ८२ ॥
बोलतां पांगल्या श्रुति नेति नेति । खुंटलिया युक्ति पुढें त्यांच्या ॥ ८३ ॥
पुढें पार त्याचा न कळेचि जातां । पाउलें देखतां ब्रह्मादिकां ॥ ८४ ॥
काय भक्तिपिसें लागलें देवासी । इच्छा ज्याची जैसी तैसा होय ॥८५॥

होय हा सगुण निर्गुण आवडी। भक्तिप्रिय गोडी फेडावया ॥ ८६ ॥
मायबापा बाळ बोले लाडें कोडें । करुनी वांकुडें मुख तैसें ॥ ८७ ॥
तैसें याचकाचें समाधान दाता। होय हा राखता सत्त्वकाळीं॥ ८८॥
सत्वकाळीं कामा न येती आयुधें। बळ हा संबंध सैन्यलोक ॥ ८९ ॥
सैन्यलोक तया दाखवी प्रताप । लोटला हा कोप कोपावरी ॥ ९० ॥
कोपा मरण नाहीं शांत होय त्यासी। प्रमाण भल्यासी सत्त्वगुण ॥९१॥
सत्त्वरजतम आपण नासती । करितां हे भक्ति विठोबाची ॥ ९२ ॥
चित्त रंगलिया चैतन्यचि होय । तेथें उणें काय निजसुखा ॥९३॥
सुखाचा सागर आहे विटेवरी । कृपादान करी तोचि एक ॥९४॥
एक चित्त धरूं विठोबाचे पायीं। तेथें उणें कांहीं एक आह्मां ॥९५॥
आह्मांसी विश्वास त्याचिया नामाचा। ह्मणउनि वाचा घोष करूं ॥९६॥
करूं हरिकथा सुखाचा समाधि। आणिकाचि बुद्धि दुष्ट नासे ॥९७॥
नासे संवसार लोकमोहो माया। शरण जातां या रे विठोबासी ॥९८॥
सिकविलें मज मूढा संतजनीं । दृढ या वचनीं राहिलोंसें ॥९९॥
राहिलोंसें दृढ विठोबाचे पायीं। तुका ह्मणे कांहीं न लगे आतां ॥१००॥

॥ ५२५ ॥

गाईन ओंवियां पंढरीचा देव । आमुचा तो जीव पांडुरंग ॥ १ ॥
रंगलें हें चित्त माझें तया पायीं । ह्मणउनि घेई हाचि लाहो ॥ २ ॥
लाहो करीन मी हाचि संवसारीं। राम कृष्ण हरि नारायण ॥ ३ ॥
नारायण नाम घालितां तुकासी । न येती या रासी तपतीर्थें ॥ ४ ॥
तीर्थें रज माथां वंदिती संतांचे । जे गाती हरीचे गुणवाद ॥ ५ ॥
गुणवाद ज्याचे गातां पूज्य जाले। बडिवार बोले कोण त्याचा ॥६॥
त्याचा पार नाहीं कळला वेदांसी। आणीक ही ऋषि विचारितां ॥ ७ ॥
विचारितां तैसा होय त्यांच्या भावें। निजसुख ठावें नाहीं कोणा ॥ ८ ॥
कोणा कवतुक न कळे हे माव । निजलिया जीव करी धंदा ॥ ९ ॥
करूनि कवतुक खेळे हाचि लीळा। व्यापूनि वेगळा पाहातसे ॥१०॥

सेवटीं आपण वेगळाची खरा । सोंग हा पसारा नट केला ॥ ११ ॥
लावियेलें चाळा मीपणें हें जन । भोग तया कोण भोगविशी ॥ १२ ॥
विषयीं गुंतलीं विसरलीं तुज । कन्या पुत्र भाज धनलोभें ॥ १३ ॥
लोभें गिळी फांसा आमिषाच्या आशा। सांपडोनी मासा तळमळी॥ १४॥
तळमळ त्याची तरीच शमेल । जरी हा विठ्ठल आठविती ॥ १५ ॥
आठवे हा तरी संतांच्या सांगातें । किंवा हें संचित जन्मांतर ॥१६॥
जन्मांतरें तीन भोगितां कळती । केलें ते पावती करितां पुढें ॥१७॥
पुढें जाणोनियां करावें संचित । पूजावे अतीत देव द्विज ॥ १८ ॥
जन्म तुटे ऐसें नव्हे तुह्मां जना । पुढिल्या पावना धर्म करा ॥ १९ ॥
करा जप तप अनुष्ठान याग । संतीं हे मार्ग स्थापियेले ॥ २० ॥
लावियेलीं कर्मं शुद्ध आचरणें । कोणा एका तेणें काळें पावे ॥२१॥
पावला सत्वर निष्काम उदार । जिंकिली अपार वासना हे ॥ २२ ॥
वासनेचें मूळ छेदिल्यावांचून । तरलोंसें कोणी न ह्मणावें ॥ २३ ॥
न ह्मणावें जाला पंडित वाचक । करूनि मंत्रपाठ अक्षरांचा ॥ २४ ॥
चाळविलीं एकें तेंचि आवर्तनें । लोक दंभमानें देहसुखें ॥ २५ ॥
सुख तरीच घडे भजनाचें सार । वाचे निरंतर रामनाम ॥ २६ ॥
राम हा उच्चार तरीच वैसे वाचे । अनंता जन्मांचें पुण्य होय ॥२७॥
पुण्य ऐसें काय रामनामापुढें । काय ते बापुडे यागयज्ञ ॥ २८ ॥
यागयज्ञ तप संसारदायकें । न तुटती एके नामेंविण ॥ २९ ॥
नामेंविण भवसिंधु पावे पार । अइसा विचार नाहीं दुजा ॥ ३० ॥
जाणती हे भक्तराज महामुनि । नाम सुखधणी अमृताची ॥ ३१ ॥
अमृताचें सार निजतत्त्व बीज । गुह्याचें तें गुज रामनाम ॥ ३२ ॥
नामें असंख्यात तारिले अपार । पुराणीं हें सार प्रसिद्ध हे ॥ ३३ ॥
हेंचि सुख आह्मी घेऊं सर्वकाळ । करूनी निर्मळ हरिकथा ॥ ३४ ॥
कथाकाळीं लागे सकळा समाधी । तात्काळ हे बुद्धि दुष्ट नासे ॥ ३५ ॥
नासे लोभ मोहो आशा तृष्णा माया । गातां गुण तया विठोबाचे ॥३६॥

विठोबाचे गुण मज आवडती। आणीक हे चित्तीं न लगे कांहीं ॥ ३७ ॥
कांहीं कोणी नका सांगों हे उपाव। माझ्या मनीं भाव नाहीं दुजा ॥३८॥
जाणोनियां आह्मीं दिला जीवभाव। दृढ याचे पाव धरियेले ॥ ३९ ॥
धरियेले आतां न सोडीं जीवेसीं। केला येच विशीं निरधार ॥ ४० ॥
निरधार आतां राहिलों ये नेटीं। संवसारतुटी करूनियां ॥ ४१ ॥
येणें अंगीकार केला पांडुरंगें। रंगविलों रंगें आपुलिया ॥ ४२ ॥
आपुली पाखर घालूनियां वरी। आह्मांसी तो करी यत्न देव ॥४३॥
देव राखे तया आणिकांचे काय। करितां उपाय चाले तेथें ॥ ४४ ॥
तेथें नाहीं रिघ कळिकाळासी येतां। दास ह्मणवितां विठोबाचे॥४५॥
विठोबाचे आह्मी लाडिके डिंगर। कांपती असुर काळ धाकें॥४६॥
धाक तिहीं लोकीं जयाचा दरारा। स्मरण हें करा त्याचें तुह्मी ॥४७॥
तुह्मी निदसुरे नका राहूं कोणी। चुकवा जाचणी गर्भवास ॥ ४८ ॥
गर्भवासदुःख यमाचें दंडण। थोर होय शीण येतां जातां ॥ ४९ ॥
तान भूक पीडा जीतां ते आघात। मेल्या यमदूत जाच करिती॥५०॥
जाच करिती हें कोणा आहे ठावें। नरकीं कौरवें बुडी दिली ॥५१॥
बुडी दिली कुंभपाकीं दुर्योधनें। दाविना लाजेनें मुख धर्मा ॥५२॥
धर्म हा कृपाळू आलासे जवळी। बैसला पाताळीं वरी नये ॥५३॥
न ये वरी कांहीं करितां उपाव। भोगवितो देव ज्याचें त्यासी ॥५४॥
त्यांसी अभिमान गर्व या देहाचा। नुच्चारिती वाचा नारायण॥५५॥
नारायण विसरलीं संवसारी। तयांसी अघोरीं वास सत्य ॥ ५६ ॥
सत्य मानूनियां संतांच्या वचना। जा रे नारायणा शरण तुह्मी ॥५७॥
तुह्मी नका मानूं कोणाचा विश्वास। पुत्र पत्नी आस धन वित्त॥५८॥
धन वित्त लोभ माया मोहपाश। मांडियेले फांसे यमदूतीं ॥ ५९ ॥
दूतीं याच्या मुखा केलेंसे कुडण। वाचे नारायण येऊं नेदी ॥६०॥
नेदी शुद्धबुद्धि आतळों चित्तासी। नाना कर्में त्यासी दुरावतां ॥६१॥
दुराविलीं एकें जाणतींच फार। निंदा अहंकार वादभेद ॥ ६२ ॥

वादभेद निंदा हे फंद काळाचे । गोंवितील वाचे रिकामिकें ॥ ६३ ॥
रिकामिक देहा होय नव्हे मना । चिंतेचिये घाणा जुंपिजेसी ॥६४॥
सेवटीं हे गळा लावूनियां दोरी । सांभाळ ये करीं वासनेचा ॥६५॥
वासनेचा संग होय अंतकाळीं । तरी तपोबळी जन्म धरी ॥ ६६ ॥
धरूनियां देव राहतील चित्तीं । आधींचिया गति आठवाया ॥ ६७ ॥
आठवावा देव मरणाचे काळीं । ह्मणउनि बळी जीव दिले ॥ ६८ ॥
दिले टाकूनियां भोग ऋषेश्वरीं । खाती वनांतरीं कंदमूळें ॥ ६९ ॥
मुळें सुखाचिया देव अंतरला । अन्नासाटीं नेला अधोगती ॥ ७० ॥
गति हे उत्तम व्हावया उपाव । आहे धरा पाव विठोबाचे ॥ ७१ ॥
विठोबाचे पायीं राहिलिया भावें । न लगे कोठें जावें वनांतरा ॥७२॥
तरती दुर्जन विठोबाच्या नांवें । संचित ज्या सवें नाहीं शुद्ध ॥७३॥
शुद्ध तें चि नांव काय तें नवल । ह्मणतां विठ्ठल वेळोवेळां ॥ ७४ ॥
वेळकाळ नाहीं करणाचें हातीं । न कळे हे गति भविष्याची ॥७५॥
भविष्य न सरे भोगिल्यावांचूनि । संचित जाणोनी शुद्ध करा ॥७६॥
करावे सायास आपुल्या हिताचे । येथें आलियाचें मनुष्यपण ॥७७॥
मनुष्यपण तरी भजा नारायण । नाहीं तरी हीन पशुहूनी ॥ ७८ ॥
पशु पाप पुण्य काय तें जाणती । मनुष्या या गति ठाउकिया ॥७९॥
ठाउकें हे जैसें पाप पुण्य लोकां । देखती ते एकां भोगितिया ॥ ८० ॥
भोगतील एक दुःख संवसारीं । काय सांगों परी वेगळाल्या ॥ ८१ ॥
त्यावें खावें वरें असावें सदैव । हेचि करी हांव संवसारीं ॥ ८२ ॥
संवसारें जन गिळिले सकळ । भोगवितो फळ गर्भवासा ॥ ८३ ॥
वासनेचें मूळ छेदिल्यावांचून । नव्हे या खंडण गर्भवासा ॥ ८४ ॥
सायास केलियावांचूनी तें कांहीं । भोगावरी पाहीं घालूं नये ॥८५॥
नये बळें धड घालूं कांट्यावरी । जाये जीवें धरी सर्प हातीं ॥८६॥
हातीं आहे हित करील तयासी । ह्मणउनि ऋषीं सांगितलें ॥ ८७ ॥
सांगती या लोकां फाजित करूनी । आपण जे कोणी तरले ते ॥८८॥

तेणें वाळवंटीं उभारिले कर । कृपेचा सागर पांडुरंग ॥ ८९ ॥
गंगाचरणीं करी पातकांची धुनी । पाउलें तीं मनीं चिंतिलिया ॥९०॥
चिंतनें जयाच्या तारिले पाषाण । उद्धरी चरण लावूनियां ॥ ९१ ॥
लावूनियां टाळी नलगे बैसावें । प्रेमसुख घ्यावें संतसंगें ॥ ९२ ॥
संतसंगें कथा करावें कीर्तन । सुखाचें साधन रामनाम ॥ ९३ ॥
मग कोठें देव जाऊं न सके दुरी । बैसोनी भीतरी राहे कंठीं ॥ ९४ ॥
राहे व्यापुनियां सकळ शरीर । आपुला विसर पडों नेदी ॥ ९५ ॥
नेदी दुःख देखों आपुलिया दासा । वारी गर्भवासा यमदूता ॥ ९६ ॥
तान भूक त्यासी वाहों नेदी चिंता । दुश्चित हे घेतां नाम होती ॥९७॥
होती जीव त्यांचे सकळ ही जंत । परि ते अंकित संचिताचे ॥ ९८ ॥
चेवले जे कोणी देहअभिमानें । त्यांसी नारायणें कृपा केली ॥ ९९ ॥
कृपाळु हा देव अनाथा कोंवसा। आह्मी त्याच्या आशा लागलोंसों १००॥
लावियेले कासे येणें पांडुरंगें । तुका ह्मणे संगें संतांचिया ॥ १०१ ॥

---

## दोहोरे.

॥ ५२६ ॥

तुका वस्तर बिचारा क्या करे रे । अंतर भगवान होय । भीतर मैला केंव मिटे रे । मरे उपर धोय ॥१॥ रामराम कहे रे मन । औरसुं नहिं काज । बहुत उतारे पार । आघे राख तुकाकी लाज ॥२॥ लोभीके चित धन बैठे । कामीन चित काम । माताके चित पुत बैठे । तुकाके मन राम ॥३॥ तुका पंखिबहिरन मानूं । बोई जनावर बाग । असंतनकुं संत न मानुं । जे बर्मकुं दाग ॥४॥ तुका राम बहुत मिठा रे । भर राखूं शरीर । तनकी करूं नावरि । उतारूं पैल तीर ॥५॥ संतन पन्हयां लें खडा । राहूं ठाकुरद्वार । चलत पाछें हुं फिरों । रज उडत लेऊं सीर ॥६॥ तुका प्रभु बडो न मनूं न मानूं बडो । जिसपास बहु दाम । बलिहारि उस मुखकी । जिसती निकसे राम ॥७॥ राम कहे सो मुख भलारे ।

खावे खीर खांड । हरिबिन मुखमो धूल परी रे । क्या जनी उस रांड ॥८॥ राम कहे सो मुख भला रे । बिन रामसें बीख । आव न जानूं रमते बेरों । जब काल लगावे सीख ॥९॥ कहे तुका मैं सवदा बेचूं । लेवेके तन हार । मिठा साधुसंतजन रे । मुरुखके सिर मार ॥१०॥ तुका दास तिनका रे । रामभजन निरास । क्या बिचारे पंडित करो रे । हात पसारे आस ॥११॥ तुका प्रीत रामसुं । तैसी मिठी राख । पतंग जाय दीपपर रे । करे तनकी खाक ॥१२॥ कहे तुका जग भुला रे । कह्या न मानत कोय । हात परे जब कालके । मारत फोरत डोय ॥१३॥ तुका सुरा नहिं सबदका रे । जब कमाई न होये । चोट साहे घनाकि रे । हिरा नीबरे तोये ॥१४॥ तुका सुरा बहुत कहावे । लडत बिरला कोये । एक पावे उंच पदवी । एक खोंसा जोये ॥१५॥ तुका मार्‍या पेटका । और न जाने कोये । जपता कछु रामनाम । हरिभगतनकी सोये ॥१६॥ *तुका सज्जन तिनसुं कहिये । जिनथी प्रेम दुनाये । दुर्जन तेरा मुख काला । थीता प्रेम घटाये ॥ १७ ॥ काफर सोही आपण बुझे । आला दुनियां भर । कहे तुका तुम्हें सुनो रे भाई । हिरदा जिन्होका कठोर ॥१८॥ भीस्त न पावे मालथी । पढिया लोक रिझाये । निचा जर्थे कमतरिण । सो ही सो फल खाये ॥ १९ ॥ फल पाया तो खुस भया । किन्होसुं न करे बाद । बान न देखे मिरगा रे । चित मिलाया नाद ॥ २० ॥ तुका दास रामका । मनमे एक हि भाव । तो न पालटूं आब । ये हि तन जाव ॥२१॥ तुका रामसुं चित बांध राखूं । तैसा आपनी हात । धेनु बछरा छोर जावे । प्रेम न छुटे सात ॥ २२ ॥ चितसुं चित जब मिले । तब तनु थंडा होये । तुका मिलना जिन्होसुं । ऐसा बिरला कोये ॥ २४ ॥ चित मिले तो सब मिले । नहिं तो फुकट संग । पानी पथर येकही

---

* हा दोहोरा पुढील पंचविसाव्या दोहोऱ्याशीं बहुतेक समान असल्यामुळें पुष्कळ प्रतींत गाळला आहे.

ठोर । कोर न भिजे अंग ॥ २४ ॥ तुका संगत तिनसें कहिये । जिनसें सुख दुनाये । दुर्जन तेरा मू काला । थीतो प्रेम घटाये ॥२५॥ तुका मिलना तो भला । मनसुं मन मिल जाय । उपर उपर मट्टि घसनी । उनकि कोन बराई ॥ २६ ॥ तुका कुटुंब छोरे रे । लरके जोरों सिर मुंदाय । जबथे इच्छा नहिं मुई । तब तूं किया काय ॥२७॥ तुका इच्छा मीट नहिं तो । काहा करे जट खाक । मथीया गोला डारदिया तो । नहिं मिले फेरन ताक ॥ २८ ॥ ब्रीद मेरे साइंयाके । तुका चलावे पास । सुरा सो हि लरे हमसें । छोरे तन-की आस ॥ २९ ॥ कहे तुका भला भया । हुं हुवा संतनका दास । क्या जानूं केते मरता । जो न मिटती मनकी आस ॥ ३० ॥ तुका और मिठाई क्या करूं रे । पाले विकारपिंड । राम कहावे सो भली रुखी । माखन खांडखीर ॥ ३१ ॥

## उत्तराधिपदें.

॥ ५२७ ॥

क्या गाऊं कोई सुननेवाला । देखें तों सब जग ही भुला ॥ १ ॥
खेलों आपने रामहिसात । जैसी वैसी करहों मात ॥ २ ॥
काहांसे लाऊं मधुरा बानी । रीझे ऐसी लोक बिरानी ॥ ३ ॥
गिरिधर लाल तो भावका भुका । राग कला नहिं जानत तुका ॥ ४ ॥

॥ ५२८ ॥

छोडे धन मंदिर बन बसाया । मांगत टुका घरघर खाया ॥ १ ॥
तीनसों हम करवों सलाम । ज्यामुख बैठा राजाराम ॥ २ ॥
तुलसीमाला बभूत चऱ्हावे । हरजीके गुण निर्मल गावे ॥ ३ ॥
कहे तुका जो सांई हमारा । हिरनकश्यप जिन्हे मारहि डारा ॥ ४ ॥

॥ ५२९ ॥

मंत्रतंत्र नहिं मानत साखी । प्रेमभाव नहिं अंतर राखी ॥ १ ॥

राम कहे त्याके पग हूं लागूं । देखत कपट अभिमान दुर भागूं ॥२॥ अधिक याती कुलहीन नहिं जानूं । जाने नारायन सो प्रानी मानूं ॥३॥ कहे तुका जीव तन डारू वारी । राम उपासिहुं बलियारी ॥ ४ ॥

॥ ५३० ॥

हरिसूं मिल दे एकहि बेर । पाछें तूं फिर नावे घेर ॥ १ ॥ मात सुनों दुति आवे मनावन। जाया करति भर जोबन ॥ २ ॥ हरिसुख मोहि कहिया न जाये । तब तूं बुझे आगो पाये ॥ ३ ॥ देखहि भाव कछु पकरी हात । मिलाई तुका प्रभुसात ॥ ४ ॥

॥ ५३१ ॥

क्या कहूं नहिं बुझत लोका । लिजावे जम मारत धका ॥ १ ॥
क्या जीवनकी पकडी आस । हातों लिया नहिं तेरा घांस ॥ २ ॥
किसे दिवाने कहता मेरा । कछु जावे तन तूं सब ल्या न्यारा ॥ ३ ॥
कहे तुका तूं भया दिवाना । आपना विचार कर ले जना ॥ ४ ॥

॥ ५३२ ॥

कब मरूं पाऊं चरन तुह्मारे । ठाकुर मेरे जीवन प्यारे ॥ १ ॥
जग रडे ज्याकुं सो मोहि मीठा । मीठा दर आनंदमाहि पैठा ॥ २ ॥
भला पाऊं जनम इन्हे बेर । बस मायाके असंग फेर ॥ ३ ॥
कहे तुका धन मानहि दारा । वोहि लिये गुंडलीया पसारा ॥ ४ ॥

॥ ५३३ ॥

दासों पाछें दौरे राम।सोवे खडा आपें मुकाम ॥१॥ प्रेमसरडी बांधी गळे। खैंच चले उधर चेले॥२॥ आपने जनसुं भूल न देवे । कर हि धर आर्दे बाट बतावे ॥३॥ तुकाप्रभु दीनदयाला । वारि रे तुज पर हुं गोपाळा॥४॥

॥ ५३४ ॥

ऐसा कर घर आवे राम । और धंदा सब छोर हि काम ॥ १ ॥ इतने गोते काहे खाता।जब तूं आपना भूल न होता॥२॥ अंतरजामी जानत साच्या। मनका एक उपर बाचा ॥३॥ तुकाप्रभु देसविदेस । भरिया खाली नहिं लेस ॥ ४ ॥

॥ ५३५ ॥

मेरे रामको नाम जो लेवे बारोंबार । त्या के पाऊं मेरे तनकी पैजार ॥१॥
हांसत खेलत चालत बाट । खाना खाते सोते खाट ॥२॥ जातनसुं
मुजे कछु नहिं प्यार । असतेके नहिं हिंदु धेड चंभार ॥३॥ ज्याका
चित लगा मेरे रामको नाम । कहे तुका मेरा चित लगा त्याके पाव ॥४॥

॥ ५३६ ॥

आपें तरे त्याकी कोण बराई । औरनकूं भलो नाम घराई ॥ १ ॥
काहे भूमि इतना भार राखे । दुभत धेनु नहिं दुध चाखे ॥ २ ॥
बरसते मेघ फलतेहि बिरखा । कोन काम आपनी उन्होति रखा ॥ ३ ॥
काहे चंदा सुरज खावे फेरा । खिन एक बैठन पावत घेरा ॥ ४ ॥
काहे परिस कंचन करे धातु । नहिं मोल तुटत पावत धातु ॥ ५ ॥
कहे तुका उपकार हि काज । सब कररहिया रघुराज ॥ ६ ॥

॥ ५३७ ॥

जग चले उस घाट कोन जाय । नहिं समजत फिरफिर गोते खाय ॥१॥
नहिं एक दो सकळ संसार । जो वुझे सो आगला स्वार ॥२॥
उपर स्वार बैठे कृष्णापीठ । नहिं बाचे कोइ जावे लूट ॥३॥ देख हि
डर फेर बैठा तुका । जोवत मारग राम हि एका ॥ ४ ॥

॥ ५३८ ॥

भले रे भाई जिन्हें किया चीज । आछा नहिं मिलत वीज ॥ १ ॥
फीरतफीरत पाया सारा । मीलत ढोले धन किनारा ॥ २ ॥ तीरथ
बरत फिर पाया जोग । नहिं तलमल तुटत भवरोग ॥ ३ ॥ कहे
तुका मैं तोको दास । नहिं सिरभार चलावे पास ॥ ४ ॥

॥ ५३९ ॥

लाल कमली वोढे पेनाये । मोसु हरिबें कैसें बनाये ॥१॥ कहे सखि
तुम्हें करति सोर । हिरदा हरिका कठिन कठोर ॥२॥ नहिं क्रिया
सरम कछु लाज । और सुनाउं बहुत हे भाज ॥३॥ और नामरूप
नहिं गोवळिया । तुकाप्रभु माखन खाया ॥४॥

॥ ५४० ॥

राम कहो जीवना फल सो ही । हरिभजनसुं विलंब न पाई ॥ १ ॥
कवनका मंदर कवनकी झोपरी । एकरामबिन सब हि फुकरी ॥२॥
कवनकी काया कवनकी माया । एकरामबिन सब हि जाया ॥३॥
कहे तुका सब हि चलनार । एकरामबिन नहिं वा सार ॥४॥

॥ ५४१ ॥

काहे भुला धनसंपत्ती घोर । रामनाम सुन गाउ हो बाप रे ॥ १ ॥
राजे लोक सब कहे तूं आपना । जब काल नहिं पाया ठाना ॥ २ ॥
माया मिथ्या मनका सब धंदा । तजो अभिमान भजो गोविंदा ॥३॥
राना रंक डोंगरकी राई । कहे तुका करे इलाहि ॥ ४ ॥

॥ ५४२ ॥

काहे रोवे आगले मरना । गंव्हार तूं भुला आपना ॥१॥ केते मालुम नहिं पडे । नन्हे बडे गये सो ॥२॥ बाप भाई लेखा नहिं । पाछें तूं हि चलनार ॥३॥ काले बाल सिपत भये । खबर पकडो तुका कहे ॥ ४ ॥

॥ ५४३ ॥

क्या मेरे राम कवन सुख सारा । कहकर दे पुछूं दास तुह्मारा ॥ १ ॥
तनजोबनकी कोन बराई । व्याधपीडादिस काटहि खाई ॥ २ ॥
कीर्त बधाऊं तों नाम न मेरा । काहे झुटा पछताऊं घेरा ॥ ३ ॥
कहे तुका नहिं समजत मात । तुह्मारे शरन हे जोडत हात ॥ ४ ॥

॥ ५४४ ॥

देखत आखों झुटा कोरा । तो काहे छोरा घरबार ॥१॥ मनसुं किया चाहिये पाख । उपर खाक पसारा ॥२॥ कामक्रोधसो संसार । वो सिर-भार चलावे ॥३॥ कहे तुका वो संन्यास । छोडे आस तनकी हि ॥ ४ ॥

॥ ५४५ ॥

रामभजन सब सार मिठाई । हरि संताप जनमदुख राई ॥ १ ॥
दुधभात घृत सकरपारे । हरते भुक नहि अंतवारे ॥ २ ॥ खावते

जुग सब चलिजावे । खटामिठा फिर पचतावे ॥ ३ ॥ कहे तुका रामरस जो पीवे । बहुही फेरा वो कबहु न खावे ॥ ४ ॥

॥ ५४६ ॥

बारबार काहे मरत अभागी । बहुरी मरन संकया तोरे भागी ॥ १ ॥
ये हि तन करते क्या ना होय । भजन भगति करे बैकुंठे जाय ॥२॥
रामनाम मोल नहिं बेचे कवरि । वो हि सब माया छुरावत मगरी ॥३॥
कहे तुका मनसुं मिल राखो । रामरस जिव्हा नित चाखो ॥ ४ ॥

---

## भुपाळ्या.

॥ ५४७ ॥

उठा सकळ जन उठिले नारायण । आनंदले मुनिजन तिन्ही लोक ॥१॥
करा जयजयकार वाद्यांचा गजर । मृदंग विणे अपार टाळ घोळ ॥२॥
जोडोनियां कर मुख पाहा सादर । पायांवरी शिर ठेवूनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय पढियंते तें मागा । आपुलालें सांगा दुःख सकळ ॥ ४ ॥

॥ ५४८ ॥

घडिया घालुनि तळीं चालती वनमाळी । उमटती कोमळीं कुंकुमाचीं ॥ १ ॥
वंदा चरणरज अवघे सकळ जन । तारियेले पाषाण उदकीं जेणें ॥२॥
प्रेम धरुनी चला टाकत ठायीं ठायीं । मौन्य धरुनी कांहीं न बोलावें ॥३॥
तुका अवसरु जाणविती पुढें । उघडली महाल मंदिरें कवाडें ॥४॥

॥ ५४९ ॥

माझें चित्त तुझे पायीं । राहे ऐसें करीं कांहीं । धरोनियां बाहीं । भव तारीं दातारा ॥ १ ॥ चतुरा तूं शिरोमणि । गुणलावण्याची खाणी । मुगुट सकळां मणि । धन्य तूंचि विठोबा ॥ २ ॥ करीं तिमिराचा नाश । दीप होऊनि प्रकाश । तोडीं आशापाश । करीं वास हृदयीं ॥३॥ पाहें गुंतलों नेणतां । तुज असो माझी चिंता । तुका ठेवी माथा । पायीं आतां राखावें ॥४॥

॥ ५५० ॥

बोलोनी वाऊं कां तुह्मी तेणा जी देवा । ठेवाल तें ठेवा ठायीं तैसा राहेन ॥१॥ पांगुळलें मन कांहीं नाठवे उपाय । ह्मणऊनी पाय जीवीं धरूनी राहिलों ॥२॥ त्यागें भोगें दुःख काय मांडावें मांडावें । ऐसी धरियेली जीवें माझ्या थोरी आशंका ॥३॥ तुका ह्मणे मातें बाळा चुकलिया वनीं । न पवतां जननी दुःख पावे विठ्ठले ॥ ४ ॥

॥ ५५१ ॥

ऐसी वाट पाहे कांहीं निरोप कां मूळ । कांहो कळवळा तुह्मां उमटेचि ना॥ १॥ आह्मो पांडुरंगे पंढरीचे निवासे । लावूनियां आस चाळवूनी ठेविलें ॥ २ ॥ काय जन्मा येऊनियां केली म्यां जोडी । ऐसा घडीघडी चित्ता येतो आठव। ३ । तुका ह्मणे खरा न पवेचि विभाग । धिक्कारितें जग हेंचि लाहो हिशोबें ॥ ४ ॥

॥ ५५२ ॥

कां गा किविलवाणा केलों दीनाचा दीन । काय तुझी हीन शक्ति जालीसी दिसे ॥ १ ॥ लाज येते मना तुझा ह्मणवितां दास । गोडी नाहीं रस बोलिली यासारिखी ॥ २ ॥ लाजविलीं मागें संतांचीं हीं उत्तरें । कळों येतें खरें तुजें एकावरूनी ॥३॥ तुका ह्मणे माझी कोणें वदविली वाणी । प्रमादा-वांचूनी तुमचिया विठ्ठला ॥ ४ ॥

॥ ५५३ ॥

जळो माझें कर्म वांयां केली कटकट । जालें तैसें तंट नाहीं आलें अनुभवा ॥ १॥ आतां पुढें धीर काय देऊं या मना । ऐसें नारायणा प्रेरिलें तें पाहिजे ॥२॥ गुणवंत केलों दोष जाणायासाठीं । माझें माझे पोटीं बळकट दूषण ॥३॥ तुका ह्मणे अहो केशीराजा दयाळा । बरवा हा लळा पाळियेला शेवटीं ॥४॥

॥ ५५४ ॥

कामें नेलें चित्त नेदी अवलोकूं मुख । बहु वाटे दुःख फुटों पाहे हृदय ॥ १ ॥ कां जी सासुरवासी मज केलें भगवंता । आपुलिया सत्ता स्वाधीनता ते नाहीं ॥ २ ॥ प्रभातेसी वाटे तुमच्या यावें दर्शना । येथें न चले चोरी

उरली नाहीं वासना ॥ ३ ॥ येथें अवघे वांयां गेले दिसती सायास ।
तुका ह्मणे नास दिसे जाल्या वेचाचा ॥ ४ ॥

॥ ५५५ ॥

जळोत तीं येथें उपजविती अंतराय । सायासाची जोडी माझी तुमचे पाय ॥१॥ आतां मज साह्य येथें करावें देवा । तुझी घेईं सेवा सकळ गांवा उगवूनी ॥२॥ भोगें रोगा जोडोनियां दिलें आणीकां । अरुचि ते हो कां आतां सकळांपासूनि ॥३॥ तुका ह्मणे असो तुझें तुझे मस्तकीं । नाहीं ये लौकिकीं आतां मज वर्तणें ॥४॥

॥ ५५६ ॥

न सांगतां तुह्मां कळों येतें अंतर । विश्वीं विश्वंभर परिहाराचि न लगे ॥१॥
परि हे अनावर आवरितां आवडी । अवसान ते घडी पुरें देत नाहीं ॥२॥
काय उणें मज येथें ठेविलिये ठायीं । पोटा आलों तईंपासूनियां समर्थ ॥३॥
तुका ह्मणे अवघी आवरिली वासना । आतां नारायणा दुसरियापासूनी ॥४॥

---

## स्नान-भोजनादिकांविषयींचे अभंग.

॥ ५५७ ॥

जाली पाकसिद्धि वाट पाहे रखुमाई । उदक तापलें डेरां चोकसा मर्दू द्या पाई ॥१॥ उठा पांडुरंगा उशीर जाला भोजनीं । उभ्या आंचवणा गोपी कळस घेऊनी ॥२॥ अवघ्या सावचित्त सेवेलागीं सकळा । उद्धव अक्रूर आले पाचारूं मूळा ॥३॥ सावरिली मेज सुमनयाति सुगंधा । रत्नदीप ताटीं वाळा विडिया विनोदा ॥४॥ तुका विनंती करी पाहे पंढरीराणा । असा सावचित्त सांगे सकळा जना ॥५॥

॥ ५५८ ॥

नरी गेले हरी गहा क्षणभरी । होईल फळ धीर करावा ॥१॥ न करीं एकें मात । क्षण एक निवांत बैसावें ॥२॥ करूनी मर्दन सारिलें न्हाले देव अंग पुसी भवानी ॥३॥ नेसला सोनसळा विनवी

रखुमाई । वाढिलें आतां ठायीं चलावें जी ॥४॥ करूनियां भोजन घेतलें आंचवण । आनंदें नारायण पहुडले ॥५॥ तुका मान जाणवी आतां । सकळां बहुतां होती चित्तीं ॥६॥

॥ ५७९ ॥

द्या जी आह्मां कांहीं मागा जी रखुमाई । शेष उरलें तें ठायीं सनकादिकांचें ॥१॥ टोकत बाहेरी बैसलों आशा । पुराया ग्रासा एकमेकां ॥२॥ येथवरी आलों तुझिया नांवें । आस करूनी आह्मी दातारा ॥३॥ प्रेम देऊनियां बहुडा आतां दिला । तुका ह्मणे आतां विठ्ठल बोला ॥ ४ ॥

---

## आरत्या.

॥ ५८० ॥

ओंवाळूं आरती पंढरिराया । सर्व भावें शरण आलों तुझिया पायां ॥ १ ॥ सर्व व्यापून कैसें रूप आकळ । तो हा गोकुळ्यामाजी जाला कृष्ण बाळ ॥२॥ स्वरूप गुणातीत जाला अवतारधारी । तो हा पांडुरंग उभा विटेवरी ॥३॥ भक्तांचिया काजा कैसा रूपासी आला । ब्रीदाचा तोडर चरणीं मिरविला ॥ ४ ॥ आरते आरती कैसी ओंवाळिली । वाखाणितां कीर्ति वाचा परतली ॥ ५ ॥ भावभक्तिबळें होसी कृपाळू देवा । तुका ह्मणे पांडुरंगा तुझ्या न कळती मावा ॥ ६ ॥

॥ ५८१ ॥

काय तुझा महिमा वर्णूं मी किती । नाममात्रें भवपाश तुटती । पाहातां पाऊलें हे विष्णुमूर्ती । कोटिकुळांसहित जग उद्धरती ॥ १ ॥ जय देव जय देव जय पंढरिराया । श्रीपंढरिराया । करूनियां कुरवंडी सांडीन काया॥ २ ॥मंगळआरतीचा थोर महिमा । आणीक द्यावया नाहीं उपमा । श्रीमुखासहित देखे जो कर्मा- । पासुन सुटे जैसा रवि नासी तमा ॥३ धन्य व्रतकाळ हे एकादशी । जागरण उपवास घडे जयांसी । विष्णुपूजन एकाभावेंसी । नित्यमुक्त पूज्य तिहीं लोकांसी ॥४॥ न लागे

काळ जे तुज ध्यानी । अखंड तुझा वास तयांच्या चित्तीं । धाले सुखें सदा प्रेमें डुल्लती । तीर्थें मळिण वास तयांचा पाहाती ॥५॥ देव भक्त तूंचि जालासी दोन्ही । वाढावया सुख भक्ति हे जनीं । जड जीवा उद्धार होय लागोनी । शरण तुका वंदी पाउलें दोन्ही ॥६॥

॥ ५६२ ॥

जगदीश जगदीश तुज ह्मणती । परि या जनामाजी असशील युक्ति । पुण्यपापविरहित सकळां अधिक अधिपती । द्रष्टा परि नकळी अलिप्त गति ॥१॥ जय देव जय जय पंढरिनाथा । श्रीपंढरिनाथा । नुरे पाप विठ्ठल ह्मणतां सर्वथा ॥ २ ॥ आगम निगम तुज नेणती कोणी । परि तूं भाव भक्ति जवळीच दोन्ही । नेणतां विधियुक्त गते पूजनीं । न माये ब्रह्मांडीं संपुष्टशयनीं ॥ ३ ॥ असुरं काळ भासे विकाळ पुढें । पसरी मुख एक चाविती धुडें । भक्ता शरणागता चालती पुढें । दावी वाट जाऊं नेदी वांकडें ॥ ४ ॥ एकाएकीं बहु विस्तरला सुखें । खेळे त्याची लीळा तोचि कवतुकें । तेथें नरनारी कवण बाळकें । काय पापपुण्य कवण सुखदुःखें ॥५॥ सकळां वर्मी तूंचि जाणशी एक । बद्ध मोक्ष प्राप्त आणि सुखदुःख । जाणों ह्मणतां तुज ठकलीं बहुतेक । तुका ह्मणे शरण आलों मज राख ॥ ६ ॥

॥ ५६३ ॥

दैत्यभारें पीडिली पृथ्वी बाळा । ह्मणोनि तुज येणें जालें गोपाळा । भक्तिप्रतिपाळक उत्सव सोहळा । मंगळें तुज गाती अबळा बाळा ॥१॥ जय देव जय देव जय गरुडध्वजा । श्रीगरुडध्वजा । आरती ओंवाळूं तुज भक्तिकाजा ॥२॥ गुण रूप नाम नाहीं जयासी । चिंतितां तैसाचि होसी तयांसी । मत्स्य कूर्म वराह नरसिंह जालासी । असुरां काळ मुनि ठाके ध्यानासी ॥३॥ सहस्र रूपें नाम सांवळा ना गोरा । श्रुति नेति ह्मणती तुज विश्वंभरा । जीवना जीवन तूंचि होसी दातारा । न कळे पार ब्रह्मादिकां सुरवरां ॥४॥ संतां महंतां घरीं ह्मणवी ह्मणियारा । शंखचक्रगदाआयुधांचा भारा । सुदर्शन घरटी फिरे अवश्वरा । सकुमार

ना स्थूळ होसी गोजिरा ॥५॥ भावेंविण तुझें न घडे पूजन । सकळही गंगा जाल्या तुजपासून । उत्पत्ति प्रलय तूंचि करिसी पाळण । धरूनि राहिला तुका निश्चयें चरण ॥६॥

॥ ५६४ ॥

अवतारनामभेद गणा आदि अगाध । जयासी पार नाहीं पुढें खुंटला वाद । एकचि दंत शोभे मुख विक्राळ दोंद । ब्रह्मांडामाजी दावी अनंत हे छंद ॥ १ ॥ जय जया गणपती ओंवाळीन आरती । साजिऱ्या सरळ भुजा फरशकमळ शोभती ॥ २ ॥ हे मही ठेंगणी हो तुज नृत्यनायका । भोंवरी फेर देतां असुर मर्दिले एकां । घातलें तोडरीं हो भक्तजनपाळका । सहस्र नाम तुज भुक्तिमुक्तिदायका ॥ ३ ॥ सुंदर शोभला हो रूपें लोपलीं तेजें । उपमा काय देऊं असे आणिक दुजें । रविशशितारागणें जयामाजी सहजें । उदरीं सामावलीं जया ब्रह्मांडबीजें ॥ ४ ॥ वर्णितां शेष लीळा तया भागलीं मुखें । पांगुळले वेद चारी कैसे राहिले मुके । अवतार जन्मला हो लिंगनाभी या मुखें । अमूर्त मूर्तिमंत होय भक्तीच्या सुखें ॥५॥ विश्व हें रूप तुझें हस्तपाद मुखडें । ऐसाचि भाव देई तया नाचतां पुढें । धूप दीप पंचारति ओंवाळिन निवाडें । राखें या शरणागता तुका खेळतां लाडें ॥६॥

॥ ५६५ ॥

महा जी महादेवा महाकालमर्दना । मांडियेलें उग्र तप महादीप्त दारुणा । परिधान व्याघ्रांबर चिताभस्मलेपना । स्मशान क्रिडास्थळ तुझें जी त्रिनयना ॥ १ ॥ जय देवा हरेश्वरा जय पार्वतीवरा । आरति ओंवाळीन कैवल्यदातारा ॥ जय० ॥२॥ रुद्र हें नाम तुझें उग्र संहारासी । शंकर शिव भोळा उदार सर्वस्वीं । उदक बेलपत्र टाळी वाहिल्या देसी । आपुलें पद दासां ठाव देई कैलासीं ॥३॥ त्रैलोक्यव्यापका हो जन आणि विजन । विराटस्वरूप हें तुझें साजिरें ध्यान । करिती वेद स्तुति कीर्ति मुखें आपण । जाणतां नेणवे हो तुमचें महिमान ॥ ४ ॥ बोलतां नाम महिमा असे आश्चर्य जगीं । उपदेश केल्यानंतर पापें पळती वेगीं । हरहरवाणी गर्जे प्रेम

संचरे अंगीं । राहिली दृष्टि चरणीं रंग मीनला रंगीं ॥ ५ ॥ पूजूनि लिंग उभा तुका जोडोनी हात । करितो विज्ञापना परिसावी हे मात । अखंड राहूं द्यावें माझें चरणीं चित्त । घातलें साष्टांग मागे मस्तकीं हात ॥ ६ ॥

॥ ५६६ ॥

अवतार गोकुळीं हा जन तारावयासी । लावण्यरूपडें हें तेजःपुंजाळ-रासी । उगवतां कोटि बिंबें रवि लोपले शशी । उत्साह सुरवरां महीं थोर मानसीं ॥१॥ जय देवा कृष्णनाथा जय रखुमाईकांता । आरति ओंवाळीन तुम्हां देवकीसुता । जय देवा कृष्णनाथा ॥२॥ वसुदेवदेवकीची बंद फोडिली शाळ । होउनी विश्वजनिता तया पोटींचा बाळ । दैत्य हे त्रासियेले समूळ कंसासी काळ । राजया उग्रसेना केला मथुरापाळ ॥३॥ राखतां गोधनें हा इंद्र कोपला भारी । मेघ जो कडाडिला शिळा वर्षतां धारीं । राखिलें गोकुळ हें नखीं धरिला गिरी । निर्भय लोकपाळ अवतरले हरी ॥४॥ कौतुक पहावया माव ब्रह्मयानें केली । वत्सें ही चोरुनियां सत्यलोकासी नेलीं । गोपाळ गाईवत्सें दोहीं ठायीं राखीलीं । सुखाचा प्रेमसिंधु अनाथांची माऊली ॥५॥ तारिलें भक्तजना दैत्य निर्दाळूनि । पांडवां साहकारी आडल्या निर्वाणीं । गुण मी काय वर्णूं मति केवढी वाणी । विनवितो दास तुका ठाव देई चरणीं ॥६॥

॥ ५६७ ॥

सुंदर अंगकांती मुख भाळ सुरेख । बाणली उटी अंगीं टिळा साजिरा रेख । मस्तकीं मुगुट कानीं कुंडलें तेज फांके । आरक्त दंत हिरे कैसे शोभले निके ॥१॥ जय देवा चतुर्भुजा जय लावण्यतेजा । आरति ओंवाळीन भवतारिया हा वोजा ॥ जय० ॥ २ ॥ उदार जुंझार हा जया वाणिती श्रुति । परतल्या नेति म्हणती तयां न कळे गति । भाट हा चतुर्मुखें अनुवाद करिती । पांगलीं साही अठरा रूप न गति ॥ जय० ॥३॥ एकोनी रूप ऐसें तुजलागीं धुंडिती । वोडके नग्न एक निराहार यति । साधनें योग नाना तपें दारुण किती । मांडिलें सुख दिली सं-

सागर शांती ॥४॥ भरूनि मार्जी लोकां निहीं नांदसि एक । कामिनी-मनमोहना रूप नाम अनेक । नामनी नाममात्रे भवपातकें शोक । पाउलें वंदितानी सिद्ध आणि साधक ॥५॥ उपमा द्यावयासी दुजें काय हें तुज । तत्त्वासी तत्त्वसार मूळ जालासी बीज । खेळसी बाळलीळा अवतार सहज । विनविता दास तुका कर जोडोनि तुज ॥६॥

॥ ५६८ ॥

पंढरी पुण्यभूमी भीमा दक्षिणवाहिनी । तीर्थ हें चंद्रभागा महापातकां धुनी । उतरलें वैकुंठमहासुख मेदिनी ॥ १ ॥ जय देवा पांडुरंगा जय अनाथनाथा । आरति ओंवाळीन तुह्मां लक्ष्मीकांता ॥ २ ॥ नित्य नवा सोहळा हो महावाद्यांचा गजर । सन्मुख गरुड पारीं उभा जोडुनि कर । मंडितचतुर्भुजा कटीं मिरवती कर ॥ ३ ॥ हरिनामकीर्तन हो आनंद महाद्वारीं । नाचती प्रेमसुखें नर नथिल्या नारी । जीवन्मुक्त लोक नित्य पाहाती हरी ॥ ४ ॥ आषाढी कार्तिकी हो गरुडटकयांचा भार । गर्जती नामघोषें महावैष्णववीर । पापासी रीग नाहीं असुर कांपती सुर ॥५॥ हें सुख पुंडलिकें कसें आणिलें वापें । निर्गुण साकारलें आह्मां-लागीं हें सोपें । ह्मणोनि चरण धरोनि तुका राहिला सुखें ॥६॥

॥ ५६९ ॥

भक्तीचिया पोटीं बोध कांकडा ज्योती । पंचप्राण जीवें भावें ओंवाळूं आरती ॥ १ ॥ ओंवाळूं आरती माझ्या पंढरीनाथा । दोन्ही कर जोडोनी चरणीं ठेवीन माथा ॥ २ ॥ काय महिमा वर्णूं आतां सांगणें तें किती । कोटि ब्रह्महत्या मुख पाहातां जाती ॥३॥ राही रखुमाई दोही दों बाहीं । मयूर पिन्छचामरें ढाळिती ठायीं ठायीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे दीप घेउनि उन्मनती शोभा । विटेवरी उभा दिसे लावण्यगाभा ॥ ५ ॥

॥ ५७० ॥

कनकाच्या परियेळीं उजळूनी आरती । रत्नदीपशोभा कैशा पाजळल्या ज्योती ॥ १ ॥ ओंवाळूं गे माये सबाह्य साजिरा । राहिरखुमाई-सत्यभामेच्या वरा ॥ २ ॥ मंडितचतुर्भुज दिव्य कानीं कुंडलें । श्री-

मुखाची शोभा पाहातां तेज फाकलें ॥ ३ ॥ वैजयंती माळ गळां शोभे श्रीमंत । शंखचक्रगदापद्म आयुधें शोभन ॥ ४ ॥ सांवळा सकुमार जैसा कर्दळीगाभा । चरणींचीं नेपुरें वांकी गर्जती नभा ॥ ५ ॥ ओंवाळितां मन हें उभें ठाकलें ठायीं । समदृष्टि समाधि तुकया लागली पायीं ॥ ६ ॥

## प्रार्थना व शेजआरती.

॥ ५७१ ॥

जोडूनियां कर चरणीं ठेविला माथा । परिसावी विनंती[1] माझी पंढरीनाथा ॥ १ ॥ अखंडित असावें[2] ऐसें वाटतें पायीं । सांडोनी[3] संकोच ठाव थोडासा देईं ॥ २ ॥ असो नसो भाव आलों तुझिया ठाया । कृपादृष्टी पाहें मज पंढरीराया ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी तुझीं वेडीं वांकुडीं । नामें भवपाश हातें आपुल्या तोडीं ॥ ४ ॥

॥ ५७२ ॥

गाऊं वाणूं तुज विठो तुझा करूं अनुवाद । जिकडे पाहें तिकडे सर्वमय गोविंद ॥ १ ॥ आनंद रे विठोबा जाला माझे मनीं । देखिलें लोचनीं विटेसहित पाउलें* ॥ २ ॥ न करीं तपसाधनें रे मुक्तीचे सायास । हाचि जन्मोजन्मीं गोड भक्तीचा रस ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मां प्रेमा उणें तें काई । पंढरीचा राणा सांटविला हृदयीं ॥ ४ ॥

॥ ५७३ ॥

केली कटकट गाऊं नाचों नेणतां । लाज नाहीं भय आह्मां पोटाची चिंता ॥ १ ॥ ऐसा सिणलेती पाय रगडूं दातारा । जागवूं त्या वारा उव जाली शरीरा ॥ २ ॥ उशिरा उशीर किती काय ह्मणावा । जननिये बाळका कोप कांहीं न धरावा ॥ ३ ॥ तुझिये संगतीं आह्मी करूं कोल्हाळ । तुका ह्मणे बाळें आवघीं मिळोन गोपाळ ॥ ४ ॥

१ करूनी विनवणी पायीं ठेवी माथा. २ विनवणी. ३ असावेंसें. ४ सांडूनी.
५ अभंग ५७४ यांतील तिसरें व चवथें कडवें पहा.
* येथें 'पाउल' शब्द पुल्लिंगी धरिला आहे.

॥ ५७४ ॥

आरूप शब्द बोलों मनीं न धरावें कांहीं। लडिवाळ बाळकें तूंचि आमुची आई ॥ १ ॥ देईं गे विठाबाई प्रेमभातुकें। अवघियां कवतुकें ल्हानां थोरां सकळां ॥ २ ॥ असो नसो भाव आलों तुझिया ठाया। पाहें कृपादृष्टी आतां पंढरीराया ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी तुझीं वेडीं वांकुडीं। नामें भवपाश आतां आपुलिया तोडीं ॥ ४ ॥

॥ ५७५ ॥

पावला प्रसाद आतां विठो निजावें। आपला तो श्रम कळों येतसे भावें॥ १ ॥ आतां स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा। पुरले मनोरथ जातों आपुलिया स्थळा ॥ २ ॥ तुह्मांसी जागवूं आह्मी आपुलिया चाडा। शुभाशुभ कर्में दोष हराया पीडा ॥ ३ ॥ तुका ह्मणे दिलें उच्छिष्टाचें भोजन। नाहीं निवडिलें आह्मां आपुलिया भिन्न ॥ ४ ॥

॥ ५७६ ॥

बहुडविलें जन मन जालें निश्चळ। चुकवूनि कोल्हाळ आला तुका ॥ १ ॥ पर्यंकीं निद्रा करावें शयन। रखुमाई आपण समवेत ॥ २ ॥ घेऊनियां आलों हातीं टाळ वीणा। सेवसी चरणा स्वामीचिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां परिसावीं सादरें। बोबडीं उत्तरें पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ५७७ ॥

नाच गाणें माझा जवळील ठाव। निरोपीन भाव होईल तो ॥ १ ॥ तुह्मां निद्रा मज आज्ञा ते स्वभावें। उतरूनी जिवें निंब लोण ॥ २ ॥ एकाएकीं बहु करीन सुस्वरें। मधुर उत्तरें आवडीनें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं जगदानी उदार। फेडशील भार एक वेळे ॥ ४ ॥

॥ ५७८ ॥

आडकलें देवद्वार। व्यर्थ काय करकर ॥ १ ॥ आतां चला जाऊं घरा। नका करूं उजगरा ॥ २ ॥ देवा लागलीसे निज। येथें उभ्या काय काज ॥ ३ ॥ राग येतो देवा। तुका ह्मणे नेघे सेवा ॥ ४ ॥

॥ ५७९ ॥

उठोनियां तुका गेला निजस्थळा । उरले राउळामाजी देव ॥ १ ॥
निउल जालें सेवका स्वामीचें । आज्ञे करूनी चित्त समाधान ॥ २ ॥
पहुडलिया हरी अनंतशयनावरी । तेथें नाहीं उरी कांहीं काम ॥ ३ ॥
अवघियांस बाहेर घालूनि गेला तुका । सांगितलें लोकां निजले देव ॥४॥

॥ ५८० ॥

शब्दांचीं पैं रत्नें करूनी अळंकार । तेणें विश्वंभर पूजियेला ॥ १ ॥
भावाचे उपचारें करूनी भोजन । तेणें नारायण जेवविला ॥ २ ॥
संसारा हातीं दिलें आंचवण । मुखशुद्धी मन समर्पिलें ॥ ३ ॥ रंगलीं इंद्रियें सुरंग तांबूल । माथां तुळसीदळ समर्पिलें ॥ ४ ॥ एकभावदीप करूनी निरांजन । देऊनी आसन देहाचें या ॥ ५ ॥ न बोलोनी तुका करी चरण सेवा । निजविलें देवा माजघरीं ॥ ६ ॥

---

## पाळणा.

॥ ५८१ ॥

जननिया बाळका रे घातलें पाळणा । पंचतत्त्वीं जडियेल्या वारतिया चहूं कोणा । अखंड जडियेल्या तया ढाळ अंगणा । वैखरी धरूनी हातीं भाव दावी खेळणा ॥१॥ निजीं रे निजीं आतां । ह्मणोनि परिये दे माता । खेळतां कष्टलासी बाळा तूं रे नेणतां । निजीं रे निजीं आतां ॥२॥ खेळतां बाहेरी रे मुला लोकांच्या सवें । बागुल काळतोंडा नाहीं नेतो तें ठावें । खेळतां दुश्चित्ता रे देखोनी तें न्यावें । ह्मणोनि सांगें तुज शीघ्र वचन पाळावें ॥३॥ संचित मागें तुज शुद्ध होतें सांगातीं । तेणें तुज वांचविलें वेरझारिया हातीं । आणीक नेलीं मागें काय जाणों तीं किती । आलासी येथवरी थोर पुण्यें बहुतीं ॥४॥ खेळतां शुक देवा तो रे लागला पाठीं । लपाला वरुषें बारा तिये मातेचे पोटीं । रिघतां बाहेरी रे पळे घेऊनि कासोटी । तोचि परी जाली स्वामी भेणें रिघे कपाटीं ॥५॥खेळतां चक्रवर्ती जनका लागला धाक । पडि-

ला अग्निमाजी पाव जळत एक। भरल्यासे काप अंगीं सुख नाठवे दुःख। आपपर तेंही नाहीं देहभाव मरळीक ॥६॥ शिबीया चक्रवर्ती कव पाडिली अवचिती। धीट तो न भे तया मास कापिलें हातीं। टाकिलें तयावरी खुणें गोविला अंतीं। पावला मायबाप हिरोन घेतला हातीं ॥७॥ बांधलें अजामेळा वेश्यागणिका कैसी। मारिली हाक धाकें कळलें मायबापासी। घातली धांव नेटें वेगीं पावल्या त्यासी। हिरोनि नेलीं दोघें आपणयां तीं पासीं ॥८॥ धरूनी आठवू रे बाळा राहें निश्चळ। खेळतां दुश्चिता रे नको जाऊं बरळ। टोकताहे तुजलागीं दिवस लेखूनी काळ। मग तेही आठवू रे नेत्रीं घाली पडळ ॥९॥ ऐसीं तीं कृपावंतें बाळा मोहिलें चित्त। सुस्वरें कंठ गाय मधुर आणि संगीत। तेणें तेंचि चित्त राहे होऊनियां निवांत। पावती तुका ह्मणे नाहीं विश्राम ते घात ॥१०॥

---

## ललित.

॥ ५८२ ॥

आजी दिवस जाला। धन्य सोनियाचा भला ॥१॥ जालें संताचे पंगती बरवें भोजन निगुती। ॥२॥ रामकृष्णनामें। बरवीं मोहियेलीं प्रेमें ॥३॥ तुका ह्मणे आला। चवी रसाळ हा काला ॥४॥

॥ ५८३ ॥

तुह्मी तरी सांगा कांहीं। आह्मांविशीं रखुमाबाई ॥१॥ कांहीं उरलें तें ठायीं। वेगीं पाठवूनी देई ॥२॥ टोकत बैसलों देखा। उच्छीतसें ग्रासा एका ॥३॥ प्रेम देउनि बहुडा जाला। तुका ह्मणे विठ्ठल बोला ॥४॥

॥ ५८४ ॥

वाट पाहें बाहे निढळीं ठेवुनियां हात। पंढरीचे वाटे दृष्टि लागलें चित्त ॥१॥ कई येतां देखें माझा मायबाप। घटिका वोटें दिवस लेखीं धरूनियां माप ॥२॥ डावा डोळा लवे उजवी स्फुरते बाहे। मन उताविळ भाव मांडुनियां देहे ॥३॥ सुखसेज गोड चित्तीं न लगे आणीक। ना-

ठवें घर दार तान पळाली भूक ॥४॥ तुका ह्मणे धन्य दिवस ऐसा तो। कोण । पंढरीचे वाटे येतां मूळ देखेन ॥५॥

॥ ५८५ ॥

तुझें दास्य करूं आणिका मागों खावया । धिग् जालें जिणें माझें पंढरिराया ॥ १ ॥ काय गा विठोबा तुज आतां ह्मणावें । शुभाशुभ नांवें तुह्मां थोरांच्या दैवें ॥ २ ॥ संसाराचा धाक निरंतर आह्मांसी । मरण भलें परि काय अवकळा ऐसी ॥३॥ तुझे शरणागत शरण जाऊं आणिकांसी । तुका ह्मणे कवणा लाज हे कां नेणसी ॥४॥

॥ ५८६ ॥

पुरविली आळी । जे जे केले ते ते काळीं ॥ १ ॥ माय तरी ऐसी सांगा । कृपाळुवा पांडुरंगा ॥ २ ॥ घेतलें सुतरी । उचलोनी कडियेवरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ४ ॥

॥ ५८७ ॥

कथेची सामग्री । देह अवसानावरी ॥ १ ॥ नको जाऊं देऊं भंगा । गात्रें माझी पांडुरंगा ॥ २ ॥ आयुष्य करीं उणें । परि मज आवडो कीर्तन ॥ ३ ॥ तुका ह्मणे हाणी । या वेगळी मना नाणीं ॥ ४ ॥

॥ ५८८ ॥

गळित जाली काया । हेंचि ललित पंढरिराया ॥ १ ॥ आलें अवसानापासीं । रूप राहिलें मानसीं ॥ २ ॥ वाइला कळस । तेथें भिरावला रस ॥३॥ तुका ह्मणे गोड जालें । नारायणीं पोट धालें ॥४॥

॥ ५८९ ॥

रत्नजडित सिंहासन । वरी बैसलें आपण ॥ १ ॥ कुंचे ढळती दोहीं बाहीं । जवळी रखुमाई राही ॥२॥ नाना उपचारीं । सिद्धि वोळगती कामारी ॥३॥ हातीं घेऊनी पादुका । उभा वंदिजन तुका ॥ ४ ॥

---

१ मागूं आणिका खावया. २ धिग जिणें जालें. ३ शुभाशुभ कर्मे तुह्मां थोरांच्या नांवें. ४ मरण भलतें. ५ लाज हे कां कोणा.

॥ ५९० ॥

हरि शोभला कांदणीं । जडित माणिकांची स्वाणी ॥ १ ॥ तैसा दिसे नारायण । मुख सुखाचें मंडण ॥२॥ कोटि चंद्रलीळा । पूर्णिमेच्या पूर्ण कळा ॥३॥ तुका ह्मणे दृष्टि धाये । परतोनि माघारी ते न ये ॥ ४ ॥

॥ ५९१ ॥

पतित पतित। परि मी त्रिवाचा पतित ॥१॥ परि तूं आपुलिया सत्ता। मज करावें सरता ॥२॥ नाहीं चित्तशुद्धि। स्थिर पायांपाशीं बुद्धि ॥३॥ अपराधाचा केलों। तुका ह्मणे किती बोलों ॥ ४ ॥

॥ ५९२ ॥

उभारिला हात। जगीं जाणविली मात ॥ १ ॥ देव बैसले सिंहासनीं आल्या याचका होय धनी॥ २॥ एकाच्या कैवाडें। उगवे बहुतांचें कोडें ॥ ३ ॥ दोहीं ठायीं तुका। नाहीं पडों देत चुका ॥ ४ ॥

॥ ५९३ ॥

देव ते संत देव ते संत। निमित्य त्या प्रतिमा ॥१॥ मी तों सांगतसें भावें। असो ठावें सकळां ॥ २ ॥ निराकारी ओस दिशा। येथें इच्छा पुरतसे ॥३॥ तुका ह्मणे रोकडें केणें। सेवितां येणें पोट धाय ॥४॥

॥ ५९४ ॥

न कळे भाव मुनि सांगे एकी अंतुरी। साठी संवत्सरा जन्म तया उदरीं। कैसा आकळे गे माय चपळ वो त्रिभुवनव्यापक हरि सकळ वो ॥२॥ हनुमंता भेटी गर्व हरिला दोहींचा। गरुडा विटंबना रूपा सत्यभामेच्या॥ ३ ॥ द्रौपदीचा भेद पुरविला समर्थां। ऋषि फळवनीं देंठीं लावितां ठायीं ॥ ४ ॥ अर्जुनाच्या रथीं कपि स्तंभीं ठेविला। दोहीं पैज तेथें गर्व हरी दादुला ॥५॥ भाव भक्ति सत्त्वगुण जाला दुर्जना।तुका ह्मणे सकळां छंदें खेळे आपणा६॥

॥ ५९५ ॥

उदार कृपाळा अगा देवांच्या देवा। तुजसवें पण आतां आमुचा दावा ॥ १ ॥ कैसा जासी सांग आतां मजपासूनी। केलें वाताहात दिलें संसार पाणी ॥ २ ॥ अवघीं आवरूनी तुझे लाविलीं पाठीं।

आतां त्या विसर सोहंकोहंमच्या गोष्टी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां च-रणीं घातली मिठी । पडिली ते पडो तुह्मां आह्मांसी तुटी ॥ ४ ॥

॥ ५९६ ॥

जाली होती काया । बहु मळिन देवराया ॥ १ ॥ तुमच्या उजळली नामें । चित्त प्रक्षाळिलें प्रेमें ॥ २ ॥ अनुतापें झाला झाडा । प्रारब्धाचा केला तोडा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देह पायीं । ठेवूनि झालों उतराई ॥ ४ ॥

॥ ५९७ ॥

आजी आनंदु रे एकी परमानंदु रे । जया श्रुति नेति नेति ह्मणती गोविंदु रे ॥ १ ॥ विठोबाचीं वेडीं आह्मां आनंदु सदा । गाऊं नाचों वाहूं टाळी रंजवूं गोविंदा ॥ २ ॥ सदा सण सांत आह्मां नित्य दिवाळी । आनंदें निर्भर आमचा कैवारी बळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं जन्ममरणांचा धाक । संत सनकादिक तें आमचें कवतुक ॥ ४ ॥

॥ ५९८ ॥

प्राणिया एक बीजमंत्र उच्चारीं । प्रतिदिनीं रामकृष्ण ह्मण कां मुरारि ॥ १ ॥ हेंचि साधन रे तुज सर्व सिद्धीचें । नाम उच्चारीं गोपाळाचें वाचे ॥ २ ॥ उपास पारणें न लगे वनसेवन । न लगे धूम्रपान पंचाग्निसाधन ॥ ३ ॥ फुकाचें सुखाचें कांहीं न वेचे भांडार । कोटी यज्ञांपरिस तुका ह्मणे हें सार ॥ ४ ॥

॥ ५९९ ॥

विठ्ठल कीर्तनाचे अंतीं । जय जय हरी जे ह्मणती ॥ १ ॥ तेंचि सुकृताचें फळ । वाचा रामनामें निर्मळ ॥ २ ॥ वेमानी हरिकथेसी । होय सावध चित्तासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचा जन्म । सुफळ जाला भवक्रम ॥ ४ ॥

॥ ६०० ॥

न चलवे पंथ वेच नसतां पालवीं । शरीर विटंबिलें वाटे भीक मागावी ॥ १ ॥ न करीं रे तैसें आपआपणां । नित्य राम राम तुह्मी सकळ ह्मणा ॥ २ ॥ राम ह्मणवितां रांडा पोरें निरविशी । पडसी यमा-

द्वारीं जाचविती चौऱ्याशीं ॥ ३ ॥ मुखीं नाहीं नाम तोही आत्मह-
त्यारा । तुका ह्मणे लाज नाहीं तया गव्हारा ॥ ४ ॥

॥ ६०१ ॥

ओढियेसी निघतां पाषाणांच्या सांगडी । बुडतां मध्यभागीं तेथें कोण
घाली उडी ॥ १ ॥ न करीं रे तैसें आपआपणिया । पतंग जाय वांयां
जीवें ज्योतीं घालूनियां ॥ २ ॥ सावधपणें सोमल वाटी भरोनियां
प्याला । मरणा अंतीं वैद्य बोलाविता गहिला ॥ ३ ॥ तुका ह्मणे करीं
आधींचाचि विचार । जंव नाहीं पातला यमाचा किंकर ॥ ४ ॥

---

## नामपर अभंग.

॥ ६०२ ॥

नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरें ॥ १ ॥
न लगे सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥ २ ॥
ठायींच बैसोनि करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥ ३ ॥
रामकृष्णहरिविठ्ठलकेशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥ ४ ॥
याविण असतां आणीक साधन । वाहातसें आण विठोबाची ॥ ५ ॥
तुका ह्मणे सोपें आहे सर्वांहूनि । शाहाणा तो धणी घेतो तेथें ॥ ६ ॥

॥ ६०३ ॥

नाम उच्चारितां कंठीं । पुढें उभा जगजेठी ॥ १ ॥ ऐसें धरोनियां ध्यान ।
मनें करावें चिंतन ॥ २ ॥ ब्रह्मादिकांच्या ध्याना नये । तो हा कीर्त-
नाचे सोये ॥३॥ तुका ह्मणे सार घ्यावें । मनें हरिरूप पाहावें ॥४॥

॥ ६०४ ॥

नाम घेतां उठाउठीं । होय संसारासी तुटी ॥१॥ ऐसा लाभ बांधा गांठी ।
विठ्ठलपायीं पडे मिठी ॥२॥ नामापरतें साधन नाहीं । जें तूं करिशी आ-
णिक कांहीं ॥३॥ हाकारोनि सांगे तुका । नाम घेतां राहों नका ॥४॥

॥ ६०५ ॥

नाम तारक भवसिंधु । विठ्ठल तारक भवसिंधु ॥ १ ॥ नामधारक तया अरि मित्रु । समता त्यागुनियां क्रोधु ॥ २ ॥ नामधारक तया । कदापि न घडे विषयाचा बाधु ॥ ३ ॥ ज्या नामें तरले शुकादिक । नारद संत मुनिजन साधु ॥ ४ ॥ जाणूनियां जे नसरें । ते नेणती जैसा गज अंधु ॥५॥ सहज तुकया । नामचि जपतां स्वरूपीं वेधु ॥ ६ ॥

॥ ६०६ ॥

नाम पावन पावन । त्याहून पवित्र आहे कोण ॥ १ ॥ शिव हालाहालें तापला । तोही नामें शीतळ जाला ॥ २ ॥ शिवास नामाचा आधार । केला कळिकाळ किंकर ॥ ३ ॥ मरण जालें काशीपुरी । तेथें नामचि उद्धरी ॥ ४ ॥ तुका ह्मणे अवघीं चोरें । एक हरिनाम सोइरें ॥५॥

॥ ६०७ ॥

नामाचा डांगोरा फिरवीं घरोघरीं । ह्मणा हरी हरी सर्व भावें ॥ १ ॥ नामें हरती कर्म वैकुंठींची पै वस्ति । संनिध श्रीपति सदोदित ॥ २ ॥ नामाचा महिमा ब्रह्मनां कळला । नामें उद्धरिला अजामेळ ॥ ३ ॥ गजेंद्राची स्थिति पुराणीं बोलती । नामेंचि श्रीपति पावलासे ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाम घेतां मुक्ति आहे । नामें सर्व पाहें आकळिलें ॥ ५ ॥

॥ ६०८ ॥

नाम घेतां न लगे मोल । नाममंत्र नाहीं खोल ॥ १ ॥ दोंचि अक्षरांचें काम उच्चारावें राम राम ॥ २ ॥ नाहीं वर्णधर्मयाती । नामीं अवघींचि सरतीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाम । चैतन्य निजधाम ॥ ४ ॥

॥ ६०९ ॥

नामें स्नानसंध्या केलें क्रियाकर्म । त्याचा भवश्रम निवारला ॥ १ ॥ आणिकें दुरावलीं करितां खटपट । वाउगे बोभाट वर्मांविण ॥ २ ॥ रामनामीं जिहीं धरिला विश्वास । तिहीं भवपाश तोडियेले ॥ ३ ॥ तुका ह्मणे केलें कळिकाळ ठेंगणें । नामसंकीर्तनें भाविकांनीं ॥ ४ ॥

॥ ६१० ॥

हरि ह्मणतां गति पातकें नासती । कळिकाळ कांपती हरि ह्मणतां ॥१॥
हरि ह्मणतां भुक्ति हरि ह्मणतां मुक्ति । चुके यातायाती हरि ह्मणतां ॥२॥
सर्वे अनुष्ठानें न लगती साधनें । तुटती बंधनें हरि ह्मणतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे भावें जपा हरिचें नाम । यम काळमय शरण तुह्मां ॥४॥

॥ ६११ ॥

लागोनियां पायां विनवितों तुह्माला । करीं टाळी बोला मुखें नाम ॥१॥
विठ्ठल विठ्ठल ह्मणा वेळोवेळां । हा सुखसोहळा स्वर्गीं नाहीं ॥ २ ॥
कृष्ण विष्णु हरि गोविंद गोपाळ । मार्ग हा प्रांजळ वैकुंठींचा ॥ ३ ॥
सकळांसी येथें आहे अधिकार । कलयुगीं उद्धार हरिनामें ॥ ४ ॥
तुका ह्मणे नामापाशीं चारी मुक्ति । ऐसें बहुग्रंथीं बोलियेलें ॥ ५ ॥

॥ ६१२ ॥

याळागीं आवडी ह्मणा राम कृष्ण । जोडा नारायण सर्वकाळ ॥ १ ॥
सोपें हें साधन लाभ येतो घरा । वाचेसी उच्चारा राम हरि ॥ २ ॥
न लगतां कष्ट न लगे सायास । करावा अभ्यास विठ्ठलाचा ॥ ३ ॥
न लगे तप तीर्थ करणें महादान । केल्या एक मन जोडे हरि ॥ ४ ॥
तुका ह्मणे कांहीं न वेचितां धन । जोडे नारायण नामासाठीं ॥ ५ ॥

॥ ६१३ ॥

रामनामाचे पवाडे । अखंड ज्याची वाचा पढे ॥ १ ॥ धन्य तो एक संसारी । रामनाम जो उच्चारी ॥ २ ॥ रामनाम गर्जे वाचा । काळ आज्ञाधारक त्याचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे रामनामीं । कृतकृत्य जालों आह्मी ॥ ४ ॥

॥ ६१४ ॥

नाम घेतां वांयां गेला । ऐसा कोणें आईकिला ॥ १ ॥ सांगा विनवितों तुह्मांसी । संत महंत सिद्ध ऋषी ॥ २ ॥ नामें तरला नाहीं कोण । ऐसा द्यावा निवडून ॥ ३ ॥ सलगीच्या उत्तरा । तुका ह्मणे क्षमा करा ॥४॥

॥ ६१५ ॥

सारासार विचार करा उठाउठी । नाम धरा कंठीं विठोबाचें ॥ १ ॥
तयाच्या चिंतनें निरसेल संकट । तराल दुर्घट भवसिंधु ॥ २ ॥
जन्मोनियां कुळीं वाचे स्मरे राम । धरीं हाचि नेम अहर्निशीं ॥३॥
तुका ह्मणे कोटी कुळें तीं पुनीत । भावें गातां गीत विठोबाचें ॥४॥

॥ ६१६ ॥

कामांमध्यें काम । कांहीं ह्मणा रामराम । जाइल भवश्रम । सुख होईल दुःखाचें ॥१॥ कळों येईल अंतकाळीं । प्राणप्रयाणाचे वेळीं । राहाती निराळीं । रांडापोरें सकळ ॥२॥ जीतां जीसी जैसातैसा । पुढें आहे रे वोळसा । उगवुनि फांसा । काय करणें तें करीं ॥३॥ केलें होतें याचि जन्में । अवघें विठोबाच्या नामें । तुका ह्मणे कर्मं । जाळोनियां तरसी॥४॥

॥ ६१७ ॥

ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म । गंवसे परब्रह्म नामें एका ॥ १ ॥
लहानथोरासी करितों प्रार्थना । दृढ नारायणा मनीं धरा ॥२॥ सर्वांप्रति माझी हेचि असे विनंती । आठवा श्रीपती मनामाजी ॥ ३ ॥
केशव नारायण करितां आचमन । तेचि संध्या स्नान कर्म क्रिया ॥४॥
नामें करा नित्य भजन भोजन । ब्रह्मकर्म ध्यान याचे पायीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे हेंचि निर्वाणींचें शस्त्र । ह्मणोनि सर्वत्र स्मरा वेगीं ॥ ६ ॥

॥ ६१८ ॥

जयजय ह्मणा राम । हातें टाळी वाचे नाम ॥ १ ॥ आटाआटी नाहीं ज्यास । न वेचे मोल न पडे खांस ॥ २ ॥ आपण ह्मणे आणिकां हातीं । यज्ञादिकीं नये ते गति ॥३॥ आसन भोजन करितां काम । ध्यानसमाधि ह्मणतां राम ॥ ४ ॥ मंत्र जपा हाचि सार । वर्णां याती जयजयकार ॥५॥ ह्मणतां राम ह्मणे तुका । वेळोवेळां चुकों नका ॥६॥

॥ ६१९ ॥

कळे न कळे त्या धर्म । ऐकां सांगतों रे वर्म । माझ्या विठोबाचें नाम । अटाहासें उच्चारा ॥१॥ तो या दाखवील वाटा । जया पाहिजे

त्या नीटा । कृपावंत मोटा । पाहिजे तो कळवळा ॥२॥ पुसतां चुका होतो वाटा । सवें घोळावा गोमटा । मोडों नेदी कांटा । घेऊं सांटा चोरासी ॥३॥ तुका ह्मणे मोल । न लगे द्यावें वेचा बोल । विठ्ठल विठ्ठल । ऐसा छंद मनासी ॥४॥

॥ ६२० ॥

विठ्ठल विठ्ठल येणें छंदें । ब्रह्मानंदें गर्जावें ॥ १ ॥ वाये टाळ टाळ्याटाळी । होय होळी विघ्नांची ॥ २ ॥ विठ्ठल आदि अवसानीं । विठ्ठल मनीं स्मरावा ॥३॥ तुका ह्मणे विठ्ठलवाणी । वदा कानीं आईका ॥४॥

॥ ६२१ ॥

ऐसे पुढती मिळतां आतां । नाहीं सत्ता स्वतंत्र ॥१॥ ह्मणउनि फावलें तें घ्यावें । नाम गावें आवडीं ॥ २ ॥ संचित प्रारब्ध गाढें । धांवे पुढें क्रियमाण ॥३॥ तुका ह्मणे घुबडा ऐसें । जन्म सरिसें शुकराचें ॥४॥

॥ ६२२ ॥

तया घडले सकळ नेम । मुखीं विठोबाचें नाम ॥ १ ॥ कांहीं न लगे सिणावें । आणिक वेगळाल्या भावें ॥२॥ वाचे उच्चारावें । रामकृष्ण गोविंदा ॥३॥ फळ पावाल अवलिळा । भोग वैकुंठ सोहळा ॥ ४ ॥ तुका ह्मणे त्याच्या नांवें । तोचि होइजे स्वभावें ॥५॥

॥ ६२३ ॥

पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी ॥ १ ॥ मग तो होऊं नेदी सीण । आड घाली सुदर्शन ॥ २ ॥ नामाच्या चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ॥३॥ तुका ह्मणे प्राण । करा देवासी अर्पण ॥४॥

॥ ६२४ ॥

जन्मा येऊनि कां रे निदसुरा । जायें भेटी वरा रखुमाईच्या ॥ १ ॥
पाप ताप दैन्य जाईल सकळ । पावसी अढळ उत्तम तें ॥ २ ॥
संतमहंतसिद्धहरिदासदाटणी । फिटती पारणीं इंद्रियांचीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तेथें नामाचा गजर । फुकाची अपार लुटी घेई ॥ ४ ॥

॥ ६२५ ॥

उभाउभी फळ । अंगीं मंत्राचे या बळ ॥१॥ ह्मणा विठ्ठल विठ्ठल । गोड आणि स्वल्प बोल ॥ २ ॥ कळिकाळाची बाधा । नव्हे उच्चारितां सदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे रोग । वारे भवा ऐसा भोग ॥ ४ ॥

॥ ६२६ ॥

ब्रह्मरस घेई काढा । जेणें पीडा वारेल ॥१॥ पथ्य नाम विठोबाचें । आणीक वाचे न सेवीं ॥२॥ भवरोगागेसें जाय । आणीक काय भुलकें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नव्हे बाधा । अणीक कदा भूतांची ॥ ४ ॥

॥ ६२७ ॥

भक्तिभाव आह्मी बांधिलासे गांठीं । सादावितों हाटीं घ्या रे कोणी ॥१॥ सुखाचिया पेंठे घातला दुकान । मांडियेलें वान रामनाम ॥ २ ॥ सुखाचें फुकाचें सकळांचें सार । तरावया पार भवसिंधु ॥ ३ ॥ मागें भाग्यवंत जाले थोर थोर । तिहीं केला फार हाचि सांटा ॥४॥ खोटें कुडें तेथें नाहीं घातपात । तुका ह्मणे चित्त शुद्ध करीं ॥ ५ ॥

॥ ६२८ ॥

स्वल्प वाट चला जाऊं । वाचे गाऊं विठ्ठल ॥ १ ॥ तुह्मी आह्मी खेळीमेळीं । गदारोळी आनंदें ॥ २ ॥ ध्वजा कुंचे गरुडटके । शृंगार निके करोनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंचि नीट । जवळी वाट वैकुंठा ॥४॥

॥ ६२९ ॥

संध्या कर्म ध्यान जप तप अनुष्ठान । अवघें घडे नाम उच्चारितां । न वेचे मोल कांहीं लगती न सायास । तरी कां आळस करिसी ह्मणी ॥ १ ॥ ऐसें हें सार कां नेघेसी फुकाचें । काय तुझें वेचे मोल तया ॥ २ ॥ पुत्रस्नेहें शोक करी अजामेळ । तंव तो कृपाळ जवळी उभा । अनाथांच्या नाथें घातला विमानीं । नेला उचलूनि परलोका ॥ ३ ॥ अंतकाळीं गणिका पक्षियाच्या छंदें । राम राम उच्चारिलें । तंव त्या दिनानाथा कृपा आली । त्यानें तियेसि वैकुंठा नेलें ॥ ४ ॥

अवचिता नाम आलिया हे गती । चिंतितां चित्तीं जवळी असे ।
तुका ह्मणे भावें स्मरतां राम राम । कोण जाणे तये दशे ॥ ९ ॥

॥ ६३० ॥

सरळीं हीं नामें उच्चारावीं सदा । हरि बा गोविंदा रामकृष्ण ॥१॥
पुण्य पर्वकाळ तीर्थेंही सकळ । कथा सिंधुजळ न्हाऊं येती ॥ २ ॥
अवघेचि लाभ बैसलिया घरा । येती भाव धरा एके ठायीं ॥ ३ ॥
सेळया मेंढ्या गाई सेवा घेती जैसी । कामधेनु तैसी नव्हे एक ॥४॥
तुका ह्मणे सुखें पाविजे अनंता । हें वर्म जाणतां सुलभचि ॥ ५ ॥

॥ ६३१ ॥

ऐसी जोडी करा राम कंठीं धरा । जेणें चुके फेरा गर्भवास ॥ १ ॥
नासिवंत आटी प्रियापुत्रधन । बीज ज्याचा सीण तेंचि फळ ॥ २ ॥
नाव धड करा सहस्त्रां नामांची । जे भवसिंधूची थडी पावे ॥ ३ ॥
तुका ह्मणे काळा हाणा तोंडावरी । भाता भरा हरिरामबाणीं ॥ ४ ॥

॥ ६३२ ॥

सेवा ते आवडी उच्चारावें नाम । भेदाभेदकाम निवारूनि ॥ १ ॥
न लगे हालावें चालावें बाहेरी । अवघेंचि घरीं बैसलिया ॥ २ ॥
देवाचींच नामें देवाचिये शिरीं । सर्व अळंकारीं समर्पावीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आहे भावेंचि संतोषी । वसे नामापाशीं आपुलिया ॥ ४ ॥

॥ ६३३ ॥

रामकृष्णनाम मांडीं पांवोळी । तेणें होईल होईल होळी पापा धुनी ॥१॥
ऐसा मना छंद लावीं रे अभ्यास । जया नाहीं नास ब्रह्मरसा ॥२॥
जोडी तरी ऐसी करावी न सरे । पुढें आस नुरे मागुताली ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसें धरा कांहीं मनीं । यातायाती स्वाणीं चुकतील ॥ ४ ॥

॥ ६३४ ॥

गावें नावें वाहे टाळी । साधन कळी उत्तम हें ॥ १ ॥ काय जाणों अरले किसी । नाव आइती या बैसा ॥ २ ॥ सायासाचें नाहीं काम । घेतां नाम विठोबाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे निर्वाणींचें । शस्त्र साचें हें एक ॥ ४ ॥

॥ ६३५ ॥

नाशवंत देह नासेल हा जाणा । कां रे उच्चाराना वाचे नाम ॥१॥ नामेंचि तारिले कोट्यान हे कोटी । नामें हे वैकुंठीं बैसविले ॥ २ ॥ नामापरतें सार नाहीं त्रिभुवनीं । तें कां तुह्मी मनीं आठवाना ॥३॥ तुका ह्मणे नाम वेदांसी आगळें । तें दिलें गोपाळें फुकासाटीं ॥ ४ ॥

॥ ६३६ ॥

अन्न तापलिया कायाचि होमे । तापत्रयें संतप्त होती ॥ संचित क्रियमाण प्रारब्ध तेथें । न चुके संसारस्थिति ॥ राहाटघटिका जैसी फिरतांचि राहिली । भरली जाती एके रितीं ॥ साधीं हा प्रपंच पंचाय अन्न । तेणें पावसील निजशांती रे ॥ १ ॥ नारायणनाम नारायणनाम । नित्य करीं काम जिव्हामुखें ॥ जन्मजराव्याधि पापपुण्य तेथें । नासती सकळही दुःखें रे ॥ २ ॥ शीत उष्ण वन सेवितां कपाट । आसनसमाधि साधीं ॥ तप तीर्थ दान व्रत आचरण । यज्ञ नाना मन बुद्धी ॥ भोगाभोग तेथें न चुकती प्रकार । जन्मजरादुःखव्याधि ॥ साहोनि काम क्रोध अहंकार । आश्रमीं अविनाश साधीं रे ॥ ३ ॥ घोकितां अक्षर अभिमानविधि । निषेध ळागला पाठी ॥ वाद करितां निंदा घडती दोष । होत वज्रलेपो भविष्यति ॥ दूषणाचें मूळ भूषण तुका ह्मणे । सांडीं मिथ्या खंती ॥ रिघोनि संतां शरण सर्वभावें । राहें भलतिया स्थिती रे ॥ ४ ॥

॥ ६३७ ॥

जवळी मुखापाशीं । असतां नेघे अहर्निशीं ॥ १ ॥ भवनिर्दाळण नाम । विठ्ठल विठ्ठल नासी काम ॥ २ ॥ सुखाचें शेजार । करूं कां नावडे घर ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठेवा । कां हा न करीचि बरवा ॥ ४ ॥

॥ ६३८ ॥

काय नव्हे केलें । एका चिंतितां विठ्ठलें ॥ १ ॥ सर्वसाधनांचें सार । भवसिंधु उतरी पार ॥ २ ॥ योगयागतपें । केलीं तयानें अमुपें ॥३॥ तुका ह्मणे जपा । मंत्र त्रिअक्षरी सोपा ॥ ४ ॥

॥ ६३९ ॥

चाल केलासी मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळां ॥ १ ॥ तुज पापचि नाहीं ऐसें । नाम घेतां जवळीं वसे ॥ २ ॥ पंच पातकांच्या कोडी । नामें जळतां न लगे घडी ॥ ३ ॥ केलीं मागें नको राहों । तुज अमान आह्मी आहों ॥४॥ करीं तुज जीं करवती । आणिक नामें घेऊं किती ॥५॥ तुका ह्मणे काळा । रीग नाहीं निघती ज्वाळा ॥६॥

॥ ६४० ॥

युक्ताहार न लगे आणिक साधनें । अल्प नारायणें दाखविलें ॥ १ ॥ कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देईल भेटी ॥ २ ॥ न लगे हा लौकिक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज आणिक उपाव । दिसती ते वाव नामाविण ॥ ४ ॥

॥ ६४१ ॥

फुकाचें तें लुटा सार । व्हा रे अमर सदैव ॥ १ ॥ नाहीं गर्भवास पुढती । डोंगर जळती दोषांचे ॥२॥ उदंड भावें उदंड घ्यावें । नाम गावें आवडी ॥३॥ तुका ह्मणे घरिच्या घरीं । देशांतरीं न सीणीजे ॥४॥

॥ ६४२ ॥

चारी वेद जयासाठीं । त्याचें नाम धरा कंठीं ॥ १ ॥ न करीं आणीक साधन । कष्टसी कां वांयांविण ॥२॥ अठरा पुराणांचे पोटीं । नामाविण नाहीं गोठी ॥३॥ गीता जेणें उपदेशिली । ते ही विटेवरी माउली ॥४॥ तुका ह्मणे सार धरीं । वाचे हरिनाम उच्चारीं ॥ ५ ॥

॥ ६४३ ॥

फळकट तो संसार । येथें सार भगवंत ॥१॥ ऐसें जागवितों मना । सरसें जनासहित ॥ २ ॥ अवघें निरसूनि काम । घ्यावें नाम विठोबाचें ॥३॥ तुका ह्मणे देवाविण । केला सीण तो मिथ्या ॥ ४ ॥

॥ ६४४ ॥

न कळे तें कळों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ १ ॥ न दिसे तें दिसों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ २ ॥

न बोलों तें बोलों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ ३ ॥ न भेटे तें भेटों येईल आपण। करितां चिंतन विठोबाचें ॥ ४ ॥ अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर ह्मणतां वाचे ॥ ५ तुका ह्मणे आसक्त जीव सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ॥ ६ ॥

॥ ६४५ ॥

गर्जत जावें नामावळी । प्रेमें टाळी वाहोनि ॥ १ ॥ येणें सुखें पुढती धांवे । भेटी सवें गोपाळा ॥ २ ॥ लोटांगण घाला तळीं । वंदा धुळी संतांची ॥ ३ ॥ तुका ह्मणे विठ्ठल लाहो । ऐसा बाहो उभारा ॥ ४ ॥

॥ ६४६ ॥

उमटती वाणी । वाटे नामाचिया ध्वनी ॥ १ ॥ बरें सेवन उपकारा। द्यावें द्यावें या उत्तरा ॥ २ ॥ सरळ आणि मृद । कथा पाहावी ते ऊर्ध्व ॥ ३ ॥ गात जात तुका । हाचि उपदेश आइका ॥ ४ ॥

॥ ६४७ ॥

समुद्रवळयांकित पृथ्वीचें दान । करितां समान नये नामा ॥ १ ॥ ह्मणऊनि कोणी न करावा आळस। ह्मणा रात्रीदिवस रामराम ॥२॥ सकळही शास्त्रें पठण करितां वेद। सरी नये गोविंदनामें एकें ॥ ३ ॥ सकळही तीर्थं प्रयाग काशी । करितां नामाशीं तुळेति ना ॥ ४ ॥ कर्वतीं कर्मरीं देहासी दंडण । करितां समान नये नामा ॥ ५ ॥ तुका ह्मणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । नाम हेंचि सार विठोबाचें ॥ ६ ॥

॥ ६४८ ॥

हित तें हें एक राम कंठीं राहे । नाठविती देहभाव देहीं ॥ १ ॥ हाचि एक धर्म निज बीजवर्म । हेंचि जाळी कर्म केलीं महा ॥ २ ॥ चित्त राहे पायीं रूप बैसे डोळां । जीवें कळवळा आवडीचा ॥ ३ ॥ अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका ह्मणे गंगे मिळणी सिंधु ॥ ४ ॥

॥ ६४९ ॥

न पालटे एक । भोळा भक्तचि भाविक ॥ १ ॥ येरां नास आहे पुढें।

पुण्य सरतां उपजे ॥२॥ नेणे गर्भवास । एक विष्णूचाचि दास ॥३॥
तुका ह्मणे खरें । नाम विठोबाचें बरें ॥ ४ ॥

॥ ६५० ॥

काय देवें खातां घेतलें हातींचें । आलें हें तयाचें थोर भय ॥ १ ॥
ह्मणतां गजरें राम एकसरें । जळती पापें थोरें भयधाकें ॥ २ ॥ काय
खोळंबले हात पाय अंग । नाशिलें हें सांग रूप काय ॥ ३ ॥
कोण लोकीं सांग घातला बाहेरी । ह्मणतां हरि हरि तुका ह्मणे ॥ ४॥

॥ ६५१ ॥

अनेक दोषांचे काट । जे जे गादले निघोंट । होती हरिनामें चोखट । क्षण एक न लगतां ॥१॥ तुह्मी हरि ह्मणा हरि ह्मणा । महादोषांचे छेदना ॥ २ ॥ अतिप्रीतीचा बांधला । नष्ट चांडाळीं रतला । क्षण न लगतां नेला । वैकुंठासी हरि ह्मणतां ॥ ३ ॥ अनंत दोषाचें मूळ । झालें वाल्मीका सबळ । जाला हरिनामें निर्मळ । गंगाजळ पैं जैसा ॥४॥ हरि ह्मणतां तरले । महादोषी गणिकें नेलें । कुंटणी भिली उद्धरिलें । वैकुंठासी हरि ह्मणतां ॥ ५ ॥ हरिविण जन्म नको वांयां । जैसी दर्पणींची छाया । ह्मणोनि तुका लागे पायां । शरण तया हरीसी ॥६॥

॥ ६५२ ॥

न धरी प्रतिष्ठा कोणाचीही यम । ह्मणतां कां रे राम लाजा ह्मणी ॥ १ ॥
सांपडे हातींचें सोडवील काळा । तो कां वेळोवेळां नये वाचे ॥ २ ॥
कोण लोक जो हा सुटला तो एक । गेले कुंभपाक रवरवांत ॥ ३ ॥
तुका ह्मणे हित तों ह्मणा विठ्ठल । न ह्मणे तो भोगील कळेल तें ॥ ४ ॥

॥ ६५३ ॥

झाडें चोरपोनि खाऊनियां पाला । आठवी विठ्ठला वेळोवेळां ॥ १ ॥
वल्कलें नेसुनि चिंधीया वेढूनी । सांडी जवळुनी देहभान ॥ २ ॥
लोकमान वमनासमान मानणें । एकांतीं राहणें विठोसाठीं ॥ ३ ॥
सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य । सेवावें अरण्य एकांतवास ॥ ४ ॥
ऐसा हा निर्धार करी जो मनाचा । तुका ह्मणे त्याचा पांग फिटे ॥५॥

॥ ६५४ ॥

झांकूनियां[1] नेत्र काय जपतोसी । जों नाहीं मानसीं प्रेमभाव[2] ॥ १ ॥
रामराम[3] ह्मणा उघड मंत्र जाणा । चुंकती[4] यातना गर्भवास ॥ २ ॥
मंत्र[5] यंत्र संध्या करिसी जडीबुटी । तेणें भूतसृष्टी पावसील ॥ ३ ॥
तुका[6] ह्मणे ऐक सुंदर मंत्र एक । भवसिंधुतारक रामनाम[7] ॥ ४ ॥

॥ ६५५ ॥

काय सुख आहे वाउगें बोलतां । ध्यातां पंढरीनाथा कष्ट नाहीं ॥ १ ॥
सर्वकाळ वाचे उच्चारितां हरि । तया सुखा सरी पाड नाहीं ॥ २ ॥
रामकृष्णरंगीं रसना रंगली । अमृताची उकळी नाम तुझें ॥ ३ ॥
तुका ह्मणे धन्य तयाचें वदन । जया नारायण ध्यानीं मनीं ॥ ४ ॥

॥ ६५६ ॥

संसारी असतां हरिनाम घेसी । तरीच उद्धरसी पूर्वजेंसी ॥ १ ॥
अवघींच इंद्रियें न येतील कामा । जिव्हे रामनामा उच्चारीं वेगीं ॥ २ ॥
शरीरसंपत्ति नव्हे रे आपुली । भ्रांतीची साउली अवघी व्यर्थ ॥ ३ ॥
तुका ह्मणे सार हरिनाम उच्चार । येऱ्हवी येरझार हरीविण ॥ ४ ॥

॥ ६५७ ॥

गाबाळाचे ग्रंथीं कां रे पडां सदा । मिथ्या भेदवादा वागवितां ॥ १ ॥
संसारगाबाळीं पडसी निखळ । जालासी तूं खळ तेणें मानें ॥ २ ॥
साधनसंकटीं गुंतसी कासया । व्यर्थ गा अपायामाजी गुंती ॥ ३ ॥
निर्मळ फुकाचें नाम गोविंदाचें । अनंतजन्मांचे फेडी मळ ॥ ४ ॥
तुका ह्मणे नको करूं कांहीं कष्ट । नाम वाचे स्पष्ट हरि बोलें ॥ ५ ॥

॥ ६५८ ॥

विठोबाचें नाम ज्याचे मुखीं नित्य । त्या देखिल्या पतित उद्धरती ॥ १ ॥
विठ्ठलविठ्ठल भावें ह्मणे वाचे । तरी तो काळाचे दांत ठेंसी ॥ २ ॥

---

१ नेत्र झांकोनियां. २ भावप्रेम. ३ उघडा मंत्र जाणा रामकृष्ण ह्मणा. ४ तुटती. ५ मंत्र तंत्र कांहीं. ६ सार तुका जपे बीजमंत्र. ७ रामकृष्ण.

बहुत तारिले सांगों किती आतां । ऐसा कोणी दाता दुजा नाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसा ही ऐकोनियां कीर्ती । धरिला एकांतीं हृदयामाजी ॥४॥

॥ ६५९ ॥

विषा केला ठोबा । ह्मणोनि नांव तो विठोबा ॥ १ ॥ कां रे नेणां त्याचें नांव । काय वेदासि नाहीं ठाव ॥ २ ॥ शेष स्तुती प्रवर्तला । जिव्हा चिरूनि पलंग जाला ॥३॥ तुका ह्मणे सत्ता । ज्याची काळाचिये माथा ॥४॥

॥ ६६० ॥

काळ सार्थक केला त्यांणीं । धरिला मनीं विठ्ठल ॥ १ ॥ नाम वाचे श्रवण कीर्ति । पाउलें चित्तीं समान ॥२॥ कीर्तनाचा समारंभ । निर्दंभ सर्वदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्वरूपसिद्धि । नित्य समाधि हरिनामीं ॥ ४ ॥

॥ ६६१ ॥

विटेवरी समचरण । तो हा रुक्मिणीरमण ॥ १ ॥ वेदशास्त्रा माहेर केले दासा उपकार ॥ २ ॥ नामापाशीं चारी मुक्ति । पाहा हृदयीं प्रतीति ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ॥ ४ ॥

॥ ६६२ ॥

तरी कां पवाडे गर्जती पुराणें । असता नारायण शक्तिहीन ॥ १ ॥
कीर्तीविण नाहीं नामाचा डांगोरा । येर कां इतरां वाणीत ना ॥ २ ॥
तरीच ह्मणा तो आहे चिरंजीव । केलियाचा जीव सुखी गुण ॥ ३ ॥
चांगलेंपण हें निरूपमता अंगी । बाणलें श्रीरंगीं ह्मणऊनी ॥ ४ ॥
तरीच हा थोर सांगितलें करी । अभिमान हरीपाशीं नाहीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे तरी करिती याची सेवा । देवापाशीं हेवा नाहीं कुडें ॥ ६ ॥

॥ ६६३ ॥

जन्मा येणें घडे पातकाचे मूळें । संचिताचें फळ आपुलिया ॥ १ ॥
मग वांयांविण दुःख वाहों नये । रुसोनियां काय देवावरी ॥ २ ॥
ठाउकाची आहे संसार दुःखाचा । चित्तीं सीण याचा वाहों नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे त्याचें नाम आठवावें । तेणें विसरावें जन्म दुःख ॥ ४ ॥

॥ ६६४ ॥

नाम न वदे ज्याची वाचा। तो लेंक दो बापांचा ॥ १ ॥ हेचि ओळख तयाची। खूण जाणा अभक्ताची ॥ २ ॥ ज्यासि विठ्ठल नाहीं ठावा। त्याचा संग न करावा ॥ ३ ॥ ठावा नाहीं पांडुरंग। जाणा जातीचा तो मांग ॥ ४ ॥ नाम न ह्मणे ज्याचें तोंड। तेंचि चर्मकाचें कुंड ॥ ५ ॥ तुका ह्मणे त्याचे दिवशीं। रांड गेली महारापाशीं ॥ ६ ॥

॥ ६६५ ॥

नामाविण काय वाउगी चावट। वांयां वटवट हरीविण ॥ १ ॥ फुकटची सांगे लोकाचिया गोष्टी। राम जगजेठी वाचे नये ॥ २ ॥ मेळवूनि चाट करी सुरापान। विषयांच्या गुणें मातलसे ॥ ३ ॥ बैसोनि टवाळी करी दुजयाची। नाहीं गोविंदाची आठवण ॥ ४ ॥ बळें यम दांत खाय तयावरी। जंव भरे दोरी आयुष्याची ॥ ५ ॥ तुका ह्मणे तुला सोडवील कोण। नाहीं नारायण आठविला ॥ ६ ॥

॥ ६६६ ॥

नामधारकासी नाहीं वर्णावर्ण। लोखंड प्रमाण नाना जात ॥ १ ॥
शस्त्र अथवा गोळे भलता प्रकार। परिसीं संस्कार सकळ हेम ॥ २ ॥
पर्जन्य वर्षतां जीवना वाहावट। तें समसकट गंगे मिळे ॥ ३ ॥
सर्व तें हें जाय गंगाचि होऊन। तैसा वर्णावर्ण नाहीं नामीं ॥ ४ ॥
महापुरीं जैसें जातसे उदक। मध्यें तें तारक नाव जैसी ॥ ५ ॥
तये नावेसंगें ब्राह्मण तरती। केवीं ते बुडती अनामिक ॥ ६ ॥
नाना काष्ठजात पडतां हुताशनीं। ते जात होउनी एकरूप ॥ ७ ॥
तेथें निवडेना घुरे कीं चंदन। तैसा वर्णावर्ण नामीं नाहीं ॥ ८ ॥
पूर्वानुवोळख तेंचि पैं मरण। जरि पावे जीवन नामामृत ॥ ९ ॥
नामामृतें जालें मुळींचें स्मरण। सहज साधन तुका ह्मणे ॥ १० ॥

॥ ६६७ ॥

नाम दूषी त्याचें नको दरुषण। विष तें वचन वाटे मज ॥ १ ॥ अमंगळ वाणी नाइकवे कानीं। निंदेची पोहणी उठे तेथें ॥ २ ॥ काय

साच लभ्य त्याचिये वचनीं । कोणत्या पुराणीं दिली ग्वाही ॥३॥ काय आड लावूं त्याचिया तोंडासी । आतां या जिभेसी काय करूं ॥ ४ ॥ तुका ह्मणे संत न मनिती त्यांस । घेऊं पाहे ग्रास यमदूत ॥ ५ ॥

॥ ६६८ ॥

तुटे मायाजाळ विघडे भवसिंधू । जरि लागे छंदु हरिनामें ॥ १ ॥
येर कर्म धर्म करितां ये काळीं । मार्जी तरला बळी कोण सांगा ॥२॥
न पढवे वेद नव्हे शास्त्रबोध । नामाचे प्रबंध पाठ करा ॥ ३ ॥
न साधवे योग न करवे वैराग्य । साधा भक्तिभाग्य संतसंगें ॥ ४ ॥
नव्हे अनुष्ठान न कळे ब्रह्मज्ञान । करावा सोपान कृष्णकथा ॥ ५ ॥
तुका ह्मणे वर्म दावियेलें संतीं । यापरती विश्रांति आणिक नाहीं ॥६॥

॥ ६६९ ॥

प्रपंचाची पीडा सोसी तो अघोरी । जया क्षणभरी नाम नये ॥ १ ॥
नाम नाठवितो आत्मया रामाचें । धिग जिणें त्याचें भवा मूळ ॥२॥
मूळ तें पापाचें आचरण तयाचें । नाहीं राघवाचें स्मरण त्या ॥ ३ ॥
स्मरण भजन नावडे जयासी । आंदणीया दासी यमदूतां ॥ ४ ॥
चिंतन रामाचें न करी तो दोषी । एकांत तयासीं बोलों नये ॥ ५ ॥
नये त्याचा संग धरूं ह्मणे तुका । धरितां पातका वांटेकरी ॥ ६ ॥

॥ ६७० ॥

ह्मणवितां हरी न ह्मणे तयाला । दरवडा पडिला देहामाजी ॥ १ ॥
आयुष्यधन त्याचें नेलें यमदूतीं । भुलविला निश्चिती कामरंगें ॥ २ ॥
नावडे ती कथा देउळासी जातां । प्रियधनसुता लक्ष तेथें ॥ ३ ॥
कोण नेतो तयां घटिका दिवसा एका । कां रे ह्मणे तुका नागवसी ॥४॥

॥ ६७१ ॥

मंत्र चळे पिसें लागतें सत्वर । अबद्ध ते फार तरले नामें ॥ १ ॥
अशौच तो बाधी आणिकां अक्षरां । नाम निदसुरा घेतां तरे ॥ २ ॥
रागज्ञानघात चुकतां होय वेळ । नाम सर्वकाळ शुभदायक ॥ ३ ॥

आणिकां भजना बोलिला निषेध । नाम तें अभेद सकळां मुखीं ॥४॥ तुका ह्मणे तपें घालिती घालणी । वेश्या उद्धरूनि नेली नामें ॥ ५ ॥

॥ ६७२ ॥

वेदाचें गव्हर न कळे पाठकां । अधिकार लोकां नाहीं येरां ॥ १ ॥ विठोबाचें नाम सुलभ सोपारें । तारी एकसरें भवसिंधु ॥२॥ जाणत्या असाध्य मंत्र तंत्र काळ । येर तो सकळ मूढ लोक ॥३॥ तुका ह्मणे विधि निषेध लोपला । उच्छेद या जाला मारगाचा ॥ ४ ॥

॥ ६७३ ॥

वाचे विठ्ठल नाहीं । तोचि प्रेतरूप पाहीं ॥१॥ धिग त्याचें ज्यालेपण । भार न साहे मेदिन ॥२॥ न बैसे कीर्तनीं । गुण नाइके जो कानीं॥३॥जातां कांटाळे देउळा । तोचि सुना मुखकाळा ॥ ४ ॥ हरिभक्तीविण । त्याचें जळो ब्राह्मणपण ॥५॥ तुका ह्मणे तेणें । वंशा आणियेलें उणें ॥६॥

॥ ६७४ ॥

विठ्ठलनामाचा नाहीं ज्या विश्वास । तो वसे उदास नरकामध्यें ॥ १ ॥ तयासी बोलतां होईल विटाळ । नव जाय तो जळस्नान करितां ॥२॥ विठ्ठल नामाची नाहीं ज्या आवडी । त्याची काळ घडी लेखिताहे ॥३॥ तुका ह्मणे मज विठोबाची आण । जरी प्रतिवचन करिन त्यासी ॥४॥

॥ ६७५ ॥

गव्हे गुरुदास्य संसारियां । वैराग्य तरी भेणें कांपे विषयां । तैसें नाम नव्हे पंढरिराया । जया सायास न लगती ॥१॥ ह्मणोनि गोड सर्व भावें । आंघोळी न लगे तोंड धुवावें । अर्थचाड जीवें । न लगे भ्यावें संसारा ॥ २ ॥ कर्म तंव न पुरे संसारिक । धर्म तंव फळदायक । नाम विठ्ठलाचें एक । नाशी दुःख भवाचें ॥३॥ न लगे सांडणें मांडणें । आगमनिगमाचें देखणें । अवघें तुका ह्मणे । विठ्ठलनामें आटलें ॥ ४ ॥

॥ ६७६ ॥

कर्म धर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन॥१॥ भलत्या काळें नामा-वळी । सुलभ भोळीं भाविकां ॥ २ ॥ प्रायश्चित्तें पडती पायां । गाती तयां वैष्णवां ॥३॥ तुका ह्मणे नुपजे दोष । करा घोष आनंदें ॥४॥

॥ ६७७ ॥

अनुहात ध्वनि वाहे सकळां पिंडीं । गम नाहीं तोंडीं कैसा तरे ॥१॥ सकळां जीवांमाजी देव आहे खरा। देखिल्या दुसरा विण न तरे ॥२॥ ज्ञान सकळांमाजी आहे हें साच । भक्तीविण तेंच ब्रह्म नव्हे ॥३॥ काय मुद्रा कळल्या कराव्या सांगतां। दीप न लागतां उन्मनीचा ॥४॥ तुका ह्मणे नका पिंडाचें पाळण । स्थापूं नारायण आतुडेना ॥ ५ ॥

॥ ६७८ ॥

नाम ह्मणतां मोक्ष नाहीं । ऐसा उपदेश करिती कांहीं । बधिर व्हावें त्यांचे ठायीं । दुष्ट वचन वाक्य तें ॥ १ ॥ जयाचे गहिलें मानसीं । तेचि पावले तयासी । चांचपडतां मेलीं पिसीं । भलतैसीं वाचाळें ॥२॥ नवविधीचा निषेध । जेणें मुखें करिती वाद । जन्मा आले निंद्य । शूकरयाती संसारा ॥३॥ काय सांगों वेळोवेळां । आठव नाहीं चां-डाळा । नामासाटीं बाळा । क्षीरसागरीं कोंडिलें ॥ ४ ॥ आपुलिया नामासाठीं । लागे शंखासुरापाठीं । फोडोनियां पोटीं । वेद चारी काढिले ॥ ५ ॥ जगीं प्रसिद्ध हे बोली । नामें गणिका तारिली । आ-णिकेंही उद्धरिलीं । पातकी महादोषी ॥ ६ ॥ जे हे पवाडे गर्जती । नाम प्रल्हादाच्या चित्तीं । जळतां बुडतां घातीं । राखे हातीं विषाचे ॥७॥ काय सांगों ऐशीं किती । तुका ह्मणे नामख्याती । नरकाप्रती जाती । निषेधिती तीं एकें ॥८॥

॥ ६७९ ॥

नाम आहे जयापाशीं । जेथें राहे तेथेंचि काशी ॥१॥ ऐसा नामाचा महिमा। जाणे वाल्मीक शंकर उमा ॥२॥ नाम प्रल्हादबाळ । जाणे पापी अजामेळ ॥३॥ नाम जाणे तो नारद । नामें ध्रुवा अक्षय पद ॥४॥

नाम गणिकेतें तारी। पशु गजेंद्र उद्धरी ॥ ५ ॥ नाम जाणे हणुमंत। जाणताती महासंत ॥ ६ ॥ नाम जाणे शुकमूर्ति। जाणे राजा परिक्षिती ॥७॥ नाम जाणे तुका। नाहीं संसाराचा धोका ॥८॥

॥ ६८० ॥

भोळे भक्त भाव धरिती मानसीं। त्यांसी हृषीकेशी जवळीच ॥ १ ॥ भाव नाहीं मनीं अभाविक सदा। त्याचिया मी खेदा काय सांगों ॥ २ ॥ गणिकेसारिखीं नामें उद्धरिलीं। सज्ञानें पडिलीं खटाटोपीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय शुद्ध माझी जाती। थोर केली ख्याती हरिनामें ॥ ४ ॥

॥ ६८१ ॥

हाकेसरसी उडी। घालूनियां स्तंभ फोडी ॥ १ ॥ ऐसा कृपावंत कोण। माझे विठाईवांचून ॥ २ ॥ करितां आठव। धांवोनियां घाली कव॥३॥ तुका ह्मणे गीतीं गातां। नामें द्यावी सायुज्यता ॥ ४ ॥

॥ ६८२ ॥

नाम साराचेंही सार। शरणागत यमकिंकर ॥ १ ॥ नाम उत्तम उत्तम। याचे बोला पुरुषोत्तम ॥२॥ नाम जपतां चंद्रमौळी। नामें तरला वाल्हाकोळी ॥३॥ तुका ह्मणे वर्णूं काय। तारक विठोबाचे पाय॥४॥

॥ ६८३ ॥

नामाचे पवाडे बोलती पुराणें। होऊनि कीर्तन तूंचि ठेला ॥ १ ॥ आदिनाथा कंठीं आगळा हा मंत्र। आवडीचें स्तोत्र सदा घोकी॥ २ ॥ आगळें हें सार उत्तमा उत्तम। ब्रह्मकर्मा नाम एक तुझें ॥ ३ ॥ तिहीं त्रिभुवनीं गमन नारदा। हातीं विणा सदा नाम मुखीं ॥ ४ ॥ परिक्षिती मृत्यु सातां दिवसांचा। मुक्त जाला वाचा उच्चारितां॥ ५ ॥ कोळियाची कीर्ति वाढली गहन। केलें रामायण रामा आधीं ॥ ६ ॥ सगुण निर्गुण तुज ह्मणे वेद। तुका ह्मणे भेद नाहीं नामीं ॥ ७ ॥

॥ ६८४ ॥

पुराणप्रसिद्ध सीमा। नामतारकमहिमा ॥ १ ॥ मागें जाली महा

दोष । पुढें नाहीं गर्भवास ॥ २ ॥ जें निंदिलें शास्त्रें । वंद्य जालें नाममात्रें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसा । त्रिभुवनीं नामठसा ॥ ४ ॥

॥ ६८५ ॥

तारिलीं बहुतें चुकवूनि घात । नाम हें अमृत स्वीकारितां ॥ १ ॥ नेणतां सायास शुद्ध आचरण । यातीकुळहीन नामासाटीं ॥२॥ जन्म नांव धरी भक्तीचा पाळणा । आकार कारणा याचसाटीं ॥३॥ असुरीं दाटली पाप होतां फार । मग फेडी भार पृथिवीचा ॥ ४ ॥ तुका ह्मणे देव भक्तपण सार । कवतुकवेव्हार तयासाटीं ॥ ५ ॥

॥ ६८६ ॥

गोड जालें पोट धालें । अवचित वाचे आलें । ह्मणतां पाप गेलें । विठ्ठलसें वाचेसी ॥ १ ॥ सत्य माना रे सकळ । उद्धरिला अजामेळ । पातकी चांडाळ । नामासाटीं आपुलिया ॥ २ ॥ चित्त पावलें आनंदा । सुखसमाधीतें सदा । ह्मणतां गोविंदा । वेळोवेळां वाचेसी ॥३॥ हें जाणती अनुभवी । जया चाड तो चोजवी । तुका ह्मणे दावी । रूप तेंचि अरूपा ॥ ४ ॥

॥ ६८७ ॥

तुज न भें मी कळिकाळा । मज नामाचा जिव्हाळा ॥ १ ॥ माझ्या बळिया नेणसी कोण । संतां साहे नारायण ॥ २ ॥ शंख वधिला सागरीं । वेद घेउनि आला चारी ॥ ३ ॥ कूर्में दैत्य वधिला जेठी । हातपाय लपवी पोटीं ॥ ४ ॥ वाराहरूप धरिलें गाढें । धरा प्रतापें धरिली दाढे ॥५॥ हिरण्यकश्यप विदारिला । भक्त प्रल्हाद रक्षिला ॥६॥ वामन जाला दिनानाथ । बळी पाताळीं घातला दैत्य ॥७॥ छेदुनियां सहस्र भुजा । कामधेनु आणिली वोजा ॥८॥ शिळा प्रतापें सागरीं तारी । स्थापी बिभीषण रावण मारी ॥९॥ मारोनियां कंसराव । पिता सोडविला वसुदेव ॥१०॥ पांचाळीसी गांजितां वैरी । वस्त्रें आपण जाला हरी ॥ ११ ॥ गजेंद्र स्मरे रामराम । त्यासी पाववी वैकुंठधाम ॥१२॥ तुका ह्मणे हरिरूप जाले । पुन्हा जन्मा नाहीं आले ॥ १३ ॥

॥ ६८८ ॥

करुणा बहुत तुझिया अंतरा । मज विश्वंभरा कळों आलें ॥ १ ॥
पक्षीयासी तुझें नाम जें ठेविलें । तयें उद्धरिलें गणिकेसी ॥ २ ॥
कुंटिणी ते दोष बहु आचरली । नाम घेतां आली करुणा तुज ॥ ३ ॥
हृदय कोमळ तुझें नारायणा । ऐसें बहुतां जनां तारियेलें ॥ ४ ॥
तुका ह्मणे सीमा नाहीं तुझे दये । कोमळ हृदय पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ ६८९ ॥

तुझिया नामाचा विसर न पडावा । ध्यानीं तो राहावा पांडुरंग ॥१॥
सांगितला मंत्र श्रीरामनामाचा । सर्वकाळ वाचा हेंचि बोलें ॥ २ ॥
उफराटें नाम वाल्मीक बोलिला । तोही वंद्य केला नारायणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज तुझाचि भरवसा । धांवुनियां कैसा येसी देवा ॥४॥

॥ ६९० ॥

सर्वसुखा अधिकारी । मुखें उच्चारी हरिनाम ॥ १ ॥ सर्वांगें तो सर्वो-
त्तम । मुखीं नाम हरीचें ॥ २ ॥ ऐशी उभारिली बाह । वेदीं पाहें
पुराणीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें कांहीं । संदेह नाहीं भरंवसा ॥ ४ ॥

॥ ६९१ ॥

ठाव देऊनियां राखें पायांपासीं । मी तों आहें रासी पातकाची ॥१॥
पातकाची रासी ह्मणतां लागे वेळ । एक तो कृपाळ नारायण ॥२॥
नारायणनामें अवघें सांग जालें । असंगचि केलें एकमय ॥ ३ ॥
एकमय जालें विठोबाच्या नामें । भेदाभेदकर्मं आणिक कांहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे चित्तीं चिंतिलें जें होतें । तें होय आपैतें नामें याच्या॥५॥

॥ ६९२ ॥

धन्य दिवस आजि डोळियां लाधला । आनंद देखिला धणीवरी॥१॥
धन्य जालें मुख निवाली रसना । नाम नारायणा घोष करूं ॥ २ ॥
धन्य हें मस्तक सर्वांग शोभलें । संतांचीं पाउलें लागताती ॥ ३ ॥
धन्य आजि पंथें चालती पाउलें । टाळिया शोभले धन्य कर ॥ ४ ॥
धन्य तुका ह्मणे आह्मांसी फावलें । पावलों पाउलें विठोबाचीं ॥ ५ ॥

॥ ६९३ ॥

काय करतील केलीं नित्य पापें । वसे नाम ज्यापें विठोबाचें ॥ १ ॥ तृणीं हुताशन लागला रासी । जळतील तैसीं क्षणमात्रें ॥ २ ॥ विष्णुमूर्तिपाद पाहातां चरण । तेथें कर्म कोण राहूं शके ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाम जाळी महादोष । जेथें होय घोष कीर्तनाचा ॥ ४ ॥

॥ ६९४ ॥

फोडिलें भांडारें । माप घेऊनियां खरें ॥ १ ॥ केली हरिनामाची वरो । मागितलें आतां सरो ॥ २ ॥ देशांत सुकाळ । जाला हारपला काळ ॥ ३ ॥ थावें धणीवरी । तुका ह्मणे लाहान थोरीं ॥ ४ ॥

॥ ६९५ ॥

लागलें भरतें । ब्रह्मानंदाचें वरतें ॥ १ ॥ जालां हरिनामाचा तारा । सीड लागलें फरारा ॥ २ ॥ बैसोनि सकळ । बाळ चालिले गोपाळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाट । बरवी सांपडली नीट ॥ ४ ॥

॥ ६९६ ॥

आमिषाचिये आसे गळ गिळी मासा । फुटोनियां घसा मरण पावे ॥ १ ॥ मरणाचे वेळे करी तळमळ । आठवी कृपाळ तये वेळीं ॥ २ ॥ अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखा । तुका ह्मणे सुखा पार नाहीं ॥ ३ ॥

॥ ६९७ ॥

सत्य साच खरें । नाम विठोबाचें बरें ॥ १ ॥ जेणें तुटती बंधनें । उभयलोकीं कीर्ति जेणें ॥ २ ॥ भाव ज्याचे गांठी । त्यासी लाभ उठाउठी ॥ ३ ॥ तुका ह्मणे भोळा । जिंकूं जाणे कळिकाळा ॥ ४ ॥

॥ ६९८ ॥

तुटे भवरोग । संचितक्रियमाणभोग ॥ १ ॥ ऐसें विठोबाचें नाम । उच्चारितां खंडे जन्म ॥ २ ॥ वसों न सके पाप । पळे त्रिविध तो ताप ॥ ३ ॥ तुका ह्मणे माया । होय दासी लागे पायां ॥ ४ ॥

॥ ६९९ ॥

तुझें नाम गोड नाम गोड । पुरे कोड सकळही ॥ १ ॥ रसना येरां रसां

विटे । घेतां घोट अधिक हें ॥ २ ॥ आणिकां रसें मरण गांठी । येणें तुटी संसारें ॥३॥ तुका ह्मणे आहार जाला । हा विठ्ठल आह्मांसी॥४॥

॥ ७०० ॥

निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्या कीर्तन करितां डोले ॥१॥
उभा राहोनियां मुखीं नाम वदे । नाचे नाना छंदें गोविंद हा ॥ २ ॥
मारगीं चालतां मुखीं नाम वाणी । उभा चक्रपाणी मागें पुढें ॥३॥
तुका ह्मणे यासी कीर्तनाची गोडी । प्रेमें घाली उडी नामासाटीं ॥४॥

॥ ७०१ ॥

काय करील तें नव्हे विश्वंभर । सेवकां दारिद्र लाज नाहीं ॥ १ ॥
मजपासूनि हें पडिलें अंतर । काय तो अव्हेर करूं जाणें ॥ २ ॥
नामाच्या चिंतनें नासी गर्भवास । नेदी करूं आस आणिकांची ॥३॥
तुका ह्मणे नेणों किती वांयां गेले । तयां उद्धरिलें पांडुरंगें ॥ ४ ॥

॥ ७०२ ॥

आलें फळ तेव्हां राहिलें पिकोन । जरि तें जतन होय देठीं ॥ १ ॥
नामेंचि सिद्धि नामेंचि सिद्धि । व्यभिचारबुद्धि न पवतां ॥ २ ॥
चालिला पंथ तो पाववील ठाया । जरि आड तया नये कांहीं ॥३॥
तुका ह्मणे मध्यें पडती आघात । तेणें होय घात हानि लाभ ॥ ४ ॥

॥ ७०३ ॥

ज्याचे गर्जतां पवाडे । कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥ तो हा पंढरीचा राणा । पुसा सा चौं अठरां जणां ॥२॥ चिंतितां जयासी । भुक्तिमुक्ति कामारी दासी ॥३॥ वैकुंठासी जावें । तुका ह्मणे ज्याच्या नांवें॥४॥

॥ ७०४ ॥

नाम घेतां कंठ शीतळ शरीर । इंद्रियां व्यापार नाठवती ॥ १ ॥
गोड गोमटें हें अमृतासी वाड । केला कईवाड माझ्या चित्तें ॥ २ ॥
प्रेमरसें जाली पुष्ट अंगकांति । त्रिविध सांडिती ताप अंगें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तेथें विकाराची मात । बोलों नये हित सकळांचें ॥ ४ ॥

॥ ७०५ ॥

मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी साक्ष बहुतांसी ॥ १ ॥ वैष्णवांचा माल खरा । तुरतुरा वस्तूसी ॥ २ ॥ भस्म दंड न लगे काठी । तीर्थी आटी भ्रमण ॥ ३ ॥ तुका ह्मणे आडकाठी । नाहीं भेटी देवाचे ॥ ४ ॥

॥ ७०६ ॥

विठ्ठल नावाचा फुकाचा । आळविल्या साटीं वाचा ॥ १ ॥ कटीं कर जैसे तैसे । उभा राहिला न बैसे ॥२॥ न पाहे सिदोरी । जाती कुळ न विचारी ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेटी । हाक देतां उठाउठीं ॥ ४ ॥

॥ ७०७ ॥

हो कां दुराचारी । वाचे नाम जो उच्चारी ॥१॥ त्याचा दास मी अंकित । कायावाचामनेंसहित ॥ २ ॥ नसो भाव चित्तीं । हरिचे गुण गातां गी-तीं ॥३॥ करी अनाचार । वाचे हरिनामउच्चार ॥४॥ हो कां भलतें कुळ । शुचि अथवा चांडाळ ॥५॥ ह्मणवी हरिचा दास । तुका ह्मणे धन्य त्यास ॥६॥

॥ ७०८ ॥

भेदाभेदताळा न घडे घालितां । आठवा रे आतां नारायण ॥ १ ॥ येणें एक केलें अवघें होय सांग । अच्युताच्या योगें नामें छंदें ॥२॥ भोंवरे खळाळ चोर वाटा घेती । पावलें मारिती सिवेपाशीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें भावेंविण पार । न पविजे सार हेंचि आहे ॥ ४ ॥

॥ ७०९ ॥

जेथें आठवती स्वामीचे ते पाय । उत्तम तो ठाय रम्य स्थळ ॥ १ ॥ रान अथवा घर एकांत लोकांत । समाधान चित्त तें ते घडी ॥ २ ॥ धन्य तो हा काळ सरे आनंदरूप । वाहातां संकल्प गोविंदाचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे लाभकाळ तेंचि जीणें । भाग्य नारायण उत्तम तें ॥ ४ ॥

॥ ७१० ॥

कस्तूरीचें रूप अति हीनवर । माजी असे सार मोल तया ॥ १ ॥ आणीक ही तैसीं चंदनाचीं झाडें । परिमळें वाढे मोल तयां ॥ २ ॥ काय रूपें असे परीस चांगला । धातु केली मोला वाढ तेणें ॥ ३ ॥

फिरंगी आटितां नये बारा रुके । गुणें मोलें विकें सहस्रवरी ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं जातीसवें काम । ज्याचे मुखीं नाम तोचि धन्य ॥५॥

॥ ७११ ॥

कंठीं नामसिका । आतां कळिकाळासी धका ॥१॥ रोखा माना कीं सिका माना । रोखा सिका तत्समाना ॥२॥ रोखा न मना सिका न मना । जतन करा नाककाना ॥ ३ ॥ सिका न मनी रावण । त्याचें केलें निसंतान ॥ ४ ॥ सिका मानी हळाहळ । जालें सर्वांगीं शीतळ ॥५॥ तुका ह्मणे नाम सिका । पटीं बैसलों निजसुखा ॥६॥

॥ ७१२ ॥

न करा टांचणी । येथें कांहीं आडचणी ॥ १ ॥ जिव्हा अमुप करी पाप । विठ्ठल पिकला माझा बाप ॥२॥ तुका* ह्मणे सर्वकाळ । अवघा गोविंद गोपाळ ॥ ३ ॥

॥ ७१३ ॥

पवित्र तें अन्न । हरिचिंतनीं भोजन ॥ १ ॥ येर वेठ्या पोट भरी । चाम मसकाचे परी ॥ २ ॥ जेऊनि तो धाला । हरिचिंतनीं केला काला ॥ ३ ॥ तुका ह्मणे चवी आलें । जें कां मिश्रित विठ्ठलें ॥ ४ ॥

॥ ७१४ ॥

देवा ऐकें हे विनंती । मज नको रे हे मुक्ति । तया इच्छा गति । हेंचि सुख आगळें ॥१॥ या वैष्णवांचे घरीं । प्रेमसुख इच्छा करी । रिद्धिसिद्धि द्वारीं । कर जोडूनि उभ्या ॥२॥ नको वैकुंठींचा वास । असे तया सुखा नास । अद्भुत हा रस । कथाकाळीं नामाचा ॥३॥ तुझ्या नामाचा महिमा । तुज न कळे मेघश्यामा । तुका ह्मणे आह्मां । जन्म गोड यासाटीं ॥४॥

॥ ७१५ ॥

प्रेम तेथें वास करी ॥ मुखीं उच्चारितां हरी ॥ १ ॥ प्रेमें यावें तया गांवा । चोजवीत या वैष्णवां ॥ २ ॥ प्रेम पाठी लागे बळें । भक्त

---

* " आठही प्रहर । बारा मास निरंतर ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाणी । वर्जेना हे घेतां धणी ॥ ४ ॥ " असा पाठभेद आहे.

देखोनियां भोळे ॥३॥ प्रेम न वजे दवडितां। शिरे बळें जेथें कथा ॥४॥
तुका ह्मणे थोर आशा। प्रेमा घरीं विष्णुदासां ॥ ५ ॥

॥ ७१६ ॥

वंदूं चरणरज सेवूं उष्टावळी। पूर्वकर्मा होळी करुनी सांडूं ॥ १ ॥
अमुप हें गांठीं बांधूं भांडवल। अनाथा विठ्ठल आह्मां जोगा ॥ २ ॥
अवघे होती लाभ एका या चिंतनें। नामसंकीर्तनें गोविंदाच्या ॥ ३ ॥
जन्ममरणाच्या खुंटतील खेपा। होईल हा सोपा सिद्ध पंथ ॥ ४ ॥
गेले पुढें त्यांचा शोधीत मारग। चला जाऊं माग घेत आह्मी ॥ ५ ॥
तुका ह्मणे घालूं जीवपणा चिरा। जाऊं त्या माहेरा निजाचिया ॥ ६ ॥

॥ ७१७ ॥

नामाची आवडी तोचि जाणा देव। न धरीं संदेह कांहीं मनीं ॥१॥
ऐसें मी हें नाहीं बोलत नेणतां। आणोनि संमता संतांचिया ॥२॥
नाम ह्मणे तया आणीक साधन। ऐसें हें वचन बोलों नये ॥३॥
तुका ह्मणे सुख पावे या वचनीं। ज्याचीं शुद्ध दोन्ही मायबापें ॥४॥

॥ ७१८ ॥

हरिनाम वेली पावली विस्तार। फळीं पुष्पीं भार वोल्हावली ॥१॥
तेथें माझ्या मना होईं पक्षिराज। साधावया काज तृप्तीचें या ॥२॥
मुळींचिया बीजें दाखविली गोडी। लवकरीचि जोडी जालियाची ॥३॥
तुका ह्मणे क्षणक्षणा जातो काळ। गोडी ते रसाळ अंतरेल ॥४॥

---

## कीर्तनपर अभंग.

॥ ७१९ ॥

हरिकथे नाहीं। विश्वास ज्याचे ठायीं ॥१॥ त्याची वाणी अमंगळ। कान
उंदराचें बीळ ॥२॥ सांडूनी हा रस। करिती आणीक सायास ॥३॥
तुका ह्मणे पिसीं। वायां गेलीं किती ऐसीं ॥४॥

॥ ७२० ॥

अमंगळ वाणी । नये आइकों ते कानीं ॥ १ ॥ जो हे दूषी हरिची कथा । त्यासि क्षयरोगव्यथा ॥२॥ याति वर्णे श्रेष्ठ । परि तो चांडाळ पापिष्ठ ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाप । माय नावडे ज्या बाप ॥४॥

॥ ७२१ ॥

प्रेम अमृताची धार । वाहे देवा ही समोर ॥१॥ ऊर्ध्ववाहिनी हरिकथा । मुगुटमणि सकळां तीर्था ॥२॥ शिवाचें जीवन । जाळी महादोष कीर्तन ॥३॥ तुका ह्मणे हरि । इची स्तुति वाणी थोरी ॥४॥

॥ ७२२ ॥

अवीट हें क्षीर हरिकथा माउली । सेवितां सेविली वैष्णवजनीं ॥१॥ अमृत राहिलें लाजोनि माघारें । येणें रसें थोरें ब्रह्मानंदें ॥ २ ॥ पतित पातकी पावनपंगती । चतुर्भुज होती देवाऐसे ॥ ३ ॥ सर्व सुखें तया मोहोरती ठाया । जेथें दाटणी या वैष्णवांची ॥ ४ ॥ निर्गुण हें सोंग धरिलें गुणवंत । धरूनियां प्रीत गाये नाचे ॥ ५ ॥ तुका ह्मणे केलीं साधनें गाळणी । सुलभ कीर्तनीं होउनी ठेला ॥ ६ ॥

॥ ७२३ ॥

आणीक नका करूं चेष्टा । व्हाल कष्टा वरपडी ॥ १ ॥ सुखें करा हरिकथा । सर्वथा हे तारील ॥ २ ॥ अनाथाचा नाथ देव । अनुभव सत्य हा ॥३॥ तुका ह्मणे बहुतां रीती । धरा चित्तीं सकळ ॥ ४ ॥

॥ ७२४ ॥

आनंदें कीर्तन कथा करीं घोष । आवडीचा रस प्रेमसुख ॥ १ ॥ मज या आवडे वैष्णवांचा संग । तेथें नाहीं लाग कळिकाळा ॥ २ ॥ स्वल्प मंत्र वाचे वैसलासे निका । रामकृष्ण सखा नारायण ॥ ३ ॥ विचारितां दुजें वाटे मज लाज । उपदेशें काज आणिक नाहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे चित्त रंगलेंसे ठायीं । माझें तुझ्या पायीं पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ ७२५ ॥

कथा करोनियां द्रव्य घेती देती । तयां अधोगति नरकवास ॥ १ ॥
रवरव कुंभपाक भोगिती यातना । नये नारायणा करुणा त्यांची ॥ २ ॥
असिखड्गधारा छेदिती सर्वांग । तप्तभूमी अंग लोळविती ॥ ३ ॥
तुका ह्मणे तया नरक न चुकती । सांपडले हातीं यमाचिया ॥ ४ ॥

॥ ७२६ ॥

कथा करोनियां मोल ज्यापें घेती । तेही दोघे जाती नरकामध्यें ॥ १ ॥
ब्रह्म पूर्ण करा ब्रह्म पूर्ण करा । अखंडित स्मरा रामराम ॥ २ ॥
मधुरवाणीच्या नका पडों भरी । जाल यमपुरी भोगावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे करीं ब्रह्मांड ठेंगणें । हात पसरी जिणें धिग त्याचें ॥ ४ ॥

॥ ७२७ ॥

कथाकाळींची मर्यादा । सांगतों ते भावें वंदा । प्रीतीनें गोविंदा । हेंचि एक आवडे ॥ १ ॥ टाळ वाद्य नृत्य गीत । अंतःकरणें प्रेमभरित । वाणिता तो कीर्त । तद्भावने लेखावा ॥ २ ॥ नये अळसें मोडूं अंग । कथे कानवडें ढुंग । हेळणेचा रंग । दावी तो चांडाळ ॥ ३ ॥ तोंडीं विडा माने ताठा । थोरपणें घाली गेंठा । चित्त नेदी नामपाठा । गोष्टी लावी तो चांडाळ ॥ ४ ॥ कथे इच्छी मान । दाखूनियां थोरपण । रजा संकोच न । लुगडीं सांवरी तो चांडाळ ॥५॥ आपण बैसे बाजेवरी । सामान्य हरिच्या दासां धरी । तरि तो सुळावरी । वाहिजे निश्चयेसीं ॥ ६ ॥ येतां न करी नमस्कार । कर जोडोनियां नम्र । न ह्मणतां थोर । आणिकां खेटी तो चांडाळ ॥७॥ तुका विनवी जना । कथे नाणावें अवगुणा । करा नारायणा । ऋणी समर्पक भावें ॥ ८ ॥

॥ ७२८ ॥

कथा देवाचें ध्यान । कथा साधना मंडण । कथे ऐसें पुण्य । आणीक नाहीं सर्वथा ॥ १ ॥ ऐसा साच खरा भाव । कथेमाजी उभा देव ॥ २ ॥ मंत्र स्वरूप जना । उच्चारितां वाचे मना । ह्मणतां नारा-

यणा । क्षणें जळती महा दोष ॥ ३ ॥ भावें करितां कीर्तन । तरे
सारी आणीक जन । भेटे नारायण । संदेह नाहीं ह्मणे तुका ॥ ४ ॥

॥ ७२९ ॥

कथा दुःख हरी कथा मुक्त करी । कथा याचि बरी विठोबाची॥१॥
कथा पाप नासी उद्धरिले दोषी । समाधि कथेसी मूढजना ॥ २ ॥
कथा तप ध्यान कथा अनुष्ठान । अमृत हे पान हरिकथा ॥ ३ ॥
कथा मंत्र जप कथा हरी ताप । कथाकाळीं कांप कळिकाळासी ॥४॥
तुका ह्मणे कथा देवाचेंही ध्यान । समाधि लागोन उभा तेथें ॥ ५ ॥

॥ ७३० ॥

कथेचा उलंघ तो अधमां अधम । नावडे ज्या नाम ओळखा तो ॥ १ ॥
कासया जीऊन जाला भूमी भार । अनउपकार माते कुंसी ॥ २ ॥
निद्रेचा आदर जागरणीं वीट । त्याचे पोटीं कीट कुपथ्याचें ॥३॥
तुका ह्मणे दोन्ही बुडविलीं कुळें । ज्याचें तोंड काळें कथेमाजी ॥४॥

॥ ७३१ ॥

कथे बैसोनि सादरें । सुखचर्चा परस्परें । नवल काय तो उद्धरे । आणीक
तरे सुगंधें ॥ १ ॥ पुण्य घेई रे फुकाचें । पाप दुष्ट वासनेचें । पेरिल्या बी-
जाचें । फळ घेई शेवटीं ॥२॥ कथा विरस पाडी आळसें । छळणा करूनि
मोडी रस । बुडवी आपणासरिसें । विटाळसें नावेसी ॥ ३ ॥
सज्जन चंदनाचिये परी । दुर्जन देशत्यागें दुरी । राहो ह्मणे हरि ।
विनंती करी तुका हे ॥४॥

॥ ७३२ ॥

करावें कीर्तन । मुखें गावे हरिचे गुण ॥ १ ॥ मग कांहीं नव्हे बाधा ।
काम दुर्जनाच्या क्रोधा ॥२॥ शांतिखड्ग हातीं । काळासी ते नाग-
विती ॥३॥ तुका ह्मणे दाता सखा । ऐसा अनंतासारिखा ॥४॥

॥ ७३३ ॥

कथा त्रिवेणीसंगम । देवभक्त आणि नाम । तेथींचें उत्तम । चरणरज
वंदितां ॥१॥ जळती दोषांचे डोंगर । शुद्ध होती नारीनर । गाती ऐकती

सादर । जे पवित्र हरिकथा ॥२॥ तीर्थें तया ठाया येती । पुनीत व्हावया । पर्वकाळ पायां-। तळीं वसे वैष्णवां ॥३॥ अनुपम्य हा महिमा । नाहीं द्यावया उपमा । तुका ह्मणे ब्रह्मा । नेणे वर्णूं या सुखा ॥४॥

॥ ७३४ ॥

कथा हें भूषण जनामध्यें सार । तरले अपार बहुत येणें ॥ १ ॥ नीचिये कुळींचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणवाद ॥ २ ॥ देव त्याची माथां वंदी पायधुळी । दीप जाला कुळीं वंशाचिये ॥ ३ ॥ त्याची।निंदा करी त्याची कुष्ट वाणी । मुख संवदणी रजकाची ॥ ४ ॥ तुका ह्मणे नाहीं चोरीचा व्यापार । विठ्ठलाचें सार नाम ध्यावें ॥ ५ ॥

॥ ७३५ ॥

कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥ १ ॥ प्रेमाछंदें नाचे डोले । हारपला देहभाव ॥ २ ॥ एकदेशीं जीवकळा । हा सकळां सोयरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे उरला देव । गेला भेव त्या काळें ॥ ४ ॥

॥ ७३६ ॥

कीर्तनाचा विकरा मातेचें गमन । भाड खाई धन विटाळ तो ॥१॥ हरि-भक्ताची माता हे हरिगुणकीर्ति । इजवर पोट भरिती चांडाळ ते ॥२॥ अंत्यज हा ऐसें कल्पांतीं करीना । भाड हे खाईना जननीची ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचें दर्शनही खोटें । पूर्वजांसी नेटें नरका धाडी ॥४॥

॥ ७३७ ॥

कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव । पंढरीचा राव संगीं आहे ॥१॥ भक्त जाय सदा हरिकीर्ति गात । त्यासवें अनंत हिंडतसे ॥२॥ त्रैलोक्य भ्रमण करीत नारद । त्यासवें गोविंद फिरतसे ॥ ३ ॥ नारद मंजुळ सुस्वरें गीत गाये । मार्गीं चालताहे संगें हरि ॥४॥ तुका ह्मणे त्याला गोडी कीर्तनाची । नाहीं आणिकांची प्रीति ऐसी ॥ ५ ॥

॥ ७३८ ॥

खोंकरी आधण होय पाकसिद्धि । हें तों घडों कधीं शकेचि ना ॥ १ ॥

खापराचे अंगीं घासितां परिस । न पालटे कीस काढिलिया ॥ २ ॥
पालथे घागरी रिचवितां जळ । तुका ह्मणे खळ तैसे कथे ॥ ३ ॥

॥ ७३९ ॥

गायत्री विकोन पोट जे जाळिती । तयां होय गति यमलोकीं ॥१॥
कन्येचा जे नर करिती विकरा । ते जाती अघोरा नरकपाता ॥२॥
नाम गाऊनियां द्रव्य जे मागती । नेणों तयां गति कैसी होय ॥३॥
कैसें होइल त्यांचें तेच हो जाणती । आह्मांसी संगती नलगे त्यांची ॥४॥
आमुचा सांगाती आहे तो श्रीहरि । न लगे दुराचारी तुका ह्मणे ॥५॥

॥ ७४० ॥

जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥१॥ बुका लावूं नये भाळा । माळ घालूं नये गळां ॥२॥ तटावृषभासी दाणा । तृण मागों नये जाणा ॥३॥ तुका ह्मणे द्रव्य घेती । देती तेही नरका जाती ॥४॥

॥ ७४१ ॥

जळती कीर्तनें । दोष पळतील विघ्नें ॥ १ ॥ हेंचि बळिवंत गाढें । आनंद करूं दिंडीपुढें ॥ २ ॥ काळि पापाची हे मूर्ति । नामखड्ग घेऊं हातीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाऊं । वळें दमामे ही लावूं ॥ ४ ॥

॥ ७४२ ॥

टाळघोळ सुख नामाचा गजर । घोषें जयजयकार ब्रह्मानंदु ॥ १ ॥
गरुडटके दिंडी पताकांचे भार । आनंद अपार ब्रह्मादिकां ॥ २ ॥
आनंदें वैष्णव जाती लोटांगणीं । एक एकाहूनि भद्रजाति ॥ ३ ॥
तेणें सुखें सुटे पाषाणा पाझर । नष्ट खळ नर शुद्ध होती ॥ ४ ॥
तुका ह्मणे सोपें वैकुंठासी जातां । रामकृष्ण कथा हेचि वाट ॥ ५ ॥

॥ ७४३ ॥

त्या हरिदासांची भेटी घेतां । नरका उभयतांसी जातां ॥१॥ मातेपरीस थोरी कथा । भाड घेतां न लाजे ॥२॥ देतां घेतां नरकवासी । उभयतांसी रवरव ॥३॥ तुका ह्मणे नरकगांवा । जाती हांवा घरोनि ॥४॥

निजपदीं निजविलें ॥ ३ ॥ दाटली वो रसें । त्रिभुवन ब्रह्मरसें ॥ ४ ॥ विष्णु जोडी कर । माथां रज वंदी हर ॥ ५ ॥ तुका ह्मणे बळ । तोरडों हा कळिकाळ ॥ ६ ॥

॥ ७५४ ॥

भाग्यालागीं लांचावले । देवधर्म ते राहिले ॥ १ ॥ कथे जातां आळसे मन । प्रपंचाचें मोटें ज्ञान ॥ २ ॥ अखंडप्रीती जाया । नेणे भजनाच्या ठाया ॥ ३ ॥ कथाकीर्तन धनाचें । सर्वकाळ विषयीं नाचे ॥ ४ ॥ तुका ह्मणे पंढरिराया । ऐसे जन्मविले वांयां ॥ ५ ॥

॥ ७५५ ॥

भावभक्तिवादें करावें कीर्तन । आशाबद्ध मन करूं नये ॥ १ ॥
अन्न पाणी धन द्रव्य नारायण । विठ्ठला वांचून बोलूं नये ॥ २ ॥
सप्रेम करावें देवाचें कीर्तन । भय या सोडून शरीराचें ॥ ३ ॥
तरी मग जोडे विठ्ठलनिधान । केलिया कीर्तन सिद्धि पावे ॥ ४ ॥
देव जोडिलिया तया काय उणें । तुका ह्मणे मन धीट करा ॥ ५ ॥

॥ ७५६ ॥

भूमीवरी कोण ऐसा । गांजूं शके हरिच्या दासा ॥ १ ॥ सुखें नाचा हा कीर्तनीं । जयजयकारें गर्जा वाणी ॥२॥ काळा सुटे पळ । जाती दुरितें सकळ ॥३॥ तुका ह्मणे चित्तीं । साच माना हे निश्चिती ॥४॥

॥ ७५७ ॥

मुंगिचिया घरा कोण जाय मूळ । देखोनियां गूळ धांव घाली ॥ १ ॥
याचकाविण काय खोळंबला दाता । तोचि धांवे हिता आपुलिया ॥२॥
उदक अन्न काये ह्मणे मज खा ये । भुकेला तो जाये चोजवीत ॥ ३ ॥
व्याधी पिडिला धांवे वैद्याचिया घरा । दुःखाच्या परिहारा आपुलिया॥४॥
तुका ह्मणे जया आपुलें स्वहित । करणें तोचि प्रीत धरी कथे ॥ ५ ॥

॥ ७५८ ॥

यम सांगे दूतां ते । तुह्मां नाहीं वेथें सत्ता । जेथें होय कथा । सदा घोष नामाचा ॥ १ ॥ नका जाऊं तया गांवा । नामधारकाच्या शिवा । सुदर्शन

यावा। भरटी फिरे भोंवती ॥ २ ॥ चक्र गदा घेउनी हरि। उभा असे त्यांचे द्वारीं। लक्ष्मी कामारी। रिद्धिसिद्धी साहित ॥ ३ ॥ ते वळिया-शिरोमणी। हरिभक्त ये मेदिनी। तुका ह्मणे कानीं। यम सांगे दूतांचे॥४॥

॥ ७५९ ॥

या रे नाचों अवघेजण। भावें प्रेमें परिपूर्ण ॥ १ ॥ गाऊं पंढरीचा राणा। क्षेम देउनि संतजना ॥ २ ॥ सुख फुकासाठीं। साधे हरि-नाम बोभाटीं ॥ ३ ॥ प्रेम वाटितो उदार। देतां नाहीं सानाथोर ॥ ४ ॥ पापें पळालीं बापुडीं। काळ झाला देशधडी ॥ ५ ॥ तुका ह्मणे धन्य काळ। आजि प्रेमाचा सुकाळ ॥ ६ ॥

॥ ७६० ॥

लटिकें तें ज्ञान लटिकें तें ध्यान। जरि हरिकीर्त्तन प्रिय नाहीं ॥ १ ॥
लटिकेंचि दंभ घातला दुकान। चाळविलें जन पोटासाटीं ॥ २ ॥
लटिकेंचि केलें वेदपारायण। जरि नाहीं स्फुंदन प्रेम कथे ॥ ३ ॥
लटिकें तें तप लटिका तो जप। अळस निद्रा झोप कथाकाळीं ॥ ४ ॥
नाम नावडे तो करील बाहेरी। नाहीं त्याची खरी चित्तशुद्धि ॥ ५ ॥
तुका ह्मणे ऐसीं गर्जती पुराणें। शिष्टांचीं वचनें मागिलाही ॥ ६ ॥

॥ ७६१ ॥

लावूनियां पुष्टी पोर। आणि करकर कथेमाजी ॥ १ ॥ पडा पायां करा विनंती। दवडा हातीं धरोनियां ॥ २ ॥ कुर्वाळूनि बैसे मोहें। प्रेम कां हें नासीतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाटे चित्त। करा फजित ह्मणऊनि ॥ ४ ॥

॥ ७६२ ॥

विठ्ठल मुक्तिदाता। नव्हे मरो हें बोलता ॥१॥ मज न साहावें कानीं। विष उत्तर लागे मनीं ॥ २ ॥ हरिकथेतें धिकारी। शत्रु माझा तो वैरी ॥३॥ सुना काळतोंडा। जो या देवा ह्मणे धोंडा ॥ ४ ॥ अहं ह्मणे ब्रह्म। नेणे भक्तीचें तें वर्म ॥ ५ ॥ तुका ह्मणे क्षण। नको तयाचें दर्षण ॥ ६ ॥

॥ ७६३ ॥

सातांदिवसांचा जरी जाला उपवासी। तरी कीर्त्तनासी टाकूं नये ॥ १ ॥

# पंढरीचा महिमा.

॥ ७७२ ॥

नको आतां पुसों कांहीं । लवलाहीं उसंती ॥ १ ॥ जाय वेगीं पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥ २ ॥ वचनाचा न करीं गोवा । रिघें देवासी शरण ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृपावंता । बहु चिंता दीनाची ॥ ४ ॥

॥ ७७३ ॥

करा करा लागपाट । धरा पंढरीची वाट । जंव नाहीं चपेट । घात पडिला काळाचा ॥१॥ दुजा ऐसा नाहीं कोणी । जो या काढी भयांतूनि । करा ह्मणऊनि । हा विचार ठायींचा ॥२॥ होती गात्रें बेंबळीं । दिवस अस्तमाना काळीं । हातपायटाळीं । जों मोकळीं आहेती ॥३॥ कां रे घेतलासी सोसें । तुज वाटताहे कैसें । तुका ह्मणे ऐसें । पुढें कैं लाहासी ॥४॥

॥ ७७४ ॥

जाय जाय तूं पंढरी । होय होय वारकरी ॥१॥ सांडोनियां वाळवंट । काय इच्छिसी वैकुंठ ॥२॥ खांद्या पताकांचे भार । तुळसीमाळा आणि अबीर ॥३॥ साधुसंतांच्या दाटणी । तुका जाय लोटांगणीं ॥४॥

॥ ७७५ ॥

जा रे तुह्मी पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥ १ ॥ गुण दोष नाणी मना । करी आपणासारिखें ॥ २ ॥ उभारोनि उभा कर । भवपार उतराया ॥ ३ ॥ तुका ह्मणे तांतड मोठी । जाली भेटी उदंड ॥ ४ ॥

॥ ७७६ ॥

पंढरीसी जा रे आलेनो संसारा । दीनाचा सोयरा पांडुरंग ॥ १ ॥ वाट पाहे उभा भेटीची आवडी । कृपाळू तातडी उतावीळ ॥ २ ॥ मागील परिहार पुढें नोव्हे सीण । जालिया दर्षण एकवेळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेदी आणिकांचे हातीं । बैसला तो चित्तीं निवडेना ॥ ४ ॥

॥ ७७७ ॥

वेढा वेढा रे पंढरी । मोर्चे लावा भीमातिरीं ॥ १ ॥ चला चला संत

जन । करा देवासी भांडण ॥ २ ॥ लुटालुटी पंढरपुर । धरा रखुमा-
ईचा वर ॥ ३ ॥ तुका ह्मणे चला । घाव निशाणी घातला ॥ ४ ॥

॥ ७७८ ॥

होय वारकरी । पाहें पाहें रे पंढरी ॥ १ ॥ काय करावीं साधनें।
फळ अवघेंचि तेणें ॥ २ ॥ अभिमान नुरे । कोड अवघेंचि पुरे ॥३॥
तुका ह्मणे डोळां । विटे बैसला सांवळा ॥ ४ ॥

॥ ७७९ ॥

पुण्य उभें राहो आतां । संतांचें या कारणें ॥ १ ॥ पंढरीचे लागा
वाटे । सखा भेटे विठ्ठल ॥ २ ॥ संकल्प हे यावे फळा । कळवळा
बहुतांचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे होऊनि क्षमा । पुरुषोत्तमा अपराध ॥ ४ ॥

॥ ७८० ॥

पंढरपुरींचें दैवत भजावें । काया वाचा जावें शरण त्या ॥ १ ॥ मनीं
ध्यान करी अहंता धरूनी । तया चक्रपाणी दूर ठेला ॥ २ ॥ मान अभि-
मान सांडुनियां यावें । अवघ्यां नीच व्हावें तरी प्राप्ति ॥ ३ ॥ तुका ह्मणे
हेंचि कोणासी मागावें । सादर होऊनि भावें भजें देवा ॥ ४ ॥

॥ ७८१ ॥

बहुतां जन्मां अंतीं जन्मलासी नरा । देव तूं सोइरा करीं आतां ॥१॥
करीं आतां त्वरा स्वहिताचा स्वार्थ । अनर्थाचा अर्थ सांडीं आतां ॥२॥
सांडीं आतां कुडी कल्पनेचि वाट । मार्ग आहे नीट पंढरीचा ॥३॥
पंढरीस जावें सर्व सुख घ्यावें । रूप तें पाहावें विटेवरी ॥४॥
विटेवरी नीट आनंदाचा कंद । तुका नाचे छंद नामघोषें ॥ ५ ॥

॥ ७८२ ॥

पंढरीस जाऊं ह्मणती । यम थोर चिंता करिती ॥१॥ या रे नाचों ब्रह्मा-
नंदें । विठ्ठलनामाचिया छंदें ॥२॥ धरिली पंढरीची वाट । पापें रिगालीं
कपाट ॥३॥ केलें भीमरेचें स्नान । यमपुरी पडिलें खान ॥४॥ दुरोनि देखिली
पंढरी । पापें गेलीं दुरच्यादुरी ॥५॥ दुरोनि देखिलें राउळ । हरुषें नाचती
गोपाळ ॥६॥ तुका ह्मणे नाहीं जाणें । अखंड पंढरिये राहाणें ॥७॥

॥ ७८३ ॥

नाहीं रिकामीक परी वाहे मनीं । तया चक्रपाणि साह्य होय ॥ १ ॥
उद्वेग जीवासी पंढरीचें ध्यान । तया नारायण साह्य करी ॥ २ ॥
शरीरासी बळ नाहीं स्वता भाव । तया पंढरिराव साह्य करी ॥ ३ ॥
असो नसो बळ राहे पराधीन । तरी अनुमान करूं नका ॥ ४ ॥
तुका ह्मणे येणें करोनी चिंतन । तया नारायण जवळीक ॥ ५ ॥

॥ ७८४ ॥

नव्हे आराणूक परि मनीं वाहे । होईल त्या साहे पांडुरंग ॥ १ ॥
पंढरीसि जावें उद्वेग मानसीं । धरिल्या पावसी संदेह नाहीं ॥ २ ॥
नसो बळ देह असो पराधीन । परि हें चिंतन टाकों नको ॥ ३ ॥
तुका ह्मणे देह पडो या चिंतनें । पुढें लागे येणें याजसाटीं ॥ ४ ॥

॥ ७८५ ॥

जाती पंढरीस । ह्मणे जाईन तयांस ॥ १ ॥ तया आहे संवसार ।
ऐसें बोले तो माहार ॥ २ ॥ असो नसो भाव । जो हा देखे पंढरि-
राव ॥ ३ ॥ चंद्रभागे न्हाती । तुका ह्मणे भलते याती ॥ ४ ॥

॥ ७८६ ॥

चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवरा पाहूं ॥ १ ॥ डोळे निवतील
कान । मना तेथें समाधान ॥ २ ॥ संतां महंतां होतील भेटी। आनंदें
नाचों वाळवंटीं ॥ ३ ॥ तें तीर्थांचें माहेर । सर्वसुखाचें भांडार ॥ ४ ॥
जन्म नाहीं रे आणीक । तुका ह्मणे माझी भाक ॥ ५ ॥

॥ ७८७ ॥

आमुची मिरास पंढरी। आमुचें घर भीमातिरीं ॥१॥ पांडुरंग आमुचा
पिता। रखुमाबाई आमुची माता ॥२॥ भाऊ पुंडलीक मुनि। चंद्रभागा आमु-
ची बहिणी ॥३॥ तुका जुनाट मिराशी। ठाव दिला पायांपाशीं ॥४॥

॥ ७८८ ॥

आतां जावें पंढरीसी। दंडवत विठोबासी ॥१॥ जेथें चंद्रभागातिरीं।

आह्मी नाचों पंढरपुरीं ॥२॥ जेथें संतांची दाटणी । त्याचें घेऊं पाय-
वणी ॥३॥ तुका ह्मणे आह्मी बळी। जीव दिधला पायां तळीं ॥४॥

॥ ७८९ ॥

पंढरीची वारी आहे माझे घरीं । आणीक न करीं तीर्थव्रत ॥ १ ॥
व्रत एकादशी करीन उपवासी । गाइन अहर्निशीं मुखीं नाम ॥ २ ॥
नाम विठोबाचें घेईन मी वाचे । बीज कल्पांतींचें तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ७९० ॥

पावलों पंढरी वैकुंठभुवन । धन्य आजि दिन सोनियाचा ॥ १ ॥
पावलों पंढरी आनंदगजरें । वाजतील तुरे शंख भेरी ॥ २ ॥
पावलों पंढरी क्षेमआलिंगनीं । संत या सज्जनीं निवविलों ॥ ३ ॥
पावलों पंढरी पार नाहीं सुखा । भेटला हा सखा मायबाप ॥ ४ ॥
पावलों पंढरी येरझार खुंटली । माउली बोळली प्रेमपान्हा ॥ ५ ॥
पावलों पंढरी आपुलें माहेर । नाहीं संवसार तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ७९१ ॥

धन्य जालों हो संसारीं । आह्मीं देखिली पंढरी ॥ १ ॥ चंद्रभागे
करूं स्नान । पुंडलिकाचें दर्शन ॥ २ ॥ करूं क्षेत्रप्रदक्षिणा । भेटूं संत
या सज्जनां ॥ ३ ॥ उभे राहूं गरुडपारीं । डोळे भरुनी पाहों हरी ॥४॥
तुका ह्मणे वाळवंटीं । महालाभ फुकासाटीं ॥ ५ ॥

॥ ७९२ ॥

आह्मी ज्याचे दास । त्याचा पंढरिये वास ॥ १ ॥ तो हा देवांचाही
देव । काय कळिकाळाचा भेव ॥ २ ॥ वेद जया गाती । श्रुति ह्मणती
नेति नेति ॥ ३ ॥ तुका ह्मणे निज । रूपडें हें तत्त्वबीज ॥ ४ ॥

॥ ७९३ ॥

आह्मां सुकाळ सुखाचा । जवळी हाट पंढरीचा । सादाविती वाचा । राम-
नामें वैष्णव ॥ १ ॥ घ्या रे आपुलाल्या परी । मका ठेवूं कांहीं उरी ।
ओसरतां भरी । तोंडवरी अंबर ॥ २ ॥ वाहे बंदर द्वारका । खेप आली
पुंडलिका । उभेचि विकिलें एका । सनकादिकां सांपडलें ॥३॥ धन्य धन्य

हे भूमंडळी। प्रगटली नामावळी। घेतां जी दुबळी। तीं आगळीं सदैव॥४॥ माप आपुलेनि हातें। कोणी नाहीं निवारितें। प्रेम करूनि चित्तें। ध्यावें हितें आपुलिया॥ ५॥ नाहीं वांटितां सरलें। आहे तैसेंचि भरलें। तुका ह्मणे गेलें। वांयांविण न घेतां॥ ६॥

॥ ७२४॥

जातां पंढरीच्या मार्गी। काय वर्णू सुखा मग॥ १॥ घडे लाभ लक्ष-कोटि। परब्रह्मीं होइल भेटी॥२॥ नाम गर्जत येती संत। त्यांच्या दर्शनें होइजे मुक्त॥ ३॥ जो अलक्ष्य ब्रह्मादिकां। आला संनिध ह्मणे तुका॥४॥

॥ ७२५॥

सुखरूप ऐसें कोण दुजें सांगा। माझ्या पांडुरंगा सारिकें तें॥ १॥
नलगे हिंडणें मुंडणें तें कांहीं। साधनाची नाहीं आटाआटी॥ २॥
चंद्रभागे स्नान विधि तो हरिकथा। समाधान चित्ता सर्वकाळ॥ ३॥
तुका ह्मणे काला वैकुंठीं दुर्लभ। विशेष तो लाभ संतसंग॥ ४॥

॥ ७२६॥

मूर्तिमंत देव नांदतो पंढरी। येर दिगांतरीं प्रतिमारूप॥ १॥
जाउनियां वना करावें कीर्तन। मानुनी पाषाण विठ्ठलरूप॥ २॥
तुका ह्मणे मुख्य पाहिजे हा भाव। भावापासीं देव शीघ्र उभा॥ ३॥

॥ ७२७॥

पंढरिये माझें माहेर साजणी। ओवियें कांडणीं गाऊं गीत॥ १॥
राही रखुमाई सत्यभामा माता। पांडुरंग पिता माहियेर॥ २॥
उद्धव अक्रूर व्यास अंबऋषि। भाई नारदासी गोरवीन॥ ३॥
गरुड बंधु लडिवाळ पुंडलीक। यांचें कवतुक वाटे मज॥ ४॥
मज बहु गोत संत आणि महंत। नित्य आठवीत ओवियेसी॥ ५॥
निवृत्ति ज्ञानदेव सोपान चांगया। जिवलगा माझिया नामदेवा॥ ६॥
नागोजन मित्रा नरहरि सोनारा। रोहिदास कबिरा सोइरिया॥ ७॥
परसो भागवता सुरदास सांवता। गाईन नेणतां सकळांसी॥ ८॥
चोखामेळा संत जिवाचे सोईरे। न पडे विसर यांचा घडी॥ ९॥

जीवींच्या जीवना एका जनार्दना । पाटका कान्हया मिराबाई ॥ १० ॥ आणीकही संत महानुभाव मुनि । सकळां चरणीं जीव माझा ॥ ११ ॥ आनंदें ओंविया गाईन मी त्यांसी । जाती पंढरीसी वारकरी ॥ १२ ॥ तुका ह्मणे माझा बळिया मायबाप । हर्षे नांदों सये घराचारी ॥ १३ ॥

॥ ७९८ ॥

कोण येथें रिता गेला । जो जो आला या ठाया ॥ १ ॥ तातडी ते काय आतां । ज्याची चिंता तयासी ॥ २ ॥ नांवासाठीं नेघें भार । न लगे फार विलपत्ति ॥ ३ ॥ तुका ह्मणे न लगे जावें । पोंठें देवें सुचने ॥ ४ ॥

॥ ७९९ ॥

सिंचन करितां मूळ । वृक्ष ओलावे सकळ ॥ १ ॥ नको पृथकाचे भरी । पडों एक मूळ धरीं ॥ २ ॥ पाणचोऱ्याचें दार । वरिल दाटावें तें थोर ॥ ३ ॥ वश जाला राजा । मग आपुल्या त्या प्रजा ॥ ४ ॥ एक चिंतामणी । फिटे सर्व सुखधणी ॥ ५ ॥ तुका ह्मणे धांवा । आहे पंढरी विसावा ॥ ६ ॥

॥ ८०० ॥

वैकुंठींचें सुख पंढरिये आलें । अवघें पुंडलिकें सांठविलें ॥ १ ॥ आतां धांवा माझे बाप । जिव्हा घेउनियां माप ॥ २ ॥ करणें एक खेप । मग न लगे हिंडावें ॥ ३ ॥ लिपय गुंडूनि पसारा । धांवे घ्या रे पंढरपुरा ॥ ४ ॥ आयुष्य वेंचे जंव आहे । गोंचि कांसोटियां जायें ॥ ५ ॥ आळस न करीं या लाभाचा । तुका विनवी कुणबियाचा ॥ ६ ॥

॥ ८०१ ॥

पुराणींचा इतिहास । गोड रस सेविला ॥ १ ॥ नव्हती हे आहाच बोल । मोकळें फोल कवित्व ॥ २ ॥ धावें घ्या रे धावें घ्या रे । एकदा जा रे पंढरिये ॥ ३ ॥

१ सुख पंढरीसी आलें । पुंडलिकें सांठविलें. २ घ्या रे घ्या रे. ३ घेउनि खरें माप. ४ करणें न लगे. ५ गुंडोनी ठेवा. ६ मग धांव. ७ जंव आहे आयुष्याचा लेश । तंव करा पंढरीचा वास ॥

भाग्यें आलेति मनुष्यदेहा। तो हा पाहा विठ्ठल॥ ४ ॥ पापपुण्या करील झाडा । आइल पीडा जन्माची॥ ५ ॥ घ्यावी हातीं टाळ दिंडी। गावें तोंडीं गुणवाद ॥६॥ तुका ह्मणे घटापटा। न लगे वाटा शोधाव्या ॥७॥

॥ ८०२ ॥

धरितां ये पंढरीची वाट। नाहीं संकट मुक्तीचें ॥ १ ॥ वंदूं येती देव पदें। त्या आनंदें उत्साहें ॥ २ ॥ नृत्यछंदें उडती रज। जे सहज चालतां॥ ३ ॥ तुका ह्मणे गरुड टकें। वैष्णव निके संभ्रम ॥ ४ ॥

॥ ८०३ ॥

तिळ एक अर्ध गाई। सीतबुंद पावे काई। तया सुखा नाहीं। अंतपार पाहतां ॥१॥ ह्मणउनी करा लाहो। नका मागें पुढें पाहों। अवघ्यामध्यें आहों। अवघे सावचित्त तों॥ २ ॥ तीर्थे न येती तुळणी। आजि या सुखाची धणी। जे कासी गयेहुनी। जीं आगळीं असती ॥ ३ ॥ येथें धरी लाज। वर्णो अभिमान काज। नाडला सहज। तुका ह्मणे तो येथें ॥४॥

॥ ८०४ ॥

तारूं लागलें बंदरीं। चंद्रभागेचिये तिरीं॥ १ ॥ लुटा लुटा संतजन। अमुप हें रासी धन ॥ २ ॥ जाला हरिनामाचा तारा। सीड लागलें फरारा ॥३॥ तुका जवळी हमाल। भार चालवी विठ्ठल ॥ ४ ॥

॥ ८०५ ॥

आषाढी निकट। आणी कार्तिकीचा हाट ॥१॥ पुरे दोन्हीच बाजार। न लगे आणीक व्यापार ॥ २ ॥ तेंचि घ्यावें तेंचि घ्यावें। कैवल्याच्या रासी भावें ॥ ३ ॥ कांहीं कोणा नेणे। विठो वांचूनि तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ८०६ ॥

न सरे लुटितां मागें बहुतां जनीं। जुनाट हे खाणी उघडिली ॥ १ ॥
सिद्ध महामुनि साधक संपन्न। तींहीं हें जतन केलें होतें ॥ २ ॥
पाळायाच्या गुणें पडिलें ठाउकें। जगा पुंडलिकें दाखविलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तेथें होतों मी दुबळा। आलें या कपाळा थोडें बहु ॥ ४ ॥

॥ ८०७

जया दोषां परिहार । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र । ते हरती अपार । पंढरपुर देखिलिया ॥ १ ॥ धन्य धन्य भीमातीर । चंद्रभागा-सरोवर । पद्मतीर्थी विठ्ठल वीर । क्रीडास्थळ वेणुनादीं ॥ २ ॥ सकळ तीर्थांचें माहेर । भूवैकुंठ निर्विकार । होतो नामाचा गजर । असुरकाळ कांपती ॥ ३ ॥ नाहीं उपमा द्यावया । सम तुल्य आणिका ठाया । धन्य भाग्य जयां । जे पंढरपुर देखती ॥ ४ ॥ उपजोनी संसारीं । एक वेळ पाहें पंढरी । महा दोषां कैंची उरी । देवभक्त देखिलिया ॥ ५ ॥ ऐसी विष्णूची नगरी । चतुर्भुज नरनारी । सुदर्शन घरटी करी । रीग न पुरे कळिकाळा ॥ ६ ॥ तें सुख वर्णावया गति । एवढी कैंची मज मति । जे पंढरपुरा जाती । ते पावती वैकुंठ ॥ ७ ॥ तुका ह्मणे या शब्दाचा । जया विश्वास नाहीं साचा । अधम जन्मांतरींचा । तया पंढरी नावडे ॥ ८ ॥

॥ ८०८ ॥

आवडे पंढरी भीमा पांडुरंग । चंद्रभागा लिंग पुंडलीक ॥ १ ॥ कामधेनु कल्पतरु चिंतामणी । आवडीची धणी पुरवीती ॥ २ ॥ तुका ह्मणे जीवा थोर जालें सुख । नाठवे हे भूक तान कांहीं ॥ ३ ॥

॥ ८०९ ॥

पंढरीचा वारकरी । खेपा वैकुंठ बंदरीं ॥ १ ॥ तया नाहीं आणखी पेणें । सदा वैकुंठीं राहाणें ॥ २ ॥ आला गेला केल्या यात्रा । उद्धरिलें कुळा सर्वत्रा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं । यासि संदेह कल्पांतींही ॥ ४ ॥

॥ ८१० ॥

पंढरीची वारी जयाचिये घरीं । पायधुळी शिरीं वंदिन त्यांची ॥ १ ॥ दासाचा मी दास पोसणा डोंगर । आतां बहु फार काय बोलों ॥२॥ जातीचें मी हीन न कळे भजन । ह्मणोनि संतचरण इच्छीतसें ॥३॥ तुका ह्मणे मज ह्मणावें आपुलें । बहुतां तारिलें संतजनीं ॥४॥

॥ ८११ ॥

पंढरीचे वारकरी। ते अधिकारी मोक्षाचे ॥ १ ॥ पुंडलिका दिला वर। करुणाकरें विठ्ठलें ॥ २ ॥ मूढ पापी जैसे तैसे। उतरी कासे लावूनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे खरें जालें। एका बोलें संताच्या ॥ ४ ॥

॥ ८१२ ॥

आलें भरा केणें। येरझार चुके जेणें ॥ १ ॥ उभें केलें विटेवरी। पेंठ इनाम पंढरी ॥ २ ॥ वाहती मारग। अवघें मोहोरलें जग ॥ ३ ॥ तुका ह्मणे माप। खरें आणा मांझें बाप ॥ ४ ॥

॥ ८१३ ॥

उठाउठीं अभिमान। जाय ऐसें स्थळ कोण ॥ १ ॥ तें या पंढरीस घडे। खळां पाझर रोकडे ॥ २ ॥ नेत्रीं अश्रुचिया धारा। कोठें रोमांच शरीरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे काला। कोठें अभेद देखिला ॥ ४ ॥

॥ ८१४ ॥

अवघें जेणें पाप नासे। तें हें असे पंढरीसी ॥ १ ॥ गात जागा गात जागा। प्रेम मागा विठ्ठला ॥ २ ॥ अवघी सुखाचीच राशी। पुंडलिकाशीं वोळली हे ॥ ३ ॥ तुका ह्मणे जवळी आलें। उभें ठेलें समचरणीं ॥ ४ ॥

॥ ८१५ ॥

अवघींच तीर्थे घडलीं एकवेळा। चंद्रभागा डोळां देखिलिया ॥ १ ॥ अवघींच पापें गेलीं दिगांतरीं। वैकुंठ पंढरी देखिलिया ॥ २ ॥ अवघिया संतां एकवेळा भेटी। पुंडलीक दृष्टी देखिलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे जन्मा आल्याचें सार्थक। विठ्ठलचि एक देखिलिया ॥ ४ ॥

॥ ८१६ ॥

उदार चक्रवर्ती। वैकुंठींचा भूपति। पुंडलिकाचिया प्रीती। विटेवरी राहिला ॥ १ ॥ सर्वसिद्धीचा दातार। सवें आणिला परिवार। भक्ता अभयंकर। घ्या घ्या ऐसें ह्मणतसे ॥ २ ॥ जेणें हें विश्व निर्मिलें। महर्षी देवा संस्थापिलें। एकवीस स्वर्गांतें धरिलें। सत्तामात्रें आपुलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृपावंत। इच्छिले पुरवी अर्थ। रिद्धिसिद्धिमुक्ती देत। शेखीं संग आपुला ॥ ४ ॥

॥ ८१७ ॥

नातुडे जो कवणे परी । उभा केला विटेवरी ॥ १ ॥ भला भला पुंडलिका । मानलासी जनलोकां ॥ २ ॥ कोण्या काळें सुखा । ऐसा कोण पावता ॥ ३ ॥ अवघा आणिला परिवार । गोपी गोपाळांचा भार ॥ ४ ॥ तुका ह्मणे धन्य जालें । भूमी वैकुंठ आणिलें ॥ ५ ॥

॥ ८१८ ॥

धन्य पुंडलिका बहु बरें केलें । निधान आणिलें पंढरिये ॥ १ ॥ न करीं आळस आलिया संसारीं । पाहें पा पंढरी भूवैकुंठ ॥ २ ॥ न पवीजे केल्या तपांचिया रासी । तें जनलोकांसी दाखविलें ॥ ३ ॥ सर्वोत्तम तीर्थ क्षेत्र आणि देव । शास्त्रांनीं हा भाव निवाडिला ॥ ४ ॥ विष्णुपद गया रामधाम काशी । अवघीं पायांपाशीं विठोबाच्या ॥ ५ ॥ तुका ह्मणे मोक्ष देखिल्या कळस । तात्काळ या नास अहंकाराचा ॥ ६ ॥

॥ ८१९ ॥

कां रे पुंड्या मातलासी । उभें केलें विठ्ठलासी ॥ १ ॥ ऐसा कैसा रे तूं धीट । मागें भिरकाविली वीट ॥ २ ॥ युगें जालीं अठ्ठावीस । अजुनी न ह्मणसी बैस ॥ ३ ॥ भाव देखोनि निकट । देवें सोडिलें वैकुंठ ॥ ४ ॥ तुका ह्मणे पुंडलिका । तूंचि बळिया एक निका ॥ ५ ॥

॥ ८२० ॥

कां रे पुंड्या मातलासी । उभें केलें विठ्ठलासी ॥ १ ॥ वस्ति क्षीरसागरवासीं । आला उभा पंढरीसी ॥ २ ॥ भक्ति देखोनी निकट । देवें सोडिलें वैकुंठ ॥ ३ ॥ तुका ह्मणे बळी । तूंचि एक भूमंडळीं ॥ ४ ॥

॥ ८२१ ॥

पुंडलीक भक्तराज । तेणें साधियलें काज । वैकुंठींचें निज । परब्रह्म आणिलें ॥ १ ॥ पांडुरंग बाळमूर्ति । गाईगोपाळांसंगती । येऊनियां प्रीति । उभें समचि राहिलें ॥ २ ॥ एका आगळें अक्षरें । भूवैकुंठचि दुसरें । ह्मणविती येरें । परि तीं ऐसीं नव्हती ॥ ३ ॥ पाप पंचक्रोशीमधीं । येऊं न सकेचि कधीं । कैंची तेथें विधि-। निषेधाची

वसति ॥ ४ ॥ पुराणें वदती ऐसें । चतुर्भुज तीं मानसें । सुदर्शना-
वरी वसे । । रीग न घडे कल्पांतीं ॥ ५ ॥ महाक्षेत्र हें पंढरी ।
अनुपम्य इची थोरी । धन्य धन्य वारकरी । तुका ह्मणे तेथींचे ॥ ६ ॥

॥ ८२२ ॥

भूत नावरे कोणासी । पुंडलीकें खिळिलें त्यासी ॥ १ ॥ समचरण
असे विटे । कटिकर उभें नीट ॥ २ ॥ वाळुवंटीं नाचती संत ॥ प्रेमा-
मृतें डुल्लत ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुंडलिका । भक्तिबळें तूंचि निका ॥ ४ ॥

॥ ८२३ ॥

वैकुंठा जावया तपाचे सायास । करणें जीवनास न लगे कांहीं ॥ १ ॥
तया पुंडलिकें केला उपकार । फेडावया भार पृथीवीचा ॥ २ ॥
तुका ह्मणे सोपी केली पायवाट । पंढरी वैकुंठ भूमीवरी ॥ ३ ॥

॥ ८२४ ॥

वैकुंठींचा देव आणिला भूतळा । धन्य तो अगळा पुंडलकि ॥ १ ॥
धारिष्ट धैर्याचा वरिष्ठ भक्तांचा । पवित्र पुण्याचा एकनिष्ठ ॥ २ ॥
पितृसेवापुण्यें लाधला निधान । ब्रह्म सनातन अंगसंगें ॥ ३ ॥
अंगसंगें रंगें क्रीडा करी जाणा । ज्या घरीं पाहुणा वैकुंठींचा ॥ ४ ॥
धन्य त्याची शक्ति भक्तीची हे ख्याति । तुका ह्मणे मुक्ति पायीं लोळे ॥ ५ ॥

॥ ८२५ ॥

पंढरीचें बा भूत मोठें । आल्या गेल्या झडपी वाटे ॥ १ ॥ तेथें जाऊं
नका कोणी । गेले नाहीं आले परतोनि ॥ २ ॥ तुका पंढरीसी गेला ।
पुन्हां जन्मा नाहीं आला ॥ ३ ॥

॥ ८२६ ॥

जाली झडपणी खडतर देवता । संचरली आतां निघों नये ॥ १ ॥
मज उपचार ह्मणी आतां करा । न साहे दुसरा भार कांहीं ॥ २ ॥
नेऊनियां घाला चंद्रभागे तिरीं । जीवा नाहीं उरी कांहीं आतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे कळों आलें वर्तमान । माझें तों वचन आच्छाइलें ॥ ४ ॥

॥ ८२७ ॥

मैंद आला पंढरीस । हातीं घेऊनि प्रेमपाश ॥१॥ पुढें नाडियलें जग। नेतो लागों नेदी माग ॥२॥ उभारोनि बाहे । दृष्टादृष्टी वेधीताहे ॥ ३ ॥ वैकुंठींहुनि पेणें । केलें पंढरीकारणें ॥ ४ ॥ पुंडलिकें थारा । देउनि आणिलें या चोरा ॥ ५ ॥ तुका ह्मणे चला । तुह्मी आह्मी धरूं त्याला ॥ ६ ॥

॥ ८२८ ॥

पंढरीचा महिमा । देतां आणीक उपमा ॥ १ ॥ ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभी भेटे ॥ २ ॥ आहेति सकळ । तीर्थें काळें देती फळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे पेंठ । भूमिवरी हे वैकुंठ ॥ ४ ॥

॥ ८२९ ॥

पंढरी पंढरी । ह्मणतां पापाची बोहरी ॥ १ ॥ धन्य धन्य जगीं ठाव । होतो नामाचा उत्साव ॥ २ ॥ रिद्धिसिद्धी लोटांगणीं । प्रेमसुखाचिया खाणी ॥ ३ ॥ आधिक अक्षरानें एका । भूवैकुंठ ह्मणे तुका ॥ ४ ॥

॥ ८३० ॥

पंढरीसी जाय । तो विसरे बापमाय ॥ १ ॥ अवघा होय पांडुरंग । राहे धरूनियां अंग ॥ २ ॥ न लगे धन मान । देहभावें उदासीन ॥ ३ ॥ तुका ह्मणे मळ । नासी तात्काळ तें स्थळ ॥ ४ ॥

॥ ८३१ ॥

पंढरीस दुःख न मिळे ओखदा । प्रेमसुख सदा सर्वकाळ ॥ १ ॥
पुंडलिकें हाट भरियेली पेंठ । अवघें वैकुंठ आणियेलें ॥ २ ॥
उदमासी तुटी नाहीं कोणा हानि । घेऊनियां धणी लाभ घेती ॥ ३ ॥
पुरलें देशासी भरलें सिगेसी । अवघी पंचक्रोशी दुमदुमीत ॥ ४ ॥
तुका ह्मणे संतां लागलीसे धणी । बैसली राहोनि पंढरीस ॥ ५ ॥

॥ ८३२ ॥

पंढरीचा वास धन्य तेचि प्राणी । अमृताची वाणी दिव्य देह ॥ १ ॥
मूढ मतिहीन दुष्ट अविचारी । ते होती पंढरीं दयारूप ॥ २ ॥

शांति क्षमा अंगीं विरक्ति सकळ । नैराश्य निर्मळ नारी नर ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं वर्ण अभिमान । अवघे जीवनमुक्त लोक ॥ ४ ॥

॥ ८३३ ॥

भीमातीरवासी । तेथें निश्चयेंसी काशी ॥ १ ॥ मुख्य मुक्तीचें माहेर । ऐसें जाणा पंढरपुर ॥ २ ॥ घडे भींवरेशीं स्नान । त्यासी पुन्हा नाहीं जन्म ॥ ३ ॥ भाव धरोनी नेटका । मोक्ष जवळी ह्मणे तुका ॥ ४ ॥

॥ ८३४ ॥

धन्य ते पंढरी धन्य भीमातीर । आणियेलें सार पुंडलिकें ॥ १ ॥
धन्य तोही लोक अवघा दैवांचा । सुकाळ प्रेमाचा घरोघरीं ॥ २ ॥
धन्य तेहि भूमी धन्य तरुवर । धन्य सरोवर तीर्थरूप ॥ ३ ॥
धन्य त्या नरनारी मुखीं नाम ध्यान । आनंदें भवन गर्जतसे ॥ ४ ॥
धन्य पशु पक्षी कीटक पाषाण । अवघा नारायण अवतरलासे ॥ ५ ॥
तुका ह्मणे धन्य संसारातें आलीं । हरिरंगीं रंगलीं सर्वभावें ॥ ६ ॥

॥ ८३५ ॥

धन्य तो ग्राम जेथें हरिदास । धन्य तोचि वास भाग्य तया ॥ १ ॥
ब्रह्मज्ञान तेथें असे घरोघरीं । धन्य त्या नरनारी चतुर्भुज ॥ २ ॥
नाहीं पापा रिघ काळाचें जीवन । हरिनामकीर्तन घरोघरीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तींहीं तारिलें सकळां । आपल्या कोटिकुळासहित जीव ॥ ४ ॥

॥ ८३६ ॥

धन्यधन्य ज्यास पंढरीसी वास । धन्य ते जन्मास प्राणी आले ॥ १ ॥
चहु खाणींमध्यें होत कोणी एक । त्रिगुण कीटक पक्षिराज ॥ २ ॥
उत्तम चांडाळ नर नारी बाळ । अवघेचि सकळ चतुर्भुज ॥ ३ ॥
अवघा विठ्ठल तेथें दुजा नाहीं । भरला अंतर्बाहीं सदोदित ॥ ४ ॥
तुका ह्मणे तेथें होउनी राहेन । सांडोवा पाषाण पंढरीचा ॥ ५ ॥

॥ ८३७ ॥

सकळतीर्थांहूनि । पंढरीनाथ मुगुटमणी ॥ १ ॥ धन्यधन्य पंढरी ।

जे मोक्षाची अक्षय पुरी ॥ २ ॥ विश्रांतीचा ठाव । तो हा माझा पंढरीराव ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांगें स्पष्ट । दुजी पंढरी वैकुंठ ॥ ४ ॥

॥ ८३८ ॥

सकळतीर्थांहुनि । पंढरी हे मुगुटमणी ॥ १ ॥ काय सांगों तेथिल शोभा । रमावल्लभ जेथें उभा ॥ २ ॥ न लभे व्रततीर्थदानीं । ते या विठ्ठलदर्शनीं ॥ ३ ॥ साधु संत गाती नाम । सकळ भूतांचा विश्राम ॥ ४ ॥ तुका ह्मणे स्तुती । करूं काय सांगों किती ॥ ५ ॥

॥ ८३९ ॥

सुरवर येती तीर्थे नित्य काळ । पेंठ त्या निर्मळ चंद्रभागा ॥ १ ॥
साक्षभूत नव्हे सांगितली मात । महिमा अत्यद्भुत वर्णवेना ॥ २ ॥
पंचक्रोशीमाजी शीघ नाहीं दोषा । जळती आपैसा अघोर ते ॥ ३ ॥
निर्विषय नर चतुर्भुज नारी । अवघा घरोघरीं ब्रह्मानंदु ॥ ४ ॥
तुका ह्मणे ज्यापें नाहीं पुण्यलेश । जा रे पंढरीस घेई कोटी ॥ ५ ॥

॥ ८४० ॥

वाराणसी गया पाहिली द्वारका । परी नये तुका पंढरीच्या ॥ १ ॥
पंढरीसी नाहीं कोणा अभिमान । पायां पडे जन एकमेका ॥ २ ॥
तुका ह्मणे जाय एकवेळ पंढरी । तयाचिये घरीं यम न ये ॥ ३ ॥

॥ ८४१ ॥

जंववरी नाहीं देखिली पंढरी । तोंवरी वर्णिसी थोरी वैकुंठींची ॥ १ ॥
मोक्षसिद्धि तेथें हिंडे दारोदारीं । होऊनि कामारी दीनरूप ॥ २ ॥
वृंदावन सडे चौक रंगमाळा । अभिनव सोहोळा घरोघरीं ॥ ३ ॥
नामघोष कथापुराणकीर्त्तनीं । ओविया कांडणीं पांडुरंग ॥ ४ ॥
सर्व सुख तेथें असे सर्वकाळ । ब्रह्म तें केवळ नांदतसे ॥ ५ ॥
तुका ह्मणे जें न साधे सायासें । तें हें प्रत्यक्ष दिसे विटेवरी ॥ ६ ॥

॥ ८४२ ॥

तीर्थे केलीं कोटीवरी । नाहीं देखिली पंढरी ॥ १ ॥ जळो त्याचें ज्यालेंपण ।

न देखेचि समचरण ॥ २ ॥ योग याग अनंत केले । नाहीं समचरण देखिले ॥ ३ ॥ तुका ह्मणे विठ्ठलपायीं । अनंत तीर्थें घडलीं पाहीं ॥ ४ ॥

॥ ८४३ ॥

काशीयात्रा पांच द्वारकेच्या तीन । पंढरीची जाण एक यात्रा ॥ १ ॥ काशी देह विटंबणें द्वारके जाळणें । पंढरीशी होणें ब्रह्मरूप ॥ २ ॥ अठरापगडयाती सकळहि वैष्णव । दुजा नाहीं भाव पंढरीसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे असो अथवा नसो भाव । दर्शनें पंढरीराव मोक्ष देतो ॥४॥

॥ ८४४ ॥

जो या गेला पंढरपुरा । आणीक यात्रा न मनी तो ॥ १ ॥ सुलभ माय पंढरिराणा । पुरवी खुणा अंतरींच्या ॥ २ ॥ जन्मांतरिंच्या पुण्यरासी । वारी त्यासी पंढरीची ॥ ३ ॥ बाहेर येतां प्राण फुटे । रडे दाटे गहिवरें ॥ ४ ॥ दधिमंगळ भोजन सारा । ह्मणती करा मुरडींव ॥ ५ ॥ मागुता हा पाहों ठाव । पंढरिराव दर्शनें ॥ ६ ॥ तुका ह्मण भूवैकुंठ । वाळुवंट भींवरा ॥ ७ ॥

॥ ८४५ ॥

आणीक ऐसें कोठें सांगा । पांडुरंगासारिखें ॥ १ ॥ दैवत ये भूमंडळीं । उद्धार कळी पावविते ॥ २ ॥ कोठें कांहीं कोठें कांहीं । शोध ठायीं स्थळासी ॥ ३ ॥ अन्यत्रींचें तीर्थी नासे । तीर्थी वसे वज्रलेप ॥ ४ ॥ पांडुरंगीचें पांडुरंगीं । पाप अंगीं राहेना ॥ ५ ॥ ऐसें हरें गिरिजेप्रति । गुह्य स्थिती सांगितली ॥ ६ ॥ तुका ह्मणे तीर्थ क्षेत्र । सर्वत्र हें दैवत ॥ ७ ॥

॥ ८४६ ॥

करोत तपादि साधनें । कोणी साधोत गोरांजनें ॥ १ ॥ आह्मी न वजों तया वाटा । नाचूं पंढरीचोहटां ॥ २ ॥ पावोत आत्मस्थिति । कोणी ह्मणोत उत्तम मुक्ति ॥ ३ ॥ तुका ह्मणे छंद । आह्मां हरिच्या दासां नित्य ॥४॥

॥ ८४७ ॥

कासया करावे तपाचे डोंगर । आणीक अपार दुःखरासी ॥ १ ॥ कासया फिरावे अनेक ते देश । दावितील आस पुढें लाभ ॥ २ ॥ कासया पुजावीं अनेक दैवतें । पोटभरे तेथें लाभ नाहीं ॥ ३ ॥

कासया करावे मुक्तीचे सायास । मिळे पंढरीस फुका मार्टी ॥ ४ ॥
तुका ह्मणे करीं कीर्तन पसारा । लाभ येईल घरा पाहिजे तो ॥ ५ ॥

॥ ८४८ ॥

जनाचिया मना जावें कासियेसी । राउळीं वाराणसी पांडुरंग ॥ १ ॥
तेथें भागीरथी येथें भीमरथी । अधिक ह्मणती चंद्रभागा ॥ २ ॥
तेथें माधवराव येथें यादवराव । जाणोनियां भाव पुंडलिकाचा ॥ ३ ॥
विष्णुपद गया तेचि येथें आहे । प्रत्यक्ष हें पाहें विटेवरी ॥ ४ ॥
तुका ह्मणे हेचि प्रपंच उद्धरी । आतां पंढरपुरी घडो वापा ॥ ५ ॥

॥ ८४९ ॥

मानी भक्तांचे उपकार । ऋणीया ह्मणवी निरंतर । केला निर्गुणीं आकार । कीर्ति मुखें वर्णितां ॥ १ ॥ ह्मणोनि जया जे वासना । ते पुरवितो पंढरिराणा । जाला भक्तांचा आंदणा । ते उपकार फेडावया ॥ २ ॥ अंबऋषीकारणें । जन्म घेतले नारायणें । एवढें भक्तीचें लक्षणें । दास्य करी दासाचें ॥ ३ ॥ ह्मणियें करितां शंका न धरी । रक्षपाळ बळिच्या द्वारीं । भक्तीचा आभारी । रीग न पुरे जावया ॥ ४ ॥ अर्जुनाचे रथवारु । ते वागवी सर्वेश्वरु । एवढे भक्तीचे उपकारु । मागें मागें हिंडतसे ॥ ५ ॥ पुंडलिकाचे द्वारीं । सम पाउलीं विटेवरी । न वजे कट करीं । धरुनि तेथें राहिला ॥ ६ ॥ भावभक्तीचा अंकित । नाम साजे दिनानाथ । ह्मणोनि राहिला निवांत । तुका चरण धरोनि ॥ ७ ॥

॥ ८५० ॥

पंढरीसी जावें ऐसें माझे मनीं । विठाइ जननी भेटे केव्हां ॥ १ ॥
न लगे त्याविण सुखाचा सोहळा । लागे मज ज्वाळा अग्निचिया ॥ २ ॥
तुका ह्मणे त्याचे पाहिलीया पाय । मग दुःख जाय सर्व माझें ॥ ३ ॥

॥ ८५१ ॥

पंढरीस जाते निरोप आइका । वैकुंठनायका क्षेम सांगा ॥ १ ॥
अनाथांचा नाथ हें तुझें वचन । धांवे नको दीन गांजों देऊं ॥ २ ॥
ग्रासिलें भुजंगें सर्पे महाकाळें । न दिसे हें जाळें उगवतां ॥ ३ ॥

कामक्रोधसुनीं श्वापदीं बहुतीं । वेढलों आवर्तीं मायेचिये ॥ ४ ॥
मृगजलनदी बुडविना तरी । आणुनियां वरी तळा नेते ॥ ५ ॥
तुका ह्मणे तुवां धरिलें उदास । तरी पाहों वास कवणाची ॥ ६ ॥

॥ ८५२ ॥

संपदा सोहळा नावडे मनाला । करी तें टकळा पंढरीचा ॥ १ ॥
जावें पंढरीसी आवडी मनासी । कधीं एकादशी आषाडी हे ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसें आर्त ज्याचे मनीं । त्याची चक्रपाणी वाट पाहे ॥ ३ ॥

॥ ८५३ ॥

साधन संपत्ति हेंचि माझें धन । सकळ चरण विठोबाचे ॥ १ ॥
शीतळ हा पंथ माहेराची वाट । जवळीच नीट सुखरूप ॥ २ ॥
वैष्णवांचा संग रामनाम गाणें । मंडित भूषणें अळंकार ॥ ३ ॥
भवनदी आड नव्हतीसी जाली । कोरडीच चाली जावें पायीं ॥४॥
मायबाप दोघें पाहातील वाट । ठेवूनियां कटीं कर उभीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे केव्हां देखेन कळस । पळाली आळस निद्रा भूक ॥ ६ ॥

॥ ८५४ ॥

सुखें घेऊं जन्मांतरें । एक बरें इहलोकीं ॥ १ ॥ पंढरीचे वारकरी ।
होतां थोरी जोडी हे ॥ २ ॥ हें तों आलें अनुभवा । पाहावें जीवा-
वरूनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे केला त्याग । सर्वसंग ह्मणऊनि ॥ ४ ॥

॥ ८५५ ॥

संतोषे माउली आरुषा वचनीं । वोरसोनि स्तनीं लावी बाळा ॥ १ ॥
तैसें प्रेमळाचें अवघेंचि गोड । पुरवितो कोड पांडुरंग ॥ २ ॥
सेवा करी साहे निष्ठुर उत्तर । त्याचे वाहे बरें तेंच मनीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे इच्छावसे खेळ खेळें । चिंता ते सकळ कांहीं नेणें ॥४॥

॥ ८५६ ॥

सांवळें रूपडें चोरटें चित्ताचें । उभें पंढरीचे विटेवरी ॥ १ ॥
डोळियांची धणी पाहातां न पुरे । तयालागीं झुरे मन माझें ॥ २ ॥
आन गोड कांहीं न लगे संसारीं । राहिले अंतरीं पाय तुझे ॥ ३ ॥

प्राण रिघों पाहे कुडी हे सांडुनी । श्रीमुख नयनीं न देखतां ॥ ४ ॥
चित्त मोहियेलें नंदाच्या नंदनें । तुका ह्मणे येणें गरुडध्वजें ॥ ५ ॥

॥ ८५७ ॥

इनामाची भरली पेंठ । वाहाती दाट मारग ॥ १ ॥ अवघेची येती वाण । अवघे शकुन लाभाचे ॥ २ ॥ अडचणी त्या केल्या दुरी । देण्या उरी घेण्याच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे जोडी जाली । ते आपुली आपणा ॥ ४ ॥

॥ ८५८ ॥

पृथक मीं सांगों किती । धर्म नीती सकळां ॥ १ ॥ अवघियांचा एक ठाव । शुद्ध भाव विठ्ठलीं ॥ २ ॥ क्षराअक्षराचा भाग । करा लाग पंढरीये ॥ ३ ॥ तुका ह्मणे आगमींचें । मथिलें साचें नवनीत ॥ ४ ॥

॥ ८५९ ॥

द्वारकेचें केणें आलें याचि ठाया । पुढें भक्तराया चोजवीत ॥ १ ॥
गोविलें विसारें माप केलें खरें । न पाहे माघारें अद्यापवरी ॥ २ ॥
वैष्णव मापारी नाहीं जाली सळे । पुढेंही न कळे पार त्याचा ॥ ३ ॥
लाभ जाला त्यांनीं धरिला तो विचार । आहिक्य परत्र सांटविलें ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज मिळाली मजूरी । विश्वास या घरीं संतांचिया ॥ ५ ॥

॥ ८६० ॥

तुझे पाय माझी काशी । कोण जाय माझें काशी ॥ १ ॥ तुझें रूप तेंचि ध्यान । तेंचि माझें अनुष्ठान ॥ २ ॥ तुझे चरण तेचि गया । जालें गयावर्जन देहा ॥ ३ ॥ तुका ह्मणे सकळ तीर्थें । तुझे पायीं वसती येथें ॥ ४ ॥

॥ ८६१ ॥

दोन्ही हात ठेवुनि कटीं । उभा भीवरेच्या तटीं । कष्टलासी साटीं । भक्तिकाजें विठ्ठला ॥ १ ॥ भागलासी मायबापा । बहु श्रम केल्या खेपा । आह्मालागीं सोपा । दैत्या काळ कृतांत ॥ २ ॥ होतासी क्षीरसागरीं । मही दाटली असुरीं । ह्मणोनियां घरीं । गौळियांचे अवतार ॥ ३ ॥ केला पुंडलिकें गोवा । तुज पंढरीसी देवा । तुका ह्मणे

॥ ८६२ ॥

दु:खाचिये साटीं तेथें मिळे सुख । अनाथाची भूक दैन्य जाय ॥१॥
उदाराचा राणा पंढरीस आहे । उभारोनि बाहे पालवितो ॥ २ ॥
जाणतियाहूनि नेणत्याची गोडी । आलिंगी आवडी करूनियां ॥ ३ ॥
क्षीण घेऊनियां प्रेम देतो साटी । न विचारी तुटी लाभा कांहीं ॥४॥
तुका ह्मणे असों अनाथ दुबळीं । आह्मांसी तो पाळी पांडुरंग ॥ ५ ॥

॥ ८६३ ॥

धरियेलीं सोंगें । येणें अवघीं पांडुरंगें ॥ १ ॥ तें हें ब्रह्म विटेवरी । उभें चंद्रभागे तिरीं ॥२॥ अंतर्व्यापी बाहे । धांडोळितां कोठें नोहे ॥३॥ योगयागतपें । ज्याकारणें दानजपें ॥ ४ ॥ दिले नेदी जती । भोग सकळ ज्या होती ॥ ५ ॥ अवघी लीळा पाहे । तुका ह्मणे दासां साहे ॥ ६ ॥

॥ ८६४ ॥

जो भक्तांचा विसावा । उभा पाचारितो धांवा ॥ १ ॥ हातीं प्रेमाचें भातुकें । मुखीं घाली कवतुकें ॥ २ ॥ भवसिंधु सुखें । उतरी कासे लावूनि ॥ ३ ॥ थोर भक्तांची आस । पाहे भोंवताली वास ॥ ४ ॥ तुका ह्मणे कृपादानी । फेडी आवडीची धणी ॥ ५ ॥

॥ ८६५ ॥

तिन्ही लोक ऋणें बांधिले जयानें । सर्वसिद्धि केणें तये घरीं ॥ १ ॥
पंढरीचोहोटां घातला दुकान । मांडियेले वान आवडीचे ॥ २ ॥
आषाढी कार्तिकी भरियेले हाट । इनाम हे पेंठ घेतां देतां ॥ ३ ॥
मुक्ति कोणी तेथें हातीं नेघे फुका । लुटितील सुखा प्रेमाचिया ॥ ४ ॥
तुका ह्मणे संतसज्जन भाग्याचे । अनंतां जन्मींचे सांटेकरी ॥ ५ ॥

॥ ८६६ ॥

तीर्थांचें जें मूळ व्रतांचें जें फळ । ब्रह्म तें केवळ पंढरिये ॥ १ ॥
तें आह्मीं देखिलें आपुलया नयनीं । फिटलीं पारणीं डोळियांचीं ॥ २ ॥
जीवांचें जीवन सुखाचें सेजार । उभें कटीं कर ठेवूनियां ॥ ३ ॥
जगाचा जनिता कृपेचा सागर । दीनां लोभापर दुष्टां काळ ॥ ४ ॥

सुरवरां चिंतनीं मुनिवरां ध्यानीं । आकार निर्गुणीं तोंचि असे ॥ ५ ॥ तुका ह्मणे नाहीं श्रुती आतुडलें । आह्मां सांपडलें गीतीं गातां ॥ ६ ॥

॥ ८६७ ॥

नागर गोडें बाळरूप । तें स्वरूप काळीचें ॥ १ ॥ गाईगोपाळांच्या संगें । आलें लागें पुंडलीका ॥ २ ॥ तें हें ध्यान दिगंबर । कटीं कर मिरवती ॥ ३ ॥ नेणपणें उगेंचि उभें । भक्तिलोभें राहिलें ॥ ४ ॥ नेणे वरदळाचा मान । विटे चरण सम उभें ॥ ५ ॥ सहज कटावरी हात । दहीं भात शिदोरी ॥ ६ ॥ मोहरी पांवा गांजिवा पाठीं । धरिली काठी ज्या काळें ॥ ७ ॥ रम्य स्थळ चंद्रभागा । पांडुरंगा क्रीडेसी ॥ ८ ॥ भीमा दक्षणमुख वाहे । दृष्टी पाहे समोर ॥ ९ ॥ तारावेसे मूढ लोक । दिली भाक पुंडलिका ॥ १० ॥ तुका ह्मणे वैकुंठवासी । भक्तांपासीं राहिला ॥ ११ ॥

॥ ८६८ ॥

आइत्या भाग्या धणी व्हावें । केणें घ्यावें न सरे तें ॥ १ ॥ केणें आलें पंढरपुरीं । उधाराचें लाभीक ॥ २ ॥ बाखराची करुनी रीति । भरा पोतीं लवलाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतांपाडें । करूं पुढें वाखती ॥ ४ ॥

॥ ८६९ ॥

आणिकांची सेवा करावी शरीरें । तीं येथें उत्तरें कोरडींच ॥ १ ॥ ऐसा पांडुरंग सुलभ सोपारा । नेघे येरझारा सेवकाच्या ॥ २ ॥ आणिकांचे भेटी आडकाठी पडे । येथें तें न घडे वचनही ॥ ३ ॥ आणिकांचें देणें काळीं पोट भरे । येथील न सरे कल्पांतींही ॥ ४ ॥ आणिकें दंडिती चुकलिया सेवा । येथें सोस हेवा नाहीं दोन्ही ॥ ५ ॥ तुका ह्मणे करी आपणासारिखें । उद्धरी पारिखें उंच निंच ॥ ६ ॥

॥ ८७० ॥

आपुलिया लाजा । धांवे भक्तांचिया काजा ॥ १ ॥ नाम धरिलें दिनानाथ । सत्य करावया व्रत ॥ २ ॥ आघात निवारी । छाया पीतांबरें करी ॥ ३ ॥ उभा कर कटीं । तुका ह्मणे याजसाटीं ॥ ४ ॥

॥ ८७१ ॥

आलिया संसारीं देखिली पंढरी । कीर्ति महाद्वारीं वाणूं तुझी ॥ १ ॥ पताकांचे भार नामाचे गजर । देखिल्या संसार सफळ जाला ॥ २ ॥ साधुसंतांचिया धन्य जाल्या भेटी। सांपडली लुटी मोक्षाची हे ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां हेंचि पैं मागणें। पुढती नाहीं येणें संसारासी ॥ ४ ॥

॥ ८७२ ॥

आह्मी आळीकरें । प्रेमसुखाचीं लेंकुरें ॥ १ ॥ पायीं गोविली वासना । तुच्छ केलें ब्रह्मज्ञाना ॥ २ ॥ येतां पाहें मुळा । वाट पंढरीच्या डोळां ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्थळें। मग मी पाहेन सकळें ॥ ४ ॥

॥ ८७३ ॥

इंद्रियाचें पुरे कोड । तेंचि गोड पुढतीही ॥ १ ॥ जावें ह्मणती पंढरपुरा । हाचि बरा संसार ॥ २ ॥ बैसलें तें मनासुळीं । सुख डोळीं देखिलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे देती कान । वाणावाण निवडुनी ॥ ४ ॥

॥ ८७४ ॥

किती चौघाचारें । येथें गोविलीं वेव्हारें ॥१॥ असे बांधविले गळे । होऊं न सकती निराळे ॥ २ ॥ आपलें आपण । केलें कां नाहीं जतन ॥ ३ ॥ तुका ह्मणे खंडदंडें । येरझारीं लपती लंडें ॥ ४ ॥

॥ ८७५ ॥

केली प्रतिज्ञा मनाशीं । तई मी दास सत्यत्वेशीं । नेईन पायांपाशीं । स्वामी मूळ पंढरिये ॥ १ ॥ तोंवरी हें भरीं पोट । केला तो मिथ्या बोभाट । नाहीं सांपडली वाट । सइराट फिरतसें ॥ २ ॥ ज्यावें आदराचें जिणें । स्वामी कृपा करी तेणें । पाळिल्या वचनें । सत्यत्वाचा अनुभव ॥३॥ घडे तैसें घडो आतां । मायबापाची हे सत्ता । तुका ह्मणे चिंता । काय पाहें मारगा ॥ ४ ॥

॥ ८७६ ॥

जाली हरिकथा रंग वोरसला । उचितासी आला पांडुरंग ॥ १ ॥ वांटितो हें प्रेम उचिताचा दाता । घेई रे तूं आतां धणीवरि ॥ २ ॥

प्रेम देऊनियां अवघीं सुखी केलीं। जीं होतीं रंगलीं विठ्ठलीं तीं ॥३॥
तुकें हें दुर्बळ देखियेलें संतीं । ह्मणउनि पुढती आणियेलें ॥ ४ ॥

॥ ८७७ ॥

जुनाट हें धन अंत नाहीं पार । खात आले फार सरलें नाहीं ॥ १ ॥
नारद हा मुनि शुकसनकादिक । उरलें अमूप तुह्मां आह्मां ॥ २ ॥
येथूनियां धना खाती बहुत जन । वाल गुंज उणें जालें नाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे धना नाहीं अंतपार । कुंटित हे चार वाचा तेथें ॥ ४ ॥

॥ ८७८ ॥

जो का निर्गुण निराकार । तेणें धरियेले अवतार ॥१॥ निर्गुण होता तो सगुणासी आला । भक्तीसाठीं प्रगटला ॥ २ ॥ जो का त्रिभुवनचाळक । तो हा नंदाचा बाळक ॥ ३ ॥ सोडविलें वसुदेवदेवकीसी । अवतार धरिला तिचे कुशीं ॥४॥ मारियेला कंसराणा । राज्यीं स्थापिलें उग्रसेना ॥५॥ तुका ह्मणे देवाधिदेव । तो हा उभा पंढरिराव ॥ ६ ॥

॥ ८७९ ॥

पांडुरंगा ऐसा सांडुनि वेव्हारा । आणिकांची करा आस वांयां ॥१॥
बहुतांसी दिला उद्धार उदारें । निवडीना खरें खोटें कांहीं ॥ २ ॥
याचिया अंकिता वैकुंठ बंदर । आणीक वेव्हार चालतीना ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझे हातींचें वजन । यासी बोल कोण ठेवूं सके ॥ ४ ॥

॥ ८८० ॥

पुंडलिकाचे निकटसेवे । कैसा धांवे बराडी ॥१ ॥ आपुलें थोरपण । नारायण विसरला ॥ २ ॥ उभा कटीं ठेवुनि कर । न ह्मणे पर बैससें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जगदीशा । करणें आशा भक्तांची ॥ ४ ॥

॥ ८८१ ॥

बाप माझा दिनानाथ । वाट भक्तांची पाहात ॥ १ ॥ कर ठेवूनियां कटीं । उभा चंद्रभागे तटीं ॥२॥ गळां वैजयंतीमाळा । रूपें डोळस सांवळा ॥३॥ तुका ह्मणे भेटावया । सदा उभारिल्या बाह्या ॥ ४ ॥

॥ ८८२ ॥

ब्रह्मज्ञान जेथें आहे घरोघरीं । सर्व निरंतरी चतुर्भुज ॥ १ ॥ पापा नाहीं रीग काळाचें खंडण । हरिनामकीर्तन परोपरी ॥२॥ तुका ह्मणे हाचि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिकां गती चाड मज ॥ ३ ॥

॥ ८८३ ॥

ब्रीद ज्याचें जगदानी । तोचि मनीं स्मरावा ॥ १ ॥ सम पाय कर कटीं । उभा तटीं भींवरेच्या ॥२॥ पाहिलिया वेध लावी । बैसे जीवीं जडोनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे भक्तिकाजा । धांवे लाजा लवलाहें ॥ ४ ॥

॥ ८८४ ॥

भक्तवत्सल दिनानाथ । तिहीं लोकीं ज्याची मात ॥ १ ॥ तो हा पुंडलिकासाटीं । आला उभा वाळवंटीं ॥ २ ॥ गर्भवास धरी । अंबऋषीचा कैवारी ॥ ३ ॥ सकळां देवां अधिष्ठान । एका मंत्रासी कारण ॥ ४ ॥ तुका ह्मणे ध्यानीं । ज्यासि ध्यातो शूळपाणी ॥ ५ ॥

॥ ८८५ ॥

लाघवी सूत्रधारी । दोरी नाचवी कुसरी । उपजवी पाळूनि संहारि । नाना-परिचीं लाघवें ॥ १ ॥ पुरोनि पंढरिये उरलें । भक्तिसुखें लांचावलें । उभेंचि राहिलें । कर कटीं न बैसे ॥२॥ बहु काळें ना सांवळें । बहु कठिण ना कोंवळें । गुणत्रया वेगळें । बहुबळें आथीलें॥ ३ ॥असोनि नसे सकळांमधीं । मना अगोचर बुद्धी । स्वामी माझा कृपानिधि । तुका ह्मणे विठ्ठल ॥४॥

॥ ८८६ ॥

लाभ खरा नये तुटी । नाहीं आडखळा भेटी ॥ १ ॥ जाय अवघिया देशा । येथें संचलासी तैसा ॥२॥ मग नलगे पारखी । अवघीं सक-ट सारखीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे बोले । रूपें भुलविले डोळे ॥ ४ ॥

॥ ८८७ ॥

वाचेचिया आळा कवळिलें ब्रह्म । चुकाविला श्रम पृथक तो ॥ १ ॥ सुलभ तें जालें सुलभ तें जालें । जवळी तें आलें पंढरीये ॥ २ ॥

नामरूपाचें बांधलें मोटळें । एक एका वेळे सारियेलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाटे चुकली वसती । उद्धार तो हातीं आणियेला ॥ ४ ॥

॥ ८८८ ॥

साधावया भक्तिकाज । नाहीं लाज हा धरीत ॥ १ ॥ ऐसियासी शरण जावें । शक्ती जीवें न वंची ॥ २ ॥ भीष्मपण केला खरा । धनुर्धरा रक्षिलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे साक्ष हातीं । तो म्यां चित्तीं धरियेला ४

॥ ८८९ ॥

पंढरीस घडे अतित्यायें मृत्य । तो जाय पतित अधःपाता ॥ १ ॥ दुराचारें मोक्ष सुखाचे वसति । भोळी बाळमूर्ति पांडुरंग ॥ २ ॥ केला न सहावे तीर्थ उपवास । कथेविण दोषसाधन तें ॥ ३ ॥ कालियापें भेद मानितां निवडे । श्रोत्रियांसी जोडे अंत्यजता ॥ ४ ॥ माहेरीं सलज्ज ते जाणा सिंदळी । काळिमा काजळी पावविते ॥ ५ ॥ तुका ह्मणे तेथें विश्वास जतन । पुरे भीमास्नान सम पाय ॥ ६ ॥

॥ ८९० ॥

उमा रमा एकी सरी । वाराणसी ते पंढरी ॥ १ ॥ दोघे सारिखे सारिखे । विश्वनाथ विठ्ठल सखे ॥ २ ॥ तेथें असे भागीरथी । येथें जाणा भीमरथी ॥ ३ ॥ वाराणसी त्रिशुलावरी । सुदर्शनावरि पंढरी ॥ ४ ॥ मनकार्णिका मनोहर । चंद्रभागा सरोवर ॥ ५ ॥ वाराणसी भैरवकाळ। पुंडलीक क्षेत्रपाळ ॥ ६ ॥ धुंडिराज दंडपाणी । उभा गरुड कर जोडुनी ॥ ७ ॥ गया तेचि गोपाळपुर । प्रयाग निरानर-सिंगपुर ॥ ८ ॥ तेथें असती गयावळ । येथें गाई आणि गोपाळ ॥ ९ ॥ शमीपत्र पिंड देती । येथें काला निजसुखप्राप्ति ॥ १० ॥ संतसज्जनीं केला काला । तुका प्रसाद लाधला ॥ ११ ॥

॥ ८९१ ॥

कार्तिकीचा सोहळा । चला जाऊं पाहूं डोळां । आलें वैकुंठ जवळां । पंढरीये सान्निध ॥ १ ॥ पीक पिकलें घुमरी । प्रेम न समाये अंबरीं । अवघी मातली पंढरी । घरोघरीं सुकाळ ॥ २ ॥ चालती स्थिर

स्थिर । गरुडटकयांचे भार । गर्जती गंभीर । टाळ श्रुति मृदंग ॥ ३ ॥ मिळालिया भद्रजाती । कैशा आनंदें डुलती । शूर उठावती एका एक आगळे ॥ ४ ॥ नामामृत कल्लोळ । वृंदें कोंदलीं सकळ । आलें वैष्णवदळ । कळिकाळ कांपती ॥ ५ ॥ आस करिती ब्रह्मादिक । देखुनि वाळवंटींचें सुख । धन्य धन्य मृत्युलोक । ह्मणती भाग्याचा कैसा ॥ ६ ॥ मरण मुक्ति वाराणसी । पितृऋण गया नासी । उधार नाहीं पंढरीसी । पायापाशीं विठोबाच्या ॥ ७ ॥ तुका ह्मणे आतां । काय करणें आह्मां चिंता । सकळ सिद्धींचा दाता । तो सर्वथा नुपेक्षी ॥ ८ ॥

---

## संतपर अभंग.

॥ ८९२ ॥

श्रीसंतांचिया माथा चरणांवरी । साष्टांग हें करीं दंडवत ॥ १ ॥ विश्रांती पावलों सांभाळउत्तरीं । वाढलें अंतरीं प्रेमसुख ॥ २ ॥ डौरली हे काया कृपेच्या वोरसें । नव्हे अनारिसें उद्धरलों ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज न घडतां सेवा । पूर्वपुण्यठेवा वोडवला ॥ ४ ॥

॥ ८९३ ॥

अर्भकाचे साटीं । पंतें हातीं धरिली पाटी ॥ १ ॥ तैसे संत जगीं । क्रिया करुनी दाविती अंगीं ॥ २ ॥ बालकाचे चाली । माता जाणुनि पाउल घाली ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाव । जनासाटीं उदकीं ठाव ॥ ४ ॥

॥ ८९४ ॥

अवघा तो शकुन । हृदयीं देवाचे चरण ॥ १ ॥ येथें नसतां वियोग । लाभा उणें काय मग ॥ २ ॥ संग हरिच्या नामाचा । शुचिर्भूत सदा वाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरिच्या दासां । शुभकाळ अवघ्या दिशा ॥ ४ ॥

॥ ८९५ ॥

अग्निमाजी गेलें । अग्नि होऊन तेंच ठेलें ॥ १ ॥ काय उरलें तया पण । मागील तें नाम गुण ॥ २ ॥ लोह लागे परिसा अंगीं ।

तोही भूषण जाला जगीं ॥ ३ ॥ सरिता ओहळा ओघा । गंगे मिळोनि जाल्या गंगा ॥ ४ ॥ चंदनाच्या वासें । तरु चंदन जाले स्पर्शें ॥ ५ ॥ तुका जडला संतां पायीं । दुजेपणा ठाव नाहीं ॥ ६ ॥

॥ ८९६ ॥

अमृत तें प्रेम जिव्हा ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ॥ १ ॥ सकळही तेथें बोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥ २ ॥ सकळ इंद्रियें जालीं ब्रह्मरूप । ओतलें स्वरूप तयामाजी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव नारायण ॥ ४ ॥

॥ ८९७ ॥

अंगें अनुभव जाला मज । संतरजचरणांचा ॥ १ ॥ सुखी जालों या सेवनें । दुःख नेणें यावरी ॥ २ ॥ निर्माल्याचें तुळसीदळ । विष्णुजळ चरणींचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे भवसार । करूनि फार मिश्रित ॥ ४ ॥

॥ ८९८ ॥

अवघे चुकविले सायास । तप रासी जीवा नास ॥ १ ॥ जीव देउनियां बळी । अवघीं तारिलीं दुर्बळीं । केला भूमंडळीं । माजी थोर पवाडा ॥ २ ॥ कांहीं न मगे याची गती । लटा वितो जगा हातीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भक्तराजा । कोण वर्णी पार तुझा ॥ ४ ॥

॥ ८९९ ॥

अभिनव सुख तरि या विचारें । विचारावें बरें संतजनीं ॥ १ ॥ रूपाच्या आठवें दोन्हीही आपण । वियोग तो क्षण होत नाहीं ॥ २ ॥ पूजा तरि चित्तें कल्पा तें ब्रह्मांड । अहाच तो खंड एकदेसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझा अनुभव यापरि । डोई पायांवरि ठेवीतसें ॥ ४ ॥

॥ ९०० ॥

अनंत लक्षणें वाणितां अपार । संताचें तें घर सांपडेना ॥ १ ॥ जये घरीं संत राहाती आपण । तें तुह्मां ठिकाण आतुडेना ॥ २ ॥ ठिकाण धरूनी पाहावे ते संत । उगाच आकांत करूं नये ॥ ३ ॥ संत होऊनियां संतांसी पाहावें । तरिच तरावें तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ९०१ ॥

अवघा भार वाटे देवा । संतसेवा न घडतां ॥ १ ॥ कसोटी हे असे हातीं । सत्य भूतीं भगवंत ॥ २ ॥ चुकलोंसा दिसें पंथ । गेले संत तो ऐसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे सोंग वांयां । कारण या अनुभवें ॥ ४ ॥

॥ ९०२ ॥

आरुष माझी वाणी बोबडीं उत्तरें । केली ते लेकुरें सलगी पायीं ॥१॥ करावें कवतुक संतीं मायबापीं । जीवन देउनि रोपीं विस्तारिजे ॥२॥ आधारें वदली प्रसादाची वाणी । उच्छिष्टसेवनीं तुमचिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेचि करितों विनंती । मागेन पुढती सेवादान ॥ ४ ॥

॥ ९०३ ॥

आतां तुह्मी कृपावंत । साधु संत जिवलग ॥ १ ॥ गोमटें तें करा माझें । भार ओझें तुह्मांसी ॥२॥ वंचिलें तें पायांपाशीं । नाहीं यासी वेगळें ॥३॥ तुका ह्मणे सोडिल्या गांठी । दिली मिठी पायांसी ॥४॥

॥ ९०४ ॥

आज्ञा पाळुनियां असें एकसरें । तुमचीं उत्तरें संतांचीं हीं ॥ १ ॥ भागवूनि देह ठेवियेला पायीं । चरणावरि डोई येथूनचि ॥ २ ॥ येणें जाणें हें तों उपाधीचें मूळ । पूजा ते सकळ अकर्तव्य ॥ ३ ॥ तुका ह्मणे असें चरणींचा रज । पदींच सहज जेथें तेथें ॥ ४ ॥

॥ ९०५ ॥

आपुलिया हिता जो असे जागता । धन्य मातापिता तयाचिया ॥ १ ॥ कुळीं कन्यापुत्र होती जीं सात्विक । तयाचा हरिख वाटे देवा ॥ २ ॥ गीता भागवत करिती श्रवण । अखंड चिंतन विठोबाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज घडो त्याची सेवा । तरी माझ्या दैवा पार नाहीं ॥ ४ ॥

॥ ९०६ ॥

आले संत पाय ठेविती मस्तकीं । इहीं उभयलोकीं सरता केलों ॥ १ ॥ बंदीम पाउलें लोळेन चरणीं । आजि इच्छाधणी फिटईल ॥ २ ॥

अवघीं पूर्वे पुण्यें जालीं सानुकूळ । अवघेंचि मंगळ संतभेटी ॥ ३ ॥
तुका ह्मणे कृतकृत्य जालों देवा । नेणें परि सेवा डोळां देखें ॥ ४ ॥

॥ ९०७ ॥

आजिचें हें मज तुह्मीं कृपादान । दिलें संतजन मायबापीं ॥ १ ॥
आलीं मुखावाटा अमृतवचनें । उत्तीर्ण तीं येणें नव्हे जन्में ॥ २ ॥
तुका ह्मणे तुह्मी उदार कृपाळ । शृंगारिलें बाळ कवतुकें ॥ ३ ॥

॥ ९०८ ॥

आवडीची न पुरे धणी । प्रीत मनीं बैसली ॥ १ ॥ नित्य नवा कळवळा । मायबाळामध्यें तो ॥ २ ॥ सुख सुखा भेटों आलें । होय वाल्हें पोटींचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ब्रह्मानंदें । संतवृंदें चरणापें ॥ ४ ॥

॥ ९०९ ॥

आलिंगनें घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥ १ ॥ ऐसा संतांचा महिमा । जाली बोलायाची सीमा ॥ २ ॥ तीर्थं पर्वकाळ । अवघीं पायांपें सकळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । त्यांची केली पावे सेवा ॥ ४ ॥

॥ ९१० ॥

आह्मां सोइरे हरिजन । जनीं भाग्य निकिंचन ॥ १ ॥ ज्याच्या धैर्या नाहीं भंग । भाव एकविध रंग ॥ २ ॥ भुके तान्हे चित्तीं । सदा देव आठविती ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन । ज्यांचें निज नारायण ॥ ४ ॥

॥ ९११ ॥

आह्मी नाचों तेणें सुखें । वाऊं टाळी गातों मुखें ॥ १ ॥ देव कृपेचा कोंवळा । शरणागता पाळी ळळा ॥ २ ॥ आह्मां जाला हा निर्धार । मागें तारिलें अपार ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतीं । वर्म दिलें आह्मां हातीं ॥ ४ ॥

॥ ९१२ ॥

उदकीं कालवी शेण मलमूत्र । तो होय पवित्र कासयानें ॥ १ ॥
उद्धारासी ठाव नाहीं भाग्यहीना । विन्मुख चरणा संतांचिया ॥ २ ॥
दुखवी तो बुडे सांगडीचा तापा । अतित्याई पापाचीच मूर्ति ॥ ३ ॥
तुका ह्मणे जेव्हां फिरतें कपाळ । तरी असंगळ योग होतो ॥ ४ ॥

॥ ९१३ ॥

उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥ १ ॥ संतदर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥ २ ॥ संपुष्ट हे हृदयपेटी । करूनि पोटीं सांठवूं ॥३॥ तुका ह्मणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥ ४ ॥

॥ ९१४ ॥

उत्तम त्या याति । देवा शरण अनन्यगति ॥१॥ नाहीं दुजा ठाव । कांहीं उत्तम मध्यम भाव ॥ २ ॥ उमटती ठसे । ब्रह्मप्राप्ति अंगीं दिसे ॥ ३ ॥ भाविक विश्वासी । तुका ह्मणे नमन त्यांसी ॥ ४ ॥

॥ ९१५ ॥

उदासीनाचा देह ब्रह्मरूप । नाहीं पुण्य पाप लागत त्या ॥ १ ॥ अनुताप अंगीं अग्निचिया ज्वाळा । नाहीं मृगजळा विझों येत ॥ २ ॥ दोष ऐशा नांवें देहाचा आदर । विटलें अंतर अहंभावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाय नासोनियां खंती । तंवाचि हे चित्तीं बद्धता ते ॥ ४ ॥

॥ ९१६ ॥

उपकारी असे आरोणि उरला । आपुलें तयाला पर नाहीं ॥ १ ॥ लाभावरि घ्यावें सांपडलें काम । आपला तो श्रम न विचारी ॥ २ ॥ जीवा ऐसें देखे आणिकां जीवांसी । निखळचि रासि गुणांचीच ॥३॥ तुका ह्मणे देव तयांचा पांगिला । न भंगे संचला धीर सदा ॥ ४ ॥

॥ ९१७ ॥

एका हातीं टाळ एका हातीं चिपाळिया । घालिती हुंमरी एक वाहाताती टाळिया ॥ १ ॥ मातले वैष्णव नटती नाना छंदें । नाहीं चाड मोक्षपद भजनीं आवडी ॥ २ ॥ हाका अरोळिया गीत वाद्यें सुखसोहळे । जाय तें न कळे केव्हां रजनी दिवस ॥ ३ ॥ तीर्थी नाहीं चाड न लगे जावें वनांतरा । तुका ह्मणे हरिहरात्मकचि पृथिवी ॥ ४ ॥

॥ ९१८ ॥

ऐशा भाग्यें जालों । तरी धन्य जन्मा आलों ॥ १ ॥ रुळें तळीले

पायरी । संत पाय देती वरी ॥ २ ॥ प्रेमामृतपान । होईल चरणरजें स्नान ॥ ३ ॥ तुका ह्मणे सुखें । तया हरतील दुःखें ॥ ४ ॥

॥ ९१९ ॥

ऐका संतजन उत्तरें माझें बोबडे बोल। करीं लाड तुह्मांपुढें हो कोणी ह्मणी कोपाल ॥ १ ॥ उपाय साधन आइका कोण गति अवगति । दृढ बैसोनां सादर तुह्मी धरावें चित्तीं ॥ २ ॥ धर्म तयासी घडे रे ज्याचे स्वाधीन भाज । कर्म तयासी जोडे रे भीत नाहीं लाज ॥३॥ पुण्य तें जाणा रे भाइनो परोपकाराचें । परपीडा परनिंदा रे खरें पाप तयाचें ॥४॥ लाभ तयासी जाला रे मुखीं देव उच्चारी । प्रपंचापाठीं गुंतला रे ह्मणी तयासीच थोरी ॥५॥ सुख तें जाणा रे भाइनो संतसमागम । दुःख तें जाणा रे भाइनो सम तेथें विषम ॥ ६ ॥ साधन तयासी साधे रे ज्याची स्वाधीन बुद्धि । पराधीनासी आहे घात रे थोर जाण संबंधीं ॥७॥ मान पावे तो आगळा मुख्य इंद्रियें राखे । अपमानी तो अधररसस्वाद चाखे ॥ ८ ॥ जाणता तयासी बोलिजे जाणे समाधान । नेणता तयासी बोलिजे वाद करी भूषण ॥९॥ भला तोचि एक जाणा रे गयावर्जन करी । बुरा धन नष्ट मेळवी परद्वार जो करी ॥१०॥ आचारी अन्न काढी रे गाई अतितभाग। अनाचारी करी भोजन ग्वाही नसतां संग ॥११॥ स्वहित तेणेंचि केलें रे भूतीं देखिला देव । अनहित तयाचें जालें रे आणी अहंभाव ॥१२॥ धन्य जन्मा तेचि आले रे एक हरीचे दास। धिग ते विषयीं गुंतले केला आयुष्या नास ॥१३॥ जोहरी तोचि एक जाणा रे जाणे सिद्धलक्षणें। वेडसर तो भुले रे वरदळभूषणें ॥१४॥ वळियाढा तोचि जाणा रे भक्ति दृढ शरीरीं । गांढ्या तयासी बोलिजे एक भाव न धरी॥१५॥ खोल तो वचन गुरूचें जो गिळूनी बैसे । उथळ धीर नाहीं अंगीं रे ह्मणे होईल कैसें ॥१६॥ उदार तो जीवभाव रे ठेवी देवाचे पायीं । कृपण तयासी बोलिजे पडे उपाधिडाई ॥ १७ ॥ चांगलेंपण तेंचि रे

ज्याचें अंतर शुद्ध । बोंगळ मळिण अंतरीं वाणी वाहे दुर्गंध ॥१८॥ गोड तेंचि एक आहे रे सार विठ्ठलनाम । कडु तो संसार रे लक्ष-चौऱ्याशी जन्म ॥ १९ ॥ तुका ह्मणे मना धरीं रे संतसंगतिसोई । न लगे कांहीं करावें राहें विठ्ठलपायीं ॥ २० ॥

॥ ९२० ॥

ऐका हें वचन माझें संतजन । विनवितों जोडुन कर तुह्मां ॥ १ ॥ तर्क करूनियां आपुल्या भावना । बोलतिया जना कोण वारी ॥२॥ आमुच्या जीवींचा तोचि जाणे भावो । रखुमाईचा नाहो पांडुरंग ॥३॥ चित्त माझें त्याचे गुंतलेंसे पायीं । ह्मणऊनि कांहीं नावडे त्या ॥ ४ ॥ तुका ह्मणे मज न साहे मीनती । खेद होय चित्तीं भंग मना ॥५॥

॥ ९२१ ॥

ऐका जी संतजन । सादर मन करूनि ॥ १ ॥ सकळांचें सार एक । कंटक ते त्यजावे ॥ २ ॥ विशेषता कांद्याहूनि । सेवित्या घाणी आ-गळी ॥३॥ तुका ह्मणे ज्याची जोडी । ते परवडी वैसींजे ॥४॥

॥ ९२२ ॥

करणें तें देवा । हेंचि एक पावे सेवा ॥ १ ॥ अवघें घडे येणें सांगा भक्त देवाचें तें अंग ॥२॥ हेंचि एक वर्म । काय बोलिला तो धर्म ॥ ३ ॥ तुका ह्मणे खरें । खरें त्रिवाचा उत्तरें ॥ ४ ॥

॥ ९२३ ॥

करितां या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥१॥ माथां पडती संतपाय । सुख कैवल्य तें काय ॥ २ ॥ ऐसा लाभ नाहीं । दुजा विचारितां कांहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे गोड । तेथें पुरे माझें कोड ॥ ४ ॥

॥ ९२४ ॥

कल्पतरु रुया नव्हती बाभुळा । पुरवती फळा इच्छितिया ॥ १ ॥ उदंड त्या गाई ह्मैसीआणि शेळ्या । परि त्या निराळ्या कामधेनु॥२॥ तुका ह्मणे देव दाखविल दृष्टी । तया सवें भेटी थोर पुण्य ॥ ३ ॥

॥ ९२५ ॥

कळल हे खुण । तरि दावी नारायण ॥ १ ॥ सत्य संतापाशीं राहे । येरां भय आड आहे ॥२॥ अणुचिया ऐसें । असे भरलें प्रकाशें ॥३॥ इंद्रियांचे धनी । ते हे जाती समजूनि ॥ ४ ॥ तर्क कुतर्क वाटा । नागवण घटापटा ॥५॥ तुका ह्मणे त्यावें । डोळां अंजन बरवें ॥६॥

॥ ९२६ ॥

कां न वजावें बैसोनि कथे । ऐसें ऐका हो श्रोते । पांडुरंग तेथें । उभा जसे तिष्ठत ॥१॥ ह्मणऊनि करी धीर । लक्ष लावूनि सादर । भवसिंधु पार । असेल ज्या तरणें ॥ २ ॥ कथे कांहीं अणुमात्र । नो बोलावें हा वृत्तांत । देवभक्तां चित्त । समरसीं खंडणा ॥३॥ कां वैष्णवा पूजावें । ऐका घेईल जो भावें । चरणरजा शिवें । वोडविला मस्तक ॥ ४ ॥ ऐसें जाणा रे निभ्रांत । देव वैष्णवांचा अंकित । अलिप्त अतीत । परमित त्यासाठीं ॥ ५ ॥ घालोनि लोळणी । तुका आला लोटांगणीं । वंदी पायवणीं । संतचरणींचें माथां ॥६॥

॥ ९२७ ॥

काय नाहीं माता गौरवीत बाळा । काय नाहीं लळा पाळीत ते ॥१॥
काय नाहीं त्याची करीत ते सेवा । काय नाहीं जीवा गोमटें तें ॥ २ ॥
अमंगळपणें कांटाळा न धरी । उचलोनी करीं कंठीं लावी ॥ ३ ॥
लेववी आपुले अंगें अळंकार । संतोषाये फार देखोनियां ॥ ४ ॥
तुका ह्मणे स्तुति योग्य नाहीं परी । तुह्मां लाज थोरी अंकिताची ॥ ५ ॥

॥ ९२८ ॥

काय माझी संत पाहाती जाणीव । सर्व माझा भाव त्यांचे पायीं ॥ १ ॥
कारण सरतें करा पांडुरंगीं । भूषणाची जगीं काय चाड ॥ २ ॥
बोबड्या उत्तरीं ह्मणे हरिहरि । आणीक भीकारी नेणें दुजें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी विठ्ठलाचे दास । करितों मी आस उच्छिष्टाची ॥ ४ ॥

॥ ९२९ ॥

काय वांणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥

थोरींव सांडिली आपुली परिसें । नेणें सिवों कैसें लोखंडासी ॥ २ ॥
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति । देह कष्टविती उपकारें ॥ ३ ॥
भूतांची दया हे भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ५ ॥

॥ ९३० ॥

काय सांगों आतां संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥ १ ॥
काय द्यावें त्यांचें व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥२॥
सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥ ३ ॥
तुका ह्मणे वत्स धेनुवेचा चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ॥ ४ ॥

॥ ९३१ ॥

कीर्ति चराचरीं आहे तैसी आहे । भेटुनि त्वां काय द्यावें आह्मां ॥१॥
घेउनि धरणें बैसति उपवासी । हा हाट आह्मांसी नाहीं तैसा ॥ २ ॥
तांतडी तयांनीं केली विटंबणा । आह्मां नारायणा काय उणें ॥ ३ ॥
नाहीं मुक्ति चाड वास वैकुंठींचा । पिकलीसे वाचा रामनामें ॥ ४ ॥
तुका ह्मणे काय व्हावें उतराई । जीव ठेवूं पायीं संतांचिया ॥ ५ ॥

॥ ९३२ ॥

कुळींची हे कुळदेवी । केली ठावी संतांनीं ॥ १ ॥ बरवें जालें शरण गेलों । उगविलों संकटीं ॥ २ ॥ आणिला रूपाही बळें । करूनि खळें हरिदासीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे समागमें । नाचों प्रेमें लागलों ॥ ४ ॥

॥ ९३३ ॥

कृपाळू सज्जन तुह्मी संत जन । हेंचि कृपादान तुमचें मज ॥ १ ॥
आठवण तुह्मी द्यावी पांडुरंगा । कींव माझी सांगा काकुलती ॥ २ ॥
अनाथ अपराधी पतिताआगळा । परि पायां वेगळा नका करूं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी निरविल्यावरी । मग मज हरी उपेक्षीना ॥ ४ ॥

॥ ९३४ ॥

केला कईवाड संतांच्या आधारें । अनुभवें खरें कळों आलें ॥ १ ॥
काय जीवित्वाची धरुनियां आशा । व्हावें गर्भवासा पात्र भेणें ॥ २ ॥

अबाळींनें जावें निश्चितीच्या ठायां । रांडा रोटा वांयां करूं नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे बळी देतां तें निधान । भिकेसाटीं कोण राज्य देतो ॥ ४ ॥

॥ ९३५ ॥

कोटिजन्म पुण्यसाधन साधिलें । तेणें हाता आलें हरिदास्य ॥ १ ॥
रात्रीं दिवस ध्यान हरीचें भजन । कायावाचामन भगवंतीं ॥ २ ॥
ऐसिया प्रेमळा ह्मणताती वेडा । संसार रोकडा बुडविला ॥ ३ ॥
एकवीस कुळें जेणें उद्धरिलीं । हे तों न कळे खोली भाग्यमंदा ॥ ४ ॥
तुका ह्मणे त्याची पायधुळी मिळे । भवभय पळे वंदितांचि ॥ ५ ॥

॥ ९३६ ॥

कोण त्याचा पार पावला धुंडितां । पुढें विचारितां विश्वंभरा ॥ १ ॥
अणुरेणु सूक्ष्मस्थूळा पार नाहीं । श्रुती नेती त्याही खुंटलिया ॥ २ ॥
फळांत कीटक येवढें आकाश । ऐसीं तरुवरास अनेक किती ॥ ३ ॥
दाविलें अनंतें अर्जुनासि पोटीं । आणीक त्या सृष्टि कृष्णलोक ॥ ४ ॥
तुका ह्मणे लागा संतांचिया कासे । ठाव घेतां कैसे वांचा जीवें ॥ ५ ॥

॥ ९३७ ॥

कोण पुण्य कोणा गांठी । ज्यासी ऐसियांची भेटी ॥ १ ॥ जिहीं हरी धरिला मनीं । दिलें संसारासी पाणी ॥ २ ॥ कोण हा भाग्याचा । ऐसियांसी बोले वाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचे भेटी । होय संसारासी तुटी ॥ ४ ॥

॥ ९३८ ॥

कोणा पुण्या फळ आलें । आजि देखिलीं पाउलें ॥ १ ॥ ऐसें नेणें नारायणा । संतीं सांभाळिलें दीना ॥ २ ॥ कोण लाभकाळ । दीन आजिचा मंगळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाला । लाभ सहज विठ्ठला ॥ ४ ॥

॥ ९३९ ॥

कोणा पुण्यें यांचा होईन सेवक । जींहीं द्वंद्वादिक दुराविलें ॥ १ ॥
ऐसें वर्म मज दावीं नारायणा । अंतरींच्या खुणा प्रगटोनि ॥ २ ॥
बहु अवघड असे संतभेटी । तरि जगजेठी करुणा केली ॥ ३ ॥
तुका ह्मणे मग नयें वृत्तीवरी । सुखाचे शेजारीं पहुडईन ॥ ४ ॥

॥ ९४० ॥

खळा सदा क्षुद्रीं दृष्टी। करी कष्टी सज्जना ॥ १ ॥ करिती आपुलाले परी। धणीवरी व्यापार ॥ २ ॥ दया संतां भांडवल । वेची बोल उपकार ॥ ३ ॥ तुका ह्मणे आपुलालें । उसंतिलें ज्यांणीं तें ॥ ४ ॥

॥ ९४१ ॥

गंगा आली आह्मांवरी। संतपाउलें साजिरीं ॥ १ ॥ तेथें करीन मी अंघोळी। उडे चरणरजधुळी। येती तीर्थावळी। पर्वकाळ सकळ ॥ २ ॥ पाप पळालें जळालें । भवदुःख दुरावलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य जालों। सप्तसागरांत न्हालों ॥ ४ ॥

॥ ९४२ ॥

गंगाजळा पाहीं पाठी पोट नाहीं। अवगुण तो कांहीं अमृतासी ॥ १ ॥ रवि दीप काळिमा काय जाणे हिरा। आणिकां तिमिरां नाश तेणें ॥ २ ॥ कर्पूरकांडणी काय कोंडा कणी। सिंधू मिळवणीं काय चाले ॥ ३ ॥ परिस चिंतामणि आणिकांचा गुणी। पालटे लागोनि नव्हे तैसा ॥ ४ ॥ तुका ह्मणे तैसे जाणा संतजन। सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥ ५ ॥

॥ ९४३ ॥

गुणांचाचि सांटा। करूं न वजों आणिका वाटा ॥ १ ॥ करिती छंद नानापरी। भरोन सिणती आडभरी ॥ २ ॥ नेमली पंगती। आह्मां संतांची संगती ॥३॥ तुका ह्मणे लिळा। येर कवतुक पाहे डोळां ॥४॥

॥ ९४४ ॥

गुरुचिया मुखें होइल ब्रह्मज्ञान। न कळे प्रेमखुण विठोबाची ॥ १ ॥ वेदातें विचारा पुराणातें पुसा। विठोबाचा कैसा प्रेमभाव ॥ २ ॥ तुका ह्मणे सांडा जाणीवेचा शीण। विठोबाची खूण जाणती संत ॥ ३ ॥

॥ ९४५ ॥

घातला दुकान। देती आलियासी दान ॥ १ ॥ संत उदार उदार। भरलें अनंत भांडार ॥ २ ॥ मागत्यांची पुरे। धणी आणिकांसी उरे। ॥ ३ ॥ तुका ह्मणे पोतें। देवें भरिलें नव्हे रितें ॥ ४ ॥

॥ ९४६ ॥

घेसी तरी घेईं संतांची हे भेटी । आणीक ते गोष्टी नको मना ॥ १ ॥
सर्वभावें त्यांचें देव भांडवल । आणीक ते बोल न बोलती ॥ २ ॥
करिसील तो करीं संतांचा सांगात । आणीक ते मात नको मना ॥ ३ ॥
बैससी तरी बैस संतांच मधीं । आणीक ते बुद्धि नको मना ॥ ४ ॥
जासी तरी जाईं संतांचिया गांवां । होईल विसावा तेथें मना ॥ ५ ॥
तुका ह्मणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेईं ॥ ६ ॥

॥ ९४७ ॥

चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥ १ ॥
दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगीं साकर अवघी गोड ॥ २ ॥
तुका ह्मणे तैसा सज्जनापासून । पाहातां अवगुण मिळेचि ना ॥ ३ ॥

॥ ९४८ ॥

चिंतनें सरे तो धन्य जाणा काळ । सकळ मंगळ मंगळांचें ॥ १ ॥
संसारसिंधु नाहीं हरिदासां । गर्भवास कैसा नेणती ते ॥ २ ॥
जनवन ऐसें कृपेच्या सागरें । दाटला आभारें पांडुरंग ॥ ३ ॥
तुका ह्मणे देवा भक्तांचें बंधन । दाखविलें भिन्न परी एक ॥ ४ ॥

॥ ९४९ ॥

चिंता नाहीं गांवीं विष्णुदासांचिये । घोष जयजयकार सदा ॥ १ ॥
नारायण घरीं सांठविलें धन । अवघेची वाण तया पोटीं ॥ २ ॥
सवंग सकळां पुरे धणीवरी । सेवावया नारी नर बाळा ॥ ३ ॥
तुका ह्मणे येणें आनंदी आनंदु । गोविंदें गोविंदु पिकविला ॥ ४ ॥

॥ ९५० ॥

चोरासी चांदणें वेश्येसी सेजार । परिसेंसी खापर काय होय ॥ १ ॥
दुधाचे आधणीं वैरिले पाषाण । कदा काळीं जाण पाक नव्हे ॥ २ ॥
तुका ह्मणे जरि पूर्वपुण्यें सिद्धि । तरिच राहे बुद्धि संतसंगीं ॥ ३ ॥

॥ ९५१ ॥

जग ऐसें बहुनांवें । बहुभावें भावना ॥ १ ॥ पाहों बोलों बहु नये ।

सत्य काय सांभाळा ॥ २ ॥ कारियासी जें कारण । तें जतन करावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतजनीं । हेंचि मनीं धरावें ॥ ४ ॥

॥ ९५२ ॥

जडलों तों आतां पायीं । ह्योऊं काई वेगळा ॥ १ ॥ तुह्मीं संतीं कृपा केली । गंगे चाली ओघाची ॥ २ ॥ सांभाळिलों मायबापा । केलों तापावेगळा ॥३॥ वोरसें या जीव धाला । तुका ठेला मौन्यची ॥ ४ ॥

॥ ९५३ ॥

जन्मा येऊनि तया लाभ जाला । बिडवई भेटला पांडुरंगा ॥ १ ॥ संसारदुःखें नासिलीं तेणें । उत्तम हें केणें नामघोष ॥ २ ॥ धन्य ते संत सिद्ध महानुभाव । पंढरीचा ठाव टाकियेला ॥ ३ ॥ प्रेमदाते तेच पतितपावन । धन्य दरुषण होय त्याला ॥४॥ पावटणिया पंथें जालिया सिद्धि । वोळगे समाधि सायुज्यता ॥५॥ प्रेम अराणूक नाहीं भय धाक। मज तेणें सुखें कांहीं चिंता ॥६॥ तें दुर्लभ संसारासी। जडजीव उद्धार लोकासी ॥ ७ ॥ तुका ह्मणे त्यासी । धन्य भाग्य दरुषणें ॥८॥

॥ ९५४ ॥

जायाचें शरीर जाईल क्षणांत । कां हा गोपीनाथ पावेचि ना ॥ १ ॥ तुह्मी संत सारे कृपेचे सागर । माझा निरोप फार सांगा देवा ॥२॥ अनाथ अज्ञान कोणी नाहीं त्याला । पायांपें विठ्ठला ठेवीं मज ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसी करा निरवण । मग तो रक्षण करील माझें ॥ ४ ॥

॥ ९५५ ॥

जन्मा आलों त्याचें । आजि फळ जालें साचें ॥ १ ॥ तुह्मीं सांभाळिलें संतीं । भय निरसली खंती ॥२॥ कृतकृत्य जालों । इच्छा केली ते पावलों ॥ ३ ॥ तुका ह्मणे काळ । आतां करूं न शके बळ ॥ ४ ॥

॥ ९५६ ॥

जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि दैवाचा पुतळा॥१॥आणीक नये माझ्या मना । हो का पंडित शाहाणा ॥२॥ नामरूपीं जडलें चित्त । त्याचा दास मी अंकित ॥३॥ तुका ह्मणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध ॥४॥

॥ ९५७ ॥

जिचें पीडे बाळ । प्राण तियेचा विकळ ॥ १ ॥ ऐसा मातेचा स्वभाव । सूत्र दोरी एक जीव ॥ २ ॥ सुखाची विश्रांति । उमटे मातेचिये चित्तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे संत । तुह्मीं बहु कृपावंत ॥ ४ ॥

॥ ९५८ ॥

जैसें तैसें बाळ मातेसी आवडे । बोलतां बोबडे शब्द गोड ॥ १ ॥ आपुले आवडी लेववी खाववी । पाहोनियां जीवीं सुख वाढे ॥ २ ॥ तुका ह्मणे काय देऊं परिहार । काय तें साचार जाणतसें ॥ ३ ॥

॥ ९५९ ॥

जुंझार ते एक विष्णुदास जगीं । पापपुण्य अंगीं नातळे त्यां ॥ १ ॥ गोविंद आसनीं गोविंद शयनीं । गोविंद त्यां मनीं बैसलासे ॥ २ ॥ ऊर्ध्व पुंड्र भाळीं कंठीं शोभे माळ । कांपिजे कळिकाळ तया भेणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे शंखचक्रांचे शृंगार । नामामृतसार मुखामाजी ॥ ४ ॥

॥ ९६० ॥

जे कां रंजले गांजले । त्यांसि ह्मणे जो आपुले ॥ १ ॥ तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥२॥ मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥ ३ ॥ ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥ ४ ॥ दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥ ५ ॥ तुका ह्मणे सांगूं किती । तोचि भगवंताची मूर्ती ॥ ६ ॥

॥ ९६१ ॥

जें ज्याचें जेवण । तेंचि याचकासी दान ॥ १ ॥ आतां जाऊं चोजवीत । जेथें बैसतील संत ॥ २ ॥ होतीं धालीं पोटें । मागें उरलीं उच्छिष्टें ॥ ३ ॥ तुका ह्मणे धांव । पुढें खुंटईल हांव ॥ ४ ॥

॥ ९६२ ॥

जेथें जावें तेथें कपाळ सरिसें । लाभ तो विशेषें संतसंगें ॥ १ ॥ पूर्व पुण्यें जरि होतीं सानुकूळ । अंतरायमूळ नुपजे तेथें ॥ २ ॥

भाग्य तरी नव्हे धन पुत्र दारा । निकट वास बरा संतांपायीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे हेचि करावी मिरासी । बळी संतांपाशीं द्यावा जीव ॥ ४ ॥

॥ ९६३ ॥

जेथें वैष्णवांचा वास । धन्य भूमी पुण्य देश ॥१॥ दोष नाहीं ओखदासी । दूत सांगे यमापाशीं ॥२॥ गरुडटकयांच्या भारें । भूमि गर्जे जयजयकारें॥ ३॥ सहज तयां जनां छंद । वाचे गोविंद गोविंद ॥ ४ ॥ तुळसीवनें रंगमाळा । अवघा वैकुंठ सोहळा ॥५॥ तुका ह्मणे भेणें । काळ नये तेणें राणें ॥६॥

॥ ९६४ ॥

ज्याचा ऐसा अनुभव । विश्व देव सत्यत्वें ॥ १ ॥ देव तया जवळी असे । पाप नासे दर्शनें ॥ २ ॥ कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं जाली समता ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेदाभेद । गेले वाद खंडोनि ॥ ४ ॥

॥ ९६५ ॥

ज्यासी आवडी हरिनामांची । तोचि एक बहु शुचि ॥ १ ॥ जपतो हरिनाम बीज । तोचि वर्णांमाजी द्विज ॥ २ ॥ तुका ह्मणे वर्णा धर्म । अवघें आहे सम ब्रह्म ॥ ३ ॥

॥ ९६६ ॥

झंविली महारें । त्याची व्याली असे पोरें ॥ १ ॥ करी संतांचा मत्सर । कोपें उभारोनि कर ॥ २ ॥ बीज तैसें फळ । वरी आलें अमंगळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठावें । ऐसें जालें अनुभवें ॥ ४ ॥

॥ ९६७ ॥

तरिच होय वेडी । नग्न होय धडफुडी ॥ १ ॥ काय बोलाचें गौरव । आंत वरी दोन भाव ॥२॥ मृगजळा न्याहाळितां । तान न वजाये सेवितां ॥३॥ न पाहे आणिकांची आस । शूर बोलिजे तयास ॥४॥ तुका ह्मणे या लक्षणें । संत अळंकार लेणें ॥५॥

॥ ९६८ ॥

तरी सदा निर्भर दास । चिंता आस विरहित ॥ १ ॥ अवघाच एकीं

ठाव । सर्व भाव विठ्ठलीं ॥२॥ निरविलें तेव्हां त्यास । जाला वास त्यामाजी ॥३॥ तुका ह्मणे रूप ध्यावें । नाहीं ठावे गुणदोष ॥ ४ ॥

॥ ९६९ ॥

तीर्थाटणें एकें तपें हुंबरती । नाथिले धरिती अभिमान ॥ १ ॥
तैसे विष्णुदास नव्हती साबडे । एकाचिया पडे पायां एक ॥ २ ॥
अक्षरें आणिती अंगासी जाणीव । इच्छा ते गौरव पूज्य व्हावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे विधिनिषेधाचे डोहीं । पडले त्यां नाहीं देव कधीं ॥४ ॥

॥ ९७० ॥

तीर्थें फळती काळें जन्में आगळिया । संतदृष्टी पाया हेळामात्रें ॥ १ ॥
सुखाचे सुगम वैष्णवांचे पाय । अंतरींचा जाय महाभेद ॥ २ ॥
काळेंही न सरे तपें समाधान । कथे मूढजन समाधिस्थ ॥ ३ ॥
उपमा द्यावया सांगतां आणिक । नाहीं तिन्ही लोक धुंडाळितां ॥ ४ ॥
तुका ह्मणे मी राहिलों येणें सुखें । संतसंगें दुःखें नासावया ॥ ५ ॥

॥ ९७१ ॥

तुह्मी पाय संतीं । माझे ठेवियेले चित्तीं ॥ १ ॥ आतां बाधूं न सके काळ । जालीं विषम शीतळ ॥ २ ॥ भय नाहीं मनीं । देव वसे घरीं रानीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भये । आतां स्वप्नींही तें नये ॥ ४ ॥

॥ ९७२ ॥

तुह्मी संत मायबाप कृपावंत । काय मी पतित कीर्ती वाणूं ॥ १ ॥
अवतार तुह्मां धराया कारण । उद्धरावे जन जड जीव ॥ २ ॥
वाढविलें सुख भक्ति भाव धर्म । कुळाचार नाम विठोबाचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे गुण चंदनाचे अंगीं । तैसे तुह्मी जगीं संतजन ॥ ४ ॥

॥ ९७३ ॥

तुह्मी साधु संत कैवल्यसागर । मोक्षाचें आगर तुह्मां घरीं ॥१॥
तेथें मतिमंद काय बोलों वाणी । अमृताचे धणी पाणी कां द्या ॥२॥
कोटि भानु तेजीं खद्योत बापुडें । तैसा तुह्मांपुढें काय बोलों ॥३॥
तुह्मी अवघे चिंतामणि कल्पतरूंचीं वनें । त्यापुढें धांवणें मशकांनीं ॥४॥

बाराणशीक्षेत्र गंगा वाहे कोड । काय तेथें पाड कोकणाचे ॥५॥
पल्लवाचा वारा हिमकरीं काय । गगनावरी छाय कोण करी ॥६॥
समुद्राची तृषा हरी ऐसा कोण । जगाची जी तान्ह निववितो ॥७॥
मेरूचा पाठार अवघी ते क्षिति । मशकाचे हातीं मुष्टि फावे ॥८॥
सिंहापुढें काय जंबूक आरोळी । मोतियांचे वोळी कांच काय ॥९॥
कापुरासी काय लावूनी उटावें । काय ओंवाळावें दीपकासी ॥१०॥
तसे तुह्मी निरे ज्ञानाचे भरींव । तेथें म्यां बोलावें पाड काय ॥११॥
कृपानिधि तुह्मीं बोलविलें बोला । सुखें न्याय केला तुमचा मीं ॥१२॥
अज्ञान मी वेडें ह्मणवितों बाळ । माझा प्रतिपाळ करणें तुह्मां ॥१३॥
बोबडें बोलणें न धरावा कोप । क्षमा करा बाप कृपासिंधु ॥१४॥
तुका ह्मणे तुह्मी संत बापमाय । भयें धरिले पाय कृपानिधि ॥१५॥

॥ ९७४ ॥

तुमचिये दासींचा दास करूनि ठेवा । आशीर्वाद द्यावा हाचि मज ॥ १॥
नवविधा काय बोलिली जे भक्ती । घ्यावी माझ्या हातीं संतजनीं ॥ २ ॥
तुका ह्मणे तुमच्या पायांच्या आधारें । उतरेन खरें भवनदी ॥ ३ ॥

॥ ९७५ ॥

तृषाकाळीं उदकें भेटी। पडे मिठी आवडीची॥ १ ॥ ऐसियाचा हो कां संग । जिवलग संतांचा ॥ २ ॥ मिष्टान्नाचा योग भुके । ह्मणतां चुके पुरेसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माते बाळा । कळवळा भेटीचा ॥ ४ ॥

॥ ९७६ ॥

तेंच किती वारंवार । बोलों फार बोलिलें ॥ १ ॥ आतां माझें दंडवत । तुमच्या संत चरणांसी ॥ २ ॥ आवडी ते नीच नवी । जाली जीवीं वसती ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरवें जालें । घरा आलें बंदरींचें ॥ ४ ॥

॥ ९७७ ॥

ते माझे सोयरे सज्जन सांगाती । पाय आठविती विठोबाचे ॥ १ ॥

---

१ 'पार' असा कांहीं प्रतींत पाठ आहे.

येरा मान विधि पाळणापुरतें । देवाचीं तीं भूतें ह्मणोनियां ॥ २ ॥
सर्व भावें जालों वैष्णवांचा दास । करीन त्यांच्या आस उच्छिष्टाची॥ ३॥
तुका ह्मणे जैसे मानती हरिदास । तैशी नाहीं आस आणिकांची ॥ ४ ॥

॥ ९७८ ॥

तेथें सुखाची वसति । गाती वैष्णव नाचती । दिंड्या पताका झळकती । गर्जती हरिनामें ॥ १॥ दोषा जाली घेघेमारी । पळती भरले दिशा चारी । न येती माघारीं । नाहीं उरी परताया॥ २॥ विसरोनि देवपणा । उभा पंढरीचा राणा । विटोनि निर्गुणा । रूप धरिलें गोजिरें ॥ ३॥ पोट सेवितां न धाये । भूक भुकेलीच राहे । तुका ह्मणे पाहे । कोण आस मुक्तीची ॥ ४ ॥

॥ ९७९ ॥

त्यांचिया चरणा माझें दंडवत । ज्यांचें धनवित्त पांडुरंग ॥ १ ॥
येथें माझा जीव पावला विसांवा । ह्मणऊनि हांवा भरलासे ॥ २ ॥
चरणींचे रज लावीन कपाळा । जीं पदें राउळा सोई जाती ॥ ३ ॥
आणिक तीं भाग्यें येथें कुरवंडी । करूनियां सांडीं इंद्राऐसी ॥ ४ ॥
वैष्णवांचे घरीं देवाची वसति । विश्वास हा चित्तीं सत्यभावें ॥ ५ ॥
तुका ह्मणे सखे हरिचे ते दास । आतां पुढें आस नाहीं दुजी ॥ ६ ॥

॥ ९८० ॥

त्रिविध कर्माचे वेगळाले भाव । निवडूनि ठाव दाखविला ॥ १ ॥
आलियाचा झाडा राहिल्याचा ठाव । सुख गौरव संतां अंगीं ॥ २ ॥
हिशेबें आलें तें सकळांसी प्रमाण । तेथें नाहीं आन चालों येत ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं पापपुण्य खतीं । झाड्याची हुजती हातां आली ॥ ४ ॥

॥ ९८१ ॥

दसरा दिवाळी तोचि आह्मां सण । सखे संतजन भेटतील ॥ १ ॥
आमुप जोडल्या सुखाचिया राशी । पार या भाग्यासी न दिसे आतां ॥ २॥
धन्य दिवस आजी जाला सोनियाचा । पिकली हे वाचा रामनामें ॥ ३॥
तुका ह्मणे काय होऊं उतराई । जीव ठेवूं पायीं संतांचिये ॥ ४ ॥

॥ ९८२ ॥

दास झालों हरिदासांचा । बुद्धिकायामनेंवाचा ॥ १ ॥ तेथें प्रेमाचा सुकाळ । टाळमृदंगकल्लोळ । नासे दुष्टबुद्धि सकळ । समाधि हरिकीर्तनीं ॥ २ ॥ ऐकतां हरिकथा । भक्ति लागे त्या अभक्तां ॥ ३ ॥ देखोनि कीर्तनाचा रंग । कैसा उभा पांडुरंग ॥ ४ ॥ हें सुख ब्रह्मादिकां । ह्मणे नाहीं नाहीं तुका ॥ ५ ॥

॥ ९८३ ॥

दासां सर्व काळ । तेथें सुखाचा कल्लोळ ॥ १ ॥ जेथें वसती हरिचे दास । पुण्य पिके पापा नास ॥ २ ॥ फिरे सुदर्शन । घेऊनियां नारायण ॥ ३ ॥ तुका ह्मणे घरीं । होय ह्मणियारा कामारी ॥ ४ ॥

॥ ९८४ ॥

देवाची पूजा हे भूताचें पाळण । मत्सर तो सीण बहुतांचा ॥ १ ॥ रुसावें फुगावें आपुलियावरी । उरला तो हरि सकळही ॥ २ ॥ तुका ह्मणे संतपण याचि नांवें । जरि होय जीव सकळांचा ॥ ३ ॥

॥ ९८५ ॥

दुष्ट भूषण सज्जनाचें । अलभ्यलाभ पुण्य त्याचें ॥ १ ॥ धन्य ऐसा परउपकारी । जाय नरका आणिकांवारी ॥ २॥ मळ खाये संवदणी । करी आणिकांची उजळणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचा । प्रीती आदर करा साचा ॥ ४ ॥

॥ ९८६ ॥

देवाचा भक्त तो देवासीच गोड । आणिकांसी चाड नाहीं त्याची ॥ १ ॥
कवणाचा सोइरा नव्हेच सांगाती । अवघियां हातीं अंतरला ॥ २ ॥
निष्काम वेडें ह्मणती बापुडें । अवघियां सांकडें जाला कैसा ॥ ३ ॥
माझें ऐसें तया न ह्मणती कोणी । असे रानीं वनीं भलते ठायीं ॥ ४ ॥
प्रात:स्नान करी विभूतिचर्चन । देखोनियां जन निंदा करी ॥ ५ ॥
कंठीं तुळसीमाळा बैसोनि निराळा । ह्मणती या चांडाळा काय जालें ॥ ६ ॥
गातां शंका नाहीं बैसे भलते ठायीं । शिव्या देती आईबाप भाऊ ॥ ७ ॥

घरीं बाइल ह्मणे कोठें व्याली रांड । बरें होतें षंढ मरता तरी ॥८॥
जन्मोनि जाला अवघियां वेगळा । ह्मणोनि गोपाळा दुर्लभ तो ॥९॥
तुका ह्मणे जो संसारा रुसला । तेणेंचि टाकिला सिद्ध पंथ ॥१०॥

॥ ९८७ ॥

देवासी अवतार भक्तांसी संसार । दोहींचा विचार एकपणें ॥ १ ॥
भक्तांसी सोहळे देवाचिया अंगें । देव त्यांच्या संगें सुख भोगी ॥२॥
देवें भक्तां रूप दिलासे आकार । भक्तीं त्याचा पार वाखाणिला ॥३॥
एका अंगीं दोन्ही जालीं हीं निर्माण । देवभक्तपण स्वामिसेवा ॥ ४ ॥
तुका ह्मणे येथें नाहीं भिन्नभाव । भक्त तोचि देव देव भक्त ॥ ५ ॥

॥ ९८८ ॥

धनें वित्तें कुळें । अवघियानें ते आगळें ॥१॥ ज्याचे नारायण गांठीं । भरला हृदय संपुटीं ॥ २ ॥ अवघेंचि गोड । त्याचें पुरलें सर्व कोड ॥ ३ ॥ तुका ह्मणे अस्त । उदय त्याच्या तेजा नास्त ॥ ४ ॥

॥ ९८९ ॥

धन्य ते संसारीं । दयावंत जे अंतरीं ॥ १ ॥ येथें उपकारासाठीं । आले घर ज्यां वैकुंठीं ॥ २ ॥ लटिकें वचन । नाहीं देहीं उदासीन ॥ ३ ॥ मधुरा वाणी ओटीं । तुका ह्मणे वाव पोटीं ॥ ४ ॥

॥ ९९० ॥

धन्य दिवस आजी दर्शन संतांचें । नांदे तयां घरीं दैवत पंढरीचें ॥ १ ॥ धन्य पुण्यरूप कैसा जाला संसार । देव आणि भक्त दुजा नाहीं विचार ॥ २ ॥ धन्य पूर्व पुण्य वोडवलें निरुतें । संतांचें दर्शन जालें भाग्यें बहुतें ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य आह्मां जोडली जोडी । संतांचें चरण आतां जीवें न सोडीं ॥ ४ ॥

॥ ९९१ ॥

धन्य आजि दिन । जालें संताचें दर्शन ॥१॥ जाली पापातापा तुटी । दैन्य गेलें उठाउठीं ॥२॥ जालें समाधान । पायीं विसांवलें मन ॥३॥ तुका ह्मणे आले घरा । तोचि दिवाळीदसरा ॥४॥

॥ ९९२ ॥

धन्य काळ संतभेटी । पायीं मिठी पडिली तो ॥ १ ॥ संदेहाची सुटली गांठी । जालें पोटीं शीतळ ॥ २ ॥ भवनदीचा जाला तारा । या उत्तारा प्रसादें ॥३॥ तुका ह्मणे मंगळ आतां । कोण दाता याहूनि ॥४॥

॥ ९९३ ॥

धरावा तो बरा । ठाव वसतीचा थारा ॥ १ ॥ निजल्या जागविती । निज पूरवूनि देती ॥२॥ एक वेवसाव । त्यांचा संग त्यांचा जीव॥३॥ हितें केलें हित । ग्वाही एक एकां चित्त ॥ ४ ॥ विषमाच कांहीं । आड तया एक नाहीं ॥५॥ तुका ह्मणे बरीं । घरा येतील त्यापरी ॥६॥

॥ ९९४ ॥

ध्यानीं योगीराज बैसले कपाटीं । लागे पाठोवाठीं तयांचिया ॥ १ ॥ तान भूक त्यांचें राखे शीत उष्ण । जाले उदासीन देहभाव ॥ २ ॥ कोण सखें तया आणीक सोयरें । असे त्यां दुसरें हरीविण ॥ ३ ॥ कोण सुख त्यांच्या जीवासि आनंद । नाहीं राज्यमद घडी तयां ॥४॥ तुका ह्मणे विष अमृतासमान । कृपा नारायण करितां होय ॥ ५ ॥

॥ ९९५ ॥

न करावी स्तुति माझी संतजनीं । होईल या वचनीं अभिमान ॥१॥ भारें भवनदी नुतरवे पार । दुरावती दूर तुमचे पाय ॥ २ ॥ तुका ह्मणे गर्व पुरवील पाठी । होईल माझ्या तुटी विठोबाची ॥ ३ ॥

॥ ९९६ ॥

नमावे पाय हें माझें उचित । आशीर्वादें हित तुमचिया ॥ १ ॥ कृपेचा वोरस न समाये पोटीं । ह्मणोनि उफराटीं वचनें हीं ॥ २ ॥ तुमची उष्टावळी हें माझें भोजन । झाडावें अंगण केरपुंजे ॥ ३ ॥ परि ऐसें पुण्य नाहीं माझे गांठीं । जेणें पडे मिठी पायांसवें ॥ ४ ॥ तुका ह्मणे राहे आठवण चित्तीं । ऐसी कृपा संतीं केली तुह्मीं ॥५॥

॥ ९९७ ॥
न मनावी चिंता तुह्मीं संतजनीं। हिरा स्फटिकमणी केंवि होय ॥ १ ॥
पडिला प्रसंग स्थळा त्या सारिखा। देखिला पारिखा भाव कांहीं ॥२॥
बहुतांसी भय एकाचिया दंडें। बहुत या तोंडें वचनासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं वैखरी बा सर। करायाचे चार वेडे वेडे ॥ ४ ॥

॥ ९९८ ॥
न लगे चंदना सांगावा परिमळ। वनस्पतिमेळ हाकारूनी ॥ १ ॥
अंतरींचें धांवे स्वभावें बाहेरी। धरितां ही परी आवरेना ॥ २ ॥
सूर्य नाहीं जागें करीत या जना। प्रकाश किरणा कर म्हून ॥ ३ ॥
तुका ह्मणे मेघ नाचवी मयूरें। लपवितां खरें येत नाहीं ॥ ४ ॥

॥ ९९९ ॥
नव्हें हें गुरुत्व मेघवृष्टि वाणी। ऐकावी कानीं संतजनीं ॥ १ ॥
आरुष हा शब्द देवाचा प्रसाद। करविला वाद तैसा केला ॥ २ ॥
देहपिंड दान दिला एकसरें। मुळिचें तें खरें टांकसाळ ॥ ३ ॥
तुका ह्मणे झरा लागला नवनीत। सेविलिटा हित पोट धाय ॥ ४ ॥

॥ १००० ॥
नव्हती ते संत करितां कवित्व। संताचे ते आप्त नव्हती संत ॥ १ ॥
येथें नाहीं वेश सरतें आडनांवें। निवडे घावडाव व्हावा अंगीं ॥ २ ॥
नव्हती ते संत धरितां भोंपळा। पांघरती वाकळा नव्हती संत ॥ ३ ॥
नव्हती ते संत करितां कीर्तन। सांगतां पुराणें नव्हती संत ॥ ४ ॥
नव्हती ते संत वेदाच्या पठणें। कर्म आचरणें नव्हती संत ॥ ५ ॥
नव्हती संत करितां तप तीर्थाटण। सेविलिया वन नव्हती संत ॥६॥
नव्हती संत माळामुद्रांच्या भूषणें। भस्मउध्दूळणें नव्हती संत ॥ ७ ॥
तुका ह्मणे नाहीं निरसला देह। तोंवरी हे अवघे संसारिक ॥ ८ ॥

॥ १००१ ॥
नव्हतो माझे बोल जाणां हा निर्धार। मी आहें मजूर विठोबाचा ॥१॥

निर्धार वचन सोडविलें माझ्या । कृपाळुवें लज्जा राखियेली ॥ २ ॥
निर्भर मानसीं जालों आनंदाचा । गोडावली वाचा नामघोषें ॥ ३ ॥
आतां भय माझें नासलें संसारीं । जालोंसें यावरी गगनाचा ॥ ४ ॥
तुका ह्मणे हा तों संतांचा प्रसाद । लाधलों आनंद प्रेमसुख ॥ ५ ॥

॥ १००२ ॥

नाचे टाळी पिटी । प्रेमें अंग धरणीं लोटी ॥ १ ॥ माझे सखे ते स-
ज्जन । भोळे भाविक हरिजन ॥२॥ न धरिती लाज । नाहीं जना-
सवें काज ॥ ३ ॥ तुका ह्मणे दाटे । कंठ नेत्रीं जळ लोटे ॥ ४ ॥

॥ १००३ ॥

नाहीं संतपण मिळत हें हाटीं । हिंडतां कपाटीं रानीं वनीं ॥ १ ॥
नये मोल देतां धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ॥२॥
तुका ह्मणे मिळे जिवाचिये साटीं । नाहीं तरी गोष्टी बोलों नये ॥३॥

॥ १००४ ॥

नाहीं साजत हा मोठा । मज अळंकार खोटा ॥ १ ॥ असें तुमचा
रजरेण । संतां पायींची वाहाण ॥ २ ॥ नाहीं स्वरूपीं ओळखी ।
भक्तिभाव करीं देखीं ॥ ३ ॥ नाहीं शून्याकारीं । क्षर ओळखी अ-
क्षरीं ॥४॥ नाहीं विवेक या ठायीं । आत्मा अनात्मा तें काई ॥ ५ ॥
कांहीं नव्हे तुका । पायां पडेन हें एका ॥ ६ ॥

॥ १००५ ॥

निजसेजेची अंतुरी । पादलिया कोण मारी ॥ १ ॥ तैसा आह्मासी
उबगतां । तुका विनविती संतां ॥ २ ॥ मूळ मांडीवरी हागलें । तें
बा कोणें रे त्यागिलें ॥ ३ ॥ दासी कामासी चुकली । ते बा कोणें रे
विकली ॥ ४ ॥ पांडुरंगाचा तुका पापी । संतसाहें काळासी दापी ॥५॥

॥ १००६ ॥

नेणों काय नाड । आला उचित काळा आड ॥१॥ नाहीं जाली संत-
भेटी । येवढी हानी काय मोठी ॥२॥ सहज पायांपासीं । जवळी पा-
वलिया ऐसी ॥३॥ चुकी जाली आतां काय । तुका ह्मणे उरली हाय॥४॥

॥ १००७ ॥

पडोनियां राहीं । उगाच संतांचिये पायीं ॥ १ ॥ न लगे पुसणें सांगावें । चित्त शुद्ध करीं भावें ॥ २ ॥ सहज ते स्थिति । उपदेश-परयुक्ति ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव । जवळी धर्मनि आणि देव ॥ ४ ॥

॥ १००८ ॥

परमेष्ठिपदा । तुच्छ करिती सर्वदा ॥ १ ॥ हेंचि ज्यांचें धन । सदा हरीचें स्मरण ॥ २ ॥ इंद्रपदादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ॥ ३ ॥ सार्वभौम राज्य । त्यांसि कांहीं नाहीं काज ॥ ४ ॥ पाताळींचें आधिपत्य । ते तों मानिती विपत्य ॥ ५ ॥ योगसिद्धिसार । ज्यासि वाटे तें असार ॥ ६ ॥ मोक्षाऐवढें सुख । सुख नव्हेचि तें दुःख ॥ ७ ॥ तुका ह्मणे हरीविण । त्यासि अवघा वाटे सिण ॥ ८ ॥

॥ १००९ ॥

पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्व काळ ॥ १ ॥
तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील राशी पातकांच्या ॥ २ ॥
देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ॥ ३ ॥
काय त्यां उरलें वेगळें आणीक । वैकुंठनायक जयां कंठीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे देवभक्तांचा संगम । तेथें ओघ नाम त्रिवेणीचा ॥ ५ ॥

॥ १०१० ॥

पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास घेती जन्म ॥ १ ॥
कर्मधर्म त्याचे जाला नारायण । त्याचेनी पावन तिन्ही लोक ॥ २ ॥
वर्णअभिमानें कोण जाले पावन । ऐसें द्या सांगून मजपाशीं ॥ ३ ॥
अंत्यजादि योनि तरल्या हरिभजनें । तयाचीं पुराणें भाट जालीं ॥ ४ ॥
वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार । धागा हा चांभार रोहिदास ॥ ५ ॥
कबीर मोमीन लतिफ मुसलमान । सेना न्हावी जाण विष्णुदास ॥ ६ ॥
कान्होपात्र खोदु पिंजारी तो दादु । भजनीं अभेद हरिचे पायीं ॥ ७ ॥
चोखामेळा वंका जातीचा माहार । त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी ॥ ८ ॥
नामयाची जनी कोण तिचा भाव । जेवी पंढरीराव तियेसवें ॥ ९ ॥

मैराळ जनक कोण कुळ त्याचें । महिमान तयाचें काय सांगों ॥१०॥
यातायातीधर्म नाहीं विष्णुदासा । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥ ११ ॥
तुका ह्मणे तुह्मी विचारावे ग्रंथ । तारिले पतित नेणों किती ॥ १२ ॥

॥ १०११ ॥

पाप ताप दैन्य जाय उठाउठीं । जालिया भेटी हरिदासांचि ॥ १ ॥
ऐसें बळ नाहीं आणिकांचे अंगीं । तपें तिर्थें जगीं दानें व्रतें ॥ २ ॥
चरणींचें रज वंदी शूळपाणी । नाचती कीर्तनीं त्यांचे माथां ॥ ३ ॥
भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेदी पाव हात कांहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे मन जालें समाधान । देखिले चरण वैष्णवांचे ॥ ५ ॥

॥ १०१२ ॥

पाठीवरी भार । जातो वाहूनियां खर ॥१॥ संत नेतील त्या ठाया । माझी आधीन त्यां काया ॥ २ ॥ मोटेचौफळ । अंगीं उच्छिष्टाचें बळ ॥३॥ न संडी मारग । येथें न चोरूनि अंग ॥४॥ आपुलिया सत्ता । चालविती नाहीं चिंता ॥५॥ कळविला तुका । घराचार येथें नका ॥६॥

॥ १०१३ ॥

पायां पडावें हें माझें भांडवल । सरती हे बोल कोठें पायीं ॥ १ ॥
तरि हे सलगी कवतुक केलें । लडिवाळ धाकुलें असें बाळ ॥ २ ॥
काय उणें तुह्मां संतांचिये घरीं । विदित या परी सकळही ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझें उचित हे सेवा । नये करूं ठेवाठेवी कांहीं ॥ ४ ॥

॥ १०१४ ॥

पायांच्या प्रसादें । कांहीं बोलिलों विनोदें ॥ १ ॥ मज क्षमा करणें संतीं । नव्हे अंगभूत युक्ति ॥ २ ॥ नव्हे हा उपदेश । तुमचें बडबडिलों शेष ॥ ३ ॥ तुमचे कृपेचें पोसणें । जन्मोजन्मीं तुका ह्मणे ॥४॥

॥ १०१५ ॥

पाहुणे घरासी । आजी आले हृषीकेशी ॥ १ ॥ काय करूं उपचार । कोंप मोडकी जर्जर । कण्या दरदर । पाण्यामाजी रांधिल्या ॥ २ ॥

घरीं मोडकिया बाजा । वरी वाकळांच्या शेजा ॥ ३ ॥ मुखशुद्धि तुळसीदळ । तुका ह्मणे मी दुर्बळ ॥ ४ ॥

॥ १०१६ ॥

पाळितों वचन । परि बहु भीतें मन ॥ १ ॥ करितों पायांशीं सलगी । नये बैसों अंगसंगीं ॥ २ ॥ जोडोनियां कर । उभें असावें समोर ॥ ३ ॥ तुका ह्मणे संत । तुह्मी मी बहु पतित ॥ ४ ॥

॥ १०१७ ॥

पुण्य फळलें बहुतां दिवसां । भाग्यउदयाचा ठसा । जालों सन्मुख तो कैसा । संतचरण पावलों ॥ १ ॥ आजि फिटलें माझें कोडें । भवदुःखाचें सांकडें । कोंदाटलें पुढें । परब्रह्म सांवळें ॥ २ ॥ आलिंगणें संतांचिया । दिव्य जाली माझी काया । मस्तक हा पायां । वरी त्यांच्या ठेवितों ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन्य झालों । सुखें संतांचिया धालों । लोटांगणीं आलों । पुढें भार देखोनी ॥ ४ ॥

॥ १०१८ ॥

पुण्यवंत व्हावें । घेतां सज्जनांचीं नांवें ॥१॥ नेघे माझे वाचे तुटी । महा लाभ फुकासाटीं ॥ २ ॥ विश्रांतीचा ठाव । पायीं संतांचिया भाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे पापें । जातीं संतांचिया जपें ॥ ४ ॥

॥ १०१९ ॥

पुनीत केलें विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ॥ १ ॥ कोण पाहे तयांकडे । वीर विठ्ठलाचे गाढे । अशुभ त्यांपुढें । शुभ होउनियां ठाके ॥ २ ॥ प्रेमसुखाचिया रासी । पाप नाहीं ओखदासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्यांनीं । केली वैकुंठ मेदिनी ॥ ४ ॥

॥ १०२० ॥

पूजा समाधानें । अतिशयें वाढे सीण ॥ १ ॥ हें तों जाणां तुह्मी संत । आहे बोलिली ते नीत ॥ २ ॥ पाहिजे तें केलें । सहज प्रसंगीं घडलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माथा । पायीं ठेवीं तुह्मां संतां ॥ ४ ॥

॥ १०२१ ॥

पूजा पुज्यमान । कथे उभे हरिजन ॥ १ ॥ ज्याची कीर्ति वाखाणिती । तेथें ओतली ते मुर्ती ॥ २ ॥ देहाचा विसर । केला आनंदें संचार ॥ ३ ॥ गेला अभिमान । लाज बोळविला मान ॥ ४ ॥ शोक मोह चिंता । याची नेणती ते वार्ता ॥ ५ ॥ तुका ह्मणे सखे । विठोबा च ते सारिखे ॥ ६ ॥

॥ १०२२ ॥

प्रमाण हें त्याच्या बोला । देव भक्ताचा अंकिला ॥ १ ॥ न पुसतां जातां नये । खालीं बैसतांही भिये ॥ २ ॥ अवघा त्याचा होत । जीव भावाही सहित ॥ ३ ॥ वदे उपचाराची वाणी । कांहीं मागे ह्मणऊनि ॥ ४ ॥ उदासीनाच्या लागें । तुका ह्मणे धांवे मागें ॥ ५ ॥

॥ १०२३ ॥

प्रारब्ध क्रियमाण । भक्तां संचित नाहीं जाण ॥ १ ॥ अवघा देवचि जाला पाहीं । भरोनियां अंतर्बाहीं ॥ २ ॥ सत्त्वरजतमबाधा । नव्हे हरिभक्तांसि कदा ॥ ३ ॥ खाय बोले करी । अवघा त्यांच्या अंगें हरी ॥ ४ ॥ देवभक्तपण । तुका ह्मणे नाहीं भिन्न ॥ ५ ॥

॥ १०२४ ॥

प्रेम देवाचें देणें । देहभाव जाय जेणें ॥ न धरावी मनें । शुद्धी देशकाळाची ॥१॥ मुक्त लज्जाविरहित । भाग्यवंत हरिभक्त ॥ जाले वोसंडत । नामकीर्तिपवाडे ॥२॥ जोडी जाली अविनाश । जन्मोनि जाले हरिचे दास ॥ त्यांस नव्हे गर्भवास । सौरस परब्रह्मीं ॥३॥ हेचि वाहाती संकल्प । पुण्यप्रसंगाचे जप ॥ तुका ह्मणे पाप । गांवीं नाहीं हरिजना ॥४॥

॥ १०२५ ॥

बरवी हे वेळ सांपडली संधि । साह्य जाली बुद्धि संचितासी ॥१॥
येणें पंथें माझीं चालिलीं पाउलें । दरुषण जालें संतां पायीं ॥२॥
त्रासिलें दरिद्रें दोषा जाला खंड । त्याचि काळें पिंड पुनीत जाला ॥३॥
तुका ह्मणे जाला अवघा व्यापार । आली येरझार फळासी हे ॥४॥

॥ १०२६ ॥

बरवें देशावर जालें । काय बोलें बोलावें ॥ १ ॥ लाभें लाभ दुणा-
वला । जीव धाला दर्शनें ॥ २ ॥ भाग्यें जाली संतभेटी । आवडी पोटीं
होती ते ॥ ३ ॥ तुका ह्मणे श्रम केला । अवघा आला फळासी ॥ ४ ॥

॥ १०२७ ॥

बहुतां जन्मींचें संचित । सबळ होय जरि बहुत । तरिचि होय हरि-
भक्त । कृपावंत मानसीं ॥ १ ॥ ह्मणवी ह्मणियारा तयांचा । दास
आपुल्या दासांचा । अनुसरले वाचा । काया मनें विठ्ठलीं ॥ २ ॥ असे
भूतदया मानसीं । अवघा देखे हृषीकेशी । जीवें न विसंबे त्यासी ।
मागें मागें हिंडतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे निर्विकार । शरणागतां वज्र-
पंजर । जे जे अनुसरले नर । तयां जन्म चुकलें ॥ ४ ॥

॥ १०२८ ॥

बहु भितों जाणपणा । आड न यो नारायणा । घेइन प्रेमपान्हा । भक्तिसुख
निवाडें ॥ १ ॥ यासी तुळे ऐसें कांहीं । दुजें त्रिभुवनीं नाहीं । काला भात
दहीं । ब्रह्मादिकां दुर्लभ ॥ २ ॥ निमिषार्ध संतसंगति । वास वैकुंठीं कल्पांतीं ।
मोक्षपदें होती । ते विश्रांती बापुडीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंचि देईं ।
मीतूंपणा खंड नाहीं । बोलिलों त्या नाहीं । अभेदाची आवडी ॥ ४ ॥

॥ १०२९ ॥

बोल बोलतां वाटे सोपें । करणी करितां टीर कांपे ॥ १ ॥ नव्हे
वैराग्य सोपारें । मज बोलतां न वाटे खरें ॥ २ ॥ विष खावें ग्रासो-
ग्रासीं । धन्य तोचि एक सोसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे करूनि दावी ।
त्याचे पाय माझे जीवीं ॥ ४ ॥

॥ १०३० ॥

बोलिलों ते धर्म अनुभव अंगें । काय पांडुरंगें उणें केलें ॥ १ ॥
सर्व सिद्धि पायीं वोळगती दासी । इच्छा नाहीं ऐसी व्हावें कांहीं ॥ २ ॥
संतसमागमें अळंकार वाणी । करूं हे पेरणी शुद्ध बीजा ॥ ३ ॥
तुका ह्मणे रामकृष्णनामें गोड । आवडीचें कोड माळ ओऊं ॥ ४ ॥

॥ १०३१ ॥

बोलिलों जैसें बोलविलें देवें । माझें तुह्मां ठावें जातिकुळ ॥ १ ॥
करा क्षमा कांहीं नका धरूं कोप । संत मायबाप दीनावरि ॥ २ ॥
वाचेचा चाळक जाला दावी वर्म । उचित ते धर्म मजपुढें ॥ ३ ॥
तुका ह्मणे घडे अपराध नेणतां । द्यावा मज आतां ठाव पायीं ॥ ४ ॥

॥ १०३२ ॥

ब्रह्म सर्वगत सदा सम । जेथें आन नाहीं विषम । तया जाणती ते अति दुर्गम । तयांचि भेटी जालिया भाग्य परम ॥१॥ ऐसे ऐसियानें भेटती ते साधु । ज्यान्च्या दरशनें तुटे भवबंधु । जे कां सच्चिदानंदीं नित्यानंदु । जे कां मोक्षसिद्धी तीर्थ वंदूं रे ॥२॥ भाव सर्व कारण मूळ बंदु । सदा समबुद्धि नास्तिक्यभेदु । भूतकृपा मोडी द्वेपकंदु । शत्रु मित्र पुत्र सम करी बंधु रे ॥३॥ मन बुद्धि काया वाचा शुद्ध करीं । रूप सर्वत्र देखोनि नमस्कारीं । लघुत्व सर्वभावें अंगीकारीं । सांडीमांडी मीतूंपण ऐसी थोरी रे ॥४॥ अर्थकामचाड नाहीं चित्ता । मानामान मोह माया मिथ्या । वर्ते समाधानीं जाणोनि नेणता । साधु भेट देती तया अवचिता रे ॥५॥ मनीं दृढ धरीं विश्वास । नाहीं सांडीमांडीचा सायास । साधुदर्शन नित्यकाळ त्यास । तुका ह्मणे जो विटला जाणिवेस रे ॥ ६ ॥

॥ १०३३ ॥

ब्रह्मज्ञान जरी कळे उठाउठी । तरि कां हिंपुटीं वेदशास्त्रें ॥ १ ॥
शास्त्रांचें भांडण जप तीर्थाटण । पूर्वीचें भ्रमण याचसाटीं ॥ २ ॥
याचसाटीं जप याचसाटीं तप । व्यासेंही अमुप ग्रंथ केले ॥ ३ ॥
याचसाटीं संतपाय हे सेवावे । तरिच तरावें तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १०३४ ॥

ब्रह्मज्ञान दारीं येतें काकुलती । अव्हेरिलें संतीं विष्णुदासीं ॥ १ ॥
रिघों पाहे माजी बळें त्याचें घर । दवडिती दूर ह्मणोनियां ॥ २ ॥
तुका ह्मणे येथें न चले सायास । पडिलें उदास त्याच्या गळां ॥ ३ ॥

॥ १०३५ ॥

भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारूनि ॥ १ ॥
विषय तो त्यांचा जाला नारायण । नावडे धन जन माता पिता ॥ २ ॥
निर्वाणीं गोविंद असे मागेंपुढें । कांहींच सांकडें पडों नेदी ॥ ३ ॥
तुका ह्मणे सत्य कर्मा व्हावें साह्य । घातलिया भये नर्का जाणें ॥ ४ ॥

॥ १०३६ ॥

भक्तांचा महिमा भक्तचि जाणती । दुर्लभ या गति आणिकांसी ॥ १ ॥
जाणोनि नेणते जाले तेणें सुखें । न बोलोनि मुखें बोलताती ॥ २ ॥
अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ॥ ३ ॥
टाळ घोष कथा प्रेमाचा सुकाळ । मूढ लोकपाळ तरावया ॥ ४ ॥
तुका ह्मणे हें तों आहे तयां ठावें । जिहीं एक्या भावें जाणीतलें ॥ ५ ॥

॥ १०३७ ॥

भक्तां समागमें सर्वभावें हरि । सर्व काम करी न सांगतां ॥ १ ॥
सांटवला राहे हृदयसंपुष्टीं । बाहेर धाकुटी मूर्ति उभा ॥ २ ॥
मागण्याची वास पाहे मुखाकडे । चिंतिल्या रोकडे मनोरथ ॥ ३ ॥
तुका ह्मणे जीव भाव देवापायीं । ठेवूनि ते कांहीं न मागती ॥ ४ ॥

॥ १०३८ ॥

भक्तांचीं सांकडीं स्वयें सोसी देव । त्यांपाशीं केशव सर्वकाळ ॥ १ ॥
जये ठायीं कीर्तन वैष्णव करिती । तेथें ह्या श्रीपति उभा असे ॥ २ ॥
तुका ह्मणे देव सर्वांठायीं जाला । भरुनी उरला पांडुरंग ॥ ३ ॥

॥ १०३९ ॥

भक्तांहूनि देवा आवडतें काइ । त्रिभुवनीं नाहीं आन दुजें ॥ १ ॥
नावडे वैकुंठ क्षीराचा सागर । धरोनी अंतर राहे दासा ॥ २ ॥
सर्वभावें त्याचें सर्वस्वेंही गोड । तुळसीदळ कोड करुनी घ्यावें ॥ ३ ॥
सर्वस्वें त्याचा ह्मणवी विकिला । चित्त द्यावें बोला सांगितल्या ॥ ४ ॥
तुका ह्मणे भक्तिसुखाचा बांधिला । आणीक विठ्ठला धर्म नाहीं ॥ ५ ॥

॥ १०४० ॥

भक्तिसुखें जे मातले । ते कळिकाळा शूर जाले ॥ १ ॥ हातीं बाण हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ॥ २ ॥ महां दोषां आला त्रास । जन्ममरणां केला नास ॥ ३ ॥ सहस्रनामाची आरोळी । एक एकाहूनि बळी ॥ ४ ॥ नाहीं आणिकांचा गुमान । ज्याचें अंकित त्यावांचून ॥ ५ ॥ तुका ह्मणे त्यांच्या घरीं । मोक्षसिद्धी या कामारी ॥ ६ ॥

॥ १०४१ ॥

भल्याचें कारण सांगावें स्वहित । जैसी कळे नीत आपणासी ॥ १ ॥ परी आह्मी असों एकाचिये हातीं । नाचवितो चित्तीं त्याचें तैसें ॥२॥ वाट सांगे त्याच्या पुण्या नाहीं पार । होती उपकार अगणित ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुह्मी बहु कृपावंत । आपुलें उचित केलें संतीं ॥ ४ ॥

॥ १०४२ ॥

भाग्यवंतां हेंचि काम । मापी नाम वैखरी ॥ १ ॥ आनंदाची पुष्टि अंगीं । श्रोते संगीं उद्धरती ॥ २ ॥ पिकविलें तया खाणें किती । पंगतीस सुकाळ ॥३॥ तुका करी प्रणिपात । दंडवत आचारियां ॥४॥

॥ १०४३ ॥

भाग्यवंता ऐशी जोडी । परवडी संतांची ॥ १ ॥ धन घरीं पांडुरंग । अभंग जें सरेना ॥ २ ॥ जनाविरहित हा लाभ । टांचें नभ सांटवणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे विष्णुदासां । नाहीं आशा दुसरी ॥ ४ ॥

॥ १०४४ ॥

भाग्याचा उदय । ते हे जोडी संतपाय ॥ १ ॥ येथूनियां तुटो माथा । मरणावांचूनि सर्वथा ॥ २ ॥ होईं बळकट । माझ्या मना रे तूं धीट ॥ ३ ॥ तुका आला लोटांगणीं । भक्तिभाग्यें जाली धणी ॥४॥

॥ १०४५ ॥

भाते भरूनि हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ॥१॥ अनंतनामाची

१. वरील अभंग १०४० पहा.

आरोळी । एक एकाहूनि बळी ॥२॥ नाहीं आणिकांचा गुमान। ज्याचे अं-
कित त्यावांचून॥ ३॥रिद्धि सिद्धि ज्या कामारी।तुका ह्मणे ज्याचे घरीं ॥४॥

॥ १०४६ ॥

भार देखोनि वैष्णवांचे । दूत पळाले यमाचे ॥ १ ॥ आले आले वै-
ष्णव वीर । काळ कांपती असुर ॥२॥ गरुडटकयाच्या भारें । भूमी
गर्जे जयजयकारें ॥ ३ ॥ तुका ह्मणे काळ । पळे देखोनियां बळ ॥४॥

॥ १०४७ ॥

भावबळें विष्णुदास । नाहीं नाश पावत ॥ १ ॥ योगभाग्यें घरा
येती । सर्व शक्ति चालत ॥ २ ॥ पित्याचें जें काय धन । पुत्रा कोण
वंचील ॥ ३ ॥ तुका ह्मणे कडे बैसों । तेणें असों निर्भर ॥ ४ ॥

॥ १०४८ ॥

भुंकुनियां सुनें लागे हस्तीपाठी । होऊनि हिंपुटी दुःख पावे ॥ १ ॥
काय त्या मशकें तयाचें करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे ॥ २ ॥
मातलें बोकड विटवी पंचानना । घेतलें मरणा धरणें तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे संतां पीडितील खळ । घेती तोंड काळें करूनियां ॥ ४ ॥

॥ १०४९ ॥

भूतदयापरत्वें जया तया परी । संत नमस्कारीं सर्वभावें ॥ १ ॥
शिकल्या बोलाचा धरीसील ताठा । तरी जासी वाटा यमपंथें ॥२॥
हिरा परिस मोहरा आणीक पाषाण। नव्हे परी जन संतां तैसी ॥३॥
सरितां वाहाळां गंगे सागरा समान। लेखी तयाहून अधम नाहीं ॥ ४ ॥
आणीक अमुप होती तारांगणें । रविशशिमानें लेखूं नये ॥ ५ ॥
तुका ह्मणे नाहीं नरमता अंगीं । नव्हे तें फिरंगी कठिण लोह ॥ ६ ॥

॥ १०५० ॥

भेणें पडे डोळसा । न कळे मृत्यु तो सीरसा ॥ १ ॥ कैसी जाली दिशा-
भुली । न वजातिये वाटे चाली ॥ २ ॥ संसाराची खंती । मावळल्या
तरी शक्ति ॥ ३ ॥ तुका ह्मणे हीणा। बुद्धि चुकली नारायणा ॥ ४ ॥

॥ १०५१ ॥

मनीं वसे त्याचें आवडे उत्तर । वाटे समाचार घ्यावा ऐसें ॥ १ ॥
जातीचें तें झुरे येर येरासाटीं । वियोगेंही तुटी नेघे कधीं ॥ २ ॥
भेटीची अपेक्षा वारता आदर । पुसे नव्हे धीर मागुतालें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझ्या जीवाचें जीवन । सोइरे हरिजन प्राणसखे ॥ ४॥

॥ १०५२ ॥

माउलीची चाली लेंकराचे ओढी । तयालागीं काढी प्राणें प्रीती ॥१॥
ऐसी बळिवंत आवडी जी देवा । संतमहानुभवा विनवितों ॥ २ ॥
मोहें मोहियेलें सर्वकाळ चित्त । विसरू तो घेत नाहीं क्षणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे दिला प्रेमाचा वोरस । सांभाळिलें दास आपुलें तें ॥ ४ ॥

॥ १०५३ ॥

मागें पुढें जालों लाटा । अवघा मोटा सरळ ॥ १ ॥ नाहीं कोठें रितें
अंग। नित्य रंग नवाचि ॥ २ ॥ पोसिंद्याचे पडिलों हातीं। माझे मातीं
थुकली ॥ ३ ॥ जोगावलों पोटीं खर। पाठीं भार वरि नाहीं ॥ ४ ॥
अवघिया मोकळ्या दिशा । नाहीं वोळसा कामाचा ॥५॥ संताचिये
लोळें द्वारीं । पळती दुरी गोमाशा ॥६॥ कांहीं न साहसा जाला ।
तुका नेला समर्थे ॥७॥ पाहातो गे महाद्वारीं । वरि झुली वाकळा ॥८॥

॥ १०५४ ॥

माझिये जातीचें मज भेटो कोणी। आवडीची धणी फेडावया॥ १ ॥
आवडे ज्या हरि अंतरापासूनि । ऐसियांचें मनीं आर्त माझें ॥ २ ॥
तयालागीं जीव होतो कासावीस । पाहातील वास नयन हे ॥ ३ ॥
सुफळ हा जन्म होईल तेथून । देतां आलिंगन वैष्णवांसी ॥ ४ ॥
तुका ह्मणे तोचि सुदिन सोहळा । गाऊं या गोपाळा धणीवरि ॥५॥

॥ १०५५ ॥

माझिया मीपणावर पडो पाषाण । जळों हें भूषण नाम माझें ॥ पाप
नाहीं पार दुःखाचे डोंगर । जालों ये भूमीसी ओझें ॥ १ ॥ काय
विटंबना सांगों किती । पाषाण फुटती ऐसें दुःख ॥ नरनारी सकळ

उत्तम चांडाळ । न पाहाती माझें मुख ॥ २ ॥ काया वाचा मनें अघटित करणें । चर्म चक्षु हात पाय ॥ निंदा द्वेष घात विश्वासीं व्यभिचार । आणीक सांगों किती काय ॥ ३ ॥ लक्ष्मीमदें मातें घडले बहुत दोष । पत्नी दोनी भेदाभेद ॥ पितृवचन घडली अवज्ञा अविचार । कुटिल कुचर वादी निंद्य ॥ ४ ॥ आणीक किती सांगों ते अवगुण । न वळे जिव्हा कांपे मन ॥ भूतदया उपकार नाहीं शब्दा धीर । विषयीं लंपट हीन ॥ ५ ॥ संत महानुभाव ऐका हें उत्तरें । अवगुण अविचारें वृद्धि पापा ॥ तुका ह्मणे सरतें करा पांडुरंगीं । शरण आलों मायबापा ॥ ६ ॥

॥ १०५६ ॥

मातेचिये चित्तीं । अवघी बाळकाची व्याप्ति ॥ १ ॥ देह विसरे आपुला । जवळी घेतां सीण गेला ॥२॥ दावी प्रेमभातें । आणि अंगावरी चढतें ॥ ३ ॥ तुका संतापुढें । पायीं झोंबे लाडें कोडें ॥ ४ ॥

॥ १०५७ ॥

माय वनीं धालया धाये । गर्भ आंवतणें न पाहे ॥ १ ॥ तैसें पूजितां वैष्णव । सुखें संतोषतो देव ॥ २ ॥ पुत्राच्या विजयें । पिता सुखातें जाये ॥३॥ तुका ह्मणे अमृतसिद्धि । हरे क्षुधा आणि व्याधि ॥ ४ ॥

॥ १०५८ ॥

मायेवरी सत्ता आवडीची बाळा । संकोचोनि लळा प्रतिपाळी ॥१॥ अपराध माझे न मानावे मनीं । तुह्मी संतजनीं मायबापीं ॥ २ ॥ आरुष वचन लेंकुराची आळी । साहोनि कवळी मागुताली ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंगीं काय नाहीं सत्ता । परि निष्ठुरता उपजेना ॥ ४ ॥

॥ १०५९ ॥

मुक्तिपांग नाहीं विष्णुचिया दासां। संसार तो कैसा न देखती ॥१॥ बैसला गोविंद जडोनियां चित्तीं । आदि तोचि अंतीं अवसानीं ॥२॥ भोग नारायणा देऊनि निराळीं । ओविया मंगळीं तोचि गाती ॥३॥ बळ बुद्धि त्यांची उपकारासाटीं । अमृत तें पोटीं सांटवलें ॥ ४ ॥

दयावंत तरी देवाच सारिखीं । आपुलीं पारखीं नोळखती ॥ ५ ॥
तुका ह्मणे त्यांचा जीव तोचि देव । वैकुंठ तो ठाव वसती ते ॥ ६ ॥

॥ १०६० ॥

मोकळें मन रसाळ वाणी । याचि गुणीं संपन्न ॥ १ ॥ लक्ष्मी ते ऐशा नांवें । भाग्यें ज्यावें तरि त्यांनीं ॥ २ ॥ नम्रन नम्रता अंगीं । नेघे रंगीं पालट ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याच्या नांवें । घेतां व्हावें संतोषी ॥ ४ ॥

॥ १०६१ ॥

येथींचिया अळंकारें । काय खरें पूजन ॥ १ ॥ वैकुंठींच्या लावूं वाटा । सर्व साटा ते ठायीं ॥ २ ॥ येथींचिया नाशवंतें । काय रितें चाळवूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे वैष्णव जन । माझे गण समुदाय ॥ ४ ॥

॥ १०६२ ॥

येथें काम संशयाचें । नाहीं न धरा संकोच ॥ १ ॥ संत पूजा जीवें भावें । देह गेह समर्पावें ॥ २ ॥ जोडा सुकृत व्यापारा । पूजा नांवें हरी हरा ॥ ३ ॥ संतपायीं धरा भाव । आन नाहीं दुजा देव ॥ ४ ॥ नाना उपचार । सुख पावे सर्वेश्वर ॥ ५ ॥ तुका ह्मणे रे निश्चिती । संत विठोबाची मूर्ती ॥ ६ ॥

॥ १०६३ ॥

युक्ति तंव जाल्या कुंटित सकळा । उरली हे कळा जीवनाची ॥ १ ॥
संतचरणीं भावें ठेविलें मस्तक । जोडोनि हस्तक राहिलोंसें ॥ २ ॥
जाणपणें नेणें कांहींचि प्रकार । साक्षी तें अंतर अंतरासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मीं केलें अभयदान । तेणें समाधान राहिलेंसे ॥ ४ ॥

॥ १०६४ ॥

रवि दीप हिरा दाविती देखणें । अदृश्य दर्शनें संतांचेनी ॥ १ ॥
त्यांचा महिमा काय वर्णूं मी पामर । न कळे तो साचार ब्रह्मादिकां ॥ २ ॥
तापली चंदन निववितो कुडी । त्रिगुण तो काढी संतसंग ॥ ३ ॥
मायबापें पिंड पाळियेला माया । जन्ममरण जाया संतसंग ॥ ४ ॥
संतांचें वचन वारी जन्मदुःख । मिष्टान्न तें भूकनिवारण ॥ ५ ॥
तुका ह्मणे जवळी न पाचारितां जावें । संतचरणीं भावें रिघावया ॥ ६ ॥

॥ १०६५ ॥

लवविलें तया सवें लवे जाती । अभिमाना हातीं सांपडेना ॥ १ ॥
भोळिवेचें लेणें विष्णुदासां साजे । तेथें भाव दुजे हारपती ॥ २ ॥
अर्चन वंदन नवविधा भक्ति । दया क्षमा शांति तया ठायीं ॥ ३ ॥
तये गांवीं नाहीं दुःखाची वसती । अवघाचि भूतीं नारायण ॥ ४ ॥
अवघेंचि जालें सोवळें ब्रह्मांड । विटाळाचें तोंड न देखती ॥ ५ ॥
तुका ह्मणे गाजे वैकुंठीं सोहळा । याही भूमंडाळमाजी कीर्ति ॥ ६ ॥

॥ १०६६ ॥

लेंकरा लेववी माता अळंकार । नाहीं अंतपार आवडीसी ॥ १ ॥
कृपेचें पोसणें तुमचें मी दीन । आजि संतजन मायबाप ॥ २ ॥
आरुषा उत्तरीं संतोषे माउली । कवळूनि घाली हृदयांत ॥ ३ ॥
पोटीं आलें त्याचे नेणे गुणदोष । कल्याणाचि असे असावें हें ॥ ४ ॥
मनाची ते चाली मोहाचिये सोई । ओघें गंगा काइ परतों जाणे ॥ ५ ॥
तुका ह्मणे कोठें उदार मेघां शक्ति । साक्षी तृषा किती चातकाची ॥ ६ ॥

॥ १०६७ ॥

लेंकराचें हित । वाहे माउलीचें चित्त ॥ १ ॥ ऐसी कळवळ्याची
जाती । करी लाभेंविण प्रीति ॥ २ ॥ पोटीं भार वाहे । त्याचें
सर्वस्वही साहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें । तैसें तुह्मां संतां ओझें ॥ ४ ॥

॥ १०६८ ॥

वक्त्या आधीं मान । गंध अक्षता पूजन । श्रोता यति जाला जाण ।
तरी त्या नाहीं उचित ॥ १ ॥ शरीर सर्वांगा प्रमाण । यथाविधि कर चरण ।
धर्माचें पाळण । सकळीं सत्य करावें ॥ २ ॥ पट्ट पुत्र सांभाळी । पिता
त्याची आज्ञा पाळी । प्रमाण सकळीं । ते मर्यादा करावी ॥ ३ ॥ वरासनीं
पाषाण । तो न मानावा सामान्य । येर उपकरणें । सोनियाचीं परी तीं
नीच ॥ ४ ॥ सोनियाचा पैंजण । मुगुटमणि केला हीण । जयाचें कारण ।
तयाठायीं अळंकार ॥ ५ ॥ सेवका स्वामीसाठीं मान । त्याचें नाम
त्याचें धन । तुका ह्मणे जाण । तह्मी संत तदर्थीं ॥ ६ ॥

॥ १०६९ ॥

वदवावी वाणी माझी कृपावंता । वागपुष्प संतां समर्पीशी ॥ १ ॥
सर्वसंकटाचा तुझां परिहार । घालावा त्यां भार पांडुरंगा ॥ २ ॥
एकसरें चिंता ठेवूनियां पायीं । जालों उतराई होतों तेणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें जालें अवसान । काया वाचा मन वेचूनियां ॥ ४ ॥

॥ १०७० ॥

वर्णाश्रम करिसी चोख । तरि तूं पावसी उत्तम लोक ॥ १ ॥ परि तें तुज नाहीं ठावें । जेणें अंगें ब्रह्म व्हावें ॥ २ ॥ जरि तूं जालासी पंडित । करिसी शब्दाचें पांडित्य ॥ ३ ॥ गासी तान मान बंध । हाव भाव गीत छंद ॥ ४ ॥ जाणसील तूं स्वतंत्र । आगमोक्त पूजायंत्र ॥ ५ ॥ साधनाच्या ओढी । डोळियांच्या मोडामोडी ॥ ६ ॥ तुका ह्मणे देहीं । संत जाहाले विदेही ॥ ७ ॥

॥ १०७१ ॥

वाट वैकुंठीं पाहाती । भक्त कैं पां येथें येती । तयां जन्ममरणखंती । नाहीं चित्तीं परलोक ॥ १ ॥ धन्यधन्य हरिचे दास । तयां सुलभ गर्भवास । ब्रह्मादिक करिती आस । तीर्था वास भेटीची ॥ २ ॥ कथाश्रवण व्हावयास । यमधर्मा थोर आस । पाहे रात्रदिवस । वाट कर जोडोनियां ॥ ३ ॥ रिद्धिसिद्धी न पाचारितां । त्या धुंडिती हरिभक्तां । मोक्षसायुज्यता । वाट पाहे भक्तांची ॥ ४ ॥ असती जेथें उभे ठेले । सदा प्रेमसुखें धाले । आणीकही उद्धरिले । महादोषी चांडाळ ॥ ५ ॥ सकळ करिती त्यांची आस । सर्वभावें ते उदास । धन्यभाग्य त्यांस । तुका ह्मणे दरुषणें ॥ ६ ॥

॥ १०७२ ॥

विष्णुमय सर्व वैष्णवांसी ठावें । येरांनीं वाहावे भार माथां ॥ १ ॥
साधनें संकटें सर्वांलागीं सीण । व्हावा लागे क्षीण अहंमान ॥ २ ॥
भाव हा कठीण वज्र हें भेदवे । परि न छेदवे मायाजाळ ॥ ३ ॥
तुका ह्मणे वर्म भजनेंचि सांपडे । येरांसी तों पडे ओस दिशा ॥ ४ ॥

॥ १०७३ ॥

वीर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥ करिती घोष जय-जयकार । जळती दोषांचे डोंगर ॥ २ ॥ दया क्षमा शांति । बाण अभंग हे हातीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे बळी । तेचि एक भूमंडळीं ॥ ४ ॥

॥ १०७४ ॥

वेश वंदाया पुरते । कोण ब्राह्मण निरुते ॥ १ ॥ ऐसें सांगा मज-पाशीं । संतां निरवितों येविशीं ॥ २ ॥ असा जी प्रवीण । ग्रंथीं कळे शुद्ध हीण ॥ ३ ॥ तुका ह्मणे लोपें । सत्याचिया घडती पापें ॥ ४ ॥

॥ १०७५ ॥

वैराग्याचें भाग्य । संतसंग हाचि लाभ ॥ १ ॥ संतकृपेचे हे दीप । करी साधका निष्पाप ॥ २ ॥ तोचि देवभक्त । भेदाभेद नाहीं ज्यांत ॥ ३ ॥ तुका प्रेमें नाचे गाये । गाणियांत विरोन जाये ॥ ४ ॥

॥ १०७६ ॥

वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥ १ ॥ नाहीं आणीक प्रमाण । तन धन तृण जन ॥ २ ॥ पडतां जड भारी । नेमा न टळे निर्धारीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे याती । हो का तयाची भलती ॥ ४ ॥

॥ १०७७ ॥

वैष्णवांची कीर्ती गाइली पुराणीं । साही अठरांजणीं चहूं वेदीं ॥ १ ॥
ऐसे कोणी दावा ग्रंथांचे वाचक । कर्मठ धार्मिक पुण्यशील ॥ २ ॥
आदिनाथ शंकर नारद मुनीश्वर । शुका ऐसा थोर आणिक नाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे मुगुटमणी हे भक्ति । आणीक विश्रांति आरतिया ॥ ४ ॥

॥ १०७८ ॥

वैष्णवांसंगती सुख वाटे जीवा । आणीक मी देवा कांहीं नेणें ॥ १ ॥
गायें नाचें उडें आपुलिया छंदें । मनाच्या आनंदें आवडीनें ॥ २ ॥
लाज भय शंका दुराविला मान । न कळे साधन यापरतें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां आपुल्या सायासें । आह्मां जगदीशें सांभाळावें ॥ ४ ॥

॥ १०७९ ॥

वैष्णवें चोरटीं । आलीं घरासी करंटीं ॥ १ ॥ आजि आपुलें जतन । करा भांडें पांघरूण ॥ २ ॥ ज्याचे घरीं खावें । त्याचें सर्वस्वही न्यावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माग । नाहीं लागों देत लाग ॥ ४ ॥

॥ १०८० ॥

शरण शरण वाणी । शरण त्रिवाचा विनवणी ॥ १ ॥ स्तुती न पुरे हे वाचा । सत्य दास मी दासांचा ॥ २ ॥ देह सांभाळून । पायांवरी लोटांगण ॥ ३ ॥ विनवी तुका संतां दीन । नव्हे गौरवें उत्तीर्ण ॥ ४ ॥

॥ १०८१ ॥

शुद्ध चर्या हेंचि संतांचें पूजन । लागतचि धन नाहीं वित्त ॥ १ ॥ सगुणाचे सोई सगुण विश्रांती । आपणचि येती चोजवीत ॥ २ ॥ कीर्तनींचि वोळे कृपेचा वोरस । दुरीपणें वास संनिधता ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्म सांगतों सवंगें । मन लावा लागें स्वहिताच्या ॥ ४ ॥

॥ १०८२ ॥

शुद्धबीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥ मुखीं अमृताची वाणी । देह वेचावा[1] कारणीं ॥ २ ॥ सर्वांगीं निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाती । ताप दर्शनें विश्रांती ॥ ४ ॥

॥ १०८३ ॥

षड्रसीं रांधिलें खापरीं घातलें । चोहटा ठेविलें मध्यरात्रीं ॥ १ ॥ त्यासी सदाचारी लोक न शिवती । श्वानासी निश्चिती फावलें तें ॥२॥ तैसें दुष्टकर्म जालें हरिभक्ता । त्यागिली ममता विषयासक्ति ॥ ३ ॥ इहपरलोक उभय विटाळ । मानिती केवळ हरिचे दास ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवा आवडे हे सेवा । अनुदिनीं व्हावा पूर्ण हेतु ॥ ५ ॥

॥ १०८४ ॥

सकळ चिंतामणी शरीर । जरी जाय अहंकार आशा समूळ ॥ निंदा हिंसा नाहीं कपट देहबुद्धि । निर्मळ स्फटिक जैसा ॥ १ ॥ मोक्षाचें

१. कांहीं प्रतींत 'देवाचे' असा पाठ आहे.

तीर्थ न लगे वाराणसी । येती तयापासीं अवघीं जनें ॥ तीर्थासी तीर्थ जाला तोचि एक । मोक्ष तेणें दर्शनें ॥ २ ॥ मन शुद्ध तया काय करिमी माळा । मंडित सकळा भूषणांसी ॥ हरिच्या गुणें गर्जताती सदा । आनंद तया मानसीं ॥ ३ ॥ तन मन धन दिलें पुरुषोत्तमा । आशा नाहीं कवणाची ॥ तुका ह्मणे तो परिसाहूनि आगळा ॥ काय महिमा वर्णूं त्याची ॥ ४ ॥

॥ १०८५ ॥

सकळ पूजा स्तुति । करावी ते व्हावें याती ॥ १ ॥ ह्मणवूनि वारा जन । संतपूजा नारायण ॥ २ ॥ सेवावें तें वरी । दावी उमटूनि देंकरीं । तुका ह्मणे सुरा । दुधा ह्मणतां केवीं बरा ॥ ३ ॥

॥ १०८६ ॥

संकोचतो जीव महत्वाच्या भारें । दासत्वाचि बरें बहु वाटे ॥ १ ॥ कळावी जी माझी आवडी हे संतां । देणें तरि आतां हेंचि द्यावें ॥२॥ तुमचे चरण पावविलों सेवा । ह्मणउनि हेवा हाचि करीं ॥ ३ ॥ विनवुनी तुका वंदितो चरण । लेखा रजरेण चरणांचा ॥ ४ ॥

॥ १०८७ ॥

सदैव हे वारकरी । जे पंढरी देखती । पदोपदीं विठ्ठल वाचा । त्यांसी कैंचा संसार ॥ १ ॥ दोष पळाले पळाले । पैल आले हरिदास ॥ २ ॥ प्रेमभातें भरलें अंगीं । निर्लज्ज रंगीं नाचती । गोपीचंदनाची उटी । तुळसी कंठीं मिरवती ॥ ३ ॥ तुका ह्मणे देव चित्तीं । मोक्ष हातीं रोकडा । दुबळा या शक्तिहीना । त्या ही जना पुरता ॥ ४ ॥

॥ १०८८ ॥

संत आले घरा । तों मी अभागी दातारा ॥१॥ कासयानें पूजा करूं । चरण हृदयींच धरूं ॥ २ ॥ काया कुरवंडी । करुन ओंवाळून सांडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें । हात जोडीं असो ठावें ॥ ४ ॥

॥ १०८९ ॥

संत केवळ दयाळ । हातीं दिधला गोपाळ ॥ १ ॥ पायीं ठेवितां

कपाळ । जाला प्रेमाचा सुकाळ ॥ २ ॥ कानीं पडितां वचन । जाले त्रैलोक्याचे कान ॥ ३ ॥ ज्यांचा मस्तकीं पडतां हात । जाला देहबुद्धिपात ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवाधिदेवा । त्याची करूं पावे सेवा ॥ ५ ॥

॥ १०९० ॥

संत गाती हरिकीर्त्तनीं । त्यांचें घेइन पायवणी ॥ १ ॥ हेंचि तप तीर्थ माझें । आणीक मी नेणें दुजें ॥ २ ॥ काया कुरवंडी करीन । संत महंत ओंवाळीन ॥ ३ ॥ संत महंत माझी पूजा । अनुभाव नाहीं दुजा ॥ ४ ॥ तुका ह्मणे नेणें कांहीं । अवघें आहे संतांपायीं ॥ ५ ॥

॥ १०९१ ॥

संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोन जाय ॥ १ ॥ मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडी वाढों लागे ॥ २ ॥ कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे । हृदयीं प्रगटे रामरूप ॥ ३ ॥ तुका ह्मणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वपुण्यें ॥ ४ ॥

॥ १०९२ ॥

संतचरणीं नाहीं गोडी । ज्यासी विषयीं आवडी ॥ १ ॥ त्यासी कैंचा भेटे देव । संतचरणीं नाहीं भाव ॥ २ ॥ संतसेवेसी आंग चोरी । दृष्टि न पडो तयावरी ॥ ३ ॥ पाहे गुणदोष संतांचे । जळो काळें तोंड त्याचें ॥४॥ तुका ह्मणे संतसेवा । आमुच्या पूर्वजांचा ठेवा ॥५॥

॥ १०९३ ॥

संतजना माझी यावया करुणा । ह्मणउनी दीन हीन जालों ॥ १ ॥ नेणें योग युक्ती नाहीं ज्ञान मति । गातसें या गीतीं पांडुरंगा ॥ २ ॥ भाव भक्ती नेणें तप अनुष्ठान । करितों कीर्त्तन विठ्ठलाचें ॥ ३ ॥ ब्रह्मज्ञान ध्यान न कळे धारणा । एका नारायणा वांचूनियां ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझा विठोबासी भार । जाणे हा विचार तोचि माझा ॥ ५ ॥

॥ १०९४ ॥

संत[1]पाउलें साजिरीं । गंगा आली आह्मांवरी ॥ १ ॥ जेथें पडे रज-

---

१. अभंग ९४१ पहा.

धुळी । तेथें करावी अंघोळी ॥ २ ॥ म्वेतबंद वाराणसी । अवघीं तीर्थें तयापासीं ॥३॥ तुका ह्मणे धन्य जालों । संतसागरीं मिळालों ॥४॥

॥ १०९५ ॥

संत मारगीं चालती । त्यांची लागो मज माती ॥ १ ॥ काय करावीं साधनें । काय नव्हे एक तेणें ॥ २ ॥ शेप घेईन उच्छिष्ट । धाय धणीवरी पोट ॥३॥ तुका ह्मणे संतां पायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥४॥

॥ १०९६ ॥

संतसंगें याचा वास सर्वकाळ । संचला सकळ मूर्तिमंत ॥ १ ॥ घालूनियां काळ अवघा बाहेरी । त्यासीच अंतरीं वास दिला ॥ २ ॥ आपुलेंसें जिहीं नाहीं उरों दिलें । चोजवितां भलें ऐसीं स्थळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं झांकत परिमळ । चंदनाचें स्थळ चंदनचि ॥ ४ ॥

॥ १०९७ ॥

संतसमागम एखादिया परी । राहावें त्याचे द्वारीं श्वानयाती ॥ १ ॥ तेथें रामनाम होईल श्रवण । घडेल भोजन उच्छिष्टाचें ॥ २ ॥ कामारी बटीक सेवेचे सेवक । दीनपण रंक तेथें भलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे सर्व सुख त्या संगती । घडेल पंगती संतांचिया ॥ ४ ॥

॥ १०९८ ॥

संतसेवेसि अंग चोरी । दृष्टी न पडो तयावरी ॥ १ ॥ ऐसियासी व्याली रांड । जळो जळो तिचें तोंड ॥२॥ संतचरणीं ठेवितां भाव । आपेंआप भेटे देव ॥३॥ तुका ह्मणे संतसेवा । माझ्या पूर्वजांचा ठेवा ॥४॥

॥ १०९९ ॥

संतां आवडे तो काळाचाही काळ । समर्थाचें बाळ जेवीं समर्थ ॥१॥ परिसतां तेथें नाहीं एकविणें । मोहें न पवे सीण ऐसें राखे ॥ २ ॥ केले अन्याय ते सांडवी उपचारें । न देखें दुसरें नाशा मूळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे मुख्य कल्पतरुछाया । काय नाहीं दया तये ठायीं ॥ ४ ॥

॥ ११०० ॥

संताचा अतिक्रम । देवपूजा तो अधर्म ॥ १ ॥ येती दगड तैसे वरी ।

मंत्रपुष्पें देवा शिरीं ॥ २ ॥ अतीतासी गाळी । देवा नैवेद्यासी पोळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । ताडण भेदकांची सेवा ॥ ४ ॥

॥ ११०१ ॥

संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं येथें ॥ १ ॥
बहु दुर्धड[1] जरी जाली ह्मैस गाय । तरी होईल काय कामधेनु ॥ २ ॥
तुका ह्मणे अंगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळों ॥ ३ ॥

॥ ११०२ ॥

संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दुःखलेश ॥ १ ॥
तेथें मी राहीन होऊनि याचक । घालितील भीक तेचि मज ॥ २ ॥
संतांचिये गांवीं वरो भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ ३ ॥
संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥ ४ ॥
संतांचा उदीम उपदेशाची पेंठ । प्रेमसुख सांटीं घेती देती ॥ ५ ॥
तुका ह्मणे तेथें आणिक नाहीं परी । ह्मणोनि भिकारी जालों त्यांचा ॥ ६ ॥

॥ ११०३ ॥

संतांचिया पायीं माझा विश्वास । सर्वभावें दास जालों त्यांचा ॥ १ ॥
तेचि माझें हित करिती सकळ । जेणें हा गोपाळ कृपा करी ॥ २ ॥
भागलिया मज वाहतील कडे । त्यांचियानें जोडे सर्वसुख ॥ ३ ॥
तुका ह्मणे शेष घेईन आवडी । वचन न मोडीं बोलिलों तें ॥ ४ ॥

॥ ११०४ ॥

संतांची स्तुति ते दर्शनाच्या योगें । पडिल्या प्रसंगें ऐसी कीजे ॥ १ ॥
संकल्प ते सदा स्वामीचेचि चित्तीं । फांकों नये वृत्ति अखंडित ॥ २ ॥
दास्यत्व तें असे एकविध नांवें । उरों नये जीवें भिन्नत्वासी ॥ ३ ॥
निज बीजा येथें तुका अधिकारी । पाहिजे तें पेरी तये वेळे ॥ ४ ॥

॥ ११०५ ॥

संताचे गुणदोष आणितां या मना । केलिया उगाणा सुकृताचा ॥ १ ॥

१. पुष्कळ प्रतींत ‘ धड ’ असा पाठ आहे.

पिळोनियां पाहे पुष्पाचा परिमळ। चिरोनि केळी केळ गाढव तो ॥२॥
तुका ह्मणे गंगे अग्नीसि विटाळ । लावी तो चांडाळ दुःख पावे ॥३॥
॥ ११०६ ॥
संतांचे घरींचा दास मी कामारी । दारीं परोपरीं लोळतसें ॥ १ ॥
चरणींचे रज लागती अंगास । तेणें बेताळीस उद्धरती ॥ २ ॥
उच्छिष्ट हें जमा करुनि पत्रावळी । घालीन कवळी मुखामाजी ॥ ३ ॥
तुका ह्मणे मी आणीक विचार । नेणें हेंचि सार मानीतसें ॥ ४ ॥
॥ ११०७ ॥
संतांचें सुख जालें या देवा । ह्मणऊनि सेवा करी त्यांची ॥ १ ॥
तेथें माझा काय कोण तो विचार। वर्णावया पार महिमा त्यांचा ॥ २ ॥
निर्गुण आकार जाला गुणवंत । घाली दंडवत पूजोनियां ॥ ३ ॥
तीर्थें त्यांची इच्छा करिती नित्यकाळ। व्हावया निर्मळ आपणांसी ॥ ४ ॥
अष्टमा सिद्धींचा कोण आला पाड। वागों नेदी आड कोण तया ॥ ५ ॥
तुका ह्मणे ते बळिया शिरोमणी। राहिलों चरणीं निकटवासें ॥ ६ ॥
॥ ११०८ ॥
संतांच्या धिक्कारें अमंगळ जिणें । विश्वशत्रु तेणें सांडी परि ॥ १ ॥
कुळ आणि रूप वांयां संवसार । गेला भरतार मोकलितां ॥ २ ॥
मूळ राखे तया फळा काय उणें । चतुर लक्षणें राखों जाणे ॥ ३ ॥
तुका ह्मणे सायास तो एके ठायीं । दीप हातीं तई अवघें बरें ॥ ४ ॥
॥ ११०९ ॥
संतांच्या पादुका घेईन मोचे खांदीं। हातीं टाळ दिंडी नाचेन पुढें ॥१॥
भजनविधि नेणें साधन उपाय । सकळ सिद्धि पाय हरिदासांचे ॥२॥
ध्यानगति मति आसन समाधि । हरिनाम गोविंदीं प्रेमसुख ॥३॥
नेणता निर्लज्ज नेणें नादभेद । सुखें हा गोविंद गाऊं गीतीं ॥४॥
सर्व जोडी मज गोत आणि वित्त । तुका ह्मणे संतमहंतपाय ॥५॥
॥ १११० ॥
संतांपायीं विन्मुख जाला। तो जरि संगति मागों आला ॥१॥ तरि त्या-

हुनि दुरी जावें । सुखें एकांतीं बैसावें ॥२॥ अतमचर्चा नाहीं जेथें । आगी लावुनि द्यावी तेथें ॥३॥ तुका ह्मणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ॥४॥

॥ ११११ ॥

संतापाशीं बहु असावें मर्यादा । फलकटाचा धंदा उर फोडी ॥ १ ॥
बासर तो भुंके गाढवाचेपरी । उडे पाठीवरी दंड तेणें ॥ २ ॥
समय नेणे तें वेडें चाहाटळ । अवगुणाचा ओंगळ मान पावे ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय वांयां चाळवणी । पिटपिटघाणी हागवणेची ॥ ४ ॥

॥ १११२ ॥

संतांनीं सरता केलों तैसेपरी । चंदनीं ते बोरी व्यापियेली ॥ १ ॥
गुण दोष याती न विचारितां कांहीं । ठाव दिला पायीं आपुलिया ॥ २ ॥
तुका ह्मणे आलें समर्थाच्या मना । तरि होय राणा रंक त्याचा ॥ ३ ॥

॥ १११३ ॥

संतांसी क्षोभवी कोण्याही प्रकारें । त्याचें नव्हे बरें उभयलोकीं ॥ १ ॥
देवाचा तो वैरी शत्रु दावेदार । पृथ्वीही थार नेदी तया ॥ २ ॥
संतांपाशीं ज्याचा नुरेचि विश्वास । त्याचे जाले दोष बळिवंत ॥ ३ ॥
तुका ह्मणे क्षीर वासराच्या अंगें । किंवा धांवे लागें विषमें मारूं ॥ ४ ॥

॥ १११४ ॥

संतांसी तों नाहीं सन्मानाची चाड । परि पडे द्वाड अव्हेरितो ॥ १ ॥
ह्मणऊनि तया न वजावें ठाया । होतसे घात या दुर्बळाचा ॥ २ ॥
भावहीना आड येतसे आशंका । उचितासी चुका घालावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे जया संकोच दर्शनें । तया ठाया जाणें अनुचित ॥ ४ ॥

॥ १११५ ॥

सर्वपक्षीं हरि साहे सखा झाला । ओल्या अंगणीच्या कल्पलता त्याला ॥ १ ॥ सहजचाली चालतां पायवाटे । चिंतामणीसमान होती गोटे ॥२॥ ऐसें हरिभक्तांचें ज्ञान महिमान । अतर्क्य तयांचें दुर्लभ दरुशन ॥३॥ तुका तरी सहज बोले वाणी । त्याचे घरीं वेदांत वाहे पाणी ॥४॥

॥ १११६ ॥

सर्व भाग्यहीन । ऐसें सांभाळिलों दीन ॥ १ ॥ पायीं संतांचे मस्तक । असों जोडोनि हस्तक ॥ २ ॥ जाणें तरी सेवा । दीन दुर्बळ जी देवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीव । समर्पून भाकीं कींव ॥ ४ ॥

॥ १११७ ॥

सर्वविशीं माझा त्रासलासे जीव । आतां कोण भाव निवडे एक ॥ १ ॥
संसाराची गज न साहेचि वार्ता । आणीक ह्मणतां माझें कोणी ॥ २ ॥
देहसुख कांहीं बोलिले उपचार । विष तें आदर वंद वाटे ॥ ३ ॥
उपाधि दाटणी प्रतिष्ठा गौरव । होय माझा जीव कासावीस ॥ ४ ॥
तुका ह्मणे कांहीं आणीक न साहे । आवडती पाय वैष्णवांचे ॥ ५ ॥

॥ १११८ ॥

सर्व सुखें आजी एथेंचि वोळलीं । संतांचीं देखिलीं चरणांबुजें ॥ १ ॥
सर्वकाळ होतों आठवीत मनीं । फिटली ते धणी येणें काळें ॥ २ ॥
तुका ह्मणे वाचा राहिली कुंटित । पुढें जालें चित्त समाधान ॥ ३ ॥

॥ १११९ ॥

संसारसोहळे भोगितां सकळ । भक्तां त्याचें बळ विठोबाचें ॥ १ ॥
भय चिंता धाक न मानिती मनीं । भक्तां चक्रपाणि सांभाळीत ॥ २ ॥
पाप पुण्य त्यांचें धरूं न शके अंग । भक्तांसी श्रीरंग सर्व भावें ॥ ३ ॥
नव्हती ते मुक्त आवडे संसार । देव भक्तां भार सर्व वाहे ॥ ४ ॥
तुका ह्मणे देव भक्तां वेळाईत । भक्त ते निश्चिंत त्याचियानें ॥ ५ ॥

॥ ११२० ॥

सांग त्वां कोणासी तारिलें । संतांवेगळें उद्धरिलें ॥ १ ॥ संत शब्द उपदेशी । मग तूं हो ह्मणशी ॥ २ ॥ तुका ह्मणे नाहीं तुझा उपकार । करूं संतांचा उच्चार ॥ ३ ॥

॥ ११२१ ॥

सांगतां हें नये सुख । कीर्ती मुख न पुरे ॥ १ ॥ आवडीनें सेवन

करूं । जीवींचें धरूं जीवींच ॥२॥ उपमा या देतां लाभा । काशा शोभा सारिखी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नुचलीं डोई । ठेविली पायीं संतांचे ॥ ४ ॥

॥ ११२२ ॥

सांडूनि सुखाचा वांटा । मुक्ति मागे तो करंटा ॥ १ ॥ कां रे न ध्यावे[1] हे जन्म । कायें वैकुंठा जाऊन ॥ २ ॥ येथें मिळतो दहीं-भात । नाहीं[3] वैकुंठीं ते मात ॥ ३ ॥ तुका[4] ह्मणे मुक्ति नलगे । रां-हेन संताचिये संगें ॥ ४ ॥

॥ ११२३ ॥

साधु ह्मणावें कोणास । जैसा वृक्षांमाजी ऊंस ॥ १ ॥ त्याची करितां धुरवडी । आपुली गोडी तो न सांडी ॥ २ ॥ त्याला घालितां पि-ळणीं । आंतून निघे गोड पाणी ॥ ३ ॥ त्याला अग्निवर ठेविती । भेल्या होऊनी राहाती ॥ ४ ॥ जाली गुळाची साखर । मोला च-ढली अपार ॥ ५ ॥ तुका ह्मणे ऐसे संत । त्यांजपाशीं भगवंत ॥ ६ ॥

॥ ११२४ ॥

सुख वाटे येचि ठायीं । बहु पायीं संतांचे ॥ १ ॥ ह्मणऊनि केला वास । नाहीं नास ते ठायीं ॥ २ ॥ न करवे हाली चाली । निवारिली चिंता हे ॥ ३ ॥ तुका ह्मणे निवे तनु । रजकणु लागतां ॥ ४ ॥

॥ ११२५ ॥

सोनियाचा कळस । माजी भरिला सुरारस ॥ १ ॥ काय करावें प्र-माण । तुह्मी सांगा संतजन ॥२॥ मृत्तिकेचा घट । माजी अमृताचा सांट ॥ ३ ॥ तुका ह्मणे हित । तें मज सांगावें त्वरित ॥ ४ ॥

॥ ११२६ ॥

सोलीव जें सुख अतिसुखाहुनी । उभे हें अंगणीं वैष्णवांच्या ॥ १ ॥ वृंदावन सडे चौक रंग माळा । नाचे तो सोहोळा देखोनियां ॥२॥ भूषणमंडित सदा सर्व काळ । मुद्रा आणि माळ तुळसी कंठीं ॥३॥

---

१. ध्यावा जन्म. २. प्रेम लुटावें नाम. ३. वैकुंठीं ते नाहीं. ४. तुका ह्मणे आतां. ५. मज नलगे सायुज्यता.

नामओघ मुखीं अमृताचें सार । मस्तक पवित्र साहित रजें ॥ ४ ॥
तुका ह्मणे मोक्ष भक्ताचिया मना । नये हा वासना त्याची करी ॥५॥
॥ ११२७ ॥
स्तुति करीं जैसा नाहीं अधिकार । न कळे विचार योग्यतेचा ॥ १ ॥
तुमचें मी दास संतांचें दुबळ । करूनि सांभाळ राखा पायीं ॥ २ ॥
रामकृष्णहरि मंत्र उच्चारणा । आवडी चरणां विठोबाच्या ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुमचें सेवितों उच्छिष्ट । क्षमा करीं धीट होऊनियां ॥४॥
॥ ११२८ ॥
हरिकथेवांचून इच्छिती स्वहित । हरिजन चित्त न घाला तेथें ॥१॥
जाईल भंगोन आपुला विश्वास । होईल या नास कारणांचा ॥ २ ॥
ज्याचिया बैसावें भोजनपंगती । त्याचिया संगती तैसें खावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय जालेती जाणते । देवाही परते थोर तुह्मी ॥ ४ ॥
॥ ११२९ ॥
हरिजनाची कोणां न घडावी निंदा । साहात गोविंदा नाहीं त्याचें ॥१॥
रूपा येऊनियां धरी अवतार । भक्तां अभयंकर खळां कष्ट ॥ २ ॥
दुर्वास हा छळों आला आंबऋषी । सुदर्शन त्यासी जाळित फिरे ॥३॥
द्रौपदीच्या क्षोभें कौरवांची शांति । होऊनि श्रीपति साह्य केलें ॥ ४ ॥
न साहेचि बभ्रु पांडवां पारिखा । धुडाविला सखा बळिभद्र ॥ ५ ॥
तुका ह्मणे अंगीं राखिली दुर्गंधि । अश्वत्थामा वधी पांडवपुत्रां ॥ ६ ॥
॥ ११३० ॥
हरिजनां प्राण विकली हे काया । अंकिला मी तयां घरीं जालों ॥१॥
ह्मणियें सत्वर करीन सांगतां । घेईन मी देतां शेष त्यांचें ॥ २ ॥
आस करूनियां राहेन अंगणीं । उच्छिष्टाची धणी घ्यावयासी ॥३॥
चालतां ते मार्गी चरणींचे रज । उडती सहज घेइन आतां ॥ ४ ॥
दुरी त्यांपासूनि न वजें दवडितां । तुका ह्मणे लाता घेइन अंगीं ॥५॥
॥ ११३१ ॥
हरिभक्त माझे जिवलग सोइरे । हृदयीं पाउलें धरीन त्यांचीं ॥ १ ॥

अंतकाळीं येती माझ्या सोडवणे । मस्तक बैसणें देईन त्यांसी ॥ २ ॥
आणिक सोइरे सज्जन वो कोणी । वैष्णवांवांचोनि नाहीं मज ॥ ३ ॥
देईन आलिंगण धरीन चरण । संवसारसीण नासे तेणें ॥ ४ ॥
कंठीं तुळशीमाळा नामाचे धारक । ते माझे तारक भवनदीचे ॥ ५ ॥
तयांचे चरणीं घालीन मी मिठी । चाड हे वैकुंठीं नाहीं मज ॥ ६ ॥
अळसें दंभें भावें हरिचें नाम गाती । ते माझे सांगाती परलोकींचे ॥ ७ ॥
कायावाचामनें देईन क्षेम त्यासी । चाड जीवित्वासी नाहीं मज ॥ ८ ॥
हरिचें नाम मज ह्मणविती कोणी । तया सुखा धणी धणीवरी ॥ ९ ॥
तुका ह्मणे तया उपकारें बांधलों । ह्मणऊनि आलों शरण संतां ॥ १० ॥

॥ ११३२ ॥

हरिचिया भक्ता नाहीं भयचिंता । दुःखनिवारिता नारायण ॥ १ ॥
न लगे वाहाणें संसार उद्वेग । जडों नेदी पांग देवराव ॥ २ ॥
असों द्यावा धीर सदा समाधान । आहे नारायण जवळीच ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझा सखा पांडुरंग । व्यापियेलें जग तेणें एकें ॥ ४ ॥

॥ ११३३ ॥

हरिच्या दासां भये । ऐसें बोलों तेंही नये ॥ १ ॥ राहोनियां आड ।
उभा देव पुरवी कोड ॥ २ ॥ हरिच्या दासां चिंता । अघटित हे
वार्ता ॥ ३ ॥ खावें ल्यावें द्यावें । तुका ह्मणे पुरवावें ॥ ४ ॥

॥ ११३४ ॥

हरिच्या दासां सोपें वर्म । सर्व धर्म पाउलें ॥ १ ॥ कडिये देव बा-
हेर खांदी । वैष्णव मांदी क्रीडेसी ॥ २ ॥ सरती येणें आटाआटी
नाहीं तुटी लाभाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे समाधान । सदा मन आमुचें ॥ ४ ॥

॥ ११३५ ॥

हींच त्यांचीं पंचभूतें । जीवन भातें प्रेमाचें ॥ १ ॥ कळवळा धरिल
संतीं । ते निगुती कैवाड ॥ २ ॥ हाच काळ वर्तमान । साधन ह
संपत्ती ॥ ३ ॥ तुका ह्मणे दिवसरातीं । हेंचि खाती अन्न ते ॥ ४ ॥

॥ ११३६ ॥

हागे आलों कोणी ह्मणे बुडतिया। तेणें किती तया बळ चढे ॥ १ ॥
तुह्मां तव भार घेतला सकळ । आश्वासिलों बाळ अभयकरें ॥ २ ॥
भुकेलियां आस दावितां निर्धार । किती होय धीर समाधान ॥ ३ ॥
तुका ह्मणे दिली चिंतामणीसाटीं । उचित कांचवटी दंडवत ॥ ४ ॥

॥ ११३७ ॥

हिरा ठेवितां ऐरणीं । वांचे मारितां जो घणीं ॥१॥ तोचि मोल पावे खरा। करणीचा होय चुरा ॥२॥ मोहरा होय तोचि अंगें। सूत न जळे ज्याचे संगें ॥३॥ तुका ह्मणे तोचि संत। सोसी जगाचे आघात ॥४॥

॥ ११३८ ॥

हिरा ठेवितां काळें गाहाण । मोल न तुटे दुकाळीं जाण ॥ १ ॥ तैसे संतजन पाहीं । विनटले श्रीहरिपायीं ॥ २ ॥ तुका ह्मणे तैसे भक्त । तयांसी जन हें निंदित ॥ ३ ॥

॥ ११३९ ॥

हें तों एक संतांठायीं । लाभ पायीं उत्तम ॥ १ ॥ ह्मणवितां त्याचे दास । पुढें आस उरेना ॥ २ ॥ कृपादान केलें संतीं । कल्पांतींही सरेना ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतसेवा । हाचि हेवा उत्तम ॥ ४ ॥

॥ ११४० ॥

डौरलों भक्तिसुखें । सेवूं अमृत हें मुखें ॥ १ ॥ संतसंगें सारूं काळ। प्रेमसुखाचा कल्लोळ ॥ २ ॥ ब्रह्मादिकांसी शिराणी । तो हा आनंद मेदिनी ॥ ३ ॥ नाहीं वैकुंठींचा पांग । धांवे कथे पांडुरंग ॥ ४ ॥ मुक्त व्हावें काशासाटीं । कैंची येणें रसें भेटी ॥ ५ ॥ तुका ह्मणे गोड । हेंचि पुरे माझें कोड ॥ ६ ॥

॥ ११४१ ॥

शेवटीची विनवणी । संतजनीं परिसावी ॥ १ ॥ विसर तो न पडावा । माझा देवा तुह्मांसी ॥२ ॥ पुढें फार बोलों काई । अवघें पायीं विदित ॥३॥ तुका ह्मणे पडिलों पायां । करा छाया कृपेची ॥ ४ ॥

## देवाशीं सलगीचीं भाषणें.

॥ ११४२ ॥

नमो विष्णुविश्वरूपा मायबापा । अपरा[1] अनुपा पांडुरंगा ॥ १ ॥
विनवितों रंक दास मी सेवक । वचन तें एक आइकावें ॥ २ ॥
तुझी स्तुति वेद करितां भागला । निवांतचि ठेला नेति नेति ॥ ३ ॥
ऋषि मुनि बहु सिद्ध कविजन । वर्णितां ते गुण न सरती ॥ ४ ॥
तुका ह्मणे तेथें काय माझी वाणी । जे तुझी वाखाणी कीर्ती देवा ॥५॥

॥ ११४३ ॥

नमो नमो तुज माझें हें कारण । काय जालें उणें करितां स्नान ॥१॥
संतांचा मारग चालतों झाडूनि । हो का लाभ हानि कांहीं तरी ॥२॥
न करिसी तरी हेंचि कोडें मज । भक्ति गोड काज आणीक नाहीं ॥३॥
करीं सेवा कथा नाचेन रंगणीं । प्रेमसुखधणी पुरेल तों ॥ ४ ॥
महाद्वारीं सुख वैष्णवांचे मेळीं । वैकुंठ जवळी वसे तेथें ॥ ५ ॥
तुका ह्मणे नाहीं मुक्तिसवें चाड । हेंचि जन्म गोड घेतां मज ॥ ६ ॥

॥ ११४४ ॥

वर्णूं महिमा ऐसी नाहीं मज वाचा । न बोलवे साचा पार तुझा ॥ १ ॥
ठायींची हे काया ठेविली चरणीं । आतां ओंवाळुनि काय सांडूं ॥ २ ॥
नाहीं भाव ऐसा करूं तुझी सेवा । जीव वाहूं देवा तोही तुझा ॥ ३ ॥
मज माझें कांहीं न दिसे पाहातां । जें तुज अनंता समर्पावें ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां नाहीं मज थार । तुझे उपकार फेडावया ॥ ५ ॥

॥ ११४५ ॥

तुजऐसा कोणी न देखें उदार । अभयदानशूर पांडुरंगा ॥ १ ॥
शरण येती त्यांचे न विचारिसी दोष । न मागतां त्यांस अढळ देसी ॥ २ ॥
धांवसील आडणी ऐकोनियां धांवा । कइवारें देवा भक्तांचिया ॥ ३ ॥

१ 'अपारा' असा कांहीं प्रतींत पाठ आहे.

दोष त्यांचे जाळी कल्पकोटिवरी। नामासाटीं हरि आपुलिया ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुज वाणूं कैशा परी। एक मुख हरी आयुष्य थोडें ॥ ५ ॥
॥ ११४६ ॥
उदार कृपाळ अनाथांचा नाथ। ऐकसी मात शरणागतां ॥ १ ॥
सर्व भार माथां चालविसी त्यांचा। अनुसरलीं वाचा काया मनें ॥ २ ॥
पाचारितां उभा राहासी जवळी। पाहिजे ते काळीं पुरवावें ॥ ३ ॥
चालतां ही पंथ सांभाळिसी वाटे। वारिसील कांटे खडे हातें ॥ ४ ॥
तुका ह्मणे चिंता नाहीं तुझ्या दासां। तूं त्यांचा कोंवसा सर्वभावें ॥ ५ ॥
॥ ११४७ ॥
यथार्थवादें तुज न वर्णवे कदा। बोलतों ते निंदा करितों तुझी ॥ १ ॥
वेदश्रुति तुज नेणती कोणी। चोवीस ठेंगणीं धांडोळितां ॥ २ ॥
आतां मज क्षमा करावें देवा। सलगी ते केशवा बोलियेलों ॥ ३ ॥
सगुण कीं साकार निर्गुण कीं निराकार। न कळे हा पार वेदां श्रुतीं ॥४॥
तो आह्मी भावें केलासी लहान। ठेवूनियां नांवें पाचारितों ॥ ५ ॥
सहस्रमुखें शेष सीणला स्तवितां। पार न कळतां ब्रह्मा ठेला ॥ ६ ॥
तेथें माझी देहबुद्धि तें काई। थोर मी अन्यायी तुका ह्मणे ॥ ७ ॥
॥ ११४८ ॥
एक प्रेमगुज ऐकें जगजेठी। आठवली गोष्टी सांगतसें ॥ १ ॥
एक मृग दोन्ही पाडसांसहित। आनंदें चरत होती वनीं ॥ २ ॥
अवचिता तेथें पारधी पावला। घेउनियां आला श्वानें दोन्ही ॥ ३ ॥
एकीकडे त्याणें चिरिल्या वाघुरा। ठेविलें श्वानपुत्रा एकीकडे ॥ ४ ॥
एकीकडे तेणें वोणवा लाविला। आपण राहिला एकीकडे ॥ ५ ॥
चहूंकडोनियां मृगें वेढियेलीं। स्मरों तें लागलीं नाम तुझें ॥ ६ ॥
रामा कृष्णा हरी गोविंदा केशवा। देवाचिया देवा पावें आतां ॥ ७ ॥
कोण रक्षी आतां ऐसिये संकटीं। बापा जगजेठी तुजविण ॥ ८ ॥
आइकोनि तुह्मी तयांचीं वचनें। कृपाअंतःकरणें कळवळिलां ॥ ९ ॥
आज्ञा तये काळीं केली पर्जन्यासी। वेगीं पावकासी विझवावें ॥ १० ॥

ससें एक तेथें उठवुनी पळविलें । तया पाठीं गेलीं श्वानें दोन्ही ॥ ११ ॥
मृगें चमकोनी सत्वर चाललीं । गोविंदें रक्षिलीं ह्मणोनियां ॥ १२ ॥
ऐसा तूं कृपाळु दयाळु आहेसी । आपुल्या भक्तांसी जीवलग ॥ १३ ॥
ऐसी तुझी कीर्ति जीवीं आवडती । रखुमाईच्या पती तुका ह्मणे ॥ १४ ॥

॥ ११४९ ॥

सुख वाटे तुझे वर्णितां पवाडे । प्रेम मिठी पडे वदनासी ॥ १ ॥
व्याले दोन्ही पक्षी एका वृक्षावरी । आला दुराचारी पारधी तो ॥ २ ॥
वृक्षाचिया माथां सोडिला ससाणा । धनुष्यासि बाणा लावियेलें ॥ ३ ॥
तये काळीं तुज पक्षी आठविती । धांवें गा श्रीपती मायबापा ॥ ४ ॥
उडोनियां जातां ससाणा मारील । बैसतां विंधील पारधी तो ॥ ५ ॥
ऐकोनियां धांवा तया पक्षियांचा । धरिला सर्पाचा वेश वेगीं ॥ ६ ॥
डंखोनि पारधी भुमीसि पाडिला । बाण तो लागला ससाण्यासी ॥ ७ ॥
ऐसा तूं कृपाळु आपुलिया दासा । होसील कोंवसा संकटींचा ॥ ८ ॥
तुका ह्मणे तुझी कीर्ति त्रिभुवनीं[1] । वेदाचिये वाणी वर्णवेना ॥ ९ ॥

॥ ११५० ॥

काय तुझी थोरी वर्णूं मी पामर । होसी दयाकर कृपासिंधु ॥ १ ॥
तुज ऐसी दया नाहीं आणिकांसी । ऐसें हृषीकेशी नवल एक ॥ २ ॥
कुरुक्षेत्रभूमीवरी पक्षी व्याले । तृणामाजी केलें कोठें त्यांनीं ॥ ३ ॥
अकस्मात तेथें रणखांब रोविला । युद्धाचा नेमिला ठाव तेथें ॥ ४ ॥
कौरव पांडव दळभार दोन्ही । झुंजावया रणीं आले तेथें ॥ ५ ॥
तयेकाळीं तुज पक्षी आठवीती । पाव बा श्रीपती ह्मणोनियां ॥ ६ ॥
हस्ती घोडे रथ येथें धांवतील । पाषाण होतील शतचूर्ण ॥ ७ ॥
ऐसिये आकांतीं वांचों कैसे परी । धांव बा श्रीहरी लवलाहें ॥ ८ ॥
टाकोनियां पिलीं कैसें जावें आतां । पावें जगन्नाथा लवलाहीं ॥ ९ ॥
आली तिये काळीं कृपा तुझ्या चित्ता । अनाथांच्या नाथा नारायणा ॥ १० ॥

---

१. पुष्कळ प्रतींत ‘ त्रिभुवना ’ असा पाठ आहे.

एका गजाचिया कंठीं घंटा होती। पाडिली अवचिती तयांवरी ॥११॥
अठरा दिवस तेथें द्वंद्वयुद्ध जालें। वारा ऊन लागलें नाहीं तया॥१२॥
जुंज जाल्यावरी दाविलें अर्जुना। तुह्मी नारायणा पक्षियांसी ॥१३॥
पाहें आपुलिया दासां म्यां रक्षिलें। रणीं वांचविलें कैशा परी ॥१४॥
ऐसी तुज माया आपुल्या भक्तांची। माउली आमुची तुका ह्मणे॥१५॥

॥ ११५१ ॥

अनंताचे मुखीं होसील गाइला। अमुप विठ्ठला दास तुह्मां ॥ १ ॥
माझें कोठें आलें होईल विचारा। तरीच अव्हेरा योग्य जालों ॥२॥
सर्व काळ तुह्मी असा जी संपन्न। चतुरा नारायण शिरोमणि ॥३॥
तुका ह्मणे ऐसे कलियुगींचे जीव। तरी नये कींव बहुपापी ॥ ४ ॥

॥ ११५२ ॥

अनंताच्या ऐकों कीर्ती। ज्याच्या चित्तीं हरिनाम ॥ उलंघूनि गेले सिंधू। हा भवबंधू तोडोनियां ॥ १ ॥ आतां हळुहळु तेचि वाहीं। चालों कांहीं अधिकारें ॥ २ ॥ खुंटूनियां गेले नावा। नाहीं हेवा खोळंबला ॥ न लगे मोल द्यावा रुका। भावें एका कारण ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाहतों वाट। उभा नीट पाउलीं ॥ भीमातिरीं थडवा केला। उठा चला लवलाहें ॥ ४ ॥

॥ ११५३ ॥

ऐसा हा लौकिक कदा राखवेना। पतितपावना देवराया ॥ १ ॥
संसार करितां ह्मणती हा दोषी। टाकितां आळसी पोटपोसा ॥ २ ॥
आचार करितां ह्मणती हा पसारा। न करितां नरा निंदिताती ॥३॥
संतसंग करितां ह्मणती हा उपदेशी। येरा अभाग्यासी ज्ञान नाहीं॥४॥
धन नाहीं त्यासि ठायींचा करंटा। समर्थासि ताठा लाविताती ॥५॥
बहु बोलों जातां ह्मणती हा वाचाळ। न बोलतां सकळ ह्मणती गर्वी ॥६॥
भेटीसि न वजातां ह्मणती हा निष्ठूर। येतां जातां घर बुडविलें॥७॥
लग्न करूं जातां ह्मणती हा मातला। न करितां झाला नपुंसक ॥८॥
निपुत्रिका ह्मणती पहा हो चांडाळ। पातकाचें मूळ पोरवडा ॥ ९ ॥

लोक जैसा ओक धरितां धरवे ना । अभक्ता जिरे ना संतसंग॥१०॥
तुका ह्मणे आतां ऐकावें वचन। त्यजुनियां जन भक्ति करा ॥ ११ ॥

॥ ११५४ ॥

उदारा कृपाळा पतितपावना । ब्रिदें नारायणा साच तुझीं ॥ १ ॥
वर्णिलासी जैसा जाणतां नेणतां । तैसा तूं अनंता साच होसी ॥२॥
दैत्यां काळ भक्तां मेघश्याममूर्ति । चतुर्भुज हातीं शंख चक्र ॥ ३ ॥
काम इच्छा तयां तैसा होसी राणी । यशोदेच्या स्तनीं पान करी ॥४॥
होऊनि सकळ कांहींच न होसी । तुका ह्मणे यासी वेद ग्वाही ॥५॥

॥ ११५५ ॥

गजइंद्र पशु आप्तें मोकलिला। तो तुज स्मरला पांडुरंगा ॥ १ ॥
त्यासाठीं गरुड सांडुनि धांवसी । माया झळंबसी दिनानाथा ॥ २ ॥
धेनु वत्सावरी झेंप घाली जैसी । तैसें गजेंद्रासी सोडविलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे ब्रीद बांधलें यासाटीं । भक्तांसी संकटीं रक्षावया ॥ ४ ॥

॥ ११५६ ॥

जन हें सुखाचें दिल्याघेतल्याचें ॥ अंत हें काळींचें नाहीं कोणी ॥१॥
जाल्या हीन शक्ति नाकडोळे गळती। सांडोनियां पळती रांडापोरें॥२॥
बाइल ह्मणे खर मरता तरी बरें । नासिलें हें घर थुंकोनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझीं नव्हतील कोणी । तुज चक्रपाणी वांचूनियां ॥ ४ ॥

॥ ११५७ ॥

मी तों बहु सुखी आनंदभरिता। आहें साधुसंतां मेळीं सदा ॥ १ ॥
कांहीं व्हावें ऐसें नाहीं माझ्या जीवा। आणीक केशवा तुजाविण॥२॥
न लगे वैकुंठ मोक्ष सायुज्यता । सुख वाटे घेतां जन्म ऐसें ॥ ३ ॥
मृत्युलोकीं कोण धरिल वासना । पावावया जनासवें दुःख ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुझा दास ऐसें लोकां । कांहीं सकळिकां कळों यावें ॥५॥

॥ ११५८ ॥

आपुले गांवींचें न देखेसें जालें। परदेसी एकलें किती कंठूं ॥ १ ॥
ह्मणऊनि पाहें मूळ येतां वाटे । जीवलग भेटे कोणी तरी ॥ २ ॥

पाहातां अवघ्या दिसतील दिशा । सकळही वोसा दृष्टीपुढें ॥ ३ ॥
तुका ह्मणे कोणी न संगे वारता । तुझी वाटे चिंता पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ११५९ ॥

आवडी धरूनि करूं गेलों लाड । भक्ति प्रेमकोड न पुरेचि ॥ १ ॥
ह्मणऊनि जीव ठेला आसावोनि । खेद होतो मनीं बहुसाल ॥ २ ॥
वेठीऐसें वाटे निर्फळ कारण । शीतळ होऊन खोडावलों ॥ ३ ॥
तुका ह्मणे सरतें नव्हेंचि पायांपें । बळ केलें पापें नव्हेचि भेटी ॥ ४ ॥

॥ ११६० ॥

लागों नेदीं बोल पायां तुझ्या हरी । जीव जावो परि न करीं आण॥१॥
परनारी मज रखुमाईसमान । वमनाहूनि धन नीच मानीं ॥ २ ॥
तुका ह्मणे याची लाज नसे कोणा । सहाकारी दीना ज्याची तया ॥३॥

॥ ११६१ ॥

काय मागें आह्मी गुंतलों काशानीं । पुढें वाहों मनीं धाक देवा ॥ १ ॥
कीर्ति चराचरीं आहे तैसी आहे । भेटोनियां काय द्यावें आह्मां ॥ २ ॥
घेउनी धरणें बैसती उपवासी । हट आह्मांपासीं नाहीं तैसा ॥ ३ ॥
तांतडी तयांनीं केली विटंबणा । आह्मां नारायणा काय उणें ॥ ४ ॥
नाहीं मुक्तिचाड वास वैकुंठींचा । जीव भाव आमुचा देऊं तुज ॥ ५ ॥
तुका ह्मणे काय मानेल तें आतां । तूं घेई अनंता सर्व माझें ॥ ६ ॥

॥ ११६२ ॥

पाठवाल तेथें गर्जेन पवाडे । कार्यीं देहाकडे नावलोकीं ॥ १ ॥
ह्मणऊनि मागें कंठींचा सौरस । पावतील नाश विघ्नें पुढें ॥ २ ॥
कृपेच्या कटाक्षें न भें कळिकाळा । येतां येत बळाशक्ती पुढें ॥ ३ ॥
तुका ह्मणे गुढी आणीन पायांपें । जगा होइल सोपें नाम तुझें ॥ ४ ॥

॥ ११६३ ॥

आपण चाळक बुद्धीच्या संचारा । आह्मांसी वेव्हारा पात्र केलें ॥ १ ॥
काय जालें तरी नेघा तुह्मी भार । आणीक कोणां थोर ह्मणों सांगा ॥२॥

---

१. अभंग ९३१ पहा.

पंचभूतें तव चर्माचिया मोटा । येथें खरा खोटा कोण भाव ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं बोलावया जागा । कां देवा वाउगा श्रम करूं ॥ ४ ॥

॥ ११६४ ॥

बोलिलेंच बोलें पडपडताळूनि । उपजत मनीं नाहीं शंका ॥ १ ॥
बहुतांची माय बहुत कृपाळ । साहोनि कोल्हाळ बुझाविसी ॥ २ ॥
बहुतांच्या भावें वांटिसी भातुकें । बहु कवतुकें खेळविसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसें जाणतसों वर्म । करणें तों श्रम न वजे वांयां ॥ ४ ॥

॥ ११६५ ॥

मज त्याची भीड नुलंघवे देवा ॥ जो ह्मणे केशवा दास तुझा ॥ १ ॥
मज आवडती बहु तैसे जन । करिती कीर्तन कथा तुझी ॥ २ ॥
सांडुनियां लाज नाचेन त्यांपुढें । आइकती कोडें नाम तुझें ॥ ३ ॥
न लगे उपचार होईन भिकारी । वैष्णवांच्या घरीं उष्टावळी ॥ ४ ॥
तुका ह्मणे जाणों उचित अनुचित । विचारूनि हित तेंचि करूं ॥ ५ ॥

॥ ११६६ ॥

तरीं भलें वांयां गेलों । जन्मा आलों मागुता । ह्मणऊनि ठेलों दास । सावकास निर्भयें ॥ १ ॥ उणें पुरें काय माझें । त्याचें ओझें तुझांसी ॥ २ ॥ सांभाळावें तें म्यां काई । अवो आई विठ्ठले । भाग जया जाइन स्थळा । तुज गोपाळा विसरेंना ॥ ३ ॥ आपलें म्यां एकसरें । करूनि बरें घेतलें । तुका ह्मणे नारायणा । आतां जाणां आपुलें ॥ ४ ॥

॥ ११६७ ॥

आहे तें सकळ प्रारब्धा हातीं । यावें काकुलती यासी आतां ॥ १ ॥
ऐसा माझ्या मनें सांगितला भाव । तोंवरीच देव दुजा नाहीं ॥ २ ॥
अवघियांची जेव्हां सारावी करकर । भावबळें थार धरूं येसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज ठेवावें पूजून । आणीक तो गुण नाहीं येथें ॥ ४ ॥

॥ ११६८ ॥

आडलिया जना होसी सहाकारी । अंधळियाकरीं काठी तूंचि ॥ १ ॥
आडिले गांजिले पीडिले संसारीं । त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥ २ ॥

प्रल्हाद महासंकटीं रक्षिला । तुह्मीं अपंगिला नानापरी ॥ ३ ॥
आपुलेंचि अंग तुह्मीं वोडविलें । त्याचें निवारलें महा दुःख ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुझे कृपे पार नाहीं । माझे विठाबाई जननीये ॥ ५ ॥

॥ ११६९ ॥

कवण जन्मता कवण जन्मविता। न कळे कृपावंता माव तुझी ॥ १ ॥
कवण हा दाता कवण हा मागता। न कळे कृपावंता माव तुझी ॥ २ ॥
कवण भोगिता कवण भोगविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ ३ ॥
कवण तें रूप कवण अरूपता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ ४ ॥
सर्वां ठायीं तूंचि सर्वही जालासी । तुका ह्मणे यासी दुजें नव्हे ॥ ५ ॥

॥ ११७० ॥

जन मानवलें वरी बाह्यात्कारीं । तैसा मी अंतरीं नाहीं जालों ॥ १ ॥
ह्मणउनी पंढरिनाथा वाटतसे चिंता । प्रगट बोलतां लाज वाटे ॥ २ ॥
संतां ब्रह्मरूप जालें अवघें जन । ते माझे अवगुण न देखती ॥ ३ ॥
तुका ह्मणे मी तों आपणांसी ठावा । आहें बरा देवा जैसा तैसा ॥४॥

॥ ११७१ ॥

चोरटें सुनें मारिलें टाळे । केंउं करी परि न संडी चाळे ॥ १ ॥
ऐसें एक दुराचारी गा देवा । आपुलिया जीवा घात करी ॥ २ ॥
नाक गेलें तरि लाज ना विचार । हिंडे फजितखोर दारोदारीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे कर्म बळिवंत गाढें । नेदी तया पुढेंमागें सरों ॥ ४ ॥

॥ ११७२ ॥

आह्मां आपुलें नावडे संचित । चरफडे चित्त कळवळ्यानें ॥ १ ॥
न कळतां जाला खोळंब मारगा । जगीं जालों जगा बहुरूपी ॥ २ ॥
कळों आलें बरें उघडले डोळे । कर्णधार मिळे तरि बरें ॥ ३ ॥
तुका ह्मणे व्हाल ऐकत करुणा । तरि नारायणा उडी घाला ॥ ४ ॥

॥ ११७३ ॥

ह्मणवितों दास न करितां सेवा । लंडपणें देवा पोट भरीं ॥ १ ॥
खोटें कोठें सरे तुझे पायांपाशीं । अंतर जाणसी पांडुरंगा ॥ २ ॥

आचरण खोटें आपणासी ठावें । लटिकें बोलावें दुसरें तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसा आहें अपराधी । असो कृपानिधी तुह्मां ठावा ॥ ४ ॥
॥ ११७४ ॥
जेथें पाहें तेथें कांडिती भूस । चिपाडें चोखूनि पाहाती रस ॥ १ ॥
काय सांगों देवा भुललें जीव । बहु यांची येतसे कींव ॥ २ ॥
वेठीचें मटळें लटिकेंची फुगे । पेणिया जाऊनि भिक्षा मागे ॥ ३ ॥
तुका ह्मणे कां उगेचि खोल । जवळी दाखवी आपणां बोल ॥ ४ ॥
॥ ११७५ ॥
भले लोक नाहीं सांडीत वोळखी । हे तों झाली देखी दुसऱ्याची ॥ १ ॥
असो आतां यासी काय चाले बळ । आपुलें कपाळ वोडवलें ॥ २ ॥
समर्थासि काय कोणें हें ह्मणावें । आपुलिया जावें भोगावरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मां बोल नाहीं देवा । नाहीं केली सेवा मनोभावें ॥ ४ ॥
॥ ११७६ ॥
जन तरी देखें गुंतलें प्रपंचें । स्मरण तें त्याचें त्यासी नाहीं ॥ १ ॥
ह्मणउनि मागें परतलें मन । घालणीचें रान देखोनियां ॥ २ ॥
इंद्रियांचा गाजे गोंधळ ये ठायीं । फोडीतसे डोई अहंकार ॥ ३ ॥
तुका ह्मणे देवा वासनेच्या आटें । केलीं तळपटें बहुतांचीं ॥ ४ ॥
॥ ११७७ ॥
काय तुझे उपकार पांडुरंगा । सांगों मी या जगामाजी आतां ॥ १ ॥
जतन हें माझें करूनि संचित । दिलें अवचित आणूनियां ॥ २ ॥
घडल्या दोषांचे न घलींच भरी । आली यास थोरी कृपा देवा ॥ ३ ॥
नव्हतें ठाउकें आइकिलें नाहीं । न मागतां पाहीं दान दिलें ॥ ४ ॥
तुका ह्मणे याच्या उपकारासाटीं । नाहीं माझे गांठी कांहीं एक ॥ ५ ॥
॥ ११७८ ॥
पाखांड्यांनीं पाठी पुरविला दुमाला । तेथें मी विठ्ठला काय बोलों ॥ १ ॥
कांद्याचा खाणार चोजवी कस्तुरी । आपण भिकारी अर्थ नेणे ॥ २ ॥
न कळे तें मज पुसती छळूनी । लागतां चरणीं न सोडिती ॥ ३ ॥

तुझ्या पायांविण दुजें नेणें कांहीं । तूंचि सर्वांठायीं एक मज ॥ ४ ॥
तुका ह्मणे खीळ पडो त्यांच्या तोंडा । किती बोलों भांडां वादकांशीं ॥ ५ ॥

॥ ११७९ ॥

कोणाच्या आधारें करूं मी विचार । कोण देइल धीर माझ्या जीवा ॥ १ ॥
शास्त्रज्ञ पंडित नव्हें मी वाचक । यातिशुद्ध एक ठाव नाहीं ॥ २ ॥
कलियुगीं बहु कुशळ हे जन । छळितील गुण तुझे गातां ॥ ३ ॥
मज हा संदेह झाला दोहीं सवा । भजन करूं देवा किंवा नको ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां दुराविता जन । किंवा हें मरण भलें दोन्ही ॥ ५ ॥

॥ ११८० ॥

तुजविण वाणीं आणिकांची थोरी । तरी माझी हरी जिव्हा झडो ॥ १ ॥
तुजविण चित्ता आवडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा ॥ २ ॥
नेत्रीं आणिकांसि पाहीन आवडी । जातु तेचि घडी चांडाळ हे ॥ ३ ॥
कथामृत पान न करिती श्रवण । काय प्रयोजन मग यांचें ॥ ४ ॥
तुका ह्मणे काय वांचून कारण । तुज एक क्षण विसंबतां ॥ ५ ॥

॥ ११८१ ॥

चित्त घेऊनियां तूं काय देसी । ऐसें मजपासीं सांग आधीं ॥ १ ॥
तरिच पंढरिराया करिन साटोवाटी । नेघें जया तुटी येईल तें ॥ २ ॥
रिद्धिसिद्धि कांहीं दाविसी अभिळास । नाहीं मज आस मुक्तीचीही ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझें माझें घडे तर । भक्तीचा भाव रे देणें घेणें ॥ ४ ॥

॥ ११८२ ॥

तुज काय करूं मज एक सार । अमृतनागर[1] नाम तुझें ॥ १ ॥
काय येणें उणें आह्मां तयापोटीं । गोवितां हे कंठीं कामधेनु ॥ २ ॥
नोळखे तानुलें माय ऐसी कोण । वोरसे देखून शोक त्याचा ॥ ३ ॥
जो नाहीं देखिला याचक नयनीं । तो पावे घेउनि लज्जा दान ॥ ४ ॥
नामासाटीं प्राण सांडियेला रणीं । शूर ते भांडणीं न फिरती ॥ ५ ॥
तुका ह्मणे आह्मी गातां गीतीं भला । भेटूनि विठ्ठला काय चाड ॥ ६ ॥

---

१. कांहीं प्रतींत ‘ सागर ’ असा पाठ आहे.

॥ ११८३ ॥

तुझी कीर्ती सांगों तुजपुढें जरी । ब्रह्मांडींही हरी माईना ते ॥ १ ॥
मेरूची लेखणी सागराची शाई । कागद हा मही न पुरेचि ॥ २ ॥
अनंत अपार आपंगिले भक्त । माझेंचि संचित ओडवेना ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मां बोल नाहीं देवा । पामरें म्यां सेवा केली नाहीं ॥४॥

॥ ११८४ ॥

यमधर्म आणिक ब्रह्मादिक देव । त्यांचा पूर्ण भाव तुझे पायीं ॥ १ ॥
करिती स्मरण पार्वतीशंकर । तेथें मी किंकर कोणीकडे ॥ २ ॥
सहस्रमुखेंसी शेष फणिवराचा । मज किंकराचा पाड काय ॥ ३ ॥
चंद्र सूर्य आणि सर्व तारांगणें । करिती भ्रमण प्रदक्षिणा ॥ ४ ॥
तुका ह्मणे त्यांसी स्वरूप कळेना । तेथें मज दीना कोण पुसे ॥ ५ ॥

॥ ११८५ ॥

विठोबाचे पायीं जीव म्यां ठेविला । भक्तिभावें केला देव ऋणी ॥ १ ॥
देव माझा ऋणी आहे सहाकारी । परस्परें वारी भवभय ॥ २ ॥
भवभयडोहीं बुडों नेदी पाहीं । धरूनियां वाही तारी मज ॥ ३ ॥
तारियेले दास पडिल्या संकटीं । विष केलें पोटीं अमृतमय ॥ ४ ॥
अमृतातें सेवीतसे नामरसा । तोडियेला फांसा बंधनाचा ॥ ५ ॥
बंधनाचा फांसा आह्मीं कांहीं नेणों । पाय तुझे जाणों पद्मनाभा ॥६॥
पद्मनाभा नाभिकमळीं ब्रह्मादिक । त्रैलोक्यनायक ह्मणविसी ॥ ७ ॥
ह्मणविसी देवा दासांचा अंकित । मनाचा संकेत पाहोनियां ॥ ८ ॥
पाहोनियां दृढ निश्चय तयाचा । तोचि दास साचा जवळीक ॥ ९ ॥
जवळीक जाली ब्रह्मीं सुखावले । मार्ग दाखविले मूढा जना ॥ १० ॥
मूढा जनामाजी दास तुझा मूढ । कास तुझी दृढ धरियेली ॥ ११ ॥
धरियेले तुझे पाय रे विठ्ठला । तुका सुखी जाला तुझ्या नामें ॥१२॥

॥ ११८६ ॥

पापाचीं संचितें देहासी दंडणा । तुज नारायणा बोल नाहीं ॥ १ ॥
पेरी कडू जिरें मागे अमृतफळें । अर्का वृक्षा केळें कैसीं येती ॥ २ ॥

सुख अथवा दुःख भोग हा देहाचा । नास हा ज्ञानाचा न करावा ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां देवा कां रुसावें । मनासी पुसावें काय केलें ॥ ४ ॥

॥ ११८७ ॥

संकल्पिला तुज सकळही भाव । कोण एक ठाव उरला तेथें ॥ १ ॥
इंद्रियव्यापार जें जें कांहीं कर्म । करितों ते धर्म सकळ तुझे ॥ २ ॥
माझें हित फार लागला विचार । तुज सर्व भार चालवणें ॥ ३ ॥
जो कांहीं लौकिक करिसी तो तुझा । अपमान पूजा कांहीं तरी ॥ ४ ॥
तुका ह्मणे मी तों राहिलों निश्चिंत । तुज कळे हित तैसें करीं ॥ ५ ॥

॥ ११८८ ॥

मोल घेऊनियां कथा जरी करीं । तरी भंगो हरी देह माझा ॥ १ ॥
माझी कथा करा ऐसें ह्मणें कोणा । तरी नारायणा जिव्हा झडो ॥ २ ॥
साह्य तूं जालासी काय उणें तुपें । आणीक भूतांपें काय मागों ॥ ३ ॥
तुका ह्मणे सर्व सिद्धि तुझे पायीं । तूं माझा गोसावी पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ११८९ ॥

कासयासी व्हावें जीतांचि मुक्त । सांडुनियां थीत प्रेमसुख ॥ १ ॥
वैष्णवांचा दास जाला नारायण । काय त्या मिळोन असे काम ॥ २ ॥
काय त्या गांठीचें पडलें सुटोन । उगेचि बैसोन धीर धरूं ॥ ३ ॥
सुख आह्मांसाटीं केलें हें निर्माण । निर्दैव तो कोण ह्मणे लाता ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज न लगे सायुज्यता । राहेन या संतां समागमें ॥ ५ ॥

॥ ११९० ॥

पांडुरंगा आतां ऐका हे विनंती । बहु माझे चित्तीं भय वाटे ॥ १ ॥
नाहीं आइकिलें संतांचिया मुखें । तें या मज लोकें भेडसाविलें ॥ २ ॥
विष्णुदासां गति नाहीं तरावया । ह्मणती गेले वांयां कष्टतही ॥ ३ ॥
धिक्कारिती मज करितां कीर्तन । काय सांगों शीण ते काळींचा ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज वाटतें उदास । काय करूं यास पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ ११९१ ॥

श्वानाचियापरी लोळें तुझ्या द्वारीं । भुंकों हरिहरि नाम तुझें ॥ १ ॥

भुंकीं उठीं बैसें न वजायें वेगळा । लुडबुडीं गोपाळा पायांपाशीं ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मां वर्म आहे ठावें । मागोन तें द्यावें प्रेमसुख ॥ ३ ॥

॥ ११९२ ॥

जन्ममरणांची कायसी चिंता । तुझ्या शरणागतां पंढरीराया ॥ १ ॥
वदनीं तुझें नाम अमृतसंजीवनी । असतां चक्रपाणी भय कवणा ॥ २ ॥
हृदयीं तुझें रूप बिंबलें साकार । तेथें कोण पाड संसाराचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझ्या चरणांची पाखर । असतां कळिकाळ पायां तळीं ॥ ४ ॥

॥ ११९३ ॥

दीनानाथा तुझीं ब्रिदें चराचर । घेसील कैवार शरणागता ॥ १ ॥
पुराणीं जे तुझे गर्जती पवाडे । ते आह्मां रोकडे कळों आले ॥ २ ॥
आपुल्या दासांचें न साहसी उणें । उभा त्याकारणें राहिलासी ॥ ३ ॥
चक्र गदा हातीं आयुधें अपारें । न्यून तेथें पुरें करूं धांवे ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुज भक्तांचें कारण । करावया पूर्ण अवतार ॥ ५ ॥

॥ ११९४ ॥

आमुचें उचित हेचि उपकार । आपलाचि भार घालूं तुज ॥ १ ॥
भूक लागलिया भोजनाची आळी । पांघुरणें काळीं शीताचिये ॥ २ ॥
जेणें काळें उठी मनाची आवडी । तेचि मागों घडी आवडे तें ॥ ३ ॥
दुःख येऊं नेदी आमचिया घरा । चक्र करी फेरा भोंवताला ॥ ४ ॥
तुका ह्मणे नाहीं मुक्तीसवें चाड । हेंचि आह्मां गोड जन्म घेतां ॥ ५ ॥

॥ ११९५ ॥

दिली हाक मनें नव्हे ती जतन । वेगळाले[१] गुण धांव घेती ॥ १ ॥
काम क्रोध मद मत्सर अहंकार । निंदा हिंसा[२] फार माया तृष्णा ॥ २ ॥
इंद्रियांचे भार फिरतील चोर । खाणें घ्यावया घर फोडूं पाहे ॥ ३ ॥
माझा येथें कांहीं न चले पराक्रम । आहे त्याचें वर्म तुझे हातीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां करितों उपाय । जेणें तुझे पाय आतुडती ॥ ५ ॥

१. कांहीं प्रतींत 'वेंटाळिल्या गुणें' असा पाठ आहे. २. कोठें 'द्वेष' असा पाठ आहे.

॥ ११९६ ॥

दुखवलें चित्त आजिच्या प्रसंगें । बहु पीडा जगें केली देवा ॥ १ ॥
कधीं हा संबंध तोडिसी तें नेणें । आठवूनि मनें पाय असें ॥ २ ॥
आणिकांचीं येती अंतरा अंतरें । सुखदुःख बरेंवाईट तीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे घडे एकांताचा वास । तरिच या नास संबंधाचा ॥ ४ ॥

॥ ११९७ ॥

खेळतां न भ्यावें समर्थाच्या बाळें । तयाच्या सकळ सत्तेखालीं ॥१॥
तरी लेवविला शोभे अळंकार । नाहीं तरी भार मानाविण ॥२॥
अवघीच दिशा असावी मोकळी । मायबाप बळी ह्मणऊनि ॥३॥
तुका ह्मणे माझें ऐसें आहे देवा । ह्मणऊनि सेवा समर्पिली ॥४॥

॥ ११९८ ॥

कळों आला भाव माझा मज देवा । वांयांविण जीवा आठविलें ॥ १ ॥
जोडूनि अक्षरें केलीं तोंडपिटी । न लगे शेवटीं हातीं कांहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे माझे गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे मज ॥ ३ ॥

॥ ११९९ ॥

बोल नाहीं तुझ्या दातृत्वपणासी । आह्मी अविश्वासी सर्वभावें ॥१॥
दंभें करी भक्ती सोंग दावी जना । अंतरीं भावना वेगळिया ॥२॥
चित्ता तूं रे साक्षी तुज कळे सर्व । किती करूं गर्व आतां पुढें ॥३॥
तुका ह्मणे देवा तूं काय करिसी । कर्मा दुस्तरासी आमुचिया ॥४॥

॥ १२०० ॥

समर्थासी लाज आपुल्या नामाची । शरण आल्याची लागे चिंता ॥१॥
न पाहे तयाचे गुण दोष अन्याय । सुख देउनि साहे दुःख त्याचें ॥२॥
मान भलेपण नाहीं फुकासाटीं । जयावरि गांठी झीज साहे ॥३॥
तुका ह्मणे हें तूं सर्वही जाणसी । मज अधिरासी धीर नाहीं ॥४॥

॥ १२०१ ॥

आवडी धरोनी आलेती आकारा । केला हा पसारा याजसाटीं ॥ १ ॥
तें मी तुझें नाम गाईन आवडी । क्षण एक घडी विसंबेना ॥ २ ॥

वर्म जाणावें हा मुख्यधर्मसार । अवघे प्रकार तयापासीं ॥ ३ ॥
वेगळ्या विचारें वेगळाले भाव । धरायासी ठाव बहु नाहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे घालूं इच्छेचिये पोटीं । कवळुनी धाकुटी मूर्ती जीवें ॥ ५ ॥

॥ १२०२ ॥

पहावया तुझा जरी बोलें अंत । तरि माझे जात डोळे देवा ॥ १ ॥
स्तंभीं तुज नाहीं घातलें प्रल्हादें । आपुल्या आनंदें अवतार ॥ २ ॥
भक्ताचिया काजा जालासी सगुण । तुज नाहीं गुण रूप नाम ॥ ३ ॥
ऐसा कोण देवा अधम यातीचा । निर्धार हा साचा नाहीं तुझा ॥ ४ ॥
तुका ह्मणे बोलें कवतुकें गोष्टी । नेदीं येऊं पोटीं राग देवा ॥ ५ ॥

॥ १२०३ ॥

जरी तुझा मज नसता आधार । कैसा हा संसार दुर्‍हावता ॥ १ ॥
ऐसा बळी कोण होईल पुरता । जो हे वारी चिंता आशापाश ॥ २ ॥
मायामोहफांसा लोकलाजबेडी । तुजविण तोडी कोण एक ॥ ३ ॥
हें तों मज कळों आलें अनुभवें । बरें माझ्या जीवें पांडुरंगा ॥ ४ ॥
तुका ह्मणे यास तूंचि माझा ग्वाही । परी भाव नाहीं जना लोकां ॥ ५ ॥

॥ १२०४ ॥

येऊनि संसारा काय हित केलें । आयुष्य नासिलें शिश्नोदरा ॥ १ ॥
विषय सेवितां कोण तृप्त जाला । इंधनीं निवाला अग्नि कोठें ॥ २ ॥
देखोनि मृगजळ भांबावलीं वेडीं । विचाराची थडी न टाकिती ॥ ३ ॥
ऐसियां जीवांसी सोय न लाविसी । निष्ठुर कां होसी कृपाळुवा ॥ ४ ॥
तुका ह्मणे देवा अगाध पैं थोरी । सर्वांचे अंतरीं पुरलासी ॥ ५ ॥

॥ १२०५ ॥

संसाराचें ओझें वाहाता वाहविता । तुजविण अनंता नाहीं कोणी ॥ १ ॥
गीतेमाजी शब्द दुंदुभीचा गाजे । योगक्षेमकाज करणें त्याचें ॥ २ ॥
चतुर्भुजा करीं वारू शृंगारावे । सारथ्य करावें अर्जुनाचें ॥ ३ ॥
श्वपच अंत्यज भक्तिस्नेहें जाला । अचळपदीं केला ध्रुव तुका ॥ ४ ॥

॥ १२०६ ॥

फिरविलें देऊळ जगामाजी ख्याति । नामदेवा हातीं दुध प्याला ॥ १ ॥
भरियेली हुंडी नरसी मेहत्याची । धनाजीजाटाचीं सेतें पेरी ॥ २ ॥
मिराबाईसाटीं घेतो विषप्याला । दामाजीचा जाला पाडेवार ॥ ३ ॥
कबीराचे मागीं विणूं लागे सेले । उठविलें मूल कुंभाराचें ॥ ४ ॥
आतां तुह्मी दया करा पंढरिराया । तुका विनवी पायां वेळोवेळां ॥ ५ ॥

॥ १२०७ ॥

न कळे महिमा वेद मौनावले । जेथें पांगुळले मनपवन ॥ १ ॥
चंद्र सूर्य ज्याचें तेज वागविती । तेथें माझी मती कोणीकडे ॥ २ ॥
काय म्यां वाणावें तुझ्या थोरपणा । सहस्रवदना वर्णवे ना ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी बाळ तूं माउली । कृपेची साउली करीं देवा ॥ ४ ॥

॥ १२०८ ॥

दारिद्रानें विप्र पीडिला अपार । तया पोटीं पोर एक असे ॥ १ ॥
बाहेरी मिष्टान्न मिळे एके दिशीं । घेऊनी छंदासी त्याचि बैसे ॥ २ ॥
क्षुधाकाळीं रडे देखिलें तें मागे । कांहीं केल्या नेघे दुजें कांहीं ॥ ३ ॥
सहज कौतुकें बोले बापमाये । देवापाशीं आहे मागशी तें ॥ ४ ॥
तेव्हां तुजलागीं स्मरे नारायणा । जीवींच्या जीवना पांडुरंगा ॥ ५ ॥
लागली हे क्षुधा जात असे प्राण । काय हें निर्वाण पाहातोसी ॥ ६ ॥
ब्रह्मांडनायक विश्वाचा पाळक । वरी तिन्ही लोक पोसितोसी ॥ ७ ॥
प्राण हा उत्कर्ष जाहला विठ्ठळ । तेव्हां तो कृपाळ धांव घाली ॥ ८ ॥
सांडुनि वैकुंठ धांव घाली तंई । आळंगिला बाहीं कृपावंतें ॥ ९ ॥
तुका ह्मणे दिला क्षीराचा सागर । राहे निरंतर तयापासीं ॥ १० ॥

॥ १२०९ ॥

हीनवर बीजवर दोघी त्या गडणी । अखंड कहाणी संसाराची ॥ १ ॥
माझा पति बहु लहानाचि आहे । खेळावया जाय पोरांसवें ॥ २ ॥
माझें दुःख जरी ऐकशील सई । ह्मातारा तो बाई खोकतसे ॥ ३ ॥
खेळे सांजवरी बाहेरी तो राहे । वाट मी बो पाहें सेजेवरी ॥ ४ ॥

पूर्व पुण्य माझें नाहीं बाई नीट । बहु होती कष्ट सांगों काई ॥ ५ ॥
जवळ मी जातें अंगा अग लावूं । नेदी जवळ येऊं कांटाळतो ॥ ६ ॥
पूर्व सुकृताचा हाचि बाई ठेवा । तुका ह्मणे देवा काय बोल ॥ ७ ॥

॥ १२१० ॥

कैसी करूं आतां सांग तुझी सेवा । शब्दज्ञानें देवा नाश केला ॥ १ ॥
आतां तुझें वर्म न कळे अनंता । तुज न संगतां बुडूं पाहें ॥ २ ॥
संध्या स्नान केली आचाराची नासी । काय तयापासीं ह्मणती एक ॥ ३ ॥
बुडविली भक्ति ह्मणती पाषाण । पिंडाचें पाळण स्थापूनियां ॥ ४ ॥
न करावी कथा ह्मणती एकादशी । भजनाची नासी मांडियेली ॥ ५ ॥
न जावें देउळा ह्मणती देवघरीं । बुडविलें यापरी तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ १२११ ॥

कैसें करूं ध्यान कैसा पाहों तुज । वर्म दावीं मज याचकासी ॥ १ ॥
कैसी भक्ति करूं सांग तुझी सेवा । कोण्या भावें देवा आतुडसी ॥ २ ॥
कैसी कीर्ती वाणूं कैसा लक्षा आणूं । जाणूं हा कवणु कैसा तुज ॥ ३ ॥
कैसा गाऊं गीतीं कैसा ध्याऊं चित्तीं । कैसी स्थिती मती दावी मज ॥ ४ ॥
तुका ह्मणे जैसें दास केलें देवा । तैसें हें अनुभवा आणीं मज ॥ ५ ॥

॥ १२१२ ॥

वाट दावी त्याचें गेलें काय । नागवला जो वारितां जाय ॥ १ ॥
ऐसीं मार्गें ठकलीं किती । सांगतां खाती विषगोळा ॥ २ ॥
विचारोनि पाहे त्यास । न वजे जीवें नव्हे नास ॥ ३ ॥
तुका ह्मणे जो रुसला जीवा । तयासी केशवा काय चाले ॥ ४ ॥

॥ १२१३ ॥

मिळे हरिदासांची दाटी । रीग न होय शेवटीं ॥ १ ॥ तेथें काय
म्यां करावें । माझें कोणें आइकावें ॥ २ ॥ कैसें तुज लाजवावें ।
भक्त ह्मणोनियां भावें ॥ ३ ॥ नाचतां नये ताळीं । मज वाजवितां
टाळी ॥ ४ ॥ अति मंडित भूषणें । शरीर माझें दैन्यवाणें ॥ ५ ॥
तुका ह्मणे कमळापति । मज न द्यावें त्यां हातीं ॥ ६ ॥

॥ १२१४ ॥

मिथ्या आहे सर्व अवघें हें मायिक। न कळे विवेक मज कांहीं ॥ १ ॥
सर्व बाजागिरि वाटती ही खरी। पाहातां येथें उरी कांहीं नाहीं २
आतां मज दुःख वाटतें अंतरीं। उपाय झडकरी सांग कांहीं ॥ ३ ॥
पुढें कोण गति न कळे सर्वथा। तुझे पायीं माथा ठेवियेला ॥ ४ ॥
करणें तें करीं सुखें आतां हरी। तुज म्यां निर्धारीं धरियेलें ॥ ५ ॥
स्वहित तें काय न कळे सर्वथा। तारीं तूं अनंता तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ १२१५ ॥

गणेश सारजा करिती गायना। आणि देवांगना रंभे ऐशा ॥ १ ॥
तेथें आह्मां मानवांहीं विनवावें तें काय। सुरवर पाय वंदिती जेथें ॥ २ ॥
ज्याच्या गायनासी तटस्थ शंकर। त्याहि परि पार न कळे तुझा ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी किंकर ते किती। इंद्राचीहि मति नागविशी ॥ ४ ॥

॥ १२१६ ॥

नो बोलावें ऐसें जनासी उत्तर। करितों विचार बहु वेळा ॥ १ ॥
कोण पाय आड ठाकतें येऊन। पालटी तो गुण अंतरींचा ॥ २ ॥
संसारा हातीं सोडवूनि गळा। हे कां अवकळा येती पुढें ॥ ३ ॥
तुका ह्मणे सर्व घडे अंतराय। यास करूं काय पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १२१७ ॥

आतां हें उचित माझें जना हातीं। पाहिजे फजिती केली कांहीं ॥ १ ॥
मग मी तुमचे न सोडीं चरण। त्रासोनियां मन येईल ठाया ॥ २ ॥
वाउगे वाणीचा न धरीं कांटाळा। ऐसी कां चांडाळा बुद्धि मज ॥ ३ ॥
तुका ह्मणे जरि माथां बैसे घाव। तरि मग वाव नेघे पुढें ॥ ४ ॥

॥ १२१८ ॥

मज नष्टा माया मोह नाहीं लोभ। अधिक हा क्षोभ आदराचा ॥ १ ॥
धिग हें शरीर अनउपकार। न मनीं आभार उपकाराचा ॥ २ ॥
मजहून नष्ट आहे ऐसा कोण। नावडे मिष्टान्न बहुमोल ॥ ३ ॥

न दिसती मज आपलेसे गुण । संचित तें कोण जाणे मागें ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझें देखोनियां काई । पांडुरंगा पायीं राखियेलें ॥ ५ ॥

॥ १२१९ ॥

त्रासला हा जीव संसारींच्या सुखा । तुजविण सखा नाहीं कोणी ॥ १ ॥
ऐसें माझे मनीं वाटे नारायणा । घालावी चरणावरी मिठी ॥ २ ॥
कई तें सुंदर देखोनि रूपडें । आवडीच्या कोडें आळंगीन ॥ ३ ॥
नाहीं पूर्व पुण्य मज पापरासी । ह्मणोनि पायांसी अंतरलों ॥ ४ ॥
अलभ्य लाभ कैंचा संचितावेगळा । विनवी गोपाळा दास तुका ॥ ५ ॥

॥ १२२० ॥

करूनी चिंतन खेळों भोवतालें । चित्त येथें आलें पायांपाशीं ॥ १ ॥
येथें नाहीं खोटा चालत परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ २ ॥
सुखदु:खें तुज देऊनी सकळ । नाहीं ऐसा काळ केला आह्मी ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाला देहाचा विसर । नाहीं आतां पर आप दोन्ही ॥ ४ ॥

॥ १२२१ ॥

सुराणींचीं जालों लाडिकीं एकलीं । वडील धाकुलीं आह्मी देवा ॥ १ ॥
ह्मणऊनि कांहीं न घडे अव्हेर । गोमटें उत्तर भातुकेंही ॥ २ ॥
कांहीं एक नाहीं वंचिलें वेगळें । मुळींचिया मुळें स्थिराविलें ॥ ३ ॥
लेवविलीं अंगीं आपुलीं भूषणें । अळंकार लेणें सकळही ॥ ४ ॥
सारितां न सरे आमुप भांडार । धना अंतपार नाहीं लेखा ॥ ५ ॥
तुका ह्मणे आह्मी आळवूं आवडी । ह्मणऊनी जोडी दाखविली ॥ ६ ॥

॥ १२२२ ॥

नाहीं सरों येत कोरड्या उत्तरीं । जिव्हाळ्याची बरी ओल ठायीं ॥ १ ॥
आपुलिया हिता मानिसी कारण । सत्या नारायण साह्य असो ॥ २ ॥
निर्वाणीं निवाड होतो आगीमुखें । तप्त लोह सुखें धरितां हातीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे नेम न टळतां बरें । खऱ्यासीचि खरें ऐसें नांव ॥ ४ ॥

॥ १२२३ ॥

आलों उल्लंघुनि दु:खाचे पर्वत । पायांपाशीं हित तुमच्या तरी ॥ १ ॥

न देखेल त्यासा दुःखी होतें मन । कठिणें कठिण वाटतसे ॥ २ ॥
नव्हे सांडी परि वाटतें निरास । न ये माझा दिस संकल्पाचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मीं सदैव जी देवा । माझ्या ह्याचि जीवा एक ठाव ॥४॥

॥ १२२४ ॥

नामाचा महिमा बोलिलों उत्कर्ष । अंगा कांहीं रस न येचि तो ॥ १ ॥
कैसें समाधान राहे पांडुरंगा । न लगेचि अंगा आणी कांहीं ॥ २ ॥
लाभाचिये अंगीं सोस कवतुकें । फिक्याचें तें फिकें वेवसाव ॥ ३ ॥
तुका ह्मणे करा आपुला महिमा । नका जाऊं धर्मावरि माझ्या ॥ ४ ॥

॥ १२२५ ॥

वैराग्याचा अंगीं जालासे संचार । इच्छी वनांतर सेवावया ॥ १ ॥
कां जी याचें करूं नये समाधान । वियोगानें मन सिणतसे ॥ २ ॥
नयेचि न्यावया पंढरीचें मूळ । न देवेचि माळ कंठींचीही ॥ ३ ॥
तुका ह्मणे जालें अप्रीतिचें जिणें । लाजिर हें वाणें सेवा करी ॥ ४ ॥

॥ १२२६ ॥

बोलिलों तें आतां पाळावें वचन । ऐसें पुण्य कोण माझे गांठी ॥ १ ॥
जातों आतां आज्ञा घेऊनियां स्वामी । काळक्षेप आह्मी करूं कोठें ॥ २ ॥
न घडे यावरी न धरवे धीर । पीडतां राष्ट्र देखोनी जग ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी दिसे मोकलिलें । काय आतां आलें जीवित्वाचें ॥ ४ ॥

॥ १२२७ ॥

ह्मणवुनि काय जीऊं भक्तपणें । जायाचीं भूषणें अळंकार ॥ १ ॥
आपुल्या कष्टाची करूनियां जोडी । मिरवीन उघडी इच्छावसें ॥ २ ॥
तुके तरि तुकीं खऱ्याचें उत्तम । मुलाम्याचा भ्रम कोठवरि ॥ ३ ॥
तुका ह्मणे पुढें आणि मागें फांस । पावें ऐसा नास न करीं देवा ॥४॥

॥ १२२८ ॥

सोंवळा होऊं तों वोंवळें जडलें । सांडीमांडी बोलतोंडीं बीजीं ॥ १ ॥
पकसरीं केली कळिवरें साटी । आतां नका तुटी पायांसवें ॥ २ ॥

संकल्पीं विकल्प पापाचा सुकाळ । रज्जुसर्प मूळ मरणाचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे हें तूं ब्रह्मांड चाळिता । मी कां करूं चिंता पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १२२९ ॥

कोणी एकाचिया पोरें केली आळी । ठावी नाहीं पोळी मागे देखी ॥ १ ॥
बुझाविलें हातीं देउनी खापर । छंद करकर वारियेली ॥ २ ॥
तैसें नको करूं मज कृपावंता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे मायबापाचें उचित । करावें हें हित बाळकाचें ॥ ४ ॥

॥ १२३० ॥

काय करूं आतां धरुनियां भीड । निःशंक हें तोंड वाजविलें ॥ १ ॥
नव्हे जगीं कोणी मुकियाचा जाण । सार्थक लाजोनी नव्हे हित ॥ २ ॥
आलें तें उत्तर बोलें स्वामीसवें । धीट नीट जीवें होऊनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे मना समर्थासीं गांठी । घालावी हे मांडी थापटूनी ॥ ४ ॥

॥ १२३१ ॥

यांसाटीं करितों निष्ठुर भाषण । आहेसी तूं जाण सर्वदाता ॥ १ ॥
ऐसें दुःख कोण आहे निवारिता । तो मी जाऊं आतां शरण त्यासी ॥ २ ॥
बैसलासों केणें करुनि एक घरीं । नाहीं येथें उरी दुसऱ्याची ॥ ३ ॥
तुका ह्मणे आलें अवघें पायांपें । आतां मायबापें नुपेक्षावें ॥ ४ ॥

॥ १२३२ ॥

चालें दंडवत घालीं नारायणा । आपुल्या कल्याणा लागूनियां ॥ १ ॥
बैसविला पदीं पुत्र राज्य करी । पिता वाहे शिरीं आज्ञा त्याची ॥ २ ॥
तुका ह्मणे आहे ठायींचाचि मान । आतां अनुमान कायसा तो ॥ ३ ॥

॥ १२३३ ॥

न कळसी ज्ञाना न कळसी ध्याना । न कळसी दर्शना धुंडाळितां ॥ १ ॥
न कळसी आगमा न कळसी निगमा । न बोलवे सीमा वेदां पार ॥ २ ॥
तुका ह्मणे तुझा नाहीं अंतपार । ह्मणोनि विचार पडिला मज ॥ ३ ॥

---

१. निष्ठुर यासाटीं करितों. २. सर्व जाण दाता. ३. कोण दुःख. ४. अवघेंचि.

॥ १२३४ ॥

माउलीसी सांगे कोण। प्रेम वाढवी तान्हें ॥१॥ अंतरींचा कळवळा। करीतसे प्रतिपाळा ॥२॥ मायबापाची उपमा। तुज देऊं घनश्यामा ॥३॥ तेही साजेना पाहातां। जीवलगा पंढरिनाथा ॥४॥ माय पाळी संसारीं। परलोकीं राहे दुरी ॥५॥ तैसा नव्हेसी अनंता। काळावरी तुझी सत्ता ॥६॥ तुका ह्मणे नारायणा। तुह्मां बहुत करुणा ॥७॥

॥ १२३५ ॥

धर्म रक्षावया अवतार घेसी। आपुल्या पाळिसी भक्तजना ॥ १ ॥
अंबऋषीसाटीं जन्म सोसियेले। दुष्ट निर्दाळिले किती एक ॥ २ ॥
धन्य तुज कृपासिंधु ह्मणतील। आपुला तूं बोल साच करीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज वर्णितो पुराणें। होय नारायण दयासिंधु ॥ ४ ॥

॥ १२३६ ॥

आजामीळ अंत मरणासि आला। तोंवरि स्मरला नाहीं तुज ॥ १ ॥
प्राण जातेवेळे ह्मणे नारायण। त्यासाटीं विमान पाठविलें ॥ २ ॥
बहुत कृपाळु होसी जगन्नाथा। त्रैलोक्यसमर्था सोइरिया ॥ ३ ॥
तुका ह्मणे भक्तकाज तूं कैवारी। तुज साही चारी वर्णिताती ॥ ४ ॥

॥ १२३७ ॥

मी त्यांसी अनन्य तीं कोणा असती। ऐसें तंव चित्तीं विचारावें ॥१॥
आहे तो विचार आपणयापाशीं। कळा बिंबाऐसी प्रतिबिंबीं ॥२॥
शुभ शकुन तो शुभ लाभें फळे। पुढील तें कळे अनुभवें ॥३॥
तुका ह्मणे माझा असेल आठव। तैसा माझा भाव तुझ्या पायीं ॥४॥

॥ १२३८ ॥

रडे अळंकार दैन्याचिये कांती। उत्तमा विपत्तिसंग घडे ॥ १ ॥
एकाविण एक अशोभ्य दातारा। कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥ २ ॥
रांधूं नेणे तया पुढील आइतें। केलें तें सोइतें वांयां जाय ॥ ३ ॥
तुका ह्मणे चिंतामणि शेळी गळा। पावे अवकळा ह्मणउनी ॥ ४ ॥

॥ १२३९ ॥

वदे वाणी परि दुर्लभ अनुभव । चालीचाचि वाहो बहुतेक ॥ १ ॥
आह्मी ऐसें कैसें राहावें निश्चळ । पाठिलागा काळ जिंतितसे ॥ २ ॥
वाढवितां पोट दंभाचे पसारे । येतील माघारे मुदला तोटे ॥ ३ ॥
तुका ह्मणे बरें जागवितां मना । तुमच्या नारायणा अभयें करें ॥४॥

॥ १२४० ॥

करिसी तें देवा करीं माझें सुखें । परी मी त्यासी मुखें न ह्मणे संत॥१॥
जया राज्य द्रव्य करणें उपार्जना । वश दंभमाना इच्छे जाले ॥ २ ॥
जगदेव परी निवडीन निराळे । ज्ञानाचे आंधळे भारवाही ॥ ३ ॥
तुका ह्मणे भय न धरीं मानसीं । ऐसियाचे विशीं करितां दंड ॥ ४ ॥

॥ १२४१ ॥

आइक नारायणा वचन माझें खरें । सांगतों निर्धारें तुजपासीं ॥ १ ॥
नाहीं भाव मज पडिली लोकलाज । राहिलेंसे काज तुझे पायीं ॥२॥
जरि तुज कांहीं करणें उचित । तरीं तूं पतित तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १२४२ ॥

कोण जाणे कोणा घडे उपासना । कोण या वचनाप्रति पावे ॥ १ ॥
आतां माझा श्रोता वक्ता तूंचि देवा । करावी ते सेवा तुझीच म्यां ॥ २ ॥
कुशळ चतुर येथें न सरते । करितील रिते तर्क मतें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जालें पेणें एके घरीं । मज आणि हरी तुह्मां गांठी ॥ ४ ॥

॥ १२४३ ॥

दुःख वाटे ऐसी ऐकों नये गोष्टी । जेणें घडे तुटी तुझ्या पायीं ॥१॥
येतो कळवळा देखोनियां घात । करितों फजित नाइकती ॥ २ ॥
काय करूं देवा ऐसी नाहीं शक्ति । दंडुनि पुढती वाटे लावूं ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज दावूं नको ऐसे । दृष्टीपुढें पिसे पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १२४४ ॥

तुज ऐसा कोण उदाराची रासी । आपुलेंचि देसी पद दासा ॥ १ ॥
शुद्ध हीन कांहीं न पाहासी कुळ । करिसी निर्मळ वास देहीं ॥ २ ॥

भावें हें कदान्न खासी त्याचे घरीं। अभक्तांच्या परी नावडती ॥ ३ ॥
न वजासी जेथें दुरी दवडितां । न येसी जो चित्ता योगियांच्या॥४॥
तुका ह्मणे ऐसीं ब्रीदें तुझीं खरीं । बोलतील चारी वेद मुखें ॥ ५ ॥

॥ १२४५ ॥

उगेंचि हें मन राहतें निश्चळ । तरि कां तळमळ साट होती ॥ १ ॥
काय तुमचीं नेणों कवतुक विंदानें । सर्वोत्तमपणें खेळतसां ॥ २ ॥
नानाछंदें आह्मां नाचवावें जीवां। वाढवाव्या हांवा भलत्यापुढें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी आपुली प्रतिष्ठा । वाढवावया चेष्टा करीतसां ॥ ४ ॥

॥ १२४६ ॥

तुह्मी साच नुपेक्षाल हा भरवसा । मज जाणतसां अधीरसें ॥ १ ॥
कासया घातला लांबणी उद्धार । ठेवा करकर वारूनियां ॥ २ ॥
सुटों नये ऐसें कळलें निरुतें । कां द्यावें मागुतें आळवूनि ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी सभाग्य जी देवा। माझा तुह्मां केवा काय आला॥४॥

॥ १२४७ ॥

काय आतां आह्मीं पोटाचि भरावें। जग चाळवावें भक्त म्हूण ॥ १ ॥
ऐसा तरी एक सांगा जी विचार। बहु होतों फार कासावीस॥ २ ॥
काय कवित्वाची घालूनियां रूढी। करूं जोडाजोडी अक्षरांची ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय गुंपोनि दुकाना। राहों नारायणा करुनी घात ॥ ४ ॥

॥ १२४८ ॥

जनीं जनार्दन ऐकतों हे मात । कैसा तो वृत्तांत न कळे आह्मां ॥१॥
जन्म जरा मरण कवण भोगी भोग । व्याधि नाना रोग सुख दुःखें ॥ २ ॥
पापपुण्यें शुद्धाशुद्ध आचरणें । हीं कोणांकारणें कवणें केलीं ॥ ३ ॥
आह्मां मरण नाश तूं तव अविनाश । कैसा हा विश्वास साच मानूं ॥ ४ ॥
तुका ह्मणे तूंचि निवडीं हा गुढार । दाखवीं साचार तेंचि मज ॥ ५ ॥

॥ १२४९ ॥

आश्चर्य या वाटे नसत्या छंदाचें । कैसें दिलें साचें करोनियां ॥ १ ॥
दुजियासी वंत अकळ हा भाव । करावा तो जीव साक्षी येथें ॥ २ ॥

एकीं अनेकत्व अनेकीं एकत्व । प्रकृतिस्वभाव प्रमाणेंचि ॥ ३ ॥
तुका ह्मणे करूं उगवूं जाणसी । कुशळ येविशीं तुह्मी देवा ॥ ४ ॥

॥ १२५० ॥

पापपुण्यसुखदु:खाचीं मंडळें । एक एका[1] वेळे डाव घेती ॥ १ ॥
कवतुक डोळां पाहिलें सकळ । नाचवितो काळ जीवांसी तो ॥ २ ॥
स्वर्गीचिया भोगें सरतां नरक । मागें पुढें एक एक दोन्ही ॥ ३ ॥
तुका ह्मणे भय उपजलें मना । घेई नारायणा कडिये मज ॥ ४ ॥

॥ १२५१ ॥

तोंडें बोलावें तें तरी वाटे खरें । जीव येरयेरें वंचिजे ना ॥ १ ॥
हें तुह्मां सांगणें काय उगवूनि । जावें समजोनि पांडुरंगा ॥ २ ॥
जेवित्याची खूण वाढित्या अंतरीं । प्रीतीनें हे धरी चाली तेथें ॥ ३ ॥
तुका ह्मणे बहु परीचे आदर । अत्यंत वेव्हारसंपादणी ॥ ४ ॥

॥ १२५२ ॥

खुंटोनियां दोरी आपणियांपाशीं । वावडी आकाशीं मोकलिली ॥ १ ॥
आपुलिया आहे मालासी जतन । गाहाणाचे ऋण बुडों नेणें ॥ २ ॥
बीज नेलें तेथें येईल अंकुर । जतन तें सार करा याचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी निश्चितीची सेवा । वेगळें नाहीं देवा उरों दिलें ॥ ४ ॥

॥ १२५३ ॥

कोणतें कारण राहिलें यामुळें । जें म्यां तुज बळें कष्टवावें ॥ १ ॥
नाहीं जात जीव नाहीं होत हानी । सहज तें मनीं आठवलें ॥ २ ॥
नाहीं कांहीं चिंता मरतों उपवासी । अथवा त्या ह्मैसी गाई व्हाव्या ॥ ३ ॥
हें तों तुज कळों येतसे अंतरीं । लाखणीक[2] वरी साच भाव ॥ ४ ॥
तुका ह्मणे देवा नासिवंतासाटीं । पायांसवें तुटी करिती तुझ्या ॥ ५ ॥

॥ १२५४ ॥

मनवाचातीत तुझें हें स्वरूप । ह्मणोनियां माप भक्ति केलें ॥ १ ॥
भक्तीचिया मापें मोजितों अनंता । इतरानें तत्वता न मोजवे ॥ २ ॥

---

१. एका बळें. २. लापणीक.

योग याग तपें देहाचिया योगें। ज्ञानाचिया लागें न सांपडसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी भोळया भावें सेवा। घ्यावी जी केशवा करितों ऐसी॥४॥

॥ १२५५ ॥

कायावाचामन ठेविलें गाहाण । घेतलें तुझें रिण जोडीलागीं ॥ १ ॥
अवघें आलें आंत पोटा पडिलें थीतें। सारूनि निश्चिंत जालों देवा ॥२॥
द्यावयासी आतां नाहीं तोळा मासा। आधील मवेशा तुज ठावी॥३॥
तुझ्या रिणें गेले बहुत बांधोन । जाले मजहून थोरथोर ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुझे खतीं जें गुंतलें । करूनी आपुलें घेई देवा ॥ ५ ॥

॥ १२५६ ॥

जरा कर्णमूळीं सांगों आली गोष्टी। मृत्याचिये भेटी जवळी आली॥१॥
आतां माझ्या मना होई सावधान। पुण्यची जाण कार्यसिद्धि॥२॥
शेवटील घडी बुडतां न लगे वेळ। साधावा तो काळ जवळी आला॥३॥
तुका ह्मणे चिंतीं कुळींची देवता। वारावा भोंवता शब्द मिथ्या॥४॥

॥ १२५७ ॥

न गमेसी जाली दिवसरजनी । राहिलों लाजोनी नो बोलावें ॥ १ ॥
रुचिविण काय शब्द वान्या माप। अनादरें कोप येत असे ॥ २ ॥
आपुलिया रडे आपुलेंचि मन । दाटे समाधान पावतसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी असा जी जाणते। काय करूं रिते वादावाद ॥ ४ ॥

॥ १२५८ ॥

दुर्बळाचे हातीं सांपडलें धन । करितां जतन नये त्यासी ॥ १ ॥
तैसी परि मज जाली नारायणा। योगक्षेम जाणां तुह्मी आतां ॥ २ ॥
खातां लेतां नये मिरवितां वरि । राजा दंड करी जनराग ॥ ३ ॥
तुका ह्मणे मग तळमळ उरे । देखिलें तें झुरे पाहावया ॥ ४ ॥

॥ १२५९ ॥

लोक फार वाखा अमंगळ जाला। त्याचा त्याग केला पांडुरंगा ॥ १ ॥
विषया वंचलों मीपणा मुकलों। शरण तुज आलों पांडुरंगा ॥ २ ॥

घर दार अवघीं त्यजिलीं नारायणा । जीवींच्या जीवना पांडुरंगा ॥३॥
तुका ह्मणे पडिलों पुंडलिकापाशीं । धांव हृषीकेशी आलिंगीं मज ॥४॥

॥ १२६० ॥

तुज करितां नव्हे ऐसें कांहीं नाहीं । डोंगराची राई रंक राणा ॥ १ ॥
अशुभाचें शुभ करितां तुज कांहीं । अवघड नाहीं पांडुरंगा ॥ २ ॥
सोळा सहस्र नारी ब्रह्मचारी कैसा । निराहारी दुर्वासा नवल नव्हे ॥३॥
पंचभ्रतारांची द्रौपदी ते सती । करितां पितृशांति पुण्य धर्मा ॥ ४ ॥
दशरथा पातकें ब्रह्महत्ये ऐसीं । नवल त्याचे कुशीं जन्म तुझा ॥ ५ ॥
मुनेश्वरा नाहीं दोष अणुमात्र । भांडवितां सुत्र वध होती ॥ ६ ॥
तुका ह्मणे माझे दोष ते कायी । सरता तुझे पायीं जालों देवा ॥ ७ ॥

॥ १२६१ ॥

सत्यत्वेंशीं घेणें भक्तीचा अनुभव । स्वामीचा गौरव इच्छीतसें ॥१॥
मग तें अवीट न भंगे साचारें । पावलें विस्तारें फिरों नेणें ॥२॥
वाणी वदे त्याचा कोणासी विश्वास । अभयें करें दास सत्य तई ॥३॥
तुका ह्मणे आधीं न करीं तांतडी । पायीं जाली जोडी तेणें शुद्ध ॥४॥

॥ १२६२ ॥

समर्थाचा ठाव संचलाचि असे । दुर्बळाची आस पुढें करी ॥ १ ॥
पावलें घेईन पदरीं हें दान । एकांतीं भोजन करूं जाऊं ॥ २ ॥
न लगे पाहावी उचिताची वेळ । अयाचित काळ साधला तो ॥ ३ ॥
तुका ह्मणे पोट धालिया उपरी । गौरवा उत्तरीं पूजूं देवा ॥ ४ ॥

॥ १२६३ ॥

घ्यावी तरी घ्यावी उदंडचि सेवा । द्यावें तरी देवा उदंडचि ॥ १ ॥
ऐसीं कैंचीं आह्मी पुरतीं भांडवलें । आल्या करीं बोलें समाधान ॥ २ ॥
व्हावें तरी व्हावें बहुतचि दुरी । आलिया अंतरीं वसवावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझें सख्यत्व आपणीं । अससील ऋणी आवडीचा ॥ ४ ॥

॥ १२६४ ॥

नाहीं होत भार घातल्या उदास । पुरवावी आस सकळ ही ॥ १ ॥

ऐसा नाहीं मज एकाचा अनुभव । धरिला तो भाव उद्धरील ॥ २ ॥
उतावीळ असे शरणागतकाजें । धांवा केशीराजे आइकतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे हित चिंतन भरंवसा । नेदी गर्भवासा येऊं देवा ॥ ४ ॥

॥ १२६५ ॥

उद्वेगासी बहु फांकती मारग । नव्हे ऐसें अंग माझें होतें ॥ १ ॥
आतां कोण यासी करणें विचार । तो देखा साचार पांडुरंगा ॥ २ ॥
मज तों अत्यंत दर्शनाची आस । जाला तरी हो नाश जीवित्वाचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे आहे वचनाची उरी । करितों तोंवरि विज्ञापना ॥ ४ ॥

॥ १२६६ ॥

काय मी अन्यायी तें घाला पालवीं । आणीक वाट दावीं चालावया ॥१॥
माग पाहोनियां जातों तेच सोयी । न वजावें कायी कोण सांगा ॥२॥
धोपट मारग लागलासे गाढा । मज काय पीडा करा तुह्मी ॥३॥
वारितांही भय कोण धरी धाक । परी तुह्मां एक सांगतों मी ॥४॥
तुका ह्मणे शूर दोहीं पक्षीं भला । मरतां मुक्त जाला मान पावे ॥५॥

॥ १२६७ ॥

माझी आतां लोक सुखें निंदा करू । ह्मणती विचारू सांडियेला ॥ १ ॥
कारण होय तो करावा विचार । काय भीड भार करूं देवा ॥ २ ॥
तुका ह्मणे काय करूं लापनिक । जनाचार सुख नासिवंत ॥ ३ ॥

॥ १२६८ ॥

लाजोनियां काळें राहिलें लिखित । नेदितांही चित्त समाधान ॥ १ ॥
कैसें सुख वाटे वचनांचे तुटी । प्रीतिविणें भेटी रुचि नेदी ॥ २ ॥
एकाचिये भेटी एकाचा कोंपर । मावेचा पदर कळों येतो ॥ ३ ॥
होत्या आपल्या त्या वेचूनियां शक्ती । पुढें जालों युक्तिकळाहीन ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुह्मी समर्थ जी देवा । दुर्बळाची सेवा कोठें पावे ॥ ५ ॥

॥ १२६९ ॥

सेवट तो होतो तुझियानें गोड । ह्मणऊनि चाड धरीतसों ॥ १ ॥
देऊं भोगाभोग कलिवराचा भार । साहों तुज थार त्याचमधीं ॥ २ ॥

तुझ्या बळें कांहीं खटपट काम । वाढवावा श्रम न लगे तो ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी चेंपलों या भारें । तुमचें तें खरें देवपण ॥ ४ ॥

॥ १२७० ॥

आवडी न पुरे मायबापापासीं । घडों का येविसीं सकईल ॥ १ ॥
होईल नेमलें आपुलिया काळें । आलीयाचा बळें आग्रो उरे ॥ २ ॥
जाणविलें तेथें थोडें एकवेळा । सकळ ही कळा सर्वोत्तमीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे निवेदिलें गुह्य गुज । आतां तुझी तुज सकळ चिंता ॥ ४ ॥

॥ १२७१ ॥

तुह्मांसी न कळे सांगा काय एक । कासया संकल्प वागवूं मी ॥१॥
आहे तेथें सत्ता ठेविलें स्थापूनि । प्रमाणेंचि वाणी वदे आज्ञा ॥२॥
कृपा जाली मग नलगे अंगसंग । निजध्यासें रंग चढता राहे ॥३॥
तुका ह्मणे मागें बोलिलों तें वाव । आतां हाचि भाव दृढ जाला ॥४॥

॥ १२७२ ॥

काय उरली ते करूं विनवणी । वेचलों वचनीं पांडुरंगा ॥ १ ॥
अव्हेरलों आतां कैचें नामरूप । आदर निरोप तरि तो नाहीं ॥ २ ॥
माझा मायबाप ये गेलों सलगी । तों हे तुह्मां जगीं सोयइरिका ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां जोडोनियां हात । करीं दंडवत ठायिंचाठायीं ॥ ४ ॥

॥ १२७३ ॥

भांडवल माझें लटिक्याचे गांठी । उदीम तो तुटी यावी हाचि ॥ १ ॥
कैसी तुझी वाट पाहों कोणा तोंडें । भोंवतीं किं रे भांडे गर्भवास ॥ २ ॥
चहूं खाणीचिया रंगलोंसें संगें । सुष्ट दुष्ट अंगें धरूनियां ॥ ३ ॥
बहुतांचे बहु पालटलों सळे । बहु आला काळें रंग अंगा ॥ ४ ॥
उकलूनि नये दावितां अंतर । घडीचा पदर सारूनियां ॥ ५ ॥
तुका ह्मणे करीं गोंवळें यासाटीं । आपल्या पालटीं संगें देवा ॥ ६ ॥

॥ १२७४ ॥

माझे विषयीं तुज पडतो विसर । नको धरूं दूर पांडुरंगा ॥ १ ॥

तुझा ह्मणवितों हेचि लाज तुला । आतां ह्मणीं मला विसरेसी ॥ २ ॥
तुका ह्मणे तुम्ही माझी नाहीं उरी । आतां केली खरी देवराया ॥ ३ ॥

॥ १२७५ ॥

मज कांहीं सीण न व्हावा यासाठीं । कृपा तुह्मां पोटीं उपजली ॥ १ ॥
होतें तैसें केलें आपलें उचित । शिकविलें हित बहु बरें ॥ २ ॥
आह्मी न मनावी कोणाची आशंका । तुह्मां भय लोकां आहे मनीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां संचिताचा ठेवा । वोडवला घ्यावा जैसा तैसा ॥ ४ ॥

॥ १२७६ ॥

लेखिलें कवित्व माझे सहज बोल । न लगोचि ओल जिव्हाळ्याची ॥ १ ॥
नयेचि उत्तर कांहीं परतोनि । जालों नारायणीं न सरतें ॥ २ ॥
लाजिरवाणी कां वदली हे वाचा । नव्हेच ठायींचा मननशीळ ॥ ३ ॥
तुका ह्मणे फळ नव्हेचि सायासा । पंढरीनिवासा काय जालें ॥ ४ ॥

॥ १२७७ ॥

आतां सोडवणें न या नारायणा । तरि मी न वंचें जाणा काळाहातीं ॥ १ ॥
ऐसें सांगोनियां जालों उतराई । आणीक तें काई माझे हातीं ॥ २ ॥
केलियाचें माप नये सेवटासी । करितील नासि अंतराय ॥ ३ ॥
तुका ह्मणे भय वाटतसे जीवा । धांवणिया धांवा लवकरी ॥ ४ ॥

॥ १२७८ ॥

ऐकें पांडुरंगा वचन माझें एक ॥ जालों मी सेवक दास तुझा ॥ १ ॥
कळे तैसा आतां करावा उद्धार ॥ खुंटला विचार माझा पुढें ॥ २ ॥
दंभ मान माझा करूं पाहे घात । जालियाही थीत कारणाचा ॥ ३ ॥
हीन बुद्धि माझी अधम हे याती । अहंकार चित्तीं वसों पाहे ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज विघडतां क्षण । न लगे जतन करीं देवा ॥ ५ ॥

॥ १२७९ ॥

कवतुकवाणी बोलतसें लाडें । आरुष वांकडें करुनि मुख ॥ १ ॥
दुजेपणीं भाव नाहीं हे आशंका । जननीबाळकामध्यें भेद ॥ २ ॥
सलगी दुरूनि जवळी पाचारूं । धांवोनियां करूं अंगसंग ॥ ३ ॥

धरूनि पालव मागतों भातुकें । आवडीचें निकें प्रेमसुख ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुज आमचीच गोडी । ऐसी हे आवडी कळों आली ॥ ५ ॥
॥ १२८० ॥
बोलिलिया गुणीं नाहीं पाविजेत । देवा नाहीं होत हित तेथें ॥ १ ॥
कवतुक तुझें नवल यावरि । घेसील तें शिरीं काय नव्हे ॥ २ ॥
नाहीं मिळों येत संचिताच्या मता । पुराणीं पाहतां अघटित ॥ ३ ॥
तुका ह्मणे पायीं निरोपिला भाव । न्याल तैसा जाओ सिद्धी देवा ॥ ४ ॥
॥ १२८१ ॥
ठेवुनि इमान राहिलों चरणीं । ह्मणउनि धणी कृपा करी ॥ १ ॥
आह्मांसी भांडार करणें जतन । आलें गेलें कोण उंच निंच ॥ २ ॥
करूनी सांभाळीं राहिला निराळा । एक एक वेळा आज्ञा केली ॥ ३ ॥
तुका ह्मणे योग्यायोग्य विनीत । देवा नाहीं चित्त येथें देणें ॥ ४ ॥
॥ १२८२ ॥
अनुतापयुक्त गेलिया अभिमान । विसरूं वचन मागिलांचा ॥ १ ॥
त्याचे पाय माझे लागोत कपाळीं । भोग उष्टावळी धन्य काळ ॥ २ ॥
षड ऊर्मी जिहीं हाणितल्या लाता । शरण या संता आल्या वेगीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाती वोळे लवकरी । ठायींचि अंतरीं शुद्ध होती ॥ ४ ॥
॥ १२८३ ॥
वाढवावा पुढें आणीक प्रकार । एकाचि तें फार रुचि नेदी ॥ १ ॥
निंच नवें लेणें देह हा पवाडा । पालट गोकडा बरावरी ॥ २ ॥
दिसे शोभिवंत सेवेनें सेवक । स्वामीची ते लोकत्रयीं कीर्ति ॥ ३ ॥
तुका ह्मणे आजी पाववा संतोष । करुनि कीर्तिघोष नाचईन ॥ ४ ॥
॥ १२८४ ॥
मागिल विसर होईल सकळ । केली तळमळ दुःखाची ते ॥ १ ॥
दोहींचें ऐक्य घालीं गडसंदीं । स्थिरावेल बुद्धि पायांपाशीं ॥ २ ॥
अहाच या केलों देहपरिचारें । तुमचें तें खरें वाटों नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे व्हावें लवकरी उदार । मी आहे सादर प्रतिग्रहासी ॥ ४ ॥

॥ १२८५ ॥

काय त्या दिवस उचिताचा आला। मागील जो केला श्रम होता ॥ १ ॥ ठेवियेला पूर्ण करूनि संकेत । तयापाशीं चित्त लागलेंसे ॥ २ ॥ जाणसी गे माते लेंकरांचें लाड । नये पडों आड निष्ठुरता ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मीं करावें वचन । तुह्मांसी जतन करणें तें ॥ ४ ॥

॥ १२८६ ॥

पाहा हो देवा कैसे जन । भिन्न भिन्न संचितें ॥ १ ॥ एक नाहीं एका ऐसे । दावी कैसे शुद्ध हीन ॥ २ ॥ पंचभूतें एकी रासी । सूत्रें कैसीं खेळवी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जे जे जाती । तैसी स्थिति येतसे ॥ ४ ॥

॥ १२८७ ॥

बरवी नामावळी । तुझी महादोषां होळी ॥ १ ॥ जालें आह्मासी जीवन । धणीवरि हें सेवन ॥ २ ॥ सोपें आणि गोड । किती अमृताही वाड ॥ ३ ॥ तुका ह्मणे अच्युता । आमचा कल्पतरु दाता ॥ ४ ॥

॥ १२८८ ॥

आगी लागो तया सुखा । जेणे हरि नये मुखा ॥ १ ॥ मज होत कां विपत्ति । पांडुरंग राहो चित्तीं ॥ २ ॥ जळो तें समूळ । धन संपत्ति उत्तम कुळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥ ४ ॥

॥ १२८९ ॥

पुरुषा हातीं कंकणचुडा । नवल दोडा वृत्तिया ॥ १ ॥ पाहा कैसी विटंबणा । नारायणा देखिली ॥ २ ॥ जळो ऐसी ब्रिदावळी । भाटवोळीपणाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाहों डोळां । अवकळा नये हे ॥ ४ ॥

॥ १२९० ॥

काय लवणकणिकेविण । एके क्षीण सागर ॥ १ ॥ मां हे येवढी अडचणी । नारायणीं मजविण ॥ २ ॥ कुबेर अटाहासे जोडी । काय कवडी कारणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे काचमणि । कोण गणी भांडारी ॥ ४ ॥

---

१. ओळखावीं. २. तुका ह्मणे जो जे जाती । त्याची स्थिति तैसी ते ॥

॥ १२९१ ॥

चरणाचा महिमा । हा तो तुझ्या पुरुषोत्तमा ॥ १ ॥ अंध पारखी माणिकें । बोलविशी स्पष्ट मुकें ॥ २ ॥ काय नाहीं सत्ता। हातीं तुझ्या पंढरीनाथा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मूढा । मज चेष्टविलें जडा ॥ ४ ॥

॥ १२९२ ॥

पावतों ताडन । तरी हें मोकलितों जन ॥ १ ॥ मग मी आठवितों दुःखें । देवा सावकाश सुखें ॥ २ ॥ होती अप्रतिष्ठा । होतों वरपडा कष्टा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मान । होतां उत्तम खंडन ॥ ४ ॥

॥ १२९३ ॥

कैसीं दिसों बरीं । आह्मी आळवितां हरि ॥ १ ॥ नाहीं सोंग अळंकार । दास जाला संवसार ॥ २ ॥ दुःख आह्मां नाहीं चिंता । हरिचे दास ह्मणवितां ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । ऐसीं जालों करितां सेवा ॥ ४ ॥

॥ १२९४ ॥

हे माझी मिराशी । ठाव तुझ्या पायांपाशीं ॥ १ ॥ याचा धरीन अभिमान । करीन आपुलें जतन ॥ २ ॥ देऊनियां जीव । बळी साधिला हा ठाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । जुन्हाट हे माझी सेवा ॥ ४ ॥

॥ १२९५ ॥

माझे माथां तुझा हात । तुझे पायीं माझें चित्त ॥ १ ॥ ऐसी पडियेली गांठी । शरीरसंबंधाची मिठी ॥ २ ॥ येरयेरांपाशीं । सांपडोन गेलों ऐसीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सेवा । माझी कृपा तुझी देवा ॥ ४ ॥

॥ १२९६ ॥

तुह्मां ठावा होता देव। माझे अंतरींचा हेवा ॥ १ ॥ होती काशानें सुटका । तरि हे वैकुंठनायका ॥ २ ॥ नसतें सांभाळिलें । जरि तुह्मीं आश्वासिलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृपाळुवा । बरवा केला सावाधावा ॥ ४ ॥

॥ १२९७ ॥

देऊं ते उपमा । आवडीनें पुरुषोत्तमा ॥ १ ॥ पाहातां काशा तूं सारिखा । तिहीं लोकांच्या जनका ॥ २ ॥ आरुष हे वाणी । गोड करूनि घेतां कानीं ॥ ३ ॥ आवडीनें खेळे । तुका पुरवावे सोहाळे ॥ ४ ॥

॥ १२९८ ॥

मागायाची नाहीं इच्छा । जो मी ऐसा संकोचों ॥१॥ लटकियाची न करूं स्तुति । इच्छा चित्तीं धरूनि ॥२॥ हिशोबें तें आलें घ्यावें । हें तों ठावें सकळांसी ॥३॥ तुका ह्मणे स्वामिसेवा । येथें देवा काशाची ॥४॥

॥ १२९९ ॥

आह्मी बोलों तें तुज कळे । एक दोहीं ठायीं खेळे ॥ १ ॥ काय परिहाराचें काम । जाणे अंतरींचें राम ॥२॥ कळोनियां काय चाड । माझी लोकांसी बडबड ॥३॥ कारण सर्वे एका । अवघें आहे ह्मणे तुका ॥४॥

॥ १३०० ॥

कौतुकाची सृष्टी । कौतुकेंचि केलें कर्ष्टा ॥ १ ॥ मोडे तरी भलें खेळ । फांके फांकिल्या कोल्हाळ ॥ २ ॥ जाणणियासाटीं । भय सामाविलें पोटीं ॥ ३ तुका ह्मणे चेता । होणें तें तूंच आइता ॥ ४ ॥

॥ १३०१ ॥

मूळ करणें संतां । नाहीं मिळत उचिता ॥ १ ॥ घडे कासयानें सेवा । सांग ब्रह्मांडाच्या जीवा ॥ २ ॥ सागर सागरीं । सामावेसी कैंची थोरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें । शरण ह्मणवितां बरवें ॥ ४ ॥

॥ १३०२ ॥

मोहरोनि चित्ता । आणूं हळूचि वरि हिता ॥ १ ॥ तों हे पडती आघात । खोडी काढिती पंडित ॥ २ ॥ संसारा भेणें । कांहीं उसंती तों पेणें ॥ ३ ॥ एकादिया भावें । तुका ह्मणे जवळी यावें ॥ ४ ॥

॥ १३०३ ॥

तुझें नाम पंढरीनाथा । भावेंविण नये हाता ॥ १ ॥ दाहां नये विसां नये । पंनासां साटां नये ॥२॥ शतां नये सहस्रां नये । लक्ष कोटीलागीं नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । भावेंविण नये हाता ॥ ४ ॥

॥ १३०४ ॥

कोण आमचीं योगतपें । करूं बापें जाणावीं ॥१॥ गीत संतसंगें गाऊं । उभीं ठाऊं जागरणीं ॥ २ ॥ आमुचा तो नव्हे लाग । करूं त्याग जावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे इंद्रियांसी । येचि रसीं रंगवूं ॥ ४ ॥

॥ १३०५ ॥

लाडें भाकितों करुणा । तूं रे उदाराचा राणा ॥ १ ॥ करिसी आमुचा सांभाळ । तूं रे माउली स्नेहाळ ॥२॥ नाहीं चिंता रे आह्मांसी । तूंचि भार चालविसी ॥ ३ ॥ आह्मी जालों उदासीन । तूंचि करिसी जतन ॥ ४ ॥ आह्मां नाहीं जीवनास । तूंचि पुरविसी घास ॥ ५ ॥ तुका ह्मणे भलते सवें । जातां मागें मागें धांवे ॥ ६ ॥

॥ १३०६ ॥

जाणतों समये । परि मत कामा नये ॥ १ ॥ तुह्मी सांगावें तें बरें । देवा सकळ विचारें ॥ २ ॥ फुकाचिये पुसी । चिंता नाहीं होवे ऐसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आहे । धर पाय मज साहे ॥ ४ ॥

॥ १३०७ ॥

बैसलों तों कडियेवरी । नव्हें दुरी वेगळा ॥ १ ॥ घडलें हें बहुता दिसां । आतां इच्छा पुरवीन ॥ २ ॥ बहु होता जाला सीण । नाहीं क्षण विसांवा ॥ ३ ॥ दुःखी केलें मी तूं पणें । जवळी नेणें होतें तें ॥४॥ पाहात जे होतों वास । तेचि आस पुरविली ॥ ५ ॥ तुका ह्मणे मायबापा । ह्मणी कोपा विठ्ठला ॥ ६ ॥

॥ १३०८ ॥

तुज पाहातां समोरी । दृष्टि न फिरे माघारी ॥ १ ॥ माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडली पंढरिराया ॥ २ ॥ नव्हे सारितां निराळें । लवण मेळवितां जळें ॥३॥ तुका ह्मणे बळी । जीव दिला पायांतळीं ॥४॥

॥ १३०९ ॥

कळों आलें तुझें जिणें । देवा तूं माझें पोषणें ॥ १ ॥ वाट पाहासी आठवाची । सत्ता सतंत कईची ॥ २ ॥ बोलावितां यावें रूपा । सदा निर्गुणींचि लपा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं परदेशी । येथें आह्मां अंगेजिसी ॥ ४ ॥

॥ १३१० ॥

किडा अन्नाचें माणुस । त्याचा ह्मणविल्या दास ॥ १ ॥ तेंही त्यासी

उपेक्षीना । बोल आपुला सांडीना ॥ २ ॥ तो तूं नराचा नरेंद्र । तुजपासूनि इंद्र चंद्र ॥ ३ ॥ तुका ह्मणे विश्वंभर । तुज वर्णी फणीवर ॥ ४ ॥

॥ १३११ ॥

तुझें ह्मणों आह्मां । मग उणें पुरुषोत्तमा ॥ १ ॥ ऐसा धर्म काय । अमृतानें मृत्यु होय ॥ २ ॥ कल्पवृक्षा तळीं । गांठी बांधलिया झोळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे परीस । सांपडल्या उपवास ॥ ४ ॥

॥ १३१२ ॥

तुझें रूप पाहतां देवा । सुख जालें माझ्या जीवा ॥ १ ॥ हें तों वाचे बोलवेना । काय सांगों नारायणा ॥ २ ॥ जन्मोजन्मींचें सुकृत । तुझे पायीं रमे चित्त ॥ ३ ॥ जरी योगाचा अभ्यास । तेव्हां तुझा निजध्यास ॥ ४ ॥ तुका ह्मणे भक्त । गोड गाऊं हरिचें गीत ॥ ५ ॥

॥ १३१३ ॥

बैसो आतां मनीं । आलें तैसेंचि वदनीं ॥ १ ॥ मग अवघेंचि गोड । पुरे सकळही कोड ॥ २ ॥ बाहेरील भाव । तैसा अंतरींहि वाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे मणि । शोभा दाखवी कोंदणीं ॥ ४ ॥

॥ १३१४ ॥

माझें परिसावें गाऱ्हाणें । चित्त द्यावें नारायणें ॥ १ ॥ माझे हृदयींचें वर्म । देवा जाणशी तूं कर्म ॥ २ ॥ सबाह्यअंतरसाक्ष । ऐसा वेदीं केला पक्ष ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेणां । काय सांगों नारायणा ॥ ४ ॥

॥ १३१५ ॥

ठाव तुह्मांपाशीं । जाला आतां हृषीकेशी ॥ १ ॥ नलगे जागावें सतत । येथें स्वभावें हे नीत ॥ २ ॥ चोरट्यासी थारा । येथें कैंचा जी दातारा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मनें । आह्मां जालें समाधान ॥ ४ ॥

॥ १३१६ ॥

बोलविसी तरी । तुझ्या येईल उत्तरीं ॥ १ ॥ कांहीं कोड कवतुकें । हातीं द्यावया भातुकें ॥ २ ॥ बोलविसी तैसें । करीन सेवन सरिसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । माझें चळण तुज सवा ॥ ४ ॥

॥ १३१७ ॥

प्रीती करी सत्ता। बाळा भीतीं मातापिता ॥ १ ॥ काय चाले त्याशीं बळ। आळी करितां कोल्हाळ ॥ २ ॥ पदरीं घाली मिठी। खेदी मागें पुढें लोटी ॥ ३ ॥ बोले मना आलें। तुका साहिला विठ्ठलें ॥ ४ ॥

॥ १३१८ ॥

मागें चिंता होती आस। केला नास या काळें ॥ १ ॥ तुह्मी आह्मां उदासीन। भिन्नाभिन्न वारिलें ॥ २ ॥ मोहजाळें दुःख वाढे। ओढे ओढे त्यास तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कोण देवा। आतां हेवा वाढवी ॥ ४ ॥

॥ १३१९ ॥

आपणाचि व्हाल साहे। कसियाला हे धांवणी ॥ १ ॥ भाकिली ते उरली कींव। आहे जीव जीवपणें ॥ २ ॥ आहाच कैंचा बीजा मोड। प्रीती कोड वांचूनि॥३॥तुका ह्मणे दंडिन काया।याल तया धांवणिया॥४॥

॥ १३२० ॥

राहे उभा वादावादीं। तरी फंदीं सांपडे ॥ १ ॥ लव्हाळयासी कोठें बळ। करिल जळ आपुलें ॥ २ ॥ कठिणासी वळजोडा। नम्र पीडा देखेना ॥३॥ तुका ह्मणे सर्व रसीं। मिळे त्यांसी गोत तें ॥४॥

॥ १३२१ ॥

असाल ते तुह्मी असा। आह्मी सहसा निवडों ना ॥ १ ॥ अनुसरलों एका चित्तें। हातोंहातें गिवसीत ॥ २ ॥ गुणदोष काशासाटीं। तुमचे पोटीं वागवूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे दुजें आतां। कोठें चित्ता आतळों ॥ ४ ॥

॥ १३२२ ॥

तूं माझा कोंवसा। परी न कळे या धर्सा ॥ १ ॥ कूट खाती मागें पुढें जाती निरयगांवा पुढें ॥ २ ॥ मज ह्मणताती कवी। निषेधुनि पापं जीवीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा। आतां कोण लेखी जगा ॥ ४

॥ १३२३ ॥

कोठें देवा बोलों। तुह्मां भीड घालूं गेलों ॥ १ ॥ करावया सत्त्वहाणी भांडवलाची टांचणी ॥ २ ॥ दुर्बळा मागतां। त्याच्या प्रवर्तेल घाता ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं। मज कळलें ऐसें कांहीं ॥ ४

॥ १३२४ ॥

वांयां जाय ऐसा । आतां उगवावा फांसा ॥ १ ॥ माझें परिसावें गाऱ्हाणें । सुखदुःखांचीं वचनें ॥ २ ॥ हाचि आह्मां ठाव । पायीं निरोपाया भाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे जार । तुझा तुज देवा भार ॥ ४ ॥

॥ १३२५ ॥

विनवीजे ऐसें कांहीं । उरलें नाहीं यावरि ॥ १ ॥ आतां असो पंढरीनाथा । पायीं माथा तुमचिये ॥ २ ॥ मागें सारियेली युक्ती । कांहीं होती जवळी ते ॥३॥ निराशेची न करी आस । तुका दास नाधारी ॥ ४ ॥

॥ १३२६ ॥

हा तों नव्हता दीन । टाळायाचा ऐसा क्षण ॥ १ ॥ कां जी नेणों राखा हात । कैसें देखावें रडत ॥ २ ॥ दावूनियां आस । दूर पळवितां कास ॥ ३ ॥ तुका ह्मणे धांव । घेतां न पुरेचि हांव ॥ ४ ॥

॥ १३२७ ॥

तुह्मां उद्धरणें फार । मज दुसरी नाहीं थार ॥ १ ॥ आतां जैसें तैसें सोसा । काय करणें हृषीकेशा ॥ २ ॥ वरें न दिसेल ओळी । एका अन्न एका गाळी ॥ ३ ॥ लाविते आभार । तुका विसरलेती फार ॥४॥

॥ १३२८ ॥

हेचि वादकाची कळा । नाहीं येऊं देत बळा ॥ १ ॥ धीर करावा करावा । तरी तो आहे आह्मां देवा ॥ २ ॥ रिघावें पोटांत । पायां पडोन घ्यावा अंत ॥ ३ ॥ तुका ह्मणे वरि । गोडा आणावा उत्तरीं ॥ ४ ॥

॥ १३२९ ॥

द्याल ऐसें दिसे । तुमचें साचपण इच्छे ॥ १ ॥ ह्मणऊनि न भंगे निर्धार । केले लोचने सादर ॥ २ ॥ सुखाचीच वास । पुरला पाहे अवकाश ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळे । काय लाभ कोणे वेळे ॥ ४ ॥

॥ १३३० ॥

लावूनि कोलित । माझा करितील घात ॥ १ ॥ ऐसे बहुतांचे संधी । सांपडलों खोळेमधीं ॥ २ ॥ पाहातील उणें । तेथें देती अनुमोदनें ॥ ३ ॥ तुका ह्मणे रिघे । पुढें नाहीं जालें धींगे ॥ ४ ॥

॥ १३३१ ॥

करूं स्तुती तरि ते निंदा । तुह्मी जाणां हे गोविंदा ॥ १ ॥ आह्मा लडिवाळांचे बोल । करा कवतुकें नवल ॥२॥ बोबड्या उत्तरीं । तुह्मां रंजवितों हरी ॥ ३ ॥ मागतों भातुकें । तुका ह्मणे कवतुकें ॥ ४ ॥

॥ १३३२ ॥

हा गे हाचि आतां लाहो । माझा अहो विठ्ठला ॥ १ ॥ दंडवत दंडवत । वेगळी मात न बोलें ॥२॥ वेगळाल्या कोठें भागें । लाग लागें लावावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे केल्या जमा । वृत्तितमा भाजूनि ॥ ४ ॥

॥ १३३३ ॥

तुझें मजपाशीं मन । माझी तेथें भूक तान ॥ १ ॥ जिव्हा रते एके ठायीं । दुजें बोलायाचें काइ ॥ २ ॥ माझिया कवतुकें । उभा पाहासी भातुकें ॥ ३ ॥ तुका ह्मणे साचें । तेथें मागील कईचें ॥ ४ ॥

॥ १३३४ ॥

तुह्मां आह्मां सरी । येथें कईच्या या परी ॥ १ ॥ स्वामिसेवा अळंकार । नाहीं आवडिये थार ॥ २ ॥ खुंटलिया वाचा । मग हा आनंद कइचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे कोडें । आह्मी नाचों तुजपुढें ॥ ४ ॥

॥ १३३५ ॥

आवडी कां ठेवूं । बैसोनियां संगें जेवूं ॥ १ ॥ मागें नको ठेवूं हरी । माझी आण तुजवरी ॥ २ ॥ देखिले प्रकार । त्याचे पाहेन साचार ॥ ३ ॥ तुका ह्मणे बाळीं । केली चाहाडी सकळीं ॥ ४ ॥

॥ १३३६ ॥

वांयां ऐसा जन्म गेला । हें विठ्ठला दुःख वाटे ॥ १ ॥ नाहीं सरता जालों पायीं । तुह्मी जई न पुसा ॥ २ ॥ कां मी जीतों संवसारी । अद्यापवरी भूमिभार ॥ ३ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । सबळ व्यथा भवरोग ॥ ४ ॥

॥ १३३७ ॥

कार्येचि कारण । तृष्णा पाववित सीण ॥ १ ॥ काय करुनि ऐसा संग । सोसेंचि तूं पांडुरंग ॥ २ ॥ रूपीं नाहीं गोडी । हांवें हांवें ऊर फोडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे पडे भरी । ऐशा वरदळाचे थोरी ॥ ४ ॥

॥ १३३८ ॥

ज्यावें हीनपणें । कासयाच्या प्रयोजनें ॥ १ ॥ प्रारब्धीं संसार । बरी हिंमतीचा थार ॥ २ ॥ होणार ते कांहीं । तेथें अवकळा नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवें । कृपा केलिया बरवें ॥ ४ ॥

॥ १३३९ ॥

पाठी लागे तया द्वडीं दुरी । घालीं या बाहेरी संवसारा ॥ १ ॥ येउनि दडें तुमच्या पायीं । धांवें तईं छो ह्मणा ॥२॥ पारखियाचा वास पडे । खडबडे उठी तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे लाविला धाक । नेदी ताक खाऊं कोणी ॥ ४ ॥

॥ १३४० ॥

सोळा सहस्र होऊं येतें । भरलें रितें आह्मापें ॥ १ ॥ ऐसे तुह्मां ठायाठाव । देव ह्मण संपादे ॥ २ ॥ कैची चिरामध्यें चिरे । मना बरें आलें तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । अंगलगा भिन्न परा ॥ ४ ॥

॥ १३४१ ॥

लागों दिलें अंगा । ऐसें कांगा संनिध ॥ १ ॥ कोण्या पापें उदय केला । तो देखिला प्रळय ॥ २ ॥ न देखवे पिडला सर्प । दया दर्प विषाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे भलें । मज तों न वजे साहिलें ॥ ४ ॥

॥ १३४२ ॥

न वजावा तो काळ वांयां । मुख्य दया हे देवा ॥ १ ॥ ह्मणऊनि जैसें तैसें । रहाणी असें पायांचे ॥ २ ॥ मोकळें हें मन कष्ट । करीं नष्ट दुर्जन ॥३॥ तुका ह्मणे कांहीं नेणें । न वजें येणें परी वांयां ॥४॥

॥ १३४३ ॥

आइकिली मात । पुरविले मनोरथ ॥ १ ॥ प्रेम वाढविलें देवा । बरवी घेऊनियां सेवा ॥ २ ॥ केली विनवणी । तैसी पुरविली धणी॥ ॥ ३ ॥ तुका ह्मणे काया । रसा कुरोंडी वरोनियां ॥ ४ ॥

॥ १३४४ ॥

निघालें तें अगीहूनि । आतां झणी आतळे ॥ १ ॥ पळवा परपरतें

दुरी । आतां हरी येथूनि ॥२॥ धरिलें तैसें श्रुत करा हो । येथें आह्मो प्रपंचीं ॥३॥ अबोल्यानें ठेला तुका । भेउनि लोकां निराळा ॥ ४ ॥

॥ १३४५ ॥

भाग सीण गेला । माझा सकळ विठ्ठला ॥ १ ॥ तुझा ह्मणवितों दास । केली उच्छिष्टाची आस ॥२॥ राहिली तळमळ । तई पासोनि सकळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे धालें । पोट ऐसें कळों आलें ॥ ४ ॥

॥ १३४६ ॥

तुह्मी आह्मी भले आतां । जालों चिंता काशाची ॥ १ ॥ आपुलाले आलों स्थळीं । मोन कळी वाढेना ॥ १ ॥ सहज जें मनीं होतें । तें उचितें घडलें ॥३॥ तुका ह्मणे नसतें अंगा । येत संगा सारिखें ॥४॥

॥ १३४७ ॥

बहु देवा बरें जालें । नसतें गेलें सोंवळें ॥ १ ॥ धोवटाशीं पडिली गांठीं । जगजेठीप्रसादें ॥ २ ॥ गादल्याचा जाला जाडा । गेली पीडा विकल्प ॥ ३ ॥ तुका ह्मणे बराबरी । निर्मळ करी निर्मळा ॥ ४ ॥

॥ १३४८ ॥

सर्व संगीं विट आला । तूं एकला आवडसी ॥ १ ॥ दिली आतां पायीं मिठी । जगजेठी न सोडीं ॥२॥ बहु जालों खेदक्षीण । येणें सीण तो नासे ॥३॥ तुका ह्मणे गंगे वास । बहु त्या आस स्थळाची ॥४॥

॥ १३४९ ॥

फावलें तुह्मां मागें । नवतों लागें पावलों ॥ १ ॥ आलों आतां उभा राहें । जवळी पाहें सन्मुख ॥ २ ॥ घरीं होती गोवी जाली । कामें बोली न घडोचि ॥३॥ तुका ह्मणे धडफुडा । जालों झाडा देई देवा ॥४॥

॥ १३५० ॥

मी तें मी तूं तें तूं । कुंकुड हें लाडसी ॥ १ ॥ वचनाची पडो तुटी । पोटींचें पोटीं राखावें ॥२॥ तेथील तेथें येथील येथें । वेगळया कुंथे कोण भारें ॥३॥ याचें यास त्याचें त्यास । तुक्यानें कास घातली॥४॥

॥ १३२१ ॥

तुझा संग पुरे संग पुरे । संगति पुरे विठोबा ॥१॥ आपल्या सारिखें

करिसी दासां । भिकारीसा जग जाणे ॥ २ ॥ रूपा नाहीं ठाव नांवा । तैसें आमुचें करिसी देवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तोयें आपुलें भेंडोळें । करिसी वाटोळें माझें तैसें ॥ ४ ॥

॥ १३५२ ॥

नको दुष्टसंग । पडे भजनामधीं भंग ॥ १ ॥ काय विचार देखिला । सांग माझा तो विठ्ठला ॥२॥ तुज निषेधितां । मज साहे सर्वथा॥३॥ एका माझ्या जीवें । वाद करूं कोणासवें ॥ ४ ॥ तुझे वर्णूं गुण । कीं हे राखों दुष्ट जन ॥५॥ काय करूं एका । मुखें सांग ह्मणे तुका॥६॥

॥ १३५३ ॥

न वजतां घरा । आह्मी कोणाच्या दातारा ॥ १ ॥ कां हे छळूं येती लोक । दाट बळेंचि कंटक ॥२॥ नाहीं आह्मी खात । कांहीं कोणाचें लागत ॥ ३ ॥ कळे तैसी सेवा । तुका ह्मणे करूं देवा ॥ ४ ॥

॥ १३५४ ॥

होउनि कृपाळ । भार घेतला सकळ ॥ १ ॥ तूंचि चालविसी माझें । भार सकळही ओझें ॥ २ ॥ देवा तुझ्या पायीं । ठेवुनि जालों उतराई ॥ ३ ॥ कायावाचामनें तुका ह्मणे दुजें नेणें॥ ४ ॥

॥ १३५५ ॥

भला ह्मणे जन । परि नाहीं समाधान ॥ १ ॥ माझें तळमळी चित्त । अंतरलें दिसे हित ॥२॥ कृपेचा आधार । नाहीं दंभ जाला भार॥३॥ तुका ह्मणे कृपे । अंतराय कोण्या पापें ॥ ४ ॥

॥ १३५६ ॥

शिकविले बोल । बोलें तैसा नाहीं ओल ॥ १ ॥ आतां देवा संदेह नाहीं । वांयां गेलों यासी कांहीं ॥ २ ॥ एकांताचा वास । नाहीं संकल्पाचा नास ॥३॥ बुद्धि नाहीं स्थिर । तुका ह्मणे शब्दा धीर॥४॥

॥ १३५७ ॥

काळावरी सत्ता । ऐशा करितो वारता ॥१॥ तो मी हीणाहूनि सांडें ।

देवा तुऱ्हें काळतोंड ॥ २ ॥ मानूनी भर्वसा । होतों दासा मी ऐसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मान । गेलों वाढवूं थोरपण ॥ ४ ॥

॥ १३५८ ॥

कळों येतें तरि कां नव्हे । पडती गोवे भ्रमाचे ॥१॥ जाणतांचि होतो घात । परिसा मत देवा हें ॥ २ ॥ आंविसासाटीं फासा मान । पाडी धनइच्छा ते ॥३॥ तुका ह्मणे होणार खोटें । कर्म मोटें बळिवंत ॥४॥

॥ १३५९ ॥

विश्वव्यापी माया । तिणें झाकुळिलें छाया ॥१॥ सत्य गेलें भोळ्या-वारीं । अविद्येची चाली थोरी ॥२॥ आपुलेंचि मन । करवी आपणां बंधन ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । तुह्मी कोडीं हीं उगवा ॥ ४ ॥

॥ १३६० ॥

एक नेणतां नाडलीं । एकां जाणिवेची भुली ॥ १ ॥ बोलों नेणें मुकें । वेडें वाचाळ काय निकें ॥ २ ॥ दोहीं सवा नाड । विहिर एकीकडे आड ॥ ३ ॥ तुका ह्मणे कर्म । तुझें कळों नेदी वर्म ॥ ४ ॥

॥ १३६१ ॥

आह्मी देव तुह्मी देव । मध्यें भेव अधीक ॥ १ ॥ कैवाडाच्या धांवा लागें । मागें मागें विठ्ठले ॥ २ ॥ भेडसाविलें हाके नादें । वोळखी भेदें मोडिली ॥३॥ तुका ह्मणे उभा राहे । मागें पाहे परतोनि ॥ ४ ॥

॥ १३६२ ॥

पुरली धांव कडिये घेईं । पुढें पायीं न चलवीं ॥ १ ॥ कृपाळुवे पांडुरंगे । अंगसंगे जिवलगे ॥२॥ अवघी निवारावी भूक । अवघ्या दुःख जन्माचें ॥३॥ तुका ह्मणे बोलवेना । लावीं स्तना ईश्वरे ॥४॥

॥ १३६३ ॥

काय माता विसरे बाळा । कळवळा प्रीतीचा ॥ १ ॥ आवडीनें गळां मिठी । घाली उठी बैसवी ॥२॥ लावूं धांवे मुख स्तना । नये मना निराळें ॥ ३ ॥ भावंडाचें भातें दावी । आपुलें लावी त्यास जी ॥४॥ माझें थोडें त्याचें फार । उत्तर हें वाढवी ॥५॥ तुका ह्मणे नारायणा । तुह्मी जाणां बुझावूं ॥ ६ ॥

॥ १३६४ ॥

आळवितां बाळें । मातेतें सुख आगळें ॥ १ ॥ धावें आवडी भातुकें । पाहे निवे कवतुकें ॥२॥ लेववूनि अळंकार । दृष्टी करावी सादर ॥३॥ आपुलिये पदीं । बैसवूनि कोडें वंदी ॥ ४ ॥ नेदी लागों दिठी । उच-लोनि लावी कंठीं ॥५॥ तुका ह्मणे लाभा । वारी द्या वो पद्मनाभा ॥६॥

॥ १३६५ ॥

अवघ्या उपचारा । एक मनचि दातारा ॥ १ ॥ घ्यावी घ्यावी हेचि सेवा । माझी दुर्बळाची देवा ॥ २ ॥ अवघियाचा ठाव । पायांवरि जीवभाव ॥ ३ ॥ चित्ताचें आसन । तुका करितो कीर्तन ॥ ४ ॥

*॥ १३६६ ॥

नीचपण बरवें देवा । न चले कोणाचाही दावा[1] ॥ १ ॥ महापुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे[2] राहाती ॥ २ ॥ येतां[3] सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरि ॥३॥ तुका ह्मणे कळ । पाय धरिल्या न चले बळ॥४॥

॥ १३६७ ॥

आहे तरि सत्ता । ऐशा करितों वारता ॥ १ ॥ अंगसंगाचीं उत्तरें । सलगीसेवेनें लेंकरें ॥ २ ॥ तरी निकटवासें । असों आशंकेच्या नासें ॥ ३ तुका ह्मणे रुची । येथें भिन्नता कैंची ॥ ४ ॥

॥ १३६८ ॥

वर्म तरी आह्मां दावा । काय देवा जाणें मी ॥१॥ बहुतां रंगीं हीन जालों । तरि आलों शरण ॥ २ ॥ द्याल जरि तुह्मी धीर । होईल स्थिर मन ठायीं ॥३॥ तुका ह्मणे सत्ताबळें । लडिवाळें राखावीं ॥४॥

॥ १३६९ ॥

अनाथांची तुह्मां दया । पंढरीराया येतसे ॥ १ ॥ ऐसी ऐकोनियां कीर्ति । बहु विश्रांति पावलों ॥ २ ॥ अनाथांच्या धांवा घरा । नामें करा कुडावा ॥३॥ तुका ह्मणे सवघड हित । ठेवूं चित्त पायां पें ॥ ४ ॥

॥ १३७० ॥

लोह चुंबकाच्या बळें । उभें राहिलें निराळें ॥ १ ॥ तैसा तूंचि

* १. हेवा. २. लोह्याळे ३. येती. ४. हेंचि फळ.

आह्मांठायीं । खेळतोसी अंतर्बाहीं ॥२॥ भक्ष अग्नीचा तो दोरा । त्यासि वांचवी मोहरा ॥३॥ तुका ह्मणे अघोलपणें । नेली लाकडें चंदनें ॥ ४ ॥

॥ १३७१ ॥

नाहीं दुकळलों अन्ना । परि या मान जनार्दना ॥ १ ॥ देव केला सकळसाक्षी । काळीं आणि शुद्धपक्षीं ॥२॥ भोगी भोगविता । बाळासवें तोचि पिता ॥३॥ कर्म अकर्म जळालें । *प्रौढें तुका तें उरलें ॥ ४ ॥

॥ १३७२ ॥

जें जें मना वाटे गोड । तें तें कोड पुरविसी ॥ १ ॥ आतां तूंचि बाह्यात्कारीं । अवघ्यापरी जालासी ॥ २ ॥ नाहीं सायासाचें काम । घेतां नाम आवडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे सर्वसांगे । पांडुरंगे दयाळे ॥ ४ ॥

॥ १३७३ ॥

आह्मां केलें गुणवंत । तें उचित राखावें ॥ १ ॥ तुह्मांसी तों चाड नाहीं । आणिकां कांहीं सुखदुःखा ॥ २ ॥ दासांचें तों देखों नये । उणें काय होइल तें ॥३॥ तुका ह्मणे विश्वंभरा । दृष्टि करा सामोरी ॥ ४ ॥

॥ १३७४ ॥

माता कापी गळा । तेथें कोण राखी बाळा ॥१॥ हें कां नेणा नारायणा । मज चाळवितां दीना ॥२॥ नागवी धांवणें । तेथें साह्य व्हावें कोणें ॥३॥ राजा सर्व हरी । तेथें दुजा कोण वारी ॥४॥ तुझ्या केल्याविण । नव्हे स्थिर वश मन ॥५॥ तुका ह्मणे हरी । सूत्र तुह्मां हातीं दोरी ॥ ६ ॥

॥ १३७५ ॥

वेद नेले शंखासुरें । केलें ब्रह्म्यानें गाऱ्हाणें ॥ १ ॥ धांव धांव झडकरी । ऐसें कृपाळुवा हरी ॥ २ ॥ गजेंद्र नाडियें गांजिला । तेणें तुझा धांवा केला ॥३॥ तुका ह्मणे पद्मनाभा । जेथें पाहें तेथें उभा ॥ ४ ॥

॥ १३७६ ॥

भागल्यांचा तूं विसांवा । करीं नांवा निंबलोण ॥ १ ॥ परमानंदा पुरुषोत्तमा । हरीं या श्रमापासूनि ॥२॥ अनाथांचा अंगीकार । करितां भार न मानिसी ॥३॥ तुका ह्मणे इच्छा पुरे । ऐसें धुरे गे विठ्ठले ॥ ४ ॥

---

* प्रौढ.

॥ १३७७ ॥

ह्मणवितों दास । मज एवढीच आस ॥ १ ॥ परी तें अंगीं नाहीं वर्म । करीं आपला तूं धर्म ॥ २ ॥ बडबडितों तोंडें । रितें भावेंविण धेंडें ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरा । दावूं जाणतों पसारा ॥ ४ ॥

॥ १३७८ ॥

उरलें तें भक्तिसुख । डोळां मुख पाहावें ॥१॥ अंतरींचें कां हो नेणां । नारायणा माझिये ॥ २ ॥ पुरवां तैसी केली आळी । बळी जगदानियां ॥३॥ हातीं घेउनि चारा भातें । दावां रितें बाळका ॥ ४ ॥ साजत हें थोरपण । नाहीं विण वत्सळा ॥ ५ ॥ शाहणें तरी लाड दावी । बाळ जेवीं मातेसी ॥६॥ तुका ह्मणे पांडुरंगा । ऐसें पैं गा आहे हें ॥७॥

॥ १३७९ ॥

देव गावा ध्यावा ऐसें जालें । परदेशी नाहीं उगलें । वडील आणि धाकुलें । नाहीं ऐसें जालें दुसरें तें ॥१॥ नाहीं लागत मुळीहूनि । सुहृदजन आणि जननी । लागल्या लागें त्यागें सांडुनि । लोभीये मांडणी संयोगाची ॥२॥ शिव बाटला जीवदशे । वहुत ओतत आलें ठसे । हीन जालें भूपणाचें इच्छे । निवडती कैसे गुणागुण ॥ ३ ॥ आतां हे हुतांश तों बरें । अवघे एकच मोहरें । पिटालियाविण नव्हे खरें । निवडे वरें जातिशुद्ध ॥ ४ ॥ तुका उतावेळ याजसाटीं । आहे तें निवेदीन पोटीं । आवडी द्यावी जी येथें लाटी । तुझी जगजेठी कीर्ती वाखाणीन ॥ ५ ॥

॥ १३८० ॥

प्रीतीच्या भांडणा नाहीं शिरपाव । वचनाचेचि भाव निष्ठुरता ॥ १ ॥ जीर्णे तरि एका जीवें उभयता । पुत्राचिया पिता दुखवे दुःखें ॥ २ ॥ काय जाणे तुटों मायेचें लिगाड । विषम तें आड उरों नेणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज करुणा उत्तरें । करितां विश्वंभरें पाविजेल ॥ ४ ॥

॥ १३८१ ॥

नव्हों सभाधीट । समोर बोलाया नीट । एकलीं एकट । दुजें नाहीं

देखिलें ॥ १ ॥ आतां अवघें तुह्मी जाणां । तुमचें माझें नारायणा । येईल करुणा । तेचि पहा तुह्मांसी ॥२॥ ताळ नाहीं माझे बुद्धी । धरली न धरवे शुद्धी । आतां बळ कधीं । कोण्या जन्में निवाड ॥ ३ ॥ आतां शेवटीचें । उत्तर तें हेंचि साचें । शरण आलें त्याचें । तुका ह्मणे सांभाळा ॥ ४ ॥

## देवापाशीं प्रेमाचें भांडण.

॥ १३८२ ॥

बरें आह्मां कळों आलें देवपण । आतां गुज कोण राखे तुझें ॥ १ ॥
मारिलें कां मज सांग आजिवरी । आतां सरोबरी तुज मज ॥ २ ॥
जें आह्मी बोलों तें आहे तुझ्या अंगीं । देईन प्रसंगीं आजि शिव्या ॥३॥
निलाजिरा तुज नाहीं याति कुळ । चोरटा शिंदळ ठावा जना ॥ ४ ॥
खासी धोंडे माती जीव जंत झाडें । एकलें उघडें परदेसीं ॥ ५ ॥
गाढव कुतरा ऐसा मज ठावा । बईल तूं देवा भारवाही ॥ ६ ॥
लंटिका तूं मागें बहुतांसी ठावा । आलें अनुभवा माझ्या तेंही ॥ ७ ॥
तुका ह्मणे मज खवळिलें भांडा । आतां धीर तोंडा न धरवे ॥ ८ ॥

॥ १३८३ ॥

आह्मी पतित ह्मणोनि तुज आलों शरण । करितों चिंतन दिवस रात्रीं ॥ १ ॥ नाहीं तरी मज काय होती चाड । धरावया भीड तुज चित्तीं ॥ २ ॥ आह्मां न तारावें तुह्मी काय करावें । सांगीजेजी भावें नारायणा ॥ ३ ॥अन्याय एकाचा अंगीकार करणें । तया हातीं देणें लाज तेचि ॥ ४ ॥ काय तें शूरत्व मिरवूनि बोलणें । जनामाजी दावणें बळरया ॥ ५ ॥ पोह्या अन्नछत्र घालूनियां घरीं । दंडितो बाहेरी आलियासी ॥६॥ नव्हे कीर्त कांहीं न मानेचि लोकां । काय विटंबणा तैसी तैसी ॥७॥ प्रत्यक्षासी काय द्यावें गा प्रमाण । पाहतां दर्पण साक्ष काई ॥८॥ तुका ह्मणे तरी आह्मांकां न कळे । तरलों अथवा[1] किंवा आह्मी नाहीं ॥९॥

१. 'अथवा' शब्द कांहीं प्रतीत नाहीं.

॥ १३८४ ॥

देवासी पैं भांडों एकचित्त करूनी । आह्मांसी सज्जनीं सांगितलें ॥१॥
आह्मां काय आतां देवें आडो परी । भेटी नेदी तरी सुखें नेदो ॥२॥
तोचि नांदो सदा हरि पैं वैकुंठीं । आह्मां देशवटी देवो सुखें ॥ ३ ॥
देवें अभिमान चित्तांत धरिला । तरी तो एकला राहो आतां ॥४॥ चित्तीं
धरोनि नाम असों सुखें येथें । हर्षें गाउं गीत गोविंदाचें ॥ ५ ॥ तुका
ह्मणे सर्व देवाची नष्टाई । आह्मी सुखें पाहीं डुलतसों ॥ ६ ॥

॥ १३८५ ॥

निष्ठुरा उत्तरीं न धरावा राग । आहे लागलाग ठायींचाचि ॥ १ ॥
तूं माझी जननी तूं माझा जनिता । रखुमाईच्या कांता पांडुरंगा ॥२॥
मुळींच्या ठेवण्या आहे अधिकार । दुरावोनि दूर गेलों होतों ॥ ३ ॥
पोटींच्या आठवा पडिला विसर । कांहीं आला भार माथां तेणें ॥ ४ ॥
राखिला हा होता बहु चौघां चार । साक्षीनें वेव्हार निवडिला ॥ ५ ॥
तुका ह्मणे कांहीं बोलणें न लगे । आतां पांडुरंगे तूं मी ऐसें ॥ ६ ॥

॥ १३८६ ॥

पांडुरंगे पाहा खादलीसे रडी । तरि नामसंडी धरिली आह्मी ॥ १ ॥
आतां संतांनीं करावी पंचाईत । कोण हा फजितखोर येथें ॥ २ ॥
कोणाचा अन्याय येथें आहे स्वामी । गर्जतसों आह्मी पातकीही ॥ ३ ॥
याचें पावनपण सोडवाजि तुह्मी । पतितपावन आह्मी आहों खरे ॥ ४ ॥
आह्मी तंव आहों अन्यायी सर्वथा । याची पावन कथा कैसी आहे ॥ ५ ॥
तुका ह्मणे आह्मी मेलों तरी जाणा । परि तुमच्या चरणा न सोडावें ॥ ६ ॥

॥ १३८७ ॥

ऐसा मी अपार पार नाहीं अंत । परि कृपावंत भाविकांचा ॥ १ ॥
दुर्जनां चांडाळां करीं निर्दाळण । करीं संरक्षण अंकिताचें ॥ २ ॥
भक्त माझे सखे जिवलग सांगाती । सर्वांग त्यांप्रती वोडवीन ॥ ३ ॥
पीतांबर छाया करीन त्यांवरी । सदा त्यांचे घरीं दारीं उभा ॥ ४ ॥

२. पुष्कळ प्रतींत 'तूं माझा जनिता तूं माझा जनिता' असा पाठ आहे.

माझे भक्त मज सदा जे गातले । त्यांघरीं घेतलें धरणें म्यां ॥ ५ ॥
कोठें हें वचन ठेविलें ये वेळे । तुका ह्मणे डोळे झांकियेले ॥ ६ ॥

॥ १३८८ ॥

आमचा तूं ऋणी ठायींचाचि देवा । मागावया ठेवा आलों दारा ॥ १ ॥
वर्म तुझें आह्मां सांपडलें हातीं । धरियेले चित्तीं दृढ पाय ॥ २ ॥
बैसलों धरणें कोंडोनियां द्वारीं । आंतूनि बाहेरी येऊों नेदीं ॥ ३ ॥
तुज मज सरी होईल या विचारें । जळो भांडखोरें निलाजिरीं ॥ ४ ॥
भांडवल माझें मिरविसी जनीं । सहस्र वोवणी नाममाळा ॥ ५ ॥
तुका ह्मणे आह्मी केली जिवें साटी । तुह्मां आह्मां तुटी घालूं आतां ॥ ६ ॥

॥ १३८९ ॥

नव्हो आतां जीवीं कपटवसती । मग काकुळती कोणा यावें ॥ १ ॥
सत्याचिये मापें गांठीं नये लाड । आदि अंत गोड नारायण ॥ २ ॥
चोखाटिया नाहीं विटाळाचा आघात । साच तें साचांत सांचा पडे ॥ ३ ॥
विचारिली वाट उसंत मीतळ । बुद्धीपुढें बळ तृणतुल्य ॥ ४ ॥
आहाराच्या वासें पचोनियां जिरे । वासना ही उरे उर्वरीत ॥ ५ ॥
तुका ह्मणे ताळा घालावा वचनीं । तूं साक्षी जननी पांडुरंगे ॥ ६ ॥

॥ १३९० ॥

जेणें तुज जालें रूप आणि नांव । पतित हें दैव तुझें आह्मीं ॥ १ ॥
नाहीं तरी तुज कोण हें पुसतें । निराकारी तेथें एकाएकीं ॥ २ ॥
अंधारें दीपका आणियेली शोभा । माणिकासी प्रभा कोंदणाची ॥ ३ ॥
धन्वंतरी रोगें आणिला उजेडा । सुखी काय चाडा जाणावें तें ॥ ४ ॥
अमृतासी मोल विषाचिया गुणें । पितळें तरी सोनें उंच निंच ॥ ५ ॥
तुका ह्मणे आह्मी असोनियां जाण । तुज देवपण आणियेलें ॥ ६ ॥

॥ १३९१ ॥

ऐसें[1] कोणी करी लागो तुझी सोई । माझे विठाबाई जननिये ॥ १ ॥
पतितपावन ह्मणविसी जरी । आचरण करीं तरी माझें ॥ २ ॥

---

१. 'लागो तुझी सोय ऐसें कोणी करी' असा कांहीं प्रतींत पाठ आहे.

नाहीं तरी ब्रीद टाकीं सोडूनियां । न धरिसी माया जरी माझी ॥ ३ ॥
बोलिला तो बोल करावा साचार । तरि लोक बरें ह्मणतील ॥ ४ ॥
करावा संसार लोक लाजे भेणें । वचनासी उणें येऊं नेदीं ॥ ५ ॥
तुह्मां आह्मां तैसें नाहीं ह्मणे तुका । होशील तूं सखा जीवलग ॥ ६ ॥

॥ १३९२ ॥

कासया लागला यासी चौघाचार । मुळींचा वेव्हार निवडिला ॥ १ ॥
ग्वाही बहुतांची घालूनियां वरि । सहजरे करीं आहे माझ्या ॥ २ ॥
तुह्मां वेगळा लागें आपल्याच ठायीं । होतें करूनि तेंही माझें माझें ॥ ३ ॥
भांडण सेवटीं जालें एकवट । आतां कटकट करूं नये ॥ ४ ॥
ठेविला ठेवा तो आला माझ्या हाता । आतां नाहीं सत्ता तुज देवा ॥५॥
तुका ह्मणे वांयांविण खटपटा । राहिलों मी वांटा घेऊनियां ॥ ६ ॥

॥ १३९३ ॥

ऐसें काय उणें जालें तुज देवा । भावेंविण सेवा घेसी माझी ॥ १ ॥
काय मज द्यावा नलगे मुशारा । पाहावें दातारा विचारूनि ॥ २ ॥
करितों पाखांडें जोडूनि अक्षरें । नव्हे ज्ञान खरें भक्तिरस ॥ ३ ॥
गुणवाद तुझे न बोलवे वाणी । आणिका छळणी वाद सांगें ॥ ४ ॥
तरी आतां मज राखें तुझे पायीं । देखसील कांहीं प्रेमरस ॥ ५ ॥
तुका ह्मणे तुज हांसतील लोक । निष्काम सेवक ह्मणोनियां ॥ ६ ॥

॥ १३९४ ॥

धरूनि पालव असुडीन करें । मग काय बरें दिसे लोकीं ॥ १ ॥
काय तें विचारा ठायींचें आपणा । जो हा नारायणा अवकाश ॥२॥
अंतर पायांसी तोंवरी या गोष्टी । पडिलिया मिठी हालों नेदीं ॥ ३ ॥
रुसलेता तरी होईल बुझावणी । तांतडी करूनि साधावें हें ॥ ४ ॥
सांपडलिया आधीं कारणासी ठाव । येथें करूं भाव दृढ आतां ॥५॥
तुका ह्मणे तुझे ठाउके बोभाट । मग खटपट चुकली ते ॥ ६ ॥

॥ १३९५ ॥

तुझें ह्मणवितां काय नास जाला । ऐकें बा विठ्ठला कीर्ती तुझी ॥ १ ॥

परी तुज नाहीं आमचे उपकार । नामरूपा थार केलियाचे ॥ २ ॥
समूळीं संसार केला देशधडी । सांडिली आवडी ममतेची ॥ ३ ॥
लोभ दंभ काम क्रोध अहंकार । यांसी नाहीं थार ऐसें केलें ॥ ४ ॥
मृत्तिका पाषाण तैसें केलें धन । आपले ते कोण पर नेणों ॥ ५ ॥
तुका ह्मणे जालों देहासी उदार । आणीक विचार काय तेथें ॥ ६ ॥

॥ १३९६ ॥

कोण पर्वकाळ पहासील तीथ । होतें माझें चित्त कासावीस ॥ १ ॥
पाठवीं भातुकें प्रेमें झडकरी । नको राखों उरी पांडुरंगा ॥ २ ॥
न धरावा कोप मजवरी कांहीं। अवगुणी अन्यायी ह्मणोनियां ॥ ३ ॥
काय रडवीसी नेणतियां पोरां । जाणतियां थोरां याचिपरी ॥ ४ ॥
काय उभी कर ठेवूनियां कटीं । बुझावीं धाकुटीं लडिवाळें ॥ ५ ॥
तुका ह्मणे आतां पदरासी पिळा। घालीन निराळा नव्हे मग ॥ ६ ॥

॥ १३९७ ॥

कैसा कृपाळु हें न कळसी देवा । न बोलसी सेवा घेसी माझी ॥१॥
काय ऐसें बळ आहे तुजपाशीं । पाहों हा रिघसी कोणा आड ॥२॥
पाडियेला ठायीं तुझ्या थारा मारा । अवघा दातारा लपसी तो ॥३॥
आतां तुह्मां आह्मां उरी तोंचि बरें । काय हीं उत्तरें वाढवूनि ॥४॥
तुका ह्मणे मज साह्य जाले संत । ह्मणऊनि मात फावली हे ॥५॥

॥ १३९८ ॥

दोष करूनि आह्मी पतित सिद्ध जालों । पावन मागों आलों ब्रीद तुझें ॥१॥
आतां पतिता तारावें कीं ब्रीद हें सोडावें। यांत जें पुरवे तेंचि सांगा॥२॥
उद्धार तुमच्यानें नव्हे हो श्रीहरि । सोडा झडकरी ब्रीद आतां ॥३॥ तें
ब्रीद घेउनी हिंडों दारोदारीं । सांगूं तुझी हरि कीर्ति जगा ॥४॥ देवें
हारविलें ब्रीद हें सोडिलें । पतितें जिंकिलें आह्मीं देवा ॥५॥ तुका ह्मणे
आह्मीं उठलों दैन्यवरि । विचारा श्रीहरी तुह्मी आतां ॥६॥

॥ १३९९ ॥

आह्मी नरका जातां काय येईल तुझ्या हाता । ऐसा तूं अनंता विचारीं

पा ॥१॥ तुज शरण आलियाचें काय हेंचि फळ । विचारा दयाळ कृपा-
निधी ॥२॥ तुझें पावनपण न चले आह्मांसीं । ऐसें हृषीकेशी कळों आलें ॥३॥
आह्मी दुःख पावों जन्ममरण व्यथा । काय तुझ्या हाता येत असे ॥४॥
तुका ह्मणे तुह्मी खादली हो रडी । आह्मी धरली सेंडी नाम तुझें ॥५॥

॥ १४०० ॥

आतां सांडूं तरी हातीं ना पदरीं । सर्वां सहोदरीं मोकलिलों ॥ १ ॥
जनाचारामध्यें उडाला पातेरा । जालों निलाजिरा ह्मणऊनि ॥ २ ॥
कोणाचिया दारा जावेनासें जालें । म्यांच विटंबिलें आपणासी ॥ ३ ॥
कोण जाला माझे बुद्धीसी संचार । नाहीं कोठें थार ऐसें जालें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुज भक्त जाले फार । ह्मणोनियां थार नाहीं येथें ॥ ५ ॥

॥ १४०१ ॥

आतां तुझा भाव कळों आला देवा । ठकूनियां सेवा घेसी माझी ॥ १ ॥
टाकूनि सांकडें आपुलिये माथां । घातला या संतावरी भार ॥ २ ॥
स्तुती करवूनी पिटिला डांगोरा । तें कोण दातारा साच करी ॥ ३ ॥
जातीचें वाणी मी पोटींचें कुडें । नका मजपुढें ठकाठकी ॥ ४ ॥
तुका ह्मणे नाहीं आलें अनुभवा । आधींच मी देवा कैसें नाचों ॥ ५ ॥

॥ १४०२ ॥

आह्मीं पतितांनीं घालावें सांकडें । तुह्मां लागे कोडें उगवणें ॥ १ ॥
आचरतां दोष न धरूं सांभाळ । निवाड उकल तुह्मां हातीं ॥ २ ॥
न घेतां कवडी करावा कुढावा । पाचारितां देवा नामासाठीं ॥ ३ ॥
दयासिंधु नाम पतितपावन । हें आह्मां वचन सांपडलें ॥ ४ ॥
तुका ह्मणे करूं अन्यायाच्या कोटी । कृपावंत पोटीं तूंचि देवा ॥ ५ ॥

॥ १४०३ ॥

तेरा दिवस जाले निश्चक्र करितां । न पवसी अनंता माय बापा ॥१॥
पाषाणांची खोळ घेउनि बैसलासी । काय हृषीकेशी जालें तुज ॥२॥
तुजवरी आतां प्राण मी त्यजीन । हत्या मी घालीन पांडुरंगा ॥३॥

फार विठाबाई धरिली तुझी आस । करीन जीवा नाश पांडुरंगा ॥४॥
तुका ह्मणे आतां मांडिलें निर्वाण । प्राण हा सांडीन चंद्रभागे ॥५॥

॥ १४०४ ॥

नाहीं जालें मोल कळे देतां काळीं । कोण पाहों बळी दोघांमध्यें ॥१॥
आह्मी तरी जालों जीवासी उदार । कैंचा हा धीर तुजपाशीं ॥२॥
बहु चाळविलें मागें आजिवरी । आतां पुढें हरी जाऊं नेदीं ॥३॥
नव्हती जों भेटी नामाची ओळखी । ह्मणऊनि दुःखी बहु जालों ॥४॥
तुका ह्मणे कांहीं राहों नेदीं बाकी । एकवेळा चुकी जाली आतां ॥५॥

॥ १४०५ ॥

जे केली आळी ते अवघी गेली वांयां । उरला पंढरिराया श्रम माझा ॥१॥
काय समाधान केलें कोणे वेळे । कोणें माझे लळे पाळियेले ॥२॥
आभासही नाहीं स्वप्नीं दुश्चिता । प्रत्यक्ष बोलतां कइचा तो ॥३॥
आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा । भक्त ऐसे जगामाजी जाले ॥४॥
तुका ह्मणे आतां नाहीं भरवसा । मोकलीसी ऐसा वाटतोसि ॥५॥

॥ १४०६ ॥

काय विनवावें कोण तो निवाड । केलें माझ्या कोड वचनाचें ॥१॥
अहो कृपानिधि गुणांच्या निधाना । माझ्या अनुमाना नयेचि हें ॥२॥
बहुत करुणा केलेंसे भाषण । एकही वचन नाहीं आलें ॥३॥
माझी कांहीं सेवा होईल पावली । निश्चिंती मानिली होती ऐसी ॥४॥
तुका ह्मणे माझी उरली ते आटी । अभय कर कटीं न देखेंचि ॥५॥

॥ १४०७ ॥

तुह्मां आह्मां तुटी होईल यावरी । ऐसें मज हरी दिसतसे ॥ १ ॥
वचनाचा कांहीं न देखों आधार । करावा हा धीर कोठवरी ॥ २ ॥
सारिलें संचित होतें गांठी कांहीं । पुढें ऋण तेंही नेदी कोणी ॥ ३ ॥
जावेंचि नलगे कोणाचिया घरा । उडाला पातेरा तुझ्या संगें ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मां हाचि लाभ जाला । मनुष्यधर्म गेला पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ १४०८ ॥

विनवितों चतुरा तुज विश्वंभरा । परियेसीं दातारा पांडुरंगा ॥ १ ॥
तुझे दास ऐसें जगीं वाखाणिलें । आतां नव्हे भलें मोकलितां ॥ २ ॥
माझे गुणदोष कोण जाणे मात । पावनपतित नाम तुझें ॥ ३ ॥
लोभ मोह माया आह्मां बांधवितां । तरि हा अनंता बोल कोणा ॥ ४ ॥
तुका ह्मणे मी तों पतितचि खरा । परि आलों दातारा शरण तुज ॥ ५ ॥

॥ १४०९ ॥

न बोलावें परी पडिला प्रसंग । हाकलितें जग तुझ्या नामें ॥ १ ॥
लटिकेंचि सोंग मांडिला पसारा । भिकारी तूं खरा कळों आलें ॥ २ ॥
निलाजिरीं आह्मी करोनियां धीर । राहिलों आधार धरूनियां ॥ ३ ॥
कैसा नेणों आतां करिसी शेवट । केली कटकट त्याची पुढें ॥ ४ ॥
तुका ह्मणे कांहीं न बोलसी देवा । उचित हे सेवा घेसी माझी ॥ ५ ॥

॥ १४१० ॥

चुकलिया आह्मां करितसां दंड । हाकासी कां खंड पांडुरंगा ॥ १ ॥
चाळविलीं एकें रिद्धिसिद्धीदरी । तैसा मी भिकारी नव्हें देवा ॥ २ ॥
कां मी येथें गुंतों मांडुनि पसारा । मागुता दातारा दंभासाटीं ॥ ३ ॥
केलें त्यां जतन आपुलें वचन । टाचीचें धरून होतों पोटीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे ताळा घातला आडाखीं । टावें होतें सेकीं आडविसी ॥ ५ ॥

॥ १४११ ॥

तरि कां मागें वांयां कीर्ती वाढविली । जनांत आपुली ब्रिदावळी ॥ १ ॥
साच करितां आतां फिरसी माघारा । टाचीचें दातारा नेणवेचि ॥ २ ॥
संतांसी श्रीमुख कैसें दाखविसी । पुढें मात त्यांसी सांगई न ॥ ३ ॥
घेईन डांगोरा तुझिया नामाचा । नव्हे अनाथांचा नाथ ऐसा ॥ ४ ॥
तुका ह्मणे आधीं राहिलों भरोनि । तूं कां होसी धनी निमित्याचा ॥ ५ ॥

॥ १४१२ ॥

कळलें माझा तुज नव्हे रे आठव । काय काज जीव ठेवूं आतां ॥ १ ॥
तूं काय करिसी माझिया संचिता । धिग हे अनंता जालें जिणें ॥ २ ॥

पतितपावन राहिलों या आशा । आइकोनि ठसा कीर्ती तुझी ॥ ३ ॥
आतां कोण करी माझा अंगीकार । कळलें निष्ठुर जालासी तूं ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझी मांडिली निरास । करितों जीवा नास तुजसाटीं ॥ ५ ॥

॥ १४१३ ॥

जाय परतें काय आणिला कांटाळा । बोला एक वेळा ऐसें तरी ॥ १ ॥
कां हो तुह्मीं केली निष्ठुरता देवा । मानेना हे सेवा करितों ते ॥ २ ॥
भाग्यवंत त्यांसी सांगितल्या गोष्टी । तें नाहीं अदृष्टीं आमुचिया ॥ ३ ॥
तुज ऐसा स्वामी असोनि मस्तकीं । होतसे या चुकी संचिताची ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुह्मापासूनि अंतर । न पडे नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ ५ ॥

॥ १४१४ ॥

परिस काय धातु *सोनें न करितु । फेडितो निभ्रांतु लोहपांगु ॥ १ ॥
काय तयाहुनि जालासी बापुडें । फेडितां सांकडें माझें एक ॥ २ ॥
कल्पतरु कोड पुरवितो रोकडा । चिंतामणि खडा चिंतिलें तें ॥ ३ ॥
चंदनांच्या वासें वसतां चंदन । होती काष्ठ आन वृक्षयाती ॥ ४ ॥
काय त्याचें उणें जालें त्यासी देतां । विचारीं अनंता तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ १४१५ ॥

गांवलोकिं कांहीं लावियेलें पिसें । काय सांगों ऐसें तुजपाशीं ॥ १ ॥
तोंड काळें केलें फिरविलें मज । नाहीं धरिली लाज पांडुरंगा ॥ २ ॥
काय तुजपाशीं सांगों हें गाऱ्हाणें । मग काय जिणें तुझें माझें ॥ ३ ॥
कोणासाटीं आतां करावा संसार । केली वारावार आपणचि ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मी मोडिला घरचार । धरियेला धीर तुझ्या पायीं ॥ ५ ॥

॥ १४१६ ॥

तुझा ह्मणऊनी जालों उतराई । त्याचें वर्म काई तें मी नेणें ॥ १ ॥
हातीं धरोनियां दावी मज वाट । पुढें कोण नीट तेंचि देवा ॥ २ ॥
देवभक्तपण करावें जतन । दोन्हीं पक्षीं जाण तूंचि बळी ॥ ३ ॥

---

* 'सोनें न करितु' याबद्दल 'परिस काय धातु' असें पुनः कांहीं प्रतींत आढळतें.

अभिमानें तुज लागली हे लाज । शरणागतां काज करावया ॥ ४ ॥
तुका ह्मणे बहु नेणता मी फार । ह्मणऊनि विचार जाणविला ॥ ५ ॥

॥ १४१७ ॥

निष्ठुर मी जालों अतिवादागुणें । हें कां नारायणें नेणिजेल ॥ १ ॥
सांडियेली तुह्मी गोत परिसोय । फोडविली डोय कर्मा हातीं ॥ २ ॥
सांपडुनि संदी केली जीवेंसाटीं । घ्यावयासी तुटी कारण हें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज काय ह्मणों उणें । नाहीं अभिमानें चाड देवा ॥ ४ ॥

॥ १४१८ ॥

करितां विचार सांपडलें वर्म । समूळ निश्रम परिहाराचें ॥ १ ॥
मज घेऊनियां आपणांसी द्यावें । साटीं[1] जीवें जीवें नारायणा ॥ २ ॥
उरी नाहीं मग पडदा कां आला । स्वमुखेंचि भला करितां वाद ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझें खरें देणें घेणें । तुह्मी साक्षी जाणें अंतरींचें ॥ ४ ॥

॥ १४१९ ॥

नाहीं तरी आतां कैचा अनुभव । जालासी तूं देव घरघेणा ॥ १ ॥
जेथें तेथें देखें लांचाचा पर्वत । घ्यावें तरि चित्त समाधान ॥ २ ॥
आधीं वरी हात या नांवें उदार । उसण्याचे उपकार फिटाफीट ॥ ३ ॥
तुका ह्मणे जैसी तैसी करूं सेवा । सामर्थ्यानें[2] देवा पायांपाशीं ॥ ४ ॥

॥ १४२० ॥

आह्मी ह्मणों कोणी नाहीं तुज आड । दिसतोसी भ्याड पांडुरंगा ॥ १ ॥
हा गे माझ्या भोगें केलासी परता । विश्वंभरीं सत्ता नाहीं ऐसी ॥ २ ॥
आह्मी तुज असों देऊनि आधार । नाम वारंवार उच्चारितों ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज धरियेलें बळें । पंचभूतीं खळें करूनियां ॥ ४ ॥

॥ १४२१ ॥

उपजल्या काळें शुभ कां शकुन । आतां आवरोन राहिलेति ॥ १ ॥
नाहीं मागितली वचनाची जोडी । निष्काम रोकडी वरिवरि ॥ २ ॥

---

१ सांडीं जीवें भावें. २ सामर्थ्य न.

सत्याविण काय उगीच लांबणी । कारियाची वाणी येर भूस ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसी कोणा चाळवणी । न विचारा मनीं पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १४२२ ॥

तुह्मां आह्मांसवें न पडावी गांठी । आलेति जगजेठी कळों आतां ॥ १ ॥
किती ह्मणों आतां वाइटा वाइट । शिवों नये वीट आल्यावरी ॥ २ ॥
बोलिल्याचि आतां हेचि पराचित । भीड भार थीत बुडवील ॥ ३ ॥
तुका ह्मणे आली रोकडी प्रचिती । झांकणें तें किती कोठें देवा ॥ ४ ॥

॥ १४२३ ॥

काय तुज मागें नाहीं जाणवलें । माझें नाहीं केलें हित कांहीं ॥ १ ॥
डोळे झांकुनियां होसी अबोलणा । तेव्हां नारायणा आतां कैसा ॥ २ ॥
न कळे उचित न सांगतां स्पष्ट । ऐसा क्रियानष्ट काय जाणे ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझा घात तुह्मां ठावा । तरि कां आधीं देवा वारूं नये ॥ ४ ॥

॥ १४२४ ॥

कामक्रोध माझे लावियेले पाठीं । बहुत हिंपुटीं जालों देवा ॥ १ ॥
आवरितां तुझे तुज नावरती । थोर वाटे चित्तीं आश्चर्य हें ॥ २ ॥
तुझिया विनोदें आह्मां प्राणसाटी । भयभीत पोटीं सदा दुःखी ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझ्या कपाळाचा गुण । तुला हांसे कोण समर्थासी ॥ ४ ॥

॥ १४२५ ॥

पंचाग्निसाधन करूं धूम्रपान । काय तीर्थाटन करूं सांग ॥ १ ॥
सांग कोणे देशीं आहे तुझें गांव । येऊनियां ठाव येऊं तेथें ॥ २ ॥
सांग कांहीं वृत्त कोण करूं व्रत । जेणें कृपावंत होसील तूं ॥ ३ ॥
वाटतें शेवटीं जालासी निष्ठुर । न देसी उत्तर तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १४२६ ॥

उपजों मरों हे तों आमची मिरासी । हें तूं निवारिसी तरी थोर ॥ १ ॥
उभा राहीं करीं खरा खोटा वाद । आह्मी जालों निंद्य लंडीपणें ॥ २ ॥
उभयतां आहे करणें समान । तुह्मां ऐसा ह्मणे मीही देवा ॥ ३ ॥
तुका ह्मणे हातीं सांपडलें वर्म । अवघाचि भ्रम फेडिन आतां ॥ ४ ॥

॥ १४२७ ॥

तुझें नाम मुखीं तयासी विपत्ति । आश्चर्य हें चित्तीं वाटतसे ॥ १ ॥
काय जाणों देवा होईल निजला । नेणों जी विठ्ठला मायबापा ॥२॥
भवबंधनाचे तुटतील फांसे । तें कां येथें असे अव्हेरिलें ॥३॥
तुका ह्मणे माझें दचकलें मन । वाटे वांयांविण श्रम केला ॥४॥

॥ १४२८ ॥

आह्मी बळकट जालों फिगाउनी । तुमच्या वचनीं तुह्मां गोऊं ॥१॥
जालें तेव्हां जालें मागील तें मागें । आतां वर्मलागें ठावीं जालीं ॥२॥
तोडावया अवघ्या चेष्टांचा संबंध । शुद्धापाशीं शुद्ध बुद्ध व्हावें ॥३॥
तुका ह्मणे आह्मां आत्मत्वाची सोय । आपणाचि होय तैसाचि तूं ॥४॥

॥ १४२९ ॥

क्षर अक्षर हे तुमचे विभाग । कासयानें जग दुरी धरा ॥ १ ॥
तैसें आह्मा नेणों पालटोंच कांहीं । त्यागिल्याची नाहीं मागें चाड ॥ २ ॥
प्रतिपादिता तूं समविषमाचा । प्रसाद तो याचा पापपुण्य ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मां नाना अवगणीं । लागे संपादणी लटिक्याची ॥ ४ ॥

॥ १४३० ॥

निर्गुणाचे द्यावें गुणासी दर्शन । एकाएकीं भिन्न भेद घडे ॥ १ ॥
तुह्मां आह्मां आतां न पडे यावरी । आहों तेंचि बरी जेथें तेथें ॥ २ ॥
आपणापासुनी नसावें अंतर । वंचिले उत्तर ह्मणउनी ॥ ३ ॥
तुका ह्मणे अंगा आली कठिणता । आमच्या अनंता तुह्मां ऐसी ॥ ४ ॥

॥ १४३१ ॥

सेवकासी आज्ञा निरोपासी काम । स्वामीचे ते धर्म स्वामी जाणे ॥ १ ॥
मनाचिये मुळीं रहावें बैसोन । आकर्षावे गुण पायांपाशीं ॥ २ ॥
भेटीचे तांतडी करितसें लाहो । अंबाळावा देहो ऐसें वाटे ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझें करावें कारण । आपुलें जतन ब्रीद करा ॥ ४ ॥

॥ १४३२ ॥

आह्मी भाविकें हे काय जाणों खोडी । आइकोनि प्रौढी विनविलें ॥ १ ॥
नाहीं ऐसें येथें जालेती असतां । वाढविली चिंता अधिक सोसें ॥ २ ॥

न कळेचि आधीं करितां विचार । न धरितां धीर आहाचता ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां वचनें वचन । वाढेल तीक्षण बुद्धि जाली ॥ ४ ॥

॥ १४३३ ॥

नये ऐसें बोलों कठिण उत्तरें । सलगी लेंकुरें केली पुढें ॥ १ ॥
अपराध कीजे घडला तो क्षमा । सिकवा उत्तमा आमुचिया ॥ २ ॥
धरूं धावें आगी पोळेल तें नेणे । ओढिलिया होणें माते बाळा ॥ ३ ॥
तुका ह्मणे भार ज्याचा जार त्यासी । प्रवीण येविशीं असा तुह्मी ॥४॥

॥ १४३४ ॥

पापी ह्मणों तरि आठवितों पाय । दोष बळी काय तयाहूनि ॥ १ ॥
ऐशा विचाराची घालूनि कोंडणी । काय चक्रपाणी निजलेती ॥ २ ॥
एक वेळ जेणें पुत्राच्या उद्देशें । घेतल्याचें कैसें नेलें दुःख ॥ ३ ॥
तुका ह्मणे अहो वैकुंठनायका । चिंता कां सेवका तुमचिया ॥ ४ ॥

॥ १४३५ ॥

कवणांशीं भांडों कोण माझें साहे । कोण मज आहे तुजविण ॥ १ ॥
धरिलें उदास दुरदुरांतरें । सांडी एकसरें केली माझी ॥ २ ॥
आइकोन माझे नाइकसी बोल । देखोनियां खोळ बुंथी घेसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे एके गांवींची वसती । ह्मणऊनि खंती वाटे देवा ॥ ४ ॥

॥ १४३६ ॥

तरले ते मागें आपुलिया सत्ता । कमाई अनंता करूनियां ॥ १ ॥
उसणें फेडितां धर्म तेथें कोण । ते तुज अनन्य तुह्मी त्यांसी ॥ २ ॥
मज ऐसा कोण सांगा वांयां गेला । तो तुह्मी तारिला पांडुरंगा ॥ ३ ॥
तुका ह्मणे नामासारिखी करणी । न देखें हें मनीं समजावें ॥ ४ ॥

॥ १४३७ ॥

तुज जाणें तान्हें नाहीं पांडुरंगा । कां जी मज सांगा उपेक्षिलें ॥ १ ॥
तुज ठावें होतें पातकी मी खरा । आधींच कां थारा दिला पायीं ॥२॥
अंक तो पडिला हरिचा मी दास । भेद पंगतीस करूं नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी जिंतिलें तें खरें । आतां उणें पुरें तुह्मां अंगीं ॥ ४ ॥

॥ १४३८ ॥

विनवितों तरी आणितोसि परी । याचकानें थोरी दातयाची ॥ १ ॥
आमुचेही कांहीं असों द्या उपकार[1] । एकल्यानें थोर कैचे तुह्मी ॥ २ ॥
नेघावीजी कांहीं बहु साल सेवा । गौरव तें देवा यत्न कीजे ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं आमुची मिरासी । असावेंसीं ऐसीं दुर्बळेंचि ॥ ४ ॥

॥ १४३९ ॥

सेवकें करावें सांगितलें काम । सिक्याचा तो धर्म स्वामी राखे ॥ १ ॥
काय देवा नेणों आलें गांढेपण । तुह्मी शक्तिहीन जाले दिसां ॥ २ ॥
विष्णुदास आह्मी निर्भर ज्या बळें । तें दिसे या काळें अव्हेरिलें ॥ १ ॥
तुका ह्मणे मूळ पाठवा लौकरी । किंवा करूं हरी काय सांगा ॥ ४ ॥

॥ १४४० ॥

करावा उद्धार हें तुह्मां उचित । आह्मी केली नीत कळली ते ॥ १ ॥
पाववील हाक धांवा ह्मणऊन । करावें जतन ज्याचें तेणें ॥ २ ॥
दुश्चितासी बोल ठेवायासी ठाव । ऐसा आह्मी भाव जाणतसों ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझें कायावाचामन । दुसरें तें ध्यान करित नाहीं ॥ ४ ॥

॥ १४४१ ॥

आतां नको चुकों आपुल्या उचिता । उदारा या कांता रखुमाईच्या ॥ १ ॥
आचरावे दोष हें आह्मां विहित । तारावे पतित तुमचें तें ॥ २ ॥
आह्मी तों आपुलें केलेसें जतन । घडो तुह्मांकून घडेल तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे विठो चतुराच्या राया । आहे तें कासया मोडों देसी ॥ ४ ॥

॥ १४४२ ॥

आदि वर्तमान जाणसी भविष्य । मागें पुढें नीस संचिताचा ॥ १ ॥
आतां काय देऊं पायांपें परिहार । जाणां तो विचार करा देवा ॥ २ ॥
आपुलें तें येथें काय चाले केलें । जोडावे ते भले हात पुढें ॥ ३ ॥
तुका ह्मणे फिके बोल माझे वारा । कराल दातारा होईल तें ॥ ४ ॥

---

१. प्रकार.

॥ १४४३ ॥

स्वप्नींचें हें धन हातीं ना पदरीं । प्रत्यक्ष कां हरि होऊं नये ॥ १ ॥
आजुनि कां करा चाळवाचाळवी । सावकाशें द्यावी सत्य भेटी ॥ २ ॥
बोलोनियां फेडा जीवींचि काजळी । पाहेन कोमळीं चरणांबुजें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझ्या जीवींचिया जीवा । सारूनियां ठेवा पडदा आतां ॥ ४ ॥

॥ १४४४ ॥

आपुल्या आपण उगवा लिगाड । काय माझें जड करून घ्याल ॥ १ ॥
उद्धारासीं काय उधाराचें काम । वाढवूंचि श्रम नये देवा ॥ २ ॥
करा आतां मजसाटीं वाड पोट । ठाव नाहीं तंट जालें लोकीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे बाकी झडलियावरी । न पडे व्यवहारीं संचिताचे ॥ ४ ॥

॥ १४४५ ॥

पुढिलांचे सोयी माझ्या मना चाली । मताची आणिली नाहीं वुद्धी ॥ १ ॥
केलासी तो उभा आजिवरी संतीं । धरविलें हातीं कट देवा ॥ २ ॥
आहे तेंची मागों नाहीं खोटा चाळा । नये येऊं बाळा लेंकराशीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझा साक्षीचा व्यवहार । कृपण जी थोर परी तुह्मी ॥ ४ ॥

॥ १४४६ ॥

काया वाचा मनें श्रीमुखाची वास । आणीक उदास विचारासी ॥ १ ॥
काय आतां मोक्ष करावा जी देवा । तुमचिया गोवा दर्शनासी ॥ २ ॥
केलिया नेमासी उभें ठाडें व्हावें । नेमलें तें भावें पालटेना ॥ ३ ॥
तुका ह्मणे जों जों कराल उशीर । तों तों मज फार रडवील ॥ ४ ॥

॥ १४४७ ॥

आतां अवश्यक करणें समाधान । पाहिलें निर्वाण न पाहिजे ॥ १ ॥
केलें तरी आतां सुशोभ्य करावें । दिसतें बरवें संतांमधीं ॥ २ ॥
नाहीं भक्तराजीं ठेविला उद्धार । नामाचा आकार त्यांचियानें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझ्या वडिलांचें ठेवणें । गोप्य नारायणें न करावें ॥ ४ ॥

॥ १४४८ ॥

समर्थपणें हे करा संपादणी । नसतेंचि मनीं धरिल्याची ॥ १ ॥

दुसऱ्यांचें येथें नाहीं चालों येत । तरी मी निवांत वाट पाहें ॥ २ ॥
खोटियाचें खरें खरियाचें खोटें । मानलें गोमटें तुह्मांसी तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मांसवें करितां वाद । होईजे तें निंद्य जनीं देवा ॥ ४ ॥

॥ १४४९ ॥

आइकिली कीर्ति संतांच्या वदनीं । तरि हें ठाकोनि आलों स्थळ ॥१॥
मागिला पुढिला करावें सारिखें । पालटों पारिखें नये देवा ॥२॥
आह्मांसी विश्वास नामाचा आधार । तुटतां हे धार उरी नाहीं ॥३॥
तुका ह्मणे येथें नसावेंचि दुजें । विनंती पंढरिराजें परिसावी हे ॥४॥

॥ १४५० ॥

कैचें भांडवल खरा हातीं भाव । कळवळ्यानें माव दावीतसें ॥ १ ॥
आतां माझा अंत नको सर्वजाणा । पाहों नारायणा निवडूनि ॥ २ ॥
संताचें उच्छिष्ट मागिलें पंगती । करावें संगती लागे ऐसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आलों दावूनि विश्वास । संचित तें नास पावे ऐसें ॥ ४ ॥

॥ १४५१ ॥

न व्हावा तो बरा मुळींच संबंध । विश्वासिकां वध बोलिलासे ॥ १ ॥
आतां माझें हित काय तें विचारा । सत्यत्वें दातारा पांडुरंगा ॥ २ ॥
नाहीं भाव परी ह्मणवितों दास । नको देऊं यास उणें येऊं ॥ ३ ॥
तुका ह्मणे कां हो उद्धारितां दीन । मानीतसां सीण मायबापा ॥ ४ ॥

॥ १४५२ ॥

कोंसया वांचूनि जालों भूमी भार । तुझ्यापायीं थार नाहीं तरी ॥ १ ॥
जातां भलें काय डोळियांचें काम । जंवें पुरुषोत्तम न देखती ॥ २ ॥
काय मुख पेवें श्वापदाचें धांवें । नित्य तुझें नांवें नुच्चारितां ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां पांडुरंगाविण । न वांचतां क्षण जीव भला ॥ ४ ॥

॥ १४५३ ॥

तुह्मांसाठीं आह्मां आपुला विसर । करितां अव्हेर कैसें दिसे ॥ १ ॥
विचाराजी आतां ठायींचें हें देवा । आह्मां नये हेवा वाढवितां ॥ २ ॥

१. काय वांचोनिया. २. जरि. ३. बिळ. ४. धाम. ५. नाम. ६. मैं. ७. वेचेचि.

आलों टाकोनियां सुखाची वसती । पुढें माझ्या युक्ति खुंटलिया ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाला सकळ वृत्तांत । केला प्रणिपात ह्मणऊनि ॥ ४ ॥

॥ १४५४ ॥

जेथें माझी दृष्टि राहिली बैसोन । तेथेंचि हें मन गुंडाळतें ॥ १ ॥
टाळावी ते पीडा आपुल्यापासून । दिठावलें अन्न ओकवितें ॥ २ ॥
तुह्मांसी कां कोडें कोणेही विशीचें । नवलाव याचें वाटतसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे वेगीं उभारा जी कर । कीर्ति मुखें थोर गर्जईन ॥ ४ ॥

॥ १४५५ ॥

नव्हें मी आह्याच आशेचें बांधलें । जें हें टोंकविलें नारायणा ॥ १ ॥
अंतर तों तुह्मां बरें कळों येतें । वेव्हार उचितें चाळवीजे ॥ २ ॥
मनें कल्पीलें आवरितां पाप । संकल्पीं विकल्प याचि नांवें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां न सोसे जळजळ । सिजल्यावरी जाळ कढ खोटा ॥ ४ ॥

॥ १४५६ ॥

तुझिया विनोदें आह्मांसी मरण । सोशियेला सीण बहु फेरे ॥ १ ॥
आतां आपणचि येसी तें करीन । नाम हें धरीन तुझें कंठीं ॥ २ ॥
वियोगेंचि आलों उसंतीत वनें । संकल्प हे मनें वाहोनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे वर्म सांपडलें सोपें । गोवियेलों पापें पुण्यें होतों ॥ ४ ॥

॥ १४५७ ॥

धरूनियां मनीं बोलिलों संकल्प । होसी तरि बाप सिद्धी पाव ॥ १ ॥
उत्कंठा हे आजी जाली माझे पोटीं । मोकलिली गोष्टी टाळाटाळ ॥ २ ॥
माझा मज असे ठाउका निर्धार । उपाधि उत्तर न साहे पैं ॥ ३ ॥
तुका ह्मणे जरी दिली आठवण । तरि अभिमान धरीं याचा ॥ ४ ॥

॥ १४५८ ॥

ऐका जी देवा माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
सन्निद्ध पातलों सांडूनियां शंका । सन्मुखचि एकाएकीं पुढें ॥ २ ॥
जाणविलें कोठें पावे पायांपाशीं । केली या जिवासी साटी ह्मण ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझे हातीं द्या उद्धार । करीं करकर ह्मणवूनि ॥ ४ ॥

॥ १४५९ ॥
आतां गुण दोष काय विचारिसी । मी तों आहें रासी पातकांची॥१॥
पतितपावनासवें समागम । आपुलाला धर्म चालवीजे ॥ २ ॥
घनघायें भेटी लोखंड परिसा । तरी अनारिसा न पालटे ॥ ३ ॥
तुका ह्मणे माती कोण पुसे फुका । कस्तुरीच्या तुका समागमें ॥ ४ ॥

॥ १४६० ॥
सांडावी हे भीड अधमाचे चाळे । मधपी बरळे भलत्या छंदें ॥ १ ॥
ऐसे तंव तुह्मी नाहीं जी दिसत । कां हें अनुचित वदलेत ॥ २ ॥
फांटा जाला त्यासी नाहीं वोढा वारा । वेरसाचि खरा हाटो गुण ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं ज्याच्या बापा ताळा । तो देखे विटाळा संतां अंगीं॥४॥

॥ १४६१ ॥
करावा उद्धार किंवा घ्यावी हारी । एका बोला स्थिरी राहें देवा ॥१॥
निरसनें माझा होईल संदेह । अवघेचि आहे मूळ पायीं ॥ २ ॥
राहिलों चिकटून कांहींचि न कळे । कोणा नेणों काळें उदय भाग्य ॥३॥
तुका ह्मणे बहु उद्वेगला जीव । भाकीतसें कीव देवराया ॥ ४ ॥

॥ १४६२ ॥
काशासाटीं आह्मी जाळिला संसार । न करा विचार ऐसा देवा ॥ १ ॥
कैसें नेणों तुह्मां करवतें उदास । माझा प्रेमरस भंगावया ॥ २ ॥
समर्पूनी ठेलों देह हा सकळ । धरितां विटाळ न लजा माझा ॥ ३ ॥
तुका ह्मणे अवघी मोकलूनि आस । फिरतों उदास कोणासाटीं ॥ ४ ॥

॥ १४६३ ॥
झड मारोनियां बैसलों पंगती । उठवितां फजिती दातयाची ॥ १ ॥
काय तें उचित तुह्मां कां न कळे । कां हो झांका डोळे पांडुरंगा ॥२॥
घेईन इच्छेचें मागोनि सकळ । नाहीं नव्हे काळ बोलायाचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे जालों माना अधिकारी । नाहीं लोक परी लाज देवा ॥४॥

॥ १४६४ ॥
काय तें सामर्थ्य न चले या काळें । काय जालीं बळें शक्तिहीण ॥१॥

माझिया संचितें आणिलासी हरी । जालें तुजवरी वरिष्ठ तें ॥ २ ॥
काय गमाविली सुदर्शन गदा । त्यां भेणें गोविंदा लाजतसां ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय ब्रिदाचें तें काम । सांडा परतें नाम दिनानाथा ॥ ४ ॥

॥ १४६५ ॥

करावा कांटाळा नव्हे हें उचित । आधींच कां प्रीत लावियेली ॥ १ ॥
जाणतसां तुह्मी रूपाचें लाघव । आपुलें तें जीव घेतें ऐसा ॥ २ ॥
काय ह्मणऊनि आलेती आकारा । आह्मां उजगरा करावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे भीड होती आजिवरी । आतां देवा उरी कोण ठेवी ॥ ४ ॥

॥ १४६६ ॥

संदेह निरसे तरि रुचिकर । फिक्यासी आदर चवी नाहीं ॥ १ ॥
आतां नको मज खोट्यानें फटवूं । कोठें येऊं जाऊं वेळोवेळां ॥ २ ॥
गेला तरि काय जीवाचें सांकडें । वांचउनि पुढें काय काज ॥ ३ ॥
तुका ह्मणे कसीं निवडा जी बरें । केलीं तैसीं पारें आळीपायीं ॥ ४ ॥

॥ १४६७ ॥

काय उणें जालें तुज समर्थासी । ऐसा मजपाशीं कोण दोष ॥ १ ॥
जो तूं माझा न करिसी अंगीकार । सांगेन वेव्हार संतांमधीं ॥ २ ॥
तुजविण रत आणिकांचे ठायीं । ऐसें कोण ग्वाही दावीं मज ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय धरुनी गुमान । सांग उगवून पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १४६८ ॥

प्रीतिभंग माझा केला पांडुरंगा । भक्तिरस सांगा कां जी तुह्मी ॥ १ ॥
ह्मणउनि कांहीं न ठेवींचि उरी । आलों वर्मावरी एकाएकीं ॥ २ ॥
न देखोंचि कांहीं परती माघारी । उरली ते उरी नाहीं मुळीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आला अंतरासी खंड । तरी माझें तोंड खवळिलें ॥ ४ ॥

॥ १४६९ ॥

आहे तेंचि आह्मीं मागों तुजपाशीं । नव्हों तुज ऐसीं क्रियानष्टें ॥ १ ॥
न बोलावीं वर्मे तोंच बरें दिसे । प्रकट ते कैसे गुण करूं ॥ २ ॥

---

१. 'नो बोला' असा कांहीं प्रतींत पाठ आहे.

एका ऐसें एका द्यावयाचा मोळा । कां तुह्मा गोपाळा नाहीं ऐसा ॥ ३ ॥
तुका ह्मणे लोकां नाहीं कळों आलें । करावें आपुलें जतन तों ॥ ४ ॥

॥ १४७० ॥

तुह्मां होईल देवा पडला विसर । आह्मीं तें उत्तर *यत्न केलें ॥ १ ॥
पतितपावन ब्रीदें मिरविसी । याचा काय देसी झाडा सांग ॥ २ ॥
आहाच मी नव्हें अर्थाचें भुकेलें । भलत्या एका बोलें वारेन त्या ॥ ३ ॥
तुका ह्मणे देह देईन सांडणें । सहित अभिमानें ओवाळूनि ॥ ४ ॥

॥ १४७१ ॥

मज ऐसें कोण उद्धरिलें सांगा । ब्रीदें पांडुरंगा बोलतसां ॥ १ ॥
हातींच्या कांकणां कासया आरसा । उरलों मी जैसा तैसा आहें ॥ २ ॥
धन्वंतरी हरी रोग्याचिये वेथे । तें तो कांहीं येथें न देखिजे ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं अनुभव अंगें । वचन वाउगें कोण मानी ॥ ४ ॥

॥ १४७२ ॥

कळों नये तोंचि चुकावितां बरें । मग पाटमोरें काय काज ॥ १ ॥
धरिलेती आतां द्या जी माझा डाव । सांपडतां भाव ऐसा आहे ॥ २ ॥
होतासी अंतरें झांकिलिया डोळीं । तो मी हा न्याहाळीं धरुनी दृष्टी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज रडीचीच खोडी । अहाच बराडी तो मी नव्हें ॥ ४ ॥

॥ १४७३ ॥

आमुचिया भावें तुज देवपण । तें कां विसरोन राहिलासी ॥ १ ॥
समर्थासी नाहीं उपकारस्मरण । दिल्या आठवण वांचोनियां ॥ २ ॥
चळण वळण सेवकाच्या बळें । निर्गुणाच्या मुळें सांभाळावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां आलों खंडावरी । प्रेम देउनि हरी बुझवावें ॥ ४ ॥

॥ १४७४ ॥

जे दोष घडले न फिटे करितां कांहीं । सरते तुझ्या पायीं जाले तैसे ॥ १ ॥
माझा कां हो करूं नये अंगीकार । जालेती निष्ठुर पांडुरंगा ॥ २ ॥

---

* यत्नें.

यातिहीन नये ऐकों ज्यां वेद । तयां दिलें पद वैकुंठींचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे कां रे एकांचा आभार । घेसी माथां भार वाहोनियां ॥४॥

॥ १४७५ ॥

ह्मणऊनी दास नव्हे ऐसा जालों । अनुभवें बोलों स्वामीपुढें ॥ १ ॥
कां नाहीं वचन प्रतिउत्तराचें । मीच माझ्या वेचें अट्टाहासें ॥ २ ॥
कासयानें गोडी उपजावा विश्वास । प्रीती कांहीं रस कांचुनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे अगा चतुरा शिरोमणी । विचारावें मनीं केशीराजा ॥ ४ ॥

॥ १४७६ ॥

नाहीं उल्लंघिलें कोणाचें वचन । मज कां नारायण दुरी जाला ॥ १ ॥
अशंकितें मनें करीं आळवण । नाहीं समाधान निश्चिंतीचें ॥ २ ॥
दासांचा विसर हें तों अनुचित । असे सर्व नीत पायांपाशीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मां लाज येत नाहीं । आह्मां चिंताडोहीं बुडवितां ॥ ४ ॥

॥ १४७७ ॥

धिग जिणें त्याचा स्वामी हीन वर । मरण तें वर भलें मग ॥ १ ॥
आइका जी देवा ऐसी आहे नीत । काय तें उचित सांभाळावें ॥ २ ॥
देशोदेशीं धाक जयाच्या उत्तरें । तयाचे कुतरें परि भलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे हें कां सुचलें उत्तर । जाणोनी अंतर ओळखावें ॥ ४ ॥

॥ १४७८ ॥

उचित तें काय जाणावें दुर्बळें । थोरिवेचें काळें तोंड देवा ॥ १ ॥
देतों हाका कोणी नाइकती द्वारीं । ओस कोणी घरीं नाहीं ऐसें ॥ २ ॥
आलिया अतीता शब्द समाधान । करितां वचन काय वेंचे ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मा साजे हें श्रीहरी । आह्मी निलाजिरीं नव्हों ऐसीं ॥ ४ ॥

॥ १४७९ ॥

जगीं मान्य केलें हा तुझा देकार । कीं कांहीं विचार आहे पुढें ॥ १ ॥
करितों कवित्व जोडितों अक्षरें । येणें काय पुरें जालें माझें ॥ २ ॥
तोंवरि हे माझी न सरे करकर । जो नव्हे विचार तुझ्या मुखें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज पुंडलिकाची आण । जरी कांहीं वचन करिसी मज ॥ ४ ॥

॥ १४८० ॥

कवतुक वाणें । बोलों बोबड्या वचनें ॥ १ ॥ हें तों नसावें अंतरीं । आह्मां धरायाचें दुरी ॥ २ ॥ स्तुति तैसी निंदा । माना समचि गोविंदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे बोलें । मज तुह्मीं शिकविलें ॥ ४ ॥

॥ १४८१ ॥

आमच्या कपाळें तुज ऐसी बुद्धि । धरावी ते शुद्धी योगा नये ॥ १ ॥
काय या राहिलें विनोदावांचून । आपुलिया भिन्न केलें आह्मां ॥ २ ॥
कोठें मूर्तिमंत दावीं पुण्यपाप । काशासी संकल्प वाहात्रिसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां आवरावा चेडा । लटिकीच पीडा पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १४८२ ॥

बहुत करूनि चाळवाचाळवी । किती तुह्मी गोवी करीतसां ॥ १ ॥
लागटपणें मी आलों येथवरी । चाड ते दुसरी न धरूनि ॥ २ ॥
दुजियाचा तंव तुह्मांसी कांटाळा । राहासी निराळा एकाएकीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां यावरी गोविंदा । मजशीं विनोदा येऊं नये ॥ ४ ॥

॥ १४८३ ॥

तुह्मी बैसलेती निर्गुणाचे खोळे । आह्मां कां हे डोळे कान दिले ॥ १ ॥
नाइकवे तुझी अपकीर्ति देवा । अव्हेरिली सेवा न देखवे ॥ २ ॥
आपुले पोटीं तों राखियेला वाव । आह्मांसी कां भाव अल्प दिला ॥ ३ ॥
तुका ह्मणे दुःखी ऐसें हें कळों द्या । पुढिलिया धंद्या मन नेघे ॥ ४ ॥

॥ १४८४ ॥

उचिताचा भाग होतो राखोनीयां । दिसती ते वांयां कष्ट गेले ॥ १ ॥
वाचनाची कांहीं राहेचि ना रुचि । खळा ऐसें वाची कुची जालें॥ २॥
विश्वासानें माझें बुडविलें घर । करविला धीर येथवरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे शेकी थार नाहीं बुड । कैसें तुह्मी कोड पुरविलें ॥ ४ ॥

॥ १४८५ ॥

ताकें कृपण तो जेवूं काय घाली । आहाच ते चालीवरुनि कळे ॥ १ ॥
काय तुह्मां वेचें घातलें सांकडें । माझें आलें कोडें आजिवरि ॥ २ ॥

सेवेविण आह्मी न लिंपों हे काया । जाला देवराया निर्धार हा ॥३॥
तुका ह्मणे तुह्मी राखावया श्रीदें । येणें अनुवादें कारियासी ॥ ४ ॥

॥ १४८६ ॥

भूत्तीवरि आह्मां येणें काशासाटीं । एवढी हे आटी सोसावया ॥ १ ॥
जाणतसां परी नेणते जी देवा । भ्रमाचि बरवा राखावा तो ॥ २ ॥
मोडुनि क्षरलों अभेदाची मूस । तुह्मां कां आळस वोडवला ॥ ३ ॥
तुका ह्मणे होई लवकरि उदार । लांबणीचें फार काम नाहीं ॥ ४ ॥

॥ १४८७ ॥

सुलभ कीर्तनें दिलें ठसावूनि । करितां धरणी उरी कोण ॥ १ ॥
आतां न टळावें केलिया नेमासी । उदाराचा होसी हीन काय ॥ २ ॥
एका नेमें कोठें दुसरा पालट । पादर तो धीट ह्मणती त्यासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे किती बोलसील उणें । एकाच वचनें खंड करीं ॥ ४ ॥

॥ १४८८ ॥

पाळिलों पोसिलों जन्म जन्मांतरीं । वागविलों करी धरोनियां ॥ १ ॥
आतां काय माझा घडेल अव्हेर । मागें बहु दूर वागविलें ॥ २ ॥
नेदी वारा अंगीं लागों अघाताचा । घेतला ठायींचा भार माथां ॥३॥
तुका ह्मणे बोल करितों आवडी । अविट तेचि गोडी अंतरींची ॥ ४ ॥

॥ १४८९ ॥

देऊनियां प्रेम मागितलें चित्त । जाली फिटाफिट तुह्मां आह्मां ॥ १ ॥
काशानें उदार तुह्मांसी ह्मणावें । एक नेसी भावें एक देसी ॥ २ ॥
देऊनियां थोडें नेसील हें फार । कुंठिसी विचार अवघियांचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां भांडवल चित्त । देउनि दुश्चित पाडियेलें ॥ ४ ॥

॥ १४९० ॥

काय तुह्मी ऐसी वेंचते गांठोळी । माझी टाळाटाळी करीतसां ॥ १ ॥
चतुरांच्या राया अहो पांडुरंगा । ऐसें तरि सांगा निवडूनि ॥ २ ॥
कोण तुह्मा सुख असे या कवतुकें । भोगितां अनेकें दुःखें आह्मी ॥३॥
तुका ह्मणे काय जालासी निर्गुण । आह्मां येथें कोण सोडवील ॥ ४ ॥

॥ १४९१ ॥
बौध्यअवतार माझिया अदृष्टा । मौन्य मुखें निष्ठा धरियेली ॥ १ ॥
लोकांचियेसाटीं शाम चतुर्भुज । संतांसवें गुज बोलतसां ॥ २ ॥
आलें कलियुग माझिया संचिता । डोळां हाकलितां न पडेसी ॥ ३ ॥
म्यांच तुझें काय केलें नारायणा । कां नये करुणा तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १४९२ ॥
तुजच पासाव जालोंसें निर्माण । असावें तें भिन्न कासयानें ॥ १ ॥
पाहावा जी ठायीं करूनि विचार । न्यून कोठें फार असेचि ना ॥ २ ॥
ठेविलिये ठायीं आज्ञेचें पाळण । करूनि जतन राहिलोंसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां बोलतसें स्पष्ट । आलों क्रियानष्ट तुह्माऐसा ॥ ४ ॥

॥ १४९३ ॥
ऐसें कां जालें तें मजही न कळे । कीर्तनाचे रळेपळे जगीं ॥ १ ॥
कैसें तुह्मां देवा वाटतसे बरें । संतांचीं उत्तरें लाजविलीं ॥ २ ॥
भाविकां कंटक करिताती पीडा । हा तंव रोकडा अनुभव ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाम निर्वाणींचा बाण । याचा अभिमान नाहीं तुह्मां ॥ ४ ॥

॥ १४९४ ॥
सांगावें तें बरें असतें हें पोटीं । दुःख देते खोटी बुद्धि मग ॥ १ ॥
आपला आपण करावा व्हेव्हार । जिंकोनि अंतर मन ग्वाही ॥ २ ॥
नाहीं मागें येत बोलिलें वचन । पाजावा तो सीण बरा मग ॥ ३ ॥
तुका ह्मणे बहु भ्यालों खटपटें । आतां देवा खोटें शब्द पुरे ॥ ४ ॥

॥ १४९५ ॥
कां हो तुह्मी माझी वदविली वाणी । नेदा हे निवडूनि पांडुरंगा ॥१॥
आणीक म्यां कोणां पुसावा विचार । समुळीं संसार दुराविला ॥२॥
स्वामिसेवा म्हूण घेतली पदरीं । सांगितलें करीं कारण तें ॥३॥
तुका ह्मणे नाहीं शिकविलें जेणें । तो याच्या वचनें उगा राहे ॥४॥

॥ १४९६ ॥
माझा तुह्मी देवा केला अंगिकार । हें मज साचार कैसें कळे ॥१॥
कां हो कांहीं माझ्या नये अनुभवा । विचारितां देवा आहे तैसा ॥२॥

लौकिकाचा मज लाविसी आभार । शिरोरत्नभार दुःखाचा हा ॥३॥
तुका ह्मणे नाहीं पालट अंतरीं । तेथें दिसे हरी ठकाठकी ॥४॥

॥ १४९७ ॥

केलें तरि आतां साचचि करावें । विचारिलें द्यावें कृपादान ॥१॥
संकल्पासी नाहीं बोलिले विकल्प । तुह्मां पुण्यपाप कळे देवा ॥२॥
उदार शक्ति तंव तुमची भूमंडळीं । ऐसी ब्रीदावळी गर्जतसे ॥३॥
तुका ह्मणे अहो रखुमादेवीवरा । उपरोध कां धरा माझा आतां ॥४॥

॥ १४९८ ॥

माझी मज जाती आवरली देवा । नव्हतां या गोवा इंद्रियांचा ॥१॥
कासया मी तुझा ह्मणवितों दास । असतों उदास सर्व भावें ॥२॥
भयाचिये भेणें धरियली कास । न पुरतां आस काय थोरी ॥३॥
तुका ह्मणे आपआपुली जतन । कैचें थोरपण मग तुह्मां ॥४॥

॥ १४९९ ॥

निर्दयासी तुह्मी करितां दंडण । तुमचें गाऱ्हाणें कोठें द्यावें ॥१॥
भाकितों करुणा ऐकती कान । उगलेंचि मौन्य धरिलें ऐसें ॥२॥
दीनपणें पाहें पाय भिडावोनि । मंजुळा वचनीं विनवीतसें ॥३॥
तुका ह्मणे गांठी मनाची उकला । काय जी विठ्ठला पाहातसां ॥४॥

॥ १५०० ॥

आमुचें ठाउकें तुह्मां गर्भवास । बळिवंत दोष केले भोग ॥१॥
काय हा सांगावा नसतां नवलाव । मैंदपणें भाव भुलवणेचा ॥२॥
एका पळवूनि एका पाठी लावा । कवतुक देवा पाहावया ॥३॥
तुका ह्मणे ज्याणें असें चेतविलें । त्याऱ्यानें उगलें कैसें नव्हे ॥४॥

॥ १५०१ ॥

द्या जी माझा विचारोनियां विभाग । न खंडे हा लाग आहाचपणें ॥१॥
किती नेणों तुह्मां साहाते कटकट । आह्मीच वाईट निवडलों ते ॥२॥
करितां कलह जिवाचियेसाटीं । हे तुह्मां वोखटीं ढाळ देवा ॥३॥
तुका ह्मणे भीर कारण आपुला । तुह्मी तों विठ्ठला मायावीत ॥४॥

॥ १५०२ ॥

आलिया अंतीता ह्मणतसां पुढारें । आपुलें रोकडें सत्त्व जाय ॥१॥
काय त्याचा भार घेऊनि मस्तकीं । हीनकर्मी लोकीं ह्मणावया ॥२॥
दारीं हाका कैसें करवतें भोजन । रुचा तरि अन्न कैसें देतें ॥३॥
तुका ह्मणे ध्वज उभारिला कर । ते शक्ति उदार काय जाली ॥४॥

॥ १५०३ ॥

येणें जाला तुमचे पोतडीचा झाडा । केलासी उघडा पांडुरंग ॥ १ ॥
भरूनियां घरीं राहिलों वाखतीं । आपुली निश्चिंती आपल्यापें ॥ २ ॥
आतां काय उरी उरली ते सांगा । आणिलेति जगाचिये साक्षी ॥३॥
तुका ह्मणे कोंठें पाहों जासी आतां । माझी जाली सत्ता तुह्मांवरी ॥४॥

॥ १५०४ ॥

नाहीं भ्यालों तरी पावलों या ठाया । तुह्मां आळवाया जवळिकें ॥ १ ॥
सत्ताबळें आतां मागेन भोजन । केलें तें चिंतन आजिवरी ॥ २ ॥
नवनीतासाटीं खादला हा जीव । थोड्यासाटीं कीव कोण करी ॥ ३ ॥
तुका ह्मणे ताक नलगे हें घाटे । पांडुरंगा खोटें चाळवण ॥ ४ ॥

॥ १५०५ ॥

हरि तूं निष्ठुर निर्गुण । नाहीं माया बहु कठिण । नव्हे तें क-रिसी आन । कवणें नाहीं केलें तें ॥ १ ॥ घेऊनि हरिश्चंद्राचें वैभव । राज्य घोडे भाग्य सर्व । पुत्र पत्नी जीव । डोंबाघरीं वोपाविलीं ॥२॥ नळा दमयंतीचा योग । विघडिला त्यांचा संग । ऐसें जाणे जग । पुराणेंही बोलती ॥ ३ ॥ राजा शिबी चक्रवर्ती । कृपाळु दयाळु भूतीं । तुळविलें अंतीं । तुळें मास तयाचें ॥ ४ ॥ कर्ण भिडतां सम-रंगणीं । बाणीं व्यापियेला रणीं । मागसी पाडोनी । तेथें दांत तयाचे ॥ ॥५॥ बळी सर्वस्वें उदार । जेणें उभारिला कर । करुनि काहार । तो पा-ताळीं घातला ॥ ६ ॥ श्रियाळाच्या घरीं । धरणें मांडिलें मुरारी । मार-विलें करीं । त्याचें बाळ त्या हातीं ॥ ७ ॥ तुज भावें जे भजती । त्यांच्या संसारा हे गति । ठाव नाहीं पुढती । तुका ह्मणे करिसी तें ॥ ८ ॥

॥ १५०६ ॥

आह्मी भाव जाणों देवा । न कळती तुझिया भावा । गणिकेचा कुढावा । पतना न्यावा दशरथ ॥ १ ॥ तरी म्यां काय गा करावें । कोण्या रीती तुज पावें । न संगतां ठावें । तुह्मांविण न पडे ॥ २ ॥ दोन फाकलिया वाटा । गोवी केली घटापटा । नव्हे धीर फांटा । आड रानें भरती ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझे डोळे । तुझे देखती हे चाळे । आतां येणें वेळे । चरण जीवें न सोडीं ॥ ४ ॥

॥ १५०७ ॥

दुर्बळाचें कोण । ऐके घालुनियां मन । राहिलें कारण । तयावांचूनि काय तें ॥१॥ कळों आलें अनुभवें । पांडुरंगा माझ्या जीवें । न सांगतां ठावें । पडे चर्या देखोनि ॥२॥ काम क्रोध माझा देहीं । भेदाभेद गेले नाहीं । होतें तेथें कांहीं । तुज कृपा करितां ॥३॥ हें तों नव्हे उचित । नुपेक्षावें शरणागत । तुका ह्मणे रीत । तुमची आह्मां न कळे ॥४॥

॥ १५०८ ॥

आह्मी शक्तिहीनें । कैसें कराल तें नेणें । लिगाडाच्या गुणें । खोळंबला राहिलों ॥ १ ॥ माझें मज देईं देवा । असे ठेविला तो ठेवा । नाहीं करीत हेवा । कांहीं अधीक आगळा ॥२॥ नाहीं गळां पडलों झोंड । तुमचें तेंचि माझें तोंड । चौघां चार खंड । लांबणी हे अनुचित॥३॥ नाहीं येत बळा । आतां तुह्मासी गोपाळा । तुका ह्मणे गळा । उगवा पायां लागतों ॥ ४ ॥

॥ १५०९ ॥

कांहो वाढवितां देवा । मज घरीं समजावा । केवढा हो गोवा । फार केलें थोड्याचें ॥ १ ॥ ठेवीन पायांवरी डोई । यासी तुमचें वेचे काई । जालों उतराई । जाणा एकएकांचे ॥ २ ॥ निवाड आपणियांपाशीं । असोन कां व्हावें अपेसी । होती गांठी तैसी । सोडूनियां ठेविली ॥ ३ ॥ तुका ह्मणे गोड । होतें जालिया निवाड । दर्शनेंही चाड । आवडीच वाढेल ॥ ४ ॥

॥ १५१० ॥

जवळों अंगाअंगीं । मग ठेवीं प्रसंगीं । कांहीं उरीजोगी । लोकीं आहे पुरती ॥ १ ॥ ठेवीं निवारुनि आधीं । अवकाश तोचि बुद्धी । सांपडली संधी । मग बळ कोणासी ॥२॥ गळा बांधीन पायीं । हालों नेदीं ठायिंचा ठायीं । निवाड तो तई । अवकळा केलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठावे । तुह्मी असा जी बरवे । बोभाटाची सवे । मुळींहुनी विठोबा॥४॥

॥ १५११ ॥

वेरझारीं जाला सीण । बहु केलें खेदक्षीण । भांडणासी दिन । आजी येथें फावला ॥ १ ॥ आतां काय भीड भार । धरूनियां लोकाचार । बुडवूनि वेव्हार । सरोबरी करावी ॥ २ ॥ आलें बहुतांच्या मना । कां रे न होसी शाहाणा । मुळींच्या वचना । आह्मी जागों आपुल्या॥ ॥ ३ ॥ तुका ह्मणे चौघांमधीं । तुज नेलें होतें आधीं । आतां नाहीं मधीं । उरी कांहीं राहिली ॥ ४ ॥

॥ १५१२ ॥

पाहा किती आले । शरण समानाचि केले । नाहीं विचारिले । गुणदोष कोणांचे ॥ १ ॥ मज सेवटींसा द्यावा । ठाव तयांचिये देवा । नाहीं करीत हेवा । कांहीं थोरपणाचा ॥ २ ॥ नाहीं पाहिला आचार । कुळगोत्रांचा विचार । फेडूं आला भार । मग न ह्मणे दगड ॥ ३ ॥ तुका ह्मणे सर्व जाणा । तुझ्या आल्यावरि मना । केला तो उगाणा । घडल्या महादोषांचा ॥ ४ ॥

॥ १५१३ ॥

प्रीतीचा कल्हे पद्रासी घाली पीळ । सरों नेदी बाळ मागें पुढें पित्यासी ॥ १ ॥ काय लागे त्यासी बळ हेडावितां कोण काळ । गोवितें सबळ जाळीं स्नेहसूत्राचीं ॥ २ ॥ सलगी दिला लाड बोले तें तें वाटे गोड । करी बुझावोनि कोड हातीं देऊनि भातुकें ॥ ३ ॥ तुका ह्मणे बोल कोणा हें कां नेणां नारायणा । सलगीच्या वचना कैचें उपजे विषम ॥ ४ ॥

॥ १५१४ ॥

अनुभव तो नाहीं आमुचिया दर्शनें । अइकिलें कानें वदे वाणी । जेविल्याचा कैसा अनुभव अंतरीं । ह्मणतां मांडे पुरी काय होतें ॥ १ ॥ नाहीं नाहीं गेली तळमळ दातारा । कां जी हरिहरा चाळविलें ॥२॥ पत्रीं कुशळता भेटी अनादर। काय तें उत्तर येइल मानूं। अंतरीं सबाह्यीं कां नाहीं सारिखें। धरूनि पारिखें वर्ततसां ॥ ३ ॥ आलों आलों ऐसी दाऊनियां आस। वाहों वुडतयास काय द्यावें। तुका ह्मणे अहो चतुरा शिरोमणि । किती माझी वाणी तुह्मी कोठें ॥ ४ ॥

॥ १५१५ ॥

अमर तूं खरा । नव्हे कैसा मी दातारा ॥ १ ॥ चाल जाऊं संतांपुढें । वाद सांगेन निवाडें ॥ २ ॥ तुज नांव जर नाहीं । तर माझें दाव काई ॥ ३ ॥ तुज रूप नाहीं । तर माझें दाव काई ॥ ४ ॥ खेळसी तूं लीळा । तेथें मी काय वेगळा ॥ ५ ॥ साच तूं लटिका । तैसा मीहीं ह्मणे तुका ॥ ६ ॥

॥ १५१६ ॥

आतां बरें वरिच्याघरीं । आपली उरी आपणापें ॥ १ ॥ वाइट बरें न पडे दृष्टी । मग कष्टी होइजेना ॥ २ ॥ बोलों जातां वाढे बोल । वांयां फोल खटपट ॥ ३ ॥ काकुलती यावें देवा । तो तों सेवा इच्छितो ॥ ४ ॥ हिशोबाचे खटखटे । चढे तुटे घडेना ॥ ५ ॥ तुका ह्मणे कळों आलें । दुसरें भलें तों नव्हे ॥ ६ ॥

॥ १५१७ ॥

दावूनियां कोणां कांहीं । तोचि वाहीं चाळविलीं ॥ १ ॥ तैसें नको करूं देवा । शुद्धभावा माझिया ॥ २ ॥ रिद्धिसिद्धी ऐसीं आड । येती नाड नागवूं ॥ ३ ॥ उदकाऐसीं दावुनि ओढी । उर फोडी झळई ॥ ४ ॥ दर्पणींचें दिलें धन । दिसे पण चरफड ॥ ५ ॥ तुका ह्मणे पायांसाटीं । करीं आटी कळों द्या ॥ ६ ॥

॥ १५१८ ॥

जालों द्वारपाळ । तुझें राखिलें सकळ ॥१॥ नाहीं लागों दिलें अंगा। आड ठाकलों मी जगा ॥२॥ करूनियां नीती । दिल्याप्रमाणें चालती ॥३॥ हातीं दंड काठी। उभा जिवाजिये साटीं ॥४॥ बळ बुद्धी युक्ती । तुज दिल्या सर्व शक्ती ॥५॥ तुका ह्मणे खरा। आतां घेईन मुशारा ॥६॥

॥ १५१९ ॥

आण काय सादर । विशीं आह्मां कां निष्ठुर ॥ १ ॥ केलें भक्त तैसें देईं । तुझें प्रेम माझ्याठायीं ॥ २ ॥ काय पंगतीस कोंडा । एकांतासी साकरमांडा ॥ ३ ॥ काय एकपण । पोतां घालूनि गांठी खूण ॥ ४ ॥ काय द्यावें ऐसें । तया आपण अनारिसें ॥ ५ ॥ तुका ह्मणे मधीं । आतां तोडूं भेद बुद्धी ॥ ६ ॥

॥ १५२० ॥

भक्तिऋण घेतलें माझें । चरण गाहाण आहेत तुझे ॥ १ ॥ प्रेमव्याज देईं हरी । माझा हिशेब लवकरी करीं ॥ २ ॥ माझें मी न सोडीं धन । नित्य करितों कीर्तन ॥ ३ ॥ तुझे नामीं आहे खत । सुखें करीं पंचाईत ॥ ४ ॥ तुका ह्मणे गरुडध्वजा । यासी साक्ष श्रीगुरुराजा ॥ ५ ॥

॥ १५२१ ॥

नाहीं देणें घेणें । गोवी केली अभिमानें ॥१॥ आतां कां हो निवडूं नेदां। पांडुरंगा येवढा धंदा ॥२॥ पांचांमधीं जावें। थोड्यासाटीं फजित व्हावें ॥ ३ ॥ तुज ऐसीं नाहीं। पांडुरंगा आह्मी कांहीं ॥ ४ ॥ टाकूं तो वेव्हार । तुज बहु करकर ॥ ५ ॥ तुका ह्मणे आतां । निवडूं संतां देखतां ॥ ६ ॥

॥ १५२२ ॥

चित्त तुझ्या पायीं । ठेवुनि जालों उतराई ॥ १ ॥ परि तूं खोटा केशीराजा । अंतपार न कळे तुझा ॥ २ ॥ आह्मी सर्वस्वें उदार । तुज देऊनियां धीर ॥ ३ ॥ इंद्रियांची होळी । संवसार दिला बळी ॥ ४ ॥ न पडे विसर । तुझा आह्मां निरंतर ॥ ५ ॥ प्रेम एकासाटीं । तुका ह्मणे न वेचे गांठीं ॥ ६ ॥

॥ १५२३ ॥

देवा तुज मज पण । पाहों आगळा तो कोण ॥ १ ॥ तरी साच मी पतित । तूंच खोटा दिनानाथ ॥ २ ॥ ग्वाही साधुसंत जन । करूनि अंगीं लावीन ॥ ३ ॥ आह्मी धरिले भेदाभेद । तुज नव्हे त्याचा छेद ॥ ४ ॥ न चले तुझें कांहीं त्यास । आह्मी बळकाविले दोष ॥ ५ ॥ दिशा भरल्या माझ्या मनें । लपालासी त्याच्या भेणें ॥ ६ ॥ तुका ह्मणे चित्त । करी तुझी माझी नीत ॥ ७ ॥

॥ १५२४ ॥

बैसलोंसें दारीं । धरणें कोंडोनि भिकारी ॥ १ ॥ आतां कोठें हालों नेदीं । बरी सांपडली संदी ॥ २ ॥ किती वेरझारा । मागें घातलिया घरा ॥ ३ ॥ माझें मज नारायणा । देतां कां रे नये मना ॥ ४ ॥ भांडावें तें किती । बहु सोसिली फजिती ॥ ५ ॥ तुका ह्मणे नाहीं । लाज तुझे अंगीं कांहीं ॥ ६ ॥

॥ १५२५ ॥

संसाराच्या भेणें । पळों न लाहेसें केलें ॥ १ ॥ जेथे तेथें आपण आहे । आह्मी करावें तें काये ॥ २ ॥ एकांतींसी ठाव । तिहीं लोकीं नाहीं वाव ॥ ३ ॥ गावा जातों ऐसें । नलगे ह्मणावें तें कैसें ॥ ४ ॥ स्वप्नाचे परी । जागा पाहे तंव घरीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे काये । तुझें घेतलें म्यां आहे ॥ ६ ॥

॥ १५२६ ॥

तुझा भरवसा आह्मां । फार होता पुरुषोत्तमा ॥ १ ॥ भवसागर संकटीं । तारिशील जगजेठी ॥२॥ नाम आदित्याचें झाड । त्याचा न पडे उजेड ॥ ३ ॥ सिलंगणींचें सोनें । त्यासी गाहाण ठेवी कोण ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवा । ब्रीद सोडुनियां ठेवा ॥ ५ ॥

॥ १५२७ ॥

माझीं मेलीं बहुवरि । तूं कां जैसा तैसा हरी ॥ १ ॥ विठो कैसा वांचलासि । आतां सांग मजपाशीं ॥ २ ॥ तुज देखतांचि माझा ।

बाप गेला आजा पणजा ॥ ३ ॥ आह्मां लागलेंसे पाठी । बालत्व तारुण्य काठी ॥ ४ ॥ तुज फावलें तें मागें । कोणी नसतां वादिलागें ॥ ५ ॥ तुका ह्मणे तुझ्या अंगीं । मज देखिल लागलीं अवघीं ॥ ६ ॥

॥ १५२८ ॥

केला पण सांडी । ऐसीयासी ह्मणती लंडी ॥ १ ॥ आतां पाहा विचारून । समर्थासी बोले कोण ॥ २ ॥ आपला निवाड । आपणचि करितां गोड ॥ ३ ॥ तुह्मी आह्मी देवा । बोलिला बोल सिद्धी न्यावा ॥ ४ ॥ असे धुरे उणें । मागें सरे तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ १५२९ ॥

आह्मां गांजी जन । तरि कां मेला नारायण ॥ १ ॥ जालों पोरटीं निढळें । ठाव नाहीं बुड आळें ॥ २ ॥ आह्मीं जना भ्यावें । तरि कां न लाजिजे देवें ॥ ३ ॥ तुका ह्मणे देश । जाला देवाविण ओस ॥ ४ ॥

॥ १५३० ॥

न व्हावें तें जालें । तुह्मां आह्मांसी लागलें ॥ १ ॥ आतां हालमाकलमें । भांडोनियां काढूं वर्मे ॥ २ ॥ पाटोळ्यासवें साटी । दिली रगट्याची गांठी ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरी । आणूनियां करिन सरी ॥ ४ ॥

॥ १५३१ ॥

आपुले वरदळ नेदा । एवढी गोविंदा कृपणता ॥ १ ॥ यावर बा तुमचा मोळा । हा गोपाळा कळेना ॥ २ ॥ सेवा तरी घेतां सांग । चोरिलें अंग साहावेना ॥ ३ ॥ तुका जरी क्रियानष्ट । तरी कां कष्ट घेतसां ॥ ४ ॥

॥ १५३२ ॥

आळणी ऐसें कळों आलें । त्यासीं भलें मौनचि ॥ १ ॥ नये कांहीं वेचूं वाणी । वेडे घाणीसांगातें ॥ २ ॥ वेगळें देहभावा । भ्रम जीवा माजिरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे कवतुक केलें । किंवा भलें दवडितां ॥ ४ ॥

॥ १५३३ ॥

लटिका ऐसा ह्मणतां देव । संदेहसा वाटतमे ॥ १ ॥ ऐसें आलें अनुभवा । मजही सेवा करितां ॥ २ ॥ शून्याकारी बहु मोळा । भेंडोळ हे पवाडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे ताळी नाहीं । एके ठायीं चपळत्वें ॥ ४ ॥

॥ १५३४ ॥

जैशासाटीं तैसें व्हावें । हें बरवें कळलेंसे ॥१॥ उदास तूं नारायणा। मीही ह्मणा तुह्मीच ॥ २ ॥ ठका महाठक जोडा । जो धडफुडा लागासी ॥ ३ ॥ एकांगीच भांडे तुका । नाहीं धोका जीवित्वें ॥ ४ ॥

॥ १५३५ ॥

आपुलें मागतां । काय नाहीं आह्मां सत्ता ॥ १ ॥ परि या लौकिकाकारणें । उरीं ठेविलें बोलणें ॥ २ ॥ येचि आतां घडी । करूं बैसों तेचि फडी ॥३॥ तुका ह्मणे करितों तुला । ठाव नाहींसें विठ्ठला ॥४॥

॥ १५३६ ॥

तुजशीं संबंधचि खोटा । परता परता रे थोटा ॥१॥ देवा तुझें काय घ्यावें । आप आपणां ठकावें ॥ २ ॥ जेथें मुद्दल न ये हातां । व्याज मरावें लेखितां ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसा । त्रिभुवनीं तुझा ठसा ॥ ४ ॥

॥ १५३७ ॥

मागतां विभाग । कोठें लपाल जी मग ॥१॥ संग साक्षी या वचना त्यांसी ठाउकिया खुणा ॥ २ ॥ होईन धरणेकरी । मग मी रिघों नेदीं बाहेरी ॥३॥ तुका ह्मणे मी अक्षर । तुज देवपणाचा भार ॥४॥

॥ १५३८ ॥

बहु होता भला । परि ये गांडेनें नासिला ॥ १ ॥ बहु शिकला रंग चाळे। खरें खोटें इचे वेळे ॥२॥ नव्हतें आळवितें कोणी। इनें केला जगऋणी ॥३॥ ज्याचे त्यासी नेदी देऊं। तुका ह्मणे धांवे खाऊं॥४॥

॥ १५३९ ॥

मज संतांचा आधार। तूं एकलें निर्विकार ॥ १ ॥ पाहा विचारूनि देवा। नको आह्मांसवें दावा ॥ २ ॥ तुज बोल न बोलवे। आह्मां भांडायाची सवे ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरी । ऐक्यभाव[1] उरे उरी ॥ ४ ॥

॥ १५४० ॥

आह्मीं याची केली सांडी । कोठें तोंडीं लागावें ॥ १ ॥ आहे तैसा

---

१. ' ऐक्यभावें उरे उरीं ' असा कांहीं प्रतींत पाठ आहे.

असो आतां । चिंतें चिंता वाढते ॥२॥ बोलिल्याचा मानी सीण । भिन्न भिन्न राहावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मांपाशीं । धीराऐसी जतन ॥४॥

॥ १५४१ ॥

धोंड्यासवें आदळितां फुटे डोकें । तो तों त्याच्या दुःखें घामेजेना॥१॥ इंगळासी सन्निधान अतिल्याई । क्षेम देतां काई सुख वाटे ॥२॥ तुका ह्मणे आह्मांसवें जी रुसला । तयाचा अबोला आकाशासीं ॥ ३ ॥

॥ १५४२ ॥

मजशीं पुरें न पडे वादें । सुख दोहींच्या संवादें ॥ १ ॥ तूंचि आगळा काशानें । शिर काय पायांविणे ॥ २ ॥ वाहों तुझा भार । दुःख साहोनि अपार ॥३॥ तुका ह्मणे नाहीं भेद । देवा करूं नये वाद ॥ ४ ॥

॥ १५४३ ॥

केली सलगी तोंडपिटी । आह्मी लडिवाळें धाकुटी ॥ १ ॥ न बोलावें तेंचि आलें । देवा पाहिजे साहिलें ॥२॥ अवघ्यामध्यें एक वेडें । तेंचि खेळविती कोडें ॥३॥ तुका ह्मणे मायबापा । मजवरी कोपों नका ॥ ४ ॥

॥ १५४४ ॥

आतां न करीं सोस । सेवीन हा ब्रह्मरस ॥१॥ सुखें[1] सेवीन अमृत । ब्रह्मपदींचें निश्चित ॥ २ ॥ तुमचा निज ठेवा । आह्मी पाडियेला ठावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवराया । आतां लपालेती वांयां ॥ ४ ॥

॥ १५४५ ॥

नेघें तुझें नाम । न करीं सांगितलें काम ॥ १ ॥ वाढे वचनें वचन । दोष उच्चारितां गुण ॥ २ ॥ आतां तुझ्या घरा । कोण करी येरझारा ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठायीं । मजपाशीं काय नाहीं ॥ ४ ॥

॥ १५४६ ॥

नाहीं खंड जाला । माझा तुमचा विठ्ठला ॥ १ ॥ कैसें कैसें हो दुश्चित्त । आहे चौघांपाशीं नीत ॥ २ ॥ मुळींचें लिहिलें । मज आतां सांपडलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज । नलगे बोलणें सहज ॥ ४ ॥

---

१. आह्मां लक्षण अमृत.

॥ १५४७ ॥

ठाव नाहीं बुड । घरें वसविलीं कुड ॥ १ ॥ भलते ठायीं तुझा वास । सदा एरवी उदास ॥ २ ॥ जागा ना निजेला । धाला ना भुकेला ॥ ॥ ३ ॥ न पुसतां भलें । तुका ह्मणे बुझें बोलें ॥ ४ ॥

॥ १५४८ ॥

ऐसाचि तो गोवा । न पाहिजे केला देवा ॥ १ ॥ बहू आली दुरिवरी । ओदत हे भरोवरी ॥ २ ॥ आह्मांसी न कळे । तुह्मी झाकूं नये डोळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे संगें । असों एक एका अंगें ॥ ४ ॥

॥ १५४९ ॥

मागतियाचे दोनिच कर । अमित भांडार दातियाचें ॥ १ ॥ काय करूं आतां कासयांत भरूं । हा मज विचारु पडियेला ॥ २ ॥ एकें सांटवणें प्रेमें वोसंडलीं । जिव्हा हे भागली करितां माप ॥३॥ तुका ह्मणे आतां आहे तेथें असो । अंखुनियां बैसों पायांपाशीं ॥ ४ ॥

॥ १५५० ॥

माझे लेखीं देव मेला । असो त्याला असेल ॥१॥ गोष्टी न करीं नांव नेघें । गेलों दोघें खंडोनी ॥ २ ॥ स्तुतिसमवेत निंदा । केला धंदा उदंड ॥ ३ ॥ तुका ह्मणे निवांत ठेलों । वेचित आलों जीवित्व ॥ ४ ॥

॥ १५५१ ॥

दारीं परोवरी । कुडीं कवाडीं मी घरीं ॥ १ ॥ तुमच्या लागलों पोषणा । अवघे ठायीं नारायणा ॥ २ ॥ नेदी खावूं जेवूं । हातींतोंडींचेंही घेऊं ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंगीं । जडलों ठायींचा सलगी ॥ ४ ॥

॥ १५५२ ॥

नव्हों आह्मी आजिकालींचीं । काचीं कुचीं चाळवणी ॥ १ ॥ एके ठायीं मूळडाळ । ठावा सकळ आहेसी ॥२॥ तुमचें आमचें कांहीं । भिन्न नाहीं वांटलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जेथें असें । तेथें दिसें तुमचासा ॥४॥

॥ १५५३ ॥

भुके नाहीं अन्न । मेल्यावरी पिंडदान ॥ १ ॥ हे तों चाळवाचाळवी ।

केलें आपणचि जेवी ॥ २ ॥ नैवेद्याचा आळ । वेच ठाकणीं सकळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे जड । मज न राखावें दगड ॥ ४ ॥

॥ १५५४ ॥

होईल तरी पुसापुसी । उत्तर त्यासी योजावें ॥ १ ॥ तोंवरि मी पुढें कांहीं । आपुलें नाहीं घालीत ॥ २ ॥ जाणोनियां अंतर देव । जेव्हां भेव फेडील ॥३॥ तुका ह्मणे धरिला हातीं । करील खंती वेगळें ॥४॥

॥ १५५५ ॥

असो आतां किती । तुज यावें काकुलती ॥ १ ॥ माझें प्रारब्ध हे गाढें । तूं बापुडें तयापुढें ॥ २ ॥ सोडवीन आतां । आधीं तुह्मीं पंढरीनाथा ॥ ३ ॥ तुका ह्मणे बळी । तो गांढ्याचे कान पिळी ॥ ४ ॥

॥ १५५६ ॥

आह्मी तुझ्या दासीं । जरि जावें पतनासी ॥ १ ॥ तरि हें दिसे विपरीत । कोठें बोलिली हे नीत ॥ २ ॥ तुझें नाम कंठीं । आह्मां संसार आटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे काळ । करी आह्मांसी विटाळ ॥ ४ ॥

॥ १५५७ ॥

लाजती पुराणें । वेदां येऊं पाहे उणें ॥ १ ॥ आह्मी नामाचे धारक । किविलवाणीं दिसों रंक ॥ २ ॥ बोलिले ते संतीं । बोल वांयांविण जाती ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । रोकडी हे मोडे सेवा ॥ ४ ॥

॥ १५५८ ॥

शोकवावा म्यां देहे । ऐसें नेणों पोटीं आहे ॥ १ ॥ तरीच नेदा जी उत्तर । दुःखी राखिलें अंतर ॥ २ ॥ जावें वनांतरा । येणें उद्देशें दातारा ॥ ३ ॥ तुका ह्मणे गिरी । मज सेववावी दरी ॥ ४ ॥

॥ १५५९ ॥

कां हो आलें नेणों भागा । पांडुरंगा माझिया ॥ १ ॥ उफराटी तुह्मां चाली । क्रिया गेली सत्याची ॥ २ ॥ साक्षी हेंगे माझें मन । आतां कोण होतें तें ॥३॥ तुका ह्मणे समर्थपणें । काय नेणें करीतसां ॥४॥

॥ १५६० ॥

तुह्मी कांटाळलां तरी । आह्मां न सोडणें हरी ॥ १ ॥ जावें कवणिया ठाया । सांगा विनवितों पाया ॥२॥ केली जिवा साटी । आतां सुखें लागा पाठी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठाव । न सोडणें हाचि भाव ॥ ४ ॥

॥ १५६१ ॥

आह्मी पतित[1] तूं पावन । हें तों पूर्वापार[2] जाण ॥ १ ॥ नवें करूं नये जुनें । सांभाळावें ज्याचें तेणें ॥ २ ॥ मिरासीचा[3] ठाव । राखा करूनि उपाव ॥ ३ ॥ वाटे मारी हाका । देवा आइकवी तुका ॥ ४ ॥

॥ १५६२ ॥

तुह्मांसी हें अवघें ठावें । किती द्यावें स्मरण ॥१॥ कां बा तुह्मी ऐसें नेणें । निष्ठुरपणें टाळित असां ॥ २ ॥ आळवितां मायबापा । नये कृपा अझूनि ॥३॥ तुका ह्मणे जगदीशा । काय असां निजेले ॥ ४ ॥

॥ १५६३ ॥

आतां चक्रधरा । झणीं आह्मांस अव्हेरा ॥ १ ॥ तुमचीं ह्मणविल्यावरी । जैसीं तैसीं तरी हरी ॥ २ ॥ काळ आह्मां खाय । तरी तुह्में नांव जाय ॥३॥ तुका ह्मणे देवा । आतां पण सिद्धी न्यावा ॥ ४ ॥

॥ १५६४ ॥

काय करूं कर्माकर्म । बरें सांपडलें वर्म ॥ १ ॥ होसी नामाच सारिखा । समजाविली नाहीं लेखा ॥ २ ॥ नाहीं वेचावेच जाला । उरला आहेसी संचला ॥३॥ तुका ह्मणे माझें । काय होईल तुह्मां ओझें ॥ ४ ॥

॥ १५६५ ॥

कैवल्याच्या तुह्मां घरीं । रासी हरी उदंड ॥ १ ॥ मजसाठीं कां जी वाणी । नव्हे धणी विभागा ॥ २ ॥ सर्वां गुणीं सपुरता । ऐसा पिता असोनी ॥ ३ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । जालों सांगा सन्मुख ॥ ४ ॥

॥ १५६६ ॥

काय करावें तें आतां । जालें नयेसें बोलतां ॥ १ ॥ नाहीं दोघांचिये

1. पापी. 2. पूर्वापर. 3. राखावा तो ठाव । मिरासी करोनि उपाव ॥

हातीं । गांठी घालावी एकांतीं ॥ २ ॥ होय आपुलें काज । तों हे भीड सांडूं लाज ॥३॥ तुका ह्मणे देवा । आधीं निवडूं हा गोवा ॥४॥

॥ १५६७ ॥

कृपेचा ओलावा । दिसे वेगळाचि देवा ॥ १ ॥ मी हें इच्छीतसें साचें । न लगे फुकटशाई काचें ॥ २ ॥ जेणें जाय कळसा । पाया उत्तम तो तैसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे घरीं । तुझ्या अवघिया परी ॥ ४ ॥

॥ १५६८ ॥

करिसी[1] लाघवें । तूं हें खेळसी आघवें[2] ॥ १ ॥ केला अहंकार आड । आह्मां जगासी हा नाड ॥ २ ॥ येथें[3] भुतें यावें । दावूं लपोंही जाणावें ॥३॥ तुका ह्मणे हो श्रीपती । आतां चाळवाल किती ॥ ४ ॥

॥ १५६९ ॥

नाहीं मागितला । तुह्मां मान म्यां विठ्ठला ॥ १ ॥ जे हे करविली फजिती । माझी एवढी जना हातीं ॥ २ ॥ नाहीं केला पोटें[4] । पुढें घालूनि बोभाट ॥३॥ तुका ह्मणे धरूनि हात । नाहीं नेलें दिवाणांत ॥४॥

॥ १५७० ॥

कां जी वाढविलें । न लगतां हें उगलें ॥१॥ आतां मानितां कां टाळा । भोंवतीं मिळालिया बाळा ॥२॥ लावूनियां सवे । पळतां दिसाल बरवे ॥३॥ तुका ह्मणे बापा । येतां न कळाचि रूपा ॥४॥

॥ १५७१ ॥

मज नाहीं धीर । तुह्मी न करा अंगीकार ॥१॥ ऐसें पडिलें विषम । बळी देवाहूनि कर्म ॥ २ ॥ चालों नेणें वाट । केल्या न पवे बोभाट ॥३॥ वेचों नेणे जीवें । तुका उदास धरिला देवें ॥४॥

॥ १५७२ ॥

अंतरीचें जाणां । तरि कां येऊं दिलें मना ॥ १ ॥ तुमची करावी म्यां सेवा । आतां अव्हेरितां देवा ॥ २ ॥ नव्हती मोडामोडी । केली मागें तेचि घडी ॥३॥ तुका ह्मणे दिला वाव । पायीं लागों दिला भाव ॥४॥

---

१ दाविसी. २ अवघें. ३ इत्थंभूत. ४ पोट. ५ बोभाटे.

॥ १५७३ ॥

रायाचें सेवक । सेटीचें पीडी रंक ॥ १ ॥ हा तों हिणाव कवणा । कां हो सेणां नारायणा ॥२॥ परिसेंसी भेटी । नव्हे लोहोपणा तुटी ॥३॥ तुझें नाम कंठीं । तुक्या काळासवें भेटी ॥४॥

॥ १५७४ ॥

विष्णुदासां भोग । जरी आह्मां पीडी रोग ॥ १ ॥ तरि हें दिसे लाजिरवाणें । काय तुह्मांसी सांगणें ॥२॥ आह्मां काळें खावें । बोलिलें तें वांयां जावें ॥३॥ तुका ह्मणे दास । आह्मी भोगूं गर्भवास ॥४॥

॥ १५७५ ॥

तुह्मां न पडे वेच । माझा सरेल संकोच ॥ १ ॥ फुकासाटीं जोडे यश । येथें कां करा आळस ॥२॥ कृपेचें भुकेलें । होय जीवदान केलें ॥३॥ तुका ह्मणे शिकविलें । माझें ऐकावें विठ्ठलें ॥४॥

॥ १५७६ ॥

जैसीं तैसीं तरी । शरणागतें तुझीं हरी ॥ १ ॥ आतां न पाहिजे केलें । ब्रीद् लटिकें आपुलें ॥ २ ॥ शुद्ध नाहीं चित्त । परी ह्मणवितों भक्त ॥ ३ ॥ मज कोण पुसे रंका । नाम सांगे तुझें तुका ॥ ४ ॥

॥ १५७७ ॥

समर्थाचें बाळ किविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा ॥ १ ॥
अवगुणी जरी जालें तें वोंगळ । करावा संभाळ लागे त्याचा ॥ २ ॥
तुका ह्मणे तैसा मी एक पतित । परी मुद्रांकित जालों तुझा ॥ ३ ॥

॥ १५७८ ॥

आणिलें सेवटा । आतां कामा नये फांटा ॥१॥ मज आपुलेंसें ह्मणा । उपरि या नारायणा ॥ २ ॥ वेचियेली वाणी । युक्ती अवघी चरणीं ॥ ३ ॥ तुका धरी पाय । क्षमा करवूनि अन्याय ॥ ४ ॥

॥ १५७९ ॥

सातां पांचा तरीं वचनां सेवटीं । निरोप कां भेटी एक तरी ॥ १ ॥
कां नेणें निष्ठुर केलें नारायणा । न देखें हें मना येतां कांहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसा न देखें निवाड । कडू किंवा गोड फळ पोटीं ॥ ३ ॥

॥ १५८० ॥

नाहीं माथां भार । तुह्मी घेत हा विचार ॥ १ ॥ जाणोनियां ऐसें केलें । दुरिल अंगेसी लाविलें ॥२॥ जातां बोलावें आवडी । नाम घ्यावें घडी घडी । तुका ह्मणे दुरी । देवा खोटी ऐसी उरी ॥ ४ ॥

॥ १५८१ ॥

नसतों किविलवाणें । कांहीं तुमच्या कृपादानें ॥ १ ॥ हेचि तयाची ओळखी । घालें टवटवित मुखीं ॥ २ ॥ वायां जात नाहीं । वचन प्रीतीचें तें कांहीं ॥३॥ तुका ह्मणे देवा । सत्य येतें अनुभवा ॥४॥

॥ १५८२ ॥

मुखाकडे वास । पाहें करूनियां आस ॥ १ ॥ आतां होईल ते शिरीं मनोगत आज्ञा धरीं ॥ २ ॥ तुह्मीं अंगी[illegible] । केला पाहिजे हें सार ॥ ३ ॥ तुका ह्मणे दारीं । उभें याचक म[illegible]री ॥ ४ ॥

॥ १५८३ ॥

आतां मज तारीं । वचन हें साच करीं ॥१॥ तुझें नाम दिनानाथ । ब्रिदावळी जगविख्यात ॥२॥ कोण लेखी माझ्या दोषा । तुझा त्रिभुवनीं ठसा ॥३॥ वांयां जातां मज । तुका ह्मणे तुह्मां लाज ॥ ४ ॥

॥ १५८४ ॥

ऐसें कोण पाप बळी । जें जवळी येऊं नेदी ॥ १ ॥ तुह्मा तंव होईल ठावें । नेदावें कां कळों हें ॥२॥ कोण जाला अंतराय । कां ते पाय अंतरले ॥३॥ तुका ह्मणे निमित्याचा । आला सुचा अनुभव ॥ ४ ॥

॥ १५८५ ॥

कां जी धरिलें नाम । तुह्मी असोनि निष्काम ॥ १ ॥ कोणां सांगतसां ज्ञान । ठकाठकीचें लक्षण ॥२॥ आवडीनें नाचें । आहे तरी पुढें साचें ॥३॥ तुका ह्मणे प्रेम । नाहीं भंगायाचें काम ॥४॥

॥ १५८६ ॥

कामधेनूचें वासरूं । खाया न मिळे काय करूं ॥ १ ॥ ऐसें आह्मां मांडियेलें । विठो त्वां कां सांडियेलें ॥ २ ॥ बैसुनि कल्पद्रुमातळीं । पोटासाटीं तळमळीं ॥३॥ तुका ह्मणे नारायणा । बरें लोकीं हें दिसेना ॥४॥

॥ १५८७ ॥

आह्मी आर्तभूत जिवीं । तुह्मी गोसावी तों उदास ॥ १ ॥ वादावाद सम-
र्थाशीं । काशानशीं करावा ॥२॥ आह्मी मरों वेरझारीं । स्वामी घरीं
बैसले ॥३॥ तुका ह्मणे करितां वाद । कांहीं भेद कळेना ॥ ४ ॥

॥ १५८८ ॥

लाज ना विचार । बाजारीं तूं भांडखोर ॥१॥ ऐसें ज्याणें व्हावें ।
त्याची गांठी तुजसवें ॥ २ ॥ फेडिसी लंगोटी । घेसी सकळांसी
तुटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे चोरा । तुला आप ना दुसरा ॥ ४ ॥

॥ १५८९ ॥

दाखवूनि आस । केला बहुतांचा नास ॥ १ ॥ थोंटा झोडा शिरो-
मणी । भेटलासी नागवणी ॥२॥ सुखाचें उत्तर । नाहीं मुदलासी
थार ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय । तुझें घ्यावें उरे हाय ॥४॥

॥ १५९० ॥

लटिकाची केला । सोंग पसारा दाविला ॥ १ ॥ अवघा बुडलासी
ऋणें । बहुतांचें देणें घेणें ॥२॥ लावियलीं चाळा । बहु दावूनि पुतळा
॥३॥ तुका ह्मणे हात । आह्मी अवरिली मात ॥४॥

॥ १५९१ ॥

व्यवहार तो खोटा । आतां न वजों तुझ्या वाटा ॥२॥ एका नामा नाहीं
ताळ । केली सहस्रांची माळ ॥२॥ पाहों जातां घाइ । खेळसील
लंपडाई ॥३॥ तुका ह्मणे चार । बहु करितोसी फार ॥४॥

॥ १५९२ ॥

मिटविण्याचे धनी । तुह्मी व्यवसाय जनीं ॥ १ ॥ कोण पडे ये लि-
गाडीं । केलीं तैसीं उगवा कोडीं ॥२॥ केलें सांगितलें काम । दिले पाळू-
नियां धर्म ॥३॥ तुका ह्मणे आतां । असो तुमचें तुमचे माथां ॥४॥

॥ १५९३ ॥

तूं पांढरा स्फटिक मणी । करिसी आणिकां त्यांहुनि ॥ १ ॥ ह्मणोनि
तुझ्या दारा । न येत ठकती दातारा ॥ २ ॥ तुझी ठावी नांदणूक । अवघा
बुडविला लोक ॥३॥ तुका ह्मणे ज्याचें घेसी । त्यास हेंचि दाखविसी ॥४॥

॥ १५९४ ॥

नवां नवसांचीं । जालों तुह्मासी वाणीचीं ॥१॥ कोण तुझें नाम घेतें। देवा पिंडदान देतें ॥ २ ॥ कोण होतें मागें पुढें । दुजें बोलाया रोकडें ॥३॥ तुका ह्मणे पांडुरंगा । कोणा घेतासि वो संगा ॥ ४ ॥

॥ १५९५ ॥

संसाराची कोण गोडी । दिली जोडी करूनि ॥ १ ॥ निष्ठुर तूं बहु देवा । पुरे हेवा न ह्मणवी ॥ २ ॥ पाहोनियां कर्म डोळां । निराळा तो वर्जीना ॥ ३ ॥ तुका ह्मणे तुज माझें । ह्मणतां ओझें फुकट ॥ ४ ॥

॥ १५९६ ॥

नव्हेसी तूं लांसी । माया आणिकां त्या ऐसी ॥ १ ॥ जे हे वांयां जाती बोल । होती निर्फळचि फोल ॥ २ ॥ नव्हेसी दुबळी । कांहीं नाहीं तें जवळी ॥३॥ तुका ह्मणे खोटी । कांहीं नव्हेसी करंटी ॥४॥

॥ १५९७ ॥

आह्मां बोल लावा । तुह्मां अनुचित हें देवा ॥ १ ॥ ऐसे सांगा का व्यालेती । काय नाहीं तुह्मां हातीं ॥ २ ॥ आतां धरा दुरी । वांयां दवडाया थोरी ॥३॥ तुका ह्मणे ठायीं । ऐसें विचारावें कांहीं ॥४॥

॥ १५९८ ॥

तुझें नामीं दिनानाथा । आह्मीं उघडा घातला माथा ॥ १ ॥ आतां न धरावें दुरी । बोल येईल ब्रीदावरी ॥२॥ पतित होतों ऐसा ठावा । आधीं कां न विचारावा॥३॥तुका ह्मणे तुझे पायीं ।आह्मीं मिरास केली पाहीं॥४॥

॥ १५९९ ॥

मरोनिया गेली माया । मग तया कोण पुसे ॥ १ ॥ पोरटियांची दाद कोणा । ऐसा जाणा प्रवाहो ॥२॥ निढळास निढळ जोडा । होय कोडा कवतुका ॥३॥ तुका ह्मणे देवा ऐसीं । आह्मों सरसीं आपण ॥ ४ ॥

॥ १६०० ॥

आतां दोघांमध्यें काय । उरलें होय वाणीजेसें ॥ १ ॥ निष्ठुर हें केलें मन । समाधान न करूनि ॥२॥ झुरावें तें तेथींच्या परी । घरिच्या घरीं अवघिया ॥३॥ तुका ह्मणे देवपण । गुंडाळून असों दे ॥ ४ ॥

॥ १६०१ ॥

आतां येथें खरें । नये फिरतां माघारें ॥१॥ होय तैसी हो आशाळी। देहनिमित्य या बळी ॥२॥ तुह्मांसवें गांठी । देवा जीवाचिये साटीं ॥ ३ ॥ तुका नव्हे लंड । करूं चौघांमध्यें खंड ॥ ४ ॥

॥ १६०२ ॥

ऐसा तंव मोळा । तुमचा नसेल गोपाळा ॥१॥ मागत्याची टाळाटाळी । झिंज्या ओढोनि कपाळीं ॥२॥ नसेल ना नवें । ऐसें धरियेलें देवें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाला । उशीर नाहीं तो विठ्ठला ॥ ४ ॥

॥ १६०३ ॥

माझ्या कपाळाच्या गुणें । किंवा रलसे नेणें ॥१॥ नये वचन बाहेरी । उभे तिष्ठतसें दारीं ॥२॥ काय सांगायास वेचे । रीतें आरंभीं ठायींचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे किती । भीड धरावी पुढती ॥ ४ ॥

॥ १६०४ ॥

अहो पुरुषोत्तमा । तुह्मां कशाची उपमा ॥ १ ॥ सतंत तो नाहीं बुद्धी । नाळवितां नाहीं शुद्धि ॥२॥ जागविलें तरी । तुह्मां व्यक्तियेणें हरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । तुह्मां नित्य दिस नवा ॥ ४ ॥

॥ १६०५ ॥

बहु धीर केला । जाण न होसी विठ्ठला ॥१॥ आतां धरीन पदरीं । करीन तुज मज सरी ॥ २ ॥ जालों जीवासी उदार । उभा राहिलों समोर ॥ ३ ॥ तुका विनवी संतां । ऐसें सांगा पंढरिनाथा ॥ ४ ॥

॥ १६०६ ॥

जाला जीवासी उदार । त्यासी काय भीडभार ॥ १ ॥ करीन आडक्या घोंगडें । उभें बाजारीं उघडें ॥ २ ॥ जों जों धरिली भीड । तों तों बहु केली चीड ॥३॥ तुका ह्मणे मूळ । तुझें उच्चारीन कुळ ॥४॥

॥ १६०७ ॥

घेतां आणिकांचा जीव । तेव्हां कींव कराना ॥१॥ आपलें तें वरदळ नेदा । हे गोविंदा कृपणता ॥ २ ॥ सेवा तरी इच्छा सांग । चोरिलें अंग साहेना ॥३॥ तुका ह्मणे अरे भन्या । निसंतान्या विठोबा ॥४॥

॥ १६०८ ॥

नामासारिखी करणी । हे तों न दिसे त्रिभुवनीं ॥ १ ॥ सिलंगणीचें सोनें । ठेवूं नये तें गहाण ॥२॥ आदित्याचीं झाडें । काय त्यांचा ज- जड पडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे .देवा । ब्रिदें सोडोनियां ठेवा ॥ ४ ॥

॥ १६०९ ॥

सांपडला संदीं । मग बळिया पडे बंदीं ॥ १ ॥ ऐसी कोणी वाहे वेळ । ह्रालीं काळाच्या सकळ ॥२॥ दाता मागे दान । जाय याचका शरण ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेणां । काय सांगों नारायणा ॥ ४ ॥

॥ १६१० ॥

शोधिसील मूळें । त्याचें करीसी वाटाळें ॥१॥ ऐसे संतांचे बोभाट । तुझे बहु झाले तट ॥ २ ॥ लौकिका बाहेरी । घाली रोंखीं जया धरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे गुण । तुझा लागलिया शून्य ॥ ४ ॥

॥ १६११ ॥

रामा अयोध्येच्या राया । दिनानाथा रे सखया ॥ १ ॥ पाप ताप विघ्न हरीं । दिनानाथा सुख करीं ॥ २ ॥ भिलटीचिया रे उच्छिष्टा । स्वीकारिसी रे तूं भ्रष्टा ॥३॥ मी तों सलगीचें मूल । तुका ह्मणे तूं सखोल॥४॥

॥ १६१२ ॥

मानामान किती । तुझ्या क्षुल्लका संपत्ती ॥ १ ॥ जारे चाळवीं बापुडीं । कोणी धरिती तीं गोडी ॥ २ ॥ रिद्धिसिद्धी देसी । आह्मीं चुंभळें नव्हों तैसीं ॥३॥ तुका ह्मणे ठका । ऐसें नागविलें लोकां ॥ ४ ॥

॥ १६१३ ॥

वटवट केली । न विचारितां मना आली ॥ १ ॥ मज कराल तें क्षमा । कैसें नेणों पुरुषोत्तमा ॥२॥ उचित न कळे । जिव्हा भलतेंचि बरळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं । लौकिकाची चाड नाहीं ॥ ४ ॥

॥ १६१४ ॥

वारिलें लिगाड । बहु दिसांचें हें जाड ॥ १ ॥ न बोलावें ऐसें केलें । कांहीं वाउगें तितुलें ॥२॥ जाला चौघांचार । गेला खंडोनि वेव्हार ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । करीन ते घ्यावी सेवा ॥ ४ ॥

॥ १६१५ ॥

हें का आह्मां सेवा दान । देखों सीण विषमाचा ॥ १ ॥ सांभाळा जी श्रीदावळी । तुह्मी कां कळीसारिखे ॥ २ ॥ शरणांगत वैऱ्या हातीं । हे निश्चिंती देखिली॥ ३॥तुका ह्मणे इच्छीं. भेटी । पाय पोटीं उफराटे॥४॥

॥ १६१६ ॥

येईल तुझ्या नामा । लाज ह्मणों पुरुषोतमा ॥ १ ॥ धीर राहिलों धरूनि । त्रास उपजला मनीं ॥ २ ॥ जगा कथा नांव । निराशेनें नुपजे भाव॥ ३ ॥ तुह्मी साक्ष कीं गा । तुका ह्मणे पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १६१७ ॥

हें तों वाटलें आश्चर्य । तुह्मां न धरवे धीर ॥ १ ॥ माझा फुटतसे प्राण । धांवा धांवा ह्मणऊन ॥ २ ॥ काय नेणों दिशा । जाल्या तुह्मांविण ओशा ॥३॥ तुका ह्मणे कांगा । नाइकिजे पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १६१८ ॥

सरे ऐसें ज्याचें दान । त्याचे कोण उपकार ॥ १ ॥ नको वाढूं ऐसें काचें । दे वो साच विठ्ठला ॥ २ ॥ रडत मागें सांडी पोर । ते काय थोर माउली ॥ ३ ॥ तुका ह्मणे कीर्ति वाढे । धर्म गाढे ते ऐसे ॥४॥

॥ १६१९ ॥

वाढविलें कांगा । तुह्मी एवढें पांडुरंगा ॥ १ ॥ काय होती मज चाड । एवढी करावया बडबड ॥ २ ॥ ब्रह्मसंतर्पण । लोकीं करावें कीर्तन ॥ ३ ॥ निमित्याचा धणी । तुका ह्मणे नेणे कोणी ॥ ४ ॥

॥ १६२० ॥

ठार्यांची ओळखी । येइल टाकूं टाका सुखीं ॥ १ ॥ तुमचा जाईल इमान । माझे कपाळीं पतन ॥ २ ॥ ठेविला तो ठेवा । अभिलाषें बुडवावा ॥ ३ ॥ मनीं न विचारा । तुका ह्मणे हे दातारा ॥ ४ ॥

॥ १६२१ ॥

शकुनानें लाभ हानि । येथूनिच कळतसे ॥ १ ॥ भयारूढ जालें मन । आतां कोण विश्वास ॥ २ ॥ प्रीत कळे आलिंगनीं । संपादनीं अत्यंत ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोकलिलें । कळों आलें बरवें हें ॥ ४ ॥

॥ १६२२ ॥

बुडतां आवरीं । मज भवाचे सागरीं ॥ १ ॥ नको मानूं भार । पाहों दोषांचे डोंगर ॥ २ ॥ आहे तें सांभाळीं । तुझी कैसी ब्रीदावळी ॥ ॥ ३ ॥ तुका ह्मणे दोषी । मी तो पातकांची राशी ॥ ४ ॥

॥ १६२३ ॥

झाड कल्पतरु । न करी याचकीं आव्हेरु ॥ १ ॥ तुह्मीं सर्वां सर्वोत्तम । ऐसे विसरतां नाम ॥२॥ परिसा तुमचें देणें । तो त्या जाणें अभिमानें ॥३॥ गाऱ्हाण्यानें तुका । गर्जे मारुनियां हाका ॥ ४ ॥

॥ १६२४ ॥

घालूनियां कांस । वळें आलों मागायास ॥ १ ॥ प्रेमें देई पाठवूनि । पांडुरंगा सेवाऋणी ॥ २ ॥ होई रे शहाणा । कळों नेदावें या जना ॥ ३ ॥ तुका ह्मणे पायीं । जडलों मग उरलें काई ॥ ४ ॥

॥ १६२५ ॥

केवढा तो अहंकार । माझा तुह्मां नव्हे दूर ॥ १ ॥ आतां कोण पडे पायां । तुमच्या अहो पंढरिराया ॥ २ ॥ कां जी कृपेनें कृपण । वेचत असे ऐसें धन ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवें । दुजियाचें पोतें न्यावें ॥ ४ ॥

॥ १६२६ ॥

विठ्ठला विठ्ठला । कंठ आळवितां फुटला ॥ १ ॥ कई कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥२॥ जाल्या येरझारा । जन्मां बहुतांचा फेरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नष्टा । अबोलण्या तुझ्या चेष्टा ॥ ४ ॥

॥ १६२७ ॥

बहुतां रीती काकुलती । आलों चित्तीं न धराच ॥१॥ आतां कशासाटीं देवा । मिथ्या हेवा वाढवूं ॥ २ ॥ तुह्मां आह्मां जाली तुटी । आतां भेटी चिंतनें ॥३॥ तुका ह्मणे लाजिरवाणें । अधीर जिणें इच्छेचें ॥ ४ ॥

॥ १६२८ ॥

आह्मांपाशीं याचें बळ । कोण काळवरी तों ॥ १॥ धरूनि ठेलों जीवेसाटीं। होय भेटी तोंवरि ॥ २ ॥ लागलों तों फिरें न पाठीं । पडिल्या गांठी वांचूनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे अवकाशें । तुमच्या ऐसें होवया ॥ ४ ॥

॥ १६२९ ॥

जीवींचें कां नेणां । परि हे आवडी नारायणा ॥ १ ॥ वाढवावें हें उत्तर । कांहीं लाज करकर ॥ २ ॥ कोठें वांयां गेले । शब्द उत्तम चांगले ॥ ३ ॥ तुका ह्मणे बाळा । असतात प्रिय खेळा ॥ ४ ॥

॥ १६३० ॥

समर्थाचें बाळ पांघरे वाकळ । हसती सकळ लोक कोणा ॥ १ ॥ समर्थासी लाज आपुल्या नांवाची । शरण आल्याची लागे चिंता ॥२॥ जरी तुज कांहीं होईल उचित । तरि हा पतित तारीं तुका ॥३॥

॥ १६३१ ॥

कासया हो माझा राखिला लौकिक । निवाड कां एक केला नाहीं ॥१॥ मग तळमळ न करितें मन । झालें तें कारण कळों येतें ॥२॥ तुका ह्मणे केला पाहिजे निवाड । वैद्यासी ते भीड मरण रोग्या ॥३॥

॥ १६३२ ॥

आशाबद्ध बहु असें निलाजिरें । होय ह्मणे धीरें फळ टोंकें ॥ १ ॥ कारणापें चित्त न पाहें अपमान । चित्त समाधान लाभासाटीं ॥ २ ॥ तुका ह्मणे हातें लोटिलें न कळे । झांकितसें डोळे पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ १६३३ ॥

नव्हे मी शाहाणा । तरी ह्मणे नारायणा ॥१॥ तुह्मां बोलवाया कांहीं । ये च भरलोंसे वाहीं ॥२॥ आणावेति रूपा । कोपलेती तरी कोपा ॥३॥ कळोनि आवडी । तुका ह्मणे जाते घडी ॥४॥

॥ १६३४ ॥

पायांपासीं चित्त । तेणें भेटी अखंडित ॥१॥ असे खेळे भलते ठायीं । प्रेमसूत्रदोरी पायीं ॥२॥ केलेंसें जतन । मुळीं काय तें वचन ॥ ३ ॥ तुका ह्मणे सर्वजाणा । ठायीं विचारावें मना ॥४॥

॥ १६३५ ॥

नव्हें परि ह्मणवीं दास । कांहीं निमित्तास मूळ केलें ॥ १ ॥ तुमचा तो धर्म कोण । हा आपण विचारा ॥२॥ नाहीं शुद्ध आचरण । परि चरण चिंतीतों ॥३॥ तुका ह्मणे पांडुरंगा । ऐसें कां गा नेणा हें ॥४॥

॥ १६३६ ॥

आह्मीं ध्यावें तुझें नाम । तुह्मीं आह्मां द्यावें प्रेम ॥१॥ ऐसें निवडिलें मुळीं । संतीं बैसोनि सकळीं ॥ २ ॥ माझी डोई पायांवरी । तुह्मीं न धरावी दुरी ॥३॥ तुका ह्मणे केला । खंड दोघांचा विठ्ठला ॥४॥

॥ १६३७ ॥

असो मागें जालें । पुढें गोड तें चांगलें ॥ १ ॥ आतां माझे मनीं । कांहीं अपराध न मनीं ॥२॥ नेदीं अवसान । करितां नामाचें चिंतन ॥३॥ तुका ह्मणे बोलें । तुज आधींच गोविलें ॥४॥

॥ १६३८ ॥

भाव धरिला चरणीं ह्मणवितों दास । अहर्निशीं ध्यास करीतसें ॥१॥ करीतसें ध्यास हृदयीं सकळ । भाव तो सबळ धरियेला ॥२॥ धरिले निश्चळ न सोडीं ते पाय । तुका ह्मणे सोय करीं माझी ॥३॥

॥ १६३९ ॥

उचिताचा दाता । कृपावंता तूं अनंता ॥१॥ कां रे न घलिसी धांव । तुझें उच्चारितां नांव ॥ २ ॥ काय बळयुक्ति । नाहीं तुझे अंगीं शक्ति ॥३॥ तुका ह्मणे तूं विश्वंभर । ओस माझें कां अंतर ॥४॥

॥ १६४० ॥

वेडें वाकडें गाईन । परि मी तुझाचि ह्मणवीन ॥१॥ मज तारीं दिनानाथा । ब्रीदें साच करीं आतां ॥ २ ॥ केल्या अपराधांच्या राशी । ह्मणऊनि आलों तुजपाशीं॥३॥तुका ह्मणे मज तारीं।सांडीं ब्रीद नाहींतरी४

॥ १६४१ ॥

अंधळ्याची काठी । हिरोनियां कडा लोटी ॥ १ ॥ हें कां देखण्या उचित । लाभ किंवा कांहीं हित ॥२॥ साकर ह्मणोनि माती। चाळवूनि द्यावी हातीं ॥३॥ तुका ह्मणे वाटे । देवा पसरावे सराटे ॥४॥

॥ १६४२ ॥

माझ्या वडिलांची मिरासी गा देवा । तुझी चरणसेवा पांडुरंगा ॥१॥ उपवास पारणीं राखिला दारवंटा । केला भोगवटा आह्मालागीं ॥२॥ वंशपरंपरा दास मी अंकित । तुका मोकलीतां लाज कोणा ॥ ३ ॥

॥ १६४३ ॥

कळों आलें ऐसें आतां । नाहीं सत्ता तुह्मांसी ॥ १ ॥ तरी वीर्य नाहीं नामा । जातो प्रेमा खंडन ॥ २ ॥ आड ऐसें येतें पाप । वाढे ताप आगळा ॥३॥ तुका ह्मणे गुण झाला । हा विठ्ठला हीनशक्ति ॥ ४ ॥

॥ १६४४ ॥

आह्मी जाणों तुझा भाव । दृढ धरियेले पाव ॥१॥ फांकों नेदी चुकवितां । नेघों थोडें बहु देतां ॥ २ ॥ बहुतां दिसांचें लिगाड । आलें होत होत जड ॥३॥ तुका ह्मणे आतां । ने घों सर्वस्वही देतां ॥४॥

॥ १६४५ ॥

ऋण वैर हत्या । हें तों न सुटे नेदितां ॥१॥ हें कां नेणां पांडुरंगा । तुह्मी सांगतसां जगा ॥२॥ माझा संबंध तो किती । चुकवा लोकाची फजिती ॥ ३ ॥ तुका ह्मणे याचि साटीं । मज घेतां नये तुटी ॥ ४ ॥

॥ १६४६ ॥

दोष पळती कीर्तनें । तुझ्या नामसंकीर्तनें ॥१॥ हें कां करूं आदरिलें । खोटें वचन आपुलें ॥२॥ तुह्मी पापा भीतां । आह्मां उपजावया चिंता ॥३॥ तुका ह्मणे सेवा । कळिकाळा जिंकी देवा ॥४॥

॥ १६४७ ॥

जरि मी नव्हतों पतित । तरि तूं पावन कैंचा तेथ ॥ १ ॥ ह्मणोनि माझें नाम आधीं । मग तूं पावन कृपानिधी ॥ २ ॥ लोहो महिमा न परिसा । नाहीं तरी दगड तैसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे याचकभावें । कल्पतरु मान पावे ॥ ४ ॥

॥ १६४८ ॥

तुमचा तुह्मीं केला गोवा । आतां चुकवितां देवा ॥१॥ कैसें सरे चाळवणें । केलें काशाला शाहाणे ॥ २ ॥ कासया हो रूपा । नांवा आलेति गा बापा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां । न सरे हवाले घालितां ॥ ४ ॥

॥ १६४९ ॥

याचि हाका तुझे द्वारीं । सदा देखो ऋणकरी ॥१॥ सदा करिसी खंड

दंड । देवा बहु गा तूं लंड ॥२॥ सुखें गोंविसी भोजना । लपवूनिया आपणां ॥३॥ एकें एक बुझाविसी । तुका ह्मणे ठक होसी ॥ ४ ॥

॥ १६५० ॥

कांगा धर्म केला । असोन सत्तेचा आपुला ॥ १ ॥ उभाउभीं पाय जोडीं । आतां फांकों नेदीं घडी ॥२॥ नको सोडूं ठाव । आतां घेऊं नेदीं वाव ॥३॥ तुका ह्मणे इच्छा । तैसा करीन सरिसा ॥ ४ ॥

॥ १६५१ ॥

नव्हों गांढे आळसी । जो तूं आह्मापुढें जासी ॥१॥ अरे दिलें आह्मां हातीं । वर्म वेवादाचें संतीं ॥२॥ धरोनियां वाट । जालों शिरोमणि थोंट ॥३॥ तुका ह्मणे देवा । वाद करीन खरी सेवा ॥ ४ ॥

॥ १६५२ ॥

करितां वेरझारा । उभा न राहासी वेव्हारा ॥१॥ हे तों झोंडाईचे चाळे । काय पोटीं तें न कळे ॥२॥ आरोगुनी मुग । बैसलासी जैसा बग ॥३॥ तुका ह्मणे किती । बुडविलीं आळवितीं ॥४॥

॥ १६५३ ॥

तुझ्याठायीं ओस । दोन्ही पुण्य आणि दोष ॥१॥ झडलें उरलें किती । आह्मी धरियेलें चित्तीं ॥ २ ॥ कळलासी नष्टा । यातिक्रियाकर्मभ्रष्टा ॥३॥ तुका ह्मणे बोला । नाहीं ताळा गा विठ्ठला ॥४॥

॥ १६५४ ॥

आह्मीं भांडों तुजसवें । वर्मीं धरूं जालें ठावें ॥१॥ होसी सरड बेडुक । वाघ गांढ्याही पाइक ॥२॥ बळ करी तया भ्यावें । पळों लागे तया घ्यावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे दूर परता । नर नारी ना तूं भूता ॥ ४ ॥

॥ १६५५ ॥

कां रे न पवसी धांवण्या । अंगराख्या नारायणा ॥ १ ॥ अंगीं असोनियां बळ । होसी खट्याळ नाट्याळ ॥ २ ॥ आह्मां नरका जातां । काय येइल तुझ्या हातां॥३॥तुका ह्मणे कान्हा । क्रियानष्टा नारायणा॥४॥

॥ १६५६ ॥

नव्हे भिडा हें कारण । जाणे करूं ऐसें जन ॥१॥ जों जों धरावा लौ-
किक । रडवितोसी आणीक ॥२॥ चाल जाऊं संतांपुढें । ते हें निवडिती
रोकडें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं निर्लज्ज । आह्मां रोकडी गरज ॥ ४ ॥

॥ १६५७ ॥

आह्मी देतों हाका । कां रे जालासी तूं मुका ॥१॥ न बोलसी नारा-
यणा । कळलासी क्रियाहीना ॥२॥ आधीं करूं चौघाचार । मग सांडूं
भीडभार ॥३॥ तुका ह्मणे सेवटीं । तुह्मां आह्मां घालूं तुटी ॥४॥

॥ १६५८ ॥

काय साहतोसी फुका । माझा बुडविला रुका ॥ १ ॥ रीण घराचें
पांगिलें । तें न सुटे कांहीं केलें ॥२॥ चौघांचिया मतें । आधीं खरें
केलें होतें ॥३॥ तुका ह्मणे यावरी । आतां भीड कोण धरी ॥४॥

॥ १६५९ ॥

पतित मिरासी । ते म्यां धरिली जीवेंसी ॥ १ ॥ आतां बळिया सांग
कोण । ग्वाही तुझें माझें मन ॥२॥ पावनाचा ठसा । दावीं मज तुझा
कैसा ॥३॥ तुका ह्मणे वाव जालें । रोख पाहिजे दाविलें ॥४॥

॥ १६६० ॥

भांडावें तों हित । ठायीं पडतें उचित ॥ १ ॥ नये खंडों देऊं वाद ।
आह्मां भांडवलभेद ॥२॥ शब्दसारसें भेटी । नये पडों देऊं तुटी ॥३॥
तुका ह्मणे आळस । तोचि कारणांचा नास ॥४॥

॥ १६६१ ॥

तुज नाहीं शक्ति । काम घेसी आह्मां हातीं ॥१॥ ऐसें अनुभव पाहीं ।
उरलें बोलिजेसें नाहीं ॥२॥ लपोनियां आड । आह्मां तुझा कैवाड ॥३॥
तुका ह्मणे तुजसाटीं । आह्मां संसारेंसी तुटी ॥४॥

॥ १६६२ ॥

पाटवणें पडणें पायां । उद्गार वांयां काशाचा ॥१॥ घडलें तें भेटीसवें ।
दिसेल बरवें सकळां हो ॥२॥ न घडतां दृष्टादृष्टी । काय गोष्टी कोर-
ड्या ॥३॥ अबोल्यानें असे तुका । अंतर ऐका साक्षीतें ॥ ४ ॥

॥ १६६३ ॥

आह्मी जालों एकविध । सुद्या सुदें असावें ॥१॥ यावरी तुमचा मोळा । तो गोपाळा अकळ ॥२॥ घेतलें तें उसणें द्यावें । कांहीं भावें विशेषें ॥३॥ तुका ह्मणे क्रियानष्ट । तरी कष्ट घेतसां ॥४॥

॥ १६६४ ॥

पराधीन माझें करूनिया जिणें । सांडी काय गुणें केली देवा ॥ १ ॥ उदार हे कीर्ति असे जगामाजी । कां तें ऐसें आजि पालटिलें॥ २ ॥ आळवितों परी न पुरेचि रीग । उचित तो त्याग नाहीं तुह्मां ॥ ३ ॥ तुका ह्मणे कां वा मुळींच व्यालासी । ऐसें कां नेणसी पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १६६५ ॥

मजसवें नको चेष्टा । नव्हे साळी कांहीं कोष्टा ॥ १ ॥ बैस सांडोनि दिमाख । जाय काळें करीं मुख ॥ २ ॥ येथें न सरे चार । हीण आणीक वेव्हार ॥३॥ तुका विष्णुदास । रस जाणतो नीरस ॥ ४ ॥

॥ १६६६ ॥

बोलतों निकुरें । नव्हेत सलगीचीं उत्तरें ॥१॥ माझें संतापलें मन । परपीडा ऐकोन ॥ २ ॥ अंगावरि आलें । तोंवरि जाईल सोसिलें ॥ ॥ ३ ॥ तुज भक्तांची आण देवा । जरि तुका येथें ठेवा ॥ ४ ॥

॥ १६६७ ॥

दंड अन्यायाचा माथां । देखोनि करावा सर्वथा ॥ १ ॥ नये उगे बहुतां घाटूं । सिसें सोनियांत आटूं ॥२॥ पापपुण्यासाटीं । नीत केली सत्ता खोटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । दोष कोणाचा तो दावा ॥४॥

॥ १६६८ ॥

जाणसी उचित । पांडुरंगा धर्मनीत ॥ १ ॥ तरि म्यां बोलावें तें काई । सरे ऐसें तुझे पायीं ॥ २ ॥ पालटती क्षण । संचितप्रारब्ध-क्रियमाण ॥३॥ तुका ह्मणे सत्ता । होसी सकळ करिता ॥ ४ ॥

॥ १६६९ ॥

भवसिंधूचें होंचि तारूं । मज विचारूं पाहातां ॥ १ ॥ चित्तीं तुझे

धरिन पाय । सुख काय तें तेथें ॥ २ ॥ माझ्या खुणा मनापाशीं । तें या रसीं बुडालें ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्म आलें । हातां भलें हें माझ्या ॥ ४ ॥

॥ १६७० ॥

आश्चर्य तें एक जालें । मना आलें माझिया ॥ १ ॥ मढ्यापाशीं करुणा केली । तैसी गेली वृथा हे ॥ २ ॥ न यावा तो कैसा राग । खोटें मग देखोनि ॥३॥ तुका ह्मणे कैंचा बोला । शोध विठ्ठला माझिया ॥ ४ ॥

॥ १६७१ ॥

मी याचक तूं दाता । काय सत्य पाहों आतां ॥ १ ॥ म्यां तो पसरिला हात । करीं आपुलें उचित ॥२॥ आह्मीं घ्यावें नाम । तुह्मां समाधान काम ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवराजा ।॥वाद खंडीं तुझा माझा ॥ ४ ॥

---

## देवापाशीं मागणें.

॥ १६७२ ॥

अद्वैतीं तों माझें नाहीं समाधान । गोड हे चरणसेवा तुझी ॥ १ ॥
करूनी उचित देईं हेंचि दान । आवडे कीर्तन नाम तुझें ॥ २ ॥
देवभक्तपण सुखाचा सोहळा । ठेवूनि निराळा दावीं मज ॥ ३ ॥
तुका ह्मणे आहे तुझें हें सकळ । कोणी एके काळें देईं मज ॥ ४ ॥

॥ १६७३ ॥

समचरणदृष्टि विटेवरी साजरी । तेथें माझी हरी वृत्ति राहो ॥ १ ॥
आणीक न लगे मायिक पदार्थ । तेथें माझें आर्त्त नको देवा ॥ २ ॥
ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी । तेथें चित्त झणी जडों देसी ॥३॥
तुका ह्मणे त्याचें कळलें आह्मां वर्म । जे जे कर्मधर्म नाशवंत ॥ ४ ॥

॥ १६७४ ॥

सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती । रखुमाईच्या पती सोयरिया ॥१॥
गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्व काळ ॥ २ ॥
विठो माउलिये हाचि वर देईं । संचरोनि राहीं हृदयामाजी ॥ ३ ॥
तुका ह्मणे कांहीं न मागें आणिक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥४॥

॥ १६७५ ॥
नामपाठ मुक्ताफळांच्या ओवणी । हें सुख सुगुणीं अभिनव ॥ १ ॥
तरी आह्मी जालों उदास निर्गुणा । भक्तांचिया मना मोक्ष नये ॥२॥
द्यावें ध्यावें ऐसा येथें उरे भाव । काय ठाया ठाव पुसोनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां अभयदान करा । ह्मणा विश्वंभरा दिलें ऐसें ॥४॥
॥ १६७६ ॥
समर्थाचे सेवे कोठें नाहीं घात । पाहों नये अंत पांडुरंगा ॥ १ ॥
आहे तैसी नीत विचारावी बरी । येऊनी भीतरी वास करा ॥ २ ॥
निढळ राखिलें तरी भयाभीत । हर्षामर्ष चित्त पावतसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे तरी कळेल निवाड । दर्शनाची चाड शुभकीर्ति ॥ ४ ॥
॥ १६७७ ॥
वारंवार हाचि न पडावा विसर । वसावें अंतर तुमच्या गुणीं ॥१॥
इच्छेचा ये दाता तूं एक समर्था । अगा कृपावंता मायबापा ॥ २ ॥
लाभाचिये वोढी उताविळ मन । त्यापरि चिंतन चरणाचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जीवीं जीवन ओलावा । पांडुरंगे द्यावा शीघ्र आतां ॥४॥
॥ १६७८ ॥
पावलें पावलें तुझें आह्मां सर्व । दुजा नका भाव होऊं देऊं ॥ १ ॥
जेथें तेथें देखें तुझींच पाउलें । त्रिभुवन संचलें विठ्ठला गा ॥ २ ॥
भेदाभेद मतें भ्रमाचे संवाद । आह्मां नको वाद त्यांशीं देऊं ॥ ३ ॥
तुका ह्मणे अणु तुजवीण नाहीं । नभाहूनि पाहीं वाढ आहे ॥ ४ ॥
॥ १६७९ ॥
वाळूनियां जन सांडी मज दुरी । करिसील हरी ऐसें कधीं ॥ १ ॥
आठवीन पाय धरूनि अनुताप । वाहे जळ झोंप नाहीं डोळां ॥ २ ॥
नावडती जीवा आणीक प्रकार । आवडी ते फार एकांताची ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसी धरितों वासना । होईं नारायणा साह्य मज ॥ ४ ॥
॥ १६८० ॥
होईल तो भोग भोगीन आपुला । न घलीं विठ्ठला भार तुज ॥ १ ॥

तुह्मांपासाव हें इच्छीतसें दान । अंतरींचें ध्यान मुखीं नाम ॥ २ ॥
नयें काकुलती गर्भवासांसाटीं । न धरीं हें पोटीं भय कांहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज उदंड एवढें । न वांचावें पुढें मायबापा ॥ ४ ॥

॥ १६८१ ॥

कानडीनें केला मऱ्हाटा भ्रतार । एकाचें उत्तर एका न ये ॥ १ ॥
तैसें मज नको करूं कमळापति । देईं या संगति सज्जनांची ॥ २ ॥
तिनें पाचारिलें इल बा ह्मणोन । येरु पळे आण जाली आतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे येर येरा जें विच्छिन्न । तेथें वाढे सीण सुखा पोटीं ॥४॥

॥ १६८२ ॥

नाम आठवितां सद्गदित कंठीं । प्रेम वाढे पोटीं ऐसें करीं ॥ १ ॥
रोमांच जीवन आनंदाश्रु नेत्रीं । अष्टांग ही गात्रीं प्रेम तुझें ॥ २ ॥
सर्व ही शरीर वेचो या कीर्तनीं । गाऊं निशिदिनीं नाम तुझें ॥ ३ ॥
तुका ह्मणे दुजें न करीं कल्पांतीं । सर्वदा विश्रांति संतां पायीं ॥४॥

॥ १६८३ ॥

अनाथ परदेशी हीन दीन भोळें । उगलेंचि लोळे तुझे रंगीं ॥ १ ॥
आपुलें ह्मणावें मज नुपेक्षावें । प्रेमसुख द्यावें मायबापा ॥ २ ॥
कासवीचे परी दृष्टी पाहें मज । विज्ञानीं उमज दावुनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझा जालों शरणागत । काया वाचा चित्त दुजें नाहीं ॥४॥

॥ १६८४ ॥

स्वगोत्रींचा पुत्र परगोत्रीं आर्पिला । विभागा मुकला पितृधना ॥ १ ॥
तैसें मजलागीं न धरावें दुरी । नव्हे परगोत्री पोटींचाचि ॥ २ ॥
सुतकासी त्याचे नाहीं प्रयोजन । जनिता ह्मणोनि तीन दिवस ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं ठावें हें कोणासी । पुसावें वेदांसी देती ग्वाही ॥४॥

॥ १६८५ ॥

मागल्याची कोठें घडते निरास । लेंकरा उदास नाहीं होतें ॥ १ ॥
कासया मी होऊं उतावीळ जीवीं । जाणता गोसावी सर्व आहे ॥२॥

जाला तरी वेळ कवतुकासाटीं । निर्दया तों पोटीं उपजेना ॥ ३ ॥
तुका ह्मणे त्यासी ठाउकें उचित । होईल संकेत नेमियेला ॥ ४ ॥

॥ १६८६ ॥

कां जी तुह्मी ऐसें नव्हा कृपावंत । निवे माझें चित्त ठायींच्या ठायीं॥ १॥
कांहीं शम नये विषम अंतरा । शांतीचा तो बरा ऐसा योग ॥ २ ॥
दुःखी होतों पंचभूतांच्या विकारें । जडत्वें दातारें राखावीं तीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे मोडा अहंकाराची मान । धरितों चरण ह्मणऊनि ॥ ४ ॥

॥ १६८७ ॥

येतील अंतरा शिष्टाचे अनुभव । तळमळी जीव तया सुखा ॥ १ ॥
आतां माझा जीव घेउनियां बळी । बैसवावें वोळी संतांचिये ॥ २ ॥
विस्तारिली वाचा फळेंविण वेल । कोरडेचि बोल फोस वांझे ॥ ३ ॥
तुका ह्मणे आलों निर्वाणाच वरी । राहों नेदीं उरी नारायणा ॥ ४ ॥

॥ १६८८ ॥

सांवळें सुंदर रूप मनोहर । राहो निरंतर हृदयीं माझे ॥ १ ॥
आणीक कांहीं इच्छा आह्मां नाहीं चाड । तुझें नाम गोड पांडुरंगे ॥२॥
जन्मोजन्मीं ऐसें मागितलें तुज । आह्मांसी सहज द्यावें आतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज ऐसे दयाळ । धुंडितां सकळ नाहीं आह्मां ॥ ४ ॥

॥ १६८९ ॥

मोक्षाचें आह्मांसी नाहीं अवघड । तो असे उघड गांठोळीस ॥ १ ॥
भक्तीचे सोहळे होतील जीवासी । नवल तेविशीं पुरवितां ॥ २ ॥
ज्याचें त्यासी देणें कोण तें उचित । मानूनियां हित घेतों सुख ॥ ३ ॥
तुका ह्मणे सुखें देईं संवसार । आवडीसी थार करीं माझे ॥ ४ ॥

॥ १६९० ॥

पहा ते पांडव अखंड वनवासी । परि त्या देवासी आठविती ॥ १ ॥
प्रल्हादासी पिता करितो जाचणी । परि तो स्मरे मनीं नारायण ॥२॥
सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । नाहीं विसरला पांडुरंगा ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझा न पडावा विसर । दुःखाचे डोंगर जाले तरी ॥ ४ ॥

॥ १६९१ ॥

नाहीं तुज कांहीं मागत संपत्ती । आठवण चित्तीं असो द्यावी ॥ १ ॥
सरलिया भोग येईन सेवटीं । पायांपें या भेटी अनुसंधानें ॥ २ ॥
आतां मजसाठीं याल आकारास । गोकडी हे आस नाहीं देवा ॥ ३ ॥
तुका ह्मणे मुखीं असो तुझें नाम । देईल तो श्रम देवो काळ ॥ ४ ॥

॥ १६९२ ॥

डगमगी मन निराशेच्या गुणें । हें तों नारायणें सांतवीजे ॥ १ ॥
धीरें तूं गंभीर जीवन जगाचें । जळो विभागाचे आत्रीतत्या ॥ २ ॥
येईल जीव हें देखोनि कठिण । केला जातो सीण तो तो वांयां ॥ ३ ॥
तुका ह्मणे आवश्यक हें वचन । पाळावेंचि दान समयो आहे ॥ ४ ॥

॥ १६९३ ॥

इच्छेपाशीं आलों फिरोनि मागुता । स्वामीसेवकता आवडीचे ॥ १ ॥
ह्यावें लवकरी मागितलें दान । मुळींचें जतन करूनि असें ॥ २ ॥
उपाय हे करीं एकाचि वचना । दावूनियां खुणा ठाया येतों ॥ ३ ॥
तुका ह्मणे गांठी किती तुजपाशीं । जगाच्या तोडिसी चिंतनानें ॥ ४ ॥

॥ १६९४ ॥

लडिवाळ ह्मणोनी निष्ठुर न बोला । परी सांभाळिला लागे घात ॥ १ ॥
बहु वागवीत आणिलें दुरूनि । दासांची पोसनी बहु आहे ॥ २ ॥
नाहीं लागों दिला आघाताचा वारा । निष्ठुर उत्तरा कोमेजतो ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी कृपावंत हरि । शांतवा उत्तरीं अमृताच्या ॥ ४ ॥

॥ १६९५ ॥

जेणें माझें चित्त राहे तुझ्या पायीं । अखंड तें देई प्रेमसुख ॥ १ ॥
देहभाव राख दीन करूनियां । जनाचारी वांयां जाय तैसा ॥ २ ॥
द्रव्य दारा नको मानाची आवडी । कवणेविशीं गोडी प्रपंचाची ॥ ॥
तुझें नाम माझें धरूनियां चित्त । एकांत लोकांत सदा राहो ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुझे जडोनियां पायीं । जालों उतराई पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ १६९६ ॥

माझे हातीं आहे करावें चिंतन । तुह्मी कृपादान प्रेम द्यावें ॥ १ ॥
मागतियां भांडवल आळवण । नामाचीं जतन दातियासी ॥ २ ॥
बाळक धांवोनि आड निघे स्तनीं । घालावा जननी कृपे पान्हा ॥३॥
तुका ह्मणे करीं कासवीचे परी । आहे सूत्रदोरी तुझे हातीं ॥ ४ ॥

॥ १६९७ ॥

पाप ताप माझे गुणदोष निवारीं । कृष्णा विष्णु हरी नारायणा ॥१॥
काम क्रोध वैरी घालोनी बाहेरी । तूं राहें अंतरीं पांडुरंगा ॥ २ ॥
करिशील तरी नव्हे कांइ एक । निर्मिलें त्रैलोक्य हेळमात्रें ॥ ३ ॥
समर्थासी काय आह्मीं शिकवावें । तुका ह्मणे यावें पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १६९८ ॥

बहुजन्मां शेवटीं स्वामी तुझी भेटी । बहु मोह पोटीं थोर जाला ॥१॥
बहु पुरें पाहिलीं बहु दिशा शोधिली । बहु चिंता वाहिली दुर्भराची ॥२॥
बहु काळ गेले अनुचित केलें । बहु नाहीं गाइलें नाम तुझें ॥ ३ ॥
ऐसा मी अपराधी अगा कृपानिधि । बहु संतां संनिधि ठेवीं तुका ॥४॥

॥ १६९९ ॥

पक्षीयांचे घरीं नाहीं सामुग्री । त्यांची चिंता करी नारायण ॥ १ ॥
अजगर जनावर वारुळांत राहे । त्याजकडे पाहे पांडुरंग ॥ २ ॥
चातक हा पक्षी नेघे भूमिजळ । त्यासाटीं घननीळ नित्य वर्षे ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी पिप्पलिकांची जात । पुरवीं मनोरथ पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १७०० ॥

नको विद्या वयसा आयुष्य फारसें । नाहीं मज पिसें मुक्तीचेंही ॥१॥
रामकृष्ण ह्मणतां जावो माझा प्राण । हेंचि कृपादान मागतसें ॥ २ ॥
नको धन मान न वाढो संतान । मुखीं नारायण प्राण जावा ॥ ३ ॥
तुका ह्मणे दीन काकुलती येतों । तुज निरवितों पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १७०१ ॥

कोरडिया गोष्टी नावडती मना । नाहीं ब्रह्मज्ञानाविण चाड ॥ १ ॥

दाखवीं आपुलें सगुण रूपडें । वंदीन मी कोडें पाय तुझे ॥ २ ॥
न लगे तो मोक्ष मज सायुज्यता । नावडे हे वार्ता शून्याकारी ॥३॥
तुका ह्मणे चाड धरीन श्रीमुखें । येशिल कवतुकें जवळीक ॥ ४ ॥

॥ १७०२ ॥

समर्थ या नांवें दिनांचा कृपाळ । हें तंव सकळ स्वामीअंगीं ॥ १ ॥
मज काय लागे करणें विनवणी । विदित चरणीं सकळ आहे ॥ २ ॥
दयासिंधु तुह्मां भांडवल दया । सिंचावें आतां या कृपापीयूषें ॥ ३ ॥
तुका ह्मणे अवो पंढरीनिवासे । बहु जीव आसे लागलासे ॥ ४ ॥

॥ १७०३ ॥

राम कृष्ण गोविंद नारायण हरी । केशवा मुरारी पांडुरंगा ॥ १ ॥
लक्ष्मीनिवासा पाहें दिनबंधु । तुझा लागो छंदु सदा मज ॥ २ ॥
तुझे नामीं प्रेम देईं अखंडित । नेणें तप व्रत दान कांहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझें हेंचि गा मागणें । अखंडही गाणें नाम तुझें ॥ ४ ॥

॥ १७०४ ॥

अमृताचीं फळें अमृताची वेली । तेचि पुढें चाली बीजाचीही ॥ १ ॥
ऐसियांचा संग देईं नारायणा । बोलावा वचना जयांचिया ॥ २ ॥
उत्तम सेवन सितळ कंठासी । पुष्टी कांती तैसी दिसे वरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तैसें होइजेत संगें । सवा लागे अंगें चंदनाच्या ॥ ४ ॥

॥ १७०५ ॥

नर नारी बाळें अवघा नारायण । ऐसें माझें मन करीं देवा ॥ १ ॥
न यो काम क्रोध द्वेष निंदा द्वंद । अवघा गोविंद निःसंदेह ॥ २ ॥
असावें म्यां सदा विषयीं विरक्त । काया वाचा चित्त तुझे पायीं ॥३॥
करोनियां साह्य पुरवीं मनोरथ । व्हावें कृपावंत तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ १७०६ ॥

ऐसें सत्य माझ्या येईल अंतरा । तरि मज करा कृपा देवा ॥ १ ॥
वचनांसारिखें तळमळी चित्त । बाहेरि तो शांत होइल भाव ॥ २ ॥

तरि मज ठाव द्यावा पायांपाशीं । सत्यत्वें जाणसी दास खरा ॥ ३ ॥
तुका ह्मणे सत्य निकट सेवकें । तरिच भातुकें प्रेम द्यावें ॥ ४ ॥

॥ १७०७ ॥

ऋणाच्या परिहारा जालो वोळगणा । द्यावी नारायणा वासलाती ॥१॥
जालों उतराई शरीरसंकल्पें । चुकों द्यावीं पापें सकळही ॥ २ ॥
आजिवरी होतों धरूनि जिवासी । व्याजें कासाविसी बहु केलें ॥३॥
तुका ह्मणे मना आणिला त्यां भाव । तुमचा तेथें ठाव आहे देवा ॥४॥

॥ १७०८ ॥

आवडी न पुरे सेवितां न सरे । पडियेली धुरेसवें गांठी ॥ १ ॥
न पुरे हा जन्म हें सुख सांठितां । पुढतीही आतां हेंचि मागों ॥२॥
मारगाचि चिंता पालखी बैसतां । नाहीं उसंतिता कोसपेणी ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी विठ्ठल माउली । जाणे ते लागली भूक तान ॥ ४ ॥

॥ १७०९ ॥

सेवीन उच्छिष्ट लोळेन अंगणीं । वैष्णवां चरणीं होइन जोडा ॥ १ ॥
ऐसें जन्म आतां मज देईं देवा । आवडी हे जीवा सर्वकाळ ॥ २ ॥
त्यांचे चरणरज येती अंगावरी । वंदीत ते शिरीं जाइन मागें ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें राहिलासे भाव । सकळही वाव जाणोनियां ॥ ४ ॥

॥ १७१० ॥

नावडावें जन नावडावा मान । करूनि प्रमाण तूंचि होईं ॥ १ ॥
सोडवूनि देहसंबंध व्यसनें । ऐसी नारायणें कृपा कीजे ॥ २ ॥
नावडावें रूप नावडावे रस । अवघी राहो आस पायांपाशीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां आपुलिया सत्ता । करूनि अनंता ठेवा ऐसें ॥ ४ ॥

॥ १७११ ॥

आतां काढाकाढी करीं गा पंढरिराया । नाहीं तरी वांयां गेलों दास ॥ १ ॥
जाणतां बैसलों दगडाचे नावे । तिचा धर्म ब्यावे प्राण हाचि ॥ २ ॥
मनाचा स्वभाव इंद्रियांची ओढी । पतनाची जोडी वरी हांव ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाली अंधळ्याची परी । आतां मज हरी वाट दावीं ॥४॥

॥ १७१२ ॥

लाज वाटे पुढें तोंड दाखवितां । परि जाऊं आतां कोणापाशीं ॥ १ ॥
चुकलिया काम मागतों मुशारा । लाज फजितखोरा नाहीं मज ॥ २ ॥
पाय सोडुनियां फिरतों बाहेर । स्वामिसेवे चोर होऊनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज पाहिजे दंडिलें । पुढें हें घडलें न पाहिजे ॥ ४ ॥

॥ १७१३ ॥

आह्मां वैष्णवांचा कुळधर्म कुळींचा । विश्वास नामाचा एका भावें ॥ १ ॥
तरीच हरिचे दास ह्मणवितां श्लाघीजे । निर्वासना कीजे चित्त आधीं ॥२॥
गाऊं नाचूं प्रेमें आनंदें कीर्तनीं । भुक्ति मुक्ति दोन्ही न मागों तुज ॥३॥
तुका ह्मणे देवा ऐसी यांची सेवा । द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥४॥

॥ १७१४ ॥

मातेची अवस्था काय जाणे बाळ । तिसी तों सकळ चिंता त्याची ॥१॥
ऐसें परस्परें आहेचि विचारा । भोपळ्याचा तारा दगडासी ॥ २ ॥
भुजंग पोटाळी चंदनाचें अंग । निवे परि संग नव्हे तैसा ॥ ३ ॥
तुका ह्मणे करा परिसाचे परी । मज ठेवा सरी लोखंडाचे ॥ ४ ॥

॥ १७१५ ॥

किती तुजपाशीं देऊं परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ १ ॥
आतां माझे हातीं देई माझें हित । करीं माझें चित्त समाधान ॥ २ ॥
राग आला तरी कापूं नये मान । बाळा मायेविण कोण दुजें ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसा होईल लौकिक । मागे बाळ भीक समर्थाचें ॥ ४ ॥

॥ १७१६ ॥

पोट धालें मग नलगे परती । जालिया निश्चिंती खेळ गोड ॥ १ ॥
आपुलिया हातें देई वो कवळ । विठ्ठल शीतळ जीवन वरी ॥ २ ॥
घराचा विसर होईल आनंद । नाचेन मी छंदें प्रेमाचिया ॥ ३ ॥
तुका ह्मणे तोंच वरी करकर । मग हें उत्तर खंडईल ॥ ४ ॥

॥ १७१७ ॥

सारीन तें आतां एकाचि भोजनें । वारीन मागणें वेळोवेळां ॥ १ ॥

सेवटींचा घास गोड करीं माते । अगे कृपावंते पांडुरंगे ॥ २ ॥
वंचूं नये आतां कांहींच प्रकार । धाकल्याचें थोर जाल्यावरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां बहु चाळवावें । कांहीं नेदीं ठावें उरों मागें ॥ ४ ॥

॥ १७१८ ॥

नाहीं तुह्मां कांहीं लाविलें मागणें । कांटाळयाच्या भेणें त्रासलेती ॥ १ ॥
एखादिये परी टाळावी करकर । हा नका विचार देखों कांहीं ॥ २ ॥
पायांच्या वियोगें प्राणासवसाटी । नेवेंवसी तुटी जाली आतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मां मागणें तें आतां । हेंचि कृपावंता चरणीं वास ॥ ४ ॥

॥ १७१९ ॥

तुझें नाम माझे मुखीं असो देवा । विनवितों राघवा दास तुझा ॥ १ ॥
तुझ्या नामबळें तरले पतित । ह्मणोनि माझें चित्त तुझे पायीं ॥ २ ॥
तुका ह्मणे तुझें नाम हें सादर । गातां निरंतर सुख वाटे ॥ ३ ॥

॥ १७२० ॥

नको देऊं देवा पोटीं हें संतान । मायाजाळें जाण नाठवसी ॥ १ ॥
नको देऊं देवा द्रव्य आणि मान । तो एक उद्वेग होय जीवा ॥ २ ॥
तुका ह्मणे करीं फकिराचे परी । रात्रदिवस हरि येईल वाचे ॥ ३ ॥

॥ १७२१ ॥

नको मज ताठा नको अभिमान । तुजवांचूनि क्षीण होतो जीव ॥ १ ॥
दुर्धर हे माया न होय सुटका । वैकुंठनायका सोडवीं मज ॥ २ ॥
तुका ह्मणे तुझें झालिया दर्शन । मग निवारण होइल सर्व ॥ ३ ॥

॥ १७२२ ॥

हरी तुझें नाम गाईन अखंड । याविण पाखंड नेणें कांहीं ॥ १ ॥
अंतरीं विश्वास अखंड नामाचा । कायामनेंवाचा देईं हेंचि ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां देईं संतसंग । तुझे नामीं रंग भरो मना ॥ ३ ॥

॥ १७२३ ॥

आतां तरी मज सांगा साच भावें । काय म्यां करावें ऐसें देवा ॥ १ ॥

चुकावया कर्म नव्हतें कारण । केला होय सीण अवघाचि ॥ २ ॥
तुका ह्मणे नको पाहूं निरवाण । देईं कृपादान याचकासी ॥ ३ ॥
॥ १७२४ ॥
मागणें तें एक तुजप्रति आहे । देशी तरि पाहें पांडुरंगा ॥ १ ॥
या संतांसी निरवीं हेंचि मज देईं । आणिक दुजें कांहीं न मागे तुज ॥२॥
तुका ह्मणे आतां उदार तूं होईं । मज ठेवीं पायीं संतांचिया ॥ ३ ॥
॥ १७२५ ॥
कासयासी व्यर्थ घातलें संसारीं । होतें तैसें जरी तुझे चित्तीं ॥ १ ॥
तुझिये भेटीची थोर असे आस । दिसोनी निरास आली मज ॥ २ ॥
आतां काय जिणें जालें निरर्थक । वैकुंठनायक भेटेचि ना ॥ ३ ॥
आडलासी काय कृपेच्या सागरा । रखुमादेवीवरा सोइरिया ॥ ४ ॥
तुका ह्मणे देईं चरणाची सेवा । नुपेक्षीं केशवा मायबापा ॥ ५ ॥
॥ १७२६ ॥
हेंचि सुख पुढें मागतों आगळें । आनंदाचीं फळें सेवादान ॥ १ ॥
जन्मजन्मांतरीं तुझाचि अंकिला । करूनि विठ्ठला दास ठेवीं ॥ २ ॥
दुजा भाव आड येऊं नेदीं चित्ता । करावा अनंता नास त्याचा ॥३॥
अभय देऊनि करावें सादर । क्षण तो विसर पडों नेदीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मी जे जे इच्छा करूं । ते ते कल्पतरू पुरविसी ॥ ५ ॥
॥ १७२७ ॥
एकांतीचें सुख देईं मज देवा । आघात या जिवा चुकवूनि ॥ १ ॥
ध्यानीं रूप वाचे नाम निरंतर । आपुला विसर पडों नेदीं ॥ २ ॥
मायबाळा भेटी सुखाची आवडी । तैशी मज गोडी देईं देवा ॥ ३ ॥
कीर्ति ऐकोनियां जालों शरणांगत । दासाचें तूं हित करितोसी ॥४॥
तुका ह्मणे मी तों दीन पापराशी । घालावें पाठीशीं मायबापा ॥५॥
॥ १७२८ ॥
आतां तुज मज नाहीं दुजेपण । दाखवीं चरण पांडुरंगा ॥ १ ॥
तुज रूप रेखा नाम गुण नाहीं । एक स्थान पाहीं गांव सिव ॥ २ ॥

नावडे संगती तुज दुजयाची । आपुल्या भक्तांची प्रीति तुह्मां ॥ ३ ॥
परि आह्मांसाठीं होसील सगुण । स्तंभासी फोडून जयापरि ॥ ४ ॥
तुका ह्मणे तैसें तुज काय उणें । देई दरुषण चरणांचें ॥ ५ ॥

॥ १७२९ ॥

येणें मुखें तुझे वर्णी गुण नाम । तेंचि मज प्रेम देई देवा ॥ १ ॥
डोळे भरूनियां पाहें तुझें मुख । तेंचि मज सुख देई देवा ॥ २ ॥
कान भरोनियां ऐके तुझी कीर्ति । ते मज विश्रांति देई देवा ॥ ३ ॥
बाहें रंगीं टाळी नाचेन उदास । हें देई हातांस पायां बळ ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझा सकळ देहभाव । आणीक नको ठाव चिंतूं यासी ॥ ५ ॥

॥ १७३० ॥

पांडुरंगा कांहीं आइकावी मात । न करावें मुक्त आतां मज ॥ १ ॥
जन्मांतरें मज ऐसीं देई देवा । जेणें चरणसेवा घडे तुझी ॥ २ ॥
बाखाणीन कीर्ति आपुलिया मुखें । नाचेन मी सुखें तुजपुढें ॥ ३ ॥
करुनिकामारी दास दीनाहुनी । आपुला अंगणीं ठाव मज ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मी मृत्युलोकीं भले । तुझेचि अंकिले पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ १७३१ ॥

त्राहे त्राहे त्राहे सोडवीं अनंता । लागों दे ममता तुझे पायीं ॥ १ ॥
एकचि मागणें देई तुझी गोडी । नलगे आवडी आणिकाची ॥ २ ॥
तुझें नाम गुण वर्णीन पवाडे । आवडीच्या कोडें नाचों रंगीं ॥ ३ ॥
बापा विठ्ठलराया हेंचि देई दान । जोडती चरण जेणें तुझे ॥ ४ ॥
आवडीसारिखें मागितलें जरी । तुका ह्मणे करीं समाधान ॥ ५ ॥

॥ १७३२ ॥

अभयदान मज देई गा उदारा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥ १ ॥
देहभाव तुझ्या ठेवियेला पायीं । आणीक मी कांहीं नेणें दुजें ॥ २ ॥
सेवा भक्ति भाव नेणें मी पतित । आतां माझें हित तुझ्या पायीं ॥ ३ ॥
अवघा निरोपिला तुज देहभाव । आतां मज पाव पांडुरंगा ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुझें नाम दीनानाथ । तें मज उचित करीं आतां ॥ ५ ॥

॥ १७३३ ॥

पापाची वासना नको दावूं डोळां । त्याहूनि अंधळा बराच मी ॥१॥
निंदेचें श्रवण नको माझे कानीं । बधिर करोनी ठेवीं देवा ॥ २ ॥
अपवित्र वाणी नको माझ्या मुखा । त्याजहुनि मुका बराच मी ॥३॥
नको मज कधीं परस्त्रीसंगति । जनांतुन माती उठतां भली ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज अवघ्याचा कांटाळा । तूं एक गोपाळ आवडसी ॥५॥

॥ १७३४ ॥

माय बाप बंधु सोयरा सांगाती । तूंचि माझी प्रीति गण गोत ॥ १ ॥
शरण आलीं त्यांचीं वारिलीं दुरितें । तारिले पतित असंख्यात ॥ २ ॥
इतर कोण जाणे पावले विश्रांति । न येतां तुजप्रति शरणागत ॥ ३ ॥
तयामध्यें मज ठेवीं नारायणा । लक्षुमीरमणा सोइरिया ॥ ४ ॥
तुका ह्मणे देई दर्शनाचा लाभ । जे पाय दुर्लभ ब्रह्मादिकां ॥ ५ ॥

॥ १७३५ ॥

काय देह घालूं करवतीं कर्मेरीं । टाकूं या भितरीं अग्नीमाजी ॥ १ ॥
काय सेवूं वन शीत ऊष्ण तान । साहों कीं मोहन धरुनी बैसों ॥ २ ॥
काय लावूं अंगीं भस्म उधळण । हिंडूं देश कोण खुंट चारी ॥ ३ ॥
काय त्यजूं अन्न करुनि उपाय । काय करूं नास जीवित्वाचा ॥ ४ ॥
तुका ह्मणे काय करावा उपाव । ऐसा देई भाव पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ १७३६ ॥

आमुची कृपाळु तूं होसी माउली । विठ्ठले साउली शरणागता ॥ १ ॥
प्रेमपान्हां स्तनीं सदा सर्वकाळ । दृष्टि हे निर्मळ अमृताची ॥ २ ॥
भूक तान दुःख वाटों नेदीं सीण । अंतरींचा गुण जाणोनियां ॥ ३ ॥
आशा तृष्णा माया चिंता दवडीं दुरी । ठाव आह्मां करीं खेळावया ॥४॥
तुका ह्मणे लावीं संताचा सांगात । तेथें न पवे हात कळिकाळाचा ॥५॥

॥ १७३७ ॥

मानावया जग व्हावी द्रव्यमाया । नाहीं हें माझिया जीवा चाड ॥ १ ॥
तुझ्या पायांसाटीं केली आगणूक । आतां कांहीं एक नको दुजें ॥ २ ॥

करूनियां कृपा करीं अंगिकार । न लावीं उशीर आतां देवा ॥ ३ ॥
नव्हे साच कांहीं कळों आलें मना । ह्मणोनि वासना आवरिली ॥४॥
तुका ह्मणे आतां मनोरथ सिद्धी । माझे कृपानिधी पाववावे ॥ ५ ॥

॥ १७३८ ॥

तरि कां नेणते होते मागें ऋषि । तींहीं या जनासी दुराविलें ॥१॥
वोळगती जया अष्ट महासिद्धि । ते या जनबुद्धी नातळती ॥ २ ॥
कंदमुळें पाला धातूच्या पोषणा । खातील वास राना तरी केला ॥३॥
लावुनियां नेत्र उगेचि बैसले । न बोलत ठेले मौन्यमुद्रे ॥ ४ ॥
तुका ह्मणे ऐसें करीं माझ्या चित्ता । दुरावीं अनंता जन दुरी ॥५॥

॥ १७३९ ॥

नलगे देवा तुझें आह्मांसी वैकुंठ । सायुज्याचा पट नलगे मज ॥१॥
देई तुझें नाम मज सर्वकाळीं । मागणें वनमाळी हेंचि तुज ॥ २ ॥
नारद तुंबर उद्धव प्रल्हाद । बळी रुक्मांगद नाम ध्याती ॥ ३ ॥
सिद्ध मुनिगण गंधर्व किन्नर । करिताती गजर रामनामें ॥ ४ ॥
तुका ह्मणे हरी देई तुझें नाम । अखंडित प्रेम हेंचि द्यावें ॥ ५ ॥

॥ १७४० ॥

विश्वास धरूनि राहिलों निवांत । ठेवूनियां चित्त तुझे पायीं ॥ १ ॥
तरावें बुडावें तुझिया वचनें । निर्धार हा मनें केला माझ्या ॥ २ ॥
न कळे हें मज साच चाळविलें । देसी तें उगलें घेइन देवा ॥ ३ ॥
मागणें तें सरे ऐसें करीं देवा । नाहीं तरी सेवा सांगा पुढें ॥ ४ ॥
करावें कांहीं कीं पाहावें उगलें । तुका ह्मणे बोलें पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ १७४१ ॥

कृपाळु ह्मणोनि बोलती पुराणें । निर्धार वचनें यांचीं मज ॥ १ ॥
आणीक उपाय नेणोंचि मी कांहीं । तुझें वर्म ठायीं पडे तैसें ॥ २ ॥
नये धड कांहीं बोलतां वचन । रिघालों शरण सर्वभावें ॥ ३ ॥
कृपा करिसी तरि थोडें तुज काम । माझा तरि श्रम बहु हरे ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज दाखवीं श्रीमुख । हरेल या भूक डोळियांची ॥ ५ ॥

॥ १७४२ ॥

भावबळें कैसा जालासी लहान । मागें संतीं ध्यान वर्णियेलें ॥ १ ॥
तें मज उचित करूनियां देवा । दाखवीं केशवा मायबापा ॥ २ ॥
पाहोनियां डोळां बोलेन मी गोष्टी । आळिंगूनि मिठी देइन पायीं ॥३॥
चरणीं दृष्टि उभा राहेन समोर । जोडोनियां कर पुढें दोन्ही ॥ ४ ॥
तुका ह्मणे उत्कंठित वासना । पुरवीं नारायणा आर्त माझें ॥ ५ ॥

॥ १७४३ ॥

आत्मस्थिति मज नको हा विचार । देईं निरंतर चरणसेवा ॥ १ ॥
जन्मोजन्मीं तुझा दास पुरुषोत्तमा । हेचि गोडी माझ्या देईं जीवा ॥२॥
काय सायुज्यता मुक्ति हेचि गोड । देव भक्त कोड तेथें नाहीं ॥३॥
काय तें निर्गुण पाहों कैशा परी । वर्णूं तुझी हरी कीर्ती कैसी ॥४॥
गोड चरणसेवा देवभक्तपणें । मज देवा ह्मणें दुरावसी ॥ ५ ॥
जाणिवेपासूनि सोडवीं माझ्या जीवा । देईं चरणसेवा निरंतर ॥६॥
तुका ह्मणे गोडा गोड नलगे प्रीति । सेवेविण चित्तीं सार नाहीं ॥ ७ ॥

॥ १७४४ ॥

कुळींचें दैवत ज्याचें पंढरीनाथ । होईन दासीसुत त्याचे घरीं ॥१॥
शुद्ध यातिकुळवर्णा चाड नाहीं । करीं भलते ठायीं दास तुझा ॥२॥
पंढरीसी कोणी जाती वारकरी । होईन त्याचे घरीं पशुयाति ॥३॥
विठ्ठलचिंतन दिवसरात्रीं ध्यान । होईन पायतन त्याचे पायीं ॥ ४ ॥
तुळसीवृंदावन जयाचे अंगणीं । होईन केरसुणी त्याचे घरीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे हाचि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिकां गति चाड मज ॥६॥

॥ १७४५ ॥

पढियंतें आह्मीं तुजपाशीं मागावें । जीवींचें सांगावें हितगुज ॥ १ ॥
पाळसील लळे दीन वो वत्सले । विठ्ठले कृपाळे जननिये ॥ २ ॥
जीव भाव तुझ्या ठेवियेला पायीं । तूंचि सर्वा ठायीं एक आह्मां ॥३॥
दुजियाचा संग लागों नेदीं वारा । नाहीं जात घरा आणिकांच्या ॥४॥

सर्व सत्ता आहे एकी तुजपाशीं । ठावें आहे देसी मागेन तें ॥ ५ ॥
ह्मणऊनि पुढें मांडियेली आळी । थिंकोनियां चोळी डोळे तुका ॥ ६ ॥

॥ १७४६ ॥

अगा करुणाकरा करितसें धांवा । या मज सोडवा लवकरी ॥ १ ॥
ऐकोनियां माझीं करुणेचीं वचनें । व्हावें नारायणें उतावीळ ॥ २ ॥
मागें पुढें अवघा दिसे रिता ठाव । ठेवूनि पायीं भाव वाट पाहें ॥ ३ ॥
उशीर तो आतां न पाहिजे केला । अहोजी विठ्ठला मायबापा ॥ ४ ॥
उरलें तें एक हेंचि मज आतां । अवघें विचारितां शून्य जालें ॥ ५ ॥
तुका ह्मणे आतां करीं कृपादान । पाउलें समान दावीं डोळां ॥ ६ ॥

॥ १७४७ ॥

मागता भिकारी जालों तुझे द्वारीं । देई मज हरी कृपादान ॥ १ ॥
प्रेम प्रीति नाम उचित करावें । भावें संचारावें हृदयामाजी ॥ २ ॥
सर्वभावें शरण आलों पांडुरंगा । कृपाळु तूं जगामाजी एक ॥ ३ ॥
तापत्रयें माझी तापविली काया । शीतळ व्हावया पाय तुझे ॥ ४ ॥
संबंधीं जनवाद पीडिलों परोपरी । अंतरलों दुरी तुजसी तेणें ॥ ५ ॥
तुका ह्मणे आतां तुझा शरणागत । करावें सनाथ मायबापा ॥ ६ ॥

॥ १७४८ ॥

न ह्मणे कवणां सिद्ध साधक गंव्हार । अवघा विश्वंभर वांचूनिया ॥ १ ॥
ऐसें माझे बुद्धि काया वाचा मन । लावीं तुझें ध्यान पांडुरंगा ॥ २ ॥
गातां प्रेमगुण शंका माझ्या मनीं । नाचतां रंगणीं नाठवावी ॥ ३ ॥
देई चरणसेवा भूतांचें भजन । वर्णा अभिमान सांडवूनि ॥ ४ ॥
आशापाश माझी तोडी माया चिंता । तुजविण व्यथा नको कांहीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे सर्व भाव तुझे पायीं । राहे ऐसें देई प्रेम देवा ॥ ६ ॥

॥ १७४९ ॥

आतां केशिराजा हेचि विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
देह असो माझा भलतिये ठायीं । चित्त तुझ्या पायीं असों द्यावें ॥ २ ॥
काळाचें खंडण घडावें चिंतन । धनामानजनविन्मुख तो ॥ ३ ॥

कफवातपित्त देहअवसानीं । ठेवावीं वारूनि दुरितें हीं ॥ ४ ॥
सावध तों माझीं इंद्रियें सकळें । दिलीं एक वेळे हाक आधीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे तूं या सकळांचा जनिता । येथें ऐकता सकळांसी ॥ ६ ॥

॥ १७५० ॥

देवा आतां ऐसा करीं उपकार । देहाचा विसर पाडीं मज ॥ १ ॥
तरीच हा जीव सुख पावे माझा । बरें केशीराजा कळों आलें ॥ २ ॥
ठाव देईं चित्ता राखें पायांपाशीं । सकळ वृत्तींसी अखंडित ॥ ३ ॥
आस भय चिंता लाज काम क्रोध । तोडावा संबंध यांचा माझा ॥ ४ ॥
मागणें तें एक हेंचि आहे आतां । नाम मुखीं संतसंग देईं ॥ ५ ॥
तुका ह्मणे नको वरपंग देवा । घ्यावी माझी सेवा भावशुद्ध ॥ ६ ॥

॥ १७५१ ॥

आला भागासी तो करीं व्यवसाय । परि राहो भाव तुझ्या पायीं ॥ १ ॥
काय चाले तुह्मीं बांधलें दातारा । वाहिलिया भारा उसंतितों ॥ २ ॥
शरीर तें करी शरीराचे धर्म । नको देऊं वर्म चुकों मना ॥ ३ ॥
चळण फिरवी ठाव वहुवस । न घडो आळस चिंतनाचा ॥ ४ ॥
इंद्रियें करोन आपुले व्यापार । आवडीसी थार देईं पायीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे नको देऊं काळा हातीं । येतों काकुलती ह्मणऊनि ॥ ६ ॥

॥ १७५२ ॥

चाल घरा उभा राहें नारायणा । ठेवूं दे चरणांवरि माथा ॥ १ ॥
वेळोवेळां देईं क्षेमआलिंगन । वरि अवलोकन कृपादृष्टी ॥ २ ॥
प्रक्षाळूं दे पाय बैसें माजवरीं । चित्त स्थिर करीं पांडुरंगा ॥ ३ ॥
आहे त्या संचितें करवीन भोजन । काय न जेवून करिसी आतां ॥ ४ ॥
करुणाकरें नाहीं कळों दिलें वर्म । दुरी होतां भ्रम कोण वारी ॥ ५ ॥
तुका ह्मणे आतां आवडीच्या सत्ता । बोलिलों अनंता करवीन तें ॥ ६ ॥

॥ १७५३ ॥

नरस्तुति आणि कथेचा विकरा । हें नको दातारा घडों देऊं ॥ १ ॥
ऐसिये कृपेची भाकितों करुणा । आहेसि तूं राणा उदाराचा ॥ २ ॥

पराविया नारी आणि परधना । नको देऊं मनावरि येऊं ॥ ३ ॥
भूतांचा मत्सर आणि संतनिंदा । हें नको गोविंदा घडों देऊं ॥ ४ ॥
देहअभिमान नको देऊं शरीरीं । चढों कांहीं परी एक देऊं ॥ ५ ॥
तुका ह्मणे तुझ्या पायांचा विसर । नको वारंवार पडों देऊं ॥ ६ ॥

॥ १७५४ ॥

तुझें नाम मुखीं न घेतां आवडी । जिव्हा तेचि घडी झडो माझी ॥ १ ॥
हें मज देई हें मज देई । आणिक दुजें कांहीं न मगें तुज ॥ २ ॥
बहिर कान तुझी कीर्ति नाइकतां । पाय न देखतां जात डोळे ॥ ३ ॥
मना तुझें ध्यान नाहीं नित्य काळ । धिग ते चांडाळ जळो जळो ॥ ४ ॥
हात पाय तेणें पंथें न चालतां । जावोत अनंता गळोनिया ॥ ५ ॥
तुजविण जिणें नाहीं मज चाड । तुका ह्मणे गोड नाम तुझें ॥ ६ ॥

॥ १७५५ ॥

अखंड जया तुझी प्रीति । मज दे त्याचि संगति । मग मी कमळा-
पति । तुज नागीं कांटाळा ॥ १ ॥ पडून राहेन तें ठायीं । उगाचि संतां-
चिये पायीं । न मगें तेथें कांहीं । तुझी आण गा विठोबा ॥ २ ॥
तुह्मी आह्मी पीडों ध्यानें । दोन्ही वारनी एकानें । बैसलों धरणें ।
हाका देत दाराशीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे या बोला । चित्त द्यावें बा वि-
ठ्ठला । न पाहिजे केला । अवघा माझा अव्हेर ॥ ४ ॥

॥ १७५६ ॥

तुझ्या रूपें माझी काया । भरों रात्रीं पंढरीराया । दर्पणींची छाया ।
एका रूपें भिन्नत्व ॥ १ ॥ सुख पडिलें साठवण । सत्ता वेचे शनें शनें ।
आडचणीचे कोन । चारी मार्ग उगवले ॥ २ ॥ वसो डोळ्यांची बा-
हुली । कवळें भिन्न छाया आली । कृष्णांजनें चाली । नव्हे परती
माघारी ॥ ३ ॥ जीव ठसावला शिवें । मना आलें तेथें जावें । फांटा
पाडिला नांवें । तुका ह्मणे खंडलें ॥ ४ ॥

॥ १७५७ ॥

होईन खडे गोटे । चरण रज साने मोटे । पंढरीचे वाटे । संतच-

रणीं लागेन ॥ १ ॥ आणीक काय दुजें । म्यां मागणें तुजपासीं । अविट तें सुख । भय नास नाहीं ज्यासी ॥२॥ होईन मोचे वाहणा । पायीं सकळां संतजनां । मांजर सुकर सुणा । जवळी शेष घ्यावया ॥३॥ सांडोवा पायरी । वाहळ बावी गंगातिरीं । होईन तयावरी । संतसज्जन चालती ॥४॥ लागें संता पायीं । ऐसा ठेवीं भलते ठायीं । तुका ह्मणे देई । धाक नाहीं जन्माचा ॥ ५ ॥

॥ १७५८ ॥

उद्धवअक्रूरासी । आणीक व्यासआंबऋषी । रुक्मांगदप्रल्हादासीं । दाविलें तें दाखवीं ॥१॥ तरि मी पाहेन पाहेन । तुझे श्रीमुखचरण । उताविळ मन । तयाकारणें तेथें ॥२॥ जनकश्रुत देवा करीं । कैसा शोभलासी हरी । विदुराच्या घरीं । कण्या धरी कवतुकें ॥ ३ ॥ पांडवां अकांतीं । तेथें पावसी स्मरती । घातलें द्रौपदी । यागीं बिरडें चोळीचें ॥४॥ करी गोपीचें कवतुक । गाईगोपाळांसी सुख । दावी तेंचि मुख । दृष्टी माझ्या आपुलें ॥५॥ तरि तूं अनाथाचा दाता। मागतियां शरणागतां । तुका ह्मणे आतां । कोड पुरवीं हें माझें ॥६॥

॥ १७५९ ॥

हेंचि माझे चित्तीं । राहो भाव पीति । विठ्ठल सुषुप्ती । जागृति स्वप्नासी ॥१॥ आणिक नाहीं तुज मागणें । राज्यचाड संपत्ति धन । जिव्हे सुख तेणें । घेतां देहीं नाम तुझें ॥ २ ॥ तुझें रूप सर्वां ठायीं । देखें ऐसें प्रेम देई । ठेवावा हा पायीं । अनुभव चित्ताचा ॥३॥ जन्ममरणाचा बाध । समुळूनि तुटे कंद । लागो हाचि छंद । हरि गोविंद वाचेसी ॥४॥ काया पालटे दरुषणें । अवघें कोंदाटे चैतन्य । जीवशिवा खंडण । होय तरे चिंतिता ॥५॥ तुका ह्मणे याचि भावें । आह्मी धालों तुझ्या नावें । सुखें होत जन्में । भलते याती भलतैशीं ॥ ६ ॥

॥ १७६० ॥

जळो माझी ऐसी बुद्धी । मज घाली तुजमधीं । आवडी हे विधि ।

निषेधींची चांगली ॥१॥ तूं स्वामी मी सेवक । उंच पद निंच एक । ऐसें करावें कौतुक । नको करूं खंडणा ॥२॥ जळ न खाती जळा । वृक्ष आपुलिया फळा । भोक्ता निराळा । तेणें गोडी निवडिली ॥३॥ हिरा शोभला कोंदणें । अळंकारीं मिरवे सोनें । एक असतां तेणें । काय दुजें जाणावें ॥४॥ उष्णें छाये सुख वाटे । बाळें माते पान्हा फुटे । एका एक भेटे । कोण सुख ते काळीं ॥५॥ तुका ह्मणे हित । हेंचि मानी माझें चित्त । नव्हे आतां मुक्त । ऐसा जाला भरवसा ॥६॥

॥ १७६१ ॥

माझें मज आतां न देखें निरसतां । ह्मणऊन आधार केला । संसाराची आस सांडुनि लौकिक । जीवभाव तुज दिला । नव्हतीं माझीं कोणी मी कवणांचा । अर्थ मोहो सांडवला । तारीं मारीं करीं भलतें दातारा । होऊन तुझा आतां ठेलों रे ॥१॥ असो माझें कोडें तुज हें सांकडें । मी असेन निवाडें सुखरूप । बाळकासी चिंता काय पोटवेथा । जया शिरीं मायबाप ॥२॥ पापपुण्यें श्रुति आटिल्या । शास्त्रांस न लगेचि ठाव । विधिनिषेधें गोविलीं पुराणें । वेदांसी तो अहंभाव । ओंकाराचें मूळ व्यापिलें माया । तेथें न धरेच भाव । ह्मणऊन काबाड । सांडिलें उपसतां । धरिलें तुझेंचि नांव ॥ ३ ॥ तनमनइंद्रियें ठेवूनि राहिलों । सर्व आशा तुझे पायीं । तप तीर्थ दान करवूं कवणा । हातीं आधीन तें मज काई । आहिक्यें परत्रें चाड नाहीं सर्वथा । जन्म सदा मज देई । मायामोहपाश करीं विष तैसें । तुका ह्मणे माझ्या ठायीं ॥ ४ ॥

॥ १७६२ ॥

संसारापासूनी कैसें सोडविशी । न कळे हृषीकेशी काय जाणें । करितां न सरे अधिक वाट पाहीं । तृष्णा देशधडी केलों । भक्तिभजनभाव यांसी नाहीं ठाव । चरणीं तुझ्या अंतरलों । मग पुढें रीग न पुरेचि पाहतां । अवघा अवघीं वेष्टिलों ॥ १ ॥ आतां माझी

लाज राखें नारायणा । हीन दीन लीन याचकाची । करितां न कळे कांहीं असतील गुण दोष । करीं होळी संचिताची ॥ २ ॥ इंद्रियें द्वारें मन धांवे सैरें । नावरे करितांचि कांहीं । हात पाय कान मुख लिंगस्थान । नेत्र घ्राण द्वारें पाहीं । जया जैसी सोय तया तैसें होय । क्षण एक स्थिर नाहीं । करिती ताडातोडी ऐसी यांची खोडी । न चले माझें यास कांहीं ॥ ३ ॥ शरीरसंबंधु पुत्र पत्नी बंधु । धन लोभ मायावंत । जन लोकपाळ मैत्र हे सकळ । सोयरीं सज्जनें बहुतें । नाना कर्म डाय करितां उपाय । बुडावया घातपातें । तुका ह्मणे हरी राखें भलत्यापरी । आह्मी तुह्मीं शरणागतें ॥ ४ ॥

॥ १७६३ ॥

मागणें तें एक तुज । देईं विचारोनि मज ॥ १ ॥ नको दुर्जनांचा संग । क्षणक्षणा चित्तभंग ॥ २ ॥ जन्म घेईन मी नाना । बहु सोसीन यातना ॥ ३ ॥ रंक होईन दीनांचा । घाये देहपात साचा ॥ ४ ॥ तुका ह्मणे हेंचि आतां । देईं देईं तूं सर्वथा ॥ ५ ॥

॥ १७६४ ॥

दुडीवरी दुडी । चाले मोकळी गुजरी ॥ १ ॥ ध्यान लागो ऐसें हरी । तुझे चरणीं तैशापरी ॥ २ ॥ आंवतण्याची आस । जैसी लागे दुर्बळास ॥ ३ ॥ लोभ्या कळांतराची आस । बोटें मोजी दिवस मास ॥४॥ तुका ह्मणे पंढरीनाथा । मजला आणिक नको व्यथा ॥५॥

॥ १७६५ ॥

काय बोलों सांगा । याउपरी पांडुरंगा ॥ १ ॥ कांहीं आधाराचांचून । पुढें न चले वचन ॥ २ ॥ वाढे ऐसा रस । कांहीं करावा सौरस ॥ ३ ॥ भक्तिभाग्यसीमा । द्यावा जोडोनियां प्रेमा ॥ ४ ॥ कोरड्या उत्तरीं । नको गौरवूं वैखरी ॥५॥ करी विज्ञापना । तुका प्रसादाची दाना ॥६॥

॥ १७६६ ॥

भोगियेल्या नारी । परी तो बाळब्रह्मचारी ॥ १ ॥ ऐसी ज्याचे अंगीं कळा । पार न कळे वेदाला ॥२॥ वळीवळी थोरथोर । मोडोनियां

केले चूर ॥ ३ ॥ वांकडी कुबज्या । सरसी आणियेली वोजा ॥ ४ ॥ मल्ल रगडिला पायीं । गज झुगारिला बाहीं ॥ ५ ॥ जिवें मारियेला मामा । धांवे भक्ताचिया कामा ॥६॥ तुका ह्मणे पूर्ण । दावी भक्तीचीं विंदानें ॥७॥

॥ १७६७ ॥

तुझे पाय माझें भाळ । एकत्रता सर्वकाळ ॥ १ ॥ हेंचि देईं विठा-बाई । पांडुरंगे माझे आई ॥२॥ नाहीं मोक्ष मुक्ति चाड । तुझी सेवा लागे गोड ॥ ३ ॥ सदा संग सज्जनांचा । नको वियोग पंढरीचा ॥ ४ ॥ नित्य चंद्रभागे स्नान । करीं क्षेत्रप्रदक्षण ॥५॥ पुंडलिक पाहोनि दृष्टि । हर्षे नाचों वाळवंटीं ॥६॥ तुका ह्मणे पांडुरंगा । तुझें स्वरूप चंद्रभागा ॥७॥

॥ १७६८ ॥

विनवितों सेवटीं । आहे तैसें माझे पोटीं ॥ १ ॥ कंठीं राहावें राहावें । हेंचि मागतसें भावें ॥ २ ॥ पुरली वासना । येणें होइल नारायणा ॥३॥ तुका ह्मणे जो देहाडा । तोचि वर्णीन पवाडा ॥ ४ ॥

॥ १७६९ ॥

राहाणें तें पायांपाशीं । आणिका रसीं विटोनि ॥ १ ॥ ऐसा धीर देईं मना । नारायणा विनवितों ॥२॥ अंतरीं तो तुझा वास । आणिकां नास कारणां ॥ ३ ॥ तुका ह्मणे शेवटींचें । वाटे साचें राखावें ॥ ४ ॥

॥ १७७० ॥

चिंतनाची जोडी । हाचि लाभ घडोघडी ॥ १ ॥ तुह्मी वसूनि अंतरीं । मज जागवा निर्धारीं ॥२॥ जेथें जेथें जाय मन । आड घाला सुदर्शन ॥ ३ ॥ तुका ह्मणे भोजें । नाचें हो ऐसें न लजें ॥ ४ ॥

॥ १७७१ ॥

आळस पाडी विषयकामीं । शक्ती देईं तुझ्या नामीं ॥१॥ हेचि विनवणी विनवणी । विनविली धरा मनीं ॥२॥ आणिक वचना मुकी वाणी । तुम-च्या गर्जो द्यावी गुणीं ॥३॥ तुका ह्मणे पाय डोळां । पाहें एरवी अंधळा ॥४॥

॥ १७७२ ॥

देव वसे चित्तीं । त्याची घडावी संगती ॥ १ ॥ ऐसें आवडतें

मना । देवा पुरवावी वासना ॥२॥ संत जनासवें भेटी । नद्दो अंग-संगें तुटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जिणें । भलें संतसंघट्टणें ॥ ४ ॥

॥ १७७३ ॥

माप ह्मणे मी मवितें । भरी धणी ठेवी रितें ॥ १ ॥ देवा अभिमान नको । माझेठायीं देऊं सकों ॥ २ ॥ देशीं चाले सिका । रितें कोण लेखी रंका ॥ ३ ॥ हातीं सूत्रदोरी । तुका ह्मणे त्याची थोरी ॥ ४ ॥

॥ १७७४ ॥

माझ्या मना लागो चाळा । पाहावयां विठ्ठल डोळां ॥ १ ॥ आणीक नाहीं चाड । नलगे संसार हा गोड ॥२॥ तरिच फळ जन्मा आलों। सरता पांडुरंगीं जालों ॥३॥ तुका ह्मणे देवा। देई चरणांची सेवा ॥४॥

॥ १७७५ ॥

विधवेसी एक सुत । अहर्निशीं तेथें चित्त ॥ १ ॥ तैसा तूं मज एकला । नको मोकलूं विठ्ठला ॥ २ ॥ सुपुत्रालागीं बाप । अवघे तेथेंचि संकल्प ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्तीं । पतिव्रते जैसा पति ॥ ४ ॥

॥ १७७६ ॥

ज्याचें जैसें भावी मन । त्यासी देणें दरूषण ॥ १ ॥ पुरवूं जाणे मनींची खूण । समाधान करोनी ॥ २ ॥ आपणियातें प्रगट करी । छाया बरी कृपेची ॥३॥ तुका ह्मणे केलें दान । मन उन्मन हरिनामीं॥४॥

॥ १७७७ ॥

हेंचि मागणें विठाबाई । पायीं ठेवूनियां डोई ॥ १ ॥ शांति दया अंतःकरणीं । रंगो नामनामीं वाणी ॥२॥ मूळ द्वंद्वाचे विघडो । निजानंदीं वृत्ति जडो ॥३॥ तुका ह्मणे हरी । आतां आपुलेंसें करीं ॥ ४ ॥

॥ १७७८ ॥

अगा पंढरीच्या राया । वेगीं येई तूं सावया ॥१॥ दीनबंधु तुझें नाम । देई आपुलें आह्मां प्रेम ॥ २ ॥ जीवनकळा तूं विश्वाची । तूंचि माउली अनाथाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुंडलीका । ठेवीं मस्तकीं पादुका॥४॥

॥ १७७९ ॥

आतां द्यावें अभयदान । जीवन ये कृपेचें ॥ १ ॥ उभारोनि बाहो देवा । हात ठेवा मस्तकीं ॥ २ ॥ नाभी नाभी या उत्तरें । करुणाकरें सांतवींजे॥३॥ तुका ह्मणे केली आस । तो हा दिस फळाचा ॥४॥

॥ १७८० ॥

शेवटींची हे विनंती । पाय चित्तीं राहावे ॥ १ ॥ ऐसें करा कृपादान । तुह्मां मन सान्निध ॥ २ ॥ भाग्याविण कैंची भेटी । नव्हे तुटी चिंतनें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळसा आलें । हें विठ्ठलें परिसावें ॥४॥

॥ १७८१ ॥

वोढविलें अंग । आतां करूनि घ्यावें सांग ॥ १ ॥ काय पूजा ते मी नेणें । जाणावें जी सर्व जाणें ॥२॥ पोटा आलें बाळ । त्याचें जाणावें सकळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरी । वाहावें जी कडियेवरी ॥ ४ ॥

॥ १७८२ ॥

जिकडे पाहे तिकडे देव । ऐसा भाव दे कांहीं ॥ १ ॥ काय केलों एकदेशीं । गुणदोषीं संपन्न ॥ २ ॥ पडे तेथें तुझ्या पायां । करीं वांयां न वजें तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे विषमें सारी । ठाणें धरी जिवासी॥४॥

॥ १७८३ ॥

जिकडे जाय तिकडे सवें । आतां यावें यावरी ॥१॥ माझ्या अवघ्या भांडवला । तूं एकला जालासी ॥२॥ आतां दुजें धरा ह्मणी । पायांहूनि वेगळें ॥३॥ तुका ह्मणे आतां देवा । नका गोवा यावरी ॥ ४ ॥

॥ १७८४ ॥

आतां बरें जालें । माझें मज कळों आलें॥१॥ खोटा ऐसा संसार । मज पायीं द्यावा थार ॥ २ ॥ उघडले डोळे । भोग देतां काळीं कळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीवा । होतां तडातोडी देवा ॥ ४ ॥

॥ १७८५ ॥

केलियाचें दान । करा आपुलें जतन ॥१॥ माझी बुद्धि स्थिर देवा ।

नाहीं विषयांचा हेवा ॥ २ ॥ भावा अंतराय । येती अंतरती पाय ॥३॥ तुका ह्मणे जोडी । आदी अंतीं राहो गोडी ॥ ४ ॥

॥ १७८६ ॥

पाहें तिकडे दिशा ओस । अवघी आस पायां पें ॥१॥ मनचि साच होईल कई । प्रेम देई भेटोनि ॥ २ ॥ सर्वोपरी पांगुळ असें । न कळे कैसें तें तुह्मां ॥३॥ तुका ह्मणे कृपावंता । तूं तों दाता दीनाचा ॥ ४ ॥

॥ १७८७ ॥

जेणें होय हित । तें तूं जाणसी उचित ॥१॥ मज नको लावूं तैसें । वांयां जाये ऐसें पिसें ॥ २ ॥ धरितोसि सत्ता । होसी सकळ जाणता ॥ ३ ॥ चतुराच्या राया । अंगीकारावें तुकया ॥ ४ ॥

॥ १७८८ ॥

करूनि विनवणी । माथा ठेवितों चरणीं ॥ १ ॥ होतें तेंचि असों द्यावें । रूप सौम्यचि बरवें ॥ २ ॥ भया ऐणें तुमचा ठाव । तुमच्या कोपें कोठें जावें ॥ ३ ॥ तुका पाया लागे । दान समुदाय मागे ॥४॥

॥ १७८९ ॥

वर्ततां बासर । काय करावें शरीर ॥ १ ॥ ठेवा नेमून नेमून । माझें तुमचे पायीं मन ॥ २ ॥ नेदाविया वृत्ती । कोठें फांकोंचि श्रीपती ॥ ३ ॥ तुका ह्मणे भलें । जन्मा येऊनिया जालें ॥ ४ ॥

॥ १७९० ॥

दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजो नारायणा ॥ १ ॥ आतां मज ऐसें करीं । तुझे पाय चित्तीं धरीं ॥ २ ॥ उपजला भावो । तुमचे कृपें सिद्धी जावो ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां । लाभ नाहीं या परता ॥४॥

॥ १७९१ ॥

अहो कृपावंता । होई बुद्धीचा ये दाता ॥ १ ॥ जेणें पाविजे उद्धार । होय तुझे पायीं थार ॥ २ ॥ वदवी हे वाचा । भाव पांडुरंगीं साचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । माझें अंतर वसवा ॥ ४ ॥

॥ १७९२ ॥

निर्धाराचें अवघें गोड । वाटे कोड कौतुक ॥ १ ॥ बैसलिया भाव

पायीं । बरा तई नाचेन ॥ २ ॥ स्वामी कळे सावधान । तरि मन उल्हासे ॥ ३ ॥ तुका ह्मणे आश्वासावें । प्रेम द्यावें विठ्ठलें ॥ ४ ॥

॥ १७९३ ॥

माझे पाय तुझी डोई । ऐसें करीगा भाक देई ॥ १ ॥ पाहतां दिसे उफराटें । घडे तरी भाग्य मोठें ॥ २ ॥ बहु साधन मोलाचें । यासी जोडा दुजें कैचें ॥३॥ नका आनुमानू विठ्ठला । तुका ह्मणे धडा जाला॥४॥

॥ १७९४ ॥

एक आतां तुह्मी करा । मज दातारा सत्तेनें ॥ १ ॥ विश्वास तो पायांवरी । ठेवुनि हरी राहिलों ॥२॥ जाणतचि दुजें नाहीं । आणिक कांहीं प्रकार ॥३॥ तुका ह्मणे शरण आलों । काय बोलों विनवितों ॥४॥

॥ १७९५ ॥

तुजवरी ज्याचें मन । दरुशन दे त्याचें ॥ १ ॥ कैसा जाती शुद्ध भाव । हात पाव ना वृत्ती ॥ २ ॥ अवघियांचा करूनि मेळा । तुज डोळा रोखिलें ॥३॥ तुका ह्मणे तुज आड । लपोनि कोड दावीं देवा ॥ ४ ॥

॥ १७९६ ॥

प्राण समर्पिला आह्मी । आतां उशीर कां स्वामी ॥ १ ॥ माझें फेडावें उसणें । भार न मना या ऋणें ॥२॥ जाला कंठस्फोट । जवळी पातलों निकट ॥३॥ तुका ह्मणे सेवा । कैसी बरी वाटे देवा ॥४॥

॥ १७९७ ॥

आतां माझ्या मायबापा । तूं या पापा प्रायश्चित्त ॥१॥ फजित ये केले खळ । तो विटाळ निवारीं ॥ २ ॥ प्रेम आतां पाजीं रस । करीं वास अंतरीं ॥३॥ तुका ह्मणे पांडुरंगा । जिवलगा माझिया ॥४॥

॥ १७९८ ॥

धर्माची तूं मूर्ति । पाप पुण्य तुझे हातीं ॥ १ ॥ मज सोडवीं दातारा । कर्मापासूनि दुस्तरा ॥ २ ॥ करिसी अंगीकार । तरी काय माझा भार ॥३॥ जिवांच्या जीवना । तुका ह्मणे नारायणा ॥४॥

॥ १७९९ ॥

मज दास करीं त्यांचा । संतदासांच्या दासांचा ॥१॥ मग होत कल्पवरी । सुखें गर्भवास हरी ॥२॥ नीचवृत्तिकाम । परी मुखीं तुझें नाम ॥३॥ तुका ह्मणे सेवे । माझे संकल्प वेंचावे ॥४॥

॥ १८०० ॥

बोलायाचा त्यासीं । नको संबंध मानसीं ॥१॥जया घडली संतानिंदा । तुज विसरुनि गोविंदा ॥२॥ जळो त्याचें तोंड । नको दृष्टीपुढें भांड ॥३॥ तुका ह्मणे देवा । तया दुरी मज ठेवा ॥४॥

॥ १८०१ ॥

काय दिनकरा । केला कोंबड्यानें खरा ॥१॥ कां हो ऐसा संत ठेवा। भार माझे माथां देवा ॥ २ ॥ आडविलें दासीं । तरि कां मरती उपवासी ॥३॥ तुका ह्मणे हातीं । कळा सकळ अनंतीं ॥४॥

॥ १८०२ ॥

अधमाची यारी । रंग पतंगाचे परी ॥१॥ विटे न लगतां क्षण । मोल जाय वांयावीण ॥ २ ॥ सर्पाचिया परी । विषें भरला कल्हारीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । मज झणी ऐसे दावा ॥४॥

॥ १८०३ ॥

काय कळे बाळा । बाप सदैव दुबळा ॥ १ ॥ आहे नाहीं हें न कळे । हातीं काय कोण्या वेळे ॥२॥ देखिलें तें दृष्टी । मागे घालूनिया मिठी ॥३॥ तुका ह्मणे भावें । माझ्यामज समजावें ॥४॥

॥ १८०४ ॥

नसे तरी मनीं नसो । परी वाचे तरी वसो ॥१॥ देह पडो या चिंतनें । विठ्ठलनामसंकीर्तनें ॥ २ ॥ दंभस्थिती भलत्या भावें । मज हरिजन ह्मणावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे काळें तरी । मज सांभाळील हरी ॥ ४ ॥

॥ १८०५ ॥

पुढिलाचें इच्छी फळ । नाहीं बळ तें अंगीं ॥ १ ॥ संत गेले तया ठाया । देवराया पाववीं ॥ २ ॥ ज्येष्ठांची कां आह्मां जोडी । परवडी न लभों ॥ ३ ॥ तुका ह्मणे करीं कोड । पुरवीं लाड आमुचा ॥ ४ ॥

॥ १८०६ ॥

आली सलगी पायांपाशीं । होइल तैसी करीन ॥१॥ आणीक आम्हीं कोठें जावें । येथें जीवें वेचलों ॥२॥ अवघ्या निरोपणा भाव । हाचि ठाव उरलासे ॥३॥ तुका ह्मणे पाळी लळे । कृपाळुवे विठ्ठले ॥४॥

॥ १८०७ ॥

ठाकलोंसें द्वारीं । उभें याचक भीकारी ॥१॥ मज भीक कांहीं देवा । प्रेमभातुकें पाठवा ॥२॥ याचकाचा भार । नये घेऊं येरझार ॥ ३ ॥ तुका ह्मणे दान । सेवा घेतल्यावांचून ॥४॥

॥ १८०८ ॥

लक्ष्मीवल्लभा । दिनानाथा पद्मनाभा ॥ १ ॥ सुख वसे तुझे पायीं । मज ठेवीं तेचि ठायीं ॥ २ ॥ माझी अल्प हे वासना । तूं तो उदाराचा राणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे भोगें । पीडा केली धांव वेगें ॥ ४ ॥

॥ १८०९ ॥

वांयां जातों देवा । नेणें भक्ती करूं सेवा ॥ १ ॥ आतां जोडोनियां हात । उभा राहिलों निवांत ॥ २ ॥ करावें तें काय । न कळे अवलोकितों पाय ॥ ३ ॥ तुका ह्मणे दान । दिलें पदरीं घेईन ॥ ४ ॥

॥ १८१० ॥

तुज मागणें तें देवा । आह्मां तुझी चरणसेवा ॥ १ ॥ आन नेघों देसी तरी । रिद्धि सिद्धि मुक्ति चारी ॥२॥ संतसंगति सर्वकाळ । थोर प्रेमाचा सुकाळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाम । तेणें पुरे माझें काम ॥ ४ ॥

॥ १८११ ॥

काय नव्हे करितां तुज । आतां राखें माझी लाज ॥ १ ॥ मी तों अपराधाची राशी । शिखा अंगुष्ट तोंपाशीं ॥ २ ॥ त्राहें त्राहें त्राहें । मज कृपादृष्टी पाहें ॥३॥ तुका ह्मणे देवा । सत्य घ्यावी आतां सेवा ॥४॥

॥ १८१२ ॥

मी तों दिनाहूनि दीन । माझा तूज अभिमान ॥ १ ॥ मी तों आलों शरणागत । माझें करावें स्वहित ॥ २ ॥ दिनानाथा कृपाळुवा । सांभाळावें आपुल्या नांवा ॥३॥ तुका ह्मणे आतां । भलें नव्हे मोकलितां ॥४॥

॥ १८१३ ॥

न बोलसी करा वाचा । उपाधीचा संबंध ॥ १ ॥ एका तुमच्या नामा-
विण । अवघा सीण कळतसे ॥२॥ संकल्पाचे ओढी मन । पापपुण्य
समचि ॥३॥ तुका ह्मणे नारायणीं । पावो वाणी विसांवा ॥ ४ ॥

॥ १८१४ ॥

कृपा करूनी देवा । मज साच तें दाखवा ॥ १ ॥ तुह्मी दयावंत
कैसे । कीर्ति जगामाजी वसे ॥२॥ पाहोनियां डोळां । हातीं ओढवाल
काळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । मज कराल कुठावा ॥ ४ ॥

॥ १८१५ ॥

तान्हेल्याची धणी । फिटे गंगा नव्हे उणी ॥ १ ॥ माझे मनोरथ
सिद्धी । पाववावे कृपानिधी ॥ २ ॥ तूं तों उदाराचा राणा । माझी
अल्पचि वासना ॥ ३ ॥ कृपादृष्टी पाहें । तुका ह्मणे होइ साहे ॥४॥

॥ १८१६ ॥

सद्गदित कंठ दाटो । येणें फुटो हृदय ॥ १ ॥ चिंतनाचा एक लाहो ।
तुमच्या अहो विठ्ठला ॥ २ ॥ नेत्रीं जल वाहो सदा । आनंदाचे
रोमांच ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृपादान । इच्छी मन हे जोडी ॥ ४ ॥

॥ १८१७ ॥

पाहतोसी काय । आतां पुढें करीं पाय ॥ १ ॥ वरि ठेवूं दे मस्तक ।
ठेलों जोडूनि हस्तक ॥२॥ बरवें करीं सम । नको भंगो देऊं प्रेम
॥३॥ तुका ह्मणे चला । पुढती सामोरे विठ्ठला ॥ ४ ॥

॥ १८१८ ॥

करूं जातां सन्निधान । क्षणि जन पालटे ॥ २ ॥ आतां गोमटे ते
पाय । तुझे माय विठ्ठले ॥ २ ॥ हरिदासांचा समागम । अंगीं प्रेम
विसांवे ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंचि मन । इच्छादान मागतसे ॥ ४ ॥

॥ १८१९ ॥

आतां मज देवा । इचे हातींचें सोडवा ॥ १ ॥ पाठीं लागलीसे
दासी । इच्छा जिते तैसी ॥ २ ॥ फेडा आतां पांग । अंगीं लप
वुनी अंग ॥ ३ ॥ दुजें नेणे तुका । कांहीं तुह्मासी ठाउका ॥ ४ ॥

॥ १८२० ॥

तुझे पायीं नाम । होवा ऐसा माझा भाव ॥ १ ॥ करीं वासनेसा-रिखें । आण पुढें येणें सुखें ॥ २ ॥ अहंकार खोटे । वाटे आपदांचे थाटे ॥ ३ ॥ तुका ह्मणे आई । हातीं धरूनि संग देई ॥ ४ ॥

॥ १८२१ ॥

तुजविण देवा । कोणा ह्मणे माझी जिव्हा ॥ १ ॥ तरि हे हो कां शतखंड । पडो झडोनियां गंड ॥ २ ॥ कांहीं इच्छेसाटीं । करील वळवळ करंटी ॥३॥ तुका ह्मणे कर । करीं तयाचा विसर ॥ ४ ॥

॥ १८२२ ॥

आतां बरें जालें । सकाळींच कळों आलें ॥ १ ॥ मज न ठेवीं इह-लोकीं । आलों तेव्हां जाली चुकी ॥२॥ युगमहिमा ठावा । नव्हता ऐसा पुढें देवा ॥३॥ तुका ह्मणे ठेवीं । भोगासाटीं निरयगांवीं ॥४॥

॥ १८२३ ॥

हरिदासाचिये घरीं । मज उपजवा जन्मांतरीं ॥ १ ॥ ह्मणसी कांहीं मागा । हेंचि देगा पांडुरंगा ॥ २ ॥ संतां लोटांगणीं । जातां लाजों नको मनीं ॥३॥ तुका ह्मणे अंगीं । शक्ति देई नाचें रंगीं ॥ ४ ॥

॥ १८२४ ॥

रंगीं रंगें नारायणा । उभा करितों कीर्तना ॥ १ ॥ हातीं घेऊनियां वीणा । कंठीं राहे नारायणा ॥ २ ॥ देखिलीसे मूर्ति । माझ्या हृद-याची विश्रांति ॥३॥ तुका ह्मणे देवा । देई कीर्तनाचा हेवा ॥ ४ ॥

॥ १८२५ ॥

जन्मोजन्मीं दास । व्हावें हेंचि माझी आस ॥ १ ॥ पंढरीचा वार-करी । वारी चुकों नेदीं हरी ॥२॥ संतसमागम । अंगीं स्थिरावलें प्रेम । स्नान चंद्रभागे । तुका ह्मणे हेंचि मागें ॥ ४ ॥

॥ १८२६ ॥

सगळियाचा सोस मनीं । लाजोनियां राहिलों ॥१॥ आवडीनें बोला-वितों । येथें तें तों लपावें ॥२॥ माझें तेंचि मज द्यावें । होतें भावें जोडिलें ॥३॥ तुका ह्मणे विश्वंभरा । आळीकरा बुझावा ॥ ४ ॥

॥ १८२७ ॥

आतां माझ्या भावा । अंतराय नको देवा ॥ १ ॥ आलें भागा तें करितों । तुझें नाम उच्चारितों ॥ २ ॥ दृढ माझें मन । येथें राखावें बांधोन ॥३॥ तुका ह्मणे वाटे । नको फुटों देऊं फांटे ॥ ४ ॥

॥ १८२८ ॥

कैसें भलें देवा अनुभवा कां नये । उशीर तो काय तुह्मांपाशीं ॥१॥ आहे तें मागतों दिसतें जवळी । केल्यामध्यें काळि कोण साध्य ॥२॥ नाहीं सांडीत मी सेवेची मर्यादा । लाविला तो धंदा नित्य करीं॥३॥ तुका ह्मणे हात आंवरिला गुंती । माझे तंव चित्तीं नाहीं दुजें ॥ ४ ॥

॥ १८२९ ॥

आतां देवा मोकळिलें । तुह्मी भलें दिसेना ॥ १ ॥ आतां नाहीं जीव भाव । उरला ठाव वेगळा ॥ २ ॥ सांभाळुन घ्यावें देवा । आपणासवा यावरि ॥३॥ तुका ह्मणे नग्नभाज । तरि ते लाज स्वामीसी॥४॥

॥ १८३० ॥

आतां पंढरीराया । माझ्या निरसावें भया ॥ १ ॥ मनीं राहिली आशंका । स्वामिभयाची सेवका ॥ २ ॥ ठेवा माथां हात । कांहीं बोला अभयमात ॥३॥ तुका ह्मणे लाडें । खेळें ऐसें करा पुढें ॥ ४ ॥

॥ १८३१ ॥

काय ऐसा सांगा । धर्म मज पांडुरंगा ॥ १ ॥ तुझे पायीं पावें ऐसा । जेणें उगवे हा फांसा ॥२॥ करीं कृपादान । तैसें बोलवीं वचन॥३॥ तुका ह्मणे देवा । माझें हृदय वसवा ॥ ४ ॥

॥ १८३२ ॥

लहानपण दे गा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥ १ ॥ ऐरावत रत्न थोर। तया अंकुशाचा मार ॥ २ ॥ ज्याचें अंगीं मोठेपण। तया यातना कठीण ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाण । व्हावें लहनाहुनि लहान ॥ ४ ॥

॥ १८३३ ॥

जाणों नेणों काय । चित्तीं धरूं तुझे पाय ॥ १ ॥ आतां हेंचि वर्म ।

गाऊं धरुनियां प्रेम ॥ २ ॥ काय सांडूं मांडूं । भावें हृदयींच कोंडूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । जन्मोजन्मीं मागें सेवा ॥ ४ ॥

॥ १८३४ ॥

देवा ऐसा शिष्य देई । ब्रह्मज्ञानी निपुण पाहीं ॥१॥ जो कां भावाचा आगळा । भक्तिप्रेमाचा पुतळा ॥२॥ ऐशा युक्ति ज्याला बाणे । तेथें वैराग्याचें ठाणें ॥३॥ ऐसा जाला हो शरीरीं । तुका लिंबलोण करी॥४॥

॥ १८३५ ॥

कृपा करावी भगवंतें । ऐसा शिष्य द्यावा मातें ॥१॥ माझें व्रत जो चालवी । त्यासि द्यावें त्वां पालवी ॥ २ ॥ व्हावा ब्रह्मज्ञानी गुंडा । तिहीं लोकीं ज्याचा झेंडा ॥ ३ ॥ तुका तुका हाका मारी । माझ्या विठोबाच्या द्वारीं ॥ ४ ॥

॥ १८३६ ॥

हेंचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥ गुण गाईन आवडी । हेंचि माझी सर्व जोडी ॥२॥ न लगे मुक्ति धन संपदा । संत संग देई सदा ॥३॥ तुका ह्मणे गर्भवासीं । सुखें घालावें आह्मांसी॥४॥

---

## अनन्यभक्ति.

॥ १८३७ ॥

भाग्यें ऐसी जाली जोडी । आतां घडी विसंबेना ॥ १ ॥ विटेवरि समचरण । संतीं खूण सांगितली ॥२॥ अवघें आतां काम सारूं। हाचि करूं कैवाड ॥३॥ तुका ह्मणे खंडूं खेपा। पुढें पापापुण्याच्या ॥ ४ ॥

॥ १८३८ ॥

आमच्या हें आलें भागा । जिव्हार या जगाचें ॥१॥ धरूनियां ठेलों जीवें । बळकट भावें एकविध ॥२॥ आणूनियां केला रूपा । उभा सोपा जवळी ॥३॥ तुका ह्मणे अंकित केला। खालीं आला वचनें ॥४॥

॥ १८३९ ॥

येथें आड कांहीं न साहे आणिक । प्रमाण तें एक हेंचि जालें ॥ १ ॥
गाऊं नाचों टाळी वाऊं गीत छंदें । डोलवूं विनोदें अंग तेणें ॥ २ ॥
मथुनियां सार काढिलें बाहेरी । उपाधि ते येरी निवडिली ॥ ३ ॥
तुका ह्मणे जगा लाविली शिराणी । सेवितां हे धणी होत नाहीं ॥४॥

॥ १८४० ॥

जैसा तैसा आतां । मज प्रमाण अनंता ॥ १ ॥ पायां पडणें न संडी । पोटीं तेंच वर तोंडीं ॥ २ ॥ एका भावें चाड । आहे तैसें अंतीं गोड ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मां । टळणेंचि नाहीं नेमा ॥ ४ ॥

॥ १८४१ ॥

आह्मी पहा कैसीं एकतत्त्व जालों । राखणे लागलों वासनेसी ॥१॥
तुह्मांविण कांहीं नावडावें जीवा । केला तोचि देवा केला पण ॥२॥
वर्म नेणो परि वृत्ति भंगों नेदूं । वंदिलेंचि वंदूं आवडीनें ॥३॥
तुका ह्मणे कळे नामाचें जीवन । वारताही भिन्न नेणों आतां ॥४॥

॥ १८४२ ॥

गोपिचंदनमुद्रा धरणें । आह्मां लेणें वैष्णवां ॥१॥ मिरवूं अळंकार लेणें । हीं भूषणें स्वामीचीं ॥२॥ विकलों तो सेवे जीवें । एकया भावें एकविध ॥३॥ तुका ह्मणे शूर जालों । बाहेर आलों संसारा ॥४॥

॥ १८४३ ॥

माझी भक्ती भोळी । एकविध भावबळी ॥ १ ॥ मी का पडेन निराळा । ऐसा सांडूनि सोहळा ॥२॥ आतां अनारिसा । येथें न व्हावें सहसा ॥३॥ तुका ह्मणे जोडुनि पाय । पुढें उगा उभा राहे ॥४॥

॥ १८४४ ॥

आह्मां भाविकांची जाती । एकविध जी श्रीपती । अळंकारयुक्ति । सरों तेथें शकेचि ना ॥१॥ जाणे माउली त्या खुणा । क्षोभ उपजों नेदी मना । शांतवूनि स्तना । लावीं अहो कृपाळे ॥२॥ तुज अवघें होऊं येतें । मज वाटों

नये चित्तें। उपासने परतें। नये कांहीं आवडों ॥३॥ करूं रूपाची कल्पना।
मुखीं नाम उच्चारणा। तुका ह्मणे जना। जल स्थल देखतां ॥ ४ ॥

॥ १८४५ ॥

आह्मां एकविधा पुण्य सर्वकाळ। चरणसकळ स्वामीचे ते ॥ १ ॥
चित्ताचे संकल्प राहिले चळण। आज्ञा ते प्रमाण करुनी असों ॥ २ ॥
दुजियापासून परतलें मन। केलें द्यावें दान होईल तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां पुरला नवस। एकाविण ओस सकळही ॥ ४ ॥

॥ १८४६ ॥

एकविध आह्मी न धरूं पालट। न संडूं ते वाट सांपडली ॥ १ ॥
ह्मणवूनि केला पाहिजे सांभाळ। माझें बुद्धीबळ पाय तुझे ॥ २ ॥
बहुत बोलतां न कळे प्रकार। अंतरा अंतर साक्ष असे ॥ ३ ॥
तुका ह्मणे आगा जीवींच्या जीवना। तूंचि नारायणा साक्षी माझा ॥४॥

॥ १८४७ ॥

नाहीं वागवीत जाणिवेचें ओझें। स्वामिसेवा काज निर्धारु हा ॥ १ ॥
आज्ञा ते प्रमाण हा मनीं निर्धार। येणें फिटे भार निश्चयेसीं ॥ २ ॥
आळी करें आह्मी एकविध चित्तें। तैसें होऊं येतें मायबापें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी ये जातीची सेवा। घातलासे देवावरी भार ॥ ४ ॥

॥ १८४८ ॥

परपीडक तो आह्मा दावेदार। विश्वीं विश्वंभर ह्मणऊनि ॥ १ ॥
दंडूं त्यागूं बळें नावलोकूं डोळा। राखूं तो चांडाळा ऐसा दुरि ॥२॥
अनाचार कांहीं न साहे अवगुण। वहु होय मन कासावीस ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी एकविध सेवा। विमुख ते देवा वाळी चित्तें ॥ ४ ॥

॥ १८४९ ॥

लौकिकापुरती नव्हे माझी सेवा। अनन्य केशवा दास तुझा ॥ १ ॥
ह्मणऊनि करीं पायांसवें आळी। आणिक वेगळी नेणें परि ॥ २ ॥
एकविध आह्मी स्वामिसेवेसाटीं। वरि तोचि पोटीं एकभाव ॥ ३ ॥
तुका ह्मणे करीं सांगितलें काम। तुह्मां धर्माधर्म ठावे देवा ॥ ४ ॥

॥ १८५० ॥

धीर तो कारण एकविध भाव । पतिव्रते नाहो सर्वभावें ॥ १ ॥
चातक हे जळ न पाहती दृष्टी । वाट पाहे कंठीं प्राण मेघा ॥ २ ॥
सूर्यविकासिनि नेघे चंद्रामृत । वाट पाहे अस्तउदयाची ॥ ३ ॥
धेनु येऊं नेदी जवळी आणिकां । आपुल्या बाळकाविण वत्सा ॥४॥
तुका ह्मणे नेम प्राणांसवें साटीं । तरीच या गोष्टी विठोबाची ॥ ५ ॥

॥ १८५१ ॥

पतिव्रता नेणें आणिकांची स्तुती । सर्व भावें पति ध्यानीं मनीं ॥१॥
तैसें माझें मन एकविध जालें । नावडे विठ्ठलेंविणें दुजें ॥ २ ॥
सूर्यविकासिनी नेघे चंद्रकळा । गाय ते कोकिळा वसंतेंसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे बाळ मातेपुढें नाचे । बोल आणिकांचे नावडती ॥ ४ ॥

॥ १८५२ ॥

आणिकांची स्तुति आह्मां ब्रह्महत्या । एकावांचूनि त्या पांडुरंगा ॥ १ ॥
आह्मां विष्णुदासां एकविध भाव । न ह्मणों या देव आणिकांसि ॥ २ ॥
शतखंड माझी होईल रसना । जरि या वचना पालटेन ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज आणिका संकल्पें । अवघींच पापें घडतील ॥ ४ ॥

॥ १८५३ ॥

पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आह्मां नारायण तैशापरी ॥ १ ॥ सर्व
भावें लोभ्या आवडे हें धन । आह्मां नारायण तैशापरी ॥ २ ॥ तुका
ह्मणे एकविध जालें मन । विठ्ठलावांचून नेणें दुजें ॥३॥

॥ १८५४ ॥

काय करूं आन दैवतें । एकाविण पंढरीनाथे ॥१॥ सरिता मिळाली
सागरीं । आणिकां नांवां कैंची उरी ॥२॥ अनेक दीपांचा प्रकाश । सूर्य
उगवतां नाश ॥३॥ तुका ह्मणे नेणें दुजें । एकाविण पंढरीराजे ॥ ४ ॥

॥ १८५५ ॥

माझी आतां सत्ता आहे । तुह्मां पायां हे वरती ॥१॥ एकाविण नेणें

दुजा । पंढरीराजा सर्वांगें ॥२॥ पुरवावी केली आळी । जे जे काळीं मागेन तें ॥३॥ तुका ह्मणे सुटसी कैसा । धरूनि दिशा राहिलों ॥४॥

॥ १८५६ ॥

आणीक दुसरें मज नाहीं आतां । नेमिलें या चित्तापासुनियां ॥१॥ पांडुरंग मनीं पांडुरंग ध्यानीं । जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ॥ २ ॥ पडिलें वळण इंद्रियां सकळा । भाव तो निराळा नाहीं दुजा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेत्रीं केलें ओळखण । तटस्थ तें ध्यान विटेवरी ॥ ४ ॥

॥ १८५७ ॥

न पूजीं आणिकां देवां न करीं त्यांची सेवा । न मनीं या केशवाविण दुजें ॥ १ ॥ काय उणें जालें मज तयापायीं । तें मी मागों काई कवणासी ॥ २ ॥ आणिकांची कीर्ति नाइके न बोले । चाड या विठ्ठलेंविण नाहीं ॥३॥ न पाहें लोचनीं श्रीमुखावांचूनि । पंढरी सांडूनि न वजें कोठें ॥ ४ ॥ न करीं कांहीं आस मुक्तीचे सायास । न भें संसारास येतां जातां ॥ ५ ॥ तुका ह्मणे कांहीं व्हावें ऐसें जीवा । नाहीं या केशवाविण दुजें ॥ ६ ॥

॥ १८५८ ॥

कोणाचिया न पडों छंदा । गोविंदासी आळवूं ॥ १ ॥ बहुतांचीं बहु मतें । अवघें रितें पोकळ ॥२॥ घटापटा ढवळी मन । होय सीण न करूं तें ॥३॥ तुका ह्मणे पांडुरंग । भरूं भाग आला तो ॥४॥

॥ १८५९ ॥

न करीं पठन घोष अक्षरांचा । बीजमंत्र आमुचा पांडुरंग ॥१॥ सर्वकाळ नामचिंतन मानसीं । समाधान मनासी समाधि हे ॥ २ ॥ न करी भ्रमण न रिघें कपाटीं । जाईन तेथें दाटी वैष्णवांची ॥ ३ ॥ अनु नेणें कांहीं न वजें तपासी । नाचें दिंडीपाशीं जागरणीं ॥४॥ उपवास व्रत न करीं पारणें । रामकृष्ण ह्मणें नारायण ॥ ५ ॥ आणिकांची सेवा स्तुती नेणें वाणूं । तुका ह्मणे आणु दुजें नाहीं ॥६॥

॥ १८६० ॥

आणोनिया मना । अवघ्या धांडोळिल्या खुणा । देखिला तो राणा । पंढरपुरनिवासी ॥ १ ॥ यासी अनुसरल्या काय । घडे ऐसें वांयां जाय। देखिले ते पाय । सम जीवीं राहाती ॥ २ ॥ तो देखावा हा विध । चिंतनें तें कार्य सिद्ध । आणिकां संबंध । नाहीं पर्वकाळासी॥३॥तुका ह्मणे खळ । होती क्षणेंचि निर्मळ । जाऊनियां मळ । वाळवंटीं नाचती ॥ ४ ॥

॥ १८६१ ॥

तूं माझा मायबाप सकळ वित्त गोत। तूंचि माझें हित करिता देवा ॥१॥
तूंचि माझा देव तूंचि माझा जीव । तूंचि माझा भाव पांडुरंगा ॥२॥
तूंचि माझा आचार तूंचि माझा विचार । तूंचि सर्व भार चालविसी ॥३॥
सर्व भावें मज तूं होसी प्रमाण । ऐसी तुझी आण वाहतसें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुज विकला जीवभाव । कळे तो उपाव करीं आतां ॥५॥

॥ १८६२ ॥

तूं आह्मां सोयरा सज्जन सांगातीं । तुजलागीं प्रीति चालो सदा ॥१॥
तूं माझा जिव्हाळा जीवाचा जिवलग । होसी अंतरंग अंतरींचा॥२॥
गणगोत मित्र तूं माझें जीवन । अनन्यशरण तुझ्या पायीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे सर्वगुणें तुझा दास । आवडे अभ्यास सदा तुझा ॥ ४ ॥

॥ १८६३ ॥

काय नव्हेसी तूं एक । देखों कासया पृथक ॥१॥ मुंग्या कैचे मुंगळे। नटनाट्य तुझे चाळे ॥ २ ॥ जाली तरी मर्यादा । किंवा असावें गोविंदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे साचा । कोठें जासी हृदयींचा ॥ ४ ॥

॥ १८६४ ॥

असोत हे बोल । अवघें तूंचि भांडवल ॥ १ ॥ माझा मायबाप देव । सज्जन सोयरा केशव ॥ २ ॥ गाळियले भेद । सारियेले वादावाद ॥ ३ ॥ तुका ह्मणे मधीं । आतां न पडे उपाधि ॥ ४ ॥

॥ १८६५ ॥

आमुची विश्रांति । तुमचे चरण कमळापती ॥ १ ॥ पुढती पुढती

नमन । घालुनियां लोटांगण ॥ २ ॥ हेंचि एक जाणें । काया वाचा आणि मनें ॥ ३ ॥ नीच जनालोकां । तळीले पायेरीस तुका ॥४ ॥

॥ १८६६ ॥

विश्वासिया नाहीं लागत सायास । रंग अनायास अंगा येतो ॥ १ ॥
लेंकराच्या हातें घास मागे माता । वोरसोनि चित्ता सुख पावे ॥२॥
गौरव त्या मानी आरुपा वचनीं । भूषण ते वाणी मिरवावी ॥ ३ ॥
तुका ह्मणे आहे सकळही साक्षी । माझा कईं पक्षी पांडुरंग ॥ ४ ॥

॥ १८६७ ॥

शिव शक्ति आणि सूर्य गणपति । एकचि ह्मणती विष्णूसही ॥ १ ॥
हिरा गार दोनी मानिती समान । राजस भजनें वांयां जाती ॥ २ ॥
अन्य देवतांसी देव ह्मणऊन । तामस जीवन तमो योग्या ॥ ३ ॥
वांयां जायासाठीं केलासे हव्यास । अन्य देवतांस देवपण ॥ ४ ॥
आपुलिया मुखें सांगतसे धणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ ५ ॥
धन्य ते वैष्णव भजनी केशव । सात्विक हे जीव मोक्षा योग्य ॥६॥
तुका ह्मणे मोक्ष नाहीं कोणापासीं । एका गोविंदासी शरण व्हारे॥७॥

॥ १८६८ ॥

बहुत असती मागें सुखी केलीं । अनाथा माउली जिवांची तूं ॥ १ ॥
माझिया संकटा न धरीं आळस । लावूनियां कास पार पावीं ॥ २ ॥
कृपावंता करा ज्याचा अंगिकार । तया संवसार नाहीं पुन्हां ॥ ३ ॥
विचारितां नाहीं दुजा बळिवंत । ऐसा सर्वगत व्यापी कोणी ॥ ४ ॥
ह्मणउनि दिला मुळीं जीवभाव । देह केला वाव समाविस्थ ॥ ५ ॥
तुका ह्मणे नाहीं जाणत आणिक । तुजविण एक पांडुरंगा ॥ ६ ॥

॥ १८६९ ॥

काय माझें नेती वाईट ह्मणोन । करूं समाधान कशासाठीं ॥ १ ॥
काय मज लोक नेती परलोका । जातां कोणा एका निवारील ॥ २ ॥
न ह्मणें कोणासी उत्तम वाईट । सुखें माझी कूट खावो मागें ॥ ३ ॥

सर्व माझा भार असे पांडुरंगा । काय माझें जगासवें काज ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझें सर्वही साधन । नामसंकीर्तन विठोबाचें ॥ ५ ॥

॥ १८७० ॥

रुसलों आह्मीं आपुलिया संसारा । तेथें जनाचारा काय पाड ॥ १ ॥
आह्मां इष्ट मित्र सज्जन सोयरे । नाहीं या दुसरें देवाविण ॥ २ ॥
दुराविले बंधु सखे सहोदर । आणीक विचार काय तेथें ॥ ३ ॥
उपाधिवचन नाइकती कान । त्रासलें हें मन बहु माझें ॥ ४ ॥
तुका ह्मणे करा होइल ते दया सुख दुःख वांयां न धरावें ॥ ५ ॥

॥ १८७१ ॥

दुध दहीं ताक पशूचें पाळण । त्यामध्यें कारण घृतसार ॥ १ ॥
हेंचि वर्म आह्मां भाविकांचे हातीं । ह्मणऊनि चित्तीं धरिलाराम ॥२॥
लोहो कफ गारा अग्नीचिया काजे । येऱ्हवी तें ओझें कोण वाहे॥३॥
तुका ह्मणे खोरीं पाहारा जतन । जोंवरि हें धन हातीं लागे ॥ ४ ॥

॥ १८७२ ॥

रवीचा प्रकाश । तोचि निशी घडे नास । जाल्या बहुवस । तरि त्या
काय दीपिका ॥१॥ आतां हाचि वसो जीवीं । माझें अंतरीं गोसावी ।
होऊं येती ठावीं । काय वर्में याच्यानें ॥२॥ सवें असतां धणी । आड येऊं
न सके कोणी । नलगे विनवणी । पृथकाची करावी ॥३॥ जन्माचिया
गति । येणें अवघ्या खुंटती । कारण ते प्रीती । तुका ह्मणे जवळी ॥४॥

॥ १८७३ ॥

न कळे जी भक्ती काय करूं सेवा । संकोचोनि देवा राहिलोंसें॥ १॥
जोडोनियां कर राहिलों निवांत । पायांपाशीं चित्त ठेवूनियां ॥ २ ॥
दिशाभुली करीं स्थळीं प्रदक्षणा । भ्रमें नारायणा कष्टविलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जालों आज्ञेचा पाळक । जीवनासी एक ठाव केला ॥४॥

॥ १८७४ ॥

करावा वर्षाव । तृषाक्रांत जाला जीव ॥१॥ पाहें आकाशाची वास ।

जाणता तूं जगनिवास ॥२॥ संयोगें विस्तार । वाढी लागे तो अंकूर ॥३॥ तुका ह्मणे फळे । चरणांबुजें तीं सकळें ॥४॥

॥ १८७५ ॥

भेद तुटलियावरी । आह्मी तुमचींच हो हरी ॥ १ ॥ आतां पाळावे पाळावे । आह्मां लडिवाळांचे लळे ॥ २ ॥ आणिकांची देवा । नाहीं जाणतची सेवा ॥३॥ तुका ह्मणे हेवा । माझा हेत पायीं देवा ॥ ४ ॥

॥ १८७६ ॥

मी दास तयाचा जया चाड नाहीं । सुखदुःख दोहींविरहित जो ॥१॥ राहिलासे उभा भींवरेच्या तीरीं । कट दोहीं करीं धरोनियां ॥ २ ॥ नवल काई तरी पाचारितां पावे । न स्मरित धांवे भक्तिकाजें ॥ ३ ॥ सर्व भार माझा त्यासी आहे चिंता । तोचि माझा दाता स्वहिताचा ॥४॥ तुका ह्मणे त्यास गाईन मी गीतीं । आणीक तें चित्तीं न धरीं कांहीं ॥ ५ ॥

॥ १८७७ ॥

बहु फिरलों ठायाठाव । कोठें भाव पुरेचि ना ॥ १ ॥ समाधान तों पावलों । उरलों बोलों यावरि ॥ २ ॥ घे गा देवा आशीर्वाद । आमुच्या नांद भाग्यानें ॥३॥ तुका ह्मणे जेवूं आधीं । खवखव मधीं सारावी ॥४॥

॥ १८७८ ॥

खरें भांडवल सांपडलें गांठीं । जेणें नये तुटी उदमासी ॥ १ ॥ सवंगाचें केणें सांपडलें धरीं । भरूनि वैखरी सांठविलें ॥ २ ॥ देतां घेतां लाभ होतसे सकळां । सदैवां दुर्बळा भाव तैसा ॥३॥ फडा आलिया तो नवजे निरासे । जरि कांहीं त्यास न कळतां ॥ ४ ॥ तुका ह्मणे आतां जालीसे निश्चिंती । आणीक तें चित्तीं न धरूं दुजें ॥५॥

॥ १८७९ ॥

ध्याइन तुझें रूप गाइन तुझें नाम । आणीक न करीं काम जिव्हामुखें ॥१॥ पाहिन तुझे पाय ठेविन मी डोय । पृथक तें काय न करीं मनीं ॥ २ ॥ तुझेचि गुणवाद आइकेन कानीं । आणिकांची वाणी पुरे आतां ॥ ३ ॥

करिन सेवा करीं चालेन मी पायीं । आणीक न वजें ठायीं तुजविण ॥ ४ ॥ तुका ह्मणे जीव ठेविन मी पायीं । आणिक तो कांहीं देऊं कोणा ॥५॥

॥ १८८० ॥

तुका वेडा अविचार । करी बडबड फार ॥ १ ॥ नित्य वाचे हाचि छंद । राम कृष्ण हरि गोविंद॥ २॥ धरी पांडुरंगीं भाव । आणीक नेणें दुजा देव ॥ ३ ॥गुरुज्ञान सर्वा ठायीं । दुजें न विचारी कांहीं ॥ ४ ॥ बोल नाईके कोणाचे । कथे नागवाचि नाचे ॥५॥ संग उपचारें कांटाळे । सुखें भलते ठायीं लोळे॥ ६ ॥कांहीं उपदेशिलें नेणे । वाचे विठ्ठल विठ्ठल ह्मणे॥ ७॥केला बहुतीं फजित।तरी हेंचि करी नित्य।८।अहो पंडित जन।तुका टाकावा थुंकोन ॥९॥

॥ १८८१ ॥

तुझा शरणागत । जन्मोजन्मींचा अंकित ॥१॥ आणीक कांहीं नेणें हेवा । तुजवांचूनि केशवा ॥ २ ॥ हेंचि माझें गाणें । तुझें नामसंकीर्तन ॥ ३ ॥ तुझ्या नामाचीं भूषणें । तुका ह्मणे त्यालों लेणें ॥ ४ ॥

॥ १८८२ ॥

हेंचि माझें तप हेंचि माझें दान । हेंचि अनुष्ठान नाम तुझें ॥ १ ॥ हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ॥ २ ॥ हाचि माझा धर्म हेंचि माझें कर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥ ३ ॥ हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ । हेंचि जपध्यान नाम तुझें ॥४॥ हेंचि माझें ज्ञान श्रवण मनन । हेंचि निजध्यासन नाम तुझें ॥ ५ ॥ हाचि कुळाचार हाचि कुळधर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें॥ ६ ॥हा माझा आचार हा माझा विचार।हा माझा निर्धार नाम तुझें॥ ७॥तुका ह्मणे दुजें सांगायासि नाहीं।नामेंविण कांहीं धनवित्त।८।

॥ १८८३ ॥

तुझ्या नामाची आवडी । आह्मी विठो तुझीं वेडीं ॥१॥ आतां नवजों आणिकां ठायां । गाऊं गीत लागों पायां ॥ २ ॥ काय वैकुंठ बापुडें । तुझ्या प्रेमसुखापुढें ॥ ३ ॥ संतसमागम मेळ । प्रेमसुखाचा सुकाळ ॥४॥ तुका ह्मणे तुझ्या पायीं । जन्ममरणा ठाव नाहीं ॥५॥

॥ १८८४ ॥

जप तप ध्यान नलगे धारणा । विठ्ठलकीर्तनामाजी उभा ॥ १ ॥ रा हें माझ्या मना दृढ या वचनीं । आणिक तें मनीं न धरावें ॥२॥ कीर्तनसमाधि साधन तें मुद्रा । रहातील थारा धरोनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे मुक्ति हरिदासांच्या घरीं । वोळगती चारी ऋद्धिसिद्धि ॥ ४ ॥

॥ १८८५ ॥

कार्य[1] ते विरक्ति नकळेचि आह्मां । जाणों एका नामा विठोबाच्या ॥१॥ नाचों प्रेमसुखें वैष्णवांचे मेळीं । दिंडी टाळघोळी आनंदें या ॥२॥ शांति क्षमा दया मी काय जाणें । गोविंद कीर्तनें वांचूनियां ॥३॥ का[2]सया उदास असों देहावरी । अमृतसागरीं बुडोनियां ॥४॥ कासया एकांत सेवूं तया वना । आनंद तो जनामाजी असे ॥ ५ ॥ तुका ह्मणे आह्मां ऐसा भरवसा । विठ्ठल सरसा चालतसे ॥६॥

॥ १८८६ ॥

दीप घेउनियां धुंडिती अंधार । भेटे हा विचार अघटित ॥ १ ॥ विष्णुदास आह्मी नभ्यों कळिकाळा । भुलों मृगजळा न घडे तें ॥ २ ॥ उघळितां माती रविकळा मळे । हें कैसें न कळे भाग्यहीना ॥३॥ तुका ह्मणे तृणें झांके हुताशन । हें तंव वचन बाउगेंचि ॥ ४ ॥

॥ १८८७ ॥

बाळ मायेविण क्षणभरि न राहे । न देखतां होये कासाविस ॥ १ ॥ आणिक उदंड बुझाविती जरी । छंद त्या अंतरीं माउलीचा ॥ २ ॥ नावडती तया बोल आणिकाचे । देखोनियां नाचे माय दृष्टी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझी विठ्ठल माउली । आणिकांचे बोलीं चाड नाहीं ॥ ४ ॥

---

१. पुष्कळ प्रतींत "काय विरक्ति कळे आह्मां" या पाठभेदानें हा अभंग आढळतो. २. फक्त इंदिरा प्रेसच्या गाथेंत 'कासया एकांत' हा चरण चवथा असून त्या खालीं 'कासया उदास' हा पांचवा चरण दिला आहे; पण बहुतेक प्रतींत आह्मीं वर दिलेला क्रमच आढळून येतो.

॥ १८८८ ॥

पाहों ग्रंथ तरी आयुष्य नाहीं हातीं । नाहीं ऐशी मति अर्थ कळे ॥१॥
होईल तें हो या विठोबाच्या नांवें । आचरलें भावें जीवीं धरूं ॥ २ ॥
एखादा अंगासी येईल प्रकार । विचारितां फार युक्ति वाढे ॥ ३ ॥
तुका ह्मणे आळी करितां गोमटी । मायबापा पोटीं येते दया ॥ ४ ॥

॥ १८८९ ॥

सिद्धीचा दास नव्हें श्रुतीचा अंकिला । होईन विठ्ठला सर्व तुझा ॥१॥
सर्व काळ सुख आमच्या मानसीं । राहिलें जयासी नाश नाहीं ॥२॥
नेणें पुण्य पाप न पाहें लोचनीं । आणिकांवांचूनि पांडुरंगा ॥ ३ ॥
न करीं आस मुक्तीचे सायास । भक्तिप्रेमरस सांडुनियां ॥ ४ ॥
गर्भवासीं धाक नाहीं येतां जातां । हृदयीं राहतां नाम तुझें ॥ ५ ॥
तुका ह्मणे जालों तुझाचि अंकिला । न भें मी विठ्ठला कळिकाळासी ॥६॥

॥ १८९० ॥

ह्मणे विठ्ठल ब्रह्म नव्हे । त्याचे बोल नाइकावे ॥१॥ मग तो होका कोणी एक । आदि करोनि ब्रह्मादिक ॥ २ ॥ नाहीं विठ्ठल जया ठावा । तोही डोळां न पाहावा ॥३॥ तुका ह्मणे नाहीं । त्याची भीड मज कांहीं॥४॥

॥ १८९१ ॥

जयाचिये वाचे नये हा विठ्ठल । त्याचे मज बोल नावडती ॥ १ ॥
शत्रु तो म्यां केला न ह्मणें आपुला । जो विन्मुख विठ्ठला सर्वभावें ॥ २ ॥
जयासी नावडे विठोबाचें नाम । तो जाणा अधम तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ १८९२ ॥

विठ्ठलावांचोनि ब्रह्म जे बोलती । वचन तें संतीं मानूं नये ॥ १ ॥
विठ्ठलावांचूनी जे जे उपासना । अवघाचि जाणा संभ्रमु तो ॥ २ ॥
विठ्ठलावांचूनि सांगतील गोष्टी । वांया ते हिंपुटी होत जाणा ॥ ३ ॥
विठ्ठलावांचूनि जें कांहीं जाणती । तितुल्या वित्पत्ति वाउगीया ॥ ४ ॥
तुका ह्मणे एक विठ्ठलचि खरा । येर तो पसारा वाउगाचि ॥ ५ ॥

॥ १८९३ ॥

येथें बोलोनियां काय । व्हावा गुरु तरि जाय ॥१॥ मज न साहे वांकडें । ये विठ्ठलकथे पुढें ॥ २ ॥ ऐकोनी मरसी वृथा । जंव आहेसि तूं जिता ॥३॥ दुरमतीची चाड । तेणें न करावी बडबड॥४॥पुसेल कोणी त्यास । जा रे करीं उपदेश ॥ ५ ॥ आह्मी विठ्ठलाचे वीर । फोडूं कळिकाळाचें शीर ॥६॥ घेऊं पुढती जन्म । वाणूं कीर्ति मुखें नाम ॥ ७ ॥ तुका ह्मणे मुक्ती । नाहीं आसचि ये चित्तीं ॥ ८ ॥

॥ १८९४ ॥

माझिया जीवाचा मज निरधार । न करीं उत्तर जनासवें ॥ १ ॥
आपुलें कारण साधो जी विचार । करावा हा धीर धरूनियां ॥ २ ॥
काय कराविया आणिका या युक्ति । काय नव्हे भक्ति विठोबाची ॥ ३ ॥
एक पुढें गेले वाट दावूनियां । मारग तो वांयां कोण सांडी ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझी विठोबासी चिंता । भेईना सर्वथा न घडे तें ॥ ५ ॥

॥ १८९५ ॥

हेंचि सर्वसुख जपावा विठ्ठल । न दवडावा पळ क्षण वांयां ॥ १ ॥
हेंचि एक सर्व साधनांचें मूळ । आतुडे गोपाळ येणें पंथें ॥ २ ॥
न लगती कांहीं तपांचिया रासी । करणें वाराणसी नाना तीर्थें ॥ ३ ॥
कल्पना हे तिळ देहीं अभिमान । नये नारायण जवळी त्यांच्या ॥४॥
तुका ह्मणे नामें देव नेदी भेटी । ह्मणे त्याचे होंटीं कुष्ट होय ॥ ५ ॥

॥ १८९६ ॥

आणीक कोणाचा न करीं मी संग । जेणें होय भंग माझ्या चित्ता ॥ १ ॥
विठ्ठलावांचूनि आणीक जे वाणी । नाइकें मी कानीं आपुलिया ॥ २ ॥
समाधानासाटीं बोलावी हे मात । परि माझें चित्त नाहीं कोठें ॥ ३ ॥
जिवाहुनि मज तेचि आवडती । आवडे ज्या चित्तीं पांडुरंग ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझें तोचि जाणे हित । आणिकांच्या चित्त नेदीं बोला ॥५॥

॥ १८९७ ॥

नव्हे जाखाई जोखाई । मायराणी मेसाबाई॥१॥बाळिया माझा पंढरिराव ।

जो या देवांचाही देव ॥२॥ रंडी चंडी शक्ति । मद्यमांसानें भक्षिती ॥३॥ बहिरव खंडेराव । रोटीसुटीसाटीं देव ॥ ४ ॥ गणोबा विक्राळ । लाडुमोदकांचा काळ ॥५॥ मुंजा झौमासुरें । हे तों कोण लेखी पोरें ॥६॥ वेताळें फेताळें । जळों त्यांचें तोंड काळें ॥७॥ तुका ह्मणे चित्तीं । धरा रखुमाईचा पती ॥८॥

॥ १८९८ ॥

माझे अंतरींचें तोचि जाणे एक । वैकुंठनायक पांडुरंग ॥ १ ॥ जीवभाव त्याचे ठेवियेला पायीं । मज चिंता नाहीं कवणेविशीं ॥ २ ॥ सुखसमारंभें संतसमागमें । गाऊं वाचे नाम विठोबाचें ॥३॥ गातां पुण्य होय आइकतां लाभ । संवसारबंद तुटतील ॥ ४ ॥ तुका ह्मणे जीव तयासी विकिला । आणीक विठ्ठलाविण नेणें ॥ ५ ॥

॥ १८९९ ॥

आणीक कांहीं मज नावडे हे मात । एक पंढरिनाथावांचूनियां ॥ १ ॥ त्याचीच कथा आवडे कीर्तन । तें मज श्रवण गोड लागे ॥ २ ॥ तुका ह्मणे संत ह्मणोत भलतें । विठ्ठलापरतें न मनीं कांहीं ॥ ३ ॥

॥ १९०० ॥

कोण वेची वाणी । आतां क्षुल्लकाकारणीं ॥ १ ॥ आतां हेंचि काम करूं । विठ्ठल हृदयांत धरूं ॥ २ ॥ नेदावया वृत्ति । आतां उठोंचि बहुति ॥ ३ ॥ उपदेश लोकां । करुनी वेडा होतो तुका ॥४॥

॥ १९०१ ॥

विठ्ठल विठ्ठल मंत्र सोपा । करी पापा निर्मूळ ॥ १ ॥ भाग्यवंता छंद मनीं । कोडें कानीं ऐकती ॥२॥ विठ्ठल हें दैवत भोळें । चाड काळें न धरावी ॥३॥ तुका ह्मणे भलते याती । विठ्ठल चित्तीं ते शुद्ध ॥४॥

॥ १९०२ ॥

विठ्ठल टाळ विठ्ठल दिंडी । विठ्ठल तोंडीं उच्चार ॥१॥ विठ्ठल अवघ्या भांडवला । विठ्ठल बोला विठ्ठल ॥२॥ विठ्ठल नाद विठ्ठल भेद । विठ्ठल छंद विठ्ठल ॥३॥ विठ्ठल सुखा विठ्ठल दुःखा । तुकया मुखा विठ्ठल ॥४॥

॥ १९०३ ॥

विठ्ठल हा चित्तीं । गोड लागे गातां गीतीं ॥ १ ॥ आह्मां विठ्ठल जीवन । टाळ चिपूळिया धन ॥ २ ॥ विठ्ठल विठ्ठल वाणी । अमृत हे संजीवनी ॥ ३ ॥ रंगला या रंगें । तुका विठ्ठल सर्वांगें ॥ ४ ॥

॥ १९०४ ॥

विठ्ठल आमुचा निजांचा । सज्जन सोयरा जीवाचा ॥ १ ॥ मायबाप चुलता बंधु । अवघा तुजशीं संबंधु ॥ २ ॥ उभयकुळीं साक्ष । तूंचि माझा मातुळपक्ष ॥३॥ समर्पिली काया । तुका ह्मणे पंढरिराया ॥४॥

॥ १९०५ ॥

विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती । विठ्ठल हा चित्तीं बैसलासे ॥ १ ॥
विठ्ठलें हें अंग व्यापिली हे काया । विठ्ठल हे छाया माझी मज ॥२॥
बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथां । न वदे अन्यथा आन दुजें ॥ ३ ॥
सकळां इंद्रियां मन एक प्रधान । तेंही करी ध्यान विठोबाचें ॥ ४ ॥
तुका ह्मणे या विठ्ठलासी आतां । नये विसंबतां माझें मज ॥ ५ ॥

॥ १९०६ ॥

विठ्ठल गीतीं गावा विठ्ठल चित्तीं ध्यावा । विठ्ठल उभा पहावा विटेवरी ॥१॥
अनाथाचा बंधु विठ्ठल कृपासिंधु । तोडी भवबंधु यमपाश ॥ २ ॥
तोचि शरणागतां हा विठ्ठल मुक्तिदाता । विठ्ठल या संतांसमागमें ॥३॥
विठ्ठल गुणानिधि विठ्ठल सर्व सिद्धि । लागली समाधि विठ्ठलनामें ॥४॥
विठ्ठलाचें नाम घेतां जालें सुख । गोडावलें मुख तुका ह्मणे ॥५॥

॥ १९०७ ॥

विठ्ठल गीतीं विठ्ठल चित्तीं । विठ्ठल विश्रांति भोग जया ॥ १ ॥
विठ्ठल आसनीं विठ्ठल शयनीं । विठ्ठल भोजनीं ग्रासोग्रासीं ॥ २ ॥
विठ्ठल जागृतिस्वप्नसुषुप्ति । आन दुजें नेणती विठ्ठलेंविण ॥ ३ ॥
भूषण अळंकार सुखाचे प्रकार । विठ्ठलीं निर्धार जयां नरा ॥ ४ ॥
तुका ह्मणे तेही विठ्ठलचि जाले । संकल्प मुराले दुजेपणें ॥ ५ ॥

॥ १९०८ ॥

जीवींचा जिव्हाळा । पाहों आपुलिया डोळां ॥ १ ॥ आह्मां विठ्ठल एक देव । येर अवघेचि वाव ॥ २ ॥ पुंडलिकाचे पाठीं । उभा हात ठेवुनि कटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्तीं । वाहूं रखुमाईचा पती ॥ ४ ॥

॥ १९०९ ॥

एक धरिला चित्तीं । आह्मीं रखुमाईचा पती ॥१॥ तेणें जालें अवघें काम । निवारला भवश्रम ॥ २ ॥ परद्रव्य परनारी । जाली विषाचिये परी ॥ ३ ॥ तुका ह्मणे फार । नाहीं लागत व्यवहार ॥ ४ ॥

॥ १९१० ॥

आह्मां अवघें भांडवल । येथें विठ्ठल एकला ॥ १ ॥ कायावाचामनोभावें । येथें जीवें वेचलों ॥ २ ॥ परतें कांहीं नेणें दुजें । तत्त्वबीजें पाउलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतसंगें । येणें रंगें रंगलों ॥ ४ ॥

॥ १९११ ॥

आह्मां हेंचि भांडवल । ह्मणों विठ्ठल विठ्ठल ॥ १ ॥ सुखें तरों भवनदी । संगें वैष्णवांची मांदी ॥ २ ॥ बाखराचें वाण । सांडूं हें जेवूं जेवण ॥ ३ ॥ नलगे वारंवार । तुका ह्मणे वेरझार ॥ ४ ॥

॥ १९१२ ॥

आणीक मात माझ्या नावडे जीवासी । काय करूं यासी पांडुरंगा ॥१॥
मुखा तेंचि गोड श्रवणां आवडी । चित्त माझें ओढी तुझे पायीं ॥२॥
जये परीं नाहीं विठ्ठलाचें नाम । मज होती श्रम आइकतां ॥३॥
आणिकाचें मज ह्मणवितां लाज । वाटे हें सहज न बोलावें ॥४॥
तुका ह्मणे मज तूंच आवडसी । सर्वभावेंविसीं पांडुरंगा ॥५॥

॥ १९१३ ॥

आह्मी नामाचे धारक । नेणों प्रकार आणीक । सर्व भावें एक । विठ्ठलचि प्रमाण ॥ १ ॥ नलगे जाणावें नेणावें । गावें आनंदें नाचावें । प्रेमसुख घ्यावें । वैष्णवांचे संगती ॥२॥ भावबळें घालूं कास । लज्जा चिंता दवडूं

आस । पायीं निजध्यास । ह्मणों दास विष्णूचे ॥३॥ भय नाहीं जन्म घेतां ।
मोक्षसुखा हाणों लाता । तुका ह्मणे सत्ता । धरूं निकट सेवेची ॥ ४ ॥
॥ १९१४ ॥
एका गावें आह्मी विठोबाचें नाम । आणिकांपें काम नाहीं आतां ॥ १ ॥
मोडूनियां वाटा सूक्षम दुस्तर । केला राज्यभार चाले ऐसा ॥ २ ॥
लावूनि मृदंग टाळश्रुतिघोष । सेवूं ब्रह्मरस आवडीनें ॥ ३ ॥
तुका ह्मणे महापातकी पतित । ऐसियांचें हित हेळामात्रें ॥ ४ ॥
॥ १९१५ ॥
आह्मांसी तो नाहीं आणीक प्रमाण । नामासी कारण विठोबाच्या ॥१॥
घालूनियां कास करितों कैवाड । वागों नेदीं आड कळिकाळासी॥२॥
अबद्ध वांकडें जैशातैशा परी । वाचे हरि हरि उच्चारावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां सांपडलें निज । सकळां हें बीज पुराणाचें ॥ ४ ॥
॥ १९१६ ॥
देवाचिये पायीं वेचों सर्व शक्ती । होतील विपत्ति ज्या ज्या कांहीं ॥१॥
नेंवे माझी वाचा पुढें कांहीं वाव । आणि दुजे भाव बोलायाचे ॥ २ ॥
मनाची वांटणी चित्ताचा विक्षेप । राहो हा अनुताप आहे तैसा ॥ ३ ॥
तुका ह्मणे घेई विठ्ठलाचा छंद । आनंदाचा कंद विस्तारेल ॥ ४ ॥
॥ १९१७ ॥
माझी सर्व चिंता आहे विठोबासी । मी त्याच्या पायाशीं न विसंबें ॥१॥
विसरतां रूप क्षण एक चित्तीं । जिवलग मूर्ती सांवळी ते ॥ २ ॥
विसरतां हरी क्षण एक घडी । अंतरली जोडी लक्षलाभ ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझ्या विठोबाचे पायें । संजिवनी आहे हृदयामाजी ॥४॥
॥ १९१८ ॥
मज अभयदान देई तूं दातारा । कृपेच्या सागरा मायबापा ॥ १ ॥
देहभाव तुझ्या ठेवियेला पायीं । आणीक मी कांहीं दुजें नेणें ॥ २ ॥
सेवा भक्तिहीन नेणता पतित । आतां माझें हित तुझ्या पायीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझें सर्वही साधन । नामसंकीर्तन विठोबाचें ॥ ४ ॥

॥ १९१९ ॥

करीन कोल्हाळ । आतां हाचि सर्वकाळ ॥१॥ आतां येवो माझे आई। देई भातुकें विठाई ॥२॥ उपायासी नाम । दिलें याचें पुढें क्षेम ॥३॥ बीज आणि फळ। हेंचि तुका ह्मणे मूळ ॥४॥

॥ १९२० ॥

आवडीच्या ऐसें जालें । मुखा आलें हरिनाम ॥ १ ॥ आतां घेऊं धणीवरि । मागें उरी नुरेतों ॥ २ ॥ सांटवण मना ऐसी । पुढें रासी अमुप ॥३॥ तुका ह्मणे कारण जालें। विठ्ठल या तीं अक्षरीं ॥४॥

॥ १९२१ ॥

जतन करीन जीवें । शुद्धभावें करूनी ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल हें धन । जीवन अंतकाळींचें ॥२॥ वर्दळ हें संचित सारू । बरवा करूं उदिम हा ॥३॥ तुका ह्मणे हृदयपेटी । ये संपुटीं सांठवूं ॥ ४ ॥

॥ १९२२ ॥

यथाविधि पूजा करी। सामोग्री तोंवरि हे नाहीं ॥१॥ आतां माझा सर्व भार । तूं दातार चालविसी ॥२॥ मंगळ तें तुह्मी जाणा । नारायणा काय तें ॥३॥ तुका ह्मणे समर्पिला । तुज विठ्ठला देहभाव ॥४॥

॥ १९२३ ॥

येणें बोधें आह्मी असों सर्वकाळ । करूनि निर्मळ हरिकथा ॥ १ ॥ आह्मी भूमीवरी एकपै दैवांचे । निधान हें वाचे सांपडलें ॥ २ ॥ तरतील कुळें दोन्ही उभयतां । गातां आइकतां सुखरूप ॥ ३ ॥ न चळे हा मंत्र न ह्मणो यातीकुळ। नलगे काळ वेळ विचारावी ॥४॥ तुका ह्मणे माझा विठ्ठल विसांवा । सांटवीन हावा हृदयांत ॥ ५ ॥

॥ १९२४ ॥

सुखाची वसती जाली माझे जीवीं । तुमच्या गोसावी कृपादानें ॥१॥ रूप वेळोवेळां आठवीं अंतरीं । बैसोनि जिव्हारीं राहिलें तें ॥ २ ॥ विसावलें मन विठ्ठलें प्रपंचा । गोडावली वाचा येणें रसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं नाठवेसें केलें । दुसरें विठ्ठलें मज आतां ॥ ४ ॥

॥ १९२५ ॥

काय क्रोध आह्मीं वाहिले विठ्ठलीं । आवडी धरिली पायांसवें ॥ १ ॥
आतां कोण पाहे मातें परतोनि । गेला हारपोनि देहभाव ॥ २ ॥
रिद्धिसिद्धि सुखें हाणितल्या लाता । तेथें या प्राकृता कोण मानी ॥३॥
तुका ह्मणे आह्मी विठोबाचे दास । करूनि ठेलों ग्रास ब्रह्मांडाचा ॥४॥

॥ १९२६ ॥

माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणचि देव होय गुरु ॥ १ ॥
पढियें देहभाव पुरवितो वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावें ॥२॥
मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलिया आघात निवारावे ॥ ३ ॥
योगक्षेम त्याचें जाणे जडभारी । वाट दावी करीं धरूनियां ॥ ४ ॥
तुका ह्मणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पहावें पुराणीं विचारूनी ॥५॥

॥ १९२७ ॥

काय उणें आह्मां विठोबाचे पायीं । नाहीं ऐसें काई येथें एक ॥ १ ॥
नये भोंवतालें ठायीं वांटूं मन । बगाडी करून दारोदारीं ॥ २ ॥
कोण बळी माझ्या विठोबा वेगळा । आणीक आगळा दुजा सांगा॥३॥
तुका ह्मणे मोक्ष विठोबाचे गांवीं । फुकाचीं लुटावीं भांडारें तीं ॥ ४ ॥

॥ १९२८ ॥

जैसा अधिकार । तैसें बोलावें उत्तर ॥ १ ॥ काय वाउगी घसघस ।
आह्मी विठोबाचे दास ॥२॥ आह्मी जाणों एका देवा। जैसी तैसी करूं
सेवा ॥३॥ तुका ह्मणे भावें । माझें पुढें पडेल ठावें ॥४॥

॥ १९२९ ॥

आह्मां विष्णुदासां हेंचि भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ १ ॥
वाणी नाहीं घ्यावें आपुलिया हातें। करोनियां चित्तें समाधान ॥ २ ॥
तुका ह्मणे द्रव्य मेळविलें मागें । हें तों कोणासंगें आलें नाहीं ॥ ३ ॥

॥ १९३० ॥

आह्मी विठ्ठलाचे दास जालों आतां । न चले हे सत्ता आणिकांची ॥ १ ॥
नावरे तयासी ऐसें नाहीं दुजें । करितां पंढरिराजें काय नव्हे ॥२॥

कोठें तुज ठाव घ्यावयासी धांवा । मना तूं विसावा घेईं आतां ॥३॥ इंद्रियाची वोढी मोडिला व्यापार । ज्या अंगें संचार चाली तुज ॥४॥ तुका ह्मणे आह्मी जिंकोनियां काळ । बैसलों निश्चळ होऊनियां ॥ ५ ॥

॥ १९३१ ॥

सकळ धर्म मज विठोबाचें नाम । आणीक तें वर्म नेणें कांहीं ॥ १ ॥ काय जाणों संतां निरविलें देवें । करिती या भावें कृपा मज ॥ २ ॥ तुका ह्मणे माझा कोणा अधिकार । तो मज विचार कळों यावा ॥ ३ ॥

॥ १९३२ ॥

माझें आराधन । पंढरपुरींचें निधान ॥ १ ॥ तया एकाविण दुजें । कांहीं नेणें पंढरीराजें ॥ २ ॥ दास विठ्ठलाचा । अंकित अंकिला ठायींचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां । नव्हे पालट सर्वथा ॥ ४ ॥

॥ १९३३ ॥

माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हायली ॥ १ ॥ कुर्वाळुनि लावी स्तनीं । न वजे दुरी जवळूनि ॥ २ ॥ केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोंवळी ॥३॥ तुका ह्मणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ४ ॥

॥ १९३४ ॥

जळतें संचित । ऐसी आहे धर्म नीत ॥ १ ॥ माझ्या विठोबाचे पाय । वेळोवेळां मनीं ध्याय ॥ २ ॥ नेदी कर्म घडो । कोठें आडराणें पडो ॥ ३ ॥ तुका ह्मणे मळ । राहों नेदी ताप जाळ ॥ ४ ॥

॥ १९३५ ॥

माझें मज द्यावें । नाहीं करवीत नवें ॥ १ ॥ सहस्रनामाचें रूपडें । भक्त कैवारी चोखडें ॥ २ ॥ साक्षीविण बोलें । तरी मज पाहिजे दंडिलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोल । माझा खरा हा विठ्ठल ॥ ४ ॥

॥ १९३६ ॥

सुख वाटे परी वर्म । धर्माधर्म न कळे ॥१॥ गायें नाचें एवढें जाणें । विठ्ठल ह्मणे निर्लज्ज ॥ २ ॥ अवघें माझें हेंचि धन । साधनही सकळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे पायां पडें । तुमच्या कोडें संतांच्या ॥ ४ ॥

॥ १९३७ ॥

येउनि संसारीं । मी तो एक जाणें हरी ॥ १ ॥ नेणें आणिक कांहीं धंदा । नित्य ध्यातसें गोविंदा ॥ २ ॥ कामक्रोधलोभस्वार्थ । अवघा माझा पंढरिनाथ ॥३॥ तुका ह्मणे एक । धणी विठ्ठल मी सेवक ॥४॥

॥ १९३८ ॥

रुची रुची घेऊं गोडी । प्रेममुखें जाली जोडी ॥ १ ॥ काळ जाऊं नेदूं वांयां । चिंतूं विठोबाच्या पायां ॥२॥ करूं भजन भोजन । धणी घेऊं नारायण ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीव धाला । होय तुझ्यानें विठ्ठला ॥ ४ ॥

॥ १९३९ ॥

आनंद अद्वय नित्य निरामय । जे कां नित्य ध्येय योगियांचे ॥ १ ॥
ते हे समचरण साजिरे विटेवरी । पाहा भीमातीरीं विठ्ठलरूप ॥ २ ॥
पुराणासी वाद श्रुति नेणती पार । तें जालें साकार पुंडलीका ॥ ३ ॥
तुका ह्मणे ज्यातें सनकादिक ध्यात । तें आमुचें कुळदैवत पांडुरंग ॥४॥

॥ १९४० ॥

अद्वयाचि द्वय जालेंचि कारण । धरिलें नारायणें भक्तिसुख ॥ १ ॥
अपरोक्ष आकार जाला चतुर्भुज । एकतत्त्व बीज भिन्न नाहीं ॥ २ ॥
शून्य निरसूनि राहिलें निर्मळ । तें दिसे केवळ विटेवरी ॥ ३ ॥
सुखें घ्यावें नाम वदनाहि चाड । सरिता वापी आड एक पाणी ॥४॥
तुका ह्मणे मीच आहें तेणें सुखें । भेद नाहीं मुखें नाम गातों ॥ ५ ॥

---

## भेटीचे अभंग.

॥ १९४१ ॥

कर कटावरी तुळसीच्या माळा । ऐसें रूप डोळां दावीं हरी ॥ १ ॥
ठेविले चरण दोन्ही विटेवरी । ऐसें रूप हरी दावीं डोळां ॥ २ ॥
कटीं पीतांबर कास मिरवली । दाखवीं वहिली ऐसी मूर्ती ॥ ३ ॥
गरुडपारावरी उभा राहिलासी । आठवे मानसीं तेंचि रूप ॥ ४ ॥

झुरोनि पांजरा होऊं पाहें आतां । येई पंढरिनाथा भेटावया ॥ ५ ॥
तुका ह्मणे माझी पुरवावी आस । विनंती उदास करूं नये ॥ ६ ॥

॥ १९४२ ॥

वाटुली पाहातां सिणले डोळुले । दाविसी पाउलें कैं वो डोळां ॥ १ ॥
तूं माय माउली कृपेची साउली । विठले पाहिली वास तुझी ॥ २ ॥
कां बा मोकलिलें कवणा निरविलें । कठिण कैसें जालें हृदय तुझें ॥३॥
तुका ह्मणे माझ्या आसावल्या बाह्या । तुज क्षेम द्याया पांडुरंगा ॥४॥

॥ १९४३ ॥

भक्तिप्रतिपाळे दीन वो वत्सले । विठले कृपाळे होसी माये ॥ १ ॥
पडिला विसर माझा काय गुणें । कपाळ हें उणें काय करूं ॥ २ ॥
तुका ह्मणे माझें जाळूनि संचित । करीं वो उचित भेट देई ॥ ३ ॥

॥ १९४४ ॥

तुजविण मज कोण वो सोयरें । आणीक दुसरें पांडुरंगा ॥ १ ॥ लागलीसे आस पाहे तुझें वास । रात्री वो दिवस लेखीं बोटें ॥ २ ॥ काम गोड मज न लगे हा धंदा । तुका ह्मणे सदा हेंचि ध्यान ॥ ३ ॥

॥ १९४५ ॥

न लगे हें मज तुझें ब्रह्मदान । गोजिरें सगुण रूप पुरे ॥ १ ॥ लागला उशीर पतितपावना । विसरोनि वचना गेलासि या ॥ २ ॥ जाळोनि संसार बैसलों अंगणीं । तुझे नाहीं मनीं मानसींही ॥ ३ ॥ तुका ह्मणे नको रागे जों विठ्ठला । उठीं देई मला भेटी आतां ॥ ४ ॥

॥ १९४६ ॥

धांव घाली आई । आतां पाहातेसी काई ॥ १ ॥ धीर नाहीं माझे पोटीं । जालों वियोगें हिंपुटी ॥ २ ॥ करावें सीतळ । बहु जाली हळहळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे डोई । कधीं ठेवीन हे पायीं ॥ ४ ॥

॥ १९४७ ॥

दर्शनाची आस । आतां न साहे उदास ॥ १ ॥ जीव आला पायां-

पाशीं । येथें असें कलिवरेसीं ॥१॥ कांहींच नाठवे । ठायीं बैसलें नुठवे ॥ ३ ॥ जीव असतां पाहीं । तुका ठकावला ठायीं ॥ ४ ॥

॥ १९४८ ॥

कान्हया रे जगजेठी । देई भेटी एकवेळ ॥१॥ काय मोकलिलें वनीं । सावजांनीं वेढिलें ॥ २ ॥ येथवरी होता संग । अंगें अंग लपविलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाहिलें मागें । एवढ्या वेगें अंतरला ॥ ४ ॥

॥ १९४९ ॥

जये ठायीं आवडी ठेली । मज ते बोली न संडे ॥ १ ॥ पुरवावें जीवींचें कोड । भेटी गोड तुज मज ॥ २ ॥ आणिलें तें येथवरी । रूप दुरी न करावें ॥३॥ तुका ह्मणे नारायणा । सेवाहीना धिग वृत्ति ॥४॥

॥ १९५० ॥

आर्त माझ्या बहु पोटीं । व्हावी भेटी पायांशीं ॥ १ ॥ यासी तुह्मी कृपावंता । माझी चिंता असों द्या ॥२॥ तळमळ करी चित्त । अखंडित वियोगें ॥३॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । जाणे व्यथा अंतरिंची ॥४॥

॥ १९५१ ॥

मन उताविळ । जालें न राहे निश्चळ ॥ १ ॥ दे रे भेटी पंढरिराया । उभारोनि चारी बाह्या ॥ २ ॥ सर्वांग तळतळी । हात पाय रोमावळी ॥ ३ ॥ तुकया बंधु ह्मणे कान्हा । भूक लागली नयना ॥ ४ ॥

॥ १९५२ ॥

भेटीची आवडी उताविळ मन । लागलेंसें ध्यान जीवीं जीवा ॥ १ ॥
आतां आवडीचा पुरवावा सोहळा । नेउनि गोपाळा क्षेम देई॥ २ ॥
नेत्र उन्मळित राहिलें ताटस्त । गंगा अश्रुपात वहावली ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी करा साचपणा । मुळींच्या वचना आपुलिया ॥ ४ ॥

॥ १९५३ ॥

मी तव बैसलों धरूनियां ध्यास । न करीं उदास पांडुरंगा ॥ १ ॥
नको आतां मज दवडूं श्रीहरी । मागाया भिकारी जालों दास ॥ २ ॥

भुकेलों कृपेच्या वचनाकारणें । आशा नारायणें पुरवावी ॥ ३ ॥
तुका ह्मणे येऊनियां देई भेटी । कुरवाळुनी पोटीं धरीं मज ॥ ४ ॥

॥ १९५४ ॥

धरुनि हें आलों जीवीं । भेटी व्हावी विठोबासी ॥१॥ संकल्प तो नाहीं दुजा । महाराजा विनवितों ॥२॥ पायांवरी ठेविन भाळ । येणें सकळ पावलें ॥३॥ तुका ह्मणे डोळेभरी । पाहिन हरीश्रीमुख ॥४॥

॥ १९५५ ॥

कधीं कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥१॥ भेटीलागीं पंढरी-नाथा । जीवीं लागली तळमळ व्यथा ॥२॥ सिणलें माझें मन । वाट पाहातां लोचन ॥३॥ तुका ह्मणे लागली भूक । तुझें पाहावया श्रीमुख॥४॥

॥ १९५६ ॥

भेटीवांचोनियां दुजें नाहीं चित्तीं । येणें काकुळती याजसाटीं ॥ १ ॥
भेटोनियां बोलें आवडीचें गुज । आनंदाच्या भोजें जेवूं संगें ॥ २ ॥
मायलेंकरासी नाहीं दुजी परि । जेवूं बरोबरी बैसोनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसें अंतरींचें आर्त । यावें जी त्वरित नारायणा ॥ ४ ॥

॥ १९५७ ॥

कन्या सासुऱ्यासि जाये । मागें परतोनी पाहे ॥ १ ॥ तैसें जालें माझ्या जिवा । कधीं भेटसी केशवा ॥ २ ॥ चुकलिया माये । बाळ हुरू हुरू पाहे ॥३॥ जीवना वेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥४॥

॥ १९५८ ॥

कीर्तन ऐकावया भुलले श्रवण । श्रीमुख लोचन देखावया ॥ १ ॥
उदित हें भाग्य होइल कोणे काळीं । चित्त तळमळी ह्मणऊनि ॥ २ ॥
उतावीळ बाह्या भेटिलागीं दंड । लोटांगणीं धड जावयासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे माथा ठेवीन चरणीं । होतील पारणीं इंद्रियांचीं ॥ ४ ॥

॥ १९५९ ॥

देवा बोलें आतां बोला । त्वां कां धरिला अबोला ॥ १ ॥ भेऊं नको देई भेटी । तूं कां पडिलासी संकटीं ॥२॥ तुझ्या जीवींचें मी जाणें ।

ह्मणसी मुक्ती आह्मां देणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नलगे कांहीं । चित्त राहो तुझे पायीं ॥ ४ ॥

॥ १९६० ॥

कां हो येथें काळ आला आह्मां आड । तुझांपाशीं नाड करावया ॥ १ ॥
कां हो विचाराचें पडिलें सांकडें । काय ऐसें कोडें उपजलें ॥ २ ॥
कां हो उपजेना द्यावी ऐशी भेटी । काय द्वैत पोटीं धरिलें देवा ॥ ३ ॥
पाप फार किंवा जालासी दुर्बळ । मागिल तें बळ नाहीं आतां ॥४॥
काय जालें देणें निघालें दिवाळें । कीं बांधलासि बळें ऋणेंपायीं॥५॥
तुका ह्मणे कां रे ऐसी केली गोवी । तुझी माझी ठेवी निवडुनियां ॥६॥

॥ १९६१ ॥

पंढरीची वाट पाहें निरंतर । निढळावरी कर ठेवूनियां ॥ १ ॥
जातियां निरोप पाठवीं माहेरा । कां मज सासुरा सांडियेलें ॥ २ ॥
पैल कोण दिसे गरुडाचे वारिकें । विठ्ठलासारिकें चतुर्भुज ॥ ३ ॥
तुका ह्मणे धीर नाहीं माझ्या जीवा । भेटशी केधवां पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ १९६२ ॥

काय तुझें वेचे मज भेटी देतां । वचन बोलतां एक दोन ॥ १ ॥
काय तुझें रूप घेतों मी चोरोनि । त्या भेणें लपोनि राहिलासी ॥२॥
काय तुझें आह्मां करावें वैकुंठ । भेवों नको भेट आतां मज ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझी नलगे दसोडी । परि आहे आवडी दर्शनाची ॥ ४ ॥

॥ १९६३ ॥

वाट पाहें हरि कां न ये अझूनि । निष्ठुर कां मनीं धरियेलें ॥ १ ॥
काय करूं धीर होत नाहीं जीवा । काय आड ठेवा उभा ठेला ॥ २ ॥
नाहीं माझा धांवा पडियेला कानीं । कोठें चक्रपाणी गुंतलेती ॥ ३ ॥
नाहीं आलें कळों अंतरा अंतर । कृपावंत फार ऐकतो ॥ ४ ॥
बहुता दिसांचें राहिलें भातुकें । नाहीं कवतुकें कुरवाळिलें ॥ ५ ॥
तुका ह्मणे देई एकवेळां भेटी । शीतळ हें पोटीं होइल मग ॥ ६ ॥

॥ १९६४ ॥

ये गा महाविष्णु अनंतभुजाच्या । आह्मां आनाथांच्या माहेरा ये ॥१॥
भेटावया तुज आढे माझा जीव । एकवेळा पाय दावीं डोळां ॥२॥
आणीक हें आर्त नाहीं नारायणा । ओढ हे वासना भेटावया ॥३॥
वाटे चित्तीं काय करावा विचार । चरण सुंदर पाहावया ॥४॥
तुका ह्मणे माझें पुरवीं मनोरथ । येईं गा संवरीत पांडुरंगा ॥५॥

॥ १९६५ ॥

पहावा नयनीं विठ्ठलचि एक । कांहीं तरी सार्थक संसाराचें ॥ १ ॥
कोठें पाहों तुज कां गा लपालासी । कांहीं बोल मशीं नारायणा ॥ २ ॥
वाटतें उदास मज दाही दिशा । तुजविण हृषीकेशा वांचोनियां ॥ ३ ॥
नको ठेवूं मज आपणां वेगळें । बहुत कळवळें तुजलागीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे भेटी देईं नारायणा । घडी कंठवेना तुजविण ॥ ५ ॥

॥ १९६६ ॥

नव्हे निष्ठावंत तुज काय बोल । सेवेविण मोल मागतसें ॥ १ ॥
न घडे भजन शुद्ध भावनिष्ठा । आपुल्या अदृष्टावरी बोल ॥ २ ॥
पूर्वीं जाले भक्त असंख्य विरक्त । काम क्रोध अहंते निर्दाळिलें ॥ ३ ॥
ऐसी अंगवण नाहीं मज देवा । करीतसें हेवा भेटावयाचा ॥ ४ ॥
कृपा करोनियां पुरवीं असोसी । आपुल्या ब्रीदासी राखावया ॥ ५ ॥
तुका ह्मणे एक बाळक अज्ञातें । त्यासी हे पोसित मायबापें ॥ ६ ॥

॥ १९६७ ॥

बा रे पांडुरंगा केव्हां येशी भेटी । जाहालों हिंपुटी तुजवीण ॥ १ ॥
तुजवीण सखें न वटे मज कोणी । वाटतें चरणीं घालूं मिठी ॥ २ ॥
ओवाळावी काया चरणांवरोनी । केव्हां चक्रपाणी भेटशील ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी पुरवी आवडी । वेगीं घालीं उडी नारायणा ॥ ४ ॥

॥ १९६८ ॥

अपराध जाले जरी असंख्यात । तरी कृपावंत नाम तुझें ॥ १ ॥
तुझें लडिवाळ तुज कृपा यावी । म्यां वाट पाहावी कवणाची ॥ २ ॥

मायबाप माझा रुक्मादेवीवर । हा दृढ निर्धार अंतरींचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे कोणे गोष्टीचें संकट । न घालीं मज भेट नारायणा ॥ ४ ॥

॥ १९६९ ॥

नाहीं बळ योग अभ्यास कराया । न कळे ते क्रिया साधनाची ॥ १ ॥
तुझिये भेटीचें प्रेम अंतरंगीं । नाहीं बळ अंगीं भजनाचें ॥ २ ॥
काय पांडुरंगा करूं हा विचार । झुरतें अंतर भेटावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे सांगा वडिलपणें बुद्धी । तुजविण दयानिधी पुसों कोणां ॥ ४ ॥

॥ १९७० ॥

माझिया तो जीवें घेतला हा सोस । पाहें तुझी वास भेटावया ॥१॥
मातेविण बाळ न मनीं आणिका । सर्वकाळ धोका स्तनपाना ॥२॥
वोसंगा निघाल्यावांचूनि न राहे । त्याचें आर्त माय पुरवीते ॥३॥
तुका ह्मणे माते भक्तां तूं कृपाळ । गिळियेले जाळ वनांतरीं ॥४॥

॥ १९७१ ॥

न लगती मज शब्दब्रह्मज्ञान । तुझिया दर्शनावांचूनिया ॥ १ ॥
ह्मणऊनि तुझें करितों चिंतन । नावडे वचन आणिकांचें ॥ २ ॥
काय ते महत्वीं करावी मान्यता । तुज न देखतां पांडुरंगा ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज भेटल्यावांचूनि । न राहें त्याहूनि होइन वेडा ॥ ४ ॥

॥ १९७२ ॥

हाचि माझा नेम धरिला हो धंदा । यावरि गोविंदा भेटी द्यावी ॥१॥
हाचि माझा ध्यास सदा सर्वकाळ । न्यावयासी मूळ येसी कधीं ॥२॥
डोळियांची भूक पाहातां श्रीमुख । आलिंगणें सुख निवती भुजा ॥३॥
बहु चित्त ओढे तयाचिये सोई । पुरला हा कांहीं नवस नेणें ॥४॥
बहुबहु काळ जालों कासावीस । वाहिलें बहुवस कलेवर ॥५॥
तुका ह्मणे आतां पाडावें हें ओझें । पांडुरंगा माझें इयावरि ॥६॥

॥ १९७३ ॥

स्वामीसी संकट पडे जे गोष्टीचें । काय त्या प्रेमाचें सुख मज ॥१॥
दुःखवीना चित्त तुझें नारायणा । कांहींच मागेना तुजपाशीं ॥२॥

रिद्धि सिद्धि मोक्ष संपत्ति विलास । सोडियेली आस याची जीवें ॥ ३ ॥
तुका ह्मणे एके वेळे देई भेटी । वोरसोनि पोटीं आलिंगावें ॥ ४ ॥

॥ ११७४ ॥

नेणपणें नाहीं केला हा बोभाट । आतां आली वाट कळों खरी ॥ १ ॥
आतां बहु शीघ्र यावें लवकरी । वाट पाहें हरी भेटी देई ॥ २ ॥
समर्थाच्या बाळा करुणेचें भाषण । तरी त्याची कोण नांदणूक ॥ ३ ॥
तुका ह्मणे बहु बोलिले बडिवार । पडिलें अंतर लौकिकीं तें ॥ ४ ॥

॥ ११७५ ॥

भेटीलागीं जीवा लागलीसे आस । पाहे रात्रंदिवस वाट तुझी ॥ १ ॥
पूर्णिमेचा चंद्रमा चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥ २ ॥
दिवाळीचे मूळा लेंकी आसावली । पाहाते वाटुली पंढरीची ॥ ३ ॥
भुकेलिया बाळ अति शोक करी । वाट पाहे परी माउलीची ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज लागलीसे भूक । धांवूनि श्रीमुख दावीं देवा ॥ ५ ॥

॥ ११७६ ॥

आमुचीं जिवलगें सज्जन सोयरीं । नांदतील तीरीं भींवरेच्या ॥ १ ॥
तींच माझ्या चित्तीं वसती दिवसराती । भेटावया खंती वाटतसे ॥ २ ॥
संपदा सोहळे सर्व सुख वसे । वैकुंठीं जें नसे सुरवरासी ॥ ३ ॥
ज्याच्या नामें पाप दुःख नाहीं भय । विठ्ठल बाप माय रखुमाबाई ॥ ४ ॥
माझा जीव जातो अमृत ते कळा । कंठीं वेळोवेळां ध्यात असें ॥ ५ ॥
तुका ह्मणे वाट पाहातां शिणले । त्या पथें डोळुले पंढरीच्या ॥ ६ ॥

॥ ११७७ ॥

लोकमान देहसुख । संपत्ति उपभोग अनेक । विटंबना दुःख । तुझिया भेटीवांचूनि ॥ १ ॥ तरि मज ये भेट ये भेट । काय ठाकलासी नीट । थोर पुण्यें वीट । तुज दैवेंचि लाधली ॥ २ ॥ काय ब्रह्मज्ञान करूं कोरडें । रितें मावेचें मापाडें । भेटीविण कुडें । तुझिया अवघें मज वाटे ॥ ३ ॥ आत्मस्थितीचा विचार । काय करूं हा उद्धार । न

देखतां धीर। चतुर्भुज मज नाहीं ॥ ४ ॥ रिद्धिसिद्धी काय करूं। अथवा अगम्य विचारु। भेटीविण भारु। तुझिया वाटे मज यांचा ॥ ५ ॥ तुजवांचूनि कांहीं व्हावें। ऐसें नको माझिया जीवें। तुका ह्मण यावें। दरुषण पायांचें ॥ ६ ॥

॥ ११७८ ॥

मातेविण बाळा। आणीक न माने सोहळा ॥ १ ॥ तैसें जालें माझ्या चित्ता। तुजवीण पंढरिनाथा ॥ २ ॥ वाट पाहे मेघाबिंदू। नेघे चातक सरिता सिंधू ॥३॥ सारसांसी निशीं। ध्यान रवीच्या प्रकाशीं ॥४॥ जीवनाविण मत्स्य। जैसें धेनूलागी वत्स ॥ ५ ॥ ॥ पतिव्रते जिणें। भ्रताराच्या वर्तमानें ॥ ६ ॥ कृपणाचें धन। लोभालागीं जैसें मन ॥ ७ ॥ तुका ह्मणे काय। तुजविण प्राण राहे ॥ ८ ॥

॥ ११७९ ॥

सर्वभावें आलों तुजचि शरण। कायावाचामनसहित देवा ॥ १ ॥
आणीक दुसरें नये माझ्या मना। राहिली वासना तुझ्या पायीं ॥ २ ॥
माझिये वारचें कांहीं जडभारी। तुजविण वारी कोण दुजें ॥ ३ ॥
तुझे आह्मी दास आमुचा तूं ऋणी। चालत दुरूनी आलों मागें ॥४॥
तुका ह्मणे आतां घेतलें धरणें। हिशोबाकारणें भेटी देई ॥ ५ ॥

॥ ११८० ॥

दंभें कीर्ति पोट भरे मानी जन। स्वहित कारण नव्हे कांहीं ॥ १ ॥
अंतरती तुझे पाय मज दुरी। धरितां ये थोरी जाणिवेची ॥ २ ॥
पिंडाच्या पाळणें धांवती विकार। मजदावेदार मजमाजी ॥ ३ ॥
कैसा करूं घात आपुला आपण। धरूनि गुमान लोकलाज ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज दावीं तो सोहळा। देखें पाय डोळां तुझे देवा ॥ ५ ॥

॥ ११८१ ॥

डोळियां पाझर कंठ माझा दाटे। येऊं देई भेटे पांडुरंगे ॥ १ ॥
बहु दिस टाकिलें निरास कां केलें। कोठें वो गुंतलें चित्त तुझें ॥ २ ॥
बहु धंदा तुज नाहीं वो आठव। राहिलासे जीव माझा कंठीं ॥ ३ ॥

पंढरीस जाती वारकरी संतां । निरोप बहुतां हातीं धाडीं ॥ ४ ॥
तुजविण कोण सांवा धांवा करी । ये वो झडकरी पांडुरंगे ॥ ५ ॥
काय तुझी वाट पाहों कोठवरी । कृपाळुवा परी विसरलासी ॥ ६ ॥
एक वेळे माझा धरूनि आठव । तुका ह्मणे येवो न्यावयासी ॥ ७ ॥

॥ १९८२ ॥

कोण्या काळें येइल मना । नारायणा तुमचिया ॥ १ ॥ माझा करणें अंगीकार । सर्व भार फेडूनी ॥ २ ॥ लागली हे तळमळ चित्ता । तरी दुश्चिता संसारीं ॥ ३ ॥ सुखाचीच पाहें वास । मागें दोष सांभाळी ॥ ४ ॥ इच्छा पूर्ण जाल्याविण । कैसा सीण वारेल ॥५॥ लाहो कायामनें वाचा । देवा साच्या भेटीचा ॥ ६ ॥ कांटाळा तो न धरावा । तुह्मी देवा देवा दासांचा ॥७॥ तुका ह्मणे माझे वेळे । न कळे कां हें उफराटें ॥८॥

॥ १९८३ ॥

वेगडाचा रंग राहे कोण काळ । अंगें हें पितळ न देखतां ॥ १ ॥
माझें चित्त मज जवळीच गोही । तुझी मज नाहीं भेटी ऐसें ॥ २ ॥
दासीसुतां नाहीं पितियाचा ठाव । अवघेंचि वाव संग त्याचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी केली विटंबना । अनुभवें जना येइल कळों ॥ ४ ॥

॥ १९८४ ॥

अनाथाचा सखा ऐकिला प्रताप । होशी कृपावंत मजवरी ॥ १ ॥
माझिया गा चित्ता करीं शिकवण । जेणें तुझे चरण जोडतील ॥ २ ॥
जोडुनियां कर येतों काकुलती । रखुमाईच्या पती कृपावंता ॥ ३ ॥
हरूपें निर्भर करीं माझें मन । दाखवीं चरण पांडुरंगा ॥ ४ ॥
तुझे भेटीवीण जन्म गेला वांयां । भजन कराया शक्ति नाहीं ॥ ५ ॥
न घडे तुझी सेवा न घडे पूजन । जन्मोनि निष्कारण जाऊं पाहे ॥ ६ ॥
तुका ह्मणे हरी करावें या काय । भजनाशीं साह्य होई बापा ॥ ७ ॥

॥ १९८५ ॥

कटावरी कर कासया ठेविले । जननी विठ्ठले जीवलगे ॥ १ ॥ शंख चक्र-गदाकमळमंडित । आयुधें मंडित कृष्णाबाई ॥ २ ॥ क्षण एक धीर होत

नाहीं चित्ता । केव्हां पंढरिनाथा भेटशील ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंचि करीं देई क्षेमा । तईंच विश्रामा पावईन ॥ ४ ॥

॥ १९८६ ॥

तुमची तों भेटी नव्हे ऐसी जाली । कोरडीच बोली ब्रह्मज्ञान ॥ १ ॥
आतां न बोलावें ऐसें वाटे देवा । संग न करावा कोणांसवें ॥ २ ॥
तुह्मां निमित्यासी सांपडलें अंग । नेदावा हा संग विचारिलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी राहिली वासना । आवडी दर्शनाचीच होती ॥ ४ ॥

॥ १९८७ ॥

तुझा ह्मणवून तुज नेणें। ऐसें काय माझें जिणें ॥ १ ॥ तरि मज कवणाचा आधार । करोनियां राहों धीर ॥ २ ॥ काय शब्दची ऐकिला । भेटी नसतां गा विठ्ठला॥३॥तुका ह्मणे आतां। अभय देई पंढरिनाथा।४॥

॥ १९८८ ॥

आपुलिया ऐसें करी । संग धरी ज्याचा हो ॥१॥ ह्मणऊनि परपरते। वरवरते पळतसें ॥२॥ लोभिक तें लोभा लावी । बांधल्या गोवी वांचूनी ॥३॥ तुका ह्मणे नामगोंठी । पुरे भेटी तुझी देवा ॥४॥

॥ १९८९ ॥

मोक्ष तुमचा देवा । तुह्मी दुर्लभ तो ठेवा ॥१॥ मज भक्तीची आवडी । नाहीं अंतरीं ते गोडी ॥ २ ॥ आपुल्या प्रकारा । करा जतन दातारा ॥३॥ तुका ह्मणे भेटी । पुरे एकचि शेवटीं ॥४॥

---

## करुणापर अभंग.

॥ १९९० ॥

संसारतापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥ १ ॥
ह्मणऊनि तुझे आठविले पाय । ये वो माझे माय पांडुरंगे ॥ २ ॥
बहुतां जन्मींचा जालों भारवाही । सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ॥ ३ ॥
वेढियेलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं । कणव न करी कोणी माझी ॥ ४ ॥

बहु पांगविलों बहु वागविलों । बहु दिवस जालों कासाविस ॥ ५ ॥
तुका ह्मणे आतां धांव घालीं वेगीं । ब्रीद तुझें जगीं दीनानाथा ॥ ६ ॥

॥ ११९१ ॥

सर्प भुलोन गुंतला नादा । गारुडियें फांदा घातलासे । हिंडवुनि पोट भरी दारोदारीं । कोंडुनि पेटारी असे रया ॥१॥ तैसी परी मज जाली पांडुरंगा । गुंतलों तो मी गा सोडीं आतां । माझें मज कांहीं न चलेसे जालें । कृपा तुज न करितां ॥ २ ॥ आविसें मीन लावियला गळीं । भक्ष तो गिळी ह्मणउनियां । काढूनि बाहेरी प्राण घेऊं पाहे । तेथें बापमाये कवण रया ॥३॥ पक्षी पिलयां पातलें आशा । देखोनियां फांसा गुंते बळें । मरण नेणें माया धांवोनि वोसरे । जीवित्व ना जालीं बाळें ॥ ४ ॥ गोडपणें मासी गुंतली लिगाडीं । सांपडे फडफडी अधिकाधिक । तुका ह्मणे प्राण घेतला आशा । पंढरीनिवासा धांव घालीं ॥५॥

॥ ११९२ ॥

सुटायाचा कांहीं पाहातों उपाय । तों हे देखें पाय गोवियेले ॥ १ ॥
ऐसिया दुःखाचे सांपडलों संदी । हरपली बुद्धि बळ माझें ॥ २ ॥
प्रारब्ध क्रियमाण संचिताचें । वोढत ठायींचें आलें साचें ॥ ३ ॥
विधिनिषेधाचे सांपडलों चपे । एकें एक लोपे निवडेना ॥ ४ ॥
सारावें तें वाढे त्याचियाचि अंगें । तृष्णेचिया संगें दुःखी जालों ॥ ५ ॥
तुका ह्मणे आतां करीं सोडवण । सर्वशक्तिहीन जालों देवा ॥ ६ ॥

॥ ११९३ ॥

भय वाटे पर । न सुटे हा संसार ॥ १ ॥ ऐसा पडिलों कांचणी । करीं धांवा ह्मणउनी ॥२॥ विचारितों कांहीं । तों हें मन हातीं नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । येथें न पुरे रिघावा ॥४॥

॥ ११९४ ॥

अंतरींचा भाव जाणोनियां गुज । तैसें केलें काज पांडुरंगा ॥ १ ॥
घातलें वचन न पडेचि खालीं । तूं आह्मां माउली अनाथांची ॥ २ ॥
मज याचकाची पुरवावी आशा । पंढरीनिवासा मायबापा ॥ ३ ॥

नाशिली आशंका माझिया जीवाची । उरली भेदाची होती कांहीं ॥४॥
तुका ह्मणे आतां केलों मी निर्भर । गाईन अपार गुण तुझे ॥ ५ ॥

॥ १९९५ ॥

बोलविसी तैसें आणीं अनुभवा । नाहीं तरी देवा विटंबना ॥ १ ॥
मिठेंविण काय करावें मिष्टान्न । शव जीवेंविण शृंगारिलें ॥ २ ॥
संपादणीविण विटंबिलें सोंग । गुणेंविण चांग रूपहीन ॥ ३ ॥
कन्यापुत्रेंविण मंगळदायकें । वेचिलें हें फिकें द्रव्य तरी ॥ ४ ॥
तुका ह्मणे तैसी होते मज परी । न देखे अंतरीं प्रेमभाव ॥ ५ ॥

॥ १९९६ ॥

श्वाना दिली सवे । पायांभोंवतें तें भोंवें ॥ १ ॥ तैसी जाली मज
परी । वसे निकट सेजारीं ॥ २ ॥ जेवितां जवळी । येऊनियां पुच्छ
घोळी ॥ ३ ॥ कोपेल तो धनी । तुका ह्मणे नेणें मनीं ॥ ४ ॥

॥ १९९७ ॥

मुखें बोलावें तें जीवींचें जाणसी । विदित पायापाशीं सर्व आहे ॥ १ ॥
आतां हेचि भलें भाकावी करुणा । विनियोग तो जाणा तुह्मी त्याचा॥२॥
आपलें तों येथें केलें नव्हे कांहीं । साधनाच्या वाहीं पडों नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे देह दिला पिंडदान । वेळोवेळां कोण चिंता करी ॥ ४ ॥

॥ १९९८ ॥

जन पूजी याचा मज कां आभार । हा तुह्मी विचार जाणा देवा ॥१॥
पत्र कोण मानी वंदितील सिक्का । गौरव सेवका त्याचि मुळें ॥ २ ॥
मी मीपणें होतों जनामधीं आधीं । कोणें दिलें कधीं काय तेव्हां ॥३॥
आतां तूं भोगितां सर्व नारायणा । नको आह्मां दीनां पीडा करूं ॥ ४ ॥
आपुलिया हातें देसील मुशारा । तुका ह्मणे खरा तोचि आह्मां ॥ ५ ॥

॥ १९९९ ॥

मजपुढें नाहीं आणीक बोलता । ऐसें कांहीं चित्ता वाटतसे ॥ १ ॥
याचा कांहीं तुह्मीं देखावा परिहार । सर्वज्ञ उदार पांडुरंगा ॥ २ ॥

कामक्रोधें नाहीं सांडिलें आसन । राहिले वसोन देहामध्यें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां जालों उतराई । कळो यावें पायीं निरोपिलें ॥ ४ ॥

॥ २००० ॥

काळावरी घालूं तरि तो सरिसा । न पुरतां इच्छा दास कसे ॥ १ ॥
आतां नाहीं कांहीं उशिराचें काम । न खंडावें प्रेम नारायणा ॥ २ ॥
देणें लागे मग विलंब कां आड । गोड तरी गोड आदि अंत ॥ ३ ॥
तुका ह्मणे होईल दर्शनें निश्चिंती । गाईन ते गीतीं ध्यान मग ॥ ४ ॥

॥ २००१ ॥

काय माझा पण होईल लटिका । ब्रिदावळी लोकां दाविली ते ॥ १ ॥
तरी करूनियां देई माझी आळी । येऊनि कुरवाळी पांडुरंगे ॥ २ ॥
आणीक म्यां कोणा ह्मणवावें हातीं । नये काकुलती दुजियासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज येथेंचि ओळखी । होईन तो सुखी पायांनींच ॥ ४ ॥

॥ २००२ ॥

नको माझे मानूं आहाच ते शब्द । कळवळ्याचा वाद करीतसें ॥ १ ॥
कासयानें बळ करूं पायांपासीं । भाकावी ते दासीं करुणा आह्मीं ॥ २ ॥
काय मज चाड असे या लौकिकें । परी असे निकें अनुभवाचें ॥ ३ ॥
लांचावल्यासाटीं वचनाची आळी । टकळ्यानें घोळीं जवळी मन ॥ ४ ॥
वाटतसे आस पुरविसी ऐसें । तरि अंगीं पिसें लावियेलें ॥ ५ ॥
तुका ह्मणे माझी येथेंचि आवडी । श्रीमुखाची जोडी इच्छीतसें ॥ ६ ॥

॥ २००३ ॥

तांतडीनें आह्मां धीरचि न कळे । पाळावे हे लळे लवलाहीं ॥ १ ॥
नका कांहीं पाहों सावकाशीं देवा । करा एक हेवा तुमचा माझा ॥ २ ॥
वोरसाचा हेवा सांभाळावी प्रीत । नाहीं राहों येत अंगीं सदा ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज नका गोवूं खेळा । भोजनाची वेळा राखियेली ॥ ४ ॥

॥ २००४ ॥

इच्छिती तयांसी व्हावें जी अरूप । आह्मांसी स्वरूपस्थिती चाड ॥ १ ॥
आतां नव्हे माझा भाव अनारिसा । पाउलांनीं इच्छा गोवियेली ॥ २ ॥

लेंकरासी कोठें जाणत्याची परी । करूं येते वुगी धरावया ॥ ३ ॥
लागली न सुटे नामाची आवडी । माझी भाव जोडी भंगूं नका ॥४॥
घेसील वेढे मुक्तांच्या अभिलासें । चाळवीं जा पिसे ब्रह्मज्ञानी ॥५॥
तुका ह्मणे माझा कोठें भक्तिरस । पाडावया ओस चाळविसी ॥ ६ ॥

॥ २००५ ॥

जालिया दर्शन करीन मी सेवा । आणीकही देवा नलगे दुजें ॥ १ ॥
प्रारब्धा आधीन अन्न आच्छादन । स्थिर करोनि मन ठेवीं पायीं॥२॥
ये गा ये गा येगा कृपाळुवा हरी । विनवीं अभ्यंतरीं देउनि भेटी ॥३॥
आसावलें मन जीवनाचे ओढी । नामरूपें गोडी लावियेली ॥ ४ ॥
काय तुह्मांपाशीं नाहीं भांडवल । माझे मिथ्या बोल जाती ऐसे ॥५॥
काय लोखंडाचे पाहे गुण दोष । सिवोनि परिस सोनें करी ॥ ६ ॥
तुका ह्मणे माझें अवघें असों द्यावें । आपुलें करावें ब्रीद साच ॥ ७ ॥

॥ २००६ ॥

तुझा दास मज ह्मणती अंकित । अवघे सकळिक लहान थोर ॥ १ ॥
हेंचि आतां लागे करावें जतन । तुझें थोरपण तुज देवा ॥ २ ॥
होउनी निर्भर राहिलों निश्चिंत । पावनपतित नाम तुझें ॥ ३ ॥
करितां तुज होय डोंगराची राई । न लगतां कांहीं पात्या पातें ॥४॥
तुका ह्मणे तुज काय ते आशंका । तारितां मशका मज दीना ॥ ५ ॥

॥ २००७ ॥

भलते जन्मीं मज घालिसील तरी । न सोडीं मी हरी नाम तुझें॥१॥
सुख दुःख तुज देईन भोगितां । मग मज चिंता कासयाची ॥ २ ॥
तुझा दास ह्मणवीन मी अंकिला । भोगितां विठ्ठला गर्भवास ॥ ३ ॥
कासया मी तुज भाकितों करुणा । तारीं नारायणा ह्मणऊनि ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुज येऊं पाहे उणें । तारिसील तेणें आह्मां तया ॥ ५ ॥

॥ २००८ ॥

आणीक पांखांडें असती उदंडें । तळमळिती पिंडें आपुलिया ॥ १ ॥
त्याचिया बोलाचा नाहीं विश्वास । घातलीसे कास तुझ्या नामीं ॥२॥

दृढ एक चित्तें जालों या जीवासी । लाज सर्वविशीं तुह्मांसी हे॥३॥
पीडों नेदों पण आपुले अंकित । आहे जें उचित तैसें करा ॥ ४ ॥
तुका ह्मणे किती भाकावी करुणा । कोप नारायणा येइल तुह्मां ॥५॥

॥ २००९ ॥

जेथें जातो तेथें पडतो मतोळा । न देखिजे डोळां लाभ कांहीं ॥१॥
कपाळीची रेखा असतां उत्तम । तरि कां हा श्रम पावतों मी ॥ २ ॥
नव्हेचि तुह्मास माझा अंगीकार । थेता संवसार अंतरला ॥ ३ ॥
भोग तंव जाला खरा भोगावा तो । भांडवल नेतो आयुष्य काळ ॥४॥
कोठें तुह्मी कीर्ति आइकिली देवा । मुकतों कां जीवा तुका ह्मणे ॥५॥

॥ २०१० ॥

न घडे मायबापें बाळकाचा घात । आपणांदेखत होऊं नेदी ॥ १ ॥
का मी मनीं चिंता वाहूं भय धाक । काय नव्हे एक करितां तुज॥२॥
वर्म जाणे त्याच्या हिताचे उपाय । तान भूक वाहे कडिये खांदीं॥३॥
तुका ह्मणे तूं गा कृपावंत भारी । ऐसें मज हरी कळों आलें ॥ ४ ॥

॥ २०११ ॥

नलगे मायेसी बाळें निरवावें । आपुल्या स्वभावें ओढे त्यासी ॥ १ ॥
मज कां लागला करणें विचार । ज्याचा जार भार त्याचे माथां ॥२॥
गोड धड त्यासी ठेवी न मागतां । समाधान खातां नेदी मना ॥ ३ ॥
खेळतां गुंतलें उमगूनी आणी । बैसोनियां स्तनीं लावी बळें ॥ ४ ॥
त्याच्या दुःखेंपणें आपण खापरी । लाही तळीं वरी होय जैसी ॥५॥
तुका ह्मणे देह विसरे आपुला । आघात तो त्याला लागों नेदी ॥६॥

॥ २०१२ ॥

हातीं धरिलियाची लाज । देवा असोंदे गा तुज ॥१॥ आहें अमंगळ
दुर्बळ । होई दीन तूं दयाळ ॥ २ ॥ बाळ रुबडें मातेसी । काय
नावडे तियेसी ॥३॥ तुका ह्मणे जाणे । करिन देहाचें सांडणें ॥ ४ ॥

॥ २०१३ ॥

आह्मांसाटीं अवतार । मत्स्यकूर्मादि सूकर ॥ १ ॥ मोहें धांवें घाली

पान्हा । नांव घेतां पंढरिराणा ॥ २ ॥ कोठें न दिसे पाहतां । उडी घाली अवचिता ॥ ३ ॥ सुख ठेवी आह्मांसाटीं । दुःख आपणची घोंटी ॥ ४ ॥ आह्मां घाली पाठीकडे । आपण कळिकाळाशीं भिडे ॥ ५ ॥ तुका ह्मणे कृपानिधी । आह्मां उतरीं नावेमधीं ॥ ६ ॥

॥ २०१४ ॥

न करीं तुमची सेवा । बापुडें मी पण देवा । बोलिलों तो पावला । पण सिद्धी सकळ ॥ १ ॥ आणीक काय तुह्मां काम । आह्मां नेदा तरी प्रेम । कैसे धर्माधर्म । निश्चयेंसी राहती ॥ २ ॥ आह्मी वेचलों शरीरें । तुह्मी बीज पेरा खरें । संयोगाचें बरें । गोड होतें उभयतां ॥ ३ ॥ एका हातें टाळी । कोठें वाजते निराळी । जाला तरी बळी । स्वामी विण शोभेना ॥ ४ ॥ रूपा यावें जी अनंता । धरिन पुटाची त्या सत्ता । होईन सरता । संतांमाजी पोसणा ॥ ५ ॥ ठेविलें उधारा । बरी काय तो पातेरा । तुका ह्मणे बरा । रोकडाचि निवाड ॥ ६ ॥

॥ २०१५ ॥

देह तंव आहे प्रारब्धा आधीन । याचा मी कां सीण वाहूं भार ॥ १ ॥
सरो माझा काळ तुझिया चिंतनें । कायावाचामनें इच्छीतसें ॥ २ ॥
लाभ तो न दिसे याहूनि दुसरा । आणीक दातारा येणें जन्में ॥ ३ ॥
तुका ह्मणे आलों सोसीत संकटें । मी माझें वोखटें आहे देवा ॥ ४ ॥

॥ २०१६ ॥

तुझी माझी आहे जुनी सोयरीक । आधीं बंधु लेंक मग जाले ॥ १ ॥
वाटेकरी ह्मूण न पुसती आतां । परि आहे सत्ता करीन ते ॥ २ ॥
लेंकीचें लेकरूं नातु जाल्यावरी । मंगळाही दुरि अंतरलों ॥ ३ ॥
बाइलेचा भाऊ पिसुन सोयरा । ह्मणऊनि करा विनोद हा ॥ ४ ॥
आकुळीं तों करूं नये तेंचि केलें । न बोलावें भलें तोंचि आतां ॥ ५ ॥
न ह्मणसी लेंकी माउसी बहिणी । आह्मां केलें धणी पापाचे त्या ॥ ६ ॥
बहु पांचांजणीं केली विटंबना । नये दावूं जना तोंड ऐसें ॥ ७ ॥
तुका ह्मणे आधीं मूळ तेंचि धरूं । मागील तें करूं उरी आतां ॥ ८ ॥

॥ २०१७ ॥

कोण तो उपाव करूं भेटावया । जाळावी हे काया ऐसें वाटे ॥ १ ॥
सोडोनियां गांव जाऊं वनांतरा । रुक्मादेवीवरा पाहावया ॥ २ ॥
करूं उपवास शोधूं हें शरीर । न धरवे धीर नारायणा ॥ ३ ॥
जाती आयुष्याचे दिवस हे चारी । मग केव्हां हरी भेटशील ॥ ४ ॥
तुका ह्मणे कांहीं सांगा विचारोनि । विठो तुझे मनीं असेल तें ॥ ५ ॥

॥ २०१८ ॥

तुज दिलें आतां करीं यत्न याचा । जीवभाव वाचा काया मनें ॥ १ ॥
भागलों दातारा सीण जाला भारी । आतां मज तारीं शरणागता ॥ २ ॥
नेणतां सोशिली तयाची आटणी । नव्हतांही कोणी कांहीं माझीं ॥ ३ ॥
वर्मे नेणें दिशा हिंडती मोकट । इंद्रियें सुनाट दाही दिशा ॥ ४ ॥
येरझारींफेरा सिणलों सायासीं । जातां हृषीकेशी अंगिकारीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे मन इंद्रियांचे सोई । धांवे यासी काई करूं आतां ॥ ६ ॥

॥ २०१९ ॥

नेणे गति काय कवण अधोगति । मानिली निश्चिंती तुझ्या पायीं ॥ १ ॥
कर्म धर्म कोण नेणें हा उपाव । तुझ्या पायीं भार ठेवियेला ॥ २ ॥
नेणें निरसूं पाप पुण्य नेणें काय । ह्मणऊनि पाय धरिले तुझे ॥ ३ ॥
वेडा मी अविचार न कळे विचार । तुज माझा भार पांडुरंगा ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुज करितां नव्हे काय । माझा तो उपाय कवण तेथें ॥ ५ ॥

॥ २०२० ॥

नाहीं आलें भक्तिसुख अनुभवा । तो मी ज्ञान देवा काय करूं ॥ १ ॥
नसावें जी तुह्मी कांहीं निश्चितीनें । माझिया वचनें अभेदाच्या ॥ २ ॥
एकाएकीं मन नेदी समाधान । देखिलया चरण वांचूनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे वाचा गुणीं लांचावली । न राहे उगली मौन्य मज ॥ ४ ॥

॥ २०२१ ॥

न कळतां काय करावा उपाय । जेणें राहे भाव तुझ्या पायीं ॥ १ ॥
येऊनियां वास करिसी हृदयीं । ऐसें घडे कई कासयानें ॥ २ ॥

साच भावें तुझें चिंतन मानसीं । राहे हें करिसी कैं गा देवा ॥ ३ ॥
लटिकें हें माझें करूनियां दुरी । साच तूं अंतरीं येउनि राहें ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज राखावें पतिता । आपुलिया सत्ता पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ २०२२ ॥

नाहीं जप तप जीवाची आटणी । मनासी दाटणी नाहीं केली ॥ १ ॥
निजलिया ठायीं पोकारिला धांवा । सांकडें तें देवा निवारावें ॥ २ ॥
नाहीं आणुनियां समर्पिलें जळ । सेवा ते केवळ चिंतनाची ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मीं वेंचिलीं उत्तरें । घेतलीं उदारें साच भावें ॥ ४ ॥

॥ २०२३ ॥

पुढिलिया सुखें निंब देतां भले । बहुत वारलें होय दुःख ॥ १ ॥
हें तां वर्म असे माउलीचे हातीं । हाणी मारी प्रीती हितासाठीं ॥ २ ॥
खेळतां विसरे भूक तान घर । धरूनियां कर आणी बळें ॥ ३ ॥
तुका ह्मणे पाळी तोंडींचिया घांसें । उदार सर्वस्वें सर्वकाळ ॥ ४ ॥

॥ २०२४ ॥

मार्ग चुकले विदेशी एकले । तयावरी जाले दिशाभुली ॥ १ ॥
हातीं धरूनियां पाववीलें घरा । त्याच्या उपकारा काय द्यावें ॥ २ ॥
तैसा मी कुडकुडा होतों केशीराजा । सेवा न घडे लाजा ह्मणऊनि ॥ ३ ॥
सांडियेला गर्भ उबगोनि माउली । नाहीं सांभाळिली भूमि शुद्ध ॥ ४ ॥
उष्ण तान भूक एवढीये आकांतीं । वोसंगा लाविती काय ह्मणिजे ॥ ५ ॥
खांद्यावरी शूळ मरणाचे वाटे । अन्यायहि मोटे साच केले ॥ ६ ॥
हातींचें हिरोनि घातला पाठीसी । तुका ह्मणे ऐसी परी जाली ॥ ७ ॥

॥ २०२५ ॥

ऐसें भाग्य कई लाहातां होइन । अवघे देखें जन ब्रह्मरूप ॥ १ ॥
मग तया सुखा अंत नाहीं पार । आनंदें सागर हेलावती ॥ २ ॥
शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं । परावृत्त संगीं कामादिकां ॥ ३ ॥
विवेकासहित वैराग्याचें बळ । धगधगितो ज्वाळ अग्नि जैसा ॥ ४ ॥

भक्ति नवविधा भावशुद्ध बरी । अलंकारावरी मुगुटमणि ॥ ५ ॥
तुका ह्मणे माझी पुरवी वासना । कोण नारायणा तुजविण ॥ ६ ॥

॥ २०२६ ॥

आळीकरा कोठें साहातें कठीण । आपुला तें प्राण देऊं पाहे ॥ १ ॥
सांभाळावें मायबापें कृपादृष्टी । पीडितां तो दृष्टी देखों नये ॥ २ ॥
अंतरलों मागें संवसारा हातीं । पायांचें सरती जालों नाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी विचारा जी देवा । ठेवाल तें ठेवा कोणे परी ॥ ४ ॥

॥ २०२७ ॥

न पाहें माघारें आतां परतोनि । संसारापासूनि विटला जीव ॥ १ ॥
सामोरें येऊनि कवळीं दातारा । काळाचा हाकारा न साहावे ॥ २ ॥
सावधान चित्त होईल आधारें । खेळतांही बरें वाटईल ॥ ३ ॥
तुका ह्मणे कंठ दाटला या सोसें । न पवेचि कैसें अवर्का हें ॥ ४ ॥

॥ २०२८ ॥

करितां विचार । तो हा दृढ संसार । ब्रह्मादिकां पार । नुलंघ सामर्थ्यें ॥ १ ॥ शरण शरण नारायणा । मज अंगीकारीं दीना आलें तें वचनां । पासीं माझ्या सामर्थ्य ॥ २ ॥ पाठीवरी मोळी तोचि कळवा पायीं तळीं । सांपडला जाळीं । मत्स्य जाला तो न्या ॥ ३ ॥ आतां करीन तांतडी । लाभाचा ते याच जोडी । तुका ह्म ओढी । पायां सोई मनाची ॥ ४ ॥

॥ २०२९ ॥

सिणलों दातारा करितां वेरझारा । आतां सोडवीं संसारापासोनिया ॥
न सुटेचि बाकी नव्हे झाडापाडा । घातलोंसें खोडा हाडांचिया ॥
मायबापें माझीं जीवाचीं सांगाती । तीं देतील हातीं काळाचिया ॥
पडताळूनि सुरी बैसली सेजारीं । यमफासा करीं घेऊनियां ॥
पाठीं पोटीं एकें लागलीं सरसीं । नेती नरकापाशीं ओढूनियां ।
... सकळां । मी एक निराळा परदेशी ।

कोणां काकुलती नाहीं कोणे परी । तुजविण हरी कृपाळुवा ॥७॥
तुका ह्मणे मज तुझाचि भरवसा । ह्मणऊनि आशा मोकलिली ॥८॥

॥ २०३० ॥

स्त्रीपुत्रांदिकीं राहिला आदर । विषयीं पडिभर अतिशय ॥ १ ॥
आतां सोडवणें धांवा नारायणा । मज हे वासना अनावर ॥ २ ॥
येऊनियां आड ठाके लोकलाज । तें हें दिसे काज अंतरलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां जेथें जेथें गोवा । तेथें तुह्मीं देवा सांभाळावें ॥ ४ ॥

॥ २०३१ ॥

बहु या प्रपंचें भोगविल्या खाणी । टाकोनियां मनीं ठेविला सीण ॥१॥
आतां पायापाशीं लपवावें देवा । नको पाहूं सेवा भक्ती माझी ॥२॥
बहु भय वाटे एकाच्या बोभाटें । आली घायवटे फिरोनियां ॥३॥
तुका ह्मणे सिगे भरूं आलें माप । वियोग संताप जाला तुझा ॥४॥

॥ २०३२ ॥

आजिवरी होतों संसाराचे हातीं । आतां ऐसें चित्तीं उपजलें ॥ १ ॥
तुला शरणागत व्हावें नारायणा । अंगिकारा दीना आपुलिया ॥ २ ॥
विसरलों काम याजसाटीं धंदा । सकळ गोविंदा माझें तुझें ॥ ३ ॥
तुका ह्मणे विज्ञापना परिसावी । आवडी हे जीवीं जाली तैसी ॥ ४ ॥

॥ २०३३ ॥

कैसा तीं देखीला होसील गोपाळीं । पुण्यवंती डोळीं नारायणा ॥ १ ॥
तेणें लोभें जीव जाळासे बगाडी । आह्मी ऐसी जोडी कई लाभों ॥ २ ॥
असेल तें कैसें दर्शनाचें सुख । अनुभवे श्रीमुख अनुभवितां ॥ ३ ॥
तुका ह्मणे वाटे देसी आलिंगन । अवस्था ते क्षणक्षणा होते ॥ ४ ॥

॥ २०३४ ॥

अवघ्या पातकांची मी एक रासी । अवघा तूं हेसी सर्वोत्तम ॥ १ ॥
जैसा तैसा लागे करणें अंगीकार । माझा सर्व भार चालविणें ॥ २ ॥
अवघेंची मज गिळियेलें काळें । अवघींच बळें तुझे अंगीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां खुंटला उपाय । अवघेचि पाय तुझे मज ॥ ४ ॥

॥ २०३५ ॥

ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठी लागे ॥ १ ॥
ह्मणोनियां अवघे सांडिले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥ २ ॥
वेदपरायण पंडित वाचक । न मिळती एक एकांमधीं ॥ ३ ॥
पाहों गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखें चेष्टा विपरीत ॥ ४ ॥
आपुलिया नाहीं निवाले जे अंगें । एकी करती रागें गुरगुरू ॥ ५ ॥
तुका ह्मणे मज कोणांचा पांगिला । नको बा विठ्ठला करूं आतां ॥ ६ ॥

॥ २०३६ ॥

मेल्यावरि मोक्ष संसारसंबंध । आरालिया बद्ध ठेवा आह्मां ॥ १ ॥
भागवित संदेह राहों कोठवरी । मग काय थोरी सेवकाची ॥ २ ॥
गाणें गीत आह्मां नाचणें आनंदें । प्रेम कोठें भेदें अंगा येतें ॥ ३ ॥
तुका ह्मणे किती सांगावे दृष्टांत । नसतां तूं अनंत सानुकूळ ॥ ४ ॥

॥ २०३७ ॥

साकरेचें नाम घेतां कळे गोडी । तैसी आह्मां जोडी वैष्णवांची ॥ १ ॥
मोक्ष गांठी असे ठेविला बांधोनी । सोस तो भजनीं आवडीचा ॥ २ ॥
भोजनाचि चिंता माय वाहे बाळा । आह्मां तरी खेळावरि चित्त ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी देहउपकारें । गाऊं निरंतर नाचों लागों ॥ ४ ॥

॥ २०३८ ॥

किती विवंचना करीतसें जीवीं । मन धांवडवी दाही दिशा ॥ १ ॥
कोणा एका भावें तुह्मी अंगीकार । करावा विचार याच साटीं ॥ २ ॥
इतर ते आतां लाभ तुच्छ जाले । अनुभवा आले गुणागुण ॥ ३ ॥
तुका ह्मणे लागो अखंड समाधि । जावें प्रेमबोधीं बुडोनियां ॥ ४ ॥

॥ २०३९ ॥

मोलाचें आयुष्य वेचतसे सेवे । नुगवतां गोवें खेद होतो ॥
उगवूं आलेति तुह्मी नारायणा । परिहार या सिणा निमिषांत ॥
लिगाडाचे मासी न्यायें जाली परी । उरली ते उरी नाहीं कांहीं ॥
—— ——े —— माधीं वाचावळें । ओढियेलों काळें धांव घालीं ॥

॥ २०४० ॥

नव्हें मी स्वतंत्र अंगाचा पाईक । जे हे सकळिक सत्ता वाहूं ॥ १ ॥
तुह्मां आळवावें पाउला पाउलीं । कृपेची साउली करीं मज ॥ २ ॥
शक्तिहीन तरी जालों शरणागत । आपुला वृत्तांत जाणोनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे भयाभेणें धरिले पाय । आणीक उपाय नेणें कांहीं ॥ ४ ॥

॥ २०४१ ॥

ओस जाल्या दिशा मज भिंगुळवाणें । जीवलग नेणे मज कोणी ॥ १ ॥
भय वाटे देखें श्वापदांचे भार । नव्हे मज धीर पांडुरंगा ॥ २ ॥
अंधकारापुढें न चलवे वाट । लागतील खुंट कांटे अंगा ॥ ३ ॥
एकला निःसंग फांकता मारग । भितों नव्हे लाग चालावया ॥ ४ ॥
तुका ह्मणे वाट दावूनि सद्गुरु । राहिला हा दुरू पांडुरंग ॥ ५ ॥

॥ २०४२ ॥

एका एक वर्म लावूनियां अंगीं । ठेवितों प्रसंगीं सांभाळीन ॥ १ ॥
नेघावा जी तुह्मी वाव बहु फार । धरूनि अंतर ठायाठाय ॥ २ ॥
वेव्हारें आलें तें समानचि होतें । बळ नाहीं येथें चालों येत ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां निवाडाच सटीं । संसारें तुटी करूनि ठेलों ॥ ४ ॥

॥ २०४३ ॥

कांहीं एक तरी असावा आधार । कासयानें धीर उपजावा ॥ १ ॥
ह्मणविल्यासाटीं कैसें पडे रुजु । धणी नाहीं उजू सन्मुख तो ॥ २ ॥
वेंचल्या दिसांचा कोणावरी लेखा । घालावा हा सुखासुखा आह्मीं ॥ ३ ॥
नाहीं मनोगत तोंवरि हे देवा । तुका ह्मणे सेवा नेघीजे तों ॥ ४ ॥

॥ २०४४ ॥

शिकल्या शब्दाचें उत्पादितों ज्ञान । दरपणींचें धन उपर वांयां ॥ १ ॥
अनुभव कई होईन भोगितां । सांकडें तें आतां हेंचि आलें ॥ २ ॥
गायें नाचें करीं शरीराचे धर्म । बीजकळा वर्म तुमचें दान ॥ ३ ॥
तुका ह्मणे केला उशीर न साहे । घाल तरी आहे सर्व सिद्ध ॥ ४ ॥

॥ २०४५ ॥

नाहीं गुणदोष लिंपों देत अंगा । झाडितां प्रसंगीं वरावरी ॥ १ ॥
निकटवासिया आळवितों धांवा । तेथूनियां देवा सोडवूनी ॥ २ ॥
उमटे अंतरीं तें करूं प्रगट । कळोनी बोभाटा धांव घालीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तरि वांचलों या काळें । समर्थाचे बळें सुखी असों ॥ ४ ॥

॥ २०४६ ॥

तुह्मी माझा देवा करिजे अंगीकार । हा नाहीं विचार मजपाशीं ॥ १ ॥
आतां दोहीं पक्षीं लागलें लंछन । देवभक्तपण लाजविलें ॥ २ ॥
एकांतीं एकलें न राहे निश्चळ । न राहेचि पळ मन ठायीं ॥ ३ ॥
पायीं महत्वाची पडिली शृंखळा । बांधविला गळा स्नेहा हातीं ॥ ४ ॥
शरीर सोकलें देखिलिया सुखा । कदान्न हें मुखा मान्य नाहीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे जाला अवगुणांचा थारा । वाढला हे निद्रा आळस बहु ॥ ६ ॥

॥ २०४७ ॥

तुजवीण तिळभरी रिता ठाव । नाहीं ऐसें विश्व बोलतसे ॥ १ ॥
बोलियेले योगी मुनी साधु संत । आहे नी या आंत सर्वाठायीं ॥ २ ॥
मी तया विश्वासें आलों शरणागत । पूर्णेचें अगत्य आहे तुझें ॥ ३ ॥
अनंत ब्रह्मांडें भरोनि उरलासी । मजला जालासी कोठें नाहीं ॥ ४ ॥
अंतपार नाहीं माझिया रूपासि । काय सेवकासि भेट देऊं ॥ ५ ॥
ऐसें विचारिलें ह्मणोनी न येशी । सांग हृषीकेशी मायबापा ॥ ६ ॥
तुका ह्मणे काय करावा उपाय । जेणें तुझे पाय आतुडती ॥ ७ ॥

॥ २०४८ ॥

अवघा वेंचलों इंद्रियांचे ओढी । जालें तें तें घडी निरोपिलें ॥ १ ॥
असावा जी ठावा लेवेसी विचार । आपुल्या स्यां भार उतरिला ॥ २ ॥
कायावाचा मनें तोचि निजध्यास । येथें जालों ओस भक्तिभावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे करूं येईल धांवणें । तरि नारायणें सांभाळावें ॥ ४ ॥

॥ २०४९ ॥

काम क्रोध माझे जीताती शरीरीं । केवळें तें वरी बोलतसे ॥ १ ॥

कैसा मी सरतां जालों तुझ्या पायीं । पांडुरंगा कांहीं न कळे हें ॥ २ ॥
पुराणींची ग्वाही वदतील संत । तैसें नाहीं चित्त शुद्ध जालें ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज आणूनि अनुभवा । दाखवीं हें देवा साच खरें ॥ ४ ॥

॥ २०५० ॥

मन माझें चपळ न राहे निश्चळ । घडी एकी पळ स्थिर नाहीं ॥ १ ॥
आतां तूं उदास नव्हें नारायणा । धांवें मज दीना गांजियेलें ॥ २ ॥
धांव घाली पुढें इंद्रियांचे ओढी । केलें तडातोडी चित्त माझें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझा न चले सायास । राहिलों हे आस धरुनी तुझी ॥ ४ ॥

॥ २०५१ ॥

नित्य या मनासी करितों विचार । तों हें अनावर विषयलोभी ॥ १ ॥
आतां मज राखें आपुलिया बळें । न देखें हें जाळें उगवतां ॥ २ ॥
सांपडलों गळीं नाहीं त्याची सत्ता । उगळी मागुता घेतला तो ॥ ३ ॥
तुका ह्मणे मी तो अज्ञानचि आहें । परि तुझी पाहें वास देवा ॥ ४ ॥

॥ २०५२ ॥

तुमचे स्तुतियोग्य कोठें माझी वाणी । मस्तक चरणीं ठेवितसें ॥ १ ॥
भक्तिभाग्य तरी नेदीं तुळसीदळ । जोडूनि अंजुळ उभा असें ॥ २ ॥
कैचें भाग्य ऐसें पाविजे संन्निध । नेणे पाळूं विध करुणा भाकीं ॥ ३ ॥
संतांचे शेवटीं उच्छिष्टाची आस । करूनियां वास पहातसें ॥ ४ ॥
करीं इच्छा मज ह्मणोत आपुलें । एखादिया बोलें निमित्य च्या ॥ ५ ॥
तुका ह्मणे शरण आलों हें साधन । करितों चिंतन रात्रदिवस ॥ ६ ॥

॥ २०५३ ॥

बारंवार तुज द्यावया आठव । आइक तो भाव माझा कैसा ॥ १ ॥
गेले मग नये फिरोन दिवस । पुढिलांची आस गणित नाहीं ॥ २ ॥
गुणां अवगुणांचे पडती आघात । तेणें होय चित्त कासाविस ॥ ३ ॥
कांहीं एक तुझा न देखों आधार । ह्मणऊनि धीर नाहीं जीवा ॥ ४ ॥
तुका ह्मणे तूं ब्रह्मांडाचा जीव । तरी कां आह्मी कींव भाकीतसों ॥ ५ ॥

॥ २०५४ ॥

मी तो सर्वभावें अनधिकारी । होइल कैसी परी नेणों देवा ॥ १ ॥
पुराणींचे अर्थ आणितां मनास । होय कासाविस जीव माझा ॥ २ ॥
इंद्रियांचीं आह्मी पांगिलों अंकितें । त्यांचे रंगीं चित्त रंगलेंसे ॥ ३ ॥
एकाचेंही मज न घडे दमन । अवघीं नेमून कैसीं राखों ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज तारीं पंढरिराया । नाहीं तरी वांयां गेलों दास ॥५॥

॥ २०५५ ॥

माझे मज कळों येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥ १ ॥
आतां आड उभा राहें नारायणा । दयासिंधुपणा साच करीं ॥ २ ॥
वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रियां अधीन जालों देवा ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझा जैसा तैसा दास । न धरीं उदास मायबापा ॥ ४ ॥

॥ २०५६ ॥

काय पुण्य ऐसें आहे मजपाशीं । तांतडी धांवसी पांडुरंगा ॥ १ ॥
काय ऐसा भक्त वांयां गेलों थोर । तूं मज समोर होसी वेगा ॥ २ ॥
काय कष्ट माझे देखिली चाकरी । तो तूं झडकरी पाचारिशी ॥ ३ ॥
कोण मी नांवाचा थोर गेलों मोटा । अपराधी करंटा नारायणा ॥४॥
तुका ह्मणे नाहीं ठाउकें संचित । येणें जन्महित नाहीं केलें ॥ ५ ॥

॥ २०५७ ॥

जन्मांतरीं शुद्ध नाहीं आचरण । यालागीं चरण अंतरले ॥ १ ॥
वोडवलें संचित येणें जन्में पाहतां । आतां पंढरिनाथा कृपा करीं ॥२॥
पतितपावन ब्रीद साच करीं देवा । यालागीं कुडावा करीं माझा॥३॥
अपराधी पातकी दुष्ट दुराचारी । आहाळलों भारी संवसारें ॥ ४ ॥
कामक्रोध आदि कल्पनेच्या त्रासें । तुज न पवें ऐसें जालें देवा ॥५॥
हा ना तोसा ठाव जाला पांडुरंगा । नयेचि उपेगा काय करूं ॥ ६ ॥
आपुलिया नांवा धांवणिया धांवें । लवकरी यावें तुका ह्मणे ॥ ७ ॥

॥ २०५८ ॥

कनवाळू कृपाळू भक्तालागी मोही । गजेंद्राचा धांवा तुवां केला

विठाई ॥ १ ॥ पांडुरंगे ये वो पांडुरंगे । जीवाचे जिवलगे येवो पांडु-
रंगे ॥ २ ॥ भक्तांच्या कैवारें कष्टलीस विठ्ठले । आंबऋषीकारणें
जन्म दाहा घेतले ॥ ३ ॥ प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार केला ।
विदारूनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला ॥ ४ ॥ उपमन्याकारणें कैसी
धांवसी लवलाहीं । पाजी प्रेमपान्हा क्षीरसागरठायीं ॥ ५ ॥ कौरवें
पांचाळी सभेमाजी आणिली । वस्त्रहरणीं वस्त्रें कैसीं जालीं माउली
॥ ६ ॥ दुर्वास पातला धर्मा छळावया वनीं । धांवसी लवलाहीं
शाखादेठ घेऊनि ॥ ७ ॥ कृपाळू माउली भुक्तिमुक्ति भांडार । करीं
माझा अंगीकार तुका ह्मणे विठ्ठले ॥ ८ ॥

॥ २०५९ ॥

तुजकारितां होतें आनाचें आन । तारिले पाषाण उदकीं देवा ॥ १ ॥
कां नये कैवार करूं अंगीकार । माझा बहु भार जड जाला ॥ २ ॥
चुकलासी ह्मणों तरी जीवांचाही जीव । गिता नाहीं ठाव उरों दिला ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसें काय सत्ताबळ । माझे परी कृपाळ आहां तुह्मी ॥ ४ ॥

॥ २०६० ॥

येई वो येई वो येई धांवोनियां । विलंब कां वांयां लाविला कृपाळे
॥ १ ॥ विठाबाई विश्वंभरे भवच्छेदके । कोठें गुंतलीस अगे विश्व-
व्यापके ॥ २ ॥ न करीं न करीं न करीं आतां आळस अव्हेरु ।
व्हावया प्रगट कैचें दुरी अंतरु ॥ ३ ॥ नेघें नेघें नेघें माझी वाचा
विसांवा । तुका ह्मणे हांवा हांवा हांवा साधावा ॥ ४ ॥

॥ २०६१ ॥

संताचे उपदेश आमुचे मस्तकीं । नाहीं मृत्युलोकीं राहाणेसा ॥ १ ॥
ह्मणऊनि बहु तळमळी चित्त । येई वो धांवत पांडुरंगे ॥ २ ॥
उपजली चिंता लागला उसीर । होत नाहीं धीर निढळ वाटे ॥ ३ ॥
तुका ह्मणे पोटीं रिघालेंसें भय । करूं आतां काय ऐसें जालें ॥ ४ ॥

॥ २०६२ ॥

मायें मोकलिलें कोठें जावें बाळें । आपुलिया बळें न वंचे तें ॥ १ ॥

हसोनियां पळे सांडुनियां ताट । मागें पाहे वाट यावें ऐसी ॥ २ ॥
भांडवल आह्मां आळी करावी हे । आपणची माये धांवसील ॥ ३ ॥
तुका ह्मणे आळी करुनियां निकी । देसील भातुकी बुझाऊनि ॥ ४ ॥
॥ २०६३ ॥
क्षणक्षणां जीवा वाटतसे खंती । आठवती चित्तीं पाय देवा ॥ १ ॥
येई वो येई वो येई लवलाहीं । आलिंगूनि बाहीं क्षेम देई ॥ २ ॥
उतावीळ मन पंथ अवलोकी । आठवा ते चुकी काय जाली ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझ्या जीवींच्या जीवना । घाला नारायणा उडी वेगीं ॥ ४ ॥
॥ २०६४ ॥
धरूनिया सोई परतलें मन । अनुलक्षीं चरण करूनियां ॥ १ ॥
येई पांडुरंगे नेई सांभाळूनि । करुणावचनीं आळवितों ॥ २ ॥
बुद्धि जाली साह्य परि नाहीं बळ । अवलोकितों जळ वाहे नेत्रीं ॥ ३ ॥
न चलती पाय गळित जाली काया । ह्मणऊनि दया येऊं द्यावी ॥ ४ ॥
दिशेच्या करितों वारियासीं मात । जोडुनियां हात वाट पाहें ॥ ५ ॥
तुका ह्मणे वेग करावा सत्वर । पाववया तीर भवनदीचें ॥ ६ ॥
॥ २०६५ ॥
उदार तूं हरी । ऐसी कीर्ति चराचरीं । अनंत हे थोरी । गर्जतील पवाडे ॥ १ ॥ तुझे पायीं माझा भाव । पुसी जन्ममरणां ठाव । देवाचा तूं देव । स्वामी सकळां ब्रह्मांडा ॥ २ ॥ मागणें तें तुज मागों । जीवभाव तुज सांगो । लागों तरी लागों । पायां तुमच्या दातारा ॥ ३ ॥ दिसों देसी कीविलवाणें । तरी तुजचि हें उणें । तुका ह्मणे जिणें । माझें तुज आधीन ॥ ४ ॥
॥ २०६६ ॥
धांव धांव गरुडध्वजा । आह्मां अनाथांच्या काजा ॥ १ ॥ बहु जालों कासावीस । ह्मणोनि पाहें तुझी वास ॥ २ ॥ पाहें पाहें त्या मारगें । कोणी येतें माझ्या लागें ॥ ३ ॥ असोनियां ऐसा । तुज सारिखा कोंबसा ॥ ४ ॥ न लावावा उशीर । नेणों कां हो केला धीर ॥ ५ ॥ तुका ह्मणे चाली । नको चालूं धांव घालीं ॥ ६ ॥

॥ २०६७ ॥

स्वामित्वाचीं वर्मे असोनि जवळी । वाहीं जावें मोळी गुणांसवें ॥१॥
काबाडापासूनि सोडवा दातारा । कांहीं नका भारा पात्र करूं ॥ २ ॥
धनवंत्याचिये अंगीं सत्ताबळ । व्याधि ते सकळ तोडावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे आलें मोड्यासी कोंपट । सांडोंव्याची वाट विसरावी ॥४॥

॥ २०६८ ॥

आमुचें दंडवत पायांवरी डोई । व्हावें उतराई ठेवूनियां ॥ १ ॥
कराल तें काय नव्हे जी विठ्ठला । चित्त द्यावें बोला बोबडिया ॥२॥
तुका ह्मणे आह्मी लडिवाळें अनाथें । ह्मणोनि दीनानाथें सांभाळावें ॥३॥

॥ २०६९ ॥

येई गे विठ्ठले विश्वजीवनकले । सुंदर घननीळे पांडुरंगे ॥ १ ॥
येई गे विठ्ठले करुणाकल्लोळे । जीवकळवळे भेटावया ॥ २ ॥
न लगती गोड आणीक उत्तरें । तुझें प्रेम झुरे भेटावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे धांव घाली कृष्णाबाई । क्षेम चहूंबाहीं देई मज ॥ ४ ॥

॥ २०७० ॥

करोनि स्नानविधि आणि देवधर्म । क्रिया नित्य नेम तुजसाटीं ॥ १ ॥
तुजलागीं दानें तुजलागीं तीर्थें । सकळही व्रतें तुजलागीं ॥ २ ॥
सकळ चित्तवृत्ति दिवस आणि राती । आवडशी प्रीति नारायणा ॥ ३ ॥
तुका ह्मणे याहो पवित्राच्या राया । प्राणविसाविया पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ २०७१ ॥

सुकलियां कोमां अत्यंत जळधर । तेणेंच प्रकार न्याय असे ॥ १ ॥
न चलें पाउलीं सांडीं गरुडासन । मनाचें हो मन त्वरेलागीं ॥ २ ॥
तुका ह्मणे भूक न साहवे बाळा । जीवनांची कळा ओढलीसे ॥ ३ ॥

॥ २०७२ ॥

आरुषा वचनीं मातेची आवडी । ह्मणऊनि तांतडी घेनी नाहीं ॥ १ ॥
काय हाइल माझें मांडिलें कवतुक । आदराची भूक व्हडारावी ॥ २ ॥

लपोनियां करी चुकुर माउली । नाहीं होती केली निष्ठा सांडी ॥ ३ ॥
तुका ह्मणे करी पारखीं वचनें । भेवउनि तान्हें आळवावें ॥ ४ ॥

॥ २०७३ ॥

बाप करी जोडी लेंकराचे ओढी । आपुली करवंडी वाळवूनी ॥ १ ॥
एकाएकी केला मिरासीचा धनी । कडिये वाळवूनी भार खांदीं ॥ २ ॥
लेवऊनी पाहे डोळां अळंकार । ठेवा दावी थोर करूनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे नेदी गांजूं आणिकांसी । उदार जीवासी आपुलिया ॥ ४ ॥

॥ २०७४ ॥

असोनि न कीजे अलिप्त अहंकारें । उगीच या भारें कुंथाकुंथी ॥ १ ॥
धांवा सोडवणें वेगीं लवकरी । मी तों जालों हरी शक्तिहीन ॥ २ ॥
भ्रमल्यानें दिसे बांधल्याचे परी । माझें मजवरी वाहोनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे धांव घेतलीसे सोई । आतां पुढें येई लवकरी ॥ ४ ॥

॥ २०७५ ॥

काय पाहातोसी कृपेच्या सागरा । नराच्या नरेंद्रा पांडुरंगा ॥ १ ॥
नामाचा प्रताप ब्रिदाचा बडिवार । करावा साचार नारायणा ॥ २ ॥
कलीमाजी देव बौद्धरूप जाला । जगाचिया बोला लागूं नका ॥ ३ ॥
माय पुत्रा काय मारूं पाहे कळी । जगाची ढवाळी काय काज ॥ ४ ॥
तुका ह्मणे या हो कृपेच्या सागरा । रकुमादेवीवरा मायबापा ॥ ५ ॥

॥ २०७६ ॥

उपजोनी मरों किती वेळोवेळां । कोणा कळवळा येत माझा ॥ १ ॥
ह्मणऊनि धांवा करीं काकुलती । यावे बा श्रीपती सोडावया ॥ २ ॥
बहुत या काळें केलों भयाभीत । येतों गिवसीत पाठीलागीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी दावितां स्वरूप । माझें कांहीं पाप निरसतें ॥ ४ ॥

॥ २०७७ ॥

मायबापापुढें लाडिकें लेंकरूं । तैसे बोल करूं कवतुकें ॥ १ ॥
कृपावंता घालीं प्रेमपान्हा रस । वोळली वोरस पांडुरंग ॥ २ ॥

नाहीं धीर खुंटी जवळी हुंबरें । ठायींच पाखर कवळिते ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज होऊं नेदीं सीण । कळों नेदीं भिन्न आहे ऐसें ॥ ४ ॥

॥ २०७८ ॥

कृपावंता दुजें नाहीं तुह्मां पोटीं । लाडें बोलें गोठी सुख मातें ॥ १ ॥
घेउनि भातुकें लागशील पाठीं । लाविशील ओंठीं ब्रह्मरस ॥ २ ॥
आपुलिये पांख घालिसी पाखर । उदार मजवर कृपाळू तूं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मांकारणें गोविंदा । वागविसी गदा सुदर्शन ॥ ४ ॥

॥ २०७९ ॥

आतां नये बोलों अव्हेराची मात । बाळावरी चित्त असों द्यावें ॥ १ ॥
तुज कां सांगाणें लागे हा प्रकार । परी हें उत्तर आवडीचें ॥ २ ॥
न वंचीं वो कांहीं एकही प्रकार । आपणां अंतर नका मज ॥ ३ ॥
तुका ह्मणे मोहो राखावा सतंत । नये पाहों अंत पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ २०८० ॥

मायबापापुढें लेंकराची आळी । आणीक हे पाळी कोण लळे ॥ १ ॥
सांभाळा जी माझीं विषमें अनंता । जवळी असतां अव्हेर कां ॥ २ ॥
आणिकांची चाले सत्ता आह्मावरी । तुमची ते थोरी काय मग ॥ ३ ॥
तुका ह्मणे आलों दुरोनि जवळी । आतां टाळाटाळी करूं नये ॥ ४ ॥

॥ २०८१ ॥

तुझा विसर नको माझिया जीवा । क्षण एक केशवा मायबापा ॥ १ ॥
जावो राहो देह आतां येचि घडी । कायसी आवडी याची मज ॥ २ ॥
कुशीळ इंद्रियें आपुलिया गुणें । यांचिया पाळणें कोण हित ॥ ३ ॥
पुत्र पत्नी बंधु सोयरीं खाणोरीं । यांचा कोण धरी संग आतां ॥ ४ ॥
पिंड हा उसना आणिला पांचांचा । सेकीं लागे ज्याचा त्यासी देणें ॥ ५ ॥
तुका ह्मणे नाहीं आणिक सोईरें । तुजविण दुसरें पांडुरंगा ॥ ६ ॥

॥ २०८२ ॥

कृपावंता कोप न धरावा चित्तीं । छळूं वक्रोक्ति स्तुती करूं ॥ १ ॥
आह्मी तुझा पार काय जाणों देवा । नेणों कैसी सेवा करावी ते ॥ २ ॥

अनंता अरूपा अलक्षा अच्युता । निर्गुणा सचित्ता सर्वोत्तमा ॥ ३ ॥
चांगलीं हीं नामें घेतलीं ठेवूनि । जालासी लहान भक्तिकाजा ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुझ्या पायांवरी सदा । मस्तक गोविंदा असो माझा ॥ ५ ॥

॥ २०८३ ॥

आह्मी जाणावे ते कांई तुझें वर्म कोणे ठायीं । अंतपार नाहीं ऐसें श्रुति बोलती ॥ १ ॥ होईं मज तैसा मज तैसा साना सकुमार हृषीकेशा । पुरवीं माझी आशा भुजा चारी दाखवीं ॥ २ ॥ खालता सप्तही पाताळा वरता स्वर्गाहूनि ढिसाळा । तो मी मशक डोळां कैसा पाहों आपुल्या ॥ ३ ॥ मज असे हा भरवसा पढियें होसी तयां तैसा । पंढरीनिवासा तुका ह्मणे गा विठोबा ॥ ४ ॥

॥ २०८४ ॥

तुह्मां आह्मां जंव जालिया समान । तेथें कोणाकोण सनमानी ॥ १ ॥
वरी तो राहिलें गोमटें गौरव । ओढे माझा जीव पायांपाशीं ॥ २ ॥
नेणपणें आह्मी आळवूं वोरसें । बोलावितों रसें शब्दरत्नें ॥ ३ ॥
तुका ह्मणे लळे पाळीं वो विठ्ठले । कां हे उरविले भेदाभेद ॥ ४ ॥

॥ २०८५ ॥

तुज घालोनियां पूजितों संपुष्टीं । परि तुझ्या पोटीं चौदा भुवनें ॥ १ ॥
तुज नाचवूनि दाखवूं कौतुका । परि रूप रेखा नाहीं तुज ॥ २ ॥
तुजलागीं आह्मी गात असों गीत । परि तूं अतीत शब्दाहूनि ॥ ३ ॥
तुजलागीं आह्मीं घातियेल्या माळा । परि तूं वेगळा कर्तृत्वासी ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां होऊनि परिमित । माझें कांहीं हित विचारावें ॥ ५ ॥

॥ २०८६ ॥

कई ऐसी दशा येइल माझ्या अंगा । चित्त पांडुरंगा झुरतसे ॥ १ ॥
नाठवूनि देह पायांचें चिंतन । अवसान तें क्षण नाहीं मधीं ॥ २ ॥
काय ऐसा पात्र होईन लाभासी । नेणों हृषीकेशी तुष्टइल ॥ ३ ॥
तुका ह्मणे धन्य मानीन संचित । घेईन तें नित्य प्रेमसुख ॥ ४ ॥

॥ २०८७ ॥

कां जी आह्मां होतें दोषाचें दर्शन । तुज समर्पून देहभाव ॥ १ ॥
पांडुरंगा कृपाळुवा दयावंता । धरसील सत्ता सकळही ॥ २ ॥
कां जी आह्मांवरि आणिकांची सत्ता । तुह्मांसी असतां जवळिकें ॥ ३ ॥
तुका ह्मणे पायीं केलें निवेदन । उचित तें दान करीं सत्ता ॥ ४ ॥

॥ २०८८ ॥

निश्चिंतीनें होतों करुनियां सेवा । कां जी मन देवा उद्वेगिलें ॥ १ ॥
अनंत उठती चित्ताचे तरंग । करितां हा त्याग वाटतसे ॥ २ ॥
कोण तुह्मांविण मनाचा चाळक । दुजे सांगा एक नारायणा ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझा मांडिला विनोद । करवूं नेणें छंद कराल काइ ॥ ४ ॥

॥ २०८९ ॥

हिरोनियां नेला मुखींचा उद्गार । पाडिलें अंतर जवळीच ॥ १ ॥
द्वैताचिये कैसा पाडियेलों हातीं । बहुत करिती ओढाओढी ॥ २ ॥
काय करूं मज नागविलें आळसें । बहुत या सोसें पीडा केली ॥३॥
तुका ह्मणे आतां अपुलिया सेवा । करुनियां देवा राखें मज ॥ ४ ॥

॥ २०९० ॥

मौन कां धरिलें विश्वाच्या जीवना । उत्तर वचना देईं माझ्या ॥ १ ॥
तूं माझें संचित तूंचि पूर्वपुण्य । तूं माझें प्राचीन पांडुरंगा ॥ २ ॥
तूं माझें सत्कर्म तूं माझा स्वधर्म । तूंचि नित्यनेम नारायणा ॥ ३ ॥
कृपावचनाची वाट पाहातसें । करुणा वोरसें बोल कांहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे प्रेमळाच्या प्रियोत्तमा । बोल सर्वोत्तमा मजसवें ॥ ५ ॥

॥ २०९१ ॥

पेणावलें ढोर मार खाय पाठीं । बैसलें ते नुठी तेथूनियां ॥ १ ॥
तैसी माझ्या मना परी जाली देवा । धांवे अहंभावा सांडावलों ॥ २ ॥
कडां घालीं उडी मागिरांच्या भेगें । मरणामरण न कळेचि ॥ ३ ॥
तुका ह्मणे जालों त्यापरी दुःखित । असें बोलावीत पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ २०९२ ॥

कोठें गुंतलासी कोणाच्या धांवया । आली देवराया निद्रा तुज ॥ १ ॥
कोठें गुंतलासी भक्तिप्रेमसुखें । न सुटती मुखें गोपिकांचीं ॥ २ ॥
काय पडिलें तुज कोणाचें संकट । दुरी पंथ वाट न चालवे ॥ ३ ॥
काय माझे तुज गुण दोष दिसती । ह्मणोनि श्रीपती कोपलासी ॥ ४ ॥
काय जालें सांग माझिया कपाळा । उरला जीव डोळां तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ २०९३ ॥

कोठें गुंतलासी योगीयाचे ध्यानीं । आनंदकीर्तनीं पंढरीच्या ॥ १ ॥
काय काज कोठें पडलीसे गुंती । कानीं न पडती बोल माझे ॥ २ ॥
काय शेषशयनीं सुखनिद्रा आली । सोय कां सांडिली तुह्मी देवा ॥ ३ ॥
तुका ह्मणे कोठें गुंतलेती सांगा । किती पांडुरंगा वाट पाहूं ॥ ४ ॥

॥ २०९४ ॥

विठ्ठला रे तूं उदाराचा राव । विठ्ठला तूं जीव या जगाचा ॥ १ ॥
विठ्ठला रे तूं उदाराची रासी । विठ्ठला तुजपाशीं सकळसिद्धी ॥ २ ॥
विठ्ठला रे तुझें नाम बहु गोड । विठ्ठला रे कोड पुरविसी ॥ ३ ॥
विठ्ठला रे तुझें श्रीमुख चांगलें । विठ्ठला लागलें ध्यान मनीं ॥ ४ ॥
विठ्ठला रे वाचे बोला बहुरस । विठ्ठला रे सोस घेतला जीवें ॥ ५ ॥
विठ्ठला रे शोक करीतसे तुका । विठ्ठला तूं ये का झडकरी ॥ ६ ॥

॥ २०९५ ॥

सत्य तूं सत्य तूं सत्य तूं विठ्ठला । कांगा हा दाविला जगदाकार ॥ १ ॥
सांभाळी आपुली हाक देतो माया । आह्मांसी कां भयाभीत केलें ॥२॥
रूप नाहीं त्यासी ठेवियेलें नाम । लटकाची श्रम वाढविला ॥ ३ ॥
तुका ह्मणे कां गा जालासी चतुर । होतासी निसुर निर्विकार ॥ ४ ॥

॥ २०९६ ॥

पाहें मजकडे भरोनियां दृष्टी । बहुत हिंपुटीं जालों माते ॥ १ ॥
करावेंसें वाटे जीवा स्तनपान । नव्हे हें वचन शृंगारिक ॥ २ ॥

सत्यासाठीं माझी शब्दविवंचना । जोडिल्या वचनाचें तें नव्हे ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी कळवळ्याची कींव । भागलासे जीव कर्तव्यानें ॥ ४ ॥

॥ २०९७ ॥

काय करूं जीव होतो कासावीस । कोंडलिये दिसे गमेचिना ॥ १ ॥
पडिलें हें दिसे ब्रह्मांडाचि वोस । दाटोनि उच्छ्वास राहातसे ॥ २ ॥
तुका ह्मणे अगा सर्वजाणतिया । विश्वंभरें काया निववावी ॥ ३ ॥

॥ २०९८ ॥

जीव जायवरी सांडी करी माता । हें तो आश्चर्यता बाळकाची ॥ १ ॥
दुर्बळ कीं नाहीं आइकत कानीं । काय नारायणीं न्यून जालें ॥ २ ॥
क्षणक्षणा माझा न घ्यावा सांभाळ । अभाग्याचा काळ ऐसा आला ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं वचनासी रुचि । फल कटवोंचि तें तें होय ॥ ४ ॥

॥ २०९९ ॥

तुज ह्मणतील कृपेचा सागर । तरि कां केला धीर पांडुरंगा ॥ १ ॥
आझुनि कां नये तुज माझी माया । काय देवराया पाहातोसी ॥ २ ॥
आळवितों जैसें पाडस कुरंगिणी । पीडिलिया वनीं तानभूक ॥ ३ ॥
प्रेमरस पान्हा पाजीं माझे आई । धांवें वो विठाई वोरसोनि ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझें कोण हरी दुःख । तुजविण एक पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ २१०० ॥

पडियेलों वनीं थोर चिंतवनीं । उशीर कां अझूनि लावियेला ॥ १ ॥
येईं गा विठ्ठला येईं गा विठ्ठला । प्राण हा फुटला आळवितां ॥ २ ॥
काय तुज नाहीं लौकिकाची शंका । आपुल्या बाळका मोकलितां ॥ ३ ॥
तुका ह्मणे बहु खंती वाटे जीवा । धरियेलें देवा दुरी दिसे ॥ ४ ॥

॥ २१०१ ॥

तरी आह्मीं तुझी धरियली कास । नाहीं कोणी दास वांयां गेला ॥ १ ॥
अगा पंढरीशा उभा विटेवरी । येईं लवकरी धांवें नेटें ॥ २ ॥
पाववितों तुज उभी करोनि बाहे । कृपावंता पाहें मजकडे ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज बहु कान डोळे । कां हे माझे वेळे ऐसी परी ॥ ४ ॥

॥ २१०२ ॥

मज नाहीं तुझ्या ज्ञानाची ते चाड । घेतां वाटे गोड नाम तुझें ॥ १ ॥
नेणतें लेंकरूं आवडीचें तान्हें । बोलतों वचनें आवडीनें ॥ २ ॥
भक्ती नेणें कांहीं वैराग्य तें नाहीं । घातला विठाई भार तुज ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाचें निर्लज्ज होऊनि । नाहीं माझे मनीं दुजा भाव ॥ ४ ॥

॥ २१०३ ॥

आवडेल तैसें तुज आळवीन । वाटे समाधान जीवा तैसें ॥ १ ॥
नाहीं येथें कांहीं लौकिकाची चाड । तुजविण गोड देवराया ॥ २ ॥
पुरवीं मनोरथ अंतरींचे आर्त । धायेवरि गीत गाई तुझें ॥ ३ ॥
तुका ह्मणे लेंकी आळवी माहेरा । गाऊं या संसारा तुज तैसें ॥ ४ ॥

॥ २१०४ ॥

माझें मुख नामीं रंगो सर्वकाळ । गोविंद गोपाळ राम कृष्ण ॥ १ ॥
अबद्ध चांगलें गाऊं भलतैसें । कळलें हें जैसें मायबापा ॥ २ ॥
तुका ह्मणे मज नलगे वांकडें । मी तुझें बोबडें बाळ तान्हें ॥ ३ ॥

॥ २१०५ ॥

क्षुधार्थी अन्नें दुष्काळें पीडिलें । मिष्टान्न देखिलें तेणें जैसें ॥ १ ॥
तैसें तुझे पायीं लाचावलें मन । झुरे माझा प्राण भेटावया ॥ २ ॥
मांजरें देखिला लोणियांचा गोळा । लावूनियां डोळा बैसलेंसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां झडी घालूं पाहें । पांडुरंगे माये तुझे पायीं ॥ ४ ॥

॥ २१०६ ॥

जेणें माझें हित होइल तो उपाव । करिसील भाव जाणोनियां ॥ १ ॥
मज नाहीं सुख दुःख तया खंती । भावना हे चित्तीं नाना छंदें ॥२॥
तोडीं हे संबंध तोडीं आशापाश । मज हो सायास न करितां ॥ ३ ॥
तुका ह्मणे मी तो राहिलों निश्चिंत । कवळोनि एकांतसुख तुझें ॥४॥

॥ २१०७ ॥

जे जे कांहीं मज होईल वासना । ते ते नारायणा व्हावें तुम्हीं ॥ १ ॥
काय भाव एक निवडूं निराळा । जाणसी तू कळा अंतरींची ॥ २ ॥

तुजविण मज कोण आहे सखा । जें सांगों आणिकां जीवभाव ॥ ३ ॥
अवघें पिशुन जालें असे जन । आपपर कोण नाठवे हें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तूंचि जीवांचें जीवन । माझें समाधान तुझे हातीं ॥ ५ ॥

॥ २१०८ ॥

तुझा ह्मणोनियां दिसतों गा दीन । हाचि अभिमान सरे तुझा ॥ १ ॥
अज्ञान बाळका कोपली जननी । तयासि निर्वाणीं कोण पावे ॥ २ ॥
तैसा विठो तुजविण परदेशी । नको या दुःखासी गोवूं मज ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज सर्व तुझी आशा । अगा जगदीशा पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ २१०९ ॥

आतां माझ्या दुःखा कोण हो सांगाती। रखुमाईचा पति पावेचि ना ॥१॥
काय विधात्यानें घातलीसे रेखा । सुटका या दुःखा न होयचि ॥ २ ॥
तुका ह्मणे माझी विसरूं नको चिंता । अगा पंढरिनाथा पाव वेगीं ॥ ३ ॥

॥ २११० ॥

तुझें नाम गाया नमे पेंडवळा । गाऊं कळवळा प्रेमाचिया ॥ १ ॥
येईल आवडी जैसी अंतरींची । तैसी नामाची कीर्ति गाऊं ॥ २ ॥
माझें मुख नामीं रंगो सर्वकाळ । गोविंद गोपाळ राम कृष्ण ॥ ३ ॥
अबद्ध चांगलें गाऊं जैसें तैसें । बाहे बाळ जैसें मायबापा ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज न लावीं वांकडें । मी तुझें बोबडें बाळ तान्हें ॥ ५ ॥

॥ २१११ ॥

तुझें प्रेम माझ्या हृदयीं आवडी । चरण न सोडीं पांडुरंगा ॥ १ ॥
कासया सिणविसी थोगिवाकारणें । काय तुझें उणें होइल देवा ॥ २ ॥
चातकाचा चिंता हरली जळधरें । काय त्याचें सरे थोरपण ॥ ३ ॥
चंद्र चकोराचा पुरवी सोहळा । काय त्याची कळा न्यून होय ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज अनाथा सांभाळीं । हृदयकमळीं स्थिर राहें ॥ ५ ॥

॥ २११२ ॥

पावलों हा देह कष्ट कलिन्यायें । न घडे उपायें घडों आलें ॥ १ ॥
आतां माझें खंडें देहदेहांतरें । अभय दातारें देऊनियां ॥ २ ॥

अंधळ्याचे पाठीं धनाची चरवी । अघटित तेंवी घडों आलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे योग घडला बरवा । आतां कास देवा न सोडीं मी ॥ ४ ॥

॥ २११३ ॥

कांगा कोणी न ह्मणे पंढरीची आई । बोलाविते पाहीं चाल नेटें ॥ १ ॥
तेव्हां माझ्या मना होइल समाधान । जाइल सर्व शीण जन्मांतरींचा ॥ २ ॥
तुका ह्मणे माझी होशील माउली । वोरसोनि घाली प्रेमपान्हा ॥ ३ ॥

॥ २११४ ॥

सांग पांडुरंगा मज हा उपाव । जेणें तुझें पाव आतुडती ॥ १ ॥
न कळे हा निर्धार ब्रह्मादिकां पार । कायसा विचार माझा तेथें ॥ २ ॥
तुका ह्मणे आतां धरूनियां धीर । राहूं कोठवर मायबापा ॥ ३ ॥

॥ २११५ ॥

काय फार जरी जालों मी शहाणा । तरी नारायणा नातुडसी ॥ १ ॥
काय जालें जरी मानी मज जन । परि नातुडति चरण तुझे देवा ॥ २ ॥
काय जालें जरी जालों उदासीन । परि वर्म भिन्न तुझें देवा ॥ ३ ॥
काय जालें जरी केले म्यां सायास । ह्मणवितों दास भक्त तुझा ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुज दाविल्यावांचून । तुझें वर्म कोण जाणे देवा ॥ ५ ॥

॥ २११६ ॥

संतांच्या पंढीया वो कैशापरि लाहो । नामाचा आठवो कैसा राहे ॥ १ ॥
हेचि थोर चिंता लागली मनासी । निजतां निद्रेसी नलगे डोळा ॥ २ ॥
जेवितां जेवणीं न लगे गोड धड । वाटतें काबाड विषयसुख ॥ ३ ॥
ऐसियां संकटीं पाव कृपानिधि । लावीं संतपदीं प्रेमभावें ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मी नेणों कांहीं हित । तुजविण अनाथ पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ २११७ ॥

जेणें तुझी कास भावें धरियेली । त्याची नाहीं केली सांडी देवा ॥ १ ॥
काय माझा भोग आहे तो नकळे । सुखें तुह्मी डोळे झांका देवा ॥ २ ॥
राव रंक तुह्मां सारिकेचि जाणा । नाहीं थोर साना तुह्मांपाशीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मीं अपंगिलें भक्तां । माझिया संचिता कृपा नये ॥ ४ ॥

॥ २११८ ॥
सर्वांपरी तुझे गुण गा उत्तम । तुझे ठायीं प्रेम राहो माझें ॥ १ ॥
माउलीपरिस आहेसी उदार । तरि कां निष्ठुर मन केलें ॥ २ ॥
गजेंद्राकारणें केलें त्वां धांवणें । तरि कां निर्वाण पाहातोसी ॥ ३ ॥
प्रल्हादा संकटीं रक्षिलें त्वां देवा । तरि कां केशवा सांडी केली ॥ ४ ॥
अन्यायी अजामेळ तो जाला पावन। ऐसें हें पुराण हाका मारी ॥ ५ ॥
तुका ह्मणे माझे थोर अपराध । नाम करी छेद क्षणमात्रें ॥ ६ ॥

॥ २११९ ॥
बहु क्लेशी जालों या हो नरदेहीं । कृपादृष्टी पाहीं पांडुरंगा ॥ १ ॥
पांडुरंगा सर्वदेवांचिया देवा । घ्यावी माझी सेवा दीनानाथा ॥ २ ॥
दीनानाथ ब्रीद त्रिभुवनीं तुझें । मायबापा ओझें उतरावें ॥ ३ ॥
उतरीं सत्वर पैलथडीं नेई । पूर्णसुख देई पायांपाशीं ॥ ४ ॥
पायांपाशीं मज ठेवीं निरंतर। आशा तुझी फार दिवस केली ॥ ५ ॥
केली आस तुझी वाट मी पाहातों । निशिदिनीं ध्यातों नाम तुझें ॥ ६ ॥
नाम तुझें गोड स्वभक्तां आवडे । भक्तांलागीं कडे खांदा घेसी ॥ ७ ॥
घेसी खांद्यावरी खेळविसी लोभें । पाउल तें शोभे विटेवरी ॥ ८ ॥
विटेवरी उभा देखिलासे डोळां। मनाचा सोहळा पुरविसी ॥ ९ ॥
पुरवीं सत्वर त्रैलोक्यस्वामिया। मिठी घाली पायां तुका भावें ॥ १० ॥

॥ २१२० ॥
तुज केलिया नव्हे ऐसें काई । डोंगराची राई क्षणमात्रें ॥ १ ॥
मज या लोकांचा न साहे आघात । देखणें प्रचित जीव घेती ॥ २ ॥
सहज विनोदें बोलियेलों गोष्टी । आरंभीं तों पोटीं न धरावी ॥ ३ ॥
दीनरूप मज करावें नेणता । याहुनी अनंता आहें तैसा ॥ ४ ॥
तुका ह्मणे जेणें मज तूं भोगसी । तें करीं जनासीं चाड नाहीं ॥ ५ ॥

॥ २१२१ ॥
हेचि वेळा देवा नका मागें घेऊं । तुह्मांविण जाऊं शरण कोणा ॥ १ ॥
नारायणा ये रे पाहें विचारून । तुजविण कोण आहे मज ॥ २ ॥

रात्र दिवस तुज आठवूनि आहें । पाहातोसी काये सत्व माझें ॥ ३ ॥
तुका ह्मणे किती येऊं काकुलती । कांहीं माया चित्तीं येऊं द्यावी ॥४॥

॥ २१२२ ॥

आणीक कोणापुढें वासूं मुख सांग । माझें अंतरंग कोण जाणे ॥ १ ॥
पाहें तुजकडे येऊनि जाऊनी । पांडुरंगा मनीं विचारावें ॥ २ ॥
भय चिंता अवघे उद्योग सांडिले । आठवुनी पाउलें असें तुम्हीं ॥ ३ ॥
नका विसरूं मज वैकुंठनायका । विनवितो तुका बंदीजन ॥ ४ ॥

॥ २१२३ ॥

कुरंगी पाडस चुकलेंसें वनीं । फुटे दुःखें करोनि हृदय त्याचें ॥ १ ॥
तैसा परदेशी जालों तुजविण । नको हो निर्वाण पाहूं माझें ॥ २ ॥
अपराधाच्या कोटी घालीं सर्व पोटीं । नको या शेवटीं उपेक्षूं गा ॥ ३ ॥
तुका ह्मणे असों द्यावी माझी चिंता । कृपाळु अनंता पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ २१२४ ॥

उदार कृपाळ पतितपावना । ब्रिदें नारायणा जाती वांयां ॥ १ ॥
वर्णिलासी श्रुति नेणे तुझा पार । राहे मौनाकार नेती ऐसें ॥ २ ॥
तेथें माझा धांवा पावे कोणीकडे । अदृष्ट हें पुढें वोढवलें ॥ ३ ॥
कोण ऐसा भक्त लाधला भाग्यासी । आठवण ऐसी द्यावी तुज ॥ ४ ॥
तुका ह्मणे नको पाहों माझा अंत । जाणोनि हे मात उडी घालीं ॥ ५ ॥

॥ २१२५ ॥

आतां मोकलावें नव्हे हें उचित । तरी कृपावंत ह्मणवावें ॥ १ ॥
पूर्वी भक्त जाले सर्व अंगीकारिले । नाहीं उपेक्षिलें तुह्मीं कोणी ॥ २ ॥
माझिया वेळेसी कां गा लपालासी । विश्व पोसितोसी लपोनियां ॥ ३ ॥
करावी ह्मणावी सर्वांभूतीं दया । तरी भेटावया येईन मी ॥ ४ ॥
तरी माझे हातीं देई मानबुद्धि । जरि दयानिधि येशील तूं ॥ ५ ॥
तुका ह्मणे तूंचि अवघा सूत्रधारी । माझी सत्ता हरी काय आहे ॥ ६ ॥

॥ २१२६ ॥

मज कोण आहे तुजविण देवा । मुकुंदा केशवा नारायणा ॥ १ ॥

वाट पाहातसें कृपेच्या सागरा । गोपी मनोहरा पांडुरंगा ॥ २ ॥
साच करीं हरी आपुली ब्रीदावळी । कृपनें सांभाळीं महाराजा ॥ ३ ॥
क्षमा करीं सर्व अपराध माझा । लडिवाळ मी तुझा पांडुरंगा ॥ ४ ॥
साह्य होसी तरी जाती माझी वैरी । मग सुखें अंतरीं ध्यान तुझें ॥ ५ ॥
कृपा करोनि देई दया क्षमा शांती । तेणें तुझी भक्ति लाभईल ॥ ६ ॥
माझें हें सामर्थ्य नव्हे नारायणा । जरी कांहीं करुणा येइल तुज ॥ ७ ॥
तुका ह्मणे मज कैसें अपंगा जी । आपुलेंसें करा जी पांडुरंगा ॥ ८ ॥

॥ २१२७ ॥

आधीं कां मज लावियेली सवे । आतां न राहावे तुजवीण ॥ १ ॥
पहिलेंचि तोंडक कां गा नाहीं केलें । आतां उपेक्षिलें न सोडीं मी ॥ २ ॥
कृपेच्या सागरा न पाहें निर्वाण । जालों तुजवीण कासावीस ॥ ३ ॥
तुका ह्मणे कोठें गुंतलेती हरी । येईं झडकरी पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ २१२८ ॥

पूर्वीं बहुतांचे केले प्रतिपाळ । तें मज सकळ श्रुत आहे ॥ १ ॥
अज अविनाश निर्गुण निरामय । विचारिलें काय त्यांचे वेळे ॥ २ ॥
तयांचिये वेळे होशी कृपावंत । माझाचि कां अंत पाहातोसी ॥ ३ ॥
नारद प्रल्हाद उपमन्यु धुरू । त्यांचा अंगीकारु कैसा केला ॥ ४ ॥
अंबऋषीसाठीं गर्भवास जाले । कां गा मोकलिलें कृपासिंधु ॥ ५ ॥
धर्माचें उच्छिष्ट अर्जुनाचीं घोडीं । आणीक सांकडीं कितीएक ॥ ६ ॥
जालासी लुगडीं तया द्रौपदीचीं । न ये कां आमुची कृपा कांहीं ॥७॥
तुका ह्मणे कां गा जालासि कठीण । माझा भाग सीण कोण जाणे ॥८॥

॥ २१२९ ॥

आतां हें सेवटीं असो पायांवरी । वदता वैखरी वागपुष्प ॥ १ ॥
नुपेक्षावें आह्मां दीना पांडुरंगा । कृपादानीं जगामाजी तुह्मीं ॥ २ ॥
बोळवुनी देह सांडियेली शुद्ध । सांगितला भेद जीव शिव ॥ ३ ॥
तुका ह्मणे मन तुमचे चरणीं । एवढी आयणी पुरवावी ॥ ४ ॥

॥ २१३० ॥

सन्मुखचि तुम्हीं सांगावी जी सेवा । ऐसे माझे देवा मनोरथ ॥ १ ॥
नेघों आम्ही कांहीं चित्तवित्त घरें । आपल्या उदारें जीवावरी ॥ २ ॥
बोल परस्परें वाढवावें सुख । पाहावें श्रीमुख डोळेभरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे सत्य बोलतों वचन । करूनी चरण साक्ष तुझे ॥ ४ ॥

॥ २१३१ ॥

काय तुज कैसें जाणवेल देवा । आणावें अनुभवा कैशा परी ॥ १ ॥
सगुण निर्गुण थोर कीं लहान । न कळे अनुमान मज तुझा ॥ २ ॥
कोण तो निर्धार करूं हा विचार । भवसिंधु पार तरावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे कैसे पाय आतुडती । न पडे श्रीपती वर्म ठावें ॥ ४ ॥

॥ २१३२ ॥

माझ्या इंद्रियांसीं लागलें भांडण । ह्मणतील कान रसना धाली ॥ १ ॥
करिती तळमळ हस्त पाद भाळ । नेत्रांसी दुकाळ पडिला थोर ॥ २ ॥
गुण गाय मुख आइकती कान । आमचें कारण तैसें नव्हे ॥ ३ ॥
दरुषणें फिटे सकळांचा पांग । जेथें ज्याचा भाग घेइल तें ॥ ४ ॥
तुका ह्मणे ऐसें करीं नारायणा । माझी ही वासना ऐसी आहे ॥ ५ ॥

॥ २१३३ ॥

व्हावया भिकारी हें आह्मां कारण । अंतरोनि जन जावें दुरी ॥ १ ॥
संबंध तुटावा शब्दाचाही स्पर्श । ह्मणऊनि आस मोकलिली ॥ २ ॥
तुका ह्मणे दुःखें उबगला जीव । ह्मणऊनी कींव भाकीं देवा ॥ ३ ॥

॥ २१३४ ॥

थोडे तुह्मी मागें होती उद्धरिले । मज ऐसे गेले वांयां जीव ॥ १ ॥
आतां याचा कांहीं न मानावा भार । कृपेचा सागर आहेसी तूं ॥ २ ॥
तुज आळवितां पापाची वसति । राहे अंगीं किती बळ त्याचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे उदकीं तारिले दगड । तैसा मीही जड एक देवा ॥ ४ ॥

॥ २१३५ ॥

कोठें आतां आह्मी वेचावी हे वाणी । कोण मना आणी जाणोनियां ॥ १ ॥

न करावी सांडी आतां टाळाटाळी। देईन ये काळीं होइल माजी ॥२॥
घरोघरीं जाल्या ज्ञानाचिया गोष्टी । सत्यासवें गांठीं न पडावी ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां भाकितां करुणा। भलताचि शाहाणा शोध काढी ४

॥ २१३६ ॥

अनंता जीवांचीं तोडिलीं बंधनें। मजहि येणें काळें कृपा कीजे ॥ १ ॥
अनंत पवाडे तुझे विश्वंभरा । भक्तकरुणाकरा नारायणा ॥ २ ॥
अंतरींचें कळो देईं गुह्य गुज । अंतरीं तें बीज राखईन ॥ ३ ॥
समदृष्टी तुझीं पाहेन पाउलें । धरीन संचलें हृदयांत ॥ ४ ॥
तेणें या चित्ताची राहेल तळमळ। होतील शीतळ सकळ गात्रें ॥ ५ ॥
तुका ह्मणे शांति करील प्रवेश । मग नव्हे नाश अखंड तो ॥ ६ ॥

॥ २१३७ ॥

कोणाचें चिंतन करूं ऐशा काळें । पायांचिया बळें कंठीतसें ॥ १ ॥
पाहातसें वाट येईं गा विठ्ठला । मज कां हा केला परदेश ॥ २ ॥
बहुतांचे सत्ते जालों कासावीस। जाय रात्र दिस वैरियांचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे बैसें मानाचिये मुळीं । तरीच हीं जाळीं उगवती ॥ ४ ॥

॥ २१३८ ॥

कईं तो दिवस देखेन मी डोळां। कल्याण मंगळामंगळाचें ॥ १ ॥
आयुष्याच्या शेवटीं पायांसवें भेटी। काळिवरें तुटी जाल्या त्वरें ॥ २ ॥
सरो हें संचित पदरींचा गोवा । उताविळ देवा मन जालें ॥ ३ ॥
पाउलःपाउलीं करितां विचार । अनंत विकार चित्ता अंगीं ॥ ४ ॥
ह्मणऊनि भयाभीत होतो जीव। भाकितसें कींव अटाहासें ॥ ५ ॥
दुःखाच्या उत्तरीं आळविले पाय । पाहणें तों काय अजून अंत ॥ ६ ॥
तुका ह्मणे होईल आइकिलें कानीं। तरी चक्रपाणी धांव घाला ॥ ७ ॥

॥ २१३९ ॥

आइका माझीं कवतुक उत्तरें । देउनी सादरें चित्त देवा ॥ १ ॥
ढोरसें आवडी आलों पायापाशीं । होय तें मनेसीं सुख कीजे ॥२॥

तुमचें न भंगे सर्वोत्तमपण । करितां समाधान लेंकरांचें ॥३॥
तुका ह्मणे जरी बोलतों बोबडें । तरी वाडेकोडें कवतुक ॥४॥
॥ २१४० ॥
आज्ञाबद्ध आह्मी भाकितसों कींव । तत्पर हा जीव कार्यापाशीं ॥१॥
प्रतिउत्तराची पाहतसें वाट । करूनि बोभाट महाद्वारीं ॥२॥
आपुलिया उचितें करूनियां ठेवीं । संबंध गोसावी तोडोनियां ॥३॥
तुका ह्मणे एक जालिया निवाड । कोण बडबड करी मग ॥४॥
॥ २१४१ ॥
दुखिया दासांचा हीन जालों दास । न धरीं उदास मायबापा ॥१॥
तुजविण प्राण कैसा राहों पाहे । वियोग न साहे क्षणभंगी ॥२॥
आणिक माझ्या जीवें मोकलिली आस । पाहे तुझी वास पांडुरंगा ॥३॥
सर्वभावें तुज आणिला उचित । राहिलों निश्चिंत तुझे पायीं ॥४॥
तुका ह्मणे तुज असो माझा भार । बोलतों मी फार काय जाणें ॥५॥
॥ २१४२ ॥
कां हो पांडुरंगा न करा धांवणें । तरि मज कोणें सोडवावें ॥१॥
तुझा ह्मणऊनि आणिकापें उभा । राहों हे तों शोभा नेदीं आतां ॥२॥
काळें पुरविली पाठी दुरवरी । पुढें पायां धीरी राहों नेदी ॥३॥
नको आणूं माझें संचित मनासीं । पावन आहेसी पतितां तूं ॥४॥
तुका ह्मणे चाले आणिकांची सत्ता । तुज आळवितां नवल हें ॥५॥
॥ २१४३ ॥
आतां पाहाशील काय माझा अंत । आलों शरणागत तुज देवा ॥१॥
करीं अंगीकार राखें पायांपाशीं । ह्मणी दिसों देसी कींविलवाणें ॥२॥
नाहीं आइकिली मागें ऐसी मात । जे त्वां शरणागत उपेक्षिले ॥३॥
तुका ह्मणे आतां धरीं अभिमान । आहेसी तूं दानशूर दाता ॥४॥
॥ २१४४ ॥
सकळ तुझे पायीं मानिला विश्वास । न करीं उदास आतां मज ॥१॥
वाचे गातां गोड आइकतां कानीं । पाहातां लोचनीं मूर्ती तुझी ॥२॥

मन स्थिर माझें ज़ालेंसे निश्चळ । वारिलीं सकळ आशापाश ॥३॥
जन्मजराव्याधि निवारलें दु:ख । वोसंडलें सुख प्रेम धरी ॥४॥
तुका ह्मणे मज जाला हा निर्धार । आतां वांयां फार काय बोलों ॥५॥

॥ २१४५ ॥

भागलों मी आतां आपुल्या स्वभावें । कृपा करोनि देवें अश्वासीजे ॥१॥
देउनि आलिंगन प्रीतीच्या पडिभरें । अंगें हीं दातारें निववावीं ॥२॥
अमृताची दृष्टी घालूनियां वरी । शीतळ हा करीं जीव माझा ॥३॥
घेईं उचलूनि पुसें तानभूक । पुसीं माझें मुख पीतांबरें ॥४॥
बुझावोनि माझी धरीं हनुवटी । ओंवाळुनि दिठी करुनी सांडीं ॥५॥
तुका ह्मणे बापा अहो विश्वंभरा । आतां कृपा करा ऐसी कांहीं ॥६॥

॥ २१४६ ॥

पूर्वींहूनि बहु भक्त सांभाळिले । नाहीं अव्हेरिले दास कोणी ॥ १ ॥
जे जे शरण आले ते ते आपंगिले । पवाडे विठ्ठले ऐसे तुझे ॥ २ ॥
मिरवे चरणीं ऐसिये गोष्टींचें । भक्त सांभाळाचें ब्रीद ऐसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मांसाटीं येणें रूपा । माझ्या मायबापा पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ २१४७ ॥

दर्दुराचें पिलूं ह्मणे रामराम । नाहीं उदक उष्ण होऊं दिलें ॥ १ ॥
कढेमाजी बाळ करी तळमळ । गोविंद गोपाळ पावे वेगीं ॥ २ ॥
आज्ञा तये काळीं केली पावकासी । ह्मणी पिलीयासी तापवीसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझे ऐसे हे पवाडे । वर्णितां निवाडे सुख वाटे ॥ ४ ॥

॥ २१४८ ॥

येउनि जाउनी पाहें तुजकडे । पडिल्या सांकडें नारायणा ॥ १ ॥
आणीक कोणाचा मज नाहीं आधार । तुजवरि भार जीवेंभावें ॥ २ ॥
निष्ठुर अथवा होईं तूं कृपाळ । तुज सर्वकाळ विसरेंना ॥ ३ ॥
आपुलें वचन राहावें सांभाळून । तुह्मां आह्मां जाण पडिपाडु ॥ ४ ॥
ज्याच्या वचनासी अंतर पडेल । बोल तो होईल तयाकडे ॥ ५ ॥
तुह्मां आह्मां तैसें नाहीं ह्मणे तुका । होशील तूं सखा जीवलग ॥ ६ ॥

॥ २१४९ ॥

तेव्हां चालें पोट बैसलों पंगती। आतां आह्मां मुक्तिपांग काई ॥ १ ॥
धांवा केला आतां येई वो धांवोन। येथें कांई करणें न लगे संदेह ॥ २ ॥
गायनाचा आतां कोठें उरला काळ। आनंदें सकळ भरी आलें ॥ ३ ॥
देवाच्या सख्यत्वें विषमासी ठाव। मध्यें कोठें वाव राहों सके ॥ ४ ॥
तेव्हां जाली अवघी बाधा वाताहात। प्रेम हृदयांत प्रवेशलें ॥ ५ ॥
तुका ह्मणे आह्मी जिंतिलें भरवसा। देव कोठें दासा मोकलितो ॥ ६ ॥

॥ २१५० ॥

शरण आलें त्यासी न दावीं हे पाठी। ऐका जगजेठी विज्ञापना ॥१॥
आळविती तयांसी उत्तर झडकरी। द्यावें परिसा हरि विज्ञापना ॥ २ ॥
गांजिलियाचें करावें धांवणें। विनंती नारायणें परिसावी हे ॥ ३ ॥
भागलियाचा होई रे विसांवा। परिसावी देवा विज्ञापना ॥ ४ ॥
अंकिताचा भार वागवावा माथां। परिसावी अनंता विज्ञापना ॥ ५ ॥
तुका ह्मणे आह्मां विसरावें ना देवा। परिसावी केशवा विज्ञापना ॥६॥

॥ २१५१ ॥

जीवनावांचूनी तळमळी मासा। प्रकार हा तैसा होतो जीवा ॥ १ ॥
न सांपडे जालें भूमिगत धन। चरफडी मन तयापरी ॥ २ ॥
मातेचा वियोग जालिया हो बाळा। तो कळवळा जाणा देवा ॥ ३ ॥
सांगावे ते किती तुह्मांसी प्रकार। सकळांचें सार पाय दावीं ॥ ४ ॥
येचि चिंते माझा करपला भीतर। कां नेणों विसर पडिला माझा॥५॥
तुका ह्मणे तूं हें जाणसी सकळ। यावरि कृपाळ होई देवा ॥ ६ ॥

॥ २१५२ ॥

बाळ मातेपाशीं सांगे तानभूक। उपायाचें दुःख काय जाणे ॥ १ ॥
तयापरी करीं पाळण हें माझें। घेऊनियां ओझें सकळ भार ॥ २ ॥
कासया गुणदोष आणिसील मना। सर्व नारायणा अपराधी ॥ ३ ॥
सेवाहीन दीनपातकांची रासी। आतां विचारिसी काय ऐसें ॥ ४ ॥

जेणें काळें पायीं अनुसरलें चित्त । निर्धार हें हित जालें ऐसें ॥ ५ ॥
तुका ह्मणे तुह्मीं तारिलें बहुतां । माझी कांहीं चिंता असों द्यावी ॥६॥

॥ २१५३ ॥

मागें शरणागत तारिले बहुत । ह्मणती दीनानाथ तुज देवा ॥ १ ॥
पाहिले अपराध नाहीं याती कुळ । तारिला अजामेळ गणिका भिल्ली ॥ २ ॥
अढळपदीं बाळ बैसविला धुरु । क्षीराचा सागरु उपमन्या ॥ ३ ॥
गजेंद्रपशु नाडिला जळचरें । भवसिंधुपार उतरिला ॥ ४ ॥
प्रल्हाद अग्नींत राखिला जळांत । विषाचें अमृत तुझ्या नामें ॥ ५ ॥
पांडवां संकट पडतां जडभारी । त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥ ६ ॥
तुका ह्मणे तूं या अनाथाचा नाथ । ऐकोनियां मात शरण आलों ॥ ७ ॥

॥ २१५४ ॥

ऐसा माझा कोण आहे भीड भार । नांवाचा मी फार वांयां गेलों ॥१॥
काय सेवा रुजू आहे सत्ताबळ । तें मज राऊळ कृपा करी ॥ २ ॥
काय याती शद्ध आहे कुळ कर्म । तेणें पडे वर्म तुझ ठायीं ॥ ३ ॥
कोण तपोनिधि दानधर्मशीळ । अंगीं एक बळ आहे सत्ता ॥ ४ ॥
तुका ह्मणे वांयां जालों भूमी भार । होईल विचार काय नेणों ॥ ५ ॥

॥ २१५५ ॥

साच मज काय कळों नये देवा । काय तुझी सेवा काय नव्हे ॥ १ ॥
करावें तें बरें जेणें समाधान । सेवावें हें वन न बोलावें ॥ २ ॥
शुद्ध माझा भाव होइल तुझे पायीं । तरीच हें देईं निवडूनी ॥ ३ ॥
उचित अनुचित कळों आली गोष्टी । तुझे कृपादृष्टी पांडुरंगा ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज पायांचें चाड । सांगती तें गोड आहे मज ॥ ५ ॥

॥ २१५६ ॥

करिसी कीं न करिसी माझा अंगीकार । हा मज विचार पडिला देवा॥१॥
देसी कीं न देसी पायांचें दर्शन । ह्मणऊनी मन स्थिर नाहीं ॥ २ ॥
बोलसी कीं न बोलसी मजसवें देवा । ह्मणोनियां जीवा भय वाटे ॥ ३ ॥

होईल कीं न होय तुज माझा आठव। पडिला संदेह हाचि मज ॥४॥
तुका ह्मणे मी तों कमाईचें हीण । ह्मणऊनी सीण करीं देवा ॥ ५ ॥

॥ २१५७ ॥

तुझ्या शरणागत जालों मी अंकित । करीं माझें हित पांडुरंगा ॥ १ ॥
पतितपावन तुह्मी ब्रीदावळी । ते आतां सांभाळीं मायबापा ॥ २ ॥
अनाथाचा नाथ बोलतील संत । ऐकोनिया मात विश्वासलों ॥ ३ ॥
न करावी निरास न धरावें उदास । देई याचकास कृपादान ॥ ४ ॥
तुका ह्मणे मी तो पातकांची रासी। देई पाय।पाशीं ठाव देवा ॥ ५ ॥

॥ २१५८ ॥

नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव । मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥ १ ॥
दावीं रूप मज गोपिकारमणा । ठेवीन चरणांवरी माथा ॥ २ ॥
पाहोनि श्रीमुख देईन आलिंगन । जीवें निंबलोण उतरीन ॥ ३ ॥
पुसतां सांगेन हितगुज मात । बैसोनि एकांत सुखगोष्टी ॥ ४ ॥
तुका ह्मणे यासी न लावीं उशीर । माझें अभ्यंतर जाणोनियां ॥ ५ ॥

॥ २१५९ ॥

तुझा दास ऐसा ह्मणती लोकपाळ । ह्मणऊनी सांभाळ करी माझा ॥१॥
अनाथाचा नाथ पतितपावन । हें आतां जतन करीं नाम ॥ २ ॥
माझे गुणदोष पाहतां न लगे अंत । ऐसें माझें चित्त मज ग्वाही ॥ ३ ॥
नेणें तुह्मी कैसी करावी हे सेवा । जाणसी तूं देवा अंतरींचें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तूं या कृपेचा सिंधु । तोडीं भवबंधु माझा देवा ॥ ५ ॥

॥ २१६० ॥

इतुलें करीं देवा ऐकें हें वचन। समूळ अभिमान जाळीं माझा ॥ १ ॥
इतुलें करीं देवा ऐकें हे गोष्टी । सर्व समदृष्टीं तुज देखें ॥ २ ॥
इतुलें करीं देवा विनवितों तुज । संतचरणरज वंदीं माथां ॥ ३ ॥
इतुलें करीं देवा ऐकें हे मात । हृदयीं पंढरिनाथ दिवसरात्रीं ॥ ४ ॥
भक्तिया भावें तारीं पंढरिनाथा। तुका ह्मणे आतां शरण आलों ॥५॥

॥ २१६१ ॥

कोण आह्मां पुसे सिणलें भागलें । तुजविण उगलें पांडुरंगा ॥ १ ॥
कोणापाशीं आह्मीं सांगावें सुखदुःख । कोण तानभूक निवारील ॥ २ ॥
कोण या तपाचा करील परिहार । उतरील पार कोण दुजा ॥ ३ ॥
कोणापें इच्छेचें मागावें भातुकें । कोण कवतुकें बुझावील ॥ ४ ॥
कोणावरी आह्मीं करावी हे सत्ता । होईल साहाता कोण दुजा ॥ ५ ॥
तुका ह्मणे अगा स्वामी सर्वजाणां । दंडवत चरणा तुमच्या देवा ॥६॥

॥ २१६२ ॥

काय कीर्ति करूं लोक दंभ मान । दाखवीं चरण तुझे मज ॥ १ ॥
मज आतां ऐसें नको करूं देवा । तुझा दास जावा वांयां विण ॥ २ ॥
होइल थोरपण जाणिवेचा भार । दुरावेन दूर तुझ्या पायीं ॥ ३ ॥
अंतरींचा भाव काय कळे लोकां । एक मानी एकां देखोवेखीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुझे पाय आतुडती । ते मज विपत्ति गोड देवा ॥ ५ ॥

॥ २१६३ ॥

मज पाहातां हें लटिकें सकळ । कोठें मायाजाळ दावीं देवा ॥ १ ॥
कोणाचा कोणासीं न धरे संबंध । आहे शुद्धबुद्ध ठायींचे ठायीं ॥२॥
काढा जी आपुलें मोह बुंथी जाळें । नका लावूं बळें वेड आह्मां॥३॥
जीव शिव कांहीं ठेवियेलीं नांवें । सत्य तुह्मां ठावें असोनियां ॥ ४ ॥
सेवेच्या अभिलाषें न धराचि विचार । आह्मां दारोदार हिंडविलें ॥ ५ ॥
आहे तैसें आतां कळलियावरी । परतें सांडा दुरी दुजेपण ॥ ६ ॥
तुका ह्मणे काय छायेचा अभिलाष । हंस पावे नाश तारांगणीं ॥ ७ ॥

॥ २१६४ ॥

जाळा तुह्मी माझें जाणतें मीपण । येणें माझा खुण मांडियेला ॥ १ ॥
खादलें पचे तरिच तें हित । ओकलिया थीत पिंड पीडी ॥ २ ॥
तरि भलें भोगे जोडिलें तें धन । पडिलिया खानें जीवनासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज तारीं गा विठ्ठला । नेणतांचि भला दास तुझा ॥ ४ ॥

॥ २१६५ ॥

वेदपुरुष तरि नेति कां वचन । निवडूनि भिन्न दाखविलें ॥ १ ॥
तुम्हीं वर्मे तूंचि दावूनि अनंता । होतोसि नेणता कोण्यागुणें ॥ २ ॥
यज्ञाचा भोक्ता तरि कां नव्हे सांग । उणें पडतां अंग क्षोभ घडे॥३॥
वससी तूं या भूतांचे अंतरीं । तरि कां भेद हरी दावियेला ॥ ४ ॥
तपतीर्थाटणें तुझें मूर्तिदान । तरि कां अभिमान आड येतो ॥ ५ ॥
आतां क्षमा कीजे विनवितो तुका । देऊनियां हाका उभा द्वारीं ॥६॥

॥ २१६६ ॥

लेंकराची आळी न पुरवी कैसी । काय तयापाशीं उणें जालें ॥ १ ॥
आह्मां लडिवाळां नाहीं तें प्रमाण । कांहीं ब्रह्मज्ञान आत्मस्थिति ॥२॥
वचनाचा घेइन अनुभव पदरीं । जें हें जनाचारीं मिरविलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी भोळिवेची आटी । दावीन शेवटीं कौतुक हें ॥ ४ ॥

॥ २१६७ ॥

आमची कां न ये तुह्मासी करुणा । किती नारायणा आळवावें॥ १ ॥
काय जाणां तुह्मी दुर्बळाचें जिणें । वैभवाच्या गुणें आपुलिया ॥ २ ॥
देती घेती करिती खटपटा आणिकें । निराळा कौतुकें पाहोनियां ॥३॥
दिवस बोटीं आह्मीं धरियेलें माप । वाहातों संकल्प स्वहिताचा ॥ ४ ॥
तुका ह्मणे मग देसी कोण्या काळें । चुकुर दुर्बळें होतों आह्मी ॥ ५ ॥

॥ २१६८ ॥

आळवितां कंठ शोकला भीतर । आयुष्य वेचे धीर नाहीं मना ॥ १ ॥
अझून कां न ये हें तुझ्या अंतरा । दीनाच्या माहेरा पांडुरंगा॥ २ ॥
धन दिसे डोळा दगडाचे परी । भोग ते शरीरीं विष जालें ॥ ३ ॥
चुकलों काय तें मज क्षमा करीं । आलिंगूनि हरी प्रेम द्यावें ॥ ४ ॥
अवस्था राहिली रूपाची अंतरीं । बाहेर भीतरी सर्व काळ ॥ ५ ॥
तुका ह्मणे माझे सकळ उपाय । पांडुरंगा पाय तुझे आतां ॥ ६ ॥

॥ २१६९ ॥

तुज न करितां काय नव्हे एक । हे तों सकळिक संतवाणी ॥ १ ॥

घेई माझा भार करीं कइवार । उतरीं हा पार भवसिंधु ॥ २ ॥
उचित अनुचित पापपुण्यकाला । हा तो नये मला निवडितां ॥ ३ ॥
कुंठित राहिली बोलतां बोलतां । पार न पवतां वाणी पुढें ॥ ४ ॥
पुसतांही कोणां न कळे हें गुज । राखें आतां लाज पांडुरंगा ॥ ५ ॥
तुका ह्मणे बहु पाहिलें या जीवें । वर्म जालें जी ठावें नाम तुझें ॥६॥

॥ २१७० ॥

आतां होई माझे बुद्धीचा जनिता । अवरावें चित्ता पांडुरंगा ॥ १ ॥
येथूनियां कोठें न वजें बाहेरी । ऐसें मज धरीं सत्ताबळें ॥ २ ॥
अनावर गुण बहुतां जातींचे । न बोलावे वाचे ऐसें करीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे हित कोणिये जातीचें । तुज ठावें साचें मायबापा ॥ ४ ॥

॥ २१७१ ॥

पोटीं शूळ अंगीं उटी चंदनाची । आवडी सुखाची कोण तया ॥ १ ॥
तैसें मज कांगा केलें पंढरिराया । लौकिक हा वांयां वाढविला ॥ २ ॥
ज्वरिलियापुढें वाढिलीं मिष्टान्नें । काय चवी तेणें घ्यावी त्यांची ॥ ३ ॥
तुका ह्मणे मढें शृंगारिलें वरी । तेचि जाली परी मज देवा ॥ ४ ॥

॥ २१७२ ॥

तळमळी चित्त दर्शनाची आशा । बहु जगदीशा करुणा केली ॥ १ ॥
वचनींच संत पावले स्वरूप । माझें नेदी पाप योगा येऊं ॥ २ ॥
वेठीऐसा करीं भक्तिवेवसाव । न पवेचि जीव समाधान ॥ ३ ॥
तुका ह्मणे कई देसील विसावा । पांडुरंगे धांवा घेतें मन ॥ ४ ॥

॥ २१७३ ॥

दाटे कंठ लागे डोळियां पाझर । गुणाची अपार वृष्टि वरी ॥ १ ॥
तेणें सुखें छंदें घेईन सोहळा । होऊनि निराळा पापपुण्यां ॥ २ ॥
तुझ्या मोहें पडो मागील विसर । आलापें सुस्वर करिन कंठ ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें पाहिजे सौरस । तुह्मांविण रस गोड नव्हे ॥ ४ ॥

॥ २१७४ ॥

कासया या लोभें केलें आर्तभूत । सांगा माझें चित नारायणा ॥१॥

चातकाचे परी एकचि निर्धार । लक्षभेदी तीर फिरों नेणें ॥ २ ॥
सांवळें रूपडें चतुर्भुज मूर्ति । कृष्णनाम चित्तीं संकल्प हा ॥ ३ ॥
तुका ह्मणे करीं आवडीसी ठाव । नको माझा भाव भंगों देऊं ॥ ४ ॥

॥ २१७५ ॥

शृंगारिक माझीं नव्हती उत्तरें । आळवितों खरे अवस्थे या ॥ १ ॥
न घलावा मधीं कामाचा विलंब । तुह्मी तो स्वयंभ करुणामूर्ति ॥ २ ॥
तुका ह्मणे केलें सन्मुख वदन । देखतां चरण पोटाळीन ॥ ३ ॥

॥ २१७६ ॥

कां हो देवा कांहीं न बोलाचि गोष्टी । कां मज हिंपुटी करीतसां ॥ १ ॥
कंठीं प्राण पाहें वचनाची आस । तों दिसे उदास धरिलें ऐसें ॥ २ ॥
येणें काळें बुंथी घेतलीसे खोल । कां नये विटाळ होऊं माझा ॥ ३ ॥
लाज वाटे मज ह्मणवितां देवाचा । न पुसती फुकाचा तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ २१७७ ॥

प्रीतीचिया बोला नाहीं पेसपाड । भलतसें गोड करूनि घेई ॥ १ ॥
तैसें विठ्ठलराया तुज मज आहे । आवडीनें गायें नाम तुझें ॥ २ ॥
वेडे वांकडे बाळकाचे बोल । करिती नवल मायबाप ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज येवो माझी दया । जीवींच्या सखया जिवलगा ॥ ४ ॥

॥ २१७८ ॥

मोल वेचूनिया धुंडिती सेवका । आह्मी तरी फुका मागों बळें ॥ १ ॥
नसतां जवळी हित फार करूं । जीव भाव धरूं तुझ्या पायीं ॥ २ ॥
नेदूं भोग आह्मी आपुल्या शरीरा । तुह्मांसी दातारा व्हावें म्हूण ॥ ३ ॥
कीर्ती तुझी करूं आमुचे सायास । तूं का रे उदास पांडुरंगा ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुज काय मागों आह्मी । फुकाचे कां ना भी ह्मणसी ना ॥ ५ ॥

॥ २१७९ ॥

पतित मी पापी शरण आलों तुज । राखीं माझी लाज पांडुरंगा ॥ १ ॥
तारियले भक्त न कळे तुझा अंत । थोर मी पतित पांडुरंगा ॥ २ ॥
द्रौपदी बहिणी वैरीं गांजियेली । आपणाऐसी केली पांडुरंगा ॥ ३ ॥

प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार । माझा कां विसर पांडुरंगा ॥ ४ ॥
सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । आपणा ऐसा केला पांडुरंगा ॥ ५ ॥
तुका ह्मणे तुज शरण निजभावें । पाप निर्दाळावें पांडुरंगा ॥ ६ ॥

॥ २१८० ॥

तुजलागीं माझा जीव जाला पिसा । अवलोकितों दिशा पांडुरंगा ॥ १ ॥
सांडिला व्यवहार माया लोकाचार । छंद निरंतर हाचि मनीं ॥ २ ॥
आइकिलें कानीं तें रूप लोचन । देखावया सीण करितातीं ॥ ३ ॥
प्राण हा विकळ होय कासावीस । जीवनाविण मत्स्य तयापरी ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां कोण तो उपाव । करूं तुझे पाव आतुडे तो ॥ ५ ॥

॥ २१८१ ॥

मागें बहुतां जनां राखिलें अडाणी । धांवसी निर्वाणी नाम घेतां ॥ १ ॥
ऐसें ठावें जालें मज बरव्या परी । ह्मणऊनि करीं धांवा तुझा ॥ २ ॥
माझेविशीं तुज पडिला विसरु । आतां काय करूं पांडुरंगा ॥ ३ ॥
अजुनि कां नये तुह्मांसी करुणा । दुरी नारायणा धरिलें मज ॥ ४ ॥
तुका ह्मणे जीव जाऊं पाहे माझा । आलां केशीराजा घालीं उडी ॥ ५ ॥

॥ २१८२ ॥

एकवेळ करीं या दुःखावेगळें । दुरिताचें जाळें उगवूनि ॥ १ ॥
आठवीन पाय हा माझा नवस । रात्रीही दिवस पांडुरंगा ॥ २ ॥
बहु दूरवरी भोगवीलें भोगा । आतां पांडुरंगा सोडवावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे काया करीन कुरवंडी । ओवाळूनि सांडीं मस्तक हें ॥ ४ ॥

॥ २१८३ ॥

आणीक म्यां कोणा यावें काकुलती । कोण कामा येती अंतकाळीं ॥ १ ॥
तूं वो माझी सखी होसी पांडुरंगे । लवकरी ये गे वाट पाहें ॥ २ ॥
काया वाचा मनें हेंचि आस करीं । पाउलें गोजिरीं चिंतीतसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी पुरवीं हे आस । घालीं ब्रह्मरस भोजन हें ॥ ४ ॥

॥ २१८४ ॥

कराल तें काय नव्हे जी विठ्ठला । चित्त द्यावें बोला बोबडिया ॥ १ ॥

सोडवूनि घ्यावें काळचक्रा हातीं । बहुत विपत्ति भोगविल्या ॥ २ ॥
ज्यालें जीवों नेदी मारिलेंची मरे । प्रारब्ध तें उरे मागुतालें ॥ ३ ॥
तुका ह्मणे दुजा खुंटला उपाय । ह्मणऊनि पाय आठविले ॥ ४ ॥

॥ २१८५ ॥

जन्म मृत्यु फार जाले माझ्या जीवा । ऐक माझा धांवा पांडुरंगा ॥ १ ॥
सिणलों बहुत करितां येरझारा । रखुमाईच्या वरा पावें वेगीं ॥ २ ॥
तुका ह्मणे तूं गा पतितपावन । घेई माझा सीण जन्मांतर ॥ ३ ॥

॥ २१८६ ॥

प्रीति नाहीं राया वर्जिली ते कांता । परी तिची सत्ता जगावरी ॥ १ ॥
तैसे दंभी जालों तरी तुझे भक्त । वास यमदूत न पाहाती ॥ २ ॥
राजयाचा पुत्र अपराधी देखा । तो काय आणिकां दंडवेल ॥ ३ ॥
बाहातरी खोडी परी देवमण कंठीं । तैसा जगजेठी ह्मणे तुका ॥ ४ ॥

॥ २१८७ ॥

लोखंडाचे न पाहे दोष । शिवोन परीस सोनें करी ॥ १ ॥ जैसी
तैसी तरी वाणी । मना आणी माउली ॥ २ ॥ लेंकराच्या स्नेहें
गोड । करी कोड त्या गुणें ॥ ३ ॥ मागें पुढें रिघे लोटीं । साहे खेटी
करी तें ॥ ४ ॥ तुका विनवी पांडुरंगा । ऐसें सांगा आहे हें ॥ ५ ॥

॥ २१८८ ॥

ह्मणऊनि धरिले पाय । अवो माय विठ्ठले ॥ १ ॥ आपुलेंचि करूनि
घ्यावें । आश्वासावें ना भीसें ॥ २ ॥ वाढली ते तळमळ चित्ता । शम
आतां करावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीवीं वसे । मज नसे वेगळी ॥४॥

॥ २१८९ ॥

बाळ माते लातेवरी । मारी तेणें संतोषे ॥ १ ॥ सुख वसे चित्ता अंगीं ।
तें हें रंगीं मिळालें ॥ २ ॥ भक्षी त्याचा जीवभाग । आला भाग तो बरा
॥३॥ तुका ह्मणे ऋणानुबंधें । सांगे सुदें सकळां ॥४॥

॥ २१९० ॥

पांडुरंगे पांडुरंगे । माझे गंगे माउलिये ॥ १ ॥ पान्हा घालीं प्रेमधारा ।

पूर क्षीरा लोटों दे ॥ २ ॥ अंगें अंग मेळउनी । करीं धणी फेडाया ॥३॥ तुका ह्मणे घेइन उड्या । सांडिन कुड्या भावना ॥ ४ ॥

॥ २१९१ ॥

जाणतें लेंकरूं । माता लागे दूरी धरूं ॥ १ ॥ तैसें न करीं कृपावंतें । पांडुरंगे माझे माते ॥ २ ॥ नाहीं मुक्ताफळा । भेटी मागुती त्या जळा ॥३॥ तुका ह्मणे लोणी । ताक सांडी निवडूनि ॥४॥

॥ २१९२ ॥

बाळाचें जीवन । माता जाणें भूक तान ॥ १ ॥ काय करूं विनवणी । असो मस्तक चरणीं ॥ २ ॥ ठेविलियें ठायीं । चित्त ठेवुनि असें पायीं ॥३॥ करितों हे सेवा । चिंतन सर्वा ठायीं देवा ॥४॥ न्यून तेंचि पुरें । घ्यावें करोनि दातारें ॥५॥ तुका ह्मणे बुद्धि । अल्प असे अपराधी ॥६॥

॥ २१९३ ॥

बैसों पाठमोरी । मना वाटे तैसें करीं ॥१॥ परि तूं जाणसी आवडी । बाळा बहुतांची परवडी ॥ २ ॥ आपुलाल्या इच्छा । मागों जया व्हावें जैशा ॥३॥ तुका ह्मणे आई । नव्हसी उदास विठाई ॥४॥

॥ २१९४ ॥

गरुडाचे पायीं । ठेवीं वेळोवेळां डोई ॥ १ ॥ वेगीं आणावा तो हरी । मज दीनातें उद्धरी ॥ २ ॥ पाय लक्ष्मीच्या हातीं । तिशीं यावें काकुलती ॥३॥ तुका ह्मणे शेषा । जागें करा हृषीकेशा ॥४॥

॥ २१९५ ॥

गंगा गेली सिंधुपाशीं । जरि तो ठाव नेदी तिशीं ॥ १ ॥ तिणें जावें कवण्या ठाया । मज सांगा पंढरिराया ॥२॥ जळ क्षोभलें जळचरा । माता बाळा नेदी थारा ॥ ३ ॥ तुका ह्मणे आलों शरण । देवा त्वां कां धरिलें मौन ॥४॥

॥ २१९६ ॥

तुझा ह्मणविलों दास । केली उच्छिष्टाची आस ॥ १ ॥ मुखीं घालावा कवळ । जरि तूं होशील कृपाळ ॥ २ ॥ सीण भाग माझा पुसें । तुका ह्मणे न करीं हांसें ॥३॥

॥ २१९७ ॥

आळस आला अंगा । धांव घालीं पांडुरंगा ॥ १ ॥ सोसूं शरीराचे भाव । पडती अवगुणांचे घाव ॥ २ ॥ करावीं व्यसनें । दुरी येउनि नारायणें ॥ ३ ॥ जवळील दुरी । जालों देवा धरीं करीं ॥ ४ ॥ ह्मणऊनि देवा । वेळोवेळां करीं धांवा ॥ ५ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । दुरी धरूं नका अंगा ॥ ६ ॥

॥ २१९८ ॥

आश्वासावे दास । तरी घडे तो विश्वास ॥१॥ नाहीं चुकत चाकरी । फुटे लाडक्याचे थोरी ॥ २ ॥ स्वामीचिया उत्तरें । सुख वाटे अभयें करें ॥ ३ ॥ न मगे परि भातें । तुका ह्मणे निढळ वाटे ॥ ४ ॥

॥ २१९९ ॥

आतां पाविजेल घरा । या दातारा संगतीं ॥१॥ पायावरी ठेवूं माथा सर्वथा हा नुपेक्षी ॥ २ ॥ येथून तेथवरि आतां । नाहीं सत्ता आणिकांची ॥३॥ तुका ह्मणे चक्रपाणी । शिरोमणि बळियांचा ॥४॥

॥ २२०० ॥

हेंचि वारंवार । पडताळुनी उत्तर ॥ १ ॥ करितों पायांसी विनंती । नुपेक्षावें कमळापती ॥ २ ॥ गंगोदकें गंगे । अर्घ्य द्यावें पांडुरंगे ॥३॥ जोडोनियां हात । करी तुका प्रणिपात ॥४॥

॥ २२०१ ॥

आपण तों असा । समर्थ जी हृषीकेशा ॥१॥ करा करा बुझावणी । काय विलंब वचनीं ॥ २ ॥ हेंगे ऐसें ह्मणा । उठूनि लागेन चरणा ॥ ३ ॥ घेउनियां सुखें । नाचेल तुका कवतुकें ॥४॥

॥ २२०२ ॥

तुझे दारींचा कुतरा । नको मोकलूं दातारा ॥ १ ॥ धरणें घेतलें दारांत । नको धरून उठवूं हात ॥२॥ घेतली मुरकुंडी । थोर जालों मी लंडी ॥३॥ तुका ह्मणे जगजीवना । श्रीदें पाहें नारायणा ॥४॥

॥ २२०३ ॥

सांडियेली काया । वरी ओंवाळूनी पायां ॥ १ ॥ शरण शरण नारायणा । मज अंगीकारा दीना ॥ २ ॥ भावें आलों लोटांगणीं । रुळें तुमचे चरणीं ॥३॥ तुका ह्मणे कई । डोई ठेवीन हे पायीं ॥४॥

॥ २२०४ ॥

उच्चारूं यासाटीं । आह्मी नाम तुझें कंठीं ॥ १ ॥ येसी धांवत धांवत । माउलिये कृपावंते ॥ २ ॥ पाय चित्तीं धरूं । क्रीडा भलते ठायीं करूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझे गंगे । प्रेमभरित पांडुरंगे ॥ ४ ॥

॥ २२०५ ॥

यावें माहेरास । हेंच सर्वकाळ आस ॥१॥ द्यावी उच्छिष्टाची धणी । तीर्थ इच्छी पायवणी ॥२॥ भोग उभा आड । आहे तोंवरीच नाड ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवें । माझें सिद्धी पाववावें ॥४॥

॥ २२०६ ॥

असो खटपट । आतां वाउगे बोभाट ॥१॥ परिसा हे विनवणी । असो मस्तक चरणीं ॥२॥ अपराध करा । क्षमा घडले दातारा ॥३॥ तुका ह्मणे वेथा । तुह्मा कळे पंढरिनाथा ॥४॥

॥ २२०७ ॥

बहु जन्मांतरें फेरे । केले येरे सोडवीं ॥ १ ॥ आळवितों करुणाकरे । विश्वंभरे दयाळे ॥२॥ वहावतों मायापुरीं । येथें करीं कुडावा ॥३॥ तुका ह्मणे दुजा कोण । ऐसा सीण निवारी ॥४॥

॥ २२०८ ॥

द्वारपाळ विनंती करी । उभे द्वारीं राउळा ॥ १ ॥ आपुलिया शरणागता । वाहों चिंता नेदावी ॥ २ ॥ वचना या चित्त द्यावें । असो ठावें पायांसी ॥३॥ तुका ह्मणे कृपासिंधू । दीनबंधू केशवा ॥४॥

---

१. इंदिरा प्रेसचे प्रतींत 'शरण शरण नारायण' या मूळारंभानें हा अभंग दिला असून 'सांडियेली काया' हा चरण तिसरा दिला आहे; पण बहुतेक गाथांतून वर दिलेला क्रमच आढळतो, व तोच संतमंडळींत प्रचलित आहे.

॥ २२०९ ॥

उशीर कां केला । कृपाळुवा जी विठ्ठला ॥ १ ॥ मज दिलें कोणा हातीं । काय मानिली निश्चिंती ॥ २ ॥ कोठवरी धरूं धीर । आतां मन करूं स्थिर ॥३॥ तुका ह्मणे जीव । ऐसी भाकितसे कींव ॥४॥

॥ २२१० ॥

कोण दुजें हरी सीण । शरण दीन आल्याचा ॥ १ ॥ तुह्मांविण जगदीशा । उदार ठसा त्रिभुवनीं ॥ २ ॥ कोण ऐसें वारी पाप । हरी ताप जन्माचा ॥३॥ तुका ह्मणे धांव घाली । कोण चाली मनाचे ॥४॥

॥ २२११ ॥

धांवा शीघ्रवत । किंवा घ्यावें दंडवत ॥ १ ॥ तुमचा जातो बडिवार । आह्मी होतों हीनवर ॥ २ ॥ न धरावा धीर । धांवा नका चालों स्थिर ॥३॥ तुका ह्मणे वाणी । माझी लाजली जी गुणीं ॥४॥

॥ २२१२ ॥

न करीं उदास । माझी पुरवावी आस ॥ १ ॥ ऐका ऐका नारायणा । माझी परिसा विज्ञापना ॥ २ ॥ मायबाप बंधुजन । तूंचि सोयरा सज्जन ॥३॥ तुका ह्मणे तुजविरहित । कोण करील माझें हित ॥४॥

॥ २२१३ ॥

आतां काशासाटीं दुरी । अंतर उरी राखिली ॥ १ ॥ करीं लवकरीं मूळ । लहानें तीळ मुळींचिया ॥ २ ॥ दोन्हीं ठायीं उद्वेगवाणें । दुरुषणें निश्चिंती ॥३॥ तुका ह्मणे वेग व्हावा । ऐसी जीवा उत्कंठा ॥४॥

॥ २२१४ ॥

उसंतिल्या कर्मवाटा । बहु मोठा अघात ॥ १ ॥ शीघ्र यावें शीघ्र यावें । हातीं न्यावें धरूनि ॥२॥ भागलों या खटपटें । घटपटें करितां ॥३॥ तुका ह्मणे कृपावंता । माझी चिंता खंडावी ॥४॥

॥ २२१५ ॥

आतां तळमळ । केली पाहिजे सीतळ ॥ १ ॥ करील तें पाहें देव । पायीं ठेवूनियां भाव ॥ २ ॥ तोचि अन्नदाता । नाहीं आणिकांची सत्ता ॥३॥ तुका ह्मणे दासा । नुपेक्षिल हा भरवसा ॥ ४ ॥

॥ २२१६ ॥

मज अनाथाकारणें । करीं येणें केशवा ॥ १ ॥ जीव झुरे तुजसाटीं । वाट पोटीं पहातसें ॥२॥ चित्त रंगलें चरणीं । तुजवांचूनि न राहे ॥३॥ तुका ह्मणे कृपावंता । माझी चिंता असावी ॥४॥

॥ २२१७ ॥

जोडिले अंजुळ । असें दान उताविळ ॥ १ ॥ पाहा वहा कृपादृष्टी । आणा अनुभवा गोष्टी ॥२॥ तूं धनी मी सेवक । आइक्य तें एका एक ॥३॥ करितों विनंती । तुका सन्मुख पुढती ॥ ४ ॥

॥ २२१८ ॥

पदोपदीं पायां पडणें । करुणा जाण भाकावी ॥१॥ ये गा विसांविया। करुणा दयासागरा ॥२॥ जोडोनियां करकमळ । नेत्र जळ भरोनि ॥३॥ तुका उभें दारीं पात्र । पुरवीं आर्त विठोबा ॥४॥

॥ २२१९ ॥

हेंचि जतन करा दान । धरुनि चरण राहिलों ते ॥ १ ॥ आणीक कांहीं न घालीं भार । बहु फार सांकडें ॥ २ ॥ द्यावी माझ्या हातें सेवा । हेचि देवा विनवणी ॥ ३ ॥ तुका तुमचा ह्मणवी दास । त्याची आस पुरवावी ॥ ४ ॥

॥ २२२० ॥

आह्मी उतराई । भाव निरोपूनि पायीं ॥ १ ॥ तुह्मी पुरवावी आळी। करावी ते लडिवाळीं ॥ २ ॥ आमचा हा नेम । तुह्मां उचित हा धर्म ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । जाणों सांगितली सेवा ॥ ४ ॥

॥ २२२१ ॥

आतां दुसरें नाहीं वर्नीं। निरंजनीं पडिलों ॥१॥ तुमचीच पाईं वास। अवघी आस निरसली ॥२॥ मागिलांचा मोडला माग । घडला त्याग अरुची ॥३॥ तुका ह्मणे करुणाकरा । तूं सोयरा जीवींचा ॥४॥

॥ २२२२ ॥

आतां आहे नाहीं । न कळे आळी करा कांहीं ॥ १ ॥ देसी पुर-

वुनी इच्छा । आतां पंढरीनिवासा ॥ २ ॥ नेणें भाग सीण । दुजें कांहीं तुह्मांविण ॥३॥ आतां नव्हे दुरी । तुका पायीं मिठी मारी ॥४॥

॥ २२२३ ॥

समर्थाची धरिली कास । आतां नाश काशाचा ॥ १ ॥ धांवें पावें करीन लाहो । तुमचा आहो विठ्ठला ॥२॥ नलगे मज पाहाणें दिशा । हाकेसरिसा ओढसी॥३॥तुका ह्मणे नव्हे धीर । तुह्मां स्थिर दयेनें॥४॥

॥ २२२४ ॥

येणें पांगे पायांपाशीं । निश्चयेंसी राहेन ॥ १ ॥ सांगितली करीन सेवा । सकळ देवा दास्यत्व ॥ २ ॥ बंधनाची तुटली बेडी । हेचि जोडी मग आह्मां ॥३॥ तुका ह्मणे नव्हें क्षण । पायांविण वेगळा॥४॥

॥ २२२५ ॥

माझें जड भारी । आतां अवघें तुह्मांवरी ॥ १ ॥ जालों अंकित अंकिला । तुमच्या मुकलों मागिला ॥ २ ॥ करितों जें काम । माझी सेवा तुझें नाम ॥३॥ तुका पायां लागे । कांहीं नेदी ना न मागें॥४॥

॥ २२२६ ॥

आलों तंव साचें । दास राहवणें काचें ॥ १ ॥ हें कां मिळतें उचित । तुह्मी नेणा कृपावंत ॥२॥ सिंहाचीं तीं पिलें । जाय घेऊनियां कोल्हें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नास । आह्मां ह्मणविलियां दास ॥ ४ ॥

॥ २२२७ ॥

इंद्रियांचीं दीनें । आह्मी केलों नारायणें ॥ १ ॥ ह्मणऊनि ऐसें सोसीं । काय सांगों कोणापाशीं ॥ २ ॥ नाहीं अंगीं बळ । त्याग करीसा सकळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोटें । प्रारब्ध होतें खोटें ॥ ४ ॥

॥ २२२८ ॥

पसरूनि राहिलों बाहो । सोयी अहो तुमचिये ॥ १ ॥ आतां यावें लागवेगें । पांडुरंगे धांवत ॥२॥ बैसायाची इच्छा कडे । चाली खडे रूपतांती ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृपाळुवा । करीन सेवा लागली ॥ ४ ॥

॥ २२२९ ॥

दर्शनाचें आर्त जीवा । बहु देवा राहिलें ॥ १ ॥ आतां आणसी तें



# प्रस्तावना.

श्री सयाजीविजय पत्राच्या वर्गणीदारांस दरसाल सुमारें दीडशेंपासून दोनशें पानांच्या कादंबरीची भेट देण्याची वहिवाट आज कित्येक वर्षांपासून चालू आहे. गुदस्तसालीं आमच्या कित्येक वर्गणीदारांनीं अशी सूचना केली कीं, कादंबरी वगैरेसारखीं पुस्तकें एकवेळ वाचल्यानंतर त्यांचा पुढें फारसा उपयोग होत नाहीं. करितां धार्मिक पुस्तकाची भेट वर्गणीदारांस देण्याची योजना केल्यास, तसल्या ग्रंथांचा तितका अधिक प्रसार होऊन अनायासें लोकांजवळ धार्मिक ग्रंथांचा संग्रहही होईल. ही सूचना आह्मांसही मान्य झाली. व प्रारंभीं, सर्वमान्य अशी तुकारामाच्या अभंगांची गाथाच वर्गणीदारांस भेट देण्याचा विचार आह्मीं ठरविला.

दीड रुपयासारख्या अल्प वर्गणींत इतकें मोठें पत्र देऊन शिवाय दीडशें दोनशें पृष्ठांचें पुस्तक देणें हेंच मुळीं पुष्कळ साहसाचें होतें. आजपर्यंत एकाही मराठी पत्रानें अशा प्रकारें पुस्तकांच्या भेटी आपल्या वर्गणीदारांस दिल्या नाहींत; आणि वास्तविक पहातां आज आमच्या मराठी पत्रांची स्थिति इतकी निकृष्ट आहे कीं, वसूल होणाऱ्या वर्गणींत पत्राचा खर्चही भागणें पुष्कळांस मुष्किलीचें होत आहे, अशा स्थितींत गाथे-सारख्या मोठ्या ग्रंथाची भेट देण्याचें धाडस करणें हें स्वाभाविकतःच पुष्कळ आश्चर्याचें आणि जोखमेचें आहे; असें कोणीही विचारी मनुष्य तेव्हांच कबूल करील. परंतु मुद्रणकलेच्या साह्यानें जितक्या सवलतीनें मराठी ग्रंथांचा प्रसार करितां येईल तितका करण्याचा आमचा निश्चय

असल्यामुळें, असल्या भेटी देण्याचेंही आम्हीं हल्लीं धाडस केलें आहे, त्याचें चीज करणें केवळ वर्गणीदारांवर अवलबून आहे. सर्वशक्तिमान प्रभु आमच्या हातून हें काम दरसाल निर्विघ्न शेंवटास नेवो, अशी आमची विनंती आहे.

ही गाथा सरकारी प्रतीबरहुकूम बारीक टाईपांत छापून एकाच भागांत प्रसिद्ध करण्याचा मूळारंभीं आमचा विचार ठरला होता. परंतु आमचा हा विचार कित्येक मंडळीस कळवितां, त्यांनीं आह्मास वेगवेगळ्या प्रकारच्या सूचना केल्या. त्या सूचनांत बऱ्याच विचाराच्या अशा पुढील सूचना आह्मांस आढळून आल्या.

१. टाईप अगदीं बारीक न वापरतां थोडा ठळक असा वापरावा.

२. अभंगांचीं प्रकरणें पाडून तीं होतील तितकीं शिस्तवार लावावीं.

३. आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या गाथा एकत्र करून त्यांत जे पाठभेद आढळतील त्यांच्या टिपा द्याव्या.

४. एकाच अर्थाचे असे कित्येक प्रतींतून दुबार अभंग झाले आहेत ते कमी करावे.

५. तुकारामाचे असे जे अभंग प्रचलित गाथेशिवाय इतर ठिकाणीं सांपडतील त्यांचा यांत समावेश करावा.

६. भाषेंत नवीन पद्धतीचा फेरफार न करतां मूळांत असेल तशी भाषा ठेवावी.

७. शेंवटीं अवघड शब्दांचा विस्तृत कोश जोडावा.

येणेंप्रमाणें ह्या सात सूचना आह्मांस विशेष अगत्याच्या दिसल्या व त्याप्रमाणें हल्लींच्या गाथेंत आह्मीं सुधारणा करण्याचा प्रयत्न केला आहे. तो कितपत सिद्धीस गेला हें पाहण्याचें काम वाचकांचें आहे. कित्येकांच्या दृष्टीनें यांत आणखी विशेष सुधारणा करण्यासारख्या असल्याचें दिसून

आल्यास त्यांनीं त्या कळविण्याची कृपा करावी. ईशेच्छेनें दुसऱ्या आवृत्तीचा योग आल्यास त्यावेळीं त्यांचा उपयोग करूं, व राहिलेल्या उणिवा भरून काढण्याचा प्रयत्न अवश्य करूं.

पूर्वींचा बेत रहित करून मागाहून गाथेचा टाईप मोठा धरल्यामुळें अर्थात् पृष्ठांची संख्या दुप्पट वाढली व त्यामुळें ती दोन भागांत प्रसिद्ध करणें भाग पडलें. शिवाय हें काम ज्या विद्वान् गृहस्थाकडे सोंपलें होतें, ते वे. शा. सं. भास्कर राजाराम शास्त्री, ऐन वेळीं आजारी पडून शेवटीं त्या दुखण्यांतच त्यांचा अंत झाला, त्यामुळें हा पहिला भागच तयार होण्यास ठरलेल्या मुदतीपेक्षां पुष्कळ अधिक वेळ लागला, व त्यामुळें पुष्कळ वर्गणीदारांस तिष्ठत बसावें लागलें, याबद्दल सुज्ञजन आम्हांस क्षमा करितील अशी आशा आहे.

ह्या भागांत एकंदर ४० प्रकरणें आलीं असून अभंगांची संख्या २३०७ आहे. बाकीचे राहिलेले प्रकरणवार अभंग, अवघड शब्दांचा कोश, सूची आणि तुकाराम महाराजांचें चरित्र, असें सर्व दुसरे भागांत देणार आहोंत. व तो भाग येत्यासालीं तयार होऊन सन १९०४ सालच्या भेटींत विजयाच्या वर्गणीदारांस मिळावयाचा आहे. त्या भागाची पृष्ठसंख्याही हल्लींच्या भागापेक्षां बरीच अधिक होण्याचा संभव आहे. ही अल्पसेवा सुज्ञजन मानून घेतील अशी आशा आहे.

प्रकाशक.



करीं । विश्वंभरीं काय उणें ॥ २ ॥ येथें जरी उरे चिंता । कोण दाता याहूनी ॥३॥ तुका ह्मणे जाणवलें । आह्मां भलें एवढेंच ॥४॥

॥ २२३० ॥

बुद्धिहीनां उडजीवां । नको देवा उपेक्षूं ॥ १ ॥ परिसावी विज्ञापना । आह्मां दीनां दासांची ॥ २ ॥ चिंतूनिया आले पाय । त्यांसी काय वचन ॥३॥ तुका ह्मणे पुरुषोत्तमा । करीं क्षमा अपराध ॥४॥

॥ २२३१ ॥

बहु वाटे भये । माझे उडी घाला दये ॥ १ ॥ फांसा गुंतलों लिगाडीं । न चले बळ चरफडी ॥ २ ॥ कुंठितचि युक्ति । माझ्या जाल्या सर्व शक्ति ॥३॥ तुका ह्मणे देवा । काममोहें केला गोवा॥४॥

॥ २२३२ ॥

आणिक कांहीं नेणें । असें पायांच्या चिंतनें ॥ १ ॥ माझा न व्हावा विसर । नाहीं आणीक आधार ॥ २ ॥ भांडवल सेवा । हाचि ठेवियेला ठेवा ॥ ३ ॥ करीं मानभावा । तुका विनंती करी देवा ॥ ४ ॥

॥ २२३३ ॥

काय जाणों वेद । आम्ही आगमाचे भेद ॥ १ ॥ एक रूप तुझें मनीं । धरूनि राहिलों चिंतनीं ॥ २ ॥ कोठें अधिकार । नाहीं रानट विचार ॥ ३ ॥ तुका ह्मणे दीना । नुपेक्षावें नारायणा ॥ ४ ॥

॥ २२३४ ॥

जोडोनियां कर । उभा राहिलों समोर ॥ १ ॥ हेंचि माझें भांडवल । जाणे कारण विठ्ठल ॥ २ ॥ भाकितों करुणा । आतां नुपेक्षावें दीना ॥ ३ ॥ तुका ह्मणे डोई । ठेवीं वेळोवेळां पायीं ॥ ४ ॥

॥ २२३५ ॥

उमटे तें ठायीं । तुझे निरोपावें पायीं ॥ १ ॥ आह्मीं करावें चिंतन । तुझें नामसंकीर्तन ॥ २ ॥ भोजन भोजनाच्या काळीं । मागों करूनियां आळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे माथां । भार तुझ्या पंढरिनाथा ॥४॥

॥ २२३६ ॥

जेणें वेळ लागे । ऐसें सांडीं पांडुरंगे ॥ १ ॥ कंठ कंठा मिळों देईं ।

माझा वोरस तूं घेई ॥२॥ नको पितांबर । सांवरूं हे अळंकार ॥३॥ टाकीं वो भातुकें । लौकिकाचें कवतुकें ॥४॥ हातां पायां नको । कांहीं वेगळाळें राखों ॥५॥ तुका ह्मणे यावरी । मग सुखें अळंकारीं ॥६॥

॥ २२३७ ॥

प्रेम देयाला हो । स्फुरताती दंड बाहो ॥ १ ॥ आतां झडझडां चालें । देईं उचलूनि पाउलें ॥ २ ॥ सांडीं हंसगती । बहु उत्कंठा हे चित्तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आई । श्रीरंगे विठाबाई ॥ ४ ॥

॥ २२३८ ॥

मथुरेच्या[1] राया । माझें दंडवत पायां ॥ १ ॥ तुमचे कृपेचें पोषणें । माझा समाचार घेणें ॥ २ ॥ नाम धरिलें कंठीं । असें आर्तभूत पोटीं ॥ ३ ॥ जीवींचें तें जाणा । तुका ह्मणे नारायणा ॥ ४ ॥

॥ २२३९ ॥

पतितपावना । दिनानाथा नारायणा ॥ १ ॥ तुझें रूप माझे मनीं । राहो नाम जपो वाणी ॥ २ ॥ ब्रह्मांडनायका । भक्तजनाच्या पाळका ॥ ३ ॥ जीवांचिया जीवा । तुका ह्मणे देवदेवा ॥ ४ ॥

॥ २२४० ॥

धेनु चरे वनांतरीं । चित्त बाळकापें घरीं ॥ १ ॥ तैसें करीं वो माझे आई । ठाव देउनि राखें पायीं ॥ २ ॥ काढितां तळमळी । जीवना-वेगळी मासोळी ॥३॥ तुका ह्मणे कुडी । जीवाप्राणांची आवडी ॥४॥

॥ २२४१ ॥

आळवीन स्वरें । कैशा मधुरा उत्तरें ॥ १ ॥ यें वो यें वो पांडुरंगे । प्रेमपान्हा मज दें गे ॥ २ ॥ पसरूनि चोंची । वचनें हीं करुणेचीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे बळी । आह्मी लडिवाळें आळीं ॥ ४ ॥

॥ २२४२ ॥

सकळिकांचें समाधान । नव्हे देखिल्यावांचून ॥ १ ॥ रूप दाखवीं रे

---

१. फक्त इंदिरा प्रेसचे प्रतींत या अभंगाचा " पंढरीच्या राया " असा निराळाच मूळारंभ आढळतो; पण इतर सर्व गाथांतून " मथुरेच्या राया " असा पाठ असल्यामें आम्हींही तोच दिला आहे.

आतां । सहस्रभुजांच्या मंडिता ॥२॥ शंखचक्रपद्मगदा । गरुडासहित ये गोविंदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे कान्हा । भूक लागली नयनां ॥ ४ ॥

॥ २२४३ ॥

येगा येगा पांडुरंगा । घेई उचलुनि वोसंगा ॥ १ ॥ ऐसी असोनियां वेसी । दिसतों मी परदेसी ॥ २ ॥ उगवूनि गोवा । सोडवूनि न्यावें देवा ॥ ३ ॥ तुज आड कांहीं । बळ करी ऐसें नाहीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे हृषीकेशी । काय उशीर लाविलासी ॥ ५ ॥

॥ २२४४ ॥

अल्प माझी मती । ह्मणोनि येतों काकुलती ॥ १ ॥ आतां दाखवा दाखवा । मज पाउलें केशवा ॥ २ ॥ धीर माझ्या मना । नाहीं नाहीं नारायणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे दया । मज करा अभागिया ॥ ४ ॥

॥ २२४५ ॥

कोणें साक्षीविण । केलें उद्धारा भजन ॥ १ ॥ ऐसें सांगा जी दातारा । माझी भक्ति परंपरा ॥ २ ॥ कोणें नाहीं केली आळी । ब्रह्मज्ञानाहुनि वेगळी ॥ ३ ॥ कोणाचें तों कोड । नाहीं पुरविला लाड ॥ ४ ॥ कोणाच्या उद्धारा । केला विलंब माघारा ॥ ५ ॥ तुका ह्मणे भिन्न । कांहो बोलें साक्षीविण ॥ ६ ॥

॥ २२४६ ॥

माझें जीवन तुझे पाय । कृपाळु तूं माझी माय ॥१॥ नेदीं दिसों किविलवाणें । पांडुरंगा तुझें तान्हें ॥२॥ जन्ममरण तुजसाटीं । आणीक नेणें दुजी गोष्टी॥३॥तुका ह्मणे तुजविण। कोण हरिल माझा सीण ॥४॥

॥ २२४७ ॥

तुजवांचून कोणा शरण । जाऊं आतां कर जोडून ॥१॥ कोण करील माझें साहे । चित्तीं विचारूनी पाहें ॥२॥ तूं तंव कृपेचा सागर । दीनबंधु जगदोद्धार ॥३॥ तुका ह्मणे निका । भवसिंधुतारक नौका॥४॥

॥ २२४८ ॥

काय आह्मीं केलें ऐसें । नुद्धरीजेसें सांगावें ॥ १ ॥ हरण कोल्हें वैकुं-

ठवासी । कोण त्यासी अधिकार ॥ २ ॥ गजा नाड्या सरोवरीं । नाहीं हरी विचारिलें ॥३॥ तुका ह्मणे गणिका नष्ट । माझे कष्ट त्याहूनि ॥ ४ ॥

॥ २२४९ ॥

काय न्यून आहे सांगा । पांडुरंगा तुह्मांपें ॥ १ ॥ आमुची तों न पुरे इच्छा । पिता ऐसा मस्तकीं ॥ २ ॥ कैसी तुह्मां होय सांडी । करुणा तोंडीं उच्चारें ॥३॥ आश्चर्यचि करी तुका । हे नायका वैकुंठींचिया ॥४॥

॥ २२५० ॥

न पवीजे तया ठाया । आलों काया क्लेशेसीं ॥ १ ॥ आतां माझें आणीं मना । नारायणा ओजेचें ॥ २ ॥ बहु रिणें पिडिलों फार । परिहार करावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे निर्बळशक्ति । काकुलती म्हुण येतों ॥ ४ ॥

॥ २२५१ ॥

कळों येतें वर्म । तरी न पावतों श्रम ॥ १ ॥ तुह्मां शिरीं होता भार । आह्मां कैचा संचार ॥ २ ॥ होतें अभयदान । तरी स्थिर होतें मन ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाहें । ऐसी वाट उभा आहें ॥ ४ ॥

॥ २२५२ ॥

तुह्मी तो सदैव । आधीरपणें माझी हांव ॥ १ ॥ जळो आशेचें तें जिणें । टोंकतसों दीनपणें ॥ २ ॥ येथूनि सोडवा । आतां अनुभवेंसी देवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जालें । एक मग हें निमालें ॥ ४ ॥

॥ २२५३ ॥

धांवा केला धांवा । श्रम होऊं नेदी जीवा ॥ १ ॥ वर्षे अमृताच्या धारा । घेई वोसंगा लेंकरा ॥ २ ॥ उशीर तो आतां । न करावा हेच चिंता ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्वरें । वेग करीं विश्वंभरें ॥ ४ ॥

॥ २२५४ ॥

घालिती पव्हया । वाटे अनाथाच्या दया ॥ १ ॥ तैसें कां हें नये करूं । पांडुरंगा आह्मां तारूं ॥२॥ रोगियासी काढा । देउनि वारिताती पीडा ॥३॥ बुडत्यासाठीं उडी । घालिताती काय जोडी ॥ ४ ॥ झाडित ती कांटे । पुढें मागिलांचे वाटें ॥५॥ तुका ह्मणे भार । घेती भागल्यांचा फार ॥६॥

॥ २२५५ ॥

ाकरूनि हित । सोयी लावावे हे नीत ॥ १ ॥ त्याग करूं नये खरें ।
तें विचारावें बरें ॥ २ ॥ तुमचिया तोंडें । धर्माधर्मेचि खंडे ॥ ३ ॥
जसाटीं देवा । कां हो लपविला हेवा ॥ ४ ॥ जाला सावधान । त्यासी घा-
ावें भोजन ॥ ५ ॥ तुका ह्मणे पिता । वरी बाळाच्या तो हिता ॥ ६ ॥

॥ २२५६ ॥

ां जी माझे जीवीं । आळस ठेविला गोसावी ॥ १ ॥ येवढा घात
ाणीक काय । चिंतनासी अंतराय ॥ २ ॥ देहूआत्म बंदी । केला
ात कुबुद्धी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मन । कळवळो वाटे क्षीण ॥ ४ ॥

॥ २२५७ ॥

आतां घेई माझें । भार सकळही ओझें ॥ १ ॥ काय करिसी होई
ाड । आलों पोटासीं दगड ॥ २ ॥ तूंचि डोळे वाती । होई दीपक
सांगाती ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं । विचाराया चाड नाहीं ॥ ४ ॥

॥ २२५८ ॥

वाहात्रतों पुरीं । आतां उचित तें करीं ॥ १ ॥ माझी शक्ति नारा-
यणा । कींव भाकावी करुणा ॥ २ ॥ आह्मां ओढी काळ । तुझें क्षीण
जालें बळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे गोडी । जीवा मातेचिया ओढी ॥ ४ ॥

॥ २२५९ ॥

तूं श्रीयेचा पति । माझी बहु हीन याती ॥ १ ॥ दोघे असों एके
ठायीं । माझा माथा तुझे पायीं ॥ २ ॥ माझ्या दीनपणा पार । नाहीं
बहु तूं उदार ॥ ३ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा । मी ओहोळ तूं गंगा ॥ ४ ॥

॥ २२६० ॥

नाहीं तुह्मीं केला । अंगीकार तो विठ्ठला ॥ १ ॥ सोंगें न पवीजे
थडी । माजी फुटकी सांगडी ॥ २ ॥ प्रेम नाहीं अंगीं । भले ह्मण-
विलें जगीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । मज वांयां कां चाळवा ॥ ४ ॥

॥ २२६१ ॥

मंत मानितील मज । तेणें वाटतसे लाज ॥ १ ॥ तुह्मी कृपा केली

नाहीं । चित्त माझें मज ग्वाही ॥ २ ॥ गोविलों थोरिवा । दुःख वाटतसे जीवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे माया । अवरा हे पंढरिराया ॥ ४ ॥

॥ २२६२ ॥

संत पंढरीस जाती । निरोप धाडीं तया हातीं ॥ १ ॥ माझा न पडावा विसर । तुका विनवितो किंकर ॥ २ ॥ केरसुणी महाद्वारीं । ते मी असें निरंतरीं ॥ ३ ॥ तुमचे पायीं पायतन । मोचे माझें तन मन ॥ ४ ॥ तांबुलाची पिकधरणी । ते मी असें मुख पसरूनि ॥५॥ तुमची विष्ठा पंढरिराया । ते सारसुखी माझी काया ॥ ६ ॥ लागती पादुका । ते मी तळील मृत्तिका ॥ ७ ॥ तुका ह्मणे पंढरिनाथा । दुजें न धरावें सर्वथा ॥ ८ ॥

॥ २२६३ ॥

केला तैसा अंगीकार । माझा भार चालवीं ॥१॥ होऊं अंतराय बुद्धी । कृपानिधी नेदावी॥२॥आह्मी तरी जड जीव । कैचा भाव पुरता॥३॥अनन्य भावें घ्यावी सेवा । आह्मा देवा घडेसी ॥ ४ ॥ तुह्मीं आह्मी शरणागतें । कृपावंतें रक्षीजे॥५॥तुका ह्मणे भाकूं कींव । असों जीव जड आह्मी॥६॥

॥ २२६४ ॥

स्मरणाचे वेळे । व्हावें सावध न कळे ॥ १ ॥ पडिलों विषयांचे ओढी । कोणी न दिसेसें काढी ॥ २ ॥ भांडवल माझें । वेच जालें भूमि ओझें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळे । तूंचि धांवें ऐसे वेळे ॥ ४ ॥

॥ २२६५ ॥

नेणें करूं सेवा । पांडुरंगा कृपाळुवा ॥ १ ॥ धांवें वुडतों मी काढीं । सत्ता आपुलिया ओढीं ॥ २ ॥ क्रियाकर्महीन । जालों इंद्रियां अधीन ॥ ३ ॥ तुका विनंती करी । वेळोवेळां पाय धरी ॥ ४ ॥

॥ २२६६ ॥

पापाची मी राशी । सेवा चोर पायांपाशीं ॥ १ ॥ करा दंड नारायणा । माझ्या मनाचो खंडणा ॥ २ ॥ जना हातीं सेवा । घेतों लडपणें देवा ॥ ३ ॥ तुझा ना संसार । तुका दोहींकडे चोर ॥४॥

॥ २२८७ ॥
ीं धरूं जावें । तेणें परतेंचि व्हावें ॥ १ ॥ ऐसा कां हो आला
टा । हीन भाग्याचा करंटा ॥ २ ॥ देव ना संसार । दोहीं ठायीं
हीं थार ॥ ३ ॥ तुका ह्मणे पीक । भूमि नदे न मिळे भीक ॥४॥
॥ २२८८ ॥
ालों आतां दास । माझे तोडोनियां पाश ॥ १ ॥ ठाव द्यावा पायां-
शीं । मी तों पातकांची राशी ॥ २ ॥ सकळही गोवा । माझा
ावूनि देवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे भय । करा जवळी तें नये ॥ ४ ॥
॥ २२८९ ॥
हुक्षेदक्षिण । आलों सोसुनियां वन ॥ १ ॥ विठोबा विसांवया वि-
ांवया । पडों देईंगा पायां ॥ २ ॥ बहुतां काकुलती । आलों सोसिली
ाजिती ॥ ३ ॥ केली तुजसाटीं । तुका ह्मणे येवढी आटी ॥ ४ ॥
॥ २२९० ॥
ातों भाव नाहीं अंगीं । भूषण करावया जगीं ॥ १ ॥ परि तूं पतितपा-
न । करीं साच हें वचन ॥ २ ॥ मुखें ह्मणवितों दास । चित्तीं माया
ोभ आस ॥ ३ ॥ तुका ह्मणे नावीं वेश । तैसा अंतरीं नाहीं लेश ॥४॥
॥ २२९१ ॥
ारा नारायणा । माझ्या दुःखाची खंडणा ॥ १ ॥ वृत्ति राखा पायां-
ाशीं । वस्ती धरूनि मानसीं ॥ २ ॥ पाळोनियां लळा । आतां पाव-
ावें फळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे दीनें । त्यांचा हरतिया सीण ॥ ४ ॥
॥ २२९२ ॥
क्रियामतिहीन । एक मी गा तुझें दीन ॥ १ ॥ देवा करावा सांभाळ ।
ारीं माझी तळमळ ॥ २ ॥ नको माझे ठायीं । गुणदोष घालूं
कांहीं ॥ ३ ॥ अपराधाच्या कोटी । तुका ह्मणे घालीं पोटीं ॥ ४ ॥
॥ २२९३ ॥
तुझे थोर थोर । भक्त करिती विचार ॥ १ ॥ जपतपादि साधनें ।
मज चिंतवेना मनें ॥ २ ॥ करुणावचनें । ऱ्यां भाकावीं तुह्मां
दीनें ॥ ३ ॥ तुका ह्मणे घेई । माझें थोडें फार ठायीं ॥ ४ ॥

॥ २२७४ ॥
न संडवे अन्न । मज न सेववे वन ॥ १ ॥ ह्मणउनी नारायणा । कींव भाकितों करुणा ॥ २ ॥ नाहीं अधिकार । कांहीं घोकाया अ-क्षर ॥ ३ ॥ तुका ह्मणे थोडें । अयुष्य अवघेंचि कोडें ॥ ४ ॥
॥ २२७५ ॥
आयुष्य गेलें वांयांविण । थोर जाली नागवण ॥ १ ॥ आतां धांवें धांवें तरी । काय पहातोसि हरी ॥ २ ॥ माझे तुझे याचि गति । दिवस गेले तोंडीं माती ॥ ३ ॥ मन वाव घेऊं नेदी । बुडवूं पाहे भवनदी ॥४॥ पडिला विषयाचा घाला । तेणें नागविलें मला ॥५॥ शरण आलों आतां धांवें । तुका ह्मणे मज पावें ॥ ६ ॥
॥ २२७६ ॥
जाली तडातोडी । अवघीं पडिलों उघडीं ॥ १ ॥ नव्हों कोणाचीच कांहीं । तुझे भरलिया वाहीं ॥ २ ॥ पारुषला संवसार । मोडिली बैस-ण्याची थार ॥३॥ आतां ह्मणे तुका । देवा अंतरें राखों नका ॥ ४ ॥
॥ २२७७ ॥
सांगों देवा नेणा काय । बोलाची त्या आवडी ॥ १ ॥ वांयां मज चुकुर करा । विश्वंभरा विनोदें ॥ २ ॥ आवडीच्या करा ऐसें । अं-तर्वासें जाणतसां ॥३॥ तुका ह्मणे समाधानें । होइन मनें मोकळा ॥४॥
॥ २२७८ ॥
भीमातिरींचा नाटक । यानें लाबियेलें चेटक ॥ १ ॥ मन बुद्धि जाली ठक । नेणे संसाराची टुक ॥ २ ॥ कैसी प्रासंगीक वाणी । प्रत्यादर कडसणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोठा ठक । जेथें तेथें उभा ठाके ॥ ४ ॥
॥ २२७९ ॥
देह प्रारब्धा शिरीं । असोन करी उद्वेग ॥ १ ॥ धांव घालीं नारा-यणा । माझ्या मना जागवीं ॥२॥ ऐसीं चुकोनियां वर्मे । पीडा भ्रमें पावलों ॥ ३ ॥ तुका ह्मणे कैंचा भोग । नव्हे रोग अंगींचा ॥ ४ ॥
॥ २२८० ॥
आतां न ह्मणें मी माझें । नेघें भार कांहीं ओझें ॥ १ ॥ तूंचि तारिता

ारिता । कळों आलासी निरुता ॥२॥ अवघा तूंचि जनार्दन । संत
ोलती वचन ॥३॥ तुका ह्मणे पांडुरंगा । तुझ्या रिगालों वोसंगा ॥४॥

॥ २२८१ ॥

वेठ्ठल माझी माय । आह्मां सुखा उणें काय ॥ १ ॥ घेतों अमृताची
ानी । प्रेम वोसंडलें स्तनीं ॥ २ ॥ क्रीडों वैष्णवांच्या मेळीं । करूं
आनंदाच्या जळीं ॥३॥ तुका ह्मणे कृपावंत । ठेवीं आह्मांपाशीं चित्त ॥४॥

॥ २२८२ ॥

हेंचि माझें धन । तुमचे वंदात्रे चरण ॥१॥ येणें भाग्यें असो जीत ।
एवढें समर्पूनी चित्त ॥ २ ॥ सांभाळिलें देवा । मज अनाथा जी
जीवा ॥ ३ ॥ जोडूनियां कर । तुका विनवितो किंकर ॥ ४ ॥

॥ २२८३ ॥

स्वामिसेवा गोड । माते बाळकाचें कोड ॥१॥ जें जें मागावें भातुकें ।
तें तें पुरवी कौतुकें ॥ २ ॥ खेळविलें कोडें । हरुषें बोले कीं
बोवडें ॥ ३ ॥ तुका ह्मणे लाड । तेथें पुरे माझें कोड ॥ ४ ॥

॥ २२८४ ॥

कोड आवडीचें । पुरवीना बाळकाचें ॥१॥ तेव्हां कैसी ते माउली ।
जाणा काशासाटीं व्याली ॥ २ ॥ वत्साचिये आसे । धेनु धांवेना
वोरसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे घरीं । बाळ टाकिलें बाहेरीं ॥ ४ ॥

॥ २२८५ ॥

माये लेंकरांत भिन्न । नाहीं उत्तरांचा सीण ॥ १ ॥ धाडीं धाडीं वो
भातुकें । रंजविल्याचें कौतुकें ॥ २ ॥ करूनि नवल । याचें बोलिलों
ते बोल ॥ ३ ॥ तुका ह्मणे माते । पांडुरंगे कृपावंते ॥ ४ ॥

॥ २२८६ ॥

प्रीतीचा तो कळवळा । जिव्हाळाचि वेगळा ॥ १ ॥ बहु नेदी रडों
माता । दुश्चित होतां धीर नव्हे ॥२॥ वरी वरी तोंडापुरतें । मोहोरी
तें कळतसे ॥३॥ जाणोनियां नेणता तुका । नव्हे लोकांसारिखा ॥४॥

॥ २२८७ ॥

मागितल्यास आस करा। उरी धरा कांहींबाही ॥१॥ ह्मणऊनि सारिली आस। होती यास मूळ तें ॥२॥ माझ्या मोहें तुज पान्हा। लोटे स्तना वोरस ॥३॥ तुका ह्मणे आळवणें। माझ्या देणें उत्तर ॥४॥

॥ २२८८ ॥

चालवणें काय। ऐसें अगे माझे माय ॥१॥ धांव पाव लवलाहें। कंठीं प्राण वाट पाहे ॥२॥ पसरूनि कर। तुज चालिलों समोर ॥३॥ देसील विसांवा। तुका ह्मणे ऐशा हांवा ॥४॥

॥ २२८९ ॥

आपुल्या महिमानें। धातु परिसें केलें सोनें ॥१॥ तैसें न मनीं माझें आतां। गुणदोष पंढरिनाथा ॥२॥ गांवाखालील वोहोळ। गंगा न मनी अमंगळ ॥३॥ तुका ह्मणे माती। केली कस्तुरीनें सरती ॥४॥

॥ २२९० ॥

उपजलें मनीं। हे तों स्वामीची करणी ॥१॥ होइल प्रसादाचें दान। तरि हें कवतुक पाहेन ॥२॥ येइल अभय जरि। तरि हे आज्ञा वंदिन शिरीं ॥३॥ भक्तिप्रयोजना। प्रयोजावें वंदीजना ॥४॥ यश स्वामीविये शिरीं। दास्य करावें किंकरीं ॥५॥ तुका ह्मणे आळीकरा। त्यासी योजावें उत्तरा ॥६॥

॥ २२९१ ॥

गातों नाचतों आनंदें। टाळघागरियाच्या छंदें ॥१॥ तुझी तुज पुढें देवा। नेणों भाव कैसी सेवा ॥२॥ नेणों ताळ घात मात। भलते सवां पाय हात ॥३॥ लाज नाहीं शंका। प्रेम घाला ह्मणे तुका ॥४॥

॥ २२९२ ॥

बुद्धिहीना उपदेश। तें तें विष अमृतीं ॥१॥ हुंगों नये गोऱ्हवाडी। तेथें जोडी विटाळ ॥२॥ अळसियाचें अंतर कुडें। जैसें मढें निष्काम ॥३॥ तुका ह्मणे ऐशा हातीं। मज श्रीपती वांचवा ॥४॥

॥ २२९३ ॥

आपुल्या आह्मी पुसिलें नाहीं। तुज कांहीं कारणें ॥१॥ मागें मागें

धांवत आलों । कांहीं बोलों यासाठीं ॥२॥ बहुत दिस होतें मनीं । घ्यावी धणी एकांतीं ॥३॥ तुका ह्मणे उभा राहें । कान्हो पाहें मजकडे ॥४॥

॥ २२९४ ॥

अवघिया चाडा कुंटित करूनि । लावीं आपुलीच गोडी ॥ आशा मनसा तृष्णा कल्पना । करूनियां देशधडी ॥ मीतूंपणापासव गुंतलों । मिथ्या संकल्प तो माझा तोडीं ॥ तुझिये चरणीं माझे दोन्ही पक्ष । अवघी करुनि दाखवीं पिंडी रे रे ॥ १ ॥ माझें साच काय केलें मृगाजळ । वर्णा याती कुळ अभिमान ॥ कुमारी भातुकें खेळती कवतुकें । काय त्यांचें साचपण ॥ २ ॥ वेगळाल्या भावें चित्ता तडातोडी । केलों देशधडी मायाजाळें ॥ गोत वित्त माय बाप बहिणी सुत । बंधुवर्ग माझीं बाळें ॥ एका एक न धरी संबंध पुरलिया । पातलिया जवळी काळें ॥ जाणोनियां त्याग सर्वस्वें केला । सांभाळीं आपुलें जाळें ॥ ३ ॥ एकां जवळी धरी आणिकां अंतरीं । तीं काय सोयरीं नव्हतीं माझीं ॥ एकांचें पाळण एकांसी भांडण । चाड कवणिये काजीं ॥ अधिक असे उणें कवण कवण्या गुणें । हे भाव न कळेचि तुझी ॥ ह्मणोनि चिंतनीं राहिलों श्रीपती । तुका ह्मणे भाक माझी ॥४॥

॥ २२९५ ॥

माझिया संचिता । दृढ देखोनि बळिवंता । पळसी पंढरिनाथा । भेणें आतां तयाच्या ॥ १ ॥ तरि मज कळलासी । नव्हता भेटी जाणीवेसी । एक संपादिसी । मान करिसी लोकांत ॥ २ ॥ तरि हें प्रारब्ध जी गाढें । कांहीं न चले तयापुढें । काय तुज म्यां कोडें । रे सांकडें घालावें ॥ ३ ॥ भोगाधीपति क्रियमाण । तें तुज नागवे अझून । तरि कां वांयांविण । तुज म्यां सीण करावा ॥ ४ ॥ तुज नव्हता माझें कांहीं । परि मी न संडीं भक्तिसोई । हो कां भलत्या ठायीं । कुळीं जन्म भलतैसा ॥५॥ तूं भितोसि माझिया दोषा । कांहीं मागणें ते आशा । तुका ह्मणे ऐसा । कांहीं न धरीं संकोच ॥ ६ ॥

॥ २२९६ ॥

कांहीं बोलिलों बोबडें । मायबाप तुह्मांपुढें । सलगी लाडें कोडें । मज क्षमा करावी ॥ १ ॥ काय जाणावा महिमा । तुमचा म्यां पुरुषोत्तमा । आवडीनें सीमा । सांडविली मज हातीं ॥ २ ॥ घडे अवज्ञा सख्यत्वें । बाळें बापासी न भ्यावें । काय म्यां सांगावें । आहे ठावें तुह्मासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । प्रेम लोभ न संडावा । पाळिला पाळावा । लळा पुढती आगळा ॥ ४ ॥

॥ २२९७ ॥

ह्मणऊनि काकुळती । येतों पुढतों पुढती । तुह्मां असें हातीं । कमळापती भांडार ॥ १ ॥ फेडूं आलेती दरिद्र । तरी नलगे उशीर । पुरे अभयंकर । ठाया ठाव रंकाशी ॥ २ ॥ कोठें न घाली धांव । याजसाटीं त्यजिली हांव । घेऊं नेदी वाव । मना केला विरोध ॥ ३ ॥ कारणांच्या गुणें । वेळ काळ तोही नेणें । तुमच्या कीर्तनें । तुका तुह्मां जागवी ॥ ४ ॥

॥ २२९८ ॥

जों जों घ्यावा सोस । माझें वारीं गर्भवास । लटिक्याचा दोष । अधिक जडे अंगेसीं ॥ १ ॥ आतां आहे तैसें असो । अनुताप अंगीं वसो । येवढेंचि नसो । माझें आणि परावें ॥ २ ॥ जागा जालेपणें । काय नासावें स्वप्न । शब्दाचिया शिणें । कष्ट मिथ्या मानावे ॥ ३ ॥ छाये माकड विटे । धांवे कूपीं काय भेटे । तुका ह्मणे फुटे । डोई गुढघे कोंपर ॥ ४ ॥

॥ २२९९ ॥

माझें चित्त तुझे पायीं । राहे ऐसें करीं कांहीं । धरोनियां बाहीं । भव हा तारीं दातारा ॥ १ ॥ चतुरा तूं शिरोमणि । गुणलावण्याची खाणी । मुगुट सकळां मणि । धन्य तूंचि विठोबा ॥ २ ॥ करीं या तिमिराचा नाश । दीप होउनि प्रकाश । तोडीं आशापाश । करीं वास हृदयीं ॥ ३ ॥ पाहें गुंतलों नेणतां । तुज असो माझी चिंता । तुका ठेवी माथा । पायीं आतां राखावें ॥ ४ ॥

॥ २३०० ॥

काय करूं आतां या मना । न संडी विषयवासना । प्रार्थितांही राहेना । आदरें पतना नेऊं पाहे ॥१॥ आतां धांवें धांवें गा श्रीहरी । गेलों वांयां नाहीं तरी । न दिसे कोणी आवरी । आणीक दुजा तयासी ॥२॥ न राहे एके ठायीं एकी घडी । चित्त तडतडा तोडी । भरले विषयभोवडीं । घालूं पाहे उडी भवडोहीं ॥ ३ ॥ आशा तृष्णा कल्पना पापिणी । घात मांडला माझा यांणीं । तुका ह्मणे चक्रपाणी । काय अजोनि पाहातोसी ॥ ४ ॥

॥ २३०१ ॥

याती हीन मति हीन कर्म हीन माझें । सर्व लज्जा सांडोनियां शरण आलों तुज ॥१॥ येईं गा तूं मायबापा पंढरीच्या राया । तुज-विण सीण वाटे क्षीण जाली काया ॥ २ ॥ दिनानाथ दीनबंधु नाम तुज साजे । पतितपावन नाम ऐसी श्रीदावळी गाजे ॥ ३ ॥ विटेवरि नीट उभा कटावरी कर । तुका ह्मणे हेंचि आह्मां ध्यान निरंतर ॥४॥

॥ २३०२ ॥

अधिक कोंडितां चरफडी । भलतीकडे घाली उडी ॥ १ ॥ काय करूं या मना आतां । कां विसरतें पंढरिनाथा ॥ २ ॥ करी संसाराची चिंता । वेळोवेळां मागुती ॥ ३ ॥ भजन नावडे श्रवण । धांवें विषय अवलोकून ॥४॥ बहुत चंचळ चपळ । जातां येतां न लगे वेळ ॥५॥ किती राखों दोनी काळ । निजलिया जागे वेळ ॥ ६ ॥ मज राखें आतां । तुका ह्मणे पंढरिनाथा ॥७॥

॥ २३०३ ॥

चित्त गुंतलें प्रपंचें । जालें वेडें ममतेचें ॥१॥ आतां सोडवीं पांडुरंगा । आलें निवारीं तें अंगा ॥ २ ॥ गुंतली चावठी । नामीं रूपीं जाली तुटी ॥३॥ तुका ह्मणे चाली । पुढें वाट खोळंबली ॥४॥

॥ २३०४ ॥

काय करूं जी दातारा । कांहीं न पुरे संसारा ॥ १ ॥ जाली माक॰

डाची परि । येतों तळा जातों वरी ॥ २ ॥ घाली भलते ठायीं हात। होती शिव्या बैसे लात ॥ ३ ॥ आदि अंतीं तुका । सांगे न कळे जाला चुका ॥ ४ ॥

॥ २३०५ ॥

प्रपंच वोसगे । चित्त तुझे पायीं मुरे ॥१॥ ऐसें करिं गा पांडुरंगा। शुद्ध रंगवावें रंगा ॥ २ ॥ पुरे पुरे आतां । नको दुजियाची सत्ता ॥ ३ ॥ लटिकें तें फेडा । तुका ह्मणे जाय पीडा ॥४॥

॥ २३०६ ॥

आधार तो व्हावा । ऐसी आस करीं देवा ॥ १ ॥ तुह्मांपाशीं काय उणें । काय देचे समाधानें ॥२॥ सेवेच्या अभिलाषें । मन बहु जालें पिसें ॥३॥ अरे भक्तपराधीना । तुका ह्मणे नारायणा ॥४॥

॥ २३०७ ॥

जन्मा आलियाचा लाभ । पद्मनाभदरुषणें ॥ १ ॥ पाठीलागा येतो काळ । तूं कृपाळ माउली ॥ २ ॥ कोण्या उपायें हें घडे । भव आंगडें सुटकेचें ॥ ३ ॥ बहु उसंतीत आलों । तया भ्यालों स्थळाशीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तूं जननी । ये निर्वाणी विठ्ठले ॥ ५ ॥



# तुकारामाच्या अभंगांची गाथा.

## भाग दुसरा.

### उपदेशपर अभंग.

॥ २३०८ ॥

जोडोनियां धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेच करी ॥ १ ॥
उत्तमचि गती तो एक पावेल । उत्तम भोगील जीव खाणी ॥ २ ॥
परउपकारी नेणें परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ॥ ३ ॥
भूतदया गाईपशूचें पालन । तान्हेल्या जीवन वनामाजी ॥ ४ ॥
शांतिरूपें नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्व वडिलांचें ॥ ५ ॥
तुका ह्मणे हेंचि आश्रमाचें फळ । परमपद बळ वैराग्याचें ॥ ६ ॥

॥ २३०९ ॥

पराविया नारी माउलीसमान । मानिलिया धन काय वेचे ॥ १ ॥
न करितां परनिंदा परद्रव्यअभिलाष । काय तुमचें यास वेचे सांगा ॥२॥
बैसलिये ठायीं ह्मणतां रामराम । काय होय श्रम ऐसें सांगा ॥ ३ ॥
संतांचे वचनीं मानितां विश्वास । काय तुमचें यास वेचे सांगा ॥ ४ ॥
खरें बोलतां कोण लागती सायास । काय वेचे यास तुमचें सांगा ॥ ५ ॥
तुका ह्मणे देव जोडे याचसाटीं । आणीक ते आटी न लगे कांहीं ॥ ६ ॥

॥ २३१० ॥

आळिया संसारा उठा वेग करा । शरण जा उदारा पांडुरंगा ॥ १ ॥
देह हें देवाचें धन कुबेराचें । तेथें मनुष्याचें काय आहे ॥ २ ॥
देता देवविता नेता नेवविता । येथें याची सत्ता काय आहे ॥ ३ ॥

निमित्याचा धनी केला असे प्राणी । माझें माझें ह्मणोनि व्यर्थ गेला ॥४॥
तुका ह्मणे कां रे नाशवंतासाटीं । देवासवें आटी पाडितोसी ॥ ५ ॥

॥ २३११ ॥

सांगतों तरि तुह्मी भजा रे विठ्ठला । नाहीं तरि गेला जन्म वांयां ॥१॥
करितां भरोवरी दुरावसी दुरी । भवाचिये पुरीं वाहावसी ॥ २ ॥
कांहीं नलगे एक भावचि कारण । तुका ह्मणे आण विठ्ठलाची ॥ ३ ॥

॥ २३१२ ॥

अरे गिळिलें हो संसारें । कांहीं तरि राखा खरें । दिला करुणाकरें । मनुष्यदेह सत्संग ॥ १ ॥ येथें न घलीं न घलीं आड । संचितसा शब्द नाड । उठाउठीं गोड । बीजें बीज वाढवा ॥२॥ केलें तें क्रियमाण । जालें तें संचित ह्मण । प्रारब्ध जाण । उरवरित उरलें तें ॥३॥ चित्त खोटें चालीवरि । रोग भोगाचे अंतरीं । रसनें अनावरी । तुका ह्मणे ढुंग वाहे॥४॥

॥ २३१३ ॥

मोलाचें आयुष्य वेचुनियां जाय । पूर्वपुण्यें होय लाभ याचा ॥ १ ॥
अनंत जन्मींचें शेवट पाहातां । नर देह हातां आला तुझ्या ॥ २ ॥
कराल ते जोडी येईल कार्यासी । ध्यावें विठ्ठलासी सुखालागीं ॥ ३ ॥
सांचलिया धन होईल ठेवणें । तैसा नारायण जोडी करा ॥ ४ ॥
करा हरिभक्ती परलोकीं चे कामा । सोडवील यमापासोनियां ॥ ५ ॥
तुका ह्मणे करा आयुष्याचें मोल । नका वेचूं बोल लाभेंविण ॥ ६ ॥

॥ २३१४ ॥

लाभ जाला बहुतां दिसीं । लाहो करा पुढें नासी । मनुष्यदेहा ऐसी । उत्तम जोडी जोडिली ॥ १ ॥ घेई हरिनाम सादरें । भरा सुखाचीं भांडारें । जालिया व्यापारें । लाहो हेवा जोडीचा ॥ २ ॥ घेउनि माप हातीं । काळ मोवी दिवस रातीं । चोर लाग घेती । पुढें तैसें

पळावें ॥ ३ ॥ हित सावकासें । ह्मणे करीन तें पिसें । हातीं काय ऐसें । तुका ह्मणे नेणसी ॥ ४ ॥

॥ २३१५ ॥

कैसें असोनि ठाउकें नेणां । दुःख पावाल पुढिले पेणा ॥ १ ॥ आतां जागें रे भाई जागें रे । चोर निजल्या नाडूनि भांगे रे ॥ २ ॥ आतां नका रे भाई नका रे । आहे गांठीं तें लुटवूं लोकां रे ॥ ३ ॥ तुका ह्मणे एकांच्या घायें । कां रे जाणोनि न धरा भये ॥ ४ ॥

॥ २३१६ ॥

बहुत सोसिलें मागें न कळतां । पुढतीं काय आतां अंध व्हावें ॥ १ ॥ एकाचिये अंगीं हें ठेवावें लावून । नये भिन्न भिन्ना चांचपडों ॥ २ ॥ कोण होईल तो ब्रह्मांडचाळक । आपणचि हाक देइल हाकें ॥ ३ ॥ तुका ह्मणे दिलीं चेतवूनि सुनीं । कौतुका वांचूनि नाहीं स्थळ ॥ ४ ॥

॥ २३१७ ॥

आतां उघडी डोळे । जरी अद्यापि न कळे । तरी मातेचिये खोळे । दगड आला पोटासी ॥ १ ॥ मनुष्यदेहा ऐसा निध । साधिली ते साधे सिद्ध । करूनि प्रबोध । संत पार उतरले ॥ २ ॥ नाव चंद्रभागे तीरीं । उभी पुंडलीकाचे द्वारीं । कट धरूनियां करीं । उभाउभी पालवी ॥ ३ ॥ तुका ह्मणे फुकासाटीं । पायीं घातली या मिठी । होतो उटाउठी । लवकरीच उतार ॥ ४ ॥

॥ २३१८ ॥

येऊनि नरदेहा झांकितील डोळे । बळेंचि अंधळे होती लोक ॥ १ ॥ उजडासरसी न चलती वाट । पुढील बोभाट जाणोनियां ॥ २ ॥ बहु फेरे आले सोसोनि वोळसा । पुढें नाहीं ऐसा लाभ मग ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाऊं साद्यंतीत वाट । भेट तरी भेटो कोणी तरी ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ जागा रे जागा रे. २ भागा.

॥ २३१९ ॥

विषयाचें सुख एथें वाटे गोड । पुढें अवघड यमदंड ॥ १ ॥
मारिती तोडिती झोडिती निष्ठुर । यमाचे किंकर बहुसाल ॥ २ ॥
असिपत्रीं तरुवरखैराचे इंगळ । निघतील ज्वाळ तेलपाकीं ॥ ३ ॥
तप्तभूमीवरि लोळविती[1] पाहीं । अग्निस्तंभ बाहीं कवळविती ॥ ४ ॥
ह्मणऊनिया तुका येतो काकुलती । पुरे यातायाती गर्भवास ॥ ५ ॥

॥ २३२० ॥

देह मृत्याचें भातुकें । कळों आलें कवतुकें ॥१॥ काय मानियेलें सार । हेंचि वाटतें आश्चर्य ॥ २ ॥ नानाभोगांचीं संचितें । करूनि ठेविलें आइतें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कोडीं । उगवूं न सकती बापुडीं ॥ ४ ॥

॥ २३२१ ॥

कां रे तुह्मी निर्मळ हरिगुण गाना । नाचत आनंदरूप वैकुंठासी जाना ॥ १ ॥ काय गणिकेच्या याती अधिकार मोठा । दोषी अजामेळ ऐसी नेलीं वैकुंठा ॥ २ ॥ ऐसे नेणों मागें किती अनंत अपार । पंच महादोषी पातकां नाहीं पार ॥ ३ ॥ पुत्राचिया लोभें नष्ट ह्मणे नारायण । कोण कर्तव्य तुका ह्मणे त्याचें पुण्य ॥ ४ ॥

॥ २३२२ ॥

कां रे न भजसी हरी । तुज कोण अंगीकारी ॥ १ ॥ होइल यमपुरी । यमदंड यातना ॥ २ ॥ कोण जाली लगबग । काय करिसि तेथें मग ॥ ३ ॥ कां रे भरला ताठा । करिती वोज नेतां वाटा ॥ ४ ॥ तोंडा पडिली खिळणी । जिव्हा पिटिती वोढूनि ॥ ५ ॥ कां रे पडिली जनलाज । कोण सोडवील तुज ॥ ६ ॥ लाज धरीं ह्मणे तुका । नको वांयां जाऊं फुका ॥ ७ ॥

---

पाठभेदः—१ चालविती पायीं.

॥ २३२३ ॥

कां रे नाठविसी कृपाळु देवासी । पोसितो जनासी एकला तो ॥१॥
बाळा दुधा कोण करितें उत्पत्ती । वाढवी श्रीपति सवें दोन्ही ॥ २ ॥
फुटती तरुवर उष्णकाळमासीं । जीवन तयांसी कोण घाली ॥ ३ ॥
तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहे त्या अनंता आठवूनि ॥ ४ ॥
तुका ह्मणे ज्याचें नाम विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यान करीं ॥ ५ ॥

॥ २३२४ ॥

देवाचें भजन कां रे न करीसी । अखंड हव्यासी पीडतोसी ॥ १ ॥
देवासी शरण कां रे न वजवे तैसा । बक मीना जैसा मनुष्यालागीं ॥२॥
देवाचा विश्वास कां रे नाहीं तैसा । पुत्रस्नेहें जैसा गुंतलासी ॥ ३ ॥
कां रे नाहीं तैसी देवाची हे गोडी । नागवूनि सोडी पत्नी जैसी ॥४॥
कां रे नाहीं तैसे देवाचे उपकार । माया मिथ्या भार पितृपूजना ॥५॥
कां रे भय वाहासी लोकांचा धाक । विसरोनि एक नारायण ॥ ६ ॥
तुका ह्मणे कां रे घातलेंसें वांयां । अवघें आयुष्य जाया भक्तिविण ॥७॥

॥ २३२५ ॥

रामनाम हाचि मांडिला दुकान । आहे वानोवाण घ्या रे कोणी ॥१॥
नका कोणी करूं घेतां रे आळस । वांटतों तुह्मांस फुकाचें हें ॥ २ ॥
संचितासारिखें पडे त्याच्या हाता । फारसें मागतां तरी न ये ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी सांटविलें सार । उरलिया थार विचारितां ॥ ४ ॥

॥ २३२६ ॥

बहुतां जन्मां अंतीं । जोडी लागली हे हातीं ॥ १ ॥ मनुष्यदेहा ऐसा ठाव । धरीं पांडुरंगीं भाव ॥ २ ॥ बहु केला फेरा । येथें सांपडला थारा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाणे । ऐसे भले ते शाहाणे ॥ ४ ॥

॥ २३२७ ॥

भवसागर तरतां । कां रे करीतसां चिंता । पैल उभा दाता । कटीं

कर ठेवुनियां ॥ १ ॥ त्याचे पायीं घाला मिठी । मोल नेघे जगजेठी। भावा एकासाटीं । खांदां वाहे आपुल्या ॥ २ ॥ सुखें करावा संसार । परि न संडावे दोन्ही वार । दया क्षमा घर । चोजवीत येतील ॥ ३ ॥ भुक्तिमुक्तीची चिंता । नाहीं दैन्य दरिद्रता । तुका ह्मणे दाता । पांडुरंग वोळगिल्या ॥ ४ ॥

॥ २३२८ ॥

कोणें तुझा सांग केला अंगीकार । निश्चिंति त्वां थोर मानियेली ॥१॥
कोणें ऐसा तुज उपदेश केला । नको या विठ्ठला शरण जाऊं ॥ २ ॥
तेव्हां तुज कोण घालील पाठीसी । वासील भूमीसी वदन यम ॥३॥
कारे नागवसी आयुष्य खातो काळ । दिसेंदिस बळ क्षीण होतें ॥४॥
तुका ह्मणे यासि सांगा कोणी तरी । विसरला हरी मायबाप ॥ ५ ॥

॥ २३२९ ॥

हरीच्या जागरणा । जातां कां रे नये मना ॥ १ ॥ कोठें पाहासील तुटी । आयुष्य वेंचे फुकासाटीं ॥ २ ॥ ज्यांची तुज गुंती । ते तों मोकलिती अंतीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरा । लाभ काय तो विचारा ॥ ४ ॥

॥ २३३० ॥

दुःखाचे डोंगर लागती सोसावे । ऐसें तंव ठावें सकळांसीं ॥ १ ॥
कांहीं न करिती विचार हिताचा । न करिती वाचा नामघोष ॥ २ ॥
भोग कळों येतो मागिल ते जन्म । उत्तम मध्यम कनिष्ठ ते ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें झांकितील डोळे । भोग देतेवेळे येइल कळों ॥ ४ ॥

॥ २३३१ ॥

बुद्धीचा पालट धरा रे कांहीं । मागुता नाहीं मनुष्यदेह ॥ १ ॥
आपुल्या हिताचे न होती सायास । गृहदारा आस धनवित्त ॥ २ ॥
अवचितें निधान लागलें हें हातीं । भोगावी विपत्ति गर्भवास ॥ ३ ॥

यावें जावें पुढें ऐसेंचि कारण । भोगावें पतन नरकवास ॥ ४ ॥
तुका ह्मणे धरीं आठव या देहीं । नाहीं तरि कांहीं बरें नव्हे ॥ ५ ॥

॥ २३३२ ॥

ह्मणतां[1] हरिदास कां रे नाहीं लाज । दीनासी महाराज ह्मणसी हीना ॥१॥
काय ऐसें पोट न भरे ते गेलें । हालविसी कुले सभेमाजी ॥ २ ॥
तुका ह्मणे पोटें केली विटंबना । दीन जाला जना कींव भाकी ॥ ३ ॥

॥ २३३३ ॥

ह्मणसी नाहीं रे संचित । न करीं न करीं ऐसी मात ॥ १ ॥ लाहो घेईं हरिनामाचा । जन्म जाऊं नेदीं साचा ॥ २ ॥ गळा पडेल यमफांसीं । मग कैंचा हरि ह्मणसी ॥ ३ ॥ पुरलासाटीं देहाडा । ऐसें न ह्मणें न ह्मणें मूढा ॥ ४ ॥ नरदेह दुबळा । ऐसें न ह्मणें रे चांडाळा ॥ ५ ॥ तुका ह्मणे सांगों किती । सेकीं तोंडीं पडेल माती ॥ ६ ॥

॥ २३३४ ॥

समश्रुळित असतां वाचा । घोष न केरीं[2] कां नामाचा ॥ १ ॥ कां रे वैष्णव नव्हेसी । कवण्या दंभें नागवलासी ॥ २ ॥ हरि हरि ह्मणतां लाजसी । गर्वें फुगोनि चालसी ॥३॥ तारुण्यें उताणा । पुंसेविण बांडा सुना ॥ ४ ॥ जालेंसि महिमेचें वेडें । नाचों लाजसी दिंडीपुढें ॥ ५ ॥ अळंकारांच्यानि बळें । वंचलासी तुळसीमाळें ॥ ६ ॥ कैसा सकुमार जालासी । ह्मणसी न ठकें एकादशी ॥ ७ ॥ स्नान न करिसी आंघोळी । विभुति न लाविसी कपाळीं ॥८॥ वरिवरि न्याहाळिसी त्वचा । उपेग नाहीं मांसाचा ॥ ९ ॥ पद्मनाभी विश्वनाथ । तुका अझून रडत ॥ १० ॥

॥ २३३५ ॥

देहीं असोनियां देव । वृथा फिरतो निर्दैव ॥ १ ॥ देव आहे अंतर्यामीं । व्यर्थ हिंडे तीर्थग्रामीं ॥ २ ॥ नाभीं मृगाचे कस्तुरी । व्यर्थ हिंडे

पाठभेदः—१ ह्मणवितां. २ करिसी.

वनांतरीं ॥ ३ ॥ साकरेचें मूळ ऊंस । तैसा देहीं देव दिसे ॥ ४ ॥ दुधीं असतां नवनीत। नेणें तयाचें मथित ॥५॥ तुका सांगे मूढजना । देहीं देव कां पाह्याना ॥ ६ ॥

॥ २३३६ ॥

कां रे दाटोन होतां वेडे। वेद आहे तुह्मांपुढें ॥ १ ॥ ज्यासि पाठ नाहीं पोट। करी त्रैलोक्याचा घोंट ॥२॥ तुमची तुह्मां नाहीं सोय। कोणाचें बा काय जाय ॥ ३ ॥ तुका गातो नामीं। तेथें नाहीं तुह्मी आह्मी ॥ ४ ॥

॥ २३३७ ॥

ऐसे सांडुनियां धुरे । किविलवाणी दिसां[1] कां रे । कामें उर भरे । हातीं नुरे मृत्तिका ॥ १ ॥ उदार हा जगदानी । पांडुरंग अभिमानी । तुळसीदळ पाणी । चिंतनाचा भुकेला ॥ २ ॥ न लगे पुसावी चाकरी । कोणी वकील ये घरीं । त्याचा तो चाकेरी[2] । पारपत्य सकळ ॥ ३ ॥ नाहीं आडकाठी । तुका ह्मणे जातां भेटी । न बोलतां मिठी । उगीच पायीं घालावी ॥ ४ ॥

॥ २३३८ ॥

कां रे दास होसी संसाराचा खर । दुःखाचे डोंगर भोगावया ॥ १ ॥ मिष्टान्नाची गोडी जिव्हेच्या अगरीं । मसक भरल्यावरी स्वाद नेणे ॥२॥ आणीकही भोग आणिकां इंद्रियांचे। नाहीं ऐसे साचे जवळी कांहीं ॥३॥ रूप दृष्टि धाय पाहातां पाहातां । न घडे सर्वथा आणि तृष्णा ॥४॥ तुका ह्मणे कां रे नाशिवंतासाटीं । देवासवें तुटी करितोसी ॥ ५ ॥

॥ २३३९ ॥

गेले पळाले दिवस रोज । काय ह्मणतोसि माझें माझें ॥ १ ॥ सळे धरोनि बैसला काळ । फांको नेदी घटिका पळ ॥ २ ॥ कां रे अद्यापि न कळे । केश फिरले कान डोळे ॥ ३ ॥ हित कळोनि असतां हातीं।

पाठभेदः—१ दिसतां. २ तोचि करी.

तोंडीं पाडोनि घेसी माती ॥ ४ ॥ तुज ठाउकें मी जाणार । पाया शोधोनि बांधिसी घर ॥५॥ तुका ह्मणे वेगें । पंढरिराया शरण रिघें ॥६॥

॥ २३४० ॥

आयुष्य वेचूनि कुटुंब पोसिलें । काय हित केलें सांग बापा ॥ १ ॥
फुकाचा चाकर जालासी कावाडी । नाहीं सुख घडी भोगावया ॥ २ ॥
दुर्लभ मनुष्यजन्म कष्टें पावलासी । दिला कुटुंबासी कामभोग ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसें आयुष्य नासिलें । पाप तें सांचिलें पतनासी ॥ ४ ॥

॥ २३४१ ॥

माझें ह्मणतां याला कां रे नाहीं लाज । कन्या पुत्र भाज धन वित्त ॥ १ ॥
कोणी सोडवी ना काळाचे हातींचे । एकाविणें साचें नारायणा ॥ २ ॥
तुका ह्मणे किती सांगावें चांडाळा । नेणें जीवकळा कोण्या जीतो ॥ ३ ॥

॥ २३४२ ॥

करूनि जतन । कोणा कामा आलें धन ॥ १ ॥ ऐसें जाणतां जाणतां । कां रे होतोसी नेणता ॥ २ ॥ प्रिया पुत्र बंधु । नाहीं तुज यांशीं संबंधु ॥ ३ ॥ तुका ह्मणे एका । हरीविण नाहीं सखा ॥ ४ ॥

॥ २३४३ ॥

कां रे माझीं पोरें ह्मणसील[1] ढोरें । मायबाप खरें काय एक ॥ १ ॥ कां रे गेलें ह्मणोनि करिसी तळमळ । मिथ्याचि कोल्हाळ मेलियाचा ॥ २ ॥
कां रे माझें माझें ह्मणसील गोत । नो सं[2]डविती दूत यमाहातीं ॥ ३ ॥
कां रे मी बळिया ह्मणविसी ऐसा । सरणापाशीं कैसा उचलविसी ॥ ४ ॥
तुका ह्मणे न धरीं भरंवसा कांहीं । वेगीं शरण जाई पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ २३४४ ॥

धन मेळवूनि कोटी । सवें नये रे लंगोटी ॥ १ ॥ पानें खाशील उदंड ।

पाठभेदः—१ ह्मणविसी. २ न सोडविती.

अंतीं जासी सुकल्या तोंडें । पलंग न्याहाल्या सुपती । शेवटीं गोवऱ्या सांगाती ॥ ३ ॥ तुका ह्मणे राम । एक विसरतां श्रम ॥ ४ ॥

॥ २३४५ ॥

नित्य उठोनियां खायाचीच चिंता । आपुल्या तूं हिता नाठवीसी ॥ १ ॥ जननीचे पोटीं उपजलासि जेव्हां । चिंता तुझी तेव्हां केली तेणें ॥ २ ॥ चातकां लागूनि मेघ नित्य वर्षे । तो तुज उदास करील केवीं ॥ ३ ॥ पक्षी वनचरें आहेत भूमीवरि । तयालागीं हरि उपेक्षीना ॥ ४ ॥ तुका ह्मणे भाव धरुन राहें चित्तीं । तरि तो श्रीपति उपेक्षीना ॥ ५ ॥

॥ २३४६ ॥

एक शेरा अन्ना चाड । येर वाउगी वडबड ॥ १ ॥ कां रे तृष्णा वाढविसी । बांधवूनि मोहपाशीं ॥ २ ॥ औट हात तुझा जागा । येर सिणसी वाउगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे श्रम । एक विसरतां राम ॥ ४ ॥

॥ २३४७ ॥

एक मन तुझ्या अवघ्या भांडवला । वांटितां तें तुला येई कैसें ॥ १ ॥ ह्मणउनि दृढ धरीं पांडुरंग । देहा लावीं संग प्रारब्धाचा ॥ २ ॥ आणिका संकल्पा नको गोऊं मन । तरीच कारण साध्य होय ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें जाणावें उचित । तरी सहज स्छित[1] येईल कळों ॥ ४ ॥

॥ २३४८ ॥

मैत्र केले महाबळी । कामा न येती अंतकाळीं ॥ १ ॥ आधीं घे रे रामनाम । सामा भरीं हा उत्तम ॥ २ ॥ नाहीं तरी यम । दांत खातो करकरा ॥ ३ ॥ धन मेळविलें कोडी । काळ घेतल्या न सोडी ॥ ४ ॥ कामा न ये हा परिवार । सैन्य लोक बहु फार ॥ ५ ॥ तंववरी मिरविसी बळ । जंव आला नाहीं काळ ॥ ६ ॥ तुका ह्मणे बापा । चुकवीं चौऱ्याशींच्या खेपा ॥ ७ ॥

---

पाठभेदः—१ स्थित.

॥ २३४९ ॥

सोइरे धाइरे दिल्या घेतल्याचे । अंत हे काळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥
सख्या गोत्रबहिणी सुखाचे संगती । मोकलुनी देती अंतकाळीं ॥ २ ॥
आपुलें शरीर आपणा पारिखें । परावीं होतील नवल काई ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां सोड यांची आस । धरीं रे या कास पांडुरंगा ॥४॥

॥ २३५० ॥

आलें धरा येच पेंठे । पुढें मागुतें न भेटे ॥१॥ होसी फजीती वरपडा । लक्ष चौऱ्यासीचे वेढां ॥ २ ॥ नाहीं कोणाचा सांगात । दुःख भोगितां आघात ॥ ३ ॥ एका पाउलाची वाट । कोणा सांगावा बोभाट ॥ ४ ॥ जुंतिजेसी घाणां । नाहीं मारित्या करुणा ॥ ५ ॥ तुका ह्मणे हित पाहे । जोंवरि हें हातीं आहे ॥ ६ ॥

॥ २३५१ ॥

देवाचिये चाडे प्रमाण उचित । नये वांटूं चित्त निषेधासी ॥ १ ॥
नये राहों उभें कसमळापाशीं । भुंकतील तैसीं सांडावीं तीं ॥ २ ॥
तुका ह्मणे क्षमा सुखाची हे रासी । सांडूनि कां ऐसी दुःखी व्हावें ॥३॥

॥ २३५२ ॥

भक्तिभावें करीं बैसोनि निश्चित । नको गोवूं चित्त प्रपंचासी ॥ १ ॥
एक दृढ करीं पंढरीचा राव । मग तुज उपाव पुढिल सुचे ॥ २ ॥
नको करूं कांहीं देवतापूजन । जप तप ध्यान तेंही नको ॥ ३ ॥
मानिसील ह्मणी आपलिक कांहीं । येर झार पाहीं न चुके कदा ॥ ४ ॥
ऐसे जन्म किती पावलासी देहीं । अझूनि कां नाहीं कळली सोय ॥५॥
सोय धरीं आतां होय पां सावध । अनुभव आनंद आहे कैसा ॥ ६ ॥
सहज कैसें आहे तेथींचें तें गुज । अनुभवें निज पाहे तुकीं ॥ ७ ॥
तुका ह्मणे आतां होईं तूं सावध । तोडीं भवबंध एका जन्में ॥ ८ ॥

॥ २३५३ ॥

हरीविण जिणें व्यर्थचि संसारीं । प्रेत अळंकारीं मिरवत ॥ १ ॥
देवाविण शब्द व्यर्थचि कारण । भांड रंजवण सभेसि गा ॥ २ ॥
आचार करणें देवाविण जो गा । सर्पाचिया अंगा मृदुपण ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय बहु बोलों फार । भक्तीविण नर अभाग्य कीं ॥ ४ ॥

॥ २३५४ ॥

भक्तीवीण जिणें जळो लाजिरवाणें । संसार भोगणें दुःखमूळ ॥ १ ॥
वीस लक्ष योनि वृक्षांमाजी घ्याव्या । जलचरीं भोगाव्या नवलक्ष ॥२॥
अकरा लक्ष योनि किड्यांमाजी घ्याव्या।दशलक्ष भोगाव्या पक्ष्यांमध्यें३॥
तीस लक्ष योनि पशूंचिये घरीं । मानवांभीतरीं चार लक्ष ॥ ४ ॥
एकएक योनी कोटि कोटि फेरा । मनुष्य देहाचा वारा मग लागे ॥५॥
तुका ह्मणे तेव्हां नरदेह नरा । तयाचा मातेरा केला मूढें ॥ ६ ॥

॥ २३५५ ॥

पायां लावुनियां दोरी । भृंग बांधिला लेंकुरीं ॥१॥ तैसा पावसी बंधन । मग सोडवील कोण ॥ २ ॥ गळां बांधोनियां दोरी । वानर हिंडवी घरोघरीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाहें । रीस धांपा देत आहे ॥ ४ ॥

॥ २३५६ ॥

नरदेह वांयां जाय । सेवीं सद्गुरूचे पाय ॥ १ ॥ सांडोनियां अहंभाव । धरीं भक्ती पूजीं देव ॥२॥ थोराचिये वाटे । जातां भवशोक आटे ॥३॥ प्रल्हादातें तारी । तुका ह्मणे कंठीं धरीं ॥ ४ ॥

॥ २३५७ ॥

सोसें बहुगर्भवासीं । मेलों असों उपवासीं । नाहीं सखीं ऐसीं । तेथें कोणी भेटलीं ॥१॥ करीं करीं रे स्वहित । देह तंव हे अनित्य । नाहीं दिलें चित्त । सोडवूं मोहापासोनि ॥२॥ पाळी तोंडींचिया घांसें । तेंचि होय अनारिसें । ज्या नव्हे ऐसें । खेदी परि सोडवीना ॥३॥ तुका ह्मणे धनमानें । माझ्या वाटलों मीपणें । नाहीं दिला जनें । देखों लाभें हा लाभ ॥४॥

॥ २३५८ ॥

काळ जवळिच उभा नेणां । घाली झांपडी खुंटी कानां ॥ १ ॥ केसा हुशार सावध राहीं । आपुला तूं अपुले ठायीं ॥ २ ॥ काळ जवळिच उभा पाहीं । नेदि कोणासि देऊं कांहीं ॥ ३ ॥ काळें पुरविली पाठी। वरुषें झालीं तरी साठी ॥ ४ ॥ काळ भोंवताला भोंवे । राम येऊं नेदी जिव्हे ॥ ५ ॥ तुका ह्मणे काळा । कर्मे मिळतें तें जाळा ॥ ६ ॥

॥ २३५९ ॥

दिकचि या नाहीं संसारसंबंधा। तुटेना या बाधा भवरोगाची ॥ १ ॥
तांतडींत करीं ह्मणऊनि तांतडी । साधिली ते घडी सोनियाची ॥२॥
संकल्पाच्या बीजें इंद्रियांची चाली। प्रारब्ध तें घाली गर्भवासीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे बीजें जाळुनी सकळ । करावा[1] गोपाळ आपुला तो ॥ ४ ॥

॥ २३६० ॥

मृगजळ दिसे साचपणा ऐसें । खोटियाचें पिसें ऊर फोडी ॥ १ ॥
जाणोनि कां करा आपुलाले घात । विचारा रे हित लवलाहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे शेखी श्मशान तोंवरी । संबंध गोवरी अंगींसवें ॥ ४ ॥

॥ २३६१ ॥

आठवे देव तो करावा उपाव । येर तजीं वाव खटपटा ॥ १ ॥
होई बा जागा होई बा जागा । वाउगा कां गा सिणसील ॥ २ ॥
जाणिवेच्या भारें भवाचिये डोहीं। बुडसी तों कांहीं निघेसि ना॥३॥
तुका ह्मणे देवा पावसील भावें । जाणतां तें ठावें कांहीं नव्हे ॥ ४ ॥

॥ २३६२ ॥

भवाचिया संगें बहुच नाडिले । कळिकाळें पाडिलें तोंडघसीं ॥ १ ॥
तया भवसंगें गुंतलासी वांयां । धन पुत्र जाया भुलों नको ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ करावें गोपाळें आपुले भाट.

जे जे घडी जाय ते ते काळ खाय। प्राण्या तरणोपाय काय केला ॥३॥
तुका ह्मणे करीं सर्वही तूं त्याग। अर्पी हें सर्वांग जगदीशीं ॥ ४ ॥

॥ २३६३ ॥

अन्नाच्या परिमळें जरि जाय भूक। तरि कां हे पाक घरोघरीं ॥१॥
आपुलालें तुह्मी करा रे स्वहित। वाचे स्मरा नित्य राम राम ॥ २ ॥
देखोनि जीवन जरि जाय तान। तरि कां सांटवण[1] घरोघरीं ॥ ३ ॥
देखोनियां छाया सुख न पवीजे। जंव न बैसीजे तया तळीं ॥ ४ ॥
हितें[2] तरी होय गातां आईकतां। जरि राहे चित्ता दृढ भाव ॥ ५ ॥
तुका ह्मणे होसी भावेंचि तूं मुक्त। काय करिसी युक्त जाणिवेचि ॥६॥

॥ २३६४ ॥

सदैव तुह्मां अवघें आहे। हातपाय चालाया ॥ १ ॥ मुखीं वाणी
कानीं कीर्ति। डोळे मूर्ति देखाया ॥ २ ॥ अंध बहिर ठकलीं किती।
मुकीं होतीं पांगुळें ॥ ३ ॥ घरास आगि लावुनि जागा। न पळे तो
गा वांचे ना ॥ ४ ॥ तुका ह्मणे जागा हिता। काहीं आतां आपुल्या ॥५॥

॥ २३६५ ॥

आपुलिया आंगें तोडी मायाजाळ। ऐसें नाहीं बळ कोणापाशीं ॥१॥
रांडपोरें त्याग करी कुटुंबाचा। नावरे हे वाचा आणि मन ॥ २ ॥
हर्षामर्ष जों हे नाहीं जों जिराले। तोंवरी हे केले चार त्यांनीं ॥३॥
मुक्त जालों ऐसें बोलों जाये मुखें। तुका ह्मणे दुःखें बांधला तो ॥४॥

॥ २३६६ ॥

काळोखी खाऊन कैवाड केला धीर। आपुलिया हितें जाले जनामध्यें
शूर ॥ १ ॥ कां रे तुह्मी नेणां कां रे तुह्मी नेणां। अल्पसुखासाटीं
पडशी विपत्तीचे घाणां ॥ २ ॥ नाहीं ऐसी लाज काय तयांपें आ-

पाठभेदः—१ सांठवण. २ सुख.

गळें । काय नव्हे केलें आपुलिया बळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरी सुख अवघेंचि बरें । जतन करून हीं आपुलालीं ढोरें ॥ ४ ॥

॥ २३६७ ॥

न लगे द्यावा जीव सहजचि जाणार । आहे तो विचार जाणा कांहीं ॥ १ ॥
मरण जो मागे गाढवाचा बाळ । बोलिजे चांडाळ शुद्ध त्यासी ॥ २ ॥
तुका ह्मणे कई होईल स्वहित । निधान जो थीत टाकूं पाहे ॥ ३ ॥

॥ २३६८ ॥

वांटा घेई लवकरि । मागें अंतरसी दुरी । केली भरोवरी । सार नेती आ-णीक ॥ १ ॥ ऐसीं भांबावलीं किती । काय जाणों नेणों किती । समय नेणती । माथां भार वाहोनि ॥ २ ॥ नाहीं सरिलें तोंवरी । धांव घेई वेग करीं । घेतलें पदरीं । फावलें तें आपुलें ॥ ३ ॥ फट लंडो ह्मणे तुका । एक न साहावे धका । तरिच या सुखा । मग कैसा पावसी ॥ ४ ॥

॥ २३६९ ॥

देवाचे ह्मणोनि देवीं अनादर । हें मोठें आश्चर्य वाटतसे ॥ १ ॥
आतां येरा जना ह्मणावें तें काई । जया भार डोई संसाराचा ॥ २ ॥
त्यजुनी संसार अभिमान सांटा । जुलूम हा मोटा दिसतसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे अळस करूनियां साहे । वळें कैसें पाहें वांयां जातों ॥ ४ ॥

॥ २३७० ॥

काय एकां झालें तें कां नाहीं ठावें । काय हें सांगावें काय म्हूण ॥ १ ॥
देखतील डोळां ऐकतील कानीं । बोलिलें पुराणीं तेंही ठावें ॥ २ ॥
काय हें शरीर साच कीं जाणार । सकळ विचार जाणती हा ॥ ३ ॥
कां हें कळों नये आपुलें आपणा । बाळत्व तारुण्य वृद्धदशा ॥ ४ ॥
कां हें आवडलें प्रियापुत्रधन । काय कामा कोण कोणा आलें ॥ ५ ॥
कां हें जन्म वांयां घातलें उत्तम । कां हे रामराम न ह्मणती ॥ ६ ॥

काय भुली यांसी पडली जाणतां । देखती मरतां आणिकांसी ॥ ७ ॥
काय करिती हे बांधलिया काळें । तुका ह्मणे बळें वज्रपाशीं ॥ ८ ॥

॥ २३७१ ॥

वाटे या जनाचें थोर वा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा ॥ १ ॥
कोण दम ऐसा आहे यांचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥ २ ॥
काय मानुनियां राहिले निश्चिंती । काय जाब देती यमदूतां ॥ ३ ॥
कां हीं विसरलीं मरण बापुडीं । काय यांसी गोडी लागलीसे ॥ ४ ॥
काय ह्मतीं नाहीं करील तयासी । काय जालें यांसी काय जाणों ॥ ५ ॥
कां हीं नाठविती देवकीनंदना । सुटाया बंधनापासूनियां ॥ ६ ॥
काय मोल यासी लागे धन वित्त । कां हें यांचें चित्त घेत नाहीं ॥ ७ ॥
तुका ह्मणे कां हीं भोगितील खाणी । कां त्या चक्रपाणी विसरलीं ॥ ८ ॥

॥ २३७२ ॥

पडिली हे रूढि जगा परिचार । चालविती वेव्हार सत्य म्हूण ॥ १ ॥
मरणाची कां रे नाहीं आठवण । संचिताचा धन लोभ हेवा ॥ २ ॥
देहाचें भय तें काळाचें भातुकें । ग्रासूनि तें एकें ठेविलेंसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे कांहीं उघडा रे डोळे । जाणोनि अंधळे होऊं नका ॥ ४ ॥

॥ २३७३ ॥

ह्मणसी होऊनी निश्चिंता । हरूनियां अवघी चिंता । मग जाऊं एकांता । भजन करूं ॥ १ ॥ संसार संभ्रमें आशा लागे पाठीं । तेणें जीवा साटी होईल तुझ्या ॥ २ ॥ सेकीं नाडसील नाडसील । विषयसंगें अवघा नाडसील । मागुता पडसील भवडोहीं ॥ ३ ॥ शरीर सकळ मायेचा बांधा । यासी नाहीं कधीं अराणूक ॥ ४ ॥ करिती तडातोडी आंत बाह्यात्कारीं । ऐसे जाती चारी दिवस वेगीं ॥ ५ ॥ मोलाची घडी जाते वांयांविण । न मिळे मोल धन देतां कोडी ॥ ६ ॥ जागा होई करीं हिताचा उपाय । तुका ह्मणे हाय करिसी मग ॥ ७ ॥

॥ २३७४ ॥

इच्छेचें पाहिलें । डोळीं अंतीं मोकलिलें ॥ १ ॥ यांचा विश्वास तो काई । ऐसें विचारूनि पाहीं ॥ २ ॥ सुगंध अभ्यंगें पाळितां । केश फिरले जाणतां ॥ ३ ॥ पिंड पाळितां ओसरे । अवघी घेऊनि मागें सरे ॥ ४ ॥ करितां उपचार । कोणां नाहीं उपकार ॥ ५ ॥ अल्प जीवन करीं । तुका ह्मणे साधीं हरी ॥ ६ ॥

॥ २३७५ ॥

एक पाहातसां एकांचीं दहनें । सावध त्या गुणें कां रे नव्हा ॥ १ ॥ मारा हाक देवा भय अटाहासें । जंव काळाऐसें जालें नाहीं ॥ २ ॥ मरणांची तंव गांठोडी पदरीं । जिणें तोंचि वरि माप भरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे धिंग वाहाती मारग । अंगा आलें मग हालों नेदी ॥ ४ ॥

॥ २३७६ ॥

हरि हरि तुह्मी ह्मणारे सकळ । तेणें मायाजाळ तुटईल ॥ १ ॥ आणिका नका कांहीं गाबाळाचे भरी । पडों येथें थोरी नागवण ॥ २ ॥ भावें तुळसीदळ पाणी जोडा हात । ह्मणावा पतित वेळोवेळां ॥ ३ ॥ तुका ह्मणे हा तंव कृपेचा सागर । नामासाटीं पार पाववील ॥ ४ ॥

॥ २३७७ ॥

कैं वाहावें जीवन । कैं पलंगीं शयन ॥ १ ॥ जैसी जैसी वेळ पडे । तैसें तैसें होणें घडे ॥ २ ॥ कैं भोज्य मानापरी । कैं कोरड्या भाकरी ॥ ३ ॥ कैं बसावें वहनीं । कैं पायीं अन्हवाणी ॥ ४ ॥ कैं उत्तम प्रावर्णे । कैं वसनें तीं जीर्णें ॥ ५ ॥ कैं सकळ संपत्ती । कैं भोगणें विपत्ती ॥ ६ ॥ कैं सज्जनाशीं संग । कैं दुर्जनाशीं योग ॥ ७ ॥ तुका ह्मणे जाण । सुख दुःख तें समान ॥ ८ ॥

॥ २३७८ ॥

सकळिकांच्या पायां माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥ अहो श्रोते वक्ते सकळही जन । बरें पारखून बांधा गांठी ॥ २ ॥

फोडिलें भांडार धन्याचा हा माल । मी तंव हमाल भारवाही ॥ ३ ॥
तुका ह्मणे चाली जाली चहूं देशीं । उतरला कसीं खरा माल ॥ ४ ॥

॥ २३७९ ॥

अरे हें देह व्यर्थ जावें । ऐसें जरी तुज व्हावें । द्यूतकर्म मनोभावें । सारीपाट खेळावा ॥ १ ॥ मग कैंचें हरिचें नाम । निजेलिया जागा राम । जन्मोजन्मींचा अधम । दुःख थोर साधिलें ॥ २ ॥ विषयसुखाचा लंपट । दासीगमनीं अतिधीट । तया तेचि वाट । अधोगती जावया ॥ ३ ॥ अणीक एक कोड । नरका जावयाची चाड । तरी संतनिंदा गोड । करीं कवतुकें सदा ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसें । मना लावी रामपिसें । नाहीं तरी आलिया सायासें । फुकट जासी ठकोनी ॥ ५ ॥

॥ २३८० ॥

नका घालूं दुध जयामध्यें सार । ताकाचे उपकार तरी करा ॥ १ ॥
नेदा तरी हें हो नका देऊं अन्न । फुकाचें जीवन तरी पाजा ॥ २ ॥
तुका ह्मणे मज सगुणाची चाड । पुरवा कोणी कोड दुर्बळाचें ॥ ४ ॥

॥ २३८१ ॥

आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥ १ ॥
सकळांच्या पायां माझें दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा ॥ २ ॥
हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन एकविध ॥ ३ ॥
तुका ह्मणे लाभें[२] होय तो व्यापार । करा काय फार शिकवावें ॥ ४ ॥

॥ २३८२ ॥

ऐकें रे जना । तुझ्या स्वहिताच्या खुणा । पंढरीचा राणा । मनामाजी स्मरावा ॥ १ ॥ मग कैंचें रे बंधन । वाचे गातां नारायण । भवसिंधु तो जाण । येचि तीरीं सरेल ॥ २ ॥ दास्य करील कळिकाळ । बंद

---

पाठभेदः—१ शुद्धभावें. २ हित.

तुटेल मायाजाळ । होतील सकळ । रिद्धिसिद्धी ह्मणियारीं ॥ ३ ॥ सकळ शास्त्रांचें सार । हें वेदांचें गव्हर । पाहातां विचार । हाचि करिती पुराणें ॥४॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र । चांडाळां आहे अधिकार । बाळें नारीनर । आदिकरोनि वेश्याही ॥५॥ तुका ह्मणे अनुभवें । आह्मीं पाडियलें ठावें । आणीकही दैवें । सुख घेती भाविकें ॥६॥

॥ २३८३ ॥

न करीं तळमळ राहें रे निश्चळ । आहे हा कृपाळ स्वामी माझा ॥१॥
अविनाश सुख देईल निर्वाणीं । चुकतील खाणी चौऱ्याशीच्या ॥२॥
आणिकिया जीवा होईल उद्धार । तेही उपकार घडती कोटि ॥ ३ ॥
आहिक्य परत्रीं होसील सरता । उच्चारीं रे वाचा रामराम ॥ ४ ॥
तुका ह्मणे सांडीं संसाराचा छंद । मग परमानंद पावसील ॥ ५ ॥

॥ २३८४ ॥

साधकाची दशा उदास असावी । उपाधि नसावी अंतर्बाही ॥ १ ॥
लोलुपता काय निद्रेतें जिणावें । भोजन करावें परमित ॥ २ ॥
एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं वचन । प्राण गेल्या जाण बोलों नये ॥३॥
संग सज्जनाचा उच्चार नामाचा । घोष कीर्तनाचा अहर्निशीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे ऐशा साधनीं जो राहे । तोचि ज्ञान लाहे गुरुकृपा ॥ ५ ॥

॥ २३८५ ॥

निर्वाहापुरतें अन्नआच्छादन । आश्रमासी स्थान कोंपी गुहा ॥ १ ॥
कोठेंही चित्तासी नसावें बंधन । हृदयीं नारायण सांटवावा ॥ २ ॥
नये बोलों फार बैसों जनामधीं । सावधान बुद्धी इंद्रियें दमी ॥ ३ ॥
तुका ह्मणे घडी घडीनें साधावी । त्रिगुणांची गोवी उगवूनि ॥ ४ ॥

---

पाठभेद:—१ चांडाळांही. २ वाचे उच्चारितां रामनाम.

॥ २३८६ ॥

सर्वस्वा मुकावें तेणें हरि जिंकावें । अर्थ प्राण जीवें देहत्याग ॥ १ ॥
मोह ममता माया चाड नाहीं चिंता । विषयकंदुवेथा जाळूनियां ॥२॥
लोकलज्जा दंभ आणि अहंकार । करूनि मत्सर देशधडी ॥ ३ ॥
शांति क्षमा दया सखिया विनउनी । मूळ चक्रपाणी धाडी त्यांसी ॥४॥
तुका ह्मणे याती अक्षरें अभिमान । सांडोनियां शरण रिघें संतां ॥५॥

॥ २३८७ ॥

आशा हे समूळ खाणोनि काढावी । तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें॥१॥
नाहीं तरि सुखें असावें संसारीं । फजिती दुसरी करूं नये ॥ २ ॥
आशा मारूनियां जयवंत व्हावें । तेव्हांचि निघावें सर्वांतूनि ॥ ३ ॥
तुका ह्मणे जरी योगाची तांतडी । आशेची बीबुडी करीं आधीं ॥४॥

॥ २३८८ ॥

हित व्हावें तरी दंभ दुरी ठेवा । चित्तशुद्धि सेवा देवाची हे ॥ १ ॥
आवडी विठ्ठल गाईजे एकांतीं । अलभ्य ते येती लाभ घरा ॥ २ ॥
आणीकां अंतरीं न द्यावी वसति । करावी हे शांती वासनेची ॥ ३ ॥
तुका ह्मणे बाण हाचि निर्वाणींचा । वाउगी हे वाचा वेचूं नये ॥४॥

॥ २३८९ ॥

करूनियां शुद्ध मन । नारायण स्मरावा ॥ १ ॥ तरीच हा तारिजे
सिंधु । भवबंधू तोडोनियां ॥ २ ॥ तेथें[1] सरे शुद्ध साचें । अंतरींचें
बीज तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे लवणकळी । पडतां जळीं तें होय ॥४॥

॥ २३९० ॥

बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंतपार नाहीं ॥ १ ॥
येऊनि अंतरीं राहील गोपाळ । सायासाचें फळ बैसलिया ॥ २ ॥

पाठभेदः—१ येथें.

राम कृष्ण हरि मुकुंद मुरारि । मंत्र हा उच्चारीं वेळोवेळां ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसें देईन मी दिव्य । जरी होइल भाव एकविध ॥ ४ ॥

॥ २३९१ ॥

नये वांटूं मन । कांहीं न देखावें भिन्न ॥ १ ॥ पाय विठोबाचे चित्तीं । असों द्यावे दिवसराती ॥ २ ॥ नये काकुळती । कोणा यावें हरिभक्ति ॥ ३ ॥ तुका ह्मणे साई । करील कृपेची विठाई ॥ ४ ॥

॥ २३९२ ॥

नलगे देशकाळ । मंत्रविधानें सकळ । मनेंचि निश्चळ । करूनि करुणा भाकावी ॥ १ ॥ येतो बैसलिया ठाया । आसनें व्यापी देवराया । निर्मळ ते काया । अधिष्ठान तयाचें ॥ २ ॥ कल्पनेचा साक्षी । तरि आदरेंचि लक्षी । आवडीनें भक्षी । कोरडें धान्य मटमटां ॥ ३ ॥ घेणें तरि भाव । लक्षी दासांचा उपाव । तुका ह्मणे जीव । जीवीं मेळविल अनंत ॥ ४ ॥

॥ २३९३ ॥

सत्य आठवितां देव । जातें भेव पळोनि ॥ १ ॥ नलगे कांहीं करणें चिंता । धरी सत्ता सर्व तो ॥ २ ॥ भावें भाव राहे पायीं । देव तैं संनिध ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृष्णनामें । शीतळ प्रेम सर्वांसी ॥ ४ ॥

॥ २३९४ ॥

कायावाचामनें जाला विष्णुदास । काम क्रोध त्यास बाधीतना ॥१॥
विश्वास तो करी स्वामीवरी सत्ता । सकळ भोगिता होय त्याचें ॥२॥
तुका ह्मणे चित्त करावें निर्मळ । येऊनि गोपाळ राहे तेथें ॥ ३ ॥

॥ २३९५ ॥

तेचि करीं मात । जेणें होइल तुझें हित ॥ १ ॥ काय बडबड अमित । सुख जिव्हारीं सिणविसी ॥ २ ॥ जो मुळव्याधी पीडिला ।

त्यासी देखोन हांसे खरजुला ॥ ३ ॥ आरथकरी सोसी । त्यासि हांसे तो आळसी ॥४॥ क्षयरोगी ह्मणे परता । सर रोगिया तूं आतां ॥ ५ ॥ वडस दोहीं डोळां वाढले । आणिकां कानें कोंचें ह्मणे ॥६॥ तुका ह्मणे लागों पायां । शुद्ध करा आपणियां ॥ ७ ॥

॥ २३९६ ॥

थोडें परी निरें । अविट तें घ्यावें खरें ॥१॥ घ्यावें जेणें नये तुटी । बीज वाढे बीजा पोटीं ॥ २ ॥ चित्त ठेवीं ग्वाही । आणिकांशीं चाड नाहीं ॥ ३ ॥ आपलें तें हित फार । तुका ह्मणे खरें सार ॥ ४ ॥

॥ २३९७ ॥

नम्र जाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥ १ ॥ हेंचि शूरत्वाचें अंग । हरी आणिला श्रीरंग ॥ २ ॥ अवघा जाला पण । लवण सकळां कारण ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाणी । पाताळें[1] तें परी खणी ॥ ४ ॥

॥ २३९८ ॥

ऐका गा ए अवघे जन । शुद्ध मन तें हित ॥ १ ॥ अवघा काळ नव्हे जरी । समयावरी जाणावें ॥ २ ॥ नाहीं कोणी सवें येता । संचिता या वेगळा ॥ ३ ॥ बरवा अवकाश आहे । करा साहे इंद्रियें ॥ ४ ॥ कर्मभूमी ऐसा ठाव । वेवसाव जाणावा ॥ ५ ॥ तुका ह्मणे उत्तम जोडी । जाती घडी नरदेह ॥ ६ ॥

॥ २३९९ ॥

कठिण नारळाचें अंग । बाहेरी भीतरीं तें चांग ॥ १ ॥ तैसा करी कां विचार । शुद्ध कारण अंतर ॥ २ ॥ वरि कांटे फणसफळा । माजि अंतरीं जिव्हाळा ॥ ३ ॥ ऊंस बाहेरी कठिण काळा । माजी रसाचा जिव्हाळा ॥४॥ मिठें रुचविलें अन्न । नये सतंत कारण ॥५॥

---

पाठभेद:—१ पातळपणें तळा आणि.

॥ २४०० ॥

चुकलिया ताळा । वाती घालुनि बैसे डोळां ॥ १ ॥ तैसें जागें करीं चित्ता । कांहीं आपुलिया हिता ॥ २ ॥ निक्षेपिलें धन । तेथें गुंतलेंसें मन ॥ ३ ॥ नाशिवंतासाटीं । तुका ह्मणे करिसी आटी ॥ ४ ॥

॥ २४०१ ॥

उचित जाणावें मुख्य धर्म आधीं । चित्तशुद्ध बुद्धी ठायीं स्थीर[1] ॥ १ ॥ न वलावी धांव मनाचिये ओढी । वचन आवडी संताचिये ॥ २ ॥ अंतरीं या राहे वचनाचा विश्वास । न लगे उपदेश तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ २४०२ ॥

संसाराचा माथां भार । कांहीं पर न ठेवीं ॥ १ ॥ भक्तीची ते जाती ऐसी । सर्वस्वासी मुकावें ॥ २ ॥ भिक्षा आणि वेवसाव । काला करितो गाढव ॥ ३ ॥ करूनि वस्ती बाजारीं । ह्मणवी कासया निस्पृही ॥ ४ ॥ प्रसादा आडुनि कवी । केलें तूप पाणी तेवीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे होई शूर । किंवा निसुर मजुर ॥ ६ ॥

॥ २४०३ ॥

उभय भाग्यवंत तरीच समान । स्थळीं समाधान तरीच राहे ॥ १ ॥ युक्तीचें गौरव नसतां जिव्हाळा । सांचवणी जळा परी नाश ॥ २ ॥ लोखंडा परीस ज्ञानिया तो शठ । नांवाचा पालट दगड खरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे अवघे विनोदाचे ठाव । एकात्मक भाव नाहीं तेथें ॥ ४ ॥

॥ २४०४ ॥

कंथा प्रावर्ण । नव्हे भिक्षेचें तें अन्न ॥ १ ॥ करीं यापरी स्वहित । विचारूनि धर्म नीत ॥ २ ॥ देऊळ नव्हे घर । प्रपंच परउपकार ॥ ३ ॥ विधिसेवन काम । नव्हे शब्द रामराम ॥ ४ ॥ हत्या क्षत्रधर्म । नव्हे निष्काम तें कर्म ॥ ५ ॥ तुका ह्मणे संतीं । करूनि ठेविली आइती ॥ ६ ॥

---

पाठभेदः—१ स्थीर.

॥ २४०५ ॥

डोळ्यामध्यें जैसें कणु । अणु तेंहि न समाये ॥ १ ॥ तैसें शुद्ध करीं हित । नका चित्त बाटवूं ॥२॥ आपल्याचा कळवळा । आणिका बाळावरि न ये ॥ ३ ॥ तुका ह्मणे बीज मुडा । जैसा चाडा पिकाच्या ॥ ४ ॥

॥ २४०६ ॥

करणें तें हेंचि करा । नरका अघोरा कां जातां ॥१॥ जयामध्यें नारायण । शुद्ध पुण्य तें एक ॥ २ ॥ शरणागतां देव राखे । येरां वाखे विघ्नाचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे लीन व्हावें । कळे भावें वर्म हें ॥ ४ ॥

॥ २४०७ ॥

किती रांडवंडे । घालूनि व्हाल रे बापुडे । संसाराचे भिडे । कासावीस झालेती ॥१॥ माझ्या स्वामी शरण रिघा । कृपाळुवा पांडुरंगा । ठेवी अंगसंगा । विश्वासियां जवळी ॥ २ ॥ कांहीं न मागतां भलें । होइल तेंचि काम केलें । नसावें आथिलें । कांहीं एका संकल्पें ॥३॥ तुका ह्मणे भाव । पाववील ठायाठाव। एकविध जीव। ठेविलिया सेवेसी॥४॥

॥ २४०८ ॥

सत्य आह्मां मनीं । नव्हों गाबाळाचे धनी ॥१॥ ऐसें जाणा रे सकळ । भरा शुद्ध टाका मळ ॥२॥ देतों तीक्ष्ण उत्तरें । पुढें व्हावयासी बरें ॥३॥ तुका ह्मणे बरें घडे । देशोदेशीं चाले कोडें ॥ ४ ॥

॥ २४०९ ॥

काय धोविलें बाहेरी । मन मळलें अंतरीं । गादलें जन्मवरी । असत्य कार्टे काटलें ॥१॥ सांडी व्यापार दंभाचा । शुद्ध करीं रे मन वाचा । तुझिया चित्ताचा । तूंच ग्वाही आपुला ॥ २ ॥ पापपुण्यविटाळ देहीं । भरितां न विचारिसी कांहीं । काय चाचपसी मही । जी अखंड सोंवळी ॥ ३ ॥ कामक्रोधा वेगळा । ऐसा होईं कां सोंवळा । तुका ह्मणे कळा । गुंडुन ठेवीं कुसरी ॥ ४ ॥

॥ २४१० ॥
निवडावे खडे । तरी दळण वोजें घडे ॥ १ ॥ नाहीं तरि नासोनि जाय । कारण आळस उरे हाय ॥ २ ॥ निवडावें तर्णे । सेतीं करावें राखण ॥ ३ ॥ तुका ह्मणे नीत । न विचारितां नव्हे हित ॥ ४ ॥

॥ २४११ ॥
भय नाहीं भेव । अनुतापीं नव्हता जीव ॥ १ ॥ जेथें देवाची तळमळ । तेथें काशाचा विटाळ ॥ २ ॥ उच्चारितां दोष । नाहीं उरों देत लेश ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्त । होय आवडी मिश्रित ॥ ४ ॥

॥ २४१२ ॥
काय तो विवाद असो भेदाभेद । साधा परमानंद एका भावें ॥ १ ॥
निघोनि आयुष्य जातें हातोहात । विचारीं पां हित लवलाहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे भावभक्ति हे कारण । नागवी भूषण दंभ तोचि ॥ ३ ॥

॥ २४१३ ॥
जेणें घडे नारायणीं अंतराय । होत बाप माय वर्जावीं तीं ॥ १ ॥
येर प्रिया पुत्र धना कोणा लेखा । करिती तीं दुःखा पात्र शत्रु ॥ २ ॥
प्रल्हादें जनक बिभीषणें बंधु । राज्य माता निंदु भरतें केली ॥ ३ ॥
तुका ह्मणे सर्व धर्म हरिचे पाय । आणीक उपाय दुःखमूळ ॥ ४ ॥

॥ २४१४ ॥
हो का पुत्र पत्नी बंधु । त्यांचा तोडावा संबंधु ॥ १ ॥ कळों आलें खऱ्याळसें । शिवों नये लिंपो दोषें ॥२॥ फोडावें मडकें । मेलें लेखीं घायें एकें ॥ ३ ॥ तुका ह्मणें त्यागें । विण चुकीजेना भोगें ॥ ४ ॥

॥ २४१५ ॥
न मनावें तैसें गुरूचें वचन । जेणें नारायण अंतरे तें ॥ १ ॥
आड आला म्हूण फोडियेला डोळा । बळिनें आंधळा शुक्र केला ॥२॥
करी देव तरी काय नव्हे एक । कां तुह्मी पृथक सिणा वांयां ॥ ३ ॥

---
पाठभेदः—१ तन.

उल्लंघुनियां भ्रताराची आज्ञा । अन्न ऋषिपत्न्या घेउनि गेल्या ॥ ४ ॥
अवघेंचि त्यांचें देवें केलें काज । धर्म आणि लाज राखियेली ॥ ५ ॥
पितियासी पुत्रें केला वैरकार । प्रल्हादें असुर मारविला ॥ ६ ॥
बहुत विघ्नें केलीं तया आड । परि नाहीं कैवाड सांडियेला ॥ ७ ॥
गौळणी करिती देवाशीं व्यभिचार । सांडुनी आचार भ्रष्ट होती[1] ॥८॥
तयांसी दिलें तें कवणासी नाहीं । अवघा अंतबाहीं तोचि जाला ॥९॥
देव जोडे ते करावे अधर्म । अंतरें तें कर्म नाचरावें ॥ १० ॥
तुका ह्मणे हा जाणतो कळवळा । ह्मणोनि अजामेळा उद्धरिलें ॥११॥

॥ २४१६ ॥

आली सिंहस्थपर्वणी । न्हाव्या भटा जाली धणी ॥ १ ॥ अंतरीं पापा-
च्या कोडी । वरिवरि बोडी डोई दाढी ॥ २ ॥ बोडिलें तें निघालें ।
काय पालटलें सांग वहिलें ॥ ३ ॥ पाप गेल्याची काय खुण । नाहीं
पालटले अवगुण ॥ ४ ॥ भक्तिभावेंविण । तुका ह्मणे अवघा सीण ॥ ५ ॥

॥ २४१७ ॥

किती लाजिरवाणा । मरे उपजोनि शाहाणा ॥ १ ॥ एका घाई न
करीं तुटी । न निघें देवासोई भेटी ॥२॥ सोसूनि आबाळी । घायाळ
तें ढुंग चोळी ॥३॥ सावध करी तुका । ह्मणे निजले हो आइका ॥ ४ ॥

॥ २४१८ ॥

निर्वैर होणें साधनाचें मूळ । येर ते विल्हाळ सांडीमांडी ॥ १ ॥
नाहीं चालों येत सोंगसंपादणी । निवडे अवसानीं शुद्धाशुद्ध ॥ २ ॥
त्याग नांव तरी निर्विषयवासना । कार्यकारणापुरते विधि ॥ २ ॥
तुका ह्मणे राहे चिंतनीं आवडी । येणें नांवें जोडी सत्यत्वेशीं ॥ ४ ॥

॥ २४१९ ॥

नव्हे खळवादी मताच पुरता । सत्याची हे सत्ता उपदेश ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ तोही.

साक्षत्वेसी मना आणावीं उत्तरें । परिपाकीं खरें खोटें कळे ॥ २ ॥
नव्हे एकदेशी शब्द हा उखता । ब्रह्मांडापुरता वेइल त्यासी ॥ ३ ॥
तुका विनवणी करी जाणतियां । बहुमतें वांयां श्रमों नये ॥ ४ ॥

॥ २४२० ॥

पात्र शुद्ध चित्त ग्वाही । नलगे कांहीं सांगणें ॥ १ ॥ शूर तरी सत्यचि व्हावें । सार्टी जीवें करूनि ॥ २ ॥ अमुपच सुखमान । स्वामी जन मानावें ॥३॥ तुका ह्मणे जैसी वाणी। तैसें मनीं परिपाक ॥४॥

॥ २४२१ ॥

साजे अळंकार । तरि भोगितां भ्रतार ॥ १ ॥ व्यभिचारा टाकमटिका । उपहास होती लोकां ॥ २ ॥ शूरत्वाची वाणी । रूप मिरवे मंडणीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जिणें । शर्तीविण लाजिरवाणें ॥ ४ ॥

॥ २४२२ ॥

शिष्याची जो नेघे सेवा । मानी देवासारिखें ॥ १ ॥ त्याचा फळे उपदेश । आणिकां दोष उफराटे ॥ २ ॥ त्याचें खरें ब्रह्मज्ञान । उदासीन देहभावीं ॥३॥ तुका ह्मणे सत्य सांगे । येोत रागें येती ते ॥४॥

॥ २४२३ ॥

न मनीं ते ज्ञानी न मनीं ते पंडित। ऐसे परीचे एकएका भावें ॥१॥
धातू पोसोनियां आणिकां उपदेश । अंतरीं तो लेश प्रेम नाहीं ॥ २ ॥
न मनीं ते योगी न मनीं ते हरिदास । दर्शनें बहुवस बहुतां परिचीं ॥३॥
तुका ह्मणे तया नमन बाह्यात्कारी । आवडती परी चित्त शुद्धीचे ॥ ४ ॥

॥ २४२४ ॥

नाहीं पाक होत उफराटे चालीं । बोलिली ते केली व्हावी नीत ॥१॥
नाहीं मानूं येत वांजटाचे बोल । कोरडेच फोल चवी नाहीं ॥ २ ॥
तरुवरा आधीं कोठें आहे फळ । चावटा बरळ ह्मणा त्यासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे किती ठकलीं बापुडीं । गव्हा आहे गोडी मांडे पुऱ्या ॥४॥

॥ २४३५ ॥

परद्रव्य परनारीचा अभिळास । तेथूनि हा रास सर्वभाग्य ॥ १ ॥
घटिका दिवस मास वर्षे लागती तीन । बांधलें पतन गांठोडीस ॥ २ ॥
पुढें घात त्याचा रोकडा शकुन । पुढें करी गुण निश्चयेंसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे एकां तडताथवड । काळ लागे नाड परी खरा ॥ ४ ॥

॥ २४३६ ॥

आर्तभूतां द्यावें दान । खरें पुण्य त्या नांवें ॥ १ ॥ होणार तें सुखें घडो । लाभ जोडो महाबुद्धि ॥ २ ॥ सत्य संकल्पाच साटीं । उजळा पोटीं रवि-बिंब ॥ ३ ॥ तुका ह्मणे मनीं वाव । शुद्ध भाव राखावा ॥ ४ ॥

॥ २४३७ ॥

पुण्य परउपकार पाप ते परपीडा । आणिक नाहीं जोडा दुजा यासी ॥ १ ॥
सत्य तोचि धर्म असत्य तें कर्म । आणिक हें वर्म नाहीं दुजें ॥ २ ॥
गति तेचि मुखीं नामाचें स्मरण । अधोगति जाण विन्मुखता ॥ ३ ॥
संतांचा संग तोचि स्वर्गवास । नर्क तो उदास अनर्गळा ॥ ४ ॥
तुका ह्मणे उघडें आहे हित घात । जयाचें उचित करा तैसें ॥ ५ ॥

॥ २४३८ ॥

कुळधर्म ज्ञान कुळधर्म साधन । कुळधर्में निधान हातीं चढे ॥ १ ॥
कुळधर्म भक्ति कुळधर्म गति । कुळधर्म विश्रांति पाववील ॥ २ ॥
कुळधर्म दया कुळधर्म उपकार । कुळधर्म सार साधनाचें ॥ ३ ॥
कुळधर्म महत्त्व कुळधर्म मान । कुळधर्म पावन परलोकींचें ॥ ४ ॥
तुका ह्मणे कुळधर्म दावी देवीं देव । यथाविध भाव जरीं होय ॥ ५ ॥

॥ २४३९ ॥

जेणें वाढे[1] अपकीर्ति । सर्वार्थी तें वेर्जावें[2] ॥ १ ॥ सत्य रुचे भलेपण ।

---

पाठभेदः—१ वाटे. २ त्यजावें.

वचन तें जगासी ॥ २ ॥ होईजे तें शुद्ध त्यागें । वाउगें तें सारावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे खोटें वर्म । निंद्यकर्म काळिमा ॥ ४ ॥

॥ २४४० ॥

भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥ १ ॥ धांवे जातीपाशीं जाती । खुण येरयेरां ॥ २ ॥ हिरा हिरकणी । काढी आंतुनि अहिरणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे केलें । मन शुद्ध हें चांगलें ॥ ४ ॥

॥ २४४१ ॥

शाहाणियां पुरे एकचि वचन । विशारती खूण तेचि त्यासी ॥ १ ॥
उपदेश असे बहुतांकारणें । घेतला तो मनें पाहिजे हा ॥ २ ॥
फांसावेना तरि दुःख घेतें वाव । मग होतो जीव कासावीस ॥ ३ ॥
तुका ह्मणे नको राग धरूं झोंडा । नुघडितां पीडा होइल डोळे ॥४॥

॥ २४४२ ॥

नाहीं सुगंधाची लागत लावणी । लावावी ते मनीं शुद्ध होतां ॥ १ ॥
वाऱ्या हातीं माप चाले सज्जनाचें । कीर्ति मुख त्याचें नारायण॥२॥
प्रभा आणि रवि काय असे आन । उदयीं तंव[2] जन सकळ साक्षी॥३॥
तुका ह्मणे बरा सत्याचा सायास । नवनीता नाश नाहीं पुन्हा ॥४॥

॥ २४४३ ॥

अनुतापें दोष । जाय न लगतां निमिष ॥ १ ॥ परि तो राहे विसावबळा । आदीं अवसानीं भला ॥ २ ॥ हेंचि प्रायश्चित्त । अनुतापीं न्हाय चित्त ॥ ३ ॥ तुका ह्मणे पापा । शिवों नये अनुतापा ॥ ४ ॥

॥ २४४४ ॥

ढेकरें जेवण दिसे साचें । नाहीं तरि काचें कुंथाकुंथी ॥१॥ हेही बोल

पाठभेदः—१ तुका ह्मणे भले । मन शुद्ध तींहीं केले. २ तें.

तेही बोल । कोरडे फोल रुचीविण ॥२॥ गव्हांचिया होती परी । फके वरी खाऊं नये ३ तुका ह्मणे असे हातींचें कांकण।तयासी दर्पण विल्हाळक॥४॥

॥ २४४५ ॥

केलें नाहीं मनीं तया घडे त्याग । उबग उद्वेग नाहीं चित्तीं ॥ १ ॥
देवचि हा जाणे अंतरींचा भाव । मिथ्या तो उपाव बाह्य रंग ॥ २ ॥
त्यागिल्याचें ध्यान राहिलें अंतरीं । अवघी ते परी विटंबना ॥ ३ ॥
तुका ह्मणे आपआपणां विचारा । कोण हा दुसरा सांगे तुह्मां ॥ ४ ॥

॥ २४४६ ॥

अन्यायासी राजा जरि न करी दंड । बहुच ते लंड पीडिती जना॥१॥
न करी निगा कुणबी न काढितां तण । कैंचे येती कण हातासी ते ॥ २ ॥
तुका ह्मणे संतां करूं नये अनुचित । पाप नाहीं नीत विचारितां ॥ ३ ॥

॥ २४४७ ॥

ऐसी एकां अटी । रीतीं सिणती करंटीं ॥ १ ॥ साच आपुल्या पुरतें । करून ने घेती कां हितें ॥ २ ॥ कांहीं वेचितील वाणी । निरर्थकाचि कारणीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । कांहीं समर्पूनि सेवा ॥ ४ ॥

॥ २४४८ ॥

जळालें तें बाह्य सोंग । अंतर व्यंग पडिलिया ॥ १ ॥ कारण तें अंतरलें । वाइट भलें ह्मणवितां ॥२॥ तांतडीनें नासी । तांतडीचें संतोषी ॥ ३ ॥ तुका ह्मणे धीर । नाहीं बुद्धि एक स्थिर ॥ ४ ॥

॥ २४४९ ॥

निष्ठुर तो दिसे निराकारपणें । कोंवळा सगुणें प्रतिपाळी ॥ १ ॥
केलाच करावा केला कइवाड । होईल तें गोड न परेते ॥ २ ॥
मथिलिया लागे नवनीत हातां । नासे विताळितां आहाच तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां मनाशीं विचार । करावा तो सार एकचित्त ॥ ४ ॥

॥ २४५० ॥

भोजन तें पाशांतीचें । निंचें उंचें उसाळी ॥ १ ॥ जैशी कारंज्याची कळा । तो जिव्हाळा स्वहिताचा ॥ २ ॥ कल्पना ते देवाविण । न करीं भिन्न इतरीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे पात्र भूतीं । ते निश्चिती मापलीं ॥ ४ ॥

॥ २४५१ ॥

जीवित्व तें किती । हेंचि धरितां वरें चित्तीं ॥ १ ॥ संत सुमनें उत्तरें । मृदु रसाळ मधुरें ॥ २ ॥ विसांवतां कानीं । परिपाक घडे मनीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जोडी । होय जतन रोकडी ॥ ४ ॥

॥ २४५२ ॥

मायबापें सर्पीण जरी बोका । त्यांचे संगें सुखा न पवे बाळ ॥ १ ॥ चंदनाचा शूळ सोनियाची बेडी । सुख नेदी फोडी प्राण नाशी ॥ २ ॥ तुका ह्मणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञान गर्व ताठा ॥ ३ ॥

॥ २४५३ ॥

सत्या मापें वाढ । गवाळाची चाली ग्वोडे ॥ १ ॥ उतरे तें कळे कसीं । विखरोन सर्वदेशीं ॥ २ ॥ धरासर्थे राजा । नव्हे हो वा पाटपूजा ॥ ३ ॥ तुका ह्मणे साचें । रूप तें दर्पणाचें ॥ ४ ॥

॥ २४५४ ॥

मंगळाचा मंगळ सांटा । विट तोटा नेणें तें ॥ १ ॥ हें भरा सातें आलें । भलें भलें ह्मणवावें ॥ २ ॥ जनीं जनार्दन वसे । येथें दिसे तें शुद्ध ॥ ३ ॥ तुका ह्मणे बहुतां मुखें । खरें सुखें ठेवावें ॥ ४ ॥

॥ २४५५ ॥

वंदिलें वंदावें जीवाचिये साटीं । किंवा बरी तुटी आरंभींच ॥ १ ॥ स्वहिताची चाड ते ऐका हे बोल । अवघेंचि मोल धीरा अंगीं ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ कीं बोका. २ मान.

सिंपिलें तें रोंप वरीवरी बरें । वाळलिया वरी कोंभ नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे टाकी घायें देवपण । फुटलिया जन कुला पुसी ॥ ४ ॥

॥ २४५६ ॥

पाठेळ करितां न साहावे वारा । साहेलिया ढोरा गोणी चाले ॥ १ ॥
आपणां आपण हेचि कसवटी । हर्षामर्ष पोटीं विरों द्यावे ॥ २ ॥
नवनीत तोंवरी कडकडी लोणी । निश्चळ होऊनी राहे मग ॥ ३ ॥
तुका ह्मणे जरी जग टाकी घाया । त्याच्या पडे पायां जन मग ॥४॥

॥ २४५७ ॥

एका बोटाची निशाणी । परिपाक नाहीं मनीं ॥१॥ तरि तें संपादिलें सोंग । कारणावांचूनियां व्यंग ॥ २ ॥ वैष्णवांचा धर्म । जग विष्णु नेणे वर्म ॥३॥ अतिशयें पाप । तुका सत्य करी माप ॥ ४ ॥

॥ २४५८ ॥

एका बीजा केला नास । मग भोगलें कणीस ॥१॥ कळे सकळां हा भाव । लाहानथोरांवरी जीव ॥२॥ लाभ नाहीं फुकासाटीं । केल्याविण जीवासाटीं ॥३॥ तुका ह्मणे रणीं । जीव देतां लाभ दुणी ॥४॥

॥ २४५९ ॥

सकळ देवाचें दैवत । उभें असे रंगा आंत ॥१॥ रंग लुटा माझे बाप । शुद्ध भाव खरें माप ॥२॥ रंग लुटिला बहुतीं । शुक नारदादि संतीं ॥३॥ तुका लुटितां हे रंग । साह्य जाला पांडुरंग ॥ ४ ॥

॥ २४६० ॥

सोनें दावी वरी तांबें तयापोटीं । खरियाचेसाटीं विकूं पाहे ॥ १ ॥
पारखी तो जाणे तयाचें जीवींचें । निवडी दोहींचें वेगळालें ॥ २ ॥
क्षीरा नीरा कैसें होय एकपण । स्वादा तोचि भिन्न भिन्न काढी ॥३॥
तुका ह्मणे थीता नागवलाचि खोटा । अपमान मोटा पावईल ॥ ४ ॥

॥ २४६१ ॥

समर्थासी नाहीं वर्णावर्णभेद । सामग्री ते सर्व सिद्ध घरीं ॥ १ ॥
आदराचे ठायीं बहुच आदर । मागितलें फार तेथें वाढी. ॥ २ ॥
न ह्मणे सोइरा सुहृद आवश्यक । राजा आणि रंक सारिखाचि ॥३॥
भाव देखे तेथें करी लडबड । जडा राखे जड निराळेंचि ॥ ४ ॥
कोणी न विसंसे याचकाचा ठाव । विनवुनी देव शंका फेडी ॥ ५ ॥
तुका ह्मणे पोट भरुनी उरवी । घालें ऐसें दावी अनुभवें ॥ ६ ॥

॥ २४६२ ॥

गव्हांच्या घुगऱ्या । नाचण्यांच्या पुऱ्या । वऱ्या त्याचि वऱ्या । पाधाणी त्या पाधाणी ॥१॥ काय थोरपण । वांयां जाळावा तो शीण । कारणापें भिन्न । निवडे तें निराळें ॥ २ ॥ रुचि वोजेपाशीं । गरज ते जैशीतैशी । करूं नका नाशी । खावें खाणें जालें तें ॥३॥ तुका ह्मणे मोठा । काय करावा तो ताठा । नाहीं वीण नीटा । पाविजेत मारग॥४॥

॥ २४६३ ॥

विषयांचे लोलिंगत । ते फजीत होतील ॥१॥ न सरे येथें यातिकुळ । शुद्ध मूळबीज व्हावें ॥ २ ॥ शिखासूत्र सोंग वरी । दुराचारी दंड पावे ॥३॥ तुका ह्मणे अभिमाना । नारायणा न सोसे ॥४॥

॥ २४६४ ॥

शंख करिशी ज्याच्या नांवें । त्याचें तुज नाहीं ठावें । एक सांगतों एका भावें । सांपडे घरीं तें जीवउनि खावें । रे विठ्ठल ॥ १ ॥ टिळे माळा करंडी सोंग । धरुनि चाळविलें जग । पसरी हात नाहीं त्याग । दावी दगड पुजी भग । रे विठ्ठल ॥ २ ॥ राख लावुनि अंग मळी । वाये ठोके मी एक बळी । वासने हातीं बांधवी नळी । त्यासी येऊनि गिळी । रे विठ्ठल ॥ ३ ॥ कोण तें राहडीचें सुख । वरते पाय हारतें

---

पाठभेदः---१ कोणा न विसंवे याचकाचा ठाव. २ आलें. ३ येउनि काळ गिळी.

मुख । करवी पीडा भोगवी दु:ख । पडे नरकीं परि न पळेचि मूर्ख । रे विठ्ठल ॥ ४ ॥ सिकला फाक मारी हाका । रांडा पोरें मेळवी लोकां । विटंबी शरीर मागे रुका । केलें तें गेलें अवघेंचि फुका । रे विठ्ठल ॥ ५ ॥ कळावें जना मी एक बळी । उभा राहोनि मांडी फळी । फोडोनि गुडघे कोंपर चोळी। आपला घात करोनि आपणचि तळमळे । रे विठ्ठल ॥ ६ ॥ फुकट खेळें ठकलीं वांयां । धरुनि सोंग बोडक्या डोया । शिवों नये ती अंतरीं माया । संपादणीविण विटं-बिली काया । रे विठ्ठल ॥ ७ ॥ धुळी माती कांहीं खेळोंच नका । जवादी चंदन घ्यावा बुका । आपणा परिमळ आणिकां लोकां । मो-लाची महिमा फजिती फुका । रे विठ्ठल ॥८॥ बहुत दु:खी जालियां खेळें । अंगीं बुद्धि नाहींत बळें । पाठीवरी तोबा तोंड काळें । रसना द्रवे उपस्थाच्या मुळें । रे विठ्ठल ॥ ९ ॥ काय सांगतो तें ऐका तुका । मोडा खेळ कांहीं अवगोंच नका । चला जेवूं आधीं पोटीं लागल्या भुका । घाल्यावरी बरा टाकमटिका । रे विठ्ठल ॥ १० ॥

॥ २४६५ ॥

धाई अंतरिंच्या सुखें । काय बडबड वाचा मुखें ॥ १ ॥ विधिनिषेध उर फोडी । जंव नाहीं अनुभव गोडी ॥२॥ वाढे तळमळ उभयतां। नाहीं देखिलें अनुभवितां ॥ ३ ॥ अपुल्या मतें पिसें । परि तें आहे जैसेंतैसें ॥४॥ साधनाची सिद्धि । मौन करा स्थिर बुद्धि ॥५॥ तुका ह्मणे वादें । वांयां गेलीं ब्रह्मवृंदें ॥ ६ ॥

॥ २४६६ ॥

संसारसंगें परमार्थ जोडे । ऐसें काय घडे जाणतेनो ॥१॥ हेंडग्याच्या आळां अवघीं चिपाडें । काय तेथें गोडें निवडावीं ॥ २ ॥ ढेकणाचे बाजे सुखाची कल्पना । मूर्खत्व वचना येऊं पाहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मद्य साडवी लंगोटी । सांगितला सेटीं विचार त्या ॥ ४ ॥

॥ २४६७ ॥

नव्हे ब्रह्मचर्य बाइलेच्या त्यागें । वैराग्य वाउगें देशत्यागें ॥ १ ॥
काम वाढे भय वासनेच्या द्वारें । सांडावें तें धीरें आचावाचे ॥ २ ॥
कांपवूनि टिरी शूरत्वाची मात । केलें वाताहात उचित काळें ॥ ३ ॥
तुका ह्मणे करी जिव्हेसी विटाळ । लटिक्याची मळ स्तुति होतां ॥ ४ ॥

॥ २४६८ ॥

उदंड शाहाणे होत तर्कवंत । परि या नेणवे अंत विठोबाचा ॥ १ ॥
उदंडां अक्षरां करोत भरोवरी । परि ते नेणवे थोरी विठोबाची ॥२॥
तुका ह्मणे नाहीं भोळेपणाविण । जाणीव ते सिण रितें माप ॥ ३ ॥

॥ २४६९ ॥

नाना मतांतरें शब्दाची व्युत्पत्ति । पाठांतरें होती वाचाळ ते ॥ १ ॥
माझ्या विठोबाचें वर्म आहे दुरी । कैंची तेथें उरी देहभावा ॥ २ ॥
यज्ञ याग जप तप अनुष्टान । राहे ध्येय ध्यान आलीकडे ॥ ३ ॥
तुका ह्मणे होय उपरति चित्ता । अंगीं सप्रेमता येणें लागे ॥ ४ ॥

॥ २४७० ॥

शास्त्रज्ञ हो ज्ञाते असती बहुत । परि नाहीं चित्त हातां आलें ॥ १ ॥
क्षणा एका साटीं न धरवे धीर । तेणें हा रघुवीर अंतरतो ॥ २ ॥
तोळाभर सोनें रतिभार राई । मेळविल्या पाहीं नास होतो ॥ ३ ॥
हरीचे अंकित असती विरळागत । तयांसी अच्युत कृपा करी ॥ ४ ॥
तुका ह्मणे काय धुडवण्या गोष्टी । जंव नाहीं गांठीं चित्त आलें ॥ ५ ॥

॥ २४७१ ॥

नाहीं सरों येत जोडिल्या वचनीं । कवित्वाची वाणी कुशळता ॥ १ ॥
सत्याचा अनुभव वेधी सत्यपणें । अनुभवाच्या गुणें रुचों येतो ॥ २ ॥

पाठभेदः—१ वित्पत्ति. २ उडवण्या.

काय अगोपाशीं शृंगारिलें चाले । पोटींचें उकले कसापाशीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें करावा उकल । लागेचि ना बोल वाढवूनि ॥ ४ ॥

॥ २४७२ ॥

येथें नाहीं उरों आले अवतार । येर ते पामर जीव किती ॥ १ ॥
विषयांचे झर्णा व्हाल लोलिंगत । चवलिया अंत न लगे मज ॥ २ ॥
वाहोनियां भार कुंथसील ओझें । नव्हे तेंचि माझें थीता त्याग ॥ ३ ॥
तुका ह्मणे कैसी नाहीं त्याची लाज । संतीं केशीराज साधियेला ॥ ४ ॥

॥ २४७३ ॥

घरोघरीं अवघें जालें ब्रह्मज्ञान । परि मेळवण बहु माजी ॥ १ ॥
निरें कोणापाशीं होय एक रज । तरि द्या रे मज दुर्बळासी ॥ २ ॥
आशा तृष्णा माया कालवूनि दोन्ही । दंभ तो दुरोनि दिसतसे ॥ ३ ॥
काम क्रोध लोभ सिणवी बहुत । सेलवूनि आंत काळकूट ॥ ४ ॥
तुका ह्मणे तेथें कांहीं हातां नये । आयुष्य मोलें जाये वांयांविण ॥ ५ ॥

॥ २४७४ ॥

देखीचें तें ज्ञान करावें तें काई । अनुभव नाहीं आपणासी ॥ १ ॥
इंद्रियांचे गोडी ठकलीं बहुतें । सोडितां मागुतें आवरेना ॥ २ ॥
युक्तीचा आहार नीतीचा वेव्हार । वैराग्य तें सार तरावया ॥ ३ ॥
नाव रेवाळितां घाला घाली वारा । तैसा तो पसारा अहंतेचा ॥ ४ ॥
तुका ह्मणे बुद्धि आपुले अधीन । करी नारायण आतुडे तो ॥ ५ ॥

॥ २४७५ ॥

नव्हे ब्रह्मज्ञान बोलतां हे[१] सिद्ध । जंव हा आत्मबोध नाहीं चित्तीं ॥ १ ॥
काय करिसी वांयां लटिकाची पाल्हाळ । श्रम तो केवळ जाणिवेचा ॥ २ ॥
मीच देव ऐसें सांगसी या लोकां । विषयांच्या सुखा टोंकोनियां ॥ ३ ॥

---

पाठभेदः—१ हा शब्द आढळत नाहीं. २ हा शब्द कोठें कोठें नाहीं.

अमृताची गोडी पुढिलां सांगसी । आपण उपवासी मरोनियां ॥ ४ ॥
तुका ह्मणे जरि राहील तळमळ । ब्रह्म तें केवळ सदोदित ॥ ५ ॥

॥ २४७६ ॥

ब्रह्मज्ञान जरी एके दिवसीं कळे । तात्काळ हा गळे अभिमान ॥१॥
अभिमान लागे शुकाचिये पाठीं । व्यासें उपराटी दृष्टी केली ॥ २ ॥
जनकभेटीसी पाठविला तेणें । अभिमान नाणें खोटें केलें ॥ ३ ॥
खोटें करूनियां लाविला अभ्यासीं । मेरुशिखरासी शुक गेला ॥ ४ ॥
जाऊनियां तेणें साधिली समाधी । तुका ह्मणे तधीं होतों आह्मी ॥ ५ ॥

॥ २४७७ ॥

त्रिपुटीच्या योगें । कांहीं नव्हे कोणांजोगें । एक जातां लागें । एक पाठी लागतें ॥ १ ॥ मागें पुढें अवघा काळ । पळों नये नचले बळ । करितां कोल्हाळ । कृपें खांदा हरि वाहे ॥ २ ॥ पापपुण्यात्मयाच्या शक्ती । असती योजिल्या श्रीपती । यावें काकुलती । येथें सत्तानायेका ॥ ३ ॥ तुका उभा पैल थडी । तरि हे प्रकाश निवडी । घातल्या सांगडी । तापे पेटीं हाकारी ॥ ४ ॥

॥ २४७८ ॥

लापनिकशब्दें नातुडे हा देव । मनिंचे गुह्य भाव शुद्ध बोला ॥ १ ॥
अंतरिंचा भेद जाणे परमानंद । जयासी संवाद करणें लागे ॥ २ ॥
तुका ह्मणे जरी आपुलें स्वहित । तरी करीं चित्त शुद्धभावें ॥ ३ ॥

॥ २४७९ ॥

आह्मां हें कौतुक जगा द्यावी नीत । करावे फजित चुकती ते ॥ १ ॥
कासयाचा बाध एकाच्या निरोपें । काय व्हावें कोपें जगाचिया॥२॥
अविद्येचा येथें कोठें परिश्रम । रामकृष्णनाम ऐसे बाण ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें खऱ्याचा विकरा । न सरती येरा खोट्या परी ॥४॥

॥ २४८० ॥

नका धरूं कोणी । राग वचनाचा मनीं ॥ १ ॥ येथें बहुतांचें हित । शुद्ध करोनि राखा चित्त ॥ २ ॥ नाहीं केली निंदा । आह्मीं दूषिलेंसे भेदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज । येणेंविण काय काज ॥ ४ ॥

॥ २४८१ ॥

सेवितों रँस तो वांटितों आणिकां । घ्या रे होऊं नका राणभरी ॥ १ ॥ विटेवरी ज्याचीं पाउलें समान । तोचि एक दानशूर दाता ॥ २ ॥ मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धी याचे पायीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप ॥ ४ ॥

॥ २४८२ ॥

गाजराची पुंगी । तैसे नवे जाले जोगी ॥ १ ॥ काय करोनि पठन । केली अहंता जतन ॥ २ ॥ अल्प असे ज्ञान । अंगीं ताठा अभिमान ॥ ३ ॥ तुका ह्मणे लंड । त्याचें हाणोनि फोडा तोंड ॥ ४ ॥

॥ २४८३ ॥

घालूनियां मध्यावँर्ती । दाटुनि उपदेश देती ॥ १ ॥ ऐसे पोटभरे संत । तयां कैंचा भगवंत ॥ २ ॥ रांडापोरांतें गोविती । वर्षासन ते लाविती ॥ ३ ॥ जसें बोलती निरोपणीं । तैसी न करिती करणी ॥ ४ ॥ तुका ह्मणे तया । तमोगुणिँयांची क्रिया ॥ ५ ॥

॥ २४८४ ॥

परद्रव्य परनारी । अभिळासूनि नाक धरी ॥ १ ॥ जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर ॥ २ ॥ सोंवळ्याची स्फीति । क्रोधें विटाळला चित्तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सोंग । दावी बाहेरील रंग ॥ ४ ॥

॥ २४८५ ॥

भोंदावया मीस घेऊनि संतांचें । करी कुटुंबाचें दास्य सदा ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ सेवितों हा रस. २ गुडगुडीची. ३ मध्यवर्ती. ४ तमोगुणियांची.

मनुष्याचे परी बोलं[1] रावा करी । रंजवी नरनारी जगामध्यें ॥ २ ॥
तिमयाचा बैल करी सिकविलें । चित्रींचें बाहुलें गोष्टी सांगे ॥ ३ ॥
तुका ह्मणे देवा जळो हे महंती । लाज नाहीं चित्तीं निसुगातें ॥ ४ ॥

॥ २४८६ ॥

पुराणीक ह्मणविती । जाणोनि कांदे भक्षिती ॥ १ ॥ अगस्तीचें मूत्र मळ । लावुनि ह्मणती कृष्णावळ ॥ २ ॥ श्रेष्ठ वर्ण ब्राह्मणाचा । संग न सुटे शूद्रीचा ॥ ३ ॥ बद्राहीच्या पाडी दाढा । लागे तुकयाचा हुंदाडा ॥ ४ ॥

॥ २४८७ ॥

बोली मैंदाची बरवी असे । वाटे अंतरीं घालावे फांसे ॥ १ ॥
कैसा वरिवरि दिसताहे चांग । नव्हे भाविक केवळ मांग ॥ २ ॥
टिळा टोपी माळा कंठीं । अंधारीं नेउनि चेपी घांटी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तो केवळ पुंड । त्यावरि वाजती यमदंड ॥ ४ ॥

॥ २४८८ ॥

डोई वाढवूनि केश । भूतें आणिती अंगास ॥ १ ॥ तरी ते नव्हति संत जन । तेथें नाहीं आत्मखुण ॥ २ ॥ मेळवूनि नरनारी । शकुन सांगती नानापरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मैंद । नाहीं त्यापासीं गोविंद ॥ ४ ॥

॥ २४८९ ॥

टिळा टोपी माळा देवाचें गवाळें । वागवी वोंगळें पोटासाटीं ॥ १ ॥
तुळसी खोवी कानीं दर्भ खोवीं शेंडी । लटिकी धरी बोंडी नासिकाची ॥ २ ॥
कीर्तनाचे वेळे रडे पडे लोळे । प्रेमेंविण डोळे[2] गळताती ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसे भावेचे मइंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ४ ॥

॥ २४९० ॥

होऊनि संन्यासी भगवीं लुगडीं । वासना न सोडी विषयांची ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ बोले. २ गळे दाटताती.

निंदिती कदान्न इच्छिती देवान्न । पाहाताती मान आदराचा ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसें दांभिक भजन । तया जनार्दन भेटे केवीं ॥ ३ ॥

॥ २४९१ ॥

लांबवूनि जटा नेसोनि कासोटा । अभिमान मोटा करिताती ॥ १ ॥
सर्वांगा करिती विभूतिलेपन । पाहाती मिष्टान्न भक्षावया ॥ २ ॥
तुका ह्मणे त्यांचा नव्हे हा स्वधर्म । न कळतां वर्म मिथ्यावाद ॥३॥

॥ २४९२ ॥

कान फाडूनियां मुद्रा ते घालिती । नाथ ह्मणविती जगामाजी ॥ १ ॥
घालोनियां फेरा मागती द्रव्यासी । परि शंकरासी नोळखती ॥ २ ॥
पोट भरावया शिकती उपाय । तुका ह्मणे जाय नर्कलोका ॥ ३ ॥

॥ २४९३ ॥

कौडीकौडीसाटीं फोडिताती शिर । काढूनि रुधिर मळंग ते ॥ १ ॥
पांघरती चर्म लोहाची सांकळी । मारिती आरोळी धैर्यबळें ॥ २ ॥
तुका ह्मणे त्यांचा नव्हेचि स्वधर्म । न कळेचि वर्म गोविंदाचें ॥ ३ ॥

॥ २४९४ ॥

लावूनियां मुद्रा बांधोनियां कंठीं । हिंडे पोटासाटीं देशोदेशीं ॥ १ ॥
नेसोनि कोपीन शुभ्रवर्ण जाण । पाहाती पक्वान्न क्षेत्रींचें तें ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसे मावेचे मइंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ३ ॥

॥ २४९५ ॥

दाढी डोई मुंडी मुंडुनियां सर्व । पांघुरती बरवें वस्त्र काळें ॥ १ ॥
उंफराटी काठी घेउनियां हातीं । उपदेश देती सर्वत्रासी ॥ २ ॥
चाळवुनी रांडा देउनियां भेप । तुका ह्मणे त्यास यम दंडी ॥ ३ ॥

॥ २४९६ ॥

होउनी जंगम विभूती लाविती । शंख वाजविती घरोघरीं ॥ १ ॥

शिवाचें निर्माल्य तीर्था न सेविती । घंटा वाजविती पोटासाटीं ॥ २ ॥
तुका ह्मणे त्यांसी नाहीं शिवभक्ति । व्यापार करिती संसाराचा ॥ ३ ॥

॥ २४९७ ॥

टिळा टोपी उंच दावी । जगीं मी एक गोसावी ॥ १ ॥ अवघा वरपंग सारा । पोटीं विषयांचा थारा ॥ २ ॥ मुद्रा लाविती कोंगोनि । मान व्हावयासी जनीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसे किती । नरका गेले पुढें जाती ॥ ४ ॥

॥ २४९८ ॥

लांब लांब जटा काय वाढवूनि । पावडें घेऊनि क्रोधें चाले ॥ १ ॥
खायाचा वोळसा शिव्या दे जनाला । ऐशा तापशाला बोध कैंचा ॥ २ ॥
सेवी भांग अफू तमाखू उदंड । परि तो अखंड भ्रांतीमाजी ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसा सर्वस्वें बुडाला । त्यासी अंतरला पांडुरंग ॥ ४ ॥

॥ २४९९ ॥

सदा सर्वकाळ अंतरीं कुटिल । तेणें गळा माळ घालूं नये ॥ १ ॥
ज्यासी नाहीं धर्म दया क्षमा शांति । तेणें अंगीं विभूती लावूं नये ॥ २ ॥
जयासी न कळे भक्तीचें महिमान । तेणें ब्रह्मज्ञान बोलों नये ॥ ३ ॥
ज्याचें मन नाहीं लागलें हातासी । तेणें प्रपंचासी टाकूं नये ॥ ४ ॥
तुका ह्मणे ज्यासी नाहीं हरिभक्ति । तेणें भगवें हातीं धरूं नये ॥ ५ ॥

॥ २५०० ॥

संतचिन्हें लेउनि अंगीं । भूषण मिरविती जगीं ॥ १ ॥ पडिले दु:खाचे सागरीं । वहावले ते भवपुरीं ॥ २ ॥ कामक्रोधलोभ चित्तीं । वरिवरि दाविती विरक्ती ॥ ३ ॥ आशापाशीं बांधोनि चित्त । ह्मणती जालों आह्मी मुक्त ॥ ४ ॥ त्यांचे लागले संगती । जाली त्यांची तेचि गति ॥ ५ ॥ तुका ह्मणे शब्दज्ञानें । जग नाडियेलें तेणें ॥ ६ ॥

पाठभेद:—१ त्यांसी.

॥ २५०१ ॥

मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धन अभिमान ॥ १ ॥ ऐसियाची करितां सेवा । काय सुख होय जीवा ॥ २ ॥ पोटासाटीं संत । जाले कळींत बहुत ॥ ३ ॥ विरळा ऐसा कोणी । तुका त्यासि लोटांगणी ॥ ४ ॥

॥ २५०२ ॥

ऐसे कैसे जाले भोंदू । कर्म करोनि ह्मणती साधू ॥ १ ॥ अंगा लावूनियां राख । डोळे झांकुनी करिती पाप ॥ २ ॥ दावुनि वैराग्याची कळा । भोगी विषयाचा सोहळा ३ तुका ह्मणे सांगों किती । जळो तयांची संगती ॥ ४ ॥

॥ २५०३ ॥

ऐसे नाना भेष घेउनी हिंडती । पोटासाटीं घेती प्रतिग्रह ॥ १ ॥ परमार्थासी कोण त्यजी संवसार । सांगापां साचार नांव त्याचें ॥ २ ॥ जन्मतां संसार त्यजियेला शुकें । तोचि निष्कळंक तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ २५०४ ॥

एक करिती गुरु गुरु । भोंवता भारु शिष्यांचा ॥ १ ॥ पुंस नाहीं पाय चारी । मनुष्य परी कुतरीं तीं ॥ २ ॥ परस्त्री मद्यपान । पेंडखाण माजविलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे निर्भर चित्तीं । अधोगती जावया ॥ ४ ॥

॥ २५०५ ॥

सद्गुरुवांचूनि प्रेतरूप वाणी । बोलती पुराणीं व्यासऋषि ॥ १ ॥ ह्मणोनि तयाचें पाहूं नये तोंड । निगुरा अखंड सुतकाळा ॥ २ ॥ कोणे परी तया नव्हेचि सुटका । देह त्याचा लटिका जाणा तुह्मी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसीं बोलती पुराणें । संतांचीं वचनें मागिलां हो ॥ ४ ॥

॥ २५०६ ॥

शिष्या सांगे उपदेश । गुरुपूजा हे विशेष ॥ १ ॥ दावी आचार सोवळे । दंड कमंडलु माळे ॥ २ ॥ छाटी भगवी मानसीं । व्यर्थ ह्मणवी संन्यासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे लोभ । न सुटे नाहीं लाभ ॥ ४ ॥

॥ २५०७ ॥

देखोवेखीं करिती गुरु । नाहीं ठाउका विचारु ॥ १ ॥ वर्म तें न पडे ठायीं । पांडुरंगाविण कांहीं ॥ २ ॥ शिको कळा शिकों येती । प्रेम नाहीं कोणां हातीं ॥३॥ तुका ह्मणे सार । भक्ति नेणती गव्हार ॥ ४ ॥

॥ २५०८ ॥

तक्र शिष्या मान । दुग्धा ह्मणे नारायण॥ १ ॥ऐशीं ज्ञानाचीं डोबडें । आशा विटंबिलीं मूढें ॥ २ ॥ उपदेश तो जगा । आपण सोंवळा इतका मांगा ॥ ३ ॥ रसनाशिश्नाचे अंकित । तुका ह्मणे वरदळ स्फीत ॥ ४ ॥

॥ २५०९ ॥

गुरुमार्गामुळें भ्रष्ट सर्व काळ । ह्मणती याती कुळ नाहीं ब्रह्मीं ॥१॥
पवित्राला ह्मणती नको हा कंटक । मानिती आत्मिक अनामिका ॥२॥
डोहोर होलार दासी बलुती बारा। उपदेशिती फारा रांडापोरा ॥ ३ ॥
कांहीं टाण्या टोण्या विप्र शिष्य होती । उघडी फजिती स्वधर्माची ॥४॥
नसता करुनी होम खाती एके ठायीं । ह्मणती पाप नाहीं मोक्ष येणें॥५॥
इंद्रियांचे पेठे भला कौल देती । मर्यादा जकाती माफ केली ॥ ६ ॥
नाहीं शास्त्राधार पात्रापात्र नेणे । उपदेशून घेणें द्रव्य कांहीं ॥ ७ ॥
तुका ह्मणे ऐसे गुरु शिष्य पूर्ण। विठोबाची आण नरका जाती ॥८॥

॥ २५१० ॥

जळोजळो तें गुरुपण । जळोजळो तें चेलेपण ॥१॥ गुरु आला वेशी द्वारीं । शिष्य पळतो खिडोरीं ॥ २ ॥ काशासाटीं जालें येणें । त्याचें आलें वर्षासन ॥३॥ तुका ह्मणे चेला । गुरु दोघेहि नरकाला ॥ ४ ॥

॥ २५११ ॥

अंगीं घेऊनियां वारें दया देती । तया भक्तां हातीं चोट आहे ॥१॥
देव्हारा बैसोनि हालविती सुपें । ऐसीं पापी पापें लिंपताती ॥ २ ॥
एकीबेकीन्यायें होतसे प्रचित । तेणें लोक समस्त भुलताती ॥ ३ ॥

तयांचे स्वाधीन दैवतें असती । तरि कां मरती त्यांचीं पोरें ॥ ४ ॥
तुका ह्मणे पाणी अंगारा जयाचा । भक्त कान्होबाचा तोही नव्हे ॥५॥

॥ २५१२ ॥

जगीं कीर्ति व्हावी । ह्मणोनि जालासि गोसावी ॥ १ ॥ बहुत केलें पाठांतर । वर्म राहिलेंसे दूर ॥२॥ चित्तीं नाहीं अनुताप । लटिकें भगवें स्वरूप ॥ ३ ॥ तुका ह्मणे सिंदळीच्या । व्यर्थ श्रमविली वाचा ॥ ४ ॥

॥ २५१३ ॥

काहे लकडा घांस कटावे । खोद हि जुमीन मठ बनावे ॥ १ ॥
देवलवासी तरवरछाया । घरघर माई खपरिवसमाया ॥ २ ॥
कां छाडिये भार फेरे सीर भागें । मायाकों दुःख मिटलिये अंगें ॥३॥
कहे तुका तुम सुनो हो सिद्धा । रामविना और झुटा कछु धंदा ॥ ४ ॥

॥ २५१४ ॥

न कळे ब्रह्मज्ञान आचार विचार । लटिका वेव्हार करीतसे ॥ १ ॥
विश्वामित्रीं पोटीं तयाचा अवतार । नांव महाखर चांडाळाचें ॥ २ ॥
द्रव्यइच्छेसाटीं करीतसे कथा । काय त्या पापिष्टा न मिळे खाया ॥३॥
पोट पोसावया तोंडें वडवडी । नाहीं धडफुडी एक गोष्टी ॥ ४ ॥
तुका ह्मणे तया काय व्याली रांड । येडतियां भांड जनामध्यें ॥ ५ ॥

॥ २५१५ ॥

मुखें सांगे ब्रह्मज्ञान । जन लोकांची कापितो मान ॥१॥ ज्ञान सांगतो जनासी । नाहीं अनुभव आपणासी ॥२॥ कथा करितो देवाची । अंतरीं आशा बहु लोभाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे तोचि वेडा । त्याचें हाणूनि थोबाड फोडा ॥ ४ ॥

॥ २५१६ ॥

ब्रह्मज्ञानाची भरोवरी । पुढिला सांगे आपण न करी ॥ १ ॥ थू थू

पाठभेदः—१ भंड.

त्याच्या तोंडावरी । व्यर्थ सिणवी वैखरी ॥ २ ॥ कथा करी वरिवरी । प्रेम नसेचि अंतरीं ॥३॥ तुका ह्मणे कवित्व करी । मान वस्तु हे आदरी ॥४॥

॥ २५१७ ॥

माया ब्रह्म ऐसें ह्मणतां धर्मठक । आपणासारिसे लोक नागविले ॥१॥
विषयीं लंपट शिकवी कुविद्या । मनामागें नाद्या होऊनि फिरे ॥ २ ॥
करूनी खातां पाक जिरे सुरण राई । करितां अतित्याई दुःख पावे ॥३॥
औषध द्यावया चाळविलें बाळा । दावूनियां गुळा दृष्टीपुढें ॥ ४ ॥
तरावया आधीं शोधा वेदवाणी । वांजट बोलणीं वारा त्यांचीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे जयां पिंडाचें पाळण । न घडे नारायण भेट तयां ॥ ६ ॥

॥ २५१८ ॥

पिंड पोसावे हें अधमाचें ज्ञान । विलास मिष्टान्न करूनियां ॥ १ ॥
शरीर रक्षावें हा धर्म बोलती । काय असे हातीं तयाचिया ॥ २ ॥
क्षणभंगुर हें जाय न कळतां । ग्रास गिळों सत्ता नाहीं हातीं ॥ ३ ॥
कर्वतिलीं देहें कापियेलें मांस । गेले वनवासा शुकादिक ॥ ४ ॥
तुका ह्मणे राज्य करितां जनक । अग्निमाजी एक पाय जळे ॥ ५ ॥

॥ २५१९ ॥

पिंडपोषकाच्या जळो ज्ञानगोष्टी । झणी दृष्टिभेटी न हो त्याची ॥१॥
नाहीं संतचिन्ह उमटलें अंगीं । उपदेशा लागी पात्र जाला ॥ २ ॥
पोहों नेणे कासे लावितो आणिका । ह्मणावें त्या मूर्खा काय आतां ॥३॥
सिणलें तें गेलें सिणलियापासीं । जाली त्या दोघांसी एक गति ॥४॥
तुका ह्मणे अहो देवा दिनानाथा । दृकपात आतां नको त्याचें ॥ ५ ॥

॥ २५२० ॥

अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नव्हे ॥ १ ॥
नाहीं भाव तया सांगावें तें किती । आपुलाल्या मतीं पाषांडिया ॥२॥

जया भावें संत बोलिले वचन । नाहीं अनुमोदन शब्दिकांसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे संतीं भाव केला बळी । न कळतां खळीं दूषिला देव ॥ ४ ॥

॥ २५२१ ॥

जीव तोचि देव भोजन ते भक्ति । मरण तेचि[1] मुक्ति पाषांड्याची ॥ १ ॥
पिंडाच्या पोषकीं नागविलें जन । लटिकें पुराण केले वेद ॥ २ ॥
मना आला तैसा करिती विचार । ह्मणती संसार नाहीं पुन्हा ॥ ३ ॥
तुका ह्मणे पाठीं उडती यमदंड । पापपुण्य लंड न विचारिती ॥ ४ ॥

॥ २५२२ ॥

शब्दज्ञानी येऊं नेदीं दृष्टीपुढें । छळवादी कुडे अभक्त ते ॥ १ ॥
जळो ते जाणींव जळो त्यांचे दंभ । जळो त्यांचें तोंड दुर्जनांचें ॥ २ ॥
तुका ह्मणे येती दाटुनि छळाया । त्यांच्या बोडूं डोया न धरूं भीड ॥ ३ ॥

॥ २५२३ ॥

अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ती । तयाचिये चित्तीं[2] बोध कैंचा ॥ १ ॥
अज्ञानाची पूजा कामिक भावना । तयाचिया ध्याना देव कैंचा ॥ २ ॥
अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी मन । निष्काम साधन तया कैंचें ॥ ३ ॥
अज्ञानाचें ज्ञान विषयावरी ध्यान । ब्रह्म सनातन तया कैंचें ॥ ४ ॥
तुका ह्मणे जळो ऐसियांचें तोंड । अज्ञानाचें बंड वाढविती ॥ ५ ॥

॥ २५२४ ॥

ज्यासी विषयाचें ध्यान । त्यासी कैंचा नारायण ॥ १ ॥ साधु कैंचा पा-
पीयासी । काय चांडाळासी काशी ॥ २ ॥ काय पतितासी पिता । काय
अधमासी गीता ॥ ३ ॥ तुका ह्मणे निरंजनी । शठ कैंचा ब्रह्मज्ञानी ॥ ३ ॥

॥ २५२५ ॥

शिकल्या बोलाचे सांगतील वाद । अनुभव भेद नाहीं कोणा ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ चि कांहीं प्रतींत नाहीं. २ तयाची ते मती.

पंडित हे ज्ञानी करितील कथा । न मिळती अर्था निजसुखा ॥ २ ॥
तुका ह्मणे जैसी लांचासाटीं ग्वाही । देतील हे नाहीं ठावी वस्तु ॥३॥

॥ २५२६ ॥

वंचित न कळे इंद्रियांचे ओढी । मुखें बडबडी शिकलें तें ॥ १ ॥
आपण जाऊन न्यावीं नरकास । बळें बेताळीस कुळें जग ॥ २ ॥
अबोलणें बोले डोळे झांकुनियां । बडबडी वांयां दंभासाटीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी तेथील पारखी । नाचे देखोदेखीं जाणों खरें ॥ ४ ॥

॥ २५२७ ॥

कोडियाचें गोरेपण । तैसें अहंकारी ज्ञान ॥ १ ॥ त्यासी अंतरीं रिझे कोण । जवळी जातां चिळसवाण ॥२॥ प्रेत देहा गौरविलें । तैसें विटंबवाणें जालें ॥ ३ ॥ तुका ह्मणे खाणें विष्ठा । तैशा देहबुद्धि चेष्टा ॥ ४ ॥

॥ २५२८ ॥

जाली गाढवी दुधाळ । महिमा गाईची पावेल ॥ १ ॥ श्वान जालेंसे चांगलें । तरी कां सांगातें जेवील ॥ २ ॥ जाली सिंदळा चांगली । तरि कां पतिव्रता जाली ॥३॥ तुका ह्मणे ऐशा जाति । काय उंचपण पावती ॥४॥

॥ २५२९ ॥

घेऊं नये तैसें दान । ज्याचें धन अभिळाषी ॥१॥ तोही येथें कामा नये । नर्का जाय ह्मणोनि ॥२॥ विकी स्नानसंध्या जप । करी तप पुढिलांचें ॥३॥ तुका ह्मणे दांभिक तो । नर्का जातो स्वइच्छा ॥ ४ ॥

॥ २५३० ॥

तातडीची धांव अंगा आणि भाव । खोळंबा तो वाव निश्चयाचा ॥१॥
ह्मणउनि बरी विचारावी चाली । उरीचि ते बोली कामा येते ॥ २ ॥
कोरडें वैराग्य माजिरा बडिवार । उतरे तो शूर अंगींचें तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे बरी ह्मऱ्याची ते चाली । सांचवण्या खोली कैसीयांची ॥४॥

॥ २५३१ ॥

लटिक्याचें आंवतणें जेविलिया साच। काय त्या विश्वास तोचि खरा ॥ १ ॥
कोल्हांटिणी लागे आकाशीं खेळत। ते काय पावत अमरपद ॥ २ ॥
जळमंडपयाचे घोडे राउत नाचती। ते काय तगती युद्धालागीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तैसें मतवादीयांचें जिणें। दिसे लाजिरवाणें बोलतांचि ॥ ४ ॥

॥ २५३२ ॥

भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा। तेथें अनुभवाचा काय पंथ ॥ १ ॥
वाढवुनी जटा फिरे दाही दिशा। तरी जंबु वेषा सहज स्थिति ॥ २ ॥
कोरोनियां भूमी करिती मधीं वास। तरी उंदरास काय वाणी ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसें कासया करावें। देहासी दंडावें वाउगेंचि ॥ ४ ॥

॥ २५३३ ॥

वाघाचा कालभूत दिसे वाघाऐसा। परी नाहीं दशा साच अंगीं ॥ १ ॥
बाहेरील रंग निवडी कसोटी। संघट्टणें भेटी आपेआप ॥ २ ॥
सिकविलें तैसें नाचावें माकडें। न चले त्यापुढें युक्ति कांहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे करी लटिक्याचा सांटा। फजित तो खोटा शीघ्र होय ॥ ४ ॥

॥ २५३४ ॥

जातीचें तें चढे प्रेम। पक्षी स्मरे राम राम ॥ १ ॥ ते काय गुण लागती
येरां। कागा पिंजरा शोभेना ॥ २ ॥ शिकविलें तें सुजात सोसी। मग तयासी
मोल चढे ॥ ३ ॥ तुका ह्मणे वेषधारी। हिजड्या नारी नव्हेति ॥ ४ ॥

॥ २५३५ ॥

तांबियाचें नाणें न चले खऱ्या मोलें। जरी हिंडविलें देशोदेशीं ॥ १ ॥
करणीचें कांहीं न मने सज्जना। यावें लागे मना वृद्धांचिया ॥ २ ॥
हिरियासारिखा दिसे शिरगोळा। पारखी ते डोळां न पाहाती ॥ ३ ॥

---

पाठभेदः—१ तडवती.

देऊनियां भिंग कामाविलें मोतीं । पारखिया हातीं घेतां नये ॥ ४ ॥
तुका ह्मणे काय नटोनियां व्यर्थ । आपुलें हें चित्त आपणा ग्वाही ॥५॥

॥ २५३६ ॥

मुसळाचें धनु नव्हे हो सर्वथा । पाषाण पिळितां रस कैंचा ॥ १ ॥
वांझे बाळा जैसें दुध नाहीं स्तनीं । गारा त्या अधर्णी न सिजती ॥२॥
नवखंड पृथ्वी पिके मृग जळें । डोंगर भेटे बळें असमानासी ॥३॥
नैश्वर देह तेणें तेव्हां होय ब्रह्म । तुका ह्मणे श्रम करुनी काय ॥४॥

॥ २५३७ ॥

दुधाचे घागरी मद्याचा हा बुंद । पडिलिया शुद्ध नव्हे मग ॥ १ ॥
तैसें खळां मुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें ॥ २ ॥
काय करावीं तीं बत्तीस लक्षणें । नाक नाहीं तेणें वांयां गेलीं ॥३॥
तुका ह्मणे अन्न जिरों नेदी माशी । आपुलिया जैशी संवसर्गें ॥ ४ ॥

॥ २५३८ ॥

वरिवरि बोले युद्धाचिया गोष्टी । परसैन्या भेटी नाहीं जाली ॥ १ ॥
पराव्याचे भार पाहुनियां दृष्टी । कांपतसे पोटीं थरथरां ॥ २ ॥
मनाचा उदार रायाचा जुंझार । फिरंगीचा मार मारीतसे ॥ ३ ॥
धन्य त्याची माय धन्य त्याचा बाप । अंगीं अनुताप हरिनामें ॥४॥
तुका ह्मणे साधु बोले खगधार । खोंचतें अंतर दुर्जनाचें ॥ ५ ॥

॥ २५३९ ॥

लटिकी ग्वाही सभेआंत । देतां पतित आगळा ॥ १ ॥ कुंभपाकीं वस्ती करू । होय धुरु कुळेसी ॥ २ ॥ रजस्वला रुधिर स्रवे । तेंचि घ्यावें तृषेसी ॥३॥ तुका ह्मणे जन्मा आला । काळ जाला कुळासी ॥ ४ ॥

॥ २५४० ॥

चोरें चोरातें करावा उपदेश । आपुला अभ्यास असेल तो ॥ १ ॥

शिंदळीच्या अंगणीं वेचितां पाउलें। होईल आपुलें तिच्या ऐसें ॥२॥
तुका ह्मणे भितों पुढिलिया दत्ता । ह्मणऊनि चिंता उपजली ॥ ३ ॥

॥ २५४१ ॥

एकाचिये सोई कवित्वाचे बांधे । बांधिलिया साधे काय तेथें ॥ १ ॥
काय हातीं लागे भुसाचे कांडणीं। सत्यासी दाटणी करुनि कार्य ॥२॥
कवित्वाचे रूढी पायां पाडी जग । सुखवोनि मग नरका जाय ॥३॥
तुका ह्मणे देव केल्याविणसाहे। फजिती ते आहे लटिक्या अंगीं ॥४॥

॥ २५४२ ॥

कानीं धरी बोल बहुतांचीं मतें । चाट त्यापरतें आणीक नाहीं ॥१॥
पावेल गौरव वोढाळाचे परी । दंड पाठीवरी यमदूतां ॥ २ ॥
शब्दज्ञानी एक आपुलाल्या मतें । सागती वेदांत भिन्नभावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे एक भाव न धरिती । पडिली हे माती त्यांचे तोंडीं ॥४॥

॥ २५४३ ॥

भजन या नासिलें हेंडि । दंभा लंडा आवडी ॥१॥ जेवीत ना आइता पाक । नासी ताक घुसळूनि ॥२॥ एकाएकीं इच्छी पाठ । नेणे चाट कां जेवूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे मुलाम्याचें । बंधन साचें सेवटीं ॥ ४ ॥

॥ २५४४ ॥

तरी कां वोळगणे। राजद्वारीं होती सुने ॥१॥ अंगीं दावुनि निष्कामता। पोकळ पोकळी ते वृथा ॥२॥ कासया मोकळ । भोंवतें शिष्यांचें गाबाळ ॥३॥ तुका ह्मणे ढाळे । बाहेर गुदे तें निराळें ॥ ४ ॥

॥ २५४५ ॥

इंद्रियांसी नेम नाहीं । मुखीं राम ह्मणोनि काई ॥ १ ॥ जेविंमासीसंगें अन्न । सुख नेदी तें भोजन ॥ २ ॥ कीर्तन करावें । तैसें

---

पाठभेदः—१ मागें. २ ठेवी. ३ बाह्यरंग.

करूनी दावावें ॥ ३ ॥ हे तों अंगीं नाहीं चिन्हें । गाइलें वेश्येच्या ढव्यानें ॥ ४ ॥ तुका ह्मणे रागा । संत शिवूं नेदिती अंगा ॥ ५ ॥

॥ २५४६ ॥

गुळें माखोनियां दगड ठेविला । वर दिसे भला लोकाचारीं ॥ १ ॥ अंतरीं विषयाचें लागलें पैं पिसें । बाहिरल्या वेषें भुलवी लोकां ॥२॥ ऐसिया डांभिका[1] कैंची हरिसेवा । नेणेचि सद्भावा कोणेकाळीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे येणें कैसा होय संत । विटाळलें चित्त कामक्रोधें ॥ ४ ॥

॥ २५४७ ॥

नाहीं संतांशीं शरण । काय वाचोनि पुराण ॥ १ ॥ ह्मणे विठ्ठलाचा दास । देखोनी परनारीस हांसे ॥२॥ करिती विठोबाची भक्ति । दयाधर्म नाहीं चित्तीं ॥३॥ तेथें नाहीं माझा देव । व्यर्थ श्रमवी हा जिव ॥४॥ अंगीं नाहीं क्षमा दया । ह्मणती भेट पंढरिराया॥५॥नाहीं धर्माची वासना । काय करोनि प्रदक्षिणा॥६॥ऐसें नव्हे भक्तिवर्म । तेथें नाहीं माझा राम॥७॥नये कृपा कांहीं केल्या।नये घाम जीव गेल्या८जैसी खड्गाची धार।विठ्ठल चरणीं तुका शूर९

॥ २५४८ ॥

चिरगुटें घालूनि वाढविलें पोट । गऱ्हवार बोभाट जनामध्यें ॥ १ ॥ लटिकेची डोहळे दाखवी प्रकार । दुध स्तनीं पोर पोटीं नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे अंतीं वांजचि ते खरी । फजिती दुसरी जनामध्यें ॥ ३ ॥

॥ २५४९ ॥

वांझेनें दाविलें गऱ्हवार लक्षण । चिरगुटें घालून वाथयाला ॥ १ ॥ स्वप्नींचें धन चित्रींच्या ब्राह्मणा । जातकर्म जाणावांटिती पैं ॥ २ ॥ तेवीं शब्दज्ञानी करिती चावटी । ज्ञान पोटासाटीं विकूनियां ॥ ३ ॥ बोलाचिच कढी बोलाचाचि भात । जेवुनियां तृप्त कोण जाला ॥४॥

---

पाठभेदः—१ दांभिका.

कागदीं लिहितां नामाची साकर । चाटितां मधुर गोडी नेदी ॥ ५ ॥
तुका ह्मणे जळो जळो ते महंती । नाहीं लाज चित्तीं आठवण ॥६॥

॥ २५५० ॥

व्यालयाविण करी शोभनतांतडी । चार ते गधडी करीतसे ॥ १ ॥
कासया पाल्हाळ आणिकांचे देखी । सांगतां नव्हे सुखी साकरेसि ॥२॥
कुंथाच्या ढेकरें न देवेल पुष्टी । रूप दावी कष्टी मळिण वरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे अरे वाचाळ हो ऐका । अनुभवेंविण नका वाव घेऊं ॥४॥

॥ २५५१ ॥

तरलों ह्मणुनि धरिला ताठा । त्यासी चळ जाला फांटा ॥१॥ त्रांयांविण तुटे दोड । मान सुख इच्छी भांड ॥२॥ ग्वाहीविण मात । स्थापी आपुली सतत ॥३॥ तुका ह्मणे ऐसीं कितीं । नरका गेलीं अधोगती ॥४॥

॥ २५५२ ॥

अंधळें तें सांगे सांगितल्या खुणा । अनुभव देखणा प्रगट त्या ॥ १ ॥
नांदणुक सांगे वडिलाचें बळ । कैसा तो दुर्बळ सुख पावे ॥ २ ॥
तुका ह्मणे नांदों आपल्या प्रतापें । तयाची लोकांपें स्तुती सांगों ॥३॥

॥ २५५३ ॥

स्वप्नींच्या व्यवहारा काळांतर लेखा । जागृतीसी रुका गांठी नाहीं ॥ १ ॥
तेवीं शब्दज्ञानें करिती चावटी । ज्ञान पोटासाटीं विकूं नये ॥ २ ॥
बोलाचीच कढी बोलाचाचि भात । जेवूनियां तृप्त कोण जाला ॥ ३ ॥
कागदीं लिहिली नांवाची साकर । चाटितां मधुर केवीं लागे ॥ ४ ॥
तुका* ह्मणे जळो जळो त्याचें ज्ञान । यमपुरी कोण दंड साहे ॥५॥

॥ २५५४ ॥

जाणे त्याचें वर्म नेणें त्याचें कर्म । केल्याविण धर्म नेणवती ॥ १ ॥

---

पाठभेदः—* तुका ह्मणे जळो तैसें ज्ञान वंड । यमपुरीं दंड कठिण आहे ॥

मैथुनाचें सुख सांगितल्या शून्य । अनुभवाविण कळूं नये ॥ २ ॥
तुका ह्मणे जळो शाब्दिक हें ज्ञान । विठोबाची खूण विरळा जाणे ॥३॥

॥ २५५५ ॥

जपाचें निमित्त झोंपेचा पसरु । देहाचा विसरू पाडूनियां ॥ १ ॥
ऐसें[1] तें भजन अमंगळवाणी । सोंगसंपादणी बहुरूप्याची ॥ २ ॥
सेवेसी विकिलें लोभाचिया आसे । तया कोठें असे उरला देव ॥ ३ ॥
तुका ह्मणे मानदंभ जया चित्तीं । तयाची फजीती करूं आह्मी ॥४॥

॥ २५५६ ॥

माझी पाठ करा कवी । उट लावी दारोदार ॥ १ ॥ तंव तया पारखी सिव । लाजे ठाव सांडितां ॥२॥ उष्टावळी करूनि जमा । कुंथुनि प्रेमा आणितसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे बाहेरमुदी । आहाच गोविंदीं न सरतां ॥ ४ ॥

॥ २५५७ ॥

भाव नाहीं काय मुद्रा वाणी । बैसे बगळा निश्चळ ध्यानीं ॥ १ ॥
न मनी नाम न मनी त्यासी । वाचाळ शब्द पिटी भासी[2] ॥ २ ॥
नाहीं चाड देवाची कांहीं । छळणें टोंके तस्करघाई ॥ ३ ॥
तुका ह्मणे त्याचा संग । नको शब्द स्पर्शअंग ॥ ४ ॥

॥ २५५८ ॥

मोलें घातलें रडाया । नाहीं असूं आणि माया ॥ १ ॥ तैसा भक्तिवाद काय । रंगबेगडीचा न्याय ॥२॥ वेठी धरिल्या दावी भाव । मागें पळायाचा पाव ॥ ३ ॥ काजव्याच्या ज्योती । तुका ह्मणे नलगे वाती ॥ ४ ॥

॥ २५५९ ॥

उभ्या बाजारांत कथा । हे तों नावडे पंढरिनाथा ॥ १ ॥ अवघें पोटासाटीं ढोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥ २ ॥ लावी अनुसंधान । कांहीं देईल ह्मणऊन ॥३॥ काय केलें रांडलेंका । तुला राजी नाहीं तुका ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ ऐसीं तीं भजनें. २ भासा.

॥ २५६० ॥

वरि[1] बोला रस । कथी ज्ञान माजी फोस ॥ १ ॥ ऐसे लटिके जे ठक । तयां इह ना परलोक ॥ २ ॥ परिस एक सांगे । अंगा धुळी गा हे न लगे ॥३॥ तुका ह्मणे हाडें । कुतऱ्या लाविलें झगडें ॥ ४ ॥

॥ २५६१ ॥

गांठोळीस धन भाकावी करुणा । दावूनि सज्जना कींव पीडी ॥ १ ॥
नाठेळाची भक्ति कुचराचें बळ । कोरडें वोंगळ मार खाय ॥ २ ॥
सांडोव्यासी घाली देवाची करंडी । विल्हाळ त्या धोंडी पूजा दावी ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसे माकडाचे छंद । अवघे धंदधंद सिंदळींचे ॥ ४ ॥

॥ २५६२ ॥

मोल देऊनियां सांटवावे दोष । नटाचे ते वेशें[2] पाहोनियां ॥ १ ॥
हरिदासां मुखें हरिकथाकीर्तन । तेथें पुण्यें पुण्य विशेषता ॥ २ ॥
हरितील वस्त्रें गोपिकांच्या वेशें । पाप त्या सरिसें मात्रागमन ॥ ३ ॥
तुका ह्मणे पाहा ऐसें जालें जन । सेवाभक्तिहीन रसीं गोडी ॥ ४ ॥

॥ २५६३ ॥

उष्टया पत्रावळी करूनियां गोळा । दाखविती कळा कवित्वाची ॥ १ ॥
ऐसे जे पातकी ते नरकीं पचती । जोंवरी भ्रमती चंद्रसूर्य ॥ २ ॥
तुका ह्मणे एकां[3] नारायणा ध्याई । वरकडा वाहीं शोक असे ॥ ३ ॥

॥ २५६४ ॥

पुण्यविकरा तें मातेचें गमन । भाडी ऐसें धन विटाळ तो ॥ १ ॥
आत्महत्यारा हा विषयांचा लोभी । ह्मणावें तें नाभी करवी दंड ॥ २ ॥
नागवला अल्प लोभाचिये साटीं । घेऊनि कांचवटि परिस दिला ॥३॥
तुका ह्मणे हात झाडिले परत्रीं । श्रम तोचि श्रोत्रीं वेठी केली ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ वरिवरि. २ वेष. ३ एक नारायण.

॥ २५६५ ॥

पशु ऐसे होती ज्ञानी । चर्वणीं या विषयांचे ॥ १ ॥ ठेवूनियां लोभीं लोभ । जाला क्षोभ आत्मत्वीं ॥२॥ केला आणिकां वाढी पाक । खाणें ताक मूर्खासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोठा घात । वाताहात हा देह ॥ ४ ॥

॥ २५६६ ॥

आशाबद्ध वक्ता । भय श्रोतियाच्या चित्ता ॥ १ ॥ गातो तेंही नाहीं ठावें । तोंड वासी कांहीं द्यावें ॥ २ ॥ जालें लोभाचें मांजर । भीक मागे दारोदार ॥ ३ ॥ उभयतां लोभी मन । वांयां गेलें तें भजन ॥ ४ ॥ बहिरें[1] मुके एके ठायीं । तैसें जालें तया दोहीं ॥ ५ ॥ माप आणि गोणी । तुका ह्मणे रितीं दोन्ही ॥ ६ ॥

॥ २५६७ ॥

नाइकावे कानीं तयाचे ते बोल । भक्तीविण फोल ज्ञान सांगे ॥ १ ॥ वाखाणी अद्वैत भक्तिभावेंविण । दुःख पावे सीण श्रोता वक्ता ॥ २ ॥ अहं ब्रह्म ह्मणोनि पाळीतसे पिंडा । बोलों नये भांडा तयासवें ॥ ३ ॥ वेदबाह्य लंड बोले जो पाषांड । त्याचें काळें तोंड संतांमध्यें ॥ ४ ॥ तुका ह्मणे खंडी देवभक्तपण । वरिष्ठ त्याहूनि श्वपच तो ॥ ५ ॥

॥ २५६८ ॥

पंडित ह्मणतां थोर सुख । परि तो पाहातां अवघा मूर्ख ॥१॥ काय करावें घोकिलें । वेदपठण वांयां गेलें ॥ २ ॥ वेदीं सांगितलें तें न करी । सम ब्रह्म नेणे दुराचारी ॥३॥ तुका देखे जीवीं शिव । हाचि तेथींचा अनुभव ॥४॥

॥ २५६९ ॥

जैसें दावी तैसा राहे । तरि कां देव दुरी आहे ॥ १ ॥ दुःख पावायाचें मूळ । रहणी ठाव नाहीं ताळ ॥ २ ॥ माळामुद्रांवरी । कैंचा सोंगें जोडे हरि ॥ ३ ॥ तुका ह्मणे देखें । ऐसे परीचीं बहुतेकें ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ बहिर्मुख.

॥ २५७० ॥

वसोनि थिल्लरीं । बेडुक सागरा धिक्कारी ॥ १ ॥ नाहीं देखिला ना ठावा । तोंड पिटी करी हांवा ॥ २ ॥ फुगतें काउळें । ह्मणे मी राजहंसा आगळें ॥ ३ ॥ गजाहूनि खर । ह्मणे चांगला मी फार ॥ ४ ॥ मुलाम्याचें नाणें । तुका ह्मणे नव्हे सोनें ॥ ५ ॥

॥ २५७१ ॥

कोरड्या गोष्टी चटक्या बोल । शिकल्या सांगे नाहीं ओल ॥ १ ॥ कोण यांचें मना आणी । ऐकों कानीं नाइकोनि ॥ २ ॥ घरोघरीं सांगती ज्ञान । भूस सिणें कांडिती ॥ ३ ॥ तुका ह्मणे आपुल्या मति । काय रितीं पोकळें ॥ ४ ॥

॥ २५७२ ॥

निंदा स्तुती करवी पोट । सोंग दाखवी बोभाट ॥ १ ॥ जटा राख विटंबना । धीर नाहीं क्षमा मना ॥ २ ॥ शृंगारिलें मढें । जीवेंवीण जैसें कुडें ॥ २ ॥ तुका ह्मणे रागें । भलतें चावळे वाउगें ॥ ४ ॥

॥ २५७३ ॥

भक्त ह्मणऊनि वंचावें जीवें । तेणें शेण खावें काशासाटीं ॥ १ ॥ नासिले अडबंद कौपीन ते माळा । अडचण राउळामाजी केली ॥ २ ॥ अंगीकारिले सेवे घडे अंतराय । तया जाला न्याय खापरांचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे कोठें तगों येती घाणीं । आहाचही मनीं अधीरता ॥ ४ ॥

॥ २५७४ ॥

कथे उभा अंग राखेल जो कोणी । ऐसा कोण गणी तया पापा ॥ १ ॥ येथें तो पातकी न येतांच भला । रणीं कुचराला काय चाले ॥ २ ॥ [1]कथे बैसोनी आणीक चर्चा । धिग त्याची वाचा कुंभपाक ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐलपैल ते थडीचे । बुडतील साच मध्यभागीं ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ कथे बैसोनियां आणिक करी चर्चा ॥

॥ २५७५ ॥

नावडे ज्या कथा उठोनियां जाती । ते यमा फावती बरे वोजा ॥१॥
तो असे जवळी गोंचिडाच्या न्यायें । देशत्यागें ठाय तया दुरी ॥२॥
नव्हे भला कोणी नावडे दुसरा । पाहुणा किंकरा यमा होय ॥ ३ ॥
तुका ह्मणे तया करावें तें काई । पाषाण कां नाहीं जळामध्यें ॥ ४ ॥

॥ २५७६ ॥

जवळी नाहीं चित्त । काय सांडियेलें प्रेत ॥१॥ कैसा पाहे चर्मदृष्टी । दीप स्नेहाच्या शेवटीं ॥ २ ॥ कांतेलेंसें श्वान । तैसें दिशा हिंडे मन ॥ ३ ॥ त्याचे कानीं ह्मणे । कोण वोंब तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ २५७७ ॥

काय देवापाशीं उणें । हिंडे दारोदारीं सुनें ॥ १ ॥ करी अक्षरांची आटी । एके कवडीच साटीं ॥ २ ॥ निंदी कोणा स्तवी । चिंतातुर सदा जीवीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भांड । जळो जळो त्याचें तोंड ॥ ४ ॥

॥ २५७८ ॥

ब्राह्मण तो नव्हे ऐसी ज्याची बुद्धि । पाहा श्रुतीमधीं विचारूनि ॥१॥
जयासी नावडे हरिनामकीर्तन । आणीक नर्त्तन[1] वैष्णवांचें ॥ २ ॥
सत्य त्याचे वेळे घडला व्यभिचार । मातेसी वेव्हार अंत्यजाचा ॥३॥
तुका ह्मणे येथें मानी आनसारिखें । तात्काळ तो मुखें कुष्ठ होय ॥४॥

॥ २५७९ ॥

आमचे गोसावी अयाचितवृत्ति । करवी शिष्याहातीं उपदेश ॥ १ ॥
दगडाची नाव आधींच ते जड । ते काय दगड तारूं जाणे ॥ २ ॥
तुका ह्मणे वेष विटंबिला त्यांनीं । सोंगसंपादणी करिती परी ॥ ३ ॥

॥ २५८० ॥

भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनीं धरी ॥ १ ॥ धिग त्याचें सा-

---

पाठभेदः—१ नृत्यन.

धुपण । विटाळूनि वर्ते मन ॥ २ ॥ नाहीं वैराग्याचा लेश । अर्थचाड जीवें आस ॥ ३ ॥ हें ना तेंसें जालें । तुका ह्मणे वांयां गेलें ॥ ४ ॥

॥ २५८१ ॥

घरोघरीं बहु जाले कवि । नेणे प्रसादाची चवी ॥ १ ॥ लंडा भूषणांची चाड । पुढें न विचारी नाड ॥ २ ॥ काढावें आइतें । तेंचि जोडावें स्वहितें ॥३॥ तुका ह्मणे कळे । अहाचे झांकतील डोळे ॥४॥

॥ २५८२ ॥

कवीश्वरांचा तो आह्मांसी विटाळ । प्रसाद वोंगळ चिवडिती ॥ १ ॥ दंभाचे आवडी बहिराट अंधळे । सेवटासि काळें होइल तोंड ॥ २ ॥ सोन्यासेजारीं तो लाखेची जतन । सतंत ते गुण जैसेतैसे ॥ ३ ॥ सेव्यसेवकता न पडतां ठावी । तुका ह्मणे गोवी पावती हीं ॥ ४ ॥

॥ २५८३ ॥

जळो प्रेमा तैसा रंग । जाय भुलोनि पतंग ॥ १ ॥ सासूसाटीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न ॥ २ ॥ मैंद मुखींचा कोंवळा । भाव अंतरीं निराळा ॥ ३ ॥ जैसी वृंदावनकांती । उत्तम धरूं नये हातीं ॥ ४ ॥ बक ध्यान धरी । सोंग करूनि मासे मारी ॥ ५ ॥ तुका ह्मणे सर्प डोले । तैसा कथेमाजी खुले ॥ ६ ॥

॥ २५८४ ॥

संध्या करितोसी केशवाच्या नांवें । आरंभीं तें ठावें नाहीं कैसें ॥१॥ किती या सांगावें करूनि फजित । खळ नेणें हित जवळी तें ॥ २ ॥ माजल्या न कळे उचित तें काय । न घ्यावें तें खाय घ्यावें सांडी ॥३॥ तुका ह्मणे घेती भिंती सवें डोकें । वावसी तीं एकें अंधारलीं ॥ ४ ॥

॥ २५८५ ॥

अडघणीचें दार । बाहेर माजी पैस फार ॥ १ ॥ काय करावें तें

पाठभेदः—१ हा शब्द नाहीं. २ परि होताती अंधळे. ३ संतत. ४ उडोनि.

मौन्य । दाही दिशा हिंडे मन ॥ २ ॥ बाहेर दावी वेश । माजी वासनेचे लेश ॥ ३ ॥ नाहीं इंद्रियां दमन । काय मांडिला दुकान ॥ ४ ॥ सारविलें निकें । वरि माजी अवघे पिकें ॥ ५ ॥ तुका ह्मणे अंतीं । कांहीं न लगेचि हातीं ॥ ६ ॥

॥ २५८६ ॥

काय सर्प खातो अन्न । काय ध्यान बगाचें ॥ १ ॥ अंतरींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ॥२॥ काय उंदीर नाहीं धांवीं। राख लावी गाढव ॥ ३ ॥ तुका ह्मणे सुसर जळीं। काउळीं कां न न्हाती ॥ ४ ॥

॥ २५८७ ॥

काय धोविलें कातडें । काळकुट भीतरि कुडें ॥ १ ॥ उगा राहें लोकभांडा । चाळविल्या पोरें रांडा ॥ २ ॥ घेसी बुंथी पानवथां । उगाच हालविसी माथा ॥ ३ ॥ लावूनि बैसे टाळी । मन इंद्रियें मोकळीं ॥ ४ ॥ हालवीत बैस माळा । विषयजप वेळोवेळां ॥ ५ ॥ तुका ह्मणे हा व्यापार । नाम विठोबाचें सार ॥ ६ ॥

॥ २५८८ ॥

काय काशी करिती गंगा । भीतरीं चांगा नाहीं तो ॥१॥ अधर्णी कुचर बाहेर तैसा । नये रसा पाकासि ॥२॥ काय टिळे करिती माळा। भाव खळा नाहीं त्या ॥३॥ तुका ह्मणे प्रेमेंविण । बोले भुंके अवघा शीण ॥ ४ ॥

॥ २५८९ ॥

काय नाहीं लवत झाडें । विसरे वेडें देहभाव ॥ १ ॥ जया न फळे उपदेश । धस ऐसा त्या नांवें ॥ २ ॥ काय नाहीं असत जड। दगड तो अबोलणा ॥३॥ तुका ह्मणे कुचर दाणा । तैसा ह्मणा ढेंग हा ॥ ४ ॥

॥ २५९० ॥

नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥ १ ॥ तैसी चित्तशुद्धि नाहीं । तेथें बोध करील काई ॥ २ ॥ वृक्ष न धरी पुष्पफळ । काय

करील वसंत काळ ॥ ३ ॥ वांजे न होती लेकुरें । काय कीजे[1] त्या भ्रतारें ॥ ४ ॥ नपुंसका पुरुषासी । काय करील बाइल त्यासी ॥५॥ प्राण गेलिया शरीर । काय करील वेव्हार ॥ ६ ॥ तुका ह्मणे जीवनेंविण । पीक नव्हे नव्हे जाण ॥ ७ ॥

॥ २५९१ ॥

काय दरा करील वन । समाधान नाहीं जंव ॥ १ ॥ तरी काय तेथें असतीं थोडीं । काय जोडी तयांसी ॥ २ ॥ रिघतां धांवा पेंवासधीं । जोडे सिद्धि ते ठायीं ॥ ३ ॥ काय भस्म करील राख । अंतर पाक नाहीं तों ॥ ४ ॥ वर्णाआश्रमाचे धर्म । जाती श्रम जालिया ॥ ५ ॥ तुका ह्मणे सोंग पाश । निरसे आस तें हित ॥ ६ ॥

॥ २५९२ ॥

भोरप्यानें सोंग पालटिलें वरी । बकध्यान करी मत्स्या जैसें ॥ १ ॥ टिळे माळा मैंद मुद्रा लावी अंगीं । देखों नेदी जगीं फांसे जैसें ॥२॥ ढीवर या मत्स्या चारा घाली जैसा । भीतरील फांसा कळों नेदी ॥ ३ ॥ खाटिक हा स्नेहवादें पशु पाळी । कापावया नळी तयासाटीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तैसा भला मी लोकांत । परी तूं कृपावंत पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ २५९३ ॥

मांडे पुऱ्या मुखें-सांगों जाणे मात । तोंडीं लाळ हात चोळी रिते ॥१॥ ऐसियाच्या गोष्टी फिक्या मिठेंविण । रुचि नेदी अन्न चवी नाहीं ॥२॥ बोलों जाणे अंगीं नाहीं शूरपण । काय तें वचन जाळावें तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे बहुतोंड जे वाचाळ । तेंग तेंचि मूळ लटिक्याचें ॥ ४ ॥

॥ २५९४ ॥

आवडीच्या मतें करिती भजन । भोग नारायणें ह्मणती केला ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ करावें भ्रतारें. २ धरा.

अवघा देव ह्मणे वेगळें तें काय । अर्थासाटीं डोय फोडूं पाहे ॥ २ ॥
लाजे कमंडल धरितां भोपळा । आणीक थीगळा प्रावरणा ॥ ३ ॥
झाला गडवे धातुद्रव्यइच्छा चित्तीं । नैश्वर[1] बोलती अवघें मुखें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तयां[2] देवा नाहीं भेटी । ऐसे कल्पकोटि जन्म घेतां ॥ ५ ॥

॥ २५९५ ॥

भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें । ऐसियासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥ १ ॥ देवा पायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव । समर्पिला जीवें । नाहीं तो हा व्यभिचार ॥ २ ॥ जगा घालावें सांकडें । दीन होऊनि बापुडें । हेंचि अभाग्य रोकडें । मूळ आणि विश्वास ॥ ३ ॥ काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार । तुका ह्मणे सार । दृढ पाय धरावे ॥ ४ ॥

॥ २५९६ ॥

आशाबद्ध जन । काय जाणे नारायण ॥ १ ॥ करी इंद्रियांची सेवा । पाहे आवडीचा हेवा ॥ २ ॥ भ्रमलें चावळे । तैसें उचित न कळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे विषें । अन्न नाशियेलें जैसें ॥ ४ ॥

॥ २५९७ ॥

वृत्ति भूमि राज्य द्रव्य उपार्जिती । जाणा त्या निश्चितीं देव नाहीं ॥ १ ॥
भाडेकरी वाहे पाठीवरी भार । अंतरींचें सार लाभ नाहीं ॥ २ ॥
देवपूजेवरी ठेवूनियां मन । पाषाणा पाषाण पूजी लोभें ॥ ३ ॥
तुका ह्मणे फळ चिंतिती आदरें । लाघव हे चार शिंदळीचे ॥ ४ ॥

॥ २५९८ ॥

तीळ जाळिले तांदुळ । काम क्रोध तैसेचि खळ ॥ १ ॥ कां रे सिणलासी वाउगा । न भजतां पांडुरंगा ॥ २ ॥ मानदंभासाटीं । केली अक्षरांची आटी ॥ ३ ॥ तप करूनि तीर्थाटन । वाढविला

पाठभेदः—१ नैश्वर्य. २ यांस.

अभिमान ॥ ४ ॥ वांटिलें तें धन । केली अहंता जतन ॥ ५ ॥ तुका ह्मणे चुकलें वर्म । केला अवघाचि अधर्म ॥ ६ ॥

॥ २५९९ ॥

जाळासी पंडित पुराण सांगसी । परी तूं नेणसी मी हें कोण ॥ १ ॥ गाढवभरी पोथ्या उलथिशी पानें । परि गुरुगम्यखुणे नेणशी बापा ॥२॥ तुका कुणबियाचा नेणे शास्त्रमत । एक पंढरिनाथ विसंबेना ॥ ३ ॥

॥ २६०० ॥

वरतें करोनियां तोंड । ह्याका मारितो प्रचंड ॥ १ ॥ राग आळवितो नाना । गातो काय तें कळेना ॥२॥ आशा धरोनि मनीं । कांहीं देईल ह्मणऊनि ॥ ३ ॥ पोटा एका साटीं । तुका ह्मणे जाले कष्टी ॥ ४ ॥

॥ २६०१ ॥

ह्याका मारी ज्याच्या नावें । त्याचें गांवचि नाहीं ठावें ॥१॥ काय गातो हें कळेना । राग आळवितो नाना ॥ २ ॥ आशा धरूनियां मनीं । कांहीं देईल ह्मणउनी ॥३॥ वितीभरी पोटासाटीं । तुका ह्मणे पडिली तुटी ॥ ४ ॥

॥ २६०२ ॥

कुशळ गुंतले निषेधा । वादी प्रवर्तले वादा ॥१॥ कैसी ठकलीं बापुडीं । दंभविषयांचे सांकडीं ॥ २ ॥ भूस उपणुनि केलें काय । हारपले दोन्ही ठाय ॥ ३ ॥ तुका ह्मणे लागे हातां । काय मथिलें घुसळितां ॥ ४ ॥

॥ २६०३ ॥

काळतोंडा सुना । भलतें चोरुनि करी जना ॥ १ ॥ धिग त्याचें साधुपण । विटाळुनि वर्ते मन ॥ २ ॥ मंत्र ऐसे घोकी । वश व्हावें जेणें लोकीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे थीत । नागवला नव्हे हित ॥ ४ ॥

॥ २६०४ ॥

विचार नाहीं नर खर तो तैसा । वाहे ज्ञान पाठी भार लगड

तैसा ॥ १ ॥ वादावाद करणें त्यासी तोंचि वरी । गुखाडीची चाड सरे तोंचि बाहेरी ॥ २ ॥ सौभाग्यसंपन्न हो कां वृद्ध प्रतिष्ठ । चिकरूनि सांडी पायां लागली ते विष्ठ ॥ ३ ॥ नाहीं याति कुळ फांसे ओढी तयासी । तुका ह्मणे काय मुद्रासोंग जाळिसी ॥ ४ ॥

॥ २६०५ ॥

एक ह्मणती आह्मी देवची पैं जालों । ऐसें नका बोलों पडाल पतनीं ॥ १ ॥ एक ह्मणती आह्मी देवाचीं पैं रूपें । तरी तुमाचिया बापें न चुके जन्म ॥ २ ॥ देवें उचलिली स्वकरें मेदिनी । तुमचेनीं गोणी नुचलवे ॥ ३ ॥ देवें मारियेले दैत्य दानव मोटे । तुमचेनीं न तुटे तृणमात्र ॥ ४ ॥ राया विठोबाचें पद जो अभिळासी । पातकाची राशी तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ २६०६ ॥

लय लक्षूनियां जालों ह्मणती देव । तोही नव्हे भाव सत्य जाणा ॥ १ ॥
जालों बहुश्रुत नलगे आतां कांहीं । नको राहूं तेही निश्चिंतीनें ॥ २ ॥
तपें दानें काय मानिसी विश्वास । बीजफळ त्यास आहे पुढें ॥ ३ ॥
कर्म आचरण यातीचा स्वगुण । विशेष तो गुण काय तेथें ॥ ४ ॥
तुका ह्मणे जरी होईल निष्काम । तरिच होय श्याम देखे डोळां ॥ ५ ॥

॥ २६०७ ॥

देव होईजेत देवाचे संगती । पतन पंगती जगाचिया ॥ १ ॥
दोहींकडे दोन्ही वाहातील वाटा । करितील साटा आपुलाला ॥ २ ॥
दाखविले परी नाहीं वर्जिजेतां । आला तो तो चित्ता भाग भरा ॥ ३ ॥
तुका ह्मणे अंगीं आवडीचें बळ । उपदेश मूळ बीजमात्र ॥ ४ ॥

॥ २६०८ ॥

देव होसी तरी आणिकांतें करिसी । संदेह येविशीं करणें न लगे ॥ १ ॥

दुष्ट होसी तरी आणिकांतें करिसी । संदेह येविशीं करणें न लगे ॥ २ ॥ तुका ह्मणे जें दर्पणीं बिंबलें । तें तया बाणलें निश्चयेसीं ॥ ३ ॥

॥ २६०९ ॥

जन देव तरी पायांचि पडावें । त्याचिया स्वभावें चाड नाहीं ॥ १ ॥ अग्नीचें सौजन्य शीतनिवारण । पालवीं बांधोन नेतां नये ॥ २ ॥ तुका ह्मणे विंचू सर्प नारायण । वंदावे दुरोन शिवों नये ॥ ३ ॥

॥ २६१० ॥

जग अवघें देव । मुख्य उपदेशाची ठेव ॥ १ ॥ आधीं आपणया नासी । तरी उतरे ये कसीं ॥ २ ॥ ब्रह्मज्ञानाचें कोठार । तें हें निश्चयें उत्तर ॥ ३ ॥ तुका ह्मणे ते उन्मनी । नास कारया कारणीं ॥ ४ ॥

॥ २६११ ॥

मुंगी होउनि साकर खावी । निजवस्तूची भेटी घ्यावी ॥ १ ॥ बाळवंटीं साकर पडे । गज येऊनि काय रडे ॥ २ ॥ जाला हरिदास गोसांवी । अवघी मायिक क्रिया दावी ॥ ३ ॥ पाठ पाठांतरिक विद्या । जनरंजवणी संध्या ॥ ४ ॥ प्रेम नसतां अंगा आणी । दृढ भाव नाहीं मनीं ॥ ५ ॥ ब्रह्मज्ञान वाचे बोले । करणी पाहतां न निवती डोळे ॥ ६ ॥ मिथ्या भगल वाढविती । आपुली आपण पूजा घेती ॥ ७ ॥ तुका ह्मणे धाकुटें व्हावें । निजवस्तूसी मागुनि घ्यावें ॥ ८ ॥

॥ २६१२ ॥

गासी तरि एक विठ्ठलचि गाईं । नाहीं तरि ठायीं राहे उगा ॥ १ ॥ अद्वैतीं तों नाहीं बोलाचें कारण । जाणिवेचा सीण करिसी वाया ॥ २ ॥ तुका ह्मणे किती करावी फजिती । लाज नाहीं चित्तीं निलाजिरा ॥ ३ ॥

॥ २६१३ ॥

मुकें होतां तुझ्या पदरींचें जातें । काय तें भोगितें मीमीपण ॥ १ ॥

आपुलिये घरीं मैंद होउनी बसे । कवण कवणासी बोलों नका ॥२॥
तुका ह्मणे तुह्मां सांगतों मी खूण । देवासी तें ध्यान लावुनि बसा ॥३॥

॥ २६१४ ॥

मस्तकीं सहावें ठांकियासी जाण । तेव्हां देवपण भोगावें गा ॥ १ ॥
आपुलिये स्तुती निंदा अथवा मान । टाकावा थुंकोन पैलीकडे ॥२॥
सद्गुरुसेवन तेंचि अमृतपान । करूनी प्राशन बैसावें गा ॥ ३ ॥
आपुल्या मस्तकीं पडोत डोंगर । सुखाचें माहेर टाकूं नये ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां सांगूं तुला किती । जिण्याची फजिती करूं नये ॥५॥

॥ २६१५ ॥

देव तीर्थीं येर दिसे जया ओस । तोचि तया दोष जाणतिया ॥ १ ॥
तया बरें फावे देवा चुकवितां । संचिताची सत्ता अंतराय ॥ २ ॥
शुद्धाशुद्ध ठाव पापपुण्यबीज । पाववील दुजे फळभोग ॥ ३ ॥
तुका ह्मणे विश्वंभरा ऐसें वर्म । चुकलिया धर्म अवघे मिथ्या ॥ ४ ॥

॥ २६१६ ॥

जाऊनियां तीर्था काय तुवां केलें । चर्म प्रक्षाळिलें वरी वरी ॥ १ ॥
अंतरींचें शुद्ध कासयानें जालें । भूषण त्वां केलें आपणया ॥ २ ॥
वृंदावन फळ घोळिलें साकरा । भीतरील थारा मोडेचिना ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरी कासया फुंदां तुह्मी ॥४॥

॥ २६१७ ॥

आधारावांचुनी । काय सांगसी काहाणी ॥१॥ ठावा नाहीं पंढरीराव । तोंवरी अवघेंचि वाव ॥ २ ॥ मानिताहे कोण । तुझें कोरडें ब्रह्मज्ञान ॥३॥ तुका ह्मणे ठेवा । जाणपण एक सवा ॥ ४ ॥

॥ २६१८ ॥

काय तीं करावीं मोलाचीं माकडें । नाचताती पुढें संसाराच्या ॥ १ ॥
झाडा देतेवेळे विचकिती दांत । घेती यमदूत दंडवरी ॥२॥ हात दांत

कान हलविती मान । दाखविती जन मानावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे किती जालों हीं फजित । मागें नाहीं नीत भारवाही ॥ ४ ॥

॥ २६१९ ॥

चोर टेंकाचें निघाले चोरी । आपलें तैसें पारखे घरीं ॥ १ ॥ नाहीं नफा नागवे आपण । गमाविले कान हात पाय ॥२॥ बुद्धिहीन नये कांहींचि कारणा । तयासवें जाणा तेंचि सुख ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं ठाउकें वर्म । तयासी तें कर्म वोडवलें ॥४॥

॥ २६२० ॥

सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं ॥१॥ सारा अवघें गाबाळ । डोळ्या आडील पडळ ॥ २ ॥ शुद्ध भावाविण । जो जो केला तो तो सीण ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळे । परि होताती अंधळे ॥ ४ ॥

॥ २६२१ ॥

असंत लक्षण भूतांचा मत्सर । मनास निष्ठुर अतिवादी ॥ १ ॥ अंतरींचा रंग उमटे बाहेरी । वोळखियापरी आपेंआप ॥ २ ॥ संत ते समय बोळखती वेळ । संतुष्ट निर्मळ चित्त सदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे हित उचित अनुचित । मज लागे नित आचरावें ॥ ४ ॥

॥ २६२२ ॥

खोल ओले पडे तें पीक उत्तम । उथळाचा श्रम वांयां जाय ॥ १ ॥ लटिक्याचे आह्मी नव्हों सांटेकरी । थीतें घाली भरी पदरींचें ॥२॥ कोणा इहलोकीं पाहिजे पसारा । दंभ पोट भरायाचे चाडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे कसीं अगीं जें उतरे । तेंचि येथें सरे जातिशुद्ध ॥ ४ ॥

॥ २६२३ ॥

अनुभवावांचून सोंग संपादणें । नव्हे हें करणें स्वहिताचें ॥ १ ॥ वैसा नको भुलों बाहिरल्या रंगें । हित तेंचि वेगें करूनि घेई ॥२॥ बहुरूपी रूपें नटला नारायण । सोंग संपादून जैसा तैसा ॥ ३ ॥

पाषाणाचें नांव ठेवियेलें देव। आणिका तारी भाव परि तो तैसा ॥४॥
कनक झाड ह्मुण वंदियेलें माथां। परि तेंही अर्था न मिळे माजी ॥५॥
तुका ह्मणे त्याचा भाव तारी त्यास। अहंभावीं नास तोचि पावे ॥६॥

॥ २६२४ ॥

नव्हती हे उसणे बोल । आहाच फोल रंजवण ॥ १ ॥ अनुभव तो बरावरी । नाहीं दुरी वेगळा ॥ २ ॥ पाहिजे तें आलें रुची । काचाकुची काशाची ॥३॥ तुका ह्मणे लाजे आड। त्याची चाड कोणासी ॥४॥

॥ २६२५ ॥

नये नेत्रां जळ । नाहीं अंतरीं कळवळ ॥१॥ तों हे चावटीचे बोल। जग रंजवणें फोल ॥२॥ न फळे उत्तर। नाहीं स्वामी जों सादर ॥३॥ तुका ह्मणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ॥४॥

॥ २६२६ ॥

रुचे सकळां मिष्टान्न । रोग्या विखाच्या समान ॥१॥ तरि कां तया एकासाटीं । कामें अवघीं करणें खोटीं ॥२॥ दर्पण नावडे एका। ठाव नाहीं ज्याच्या नाका ॥३॥ तुका ह्मणे खळा। उपदेशाचा कांटाळा ॥४॥

॥ २६२७ ॥

सेकीं हें ना तेंसें जालें। बोलणें तितुकें वांयां गेलें ॥१॥ स्वयें आपणचि रिता। रडे पुढिलांच्या हिता ॥२॥ सुखसागरीं नेघे वस्ती। अंगीं ज्ञानपणाची मस्ती ॥३॥ तुका ह्मणे गाढव लेखा। जेथें भेटेल तेथें ठोका ॥४॥

॥ २६२८ ॥

तोचि लटिक्यामाजी भला। ह्मणे देव म्यां देखिला ॥१॥ ऐशियाच्या उपदेशें। भवबंधन कैसें नासे ॥२॥ बुडवी आपणासरिसे। अभिमानें आणिकांस ॥३॥ आणिक नाहीं जोडा। देव ह्मणवितां या मूढा ॥४॥ आणिकांचे न मनी सावें। तुका ह्मणे या श्रेष्ठांचें ॥ ५ ॥

॥ २६२९ ॥

पाहाहो कलिचें महिमान। असत्यासी रिझलें जन । पापा देती अनुमोदन । करिती हेळण संतांचें ॥ १ ॥ ऐसें अधर्माचें बळ । लोक झकविले सकळ । केलें धर्माचें निर्मूळ । प्रळयकाळ आरंभला ॥२॥ थोर या युगाचें आश्चर्य । ब्रह्मकर्म उत्तम सार । सांडूनियां द्विजवर । दावलपीर स्मरताती ॥३॥ ऐसे यथार्थाचे अनर्थ । जाला बुडाला परमार्थ । नाहीं जाली ऐसी नीत । हा हा भूत पातलें ॥४॥ शांति क्षमा दया । भावभक्ति सत्क्रिया । ठाव नाहीं सांगावया । सत्त्वधैर्य भंगिलें ॥५॥ राहिले वर्णाश्रमधर्म । अन्योन्य विचरती कर्म । ह्मणवितां रामराम । श्रम मह्या मानिती ॥ ६ ॥ थेर भोरपाचे विशीं । धांवती भूतें आमिषां तैसीं । कथा पुराण ह्मणतां सिसी । तिडीक उठी नरक्याचे॥७॥ विषयलोभासाटीं । सर्वार्थेंसीं प्राण साटी । परमार्थी पीठ मुठी । मागतां उठती सुनींसी ॥ ८ ॥ धनाढ्य देखोनि अनामिक । तयातें मानिती आवश्यक । अपमानिले वेदपाठक । सात्विक शास्त्रज्ञ संपन्न ॥ ९ ॥ पुत्र ते पितियापाशीं । सेवा घेती सेवका ऐसी । सुनांचिया दासी । सासा जाल्या आंदण्या ॥ १० ॥ खोटें जालें आली विवसी । केली मर्यादा नाहींसी । भार्या भ्रतारेंसी । रंक तैसीं मानिती ॥ ११ ॥ नमस्कारावया हरिदासां । लाजती धरिती कांहीं गर्वसा । पोटासाटीं खौसा । वंदिती मलिंछाच्या ॥ १२ ॥ बहुत पाप जालें उचंबळ । उत्तम न ह्मणती चांडाळ । अभक्ष भक्षिती विटाळ । कोणी न धरी कोणाचा ॥१३॥ कैसें ज्ञालें नष्ट वर्तमान । एकादशीस खाती अन्न । विडे घेऊनि ब्राह्मण । आविंदवाणी वदताती ॥ १४ ॥ कामिनी विटंबिल्या कुळवंती । वदनें दासीचीं चुंबिती । सोवळ्याच्या स्फीती । जगीं मिरविती पवित्रता ॥ १५ ॥ मद्यपानाची सुराणी । नवनीता न पुसे कोणी । केळवती व्यभिचारिणी । दैन्यवाणी पतिव्रता ॥ १६ ॥

केवढी दोषाची सबळता। जाली पाहा हो भगवंता। पुण्य धुडावोनी संता। तीर्थी हरी आणिली ॥ १७ ॥ भेणें मंद जाल्या मेघवृष्टि। आकांतली कांपे सृष्टि। देव रिगाले कपाटीं। आटाआटी प्रवर्तली ॥१८॥ अपीक धान्यें दिवसें दिवसें। गाई ह्मैसी चेवल्या गोरसें। नगरें दिसती उध्वंसें। पिकलीं बहुवसें पाखांडें ॥१९॥ होम हरपलीं हवनें। यज्ञयाग अनुष्ठानें। जपतपादिसाधनें। आचरणें भ्रष्टलीं ॥२०॥ अठरा यातींचा व्यापार। करिती तस्कराई विप्र। सांडोनियां शुद्ध शुभ्र। वस्त्रें निळीं पांघरती ॥ २१ ॥ गीता लोपली गायत्री। भरले चमत्कार मंत्रीं। अश्वाचियापरी। कुमारी विकिती वेदवक्ते ॥ २२ ॥ वेदाध्ययनसंहितारुचि। भकाद्या करिती तयांची। आवडी पंडितांची। मुसाफावरी बैसली ॥ २३ ॥ मुख्य सर्वोत्तम साधनें। तीं उच्छेदुनि केलीं दीनें। कुडीं कापट्यें महा मोहनें। मिरविताती दुर्जन ॥२४॥ कळाकुशळता चतुराई। तर्कवादी भेद निंदेठायीं। विधिनिषेधाच्या वाही। एकही ऐसीं नाडलीं ॥२५॥ जे[1] संन्यासी तापसी ब्रह्मचारी। होतां[2] दिगांबर निस्पृही वैराग्यकारी। कामक्रोधें व्यापिले भारी। इच्छेकरीं न सुटती ॥२६॥ कैसें विनाशकाळाचें कौतुक। राजे जाले प्रजांचे अंतक। पिते पुत्र सहोदर। एकाएक शत्रुघातें वर्त्तती ॥२७॥ केवढी [3]ये रांडेची अंगवण। भ्रमविलें अवघें जन। याती अठरा चाऱ्ही वर्ण। कर्दम करूनि विटाळिले ॥ २८ ॥ पूर्वी होतें भविष्य केलें। संतीं तें यथार्थ जालें। ऐकत होतों तें देखिलें। प्रत्यक्ष लोचनीं ॥२९॥ आतां असो हें आघवें। गति नव्हे कळिमध्यें वागवावें। देवासी भाकोनि करुणावें। वेगें स्मरावें अंतरीं ॥३०॥ अगा ये वैकुंठनायका। काय पाहातोसि या कौतुका। धांव कलीनें गाजिलें लोकां। देतो हाका सेवक तुकयाचा ॥ ३१ ॥

---

पाठभेद:—१ 'जे' नाहीं. २ होतां वैरागी. ३ 'ये' नाहीं.

॥ २६३० ॥

कलिधर्म मागें सांगितले संतीं । आचार सांडिती द्विजलोक ॥ १ ॥
तोचि कळों आतां येतसे प्रचिती । अधर्मा टेंकती धर्म नव्हे ॥ २ ॥
तप व्रत करितां लागती सायास । पाळितां पिंडास गोड वाटे ॥३॥
देव ह्मणऊनी न येती देऊळा । संसारा वेगळा तरी कां नव्हे ॥४॥
तुका ह्मणे मज धरितां गुमान । ऐसे कोणी जन नरका जाती ॥ ५ ॥

॥ २६३१ ॥

तुह्मां सांगतों कलयुगा फळ । पुढें होइल ब्रह्मगोळ ॥ १ ॥ आह्मां ह्मणतील कंटक । ऐसा पाडिती दंडक ॥२॥ स्त्रिया पूजुनि सरे देती। भलते स्त्रियेसि भलते जाती ॥३॥ श्रेष्ठ वर्ण वेदविद्वांस । अंगीकारिति मद्यमांस ॥४॥ चारी वर्ण अठरा याती । कवळ करिती एक पंक्ती॥५॥ ह्मणती अंबेचा क्रीडाकल्लोळ । शिवरूप प्राणी सकळ ॥६॥ वाम कवळ मार्जन । जन जाईल अध:पतन ॥७॥ ऐसें होइल शकुन देतों । अगोदर सांगुन जातों ॥८॥ तुका सद्गुरुदास्य करी । सिद्धि पाणी वाहे घरीं ॥८॥

॥ २६३२ ॥

मागें संतीं होतें जें जें सांगितलें । तें येऊं लागलें अनुभवा ॥ १ ॥
आचारभ्रष्ट होती लोक कळीं । पुण्य क्षीण बळी जालें पाप ॥ २ ॥
वर्णधर्म कोणी नधरी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥ ३ ॥
वेदाचे पाठक सेवितील मद्य । न देखती भेद विषयीं भांड ॥ ४ ॥
तुका ह्मणे किती करावे फजित । तोचि छंद नित्य बहु होती ॥ ५ ॥

॥ २६३३ ॥

कलियुगीं कवित्व करिती पाषांड । कुशळ हे भांड बहु जाले ॥ १ ॥
द्रव्य दारा चित्तीं प्रजांची आवडी । मुखें बडबडी कोरडाचि ॥ २ ॥
दंभ करी सोंग मानावया जग । मुखें बोले त्याग मनीं नाहीं ॥३॥

पाठभेद:—१ हरिभक्ति.

वेदाज्ञे करोनि न करिती स्वहित । नव्हती अलिप्त देहाहुनी ॥ ४ ॥ तुका ह्मणे दंड साहील यमाचे । न करी जो वाचे बोले तैसें ॥ ५ ॥

॥ २६३४ ॥

साधक जाले कळीं । गुरुगुडीची लांब नळी ॥ १ ॥ पचीं पडे मद्यपान । भांगभुर्की हें साधन ॥ २ ॥ अभेदाचें पाठांतर । अति विषयीं पडिभर ॥ ३ ॥ चेल्यांचा सुकाळ । पिंडदंड भंगपाळ ॥ ४ ॥ सेवा मानधन । बरे इच्छेनें संपन्न ॥ ५ ॥ सोंगाच्या नरकाडी । तुका बोडोनियां सोडी ॥ ६ ॥

॥ २६३५ ॥

हातीं होन दावी बेना । करिती लेंकीच्या धारणा ॥ १ ॥ ऐसे धर्म जाले कळीं । पुण्य रंक पाप बळी ॥ २ ॥ सांडिले आचार । द्विज चाहाड जाले चोर ॥ ३ ॥ टिळे लपविती पातडीं । लेती विजारा कातडीं ॥ ४ ॥ बैसोनियां तक्तां । अन्नेंविण पिडिती लोकां ॥ ५ ॥ मुद्‌बख लिहिणें । तेलतुपावरी जिणें ॥ ६ ॥ नीचाचे चाकर । चुकलिया खाती मार ॥ ७ ॥ राजा प्रजा पीडी । क्षेत्री दुश्चितासी तोडी ॥ ८ ॥ वैश्यशूद्रादिक । हे तों सहज नीच लोक ॥ ९ ॥ अवघे बाह्य रंग । आंत हिरवें वरी सोंग ॥ १० ॥ तुका ह्मणे देवा । काय निद्रा केली धांवा ॥ ११ ॥

॥ २६३६ ॥

अंगीं ब्रह्मक्रिया खिस्तीचा व्यापार । हिंडे घरोघर चांडाळाचे ॥ १ ॥ अंत्यजा खिचडी घेताती मागून । गाळियाप्रदान मायबहिणी ॥ २ ॥ उत्तमकुळीं जन्म क्रिया अमंगळ । बुडविलें कूळ उभयतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसी कलयुगाची चाली । स्वार्थें बुडविलीं आचरणें ॥ ४ ॥

---

पाठभेदः—गुडगुडीची.

॥ २६३७ ॥

खिस्तीचा उदीम ब्राह्मण कलयुगीं । महारवाडीं मांगीं हिंडतसे ॥ १ ॥
वेवसाव करितां पर्वत मांगासी । ते पैं विटाळासी न मानिती ॥ २ ॥
मांगिणीशीं नित्य करीतसे लेखा । तोंडावरि थुंका पडतसे ॥ ३ ॥
आशा माया रांडा नांव हें कागदीं । आठवीना कधीं नारायण ॥ ४ ॥
तुका ह्मणे देह जाला पराधीन । पांडुरंगाविण गति नाहीं ॥ ५ ॥

॥ २६३८ ॥

कलयुगामाजी थोर जालें बंड । नष्ट लोक लंड जाले फार ॥ १ ॥
न धरिती सोय न पुसती कोणा । येतें जैसें मना तैसें चाले ॥ २ ॥
सज्जनाचा वारा टेकों नेदी द्वारा । ऐसिया पामरा तारी कोण ॥ ३ ॥
विश्वास तयाचा बैसेना कोठेंही । स्तुति निंदा पाहीं जीवीं धरी ॥४॥
तुका ह्मणे कैसें केलें नारायणें । जाणावें हें कोणें तयाविण ॥ ५ ॥

॥ २६३९ ॥

उपदेश तो भलत्या हातीं । जाला चित्तीं धरावा ॥ १ ॥ नये जाऊं पात्रावरी । कवटी सारीनारळें ॥ २ ॥ स्त्री पुत्र बंदीजन । नारायण स्मरविती ॥ ३ ॥ तुका ह्मणे रत्नसार । परि आधार चिंधीचा ॥ ४ ॥

॥ २६४० ॥

उपकारासाटीं बोलों हे उपाय । येणेंविण काय चाड आह्मां ॥ १ ॥
बुडतां हे जन न देखवे डोळां । येतो कळवळा ह्मणउनि ॥ २ ॥
तुका ह्मणे माझे देखतिल डोळे । भोग देत वेळे येईल कळों ॥ ३ ॥

॥ २६४१ ॥

बोलिलों तें कांहीं तुमचिया हिता । वचन नेणतां क्षमा कीजे ॥ १ ॥
वाट दावी तया न लगे शिणावें । अतिव्याई जीवें नाश पावे ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ उपकार चिंधीचे. २ रुसावें.

निंब दिला रोग तुटाया अंतरीं । पोभाळितां वरी आंत चरे ॥ ३ ॥
तुका ह्मणे हित देखण्यासि कळे । पडती आंधळे कूपामाजीं ॥ ४ ॥

॥ २६४२ ॥

आतां माझे नका वाणूं गुण दोष । करितों उपदेश याचा कांहीं ॥ १ ॥
मानदंभासाटीं छळीतसें कोणा । आण या चरणां विठोबाची ॥२॥
तुका ह्मणे हें तों ठावें पांडुरंगा । काय कळे जगा अंतरींचें ॥ ३ ॥

॥ २६४३ ॥

जन्मा येऊन उदार जाला । उद्धार केला वंशाचा । मेळवूनि धन मेळवी माती । सदा विपत्ती भोगीतसे ॥ १ ॥ नाम घेतां न मिळे अन्न । नव्हे कारण देखिलिया । धर्म करितां ऐके कानीं । बांधे निजोनि डोकियासी ॥२॥ घरा व्याही पाहुणा आला । ह्मणे त्याला बरें नाहीं । तुमचे गांवीं वैद्य आहे । बैसोनि काय प्रयोजन ॥ ३ ॥ उजवूं किती होतिल पोरें । मरतां बरें ह्मणे यांसी । ह्मणऊनि देवा नवस करी । दावी घरींहुनि बोनें ॥ ४ ॥ पर्वकाळीं भट घरा[1] आला । बोंब घाला ह्मणे पोरां । तुमचा उणा होईल वांटा । काळ पिटासी पैं आला ॥ ५ ॥ दाढी करितां अडका गेला । घरांत आला बाइलेपें । ह्मणे आतां उगवीं मोडी । डोई बोडीं आपुली ॥ ६ ॥ तीर्थ स्वप्नीं नेणे गंगा । पूजन लिंगा गांविंचिया । आडकुनि दार बैसे दारीं । आल्या घर ह्मणे ओस ॥ ७ ॥ तुका ह्मणे ऐसे आहेत गा हरी । याही तारीं जीवांसी । माझ्या भय वाटे चित्तीं । नरका जाती ह्मणोनि ॥ ८ ॥

॥ २६४४ ॥

पर्वकाळीं धर्म न करी नासरी । खर्ची राजद्वारीं द्रव्यरासी ॥ १ ॥
श्राद्धीं कष्टी होय सांगतां ब्राह्मण । गोवार मागून सावडीतो ॥ २ ॥
नेतो पानें फुलें वेश्येला उदंड । ब्राह्मणासी खांड नेदी एक ॥ ३ ॥

पाठभेदः—१ घरासि.

ह्रातें मोऱ्या शोधी कष्ट करी नाना । देवाच्या पूजना कांटाळतो ॥४॥
सारा वेळ धंदा करितां श्रमेना । साधूच्या दर्शना जातां कुंथे ॥ ५ ॥
हरीच्या कीर्तनीं गुंगायासि लागे । येरवीं तो जागे उगलाचि ॥ ६ ॥
पुराणीं बैसतां नाहीं रिकामटी । खेळतो सोंगटी अहोरात्र ॥ ७ ॥
देवाच्या विभूती न पाहे सर्वथा । करी पानवथा नेत्रभिक्षा ॥ ८ ॥
गाईला देखोनी बदबदां मारी । घोड्याची चाकरी गोड लागे ॥ ९ ॥
ब्राह्मणाचें तीर्थ घेतां त्रास मोठा । प्रेमें घेतो घोंटा घटघटां ॥ १० ॥
तुका ह्मणे ऐसे प्रपंचीं गुंतले । जन्मोनि मुकले विठोबासी ॥ ११ ॥

॥ २६४५ ॥

सोईऱ्यासी करी पाहुणेर बरा । कांडितो[1] ठोंबरा संतांलागीं ॥ १ ॥
गाईसी देखोनि बदबदां मारी । घोड्याची चाकरी गोड वाटे ॥ २ ॥
पान फुल नेतो वेश्येसी उदंड । ब्राह्मणासी खांड देऊं नेदी ॥ ३ ॥
कीर्तना जावया होतसे हिंपुष्टि । खेळतो सोंगटी रात्रंदिवस ॥ ४ ॥
बाइलेच्या गोतां[2] अवडीनें पोसी । मातापितयासी दवडितो ॥ ५ ॥
तुका ह्मणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ६ ॥

॥ २६४६ ॥

साधूच्या दर्शना लाजशी गव्हारा । वेश्येचिया घरा पुष्पें नेसी ॥१॥
वेश्या दासी मुरळी जगाची वोंवळी । तें तुज सोंवळी वाटे कैशी॥२॥
तुका ह्मणे आतां लाज धरीं बुऱ्या । टांचराच्या कुऱ्या मारा वेगीं ॥३॥

॥ २६४७ ॥

देवाचिया वस्त्रा स्वप्नींही नाठवी । स्त्रियेसी पाठवी उंच साडी ॥ १ ॥
गाईचें पाळण नयेचि विचारा । अश्वासी खरारा करी अंगें ॥ २ ॥
लेकराची रास[3] स्वयें धांवे क्षाळूं । न ह्मणे प्रक्षाळूं द्विजपायां ॥ ३ ॥
तुका ह्मणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ कांडवी. २ बाइलेचीं सारीं. ३ गांड.

॥ २६४८ ॥

राउळासी जातां त्रास मानी मोठा। बैसतो चोहोटां आदरेंशीं ॥ १ ॥
न करी स्नान संध्या ह्मणे रामराम। गुडगुडींचें प्रेम अहर्निशी ॥ २ ॥
देवब्राह्मणासी जाईना शरण। दासींचे चरण वंदी भावें ॥ ३ ॥
सुगंध चंदन सांडोनियां माशी। बसे दुर्गंधीशीं अतिआदरें ॥ ४ ॥
तुका ह्मणे अरे ऐक भाग्यहीना। कां रे रामराणा विसरसी ॥ ५ ॥

॥ २६४९ ॥

उरा लावी उर अळंगितां कांता। संतासी भेटतां अंग चोरी ॥ १ ॥
अतीत देखोनि होय पाठमोरा। व्याह्यासी सामोरा जाय वेगीं ॥ २ ॥
द्विजा नमस्कारा मनीं भाव कैंचा। तुर्कांचे दासीचा लेंक होय ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी क्रोधासी न यावें। स्वभावा करावें काय कोणी ॥ ४ ॥

॥ २६५० ॥

संत देखोनियां स्वयें दृष्टी टाळी। आदरें न्याहाळी परस्त्रीसी ॥ १ ॥
वीट ये कर्णासी संतवाक्यामृता। स्त्रीशब्द ऐकतां निवे कर्ण ॥ २ ॥
कथेमाजी निज [१]वाढे नित्यक्षणीं। स्त्रियेचे कीर्तनीं प्रेमें जागे ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी क्रोधासी न यावें। स्वभावा करावें काय कोणी ॥४॥

॥ २६५१ ॥

संत मागे पाणी नेदी एक चूळी। दासीस आंघोळी ठेवी पाणी ॥१॥
संतासी देखोनी होय पाठमोरा। दासीचिया पोरा चुंबन देतो ॥ २ ॥
संतासी देखोनी करितो टवाळ्या। भावें धुतो चोळ्या दासीचिया ॥३॥
तुका ह्मणे त्याच्या तोंडावरी थुंका। जातो यमलोका भोगावया ॥४॥

॥ २६५२ ॥

पापिया चांडाळा हरिकथा नावडे। विषयालागीं आवडे गाणें त्याला ॥१॥
ब्राह्मणा दक्षणा देतां रडे रुका। विषयालागीं फुका लुटीतसे ॥ २ ॥

पाठभेदः—१ वाटे.

वतिभरि लंगोटी नेदी अतीताला । खीरम्या देतो शाला भोरप्यासी ॥३॥ तुका ह्मणे त्याच्या थुंका तोंडावरि । जातो यमपुरी भोगावया ॥ ४ ॥

॥ २६५३ ॥

बाइल तरी ऐसी व्हावी । नरकीं गोवी अनिवार ॥ १ ॥ घडों नेदी तीर्थयात्रा । केला कुतरा हात सोंका ॥ २ ॥ आपुलीच करवी सेवा । पुजवी देवासारिखें ॥३॥ तुका ह्मणे गाढव पशु । केला नाशु आयुष्या॥४॥

॥ २६५४ ॥

बाइले अधीन होय ज्याचें जिणें । तयाच्या अवलोकनें पडिजे द्वाड ॥१॥ कासया ते जंत जिताती संसारीं । माकडाच्या परी गारोड्यांच्या ॥ २ ॥ बाइलेच्या मना येईल तें खरें । अभागी तें पुरें बाइलेचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मेंग्या गाढवाचें जिणें । कुतऱ्याचें खाणें लगबगा ॥ ४ ॥

॥ २६५५ ॥

धिग जीणें तो बाईले आधीन । परलोक मान नाहीं दोन्ही ॥ १ ॥ धिग जीणें ज्याचें लोभावरी मन । अतितपूजन घडेचिना ॥ २ ॥ धिग जीणें आळस निद्रा जया फार । अमित आहार अघोरिया ॥३॥ धिग जीणें नाहीं विवेक वैराग्य । झगे मानालागीं साधुपणा ॥ ४ ॥ तुका ह्मणे धिग ऐसे जाले लोक । निंदक वादक नरका जाती ॥ ५ ॥

॥ २६५६ ॥

सुखें बोळंब दावी गोहा । माझें दुःख नेण पाहा ॥ १ ॥ आवडीचा मारिला वेडा । होय होय कैंचा ह्मणे भिडा ॥ २ ॥ निपट मज न चले अन्न । पायली गहूं सांजा तीन ॥ ३ ॥ गेले वारीं तुह्मीं[1] आणिली साकर । सातदी[2] गेली साडेदहा शेर ॥ ४ ॥ अखंड मज पोटाची व्यथा । दुधभात साकर तूप[3] पथ्या ॥ ५ ॥ दो पहारा मज लहरी येती । शुद्ध नाहीं पडे सुपती ॥ ६ ॥ नीज नये घाली फुलें । जवळीं न साहती

पाठभेदः—१ ' तुह्मी ' नाहीं. २ सात दिवसांत दहाशेर. ३ ' तूप ' नाहीं.

मुळें ॥ ७ ॥ अंगीं चंदन लावितें भाळीं । सदा शूळ माझे कपाळीं ॥ ८ ॥ हाड गळोनि आलें मास । माझें दुःख तुह्मां नेणवे कैसें ॥ ९ ॥ तुका ह्मणे जिता गाढव केला । मेलियावरि नरका नेला ॥ १० ॥

॥ २६५७ ॥

भ्रतारासी भार्या बोले गुज गोष्टी । मज ऐसी कष्टी नाहीं दुजी ॥ १ ॥
अखंड तुमचें धंद्यावरी मन । माझें तों हेळण करिती सर्व ॥ २ ॥
जोडितसां तुह्मी खाती हेरेंचोरें । माझीं तंव पोरें हळहळीती ॥ ३ ॥
तुमची व्याली माझे डाई हो पेटली । सदा दुष्ट बोली सोसवेना ॥ ४ ॥
दुष्टवृत्ति नंदुली सदा द्वेष करी । नांदों मी संसारीं कोण्या सुखें ॥ ५ ॥
जावा दीर कांहीं धड हा न बोले । नांदों कोणां खालें कैसी आतां ॥ ६ ॥
माझ्या अंगसंगें तुह्मांसी विश्रांति । मग धडगति नाहीं तुमची ॥ ७ ॥
ठाकतें ठमकतें जीव मुठी धरूनि । परि तुह्मी अजूनि न धरा लाज ॥ ८ ॥
वेगळे निघतां संसार करीन । नाहीं तरी प्राण देतें आतां ॥ ९ ॥
तुका ह्मणे जाला कामाचा अंकित । सांगे मनोगत तैसा वर्ते ॥ १० ॥

॥ २६५८ ॥

कामाचा अंकित कांतेतें प्रार्थित । तूं कां हो दुश्चित निरंतर ॥ १ ॥
माझीं मायबापें बंधु हो बहिण । तुज करी सीण त्यागीन मी ॥ २ ॥
त्यांचें जरी तोंड पाहेन मागुता । तरी मज हत्या घडो तुझी ॥ ३ ॥
सकाळ उठोन वेगळा निघेन । वाहातों तुझी आण निश्चयेंसी ॥ ४ ॥
वेगळें निघतां घडीन दोरे चुडा । तूं तंव माझा जोडा जन्माचा कीं ॥ ५ ॥
ताईत सांकळी गळांची दुलडी[१] । बाजुबंद जोडी हातसर ॥ ६ ॥
वेणीचे जे नग सर्वही करीन । नको धरूं सीण मनीं कांहीं ॥ ७ ॥
नेसावया साडी सेलारी चुनडी । अंगींची कांचोळी जाळिया फुलें ॥ ८ ॥
तुका ह्मणे केला रांडेनें गाढव । मनासवें धांव घेतलीसे ॥ ९ ॥

---

पाठभेदः—१ दुळडी.

॥ २६५९ ॥

एका पुरुषा दोघी नारी । पाप वसे त्याचे घरीं ॥ १ ॥ पाप नलगे धुंडावें । लागेल तेणें तेथें जावें ॥ २ ॥ कांहीं दुसरा विचार । न लगे करावाचि फार ॥ ३ ॥ असत्य जे वाणी । तेथें पापाचीच खाणी ॥ ४ ॥ सत्य बोले मुखें । तेथें उचंबळती सुखें ॥ ५ ॥ तुका ह्मणे दोन्ही । अवळीच लाभहानी ॥ ६ ॥

॥ २६६० ॥

बाईल सवासिण आई । आपण पितरांचे ठायीं ॥१॥ थोर वेच जाला नष्टा । अवघ्या अपसव्य चेष्टा ॥ २ ॥ विषयांचे चरवणीं । केली आयुष्याची गाळणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे लंडा । नाहीं दया देव धोंडा ॥ ४ ॥

॥ २६६१ ॥

दासीचा जो संग करी । त्याचे पूर्वज नर्कद्वारीं ॥ १ ॥ ऐसें सांगों जातां जना । नये कोणाचिया मना ॥ २ ॥ बरें विचारूनी पाहें । तुज अंतीं कोण आहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे रांडलेंका । अंतीं जासिल यमलोका ॥ ४ ॥

॥ २६६२ ॥

बाईल चालिली माहेरा । संगें दिधला ह्मातारा ॥ १ ॥ सिधा सामग्री पोटाची । सवें स्वारी बइलाची ॥ २ ॥ जातां पाडिली ढोरानें । शिव्या देती अन्योविन्ये ॥ ३ ॥ न सावरी आपणातें । नग्न सावलें वरतें ॥ ४ ॥ फजित केलें जनलोकीं । मेला ह्मणे पडे नरकीं ॥ ५ ॥ गोह्याची हे गेली लाज । गांजितां कां तुह्मी मज ॥ ६ ॥ तुका ह्मणे जनीं । छी थू केली विटंबणी ॥ ७ ॥

॥ २६६३ ॥

परिसें गे सुनेबाई । नको वेचूं दूध दहीं ॥ १ ॥ आवा चालिली पंढरपुरा । वेसीपासुनि आली घरा ॥ २ ॥ ऐकें गोष्टी सादर बाळे । करीं जतन फुटकें पाळें ॥ ३ ॥ माझे हातींचा कलवडू । मजवांचुनि

नको फोडूं ॥ ४ ॥ वळवटक्षिरीचें लिंपन । नको फोडूं मजवांचून ॥ ५ ॥ उखळ मुसळ जातें । माझें मन गुंतलें तेथें ॥ ६ ॥ भिक्षुक आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा ॥ ७ ॥ भक्षीं परिमित आहारु । नको फारसी वरो सारूं ॥ ८ ॥ सून ह्मणे बहुत निकें । तुह्मी यात्रेसि जावें सुखें ॥ ९ ॥ सासूबाई स्वहित जोडा । सर्व मागील आशा सोडा ॥ १० ॥ सुनमुर्खीचें वचन कानीं । ऐकोनि सासू विवंची मनीं ॥ ११ ॥ सवतीचे चाळे खोटे । म्यां जावेंसें इला वाटे ॥ १२ ॥ आतां कासया यात्रे जाऊं । काय जाउनि तेथें पाहूं ॥ १३ ॥ मुलें लेंकरें घरदार । माझें येथेंचि पंढरपूर ॥ १४ ॥ तुका ह्मणे ऐसें जन । गोवियेलें मायेंकरून ॥ १५ ॥

॥ २६६४ ॥

पतिव्रतेची कीर्ती वाखाणितां । सिंदळीच्या माथां तिडिक उठे ॥ १ ॥
आमुचें तें आहे सहज बोलणें । नाहीं विचारून केलें कोणीं ॥ २ ॥
अंगें उणें त्याच्या वैसे टाळक्यांत । तेणें ठिणग्या बहुत गाळीतसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी काय करणें त्यासी । ढका खवंदासी लागतसे ॥ ४ ॥

॥ २६६५ ॥

जातीची शिंदळी । तिला कोण कसा बळी ॥ १ ॥ आपघर ना बापघर । चित्तीं मनीं व्यभिचार ॥ २ ॥ सेजे असोनियां धणी । परद्वार मना आणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे असल जाती । जातीसाटीं खाती माती ॥ ४ ॥

॥ २६६६ ॥

पतिव्रता ऐसी जगामध्यें मात । भोगी पांच सात अंधारीं ते ॥ १ ॥
भ्रतारासी लेखी श्वानाचे समान । परपुरुषीं जाण संभ्रम तो ॥ २ ॥
तुका ह्मणे तिच्या दोषा नाहीं पार । भोगील अघोर कुंभपाक ॥ ३ ॥

॥ २६६७ ॥

सिंदळीसी नाहीं पोराची पैं आस । राहे बीज त्यास काय करी ॥ १ ॥

अथवा सेतीं बीज पेरिलें भाजोन । सारा देईल कोण काका त्याचा ॥२॥
तुका ह्मणे नाहीं राखायाची चाड । तरि कां लिगाड करुनी घेतो ॥ ३ ॥

॥ २६६८ ॥

सिंदळीचें चित्त परपुरुषावरी । पति चुरमुरी रात्रंदिवस ॥ १ ॥
ऐसी ते वोंगळी जाय वो नरका । तिच्या दोषें देखा पति जाय ॥ २ ॥
आपण बुडती पति बुडविती । दोन्ही कुळें नेती अधःपाता ॥ ३ ॥
तुका ह्मणे तिची न करावी संगती । होईल फजिती मागें पुढें ॥ ४ ॥

॥ २६६९ ॥

दगडाच्या देवा बगाड नवस । बाईल कथेसी जाऊं नेदी ॥ १ ॥
वेची धनरासी बांधिलें स्मशान । दारीं वृंदावन द्वाड मानी ॥ २ ॥
चोरें नागविला न करी त्याची खंती । परि द्विजा हातीं नेदी रुका ॥ ३ ॥
करी पाहुणेर व्याह्याजावयासी । आल्या अतीतासी पाठमोरा ॥ ४ ॥
तुका ह्मणे जळो धिग त्याचें जिणें । भार वाही सीण वर्म नेणें ॥ ५ ॥

॥ २६७० ॥

गोहो यावा गांवा । ऐसे नवस करी आवा ॥ १ ॥ कैंचें पुण्य तिचे गांठीं । व्रतें वेची लोभासाटीं ॥ २ ॥ वाढावें संतान । गृहीं व्हावें धनधान्य ॥ ३ ॥ मागे गारगोटी । परिसाचीये साटोवाटी ॥ ४ ॥ तुका ह्मणे मोल । देउन घेतला सोमवल ॥ ५ ॥

॥ २६७१ ॥

गर्भाचें धारण । तिनें वागविला सिण ॥ १ ॥ व्याली कुऱ्हाडीचा दांडा । वर न घलीच तोंडा ॥ २ ॥ उपजला काळ । कुळा लाविला विटाळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाय । नरका अभक्ताची माय ॥ ४ ॥

॥ २६७२ ॥

देखोनि हरखली अंड । पुत्र जाला ह्मणे रांड । तंव तो जाला भांड ।

चाहाड चोर शिंदळ ॥ १ ॥ जाय तिकडे पीडी लोकां । जोडी भां-डवल थुंका । थोर जाला चुका । वर कां नाहीं घातली ॥ २ ॥ भूमि कांपे त्याच्या भारें । कुंभपाकाचीं शरीरें । बोले निष्ठुर उत्तरें । पापदृष्टी मळिणचित्त ॥ ३ ॥ दुराचारी तो चांडाळ । पाप सांगातें विटाळ । तुका ह्मणे खळ । ह्मणोनियां निषिद्ध तो ॥ ५ ॥

॥ २६७३ ॥

पुत्र जाला चोर । मायबापां हर्ष थोर ॥ १ ॥ आतां काशासाटीं जोडी । हाट धाटे गुंडगे घडी ॥ २ ॥ ऐते अपाहार । आणूनियां भरी घर ॥ ३ ॥ मानिली निश्चिंती । नरका जावया उभयतीं ॥ ४ ॥ झोडा झोडगीचे पोटीं । फळें बीजें तीं करंटीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे बेट्या । भांडवल नलगे खट्या ॥ ६ ॥

॥ २६७४ ॥

ऐसे कुळीं पुत्र होती । बुडविती पूर्वजा ॥ १ ॥ चाहाडी चोरी भांड-वला । वांटा आला भागासी ॥ २ ॥ त्याचियानें दुःखी मही । भार तेही न साहे ॥३॥ तुका ह्मणे ग्रामपशु । केला नाशु आयुष्या ॥ ४ ॥

॥ २६७५ ॥

आहाकटा त्याचे करिती पितर । वंशीं दुराचार पुत्र जाला ॥ १ ॥ गळोचिना गर्भ नव्हेचि कां वांज । माता त्याची लाजलावा पापी॥२॥ परपीडे परद्वारीं सावधान । सादरचि मन अभाग्याचें ॥ ३ ॥ न मिळतां निंदा चाहडी उपवास । संग्रहावे दोष सकळही ॥ ४ ॥ परउपकार पुण्य त्या वावडें । विषाचें तें कीडें दुग्धीं मरे ॥ ५ ॥ तुका ह्मणे विटाळाचीच तो मूर्ति । दया क्षमा शांति नातळे त्या ॥ ६ ॥

॥ २६७६ ॥

जळो तिचें[१] तोंड । ऐसी कां ते व्याली रांड ॥ १ ॥ सदा भोवयासी

पाठभेदः—१ त्याचें.

गांठी । क्रोध धडधडीत पोटीं ॥ २ ॥ फोडिली गोंवरी । ऐसी दिसे तोंडावरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ॥ ४ ॥

॥ २६७७ ॥

देवें दिला देह भजना गोमटा । तो या जाला भांटा बाधिकेच्या ॥ १ ॥
ताठोनियां मान राहिली वरती । अहंकारा हातीं लवों नेदी ॥ २ ॥
दास ह्मणावया न वळे रसना । सइरवचना वासे गळा ॥ ३ ॥
तुका ह्मणे कोठें ठेवावा विटाळ । [२]स्नानें निर्मळ व्हावयासी ॥ ४ ॥

॥ २६७८ ॥

मायबाप करिती चिंता । पोर नाइके सांगतां ॥ १ ॥ नको जाऊं देउळासी । नेतो बागुल लोकांसी ॥ २ ॥ कर्णद्वारें पुराणिक । भुलवी शब्दें लावी भीक ॥ ३ ॥ वैष्णवांसंगती । हातीं पडलीं नेणों किती ॥ ४ ॥ आह्मां कैंचा मग । करिसी उघडियांचा संग ॥ ५ ॥ तुका ह्मणे जाणे नरका । त्यांचा उपदेश आइका ॥ ६ ॥

॥ २६७९ ॥

[३]काय पोरा लागली चट । धरी वाट देउळाची ॥ १ ॥ सांगितलें ने घे कानीं । दुजें मनीं विठ्ठल ॥ २ ॥ काम घरीं न करी धंदा । येथें सदा दुश्चित ॥ ३ ॥ आमचे कुळीं नव्हतें ऐसें । हेंच पिसें निवडलें ॥ ४ ॥ लौकिकाची नाहीं लाज । माझें मज पारिखें ॥ ५ ॥ तुका ह्मणे नरका जाणें । त्या वचनें दुष्टांचीं ॥ ६ ॥

॥ २६८० ॥

कन्या गो करी कथेचा विकरा । चांडाळ तो खरा तया नांवें ॥ १ ॥
गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण । यातिशीं कारण नाहीं देवा ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ आटी. २ स्नानेंचि. ३ काय करूं.

जे' जैसें करिती ते तैसें पावती । भोग ते भोगिती केले कर्मीं ॥ ३ ॥ आशाबद्ध करूं नये तें करिती । तुका ह्मणे जाती नरकामधीं ॥ ४ ॥

॥ २६८१ ॥

साळंकृत कन्यादान । पृथ्वीदानाच्या समान ॥ १ ॥ परि तें न कळे या मूढा । येइल कळों भोग पुढां ॥२॥ आचरतां कर्म । भरे पोट राहे धर्म ॥३॥ सत्या देव साहे । ऐसें करूनियां पाहें ॥ ४ ॥ अन्न मान धन । हें तों प्रारब्धा आधीन ॥५॥ तुका ह्मणे सोसे । दुःख आतां पुढें नासे ॥ ४ ॥

॥ २६८२ ॥

ब्रह्महत्या मारिल्या गाई । आणीक काई पाप केलें ॥ १ ॥ ऐका जेणें विकिली कन्या । पवाडे त्या सुन्याचे ॥ २ ॥ नरमांस खादली भाडी । हाका मारी म्हणोनि ॥ ३ ॥ अवघें पाप केलें तेणें । जेणें सोनें अभिळाषिलें ॥ ४ ॥ उच्चारितां मज तें पाप । जिव्हे कांप सुटतसे ॥५॥ तुका ह्मणे कोरान्न रांड । बेटा भांड मागेना कां ॥ ६ ॥

॥ २६८३ ॥

भाग्यासाटीं गुरू केला । नाहीं आह्मांसी फळला ॥ १ ॥ याचा मंत्र पडतां कानीं । आमुच्या पेवांत गेलें पाणी ॥ २ ॥ गुरु केला घरवासी । आमुच्या चुकल्या गाईह्मसी ॥ ३ ॥ स्वामी आपुली बुटबुट घ्यावी । आमुची परताप टाकुन द्यावी ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसे नष्ट । त्यांसी दुणे होती कष्ट ॥ ५ ॥

॥ २६८४ ॥

आपुली बुटबुट घ्यावी । माझी परताप परत द्यावी ॥ १ ॥ आपुला मंत्र नव्हे बरा । माझा बईल चुकला मोरा ॥ २ ॥ तुका ह्मणे ऐशा नरा । परीस न झोंबे खापरा ॥ ३ ॥

---

पाठभेदः—१ हा चरण कांहीं प्रतींत नाहीं. २ करितां पृथ्वीसमान. ३ सुख.

॥ २६८५ ॥

एक ब्रह्मचारी गाढवा झोंबतां । ह्मणोनियां लाता पळाले तें ॥ १ ॥
गाढवही गेलें ब्रह्मचर्य गेलें । तोंड काळें जालें जगामाजी ॥ २ ॥
होणार तैसें जालें हें ना तेंसें केलें । तुका ह्मणे गेलें वांयांचि ते ॥ ३ ॥

॥ २६८६ ॥

दो दिवसांचा पाहुणा चालतो उताणा । कां रे नारायणा न भजसी ॥ १ ॥
तूं अखंड दुश्चित्ता तुज नेती अवचिता । मग पंढरिनाथा भजसी केव्हां ॥२॥
तुका ह्मणे ऐसे आहेत उदंड । तया केशव प्रचंड केवीं भेटे ॥ ३ ॥

॥ २६८७ ॥

दिवसा व्यापारचावटी । रात्रीं कुटुंब चिंता मोटी ॥ १ ॥ काय करूं या मनासी । नाठवे कां हृषीकेशी ॥ २ ॥ वेश्येपाशीं रात्रीं जागे । हरिकीर्तनीं निद्रा लागे ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय जालासी । वृथा संसारा आलासी ॥ ४ ॥

॥ २६८८ ॥

कुंकवाची ठेवाठेवी । बोडकादेवी काशाला ॥ १ ॥ दिवसगमा भरा पोट । कां गे नट नटावा ॥ २ ॥ दिमाख हा कोणां दावा । लटकी जीवा चरफड ॥ ३ ॥ तुका ह्मणे झोंडगीं हो । फुंदा कां हो कोरडी ॥ ४ ॥

॥ २६८९ ॥

पोटासाटीं खटपट करिसी अवघा वीळ । राम राम ह्मणतां तुझी बसली दांतखीळ ॥ १ ॥ हरिचें नाम कदाकाळीं कां रे नये वाचे । ह्मणतां राम राम तुझ्या बाचें काय वेचे ॥ २ ॥ द्रव्याचिया आशा तुजला दाही दिशा न पुरती । कीर्तनासी जातां तुझी जड जाली माती ॥३॥ तुका ह्मणे ऐशा जीवा काय करूं आतां । राम राम न ह्मणे त्याचा गाढव मातापिता ॥ ४ ॥

॥ २६९० ॥

देह जाईल जाईल । यासी काळ बा खाईल ॥ १ ॥ कां रे नुमजसी दगडा । कैंचे हत्ती घोडे वाडा ॥ २ ॥ लोडें बालिस्तें सुपती । जरा आलिया फजिती ॥ ३ ॥ शरीरसंबंधाचें नातें । भोरड्या बुडविती सेतातें ॥ ४ ॥ अझुनि तरी होईं जागा । तुका ह्मणे पुढें दगा ॥ ५ ॥

॥ २६९१ ॥

आयुष्य मोजावया बैसला मापारी । तूं कां रे वेव्हारी संसाराचा ॥ १ ॥ नेईल ओढोनि ठाउकें नसतां । न राहे दुश्चिता हरिविण ॥ २ ॥ कठिण हें दुःख यम जाचतील । कोण सोडवील तये[1] ठायीं ॥ ३ ॥ राहतील दुरी सज्जन सोयरीं । आठवीं श्रीहरी लवलाही ॥ ४ ॥ तुका ह्मणे किती करिसील लंडायी[2] । होईल भंडाई पुढें थोर ॥ ५ ॥

॥ २६९२ ॥

जन्मा येउनि काय केलें । तुवां मुद्दल गमाविलें ॥ १ ॥ कां रे न फिरसी माघारा । अझुनि तरी फजितखोरा ॥ २ ॥ केली गांठोळीची नासी । पुढें भीकची मागसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठाया । जाईं आपल्या आलिया ॥ ४ ॥

॥ २६९३ ॥

रंगीं रंगेरे श्रीरंगे । काय भुललासी पतंगें ॥ १ ॥ शरीर जायाचें ठेवणें । धरिसी अभिळास ह्मणें ॥ २ ॥ नव्हे तुझा हा परिवार । द्रव्य दारा क्षणभंगुर ॥ ३ ॥ अंतकाळींचा सोइरा । तुका ह्मणे विठो धरा ॥ ४ ॥

॥ २६९४ ॥

नये[3] बोलों भांडा । खीळ घालुन बैस तोंडा ॥ १ ॥ ऐक विठोबाचे गुण । करीं सादर श्रवण ॥ २ ॥ प्रेमसुखा आड । काय वाजतें चाभाड ॥ ३ ॥ तुका ह्मणे हिता । कां रे नागवसी थीता ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ तया. २ लंडाई. ३ नको.

॥ २६९५ ॥

पंधरा दिवसां एक एकादशी । कां रे न करिसी व्रतसार ॥ १ ॥
काय तुझा जीव जातो एका दिसें । फराळाच्या मिसें धणी घेसी ॥ २ ॥
स्वहित कारण मानवेल जन । हरिकथा पूजन वैष्णवांचें ॥ ३ ॥
थोडे तुज घरीं होती उजगरे । देउळासी कां रे मरसी जातां ॥ ४ ॥
तुका ह्मणे कां रे सकुमार जालासी । काय जाब देसी यमदूतां ॥५॥

॥ २६९६ ॥

एकादशी सोमवार न करिती । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ १ ॥
काय करूं बहु वाटे तळमळ । आंधळीं सकळ बहिर्मुख ॥ २ ॥
हरिहरां नाहीं बोटभरी वाती । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं नारायणीं प्रीति । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ ४ ॥

॥ २६९७ ॥

जेयाशी नाहीं एकादशी व्रत । जाणावें तें प्रेत शव लोकीं ॥ १ ॥
त्याचे दिवसें नित्य काळ लेखीताहे । रागें दांत खाय करकरा ॥ २ ॥
जयाचिये द्वारीं तुळसीवृंदावन । नाहीं तें स्मशान गृह जाणां ॥ ३ ॥
जये कुळीं नाहीं एकही वैष्णव । त्याचा बुडे भव नदीतापा ॥ ४ ॥
विठोबाचें नाम नुच्चारी जें तोंड । प्रत्यक्ष तें कुंड चर्मकाचें ॥ ५ ॥
तुका ह्मणे त्याचे काष्ठ हातपाय । कीर्तना नव जाय हरीचिया ॥ ६ ॥

॥ २६९८ ॥

गातां आइकतां कांटाळा जो करी । वास त्या अघोरीं कुंभपाकीं ॥ १ ॥
रागें यमधर्म जाचविती तया । तुज दिले कासया मुख कान ॥ २ ॥
विषयांच्या सुखें अखंड जागसी । न वजे एकादशी जागरणा ॥ ३ ॥

पाठभेद:—१ एकादशीव्रत. २ जया नाहीं नेम एकादशी व्रत. ३ वय. ४ रजकाचें.

वेचूनियां द्रव्य सेवी मद्यपान । नाहीं दिलें अन्न अतीतासी ॥ ४ ॥
तीर्थाटण नाहीं केले उपकार । पाळिलें शरीर पुष्ट लोभें ॥ ५ ॥
तुका म्हणे केला मग साहे दंड । नाइकती लंड सांगितलें ॥ ६ ॥

॥ २६९९ ॥

ज्यासी नावडे एकादशी । तो जिताचि नरकवासी ॥१॥ ज्यासी नावडे हें व्रत । त्यासी नरक तोही भीत ॥२॥ ज्यासी मान्य एकादशी । तो जिताचि मुक्तवासी ॥ ३ ॥ ज्यासी घडे एकादशी । जाणें लागे विष्णूपाशीं ॥४॥ तुका म्हणे पुण्यराशी । तोचि करी एकादशी ॥५॥

॥ २७०० ॥

करवितां व्रत अर्धे पुण्य लाभे । मोडवितां दोघे नरका जाती ॥ १ ॥
शुद्धबुद्धि दोघां होय एक मान । चोरासवें कोण जिवें राखे ॥ २ ॥
आपुलें देऊनी आपुलाचि घात । न करावा थीत जाणोनियां ॥ ३ ॥
देऊनियां वेंच धाडी वाराणसी । नेदावें चोरासि चंद्रबळ ॥ ४ ॥
तुका म्हणे तप तीर्थ व्रत याग । भक्ति हे मारग मोडूं नये ॥ ५ ॥

॥ २७०१ ॥

एकादशीस अन्न पान । जे नर करिती भोजन । श्वानविष्ठेसमान । अधम जन तो एक ॥ १ ॥ ऐका व्रताचें महिमान । नेमें आचरती जन । गाती ऐकती हरिकीर्तन । ते समान विष्णूशीं ॥ २ ॥ अशुद्ध विटाळसीचें खळ । विडा भक्षितां तांबूल । सांपडे सबळ । काळाहातीं न सुटे ॥ ३ ॥ सेज बाज विलास भोग । करी कामिनीशीं संग । तया जोडे क्षयरोग । जन्मव्याधी बळिवंत ॥ ४ ॥ आपण न वजे हरिकीर्तना । आणिकां वारी जातां जनां । त्याच्या पापा जाणा । [illegible] मेरु ठेंगणा ॥ ५ ॥ तया दंडी यमदूत । जाले तयाचे अंकित । तुका म्हणे व्रत । एकादशी चुकलीया ॥ ६ ॥

---

पाठभेदः—१ कोणा. २ पापें.

॥ २७०२ ॥

धर्म तो न कळे । काय झांकितील डोळे ॥ १ ॥ जीव भ्रमले य कामें । कैसीं कळों येती वर्में ॥ २ ॥ विषयांचा माज । कांहीं धरूं नेदी लाज ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्यांसी । माया नाचविते कैसी ॥ ४ ॥

॥ २७०३ ॥

किती वेळा खादला दगा । अझून कां गा जागसी ना ॥ १ ॥ लाज नाहीं हिंडतां गांवें । दुःख नवें नित्य नित्य ॥२॥ सवें चोरा हातीं फांसे । देखतां कैसे न देखसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांडिती वाट । तळपट करावया ॥ ४ ॥

॥ २७०४ ॥

पैल घरीं जाली चोरी । देहा करी बोंब ॥ १ ॥ हाबा हाबा करिसी काये । फिराऊनि नेय्यां वाये ॥ २ ॥ सांडुनियां शुद्धी । निजलासी गेली बुद्धि ॥ ३ ॥ चोरीं तुझा काढिला बुर । वेगळें भावा घातलें दूर ॥ ४ ॥ भलतियासी देसी वाव । लाहेसि तूं एवढा ठाव ॥ ५ ॥ तुका ह्मणे अझुनि तरी । उरलें तें जतन करीं ॥ ६ ॥

॥ २७०५ ॥

नीत सांडोनि अवनीत चाले । भंडउभंड भलतेंचि बोले ॥ १ ॥
त्यांत कोणाचें काय बा गेलें । ज्याचें तेणें अनहित केलें ॥ २ ॥
ज्यासि वंदावें त्यासी निंदी । मैत्री सांडोनि होतसे दंदी ॥ ३ ॥
आन यातीचे संगती लागे । संतसज्जनामध्यें ना वागे ॥ ४ ॥
केल्याविण पराक्रम सांगे । जेथें सांगे तेथेंचि भीक मागे ॥ ५ ॥
करी आपुलाचि संभ्रम । परि पुढें कठीण फार यम ॥ ६ ॥
तुका ह्मणे कांहीं नित्य नेम । चित्तीं न धरी तो अधम ॥ ७ ॥

॥ २७०६ ॥

वितीयेवढेंसें पोट । केवढा बोभाट तयाचा ॥१॥ जळो याची विटं-

बना । भूक जना नाचवी ॥२॥ अभिमाना सिरीं भार । झाले खर तृष्णेचे ॥३॥ तुका ह्मणे नरका जावें । ह्याचि जीवें व्यापार ॥ ४ ॥

॥ २७०७ ॥

शूरां साजती हतियारें । गांढयां हांसतील पोरें ॥ १ ॥ काय केली विटंबण । मोतीं नासिकावांचून ॥ २ ॥ पतिव्रते रूप साजे । सिंदुळ काजळ लेतां लाजे ॥ ३ ॥ दासी पत्नी सुता । नव्हे सरी एक पिता ॥ ४ ॥ मान बुद्धिमंतां । थोर न मनिती पिता ॥ ५ ॥ तुका ह्मणे तरी । आंत शुद्ध दंडे वरी ॥ ६ ॥

॥ २७०८ ॥

छळी विष्णुदासा कोणी । त्याची अमंगळ वाणी ॥ १ ॥ येऊं न द्यावा समोर । अभागी तो दुराचार ॥ २ ॥ नावडे हरिकथा । त्याची व्यभिचारीण माता ॥ ३ ॥ तुका ह्मणे याति । भ्रष्ट तयाची ते मति ॥ ४ ॥

॥ २७०९ ॥

अखंड संत निंदी । ऐसी दुर्जनाची बुद्धि ॥ १ ॥ काय ह्मणावें तयासि । तो केवळ पापरासि ॥ २ ॥ जो[1] स्मरे रामनामा । त्यासी ह्मणतो रिकामा ॥ ३ ॥ जो तीर्थ व्रत करी । त्यासी ह्मणतो भिकारी ॥ ४ ॥ तुका ह्मणे विंच्वाची नांगी । तैसा दुर्जन सर्वांगीं ॥ ५ ॥

॥ २७१० ॥

जयासी नावडे वैष्णवांचा संग । जाणावा तो मांग जन्मांतरीं ॥ १ ॥
अपवित्र वाचा जातीचा अधम । आचरण धर्म नाहीं दया[2] ॥ २ ॥
मंजुळवदनीं बचनागाची कांडी । शेवटीं विघडी जीवप्राणा ॥ ३ ॥
तुका ह्मणे ज्याचा पिता नाहीं शुद्ध । तयासी गोविंद अंतरला ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ जो स्मरे रामराम । तयासी ह्मणावें रिकामें ॥ तीर्थें व्रतें करी । तयासी ह्मणावें भिकारी ॥ २ जया.

॥ २७११ ॥

कुदल्याविण नव्हे मांडा । अळसें धोंडा पडतसे ॥१॥ राग नको धरूं मनीं । गांडमणी सांगतों ॥ २ ॥ तरटापुढें बरें नाचे । सुतकाचें[1] मुसळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे काठी सार । करी फार शाहाणें ॥ ४ ॥

॥ २७१२ ॥

गव्हाराचें ज्ञान अवघा रजोगुण । सुखवासी होऊन विषय भोगी ॥ १ ॥ त्यासी जरी ज्ञान उपदेश केला । संगेंविण त्याला राहावेना ॥ २ ॥ तुका ह्मणे संग उत्तम असावा । याविण उपावा काय सांगों ॥ ३ ॥

॥ २७१३ ॥

आपुल्या[2] पोटासाटीं । करी लोकाचिया गोष्टी ॥ १ ॥ जेणें घातलें संसारीं । विसरला तोचि[3] हरी ॥ २ ॥ पोटा घाली अन्न । न ह्मणे पतितपावन ॥ ३ ॥ मी कोठील आणि कोण । हें न कळे ज्या लागून ॥ ४ ॥ तुका ह्मणे नरस्तुती । करितो भाट त्रिजगतीं ॥ ५ ॥

॥ २७१४ ॥

लोहो परिसासी रुसलें । सोनेंपणासी मुकलें ॥१॥ येथें कोणाचें काय गेलें । ज्याचें तेणें अनहित केलें ॥ २ ॥ गंगा आली आळशावरी । आळसी देखोनि पळे दुरी ॥३॥ गांवा खालील ओहळे । रागें गंगेसी न मिळे ॥ ४ ॥ तुका केशवाचा दास । गुरुसीं न भजे शिष्य ॥ ५ ॥

॥ २७१५ ॥

देवाचें चरित्र नाठवे सर्वथा । विनोदार्थ कथा गोड वाटे ॥ १ ॥ हातावरि हात हासोनि आफळी । वाजवितां टाळी लाज वाटे ॥ २ ॥ तुका ह्मणे थुंका त्याच्या तोंडावरि । जातो यमपुरीं भोगावया ॥ ३ ॥

---

पाठभेदः—१ सुतेकाचें. २ आपुल्या पोटासाटीं लोकांची प्रौढी वाणी । संतांची वदनीं निंदा करी ॥ ३ तया.

॥ २७१६ ॥

भाव धरी तया तारील पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ॥ १ ॥
करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ । खापरा परीस काय करी ॥ २ ॥
काय करिल तया साकरेचें आळें । बीज तैसीं फळें येती तया ॥ ३ ॥
तुका ह्मणे वज्र भंगे एक वेळ । कठीण हा खेळ तयाहूनी ॥ ४ ॥

॥ २७१७ ॥

एवढी अपकीर्ती । ऐकोनियां फजीती ॥ १ ॥ जरि दाविलें[1] वदन । थुंका थुंका देखोन ॥ २ ॥ काळिमेचें जिणें । जाऊनियां राहे सुनें ॥ ३ ॥ तुका ह्मणे गुण । दूषणें अपशकुन ॥ ४ ॥

॥ २७१८ ॥

शूकरासी विष्ठा माने सावकास । मिष्टान्नाची त्यास काय गोडी ॥ १ ॥
तेवीं अभक्तांसी आवडे पाखांड । न लगे त्यां गोड परमार्थ ॥ २ ॥
श्वानासी भोजन दिलें पंचामृत । तरी त्याचें चित्त हाडावरि ॥ ३ ॥
तुका ह्मणे सर्पा पाजिलीया क्षीर । वमितां विखार विष जालें ॥ ४ ॥

॥ २७१९ ॥

अंगीं ज्वर तया नावडे साकर । जन तो इतर गोडी जाणे ॥ १ ॥
एकाचिये तोंडीं पडियेली[2] माती । अवघे ते खाती पोटभरी ॥ २ ॥
चारितां बळें येत असे दांतीं । मागोनियां घेती भाग्यवंत ॥ ३ ॥
तुका ह्मणे नसे संचित हें बरें । तयासि दुसरें काय करी ॥ ४ ॥

॥ २७२० ॥

आपुलें वेचूनि खोडा घाली पाव । ऐसा[3] तो हा जीव हीनबुद्धि ॥१॥
विषयांच्या संगें आयुष्याचा नास । पडियेलें ओस स्वहिताचें ॥ २ ॥
भुलल्याचें अंग आपणा पारिखें । छंदाच सारिखें वर्ततसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे दुःख उमटे परिणामीं । लंपटासी कामीं रतलिया ॥ ४ ॥

पाठभेदः—१ दाखविलं. २ पडिली ते. ३ ऐसे जया भाव हीन बुद्धि ते.

॥ २७२१ ॥

आंधळ्यासि जन अवघेचि आंधळे । आपणासि डोळे दृष्टी नाहीं ॥१॥
रोग्या विषतुल्य लागे हें मिष्टान्न । तोंडासि कारण चवी नाहीं ॥ २ ॥
तुका ह्मणे शुद्ध नाहीं जो आपण । तया त्रिभुवन अवघें खोटें ॥ ३ ॥

॥ २७२२ ॥

शब्दा नाहीं धीर । ज्याची बुद्धि नाहीं स्थिर ॥ १ ॥ त्याचें न व्हावें दर्शन । खळा पंगती भोजन ॥ २ ॥ संतास जो निंदी । अधम लोभासाटीं वंदी ॥ ३ ॥ तुका ह्मणे पोटीं । भाव अणीक जया होटीं ॥ ४ ॥

॥ २७२३ ॥

अतिवादी नव्हे शुद्ध या बीजाचा । ओळखा जातीचा अंत्यज तो ॥१॥
वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण । श्रेष्ठाचें वचन न मानी जो ॥ २ ॥
तुका ह्मणे मद्यपानाचें मिष्टान्न । तैसा तो दुर्जन शिवों नये ॥ ३ ॥

॥ २७२४ ॥

नव्हे आराणूक संवसारा हातीं । सर्वकाळ चित्तीं हाचि धंदा ॥ १ ॥
देवधर्म सांदीं पडिला सकळ । विषयीं गोंधळ गाजतसे ॥ २ ॥
रात्रि दीस न पुरे कुटुंबाचें समाधान । दुर्लभ दर्शन ईश्वराचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आत्महत्यारे घातकी । थोर होते चुकी नारायणीं ॥ ४ ॥

॥ २७२५ ॥

किती सांगों तरी नाइकती बटकीचे । पुढें सिंदळीचे रडतील ॥ १ ॥
नका नका करूं रांडेची संगती । नेवोनी अधोगती घालिल यम ॥२॥
तुका ह्मणे जरी देवीं नाहीं चाड । हाणोनि थोबाड फोडी काळ ॥३॥

॥ २७२६ ॥

किती उपदेश करावा खळासी । नावडे तयासी बरें कांहीं ॥ १ ॥
शुद्ध हे वासना नाहीं चांडाळाची । होळी आयुष्याची केली तेणें ॥२॥

---

पाठभेदः—१ अधम. २ तो.

नाहीं शुद्ध भाव नायके वचन । आपण्या आपण नाडियेलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे त्यासी काय व्याली रांड । करितो बडबड रात्रंदिवस ॥४॥

॥ २७२७ ॥

जातो न येतिया वाटा । काय निरवितो करंटा ॥ १ ॥ कैसा जा-
लासे बेश्रम । लाज नाहीं न ह्मणे राम ॥ २ ॥ पाहे वैरियाकडे ।
डोळे वासुनियां रडे ॥ ३ ॥ बांधुनियां यमा हातीं । दिला नाहीं
त्याची खंती ॥ ४ ॥ नाहीं यांपें काम । ऐसें जाणे तो अधम ॥ ५ ॥
अझुन तरि मुका । कां रे जालासि ह्मणे तुका ॥ ६ ॥

॥ २७२८ ॥

बुद्धिमंदा शिरीं । मार फजिती पदरीं ॥ १ ॥ जाय तेथें अपमान ।
पावे हानि थुंकी जन ॥ २ ॥ खरियाचा पाड । मागें लावावें लि-
गाड ॥ ३ ॥ तुका ह्मणे करी । वर्म नेणें भगोवरी ॥ ४ ॥

॥ २७२९ ॥

साकरेच्या गोण्या बैलाचिये पाठीं । तयासी सेवटीं करबाडें ॥ १ ॥
मालाचे पैं पेटे वाहाताती उंटे । तयालागीं कांटे भक्षावया ॥ २ ॥
वाउगा हा धंदा आशा वाढविती । बांधोनियां देती यमा हातीं ॥३॥
ज्यासी असे लाभ तोचि जाणे गोडी । येर तीं बापुडीं सिणलीं वांयां ॥४॥
तुका ह्मणे शाहणा होईं रे गव्हारा । चौऱ्यासीचा फेरा फिरों नको ॥५॥

॥ २७३० ॥

जेणें नाहीं केलें आपुलें स्वहित । पुढिलांचा घात इच्छीतसे ॥ १ ॥
संचितासी जाय मिळोनियां खोडी । पतनाचे ओढी वरी हांव ॥ २ ॥
बांधलें गांठी तें लागलें भोगावें । ऐसियासी देवें काय कीजे ॥ ३ ॥
तुका ह्मणे जया गांवां जाणे जया । पुसोनियां तया वाट चाले ॥४॥

॥ २७३१ ॥

स्तवूनियां नरा । केला आयुष्याचा मातेरा ॥ १ ॥ नारायणाचिया

लोपें । घडली अवघींचि पापें ॥ २ ॥ जीव ज्याचें दान । त्याचा खं-
डूनियां मान ॥३॥ तुका ह्मणे वाणी । आइके त्या दोष कानीं ॥ ४ ॥

॥ २७३२ ॥

ढालतरवारे गुंतले हे कर । ह्मणे तो जुंझार कैसा झुंजों ॥ १ ॥
पेटीपडदळे सिले टोप ओझें । हें तों जालें दुजे मरणमूळ ॥ २ ॥
बैसविलें मला येणें अश्वावरी । धांवूं पळूं तरी कैसा आतां ॥ ३ ॥
असोनियां उपाय ह्मणे हे अपाय । ह्मणे हाय हाय काय करूं ॥ ४ ॥
तुका ह्मणे हा तों स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणे वर्म संतचरण ॥ ५ ॥

॥ २७३३ ॥

संसार करितो मोठ्या महत्वानें । दिसे लोकां उणें न कळे त्या ॥१॥
पवित्रपण आपुलें घरच्यासीच दिसे । बाहेर उदास निंदिताती ॥२॥
आपणा कळेना आपले अवगुण । पुढिलाचे दोषगुण वाखाणिती ॥३॥
विषयाचे ध्यासें जग बांधियेलें । ह्मणोनी लागले जन्ममृत्यु ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझें संचितचि असें । देवाजीचें पिसें सहजगुण ॥ ५ ॥

॥ २७३४ ॥

किती सोसिती करंटीं । नेणों संसाराची आटी । सर्वकाळ पोटीं
चिंतेची हळहळ ॥१॥ रिकामिया तोंडें राम । काय उच्चारितां श्रम ।
उफराटा भ्रम । गोवी विषय माजिरा । कळतां न कळे । उघडे
झाकियेले डोळे । भरलें त्याचे चाळे । अंगीं वारें मायेचें ॥३॥ तुका ह्मणे
जन । ऐसें नांवबुद्धिहीन । बहुरंगें भिन्न । एकी एक निमालें ॥ ४ ॥

॥ २७३५ ॥

जालों ह्मणती त्याचें मज वाटे आश्चर्य । ऐका नव्हे धीर वचन माझें ॥१॥
शिजलिया अन्ना ग्वाही दांत हात । जिव्हेसी चाखत नकळे कैसें ॥२॥
तापलिया तेली बावन चंदन । बुंद एक क्षण शीतळ करी ॥३॥

पारखी तो जाणे अंतरींचा भेद । मूढजना छंद लावण्यांचा ॥४॥ तुका ह्मणे कसीं निवडे आपण । शुद्ध मंद हीन जैसें तैसें ॥ ५ ॥

॥ २७३६ ॥

लोभावरी ठेवुनि हेत । करी असत्य न्याय नीत ॥ १ ॥ त्याच्या पूर्वजां पतन । नरकीं किडे होती जाण ॥ २ ॥ कोटिगोहत्यापातक । त्यासी घडेल निष्टंक ॥ ३ ॥ मांसा श्रवे जे सुंदरा । पाजी विटाळ पितरां ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसियासी । यम गांजील सायासी ॥ ५ ॥

॥ २७३७ ॥

संतांच्या हेळणे बाटलें जें तोंड । प्रत्यक्ष तें कुंड चर्मकाचें ॥ १ ॥ भेसळीचें वीर्य ऐशा अनुभवें । आपुलें परावें नाहीं खळा ॥ २ ॥ संतांचा जो शोध करितो चांडाळ । धरावा विटाळ बहु त्याचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे केली प्रज्ञा याच साटीं । कांहीं माझे पोटीं शंका नाहीं ॥ ४ ॥

॥ २७३८ ॥

ह्मणे विठ्ठल पाषाण । त्याच्या तोंडावरि वाहाण ॥ १ ॥ नको नको दर्शन त्याचें । गलितकुष्ट भरो वाचे ॥ २ ॥ शाळिग्रामासि ह्मणे धोंडा । किडे पडोत त्याच्या तोंडा ॥ ३ ॥ भावी सद्गुरु मनुष्य । त्याचें खंडो कां आयुष्य ॥ ४ ॥ हरिभक्ताच्या करी चेष्टा । त्याचे तोंडीं पडो विष्टा ॥५॥ तुका ह्मणे किती ऐकों । कोठवरी मर्यादा राखों ॥६॥

॥ २७३९ ॥

हरिची हरिकथा नावडे जया । अधम ह्मणतां तया वेळ लागे ॥१॥ मनुष्यदेहीं तया नाट लागलें । अघोर साधिलें कुंभपाक ॥२॥ कासया जन्मा आला तो पाषाण । जंत कां होऊन पडिला नाहीं ॥३॥ उपजे मरोनि वेळोवेळा भांड । परि न धरी लंड लाज कांहीं ॥४॥ ऐसियाची माता कासया प्रसवली । वर नाहीं घातली मुखावरी ॥५॥ देवधर्माविण चांडाळ हा नर । न साहे भूमि भार क्षणभरी ॥६॥

राम ह्मणतां तुझें काय रे[1] वेचलें। कां हित आपुलें न विचारिसी ॥७॥ जन्मोजन्मींचा होईल नरकीं । तुका ह्मणे चुकी जरी यासी ॥८॥

॥ २७४० ॥

कांहीं नित्यनेमाविण । अन्न खाय तोचि श्वान । वांयां मनुष्यपण । भार वाहे तो वृषभ ॥ १ ॥ त्याचा होय भूमी भार । नेणे यातीचा आचार । जाला दावेदार । भोगवी अघोर पितरांसि ॥ २ ॥ अखंड अशुभ वाणी । खरें न बोलेचि स्वप्नीं । पापी तयाहुनी । आणीक नाहीं दुसरा ॥ ३ ॥ पोट पोसी एकला । भूतीं दया नाहीं ज्याला । पाठीं लागे आल्या । अतिताचे दाराशीं ॥ ४ ॥ कांहीं संतांचें पूजन । न घडे तीर्थांचें भ्रमण । यमाचा आंदण । सीण थोर पावेल ॥ ५ ॥ तुका ह्मणे त्यांनीं । मनुष्यपणा केली हानी । देवा विसरूनी । गेलीं ह्मणतां मी माझें ॥ ६ ॥

॥ २७४१ ॥

भक्ति ज्याची थोडी । पूर्ण विषयांची गोडी ॥ १ ॥ तो नराचि नव्हे पाहीं । खर जाणावा तो देहीं ॥२॥ भजन पूजनही नेणें । काय स्वरूपासी जाणे ॥३॥ तुका ह्मणे त्याला । भोवंडून बाहेर घाला ॥ ४ ॥

॥ २७४२ ॥

देव अवघे प्रतिपादी । वंदी सकळां एका निंदी ॥१॥ तेथें अवघें गेलें वांयां । विष घास एके ठायां ॥ २ ॥ सर्वांग कुरवाळी । उपटी एक रोमावळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्त । नाहीं जयाचें अंकित ॥ ४ ॥

॥ २७४३ ॥

कींविलवाणा जाला आतां । दोष करितां न विचारी ॥ १ ॥ अभिलाषी नारी धन । झकवी जन लटिकेंचि ॥ २ ॥ विश्वासिया क-

पाठभेद:—१ ते.

रितां घात । न धरी चित्त कांटाळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं आला । वृथा गेला जन्मासी ॥ ४ ॥

॥ २७४४ ॥

जेणें मुखें स्तवी । तेंचि निंदेपाठीं लावी ॥ १ ॥ ऐसी अधमाची याती । लोपी सोनें खाय माती ॥ २ ॥ गुदद्वारा वाटे । मिष्टान्नांचा नरक लोटे ॥ ३ ॥ विंचु लाभाविण । तुका ह्मणे वाहे शीण ॥ ४ ॥

॥ २७४५ ॥

आसुरी स्वभाव निर्दय अंतर । मानसीं निष्ठुर अतिवादी ॥ १ ॥ याति कुळ येथें असे अप्रमाण । गुणाचें कारण असे अंगीं ॥ २ ॥ काळकुट पितळ सोनें शुद्ध रंग । अंगाचेंच अंग साक्षी देतें ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरी जातीसवें भेटी । नवनीत पोटीं सांटविलें ॥ ४ ॥

॥ २७४६ ॥

दुर्बळ हें अवघें जन । नारायणीं विमुख ॥ १ ॥ झाडोनियां हात जातीं । पात्र होती दंडासी ॥ २ ॥ सिदोरी तें पापपुण्य । सर्वेसिण भिकेचा ॥३॥ तुका ह्मणे पडिला वाहो । कैसा पाहा हो लटिक्याचा ॥४॥

॥ २७४७ ॥

न संडी[२] अवगुण । वर्मे मानीतसे सिण ॥ १ ॥ भोग देतां करिती काई । फुटतां यमदंडें डोई ॥ २ ॥ पापपुण्य झाडा । देतां तेथें मोठी पीडा ॥ ३ ॥ तुका ह्मणे बोला । माझ्या सिणती विठ्ठला ॥ ४ ॥

॥ २७४८ ॥

द्रव्य असतां धर्म न करी । नागवला राजद्वारीं ॥ १ ॥ माय त्यासि व्याली जेव्हां । रांडसटवी नव्हती तेव्हां ॥ २ ॥ कथाकाळीं निद्रा लागे । कामीं श्वानापरी जागे ॥ ३ ॥ भोग स्त्रियेसि देतां लाजे । वस्त्र दासीचें घेउनि निजे ॥ ४ ॥ तुका ह्मणे जाण । नर गाढवाहुनी हीन ॥ ५ ॥

---

पाठभेदः—१ करी. २ खंडी.

॥ २७४९ ॥

सज्जन तो शब्द सत्य जो मानी । छळी दुर्जन आणिकांसी ॥ १ ॥
एक गुण तो केलासे दोंठायीं । ज्याचा त्यास पाहीं जैसा तैसा ॥ २ ॥
भाविक तो शब्द बोले वाणीचा । लटिका वाचा वाचाळ तो ॥ ३ ॥
परउपकार घडे तोचि भला । नाठ्याळ तयाला दया नाहीं ॥ ४ ॥
जाणीवंत तोचि पायरी जाणे । अधम तो नेणे खुंट जैसा ॥ ५ ॥
हित तें अनहित केलें कैसें । तुका ह्मणे पिसें लागलें त्या ॥ ६ ॥

॥ २७५० ॥

तोंडें खाये फार । पादे बोचा करी मार ॥१॥ एक ऐसे ते शहाणे । आपुलें अधीन तें नेणे ॥२॥ कुले घालूनि उघडे । रागें पाहे लोकांकडे ॥३॥ खेळे द्यूतकर्म । मग बोंबली जुलूम ॥४॥ निजतां आला मोहो । वीतां ह्मणे मेला गोहो॥५॥तुका ह्मणे त्यांनीं। मनुष्यपणा केली हानी॥६॥

॥ २७५१ ॥

गोविंदावांचोनि वदे ज्याची वाणी । हगवण घाणी पिटपिट ते ॥१॥
मस्तक सांडुनि सिसफुल गुडघां । चार तो अवघा बावळ्याचा ॥२॥
अंगभूत ह्मूण पूजितो वाहाणा । ह्मणतां शाहाणा येइल कैसा ॥३॥
तुका ह्मणे वेश्या सांगे सवासिणी । इतर पूजनीं भाव तैसा ॥४॥

॥ २७५२ ॥

यमपुरी त्यांणीं वसविली जाणा । उच्छेद भजना विधी केला ॥१॥
अवघड कोणी न करी सांगतां । सुलभ बहुतां गोड वाटे ॥२॥
काय ते नेणते होते मागें ऋषी । आधार लोकांसी ग्रंथ केले ॥३॥
द्रव्य दारा कोणें स्थापियेलें धन । पिंडाचें पाळण विषय भोग ॥४॥
तुका ह्मणे दोहीं ठायीं हा फजित । पावे यमदूत जना हातीं ॥५॥

॥ २७५३ ॥

अगत्य ज्या नरका जाणें। कीर्तनीं तो वीट मानी ॥१॥ नावडेसा जाला

बाप । आलें पाप वस्तीसि ॥ २ ॥ नारायण नाहीं बाचे । ते यमाचे अंदण ॥ ३ ॥ तुका ह्मणे अभक्तासी । माता दासी जग झोडी[1] ॥४॥

॥ २७५४ ॥

नेदावी सलगी न करावा संग । करी चित्ता भंग वेळोवेळा ॥ १ ॥ सर्प शांतिरूप न ह्मणावा भला । झोंबे खवळीला तात्काळ तो ॥ २ ॥ तुका ह्मणे दुरी राखावा दुर्जन । करावें वचन न घडे तें ॥ ३ ॥

॥ २७५५ ॥

याचा कोणी करी पक्ष । तोही त्याशी समतुल्य ॥१॥ फुकासाटीं पावे दुःखाचा विभाग । पूर्वजांसि लाग निरयदंडीं ॥२॥ ऐके राजा न करी दंड । जरि या लंड दुष्टासि॥३॥तुका ह्मणे त्याचें अन्न।मद्यपानासमान॥४॥

॥ २७५६ ॥

दानें कांपे हात । नावडे तेविशीं मात ॥ १ ॥ कथी चावटीचे बोल । हिंग क्षीरीं मिथ्या फोल ॥ २ ॥ न वजती पाय । तीर्थां ह्मणे वेचूं काय ॥ ३ ॥ तुका ह्मणे मनीं नाहीं । न ये आकारातें कांहीं ॥४॥

॥ २७५७ ॥

चाहाडाची माता । व्यभिचारीण तत्वता ॥ १ ॥ पाहे संतांचें उणें । छिद्र छळावया सुनें ॥ २ ॥ जाणों त्याच्या बांचें[2] । कांहीं सोडिलें गांठीचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे घात । व्हावा ऐसी जोडी मात ॥ ४ ॥

॥ २७५८ ॥

तीर्थ जळ देखे पाषाण प्रतिमा । संत ते अधमा माणसांऐसे ॥ १ ॥ वांजेच्या मैथुनापरी गेलें वांयां । बांडेल्याचें जायां जालें पीक ॥ २ ॥ अभाविक सदा सुतकी चांडाळ । सदा तळमळ चुकेचि ना ॥ ३ ॥ तुका ह्मणे वरदळी ज्याची दृष्टी । देहबुद्धि कष्टी सदा दुःखी ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ जोडी. २ वाचें.

॥ २७५९ ॥

संतनिंदा ज्याचे घरीं । नव्हे घर ते यमपुरी ॥१॥ त्याच्या पापा नाहीं जोडा । संगें जना होय पीडा ॥ २ ॥ संतनिंदा आवडे ज्यासी । तो जिताचि नर्कवासी ॥३॥ तुका ह्मणे तो नष्ट । जाणा गाढव तो स्पष्ट ॥४॥

॥ २७६० ॥

संतां नाहीं मान । देव मानी मुसलमान ॥१॥ ऐसे पोटाचे मारिले । देवा आशा विटंबिले ॥ २ ॥ घाली लोटांगण । वंदी नीचाचे चरण ॥ ३ ॥ तुका ह्मणे धर्म । न कळे माजल्याचा भ्रम ॥ ४ ॥

॥ २७६१ ॥

विद्या अल्प परी गर्वशिरोमणी । मजहुनी ज्ञानी कोण आहे ॥ १ ॥ अंगीं भरला ताठा कोणाचें मानीना । साधूची छळणा स्वयें करी ॥२॥ साधूचे देहाचा मानी जो विटाळ । त्रिलोकीं चांडाळ तोचि एक ॥३॥ संतांची जो निंदा करितो या मुखें । खतेला सकळ पापें तोचि एक ॥४॥ तुका ह्मणे ऐसे मावेचे मइंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ५ ॥

॥ २७६२ ॥

तुळसीवृंदावनीं उपजला कांदा । नावडे गोविंदा कांहीं केल्या ॥ १ ॥ तैसे वंशामध्यें जाले जे मानव । जाणावे दानव अभक्त ते ॥ २ ॥ केवड्यामधील निर्गंध कणसें । तैशीं तीं माणसें भक्तिहीन ॥ ३ ॥ तुका ह्मणे जेवीं चंदनांतिल आळी । न चढे निढळीं देवाचिया ॥४॥

॥ २७६३ ॥

आणिकांच्या कापिती माना । निष्ठुरपणा पार नाहीं ॥१॥ करिती बेटे उसणवारी । यमपुरी भोगावया ॥२॥ सेंदराचें दैवत केलें । नवस बोले तयासि ॥३॥ तुका ह्मणे नाचति पोरें । खोडितां येरें अंग दुखे ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ करी मुखें जपे ।

॥ २७६४ ॥

कावळियासी नाहीं दया उपकार । काळिमा अंतर विटाळसें ॥१॥
तैसें कुधनाचें जिणें अमंगळ । घाणेरी वोंगळ वदे वाणी ॥ २ ॥
कडु भोंपळ्याचा उपचारें पाक । सेविल्या तिडीक कपाळासी ॥३॥
तुका ह्मणे विष सांडूं नेणे साप । आदरें तें पाप त्याचे ठायीं ॥४॥

॥ २७६५ ॥

माकडें मुठीं धरिले फुटाणे । गुंतले ते नेणे हात तेथें ॥१॥ काय तो तयाचा लेखावा अन्याय । हित नेणें काय आपुलें तें ॥ २ ॥ शुकें नळिकेशीं गोवियेले पाय । विसरोनि जाय पक्ष दोन्ही ॥ ३ ॥ तुका ह्मणे एक ऐसे पशु जीव । न चले उपाव कांहीं तेथें ॥ ४ ॥

॥ २७६६ ॥

सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें । भक्षावया दिलें श्वानालागीं ॥ १ ॥
मुक्ताफळहार खरासि घातला । कस्तुरी सुकराला चोजविली ॥ २ ॥
वेदपरायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची ते खुण काय जाणे ॥ ३ ॥
तुका ह्मणे ज्याचें तोचि एक जाणे । भक्तीचें महिमान साधु जाणे ॥४॥

॥ २७६७ ॥

शिकवणें नाक झाडी । पुढील जोडी कळेना ॥ १ ॥ निरयगांवीं भोग देता । तेथें सत्ता आणिकांची ॥२॥ अवगुणांचा सांटा करीं । तेचि धरी जीवासी ॥३॥ तुका ह्मणे जडबुद्धि । कर्मशुद्धी सांडवी ॥४॥

॥ २७६८ ॥

फल्याचे बडबडे चवी ना सवाद । आपुलाचि वाद आपणासी ॥ १ ॥
कोणें या शब्दाचे मरावें घसणी । अंतरें शाहाणी राहिजे हो ॥ २ ॥
गाढवाचा भुंक आइकतां कानीं । काय कोडवाणी ऐसियेचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे ज्यासी करावें वचन । त्याचे येती गुण आंगास ते ॥ ४ ॥

॥ २७६९ ॥

विष्ठा भक्षी तया अमृत पारिखें । वोंगळांचि[1] सखें वोंगळाचें ॥ १ ॥
नये पाहों कांहीं गोऱ्हवाडीचा अंत । ह्मणी ठाका संत दुर्जनापें ॥२॥
भेंसळीच्या बीजा अमंगळ गुण । उपजवी सीण दरुषणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे छी थूं जया घरीं धन । तेथें तें कारण कासयाचें ॥ ४ ॥

॥ २७७० ॥

दुर्जनाची जाती । त्याचे तोंडीं पडे माती ॥ १ ॥ त्याची बुद्धि त्यासी नाडी । वाचे अनुचित बडबडी ॥ २ ॥ पाहे संतांकडे । दोषदृष्टी पाहे भीडे ॥ ३ ॥ उंच निंच नाहीं । तुका ह्मणे खळा कांहीं ॥ ४ ॥

॥ २७७१ ॥

नागलें देखोनि चांगलें बोले । आपुलें वेचूनि त्याजपुढें खुले ॥ १ ॥
अधमाचे ओंगळ गुण । उचित नेणें तो धर्म कोण ॥ २ ॥
अतिभूता न घाली पाण्याचा चुळ । न मागे त्यासी घाली साकरगुळ ॥३॥
एकासी आड पडोनी होंकरी । एकासी देखोनि लपवी भाकरी ॥४॥
एकासी धड न बोले वाचा । एकासी ह्मणे मी तुझे बांदीचा ॥ ५ ॥
तुका ह्मणे ते गाढवपशु । लाभेंविण केला आयुष्यनाशु ॥ ६ ॥

॥ २७७२ ॥

गाढव शृंगारिलें कोडें । कांहीं केल्या नव्हे घोडें ॥ १ ॥ त्याचें भुंकणें न राहे । स्वभावासी करील काये ॥ २ ॥ श्वान शिबिकें बैसविलें । भुंकतां न राहे उगलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्वभावकर्म । कांहीं केल्या न सुटे धर्म ॥ ४ ॥

॥ २७७३ ॥

कांहीं दुसरा विचार । नलगे करावाचि फार ॥ १ ॥ सेटया ना चौधरी । पाडेपण वाहे शिरीं ॥ २ ॥ पाप नलगे धुंडावें । पाहिजे

[1] पाठभेदः—१ वोंगळासि सखें वोंगळाचि.

तरि तेथें जावें ॥ ३ ॥ जकातीचा धंदा । तेथें पाप वसे सदा ॥ ४ ॥
गाई ह्मैसी हेड । तूप विकी महा द्वाड ॥ ५ ॥ तुका ह्मणे पाहीं ।
तेथें पुण्या रीघ नाहीं ॥ ६ ॥

॥ २७७४ ॥

पापी तो नाठवी आपुल्या संचिता । ठेवी भगवंता वरी बोल ॥ १ ॥
भेईना करितां पापाचे डोंगर । दुर्जन पामर दुराचारी ॥ २ ॥
नाठवी तो खळ आपुली करणी । देवासी निंदोनि बोलतसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे त्याच्या तोंडा लागो कांटी । नाहीं जगजेठी जया चित्तीं ॥ ४ ॥

॥ २७७५ ॥

बीजीं फळाचा भरवसा । जतन सिंचनासरिसा । चाविलिया आसा ।
काकुलती ते नाड ॥ १ ॥ हा तो गडसंदीचा ठाव । पिके पिकविला
भाव । संकोचोनि जीव । दशा केली जतन ॥ २ ॥ माती घाली
धनावरी । रांडा रोटा वरीवरी । सुखाचे सेजारीं । दुःख भ्रमें भो-
गीतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे दिशाभुली । जाल्या उफराटी चाली ।
निवाडाची बोली । अनुभवे साक्षीसी ॥ ४ ॥

॥ २७७६ ॥

कथा पुराण ऐकतां । झोंपें नाथिलें तत्त्वता । खाटेवरि पडतां । व्यापी
चिंता तळमळ ॥ १ ॥ ऐसी गहन कर्मगति । काय तयासी रडती ।
जाले जाणते जो चित्तीं । कांहीं नेघे आपुला ॥ २ ॥ उदक लावितां
न धरे । चिंता करी केव्हां सरे । जाऊं नका धीरें । ह्मणे करितां
टवाळ्या ॥ ३ ॥ जवळी गोंचिड क्षीरा । जैसी कमळणी दर्दुरा ।
तुका ह्मणे दुरा । देशत्यागें तयासी ॥ ४ ॥

॥ २७७७ ॥

कळे परि न सुटे गांठी । जालें पोटीं कुपथ्य ॥ १ ॥ अहंकाराचें

आंदणें जीव । राहे कींव केली ते ॥ २ ॥ हेंकडाची एकीच वोढी । तेही खोडी सांगती ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांगों किती । कांहीं चित्तीं न राहे ॥ ४ ॥

॥ २७७८ ॥

कंठीं कृष्णमणी । नाहीं अशुभ ते वाणी ॥ १ ॥ हो का नर अथवा नारी । रांड तये नांवें खरी ॥ २ ॥ नाहीं हातीं दान । शूरपणाचें कांकण ॥ ३ ॥ वाळियेली संतीं । केली बोडोनि फजिती ॥ ४ ॥ तुका ह्मणे ताळा । नाहीं त्याची अवकळा ॥ ५ ॥

॥ २७७९ ॥

बीजापोटीं पाहे फळ । विध न करितां सकळ ॥ १ ॥ तया मूर्ख ह्मणावें वेडें । कैसें तुटेल सांकडें ॥ २ ॥ दाविितिया वाट । वेठीं धरूं पाहे चाट ॥ ३ ॥ पुढिल्या उपाया । तुका ह्मणे राखे काया ॥ ४ ॥

॥ २७८० ॥

खद्योतें फुलविलें रविपुढें ढुंग । साक्षी तंव जग उभयतां ॥ १ ॥
आपल्या आपण नाहीं शोभों येत । चार करी स्फीत दाखवूनि ॥२॥
खाणार ताकाचें असे तें माजीरें । आपणेंचि अधीर कळों येतें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जळो मैंदाची मवाळी । दावूनियां नळी कापी सुखें ॥ ४ ॥

॥ २७८१ ॥

अभक्ताचे गांवीं साधु ह्मणजे काय । व्याघ्रवाडां गाय सांपडली ॥ १ ॥
कसाबाचे आळी मांडिलें प्रमाण । बस्वणाची आण तया काई ॥ २ ॥
केळी आणि बोरी वसती सेजारी । संवाद कोणे परी घडे तेथें ॥ ३ ॥
तुका ह्मणे खीर केली कान्हेळ्याची । शुद्ध गोडी कैची वसे तेथें ॥ ४ ॥

॥ २७८२ ॥

नाहीं देवाचा विश्वास । करी संतांचा उपहास ॥१॥ त्याचे तोंडीं पडे माती । हीन शूकराची जाती ॥ २ ॥ घोकुनी अक्षरें । वाद छळणा करीत फिरे ॥३॥ ह्मणे देवासी पाषाण । तुका ह्मणे भावहीन ॥ ४ ॥

॥ २७८३ ॥

जाणिवेच्या भारें चेंपलासे उर । सदा बुरबुर सरेचि ना ॥ १ ॥
किती याचें ऐकों कानीं । मारिलें घाणीं नाळकरी ॥ २ ॥
मिठेंविण आळणी बोल । कोरडी फोल घसघस ॥ ३ ॥
तुका ह्मणे डेंगा न कळे हित । किती फजित करूं तरी ॥ ४ ॥

॥ २७८४ ॥

माकडा दिसती कंवटी नारळा । भोक्ता तो निराळा वरील सारी ॥१॥
एका रस एका तोंडीं पडे माती । आपुलाले नेती विभाग ते ॥ २ ॥
सुनियांसी क्षीर चारिल्या[1] ओकवी । भोक्ता[2] तो सेवी धणीवरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे भार वागविती मूर्ख । नेतील तें सार परीक्षक ॥ ४ ॥

॥ २७८५ ॥

दुबळें सदैवा । ह्मणे नागवेल केव्हां ॥ १ ॥ आपणा[3] ऐसें करूं पाहे । स्वभावासी करिल काये ॥ २ ॥ मूढ सभे आंत । इच्छी पंडिताचा घात ॥ ३ ॥ गांढें देखुनि शूरा । उंगी[4] करिती बुरबुरा ॥ ४ ॥ आणिकांचा हेवा । न करीं शरण जाईं देवा ॥ ५ ॥ तुका ह्मणे किती । करूं दुष्टाची फजिती ॥ ६ ॥

॥ २७८६ ॥

निंबाचिया झाडा साकरेचें आळें । आपुलीं तीं फळें न संडीच ॥१॥
तैसें अधमाचें अमंगळ चित्त । वमन तें हित करूनि सांडी ॥ २ ॥
परिसाचे अंगीं लाविलें खापर । पालट अंतर नेघे त्याचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे वेळू चंदनासंगतीं । काय ते नसती जवळिकें ॥ ४ ॥

॥ २७८७ ॥

मांस खातां हाउस करी । जोडोनि वैरी ठेवियेला ॥ १ ॥ कोण

---

पाठभेदः—१ वाढिल्या. २ भोगितां पोसवी धणी वरी. ३. आपणां सारिखें तया पाहे. ४ उगें करितें.

त्याची करील कींव । जीवें जीव नेणती ॥ २ ॥ पुडिलांसाटीं पा-
जवी सुरी । आपुली चोरी अंगुळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे कुटिती हाडें ।
आपुल्या नाडें रडतील ॥ ४ ॥

॥ २७८८ ॥

सिंदळीचे सोइरे चोराचीया दया । तोही जाणा तया संवसर्गी ॥ १ ॥
फुकासाटीं भोगे दुःखाचा तो वाटा । उभारोनि कांटा वाटेवरी ॥ २ ॥
सर्प पोसूनियां दुधाचाही नास । केलें थींता विष अमृताचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे यासी न करितां दंडण । पुढिल्या खंडण नव्हे दोषा ॥४॥

॥ २७८९ ॥

काय वृंदावन मोहियेलें गुळें । काय जिरें काळें उपचारिलें ॥ १ ॥
तैसी अधमाची जातीच अधम । उपदेश श्रम करावा तो ॥ २ ॥
न कळे विंचासी कुरवाळिलें अंग । आपुले ते रंग दावीतसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे नये पाकासी दगड । शूकरासी गोड जैसी विष्ठा ॥ ४ ॥

॥ २७९० ॥

सुगरणीबाई थिता नास केला । गुळ तो घातला भाजीमध्यें ॥ १ ॥
क्षीरीमध्यें हिंग दुधामध्यें बोळ । थितेंचि वोंगळ कैसें केलें ॥ २ ॥
दळण दळोनी भरूं गेली पाळी । भरडोनि वोंगळी नास केला ॥ ३ ॥
कापुराचे सांते आणिला लसण । वागवितां सीण दुःख होय ॥ ४ ॥
रत्नाचा जोहारी रत्नचि पारखी । येर देखोदेखीं हातीं घेती ॥ ५ ॥
तुका ह्मणे जरी योग घडे निका । न घडतां थुंका तोंडावरी ॥ ६ ॥

॥ २७९१ ॥

कावळ्याच्या गळां मुक्ताफळमाळा । तरी काय त्याला भूषण शोभे ॥ १ ॥
गजालागीं केला कस्तुरीचा लेप । तिचें तो स्वरूप काय जाणे ॥ २ ॥
बकापुढें सांगे भावार्थवचन । वाउगाचि सीण होय त्यासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तैसे अभाविक जन । त्यांसी वांयां सीण करूं नये ॥ ४ ॥

॥ २७९२ ॥

कोणा चिंता आड । कोणा लोकलाज नाड ॥ १ ॥ कैंचा राम अभागिया । करी बडबड[1] वांयां ॥ २ ॥ स्मरणाचा राग । क्रोधें विटाळलें अंग ॥ ३ ॥ तुका ह्मणे जडा । काय चाले त्या दगडा ॥४॥

॥ २७९३ ॥

लटिक्याचे वाणी चवी ना सवाद । नाहीं कोणां वाद रुचों येत ॥ १ ॥ अन्याय तो त्याचा नव्हे वायचाळा । मायबापीं वेळा न साधिली ॥ २ ॥ अनावर अंगीं प्रबळ अवगुण । तांतडीनें मन लाहो साधी ॥ ३ ॥ तुका ह्मणे दोष आणि अवकळा । न पडतां ताळा घडतसे ॥ ४ ॥

॥ २७९४ ॥

दर्पणासी नखटें लाजे । शुद्ध खिजे देखोनि ॥ १ ॥ ऐसें अवगुणांच्या बाधें । दिसे सुदें विपरीत ॥ २ ॥ अंधळ्यासी काय हिरा । गारांचि तो सारिखा ॥३॥ तुका ह्मणे भुंके सुणें । ठाया नेणे ठाव तो ॥ ४ ॥

॥ २७९५ ॥

संसाराचे धांवे वेठी । आवडी पोटीं केवढी ॥ १ ॥ हागों जातां दगड सांची । अंतरींही संकल्प ॥ २ ॥ लाज तेवढी नारायणीं । बांकडी वाणी पोरांपें ॥ ३ ॥ तुका ह्मणे बेशरमा । अमावरी पडिभरू ॥ ४ ॥

॥ २७९६ ॥

कैसा सिंदळीचा । नव्हे ऐसी ज्याची वाचा ॥ १ ॥ वाचे नुच्चारी गोविंदा । सदा करी परनिंदा ॥ २ ॥ कैसा निरयगांवा । जाऊं न पवे विसावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे दंड । कैसा न पवे तो लंड ॥ ४ ॥

॥ २७९७ ॥

जन्मांतरिचा परिट न्हावी । जात ठावी त्यानें ते ॥ १ ॥ वाखर जैसा

---

पाठभेदः—१ कटकट.

चरचरी । तोंड करी संवदणी ॥ २ ॥ पूर्वजन्म शिखासूत्र । मळ मूत्र अंतरीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे करिती निंदा । धुवटधंदा पुढिलांचा ॥ ४ ॥

॥ २७९८ ॥

माहार माते चपणी भरे । न कळे खरें पुढील ॥१॥ वोंगळ अधमाचे गुण । जातां घडी नलगेचि ॥ २ ॥ श्वान झोळी स्वामिसत्ता । कोप येतां उतरे ॥३॥ तुका ह्मणे गुमान कां । सांगो लोकां अधमासी ॥४॥

॥ २७९९ ॥

ऐसें ठावें नाहीं मूढा । सोस काकुलती पुढां ॥१॥ माझी नका जाळूं मांडीं । पोटीं भय सोस तोंडीं ॥२॥ पातलिया काळ । तेव्हां काय चाले बळ ॥३॥ संचित तें करी । नरका जाया मेल्यावरी ॥४॥ परउपकार । न घडावा हा विचार ॥५॥ तुका ह्मणे लांसी । आतां भेटों नये ऐसी ॥६॥

॥ २८०० ॥

लाडाच्या उत्तरीं वाढविती कळ्हे । हा तो अमंगळ जातिगुण ॥ १ ॥
तमाचे शरीरीं विटाळचि वसे । विचाराचा नसे लेश तोही ॥ २ ॥
कवतुकें घ्यावे लेंकराचे बोल । साहिलिया मोल ऐसें नाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय उपदेश खळा । न्हाउनि काउळा क्षतें धुंडी ॥ ४ ॥

॥ २८०१ ॥

कुतऱ्याऐसें ज्याचें जिणें । संग कोणी न करीजे ॥ १ ॥ जाय तिकडे हाडहाडी । गोऱ्हवाडीच सोइरीं ॥२॥ अवगुणांचा त्याग नाहीं । खवळे पाहीं उपदेशें ॥३॥ तुका ह्मणे कैंची लवी । ठेंग्या केवीं अंकुर ॥४॥

॥ २८०२ ॥

वेद शास्त्र नाहीं पुराण प्रमाण । तयाचें वदन नावलोका ॥ १ ॥
तार्किंयाचें अंग आपण पारिखें । माजिऱ्यासारिखें वाईचाळें ॥ २ ॥
खाता निंदी तया कोण तो आधार । भंगलें खापर याचे नांवें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आडरानें ज्याचे चाली । तयाची ते बोली मिठेंविण ॥ ४ ॥

॥ २८०३ ॥

दुर्जनाची जोडी । सज्जनाचे खेंटर तोडी ॥ १ ॥ पाहे निमित्य हें उणें । धांवे छळावया सुनें ॥ २ ॥ न ह्मणे रामराम। मनें वांचें हेंचि काम ॥ ३ ॥ तुका ह्मणे भागा । आली निंदा करी मागा ॥ ४ ॥

॥ २८०४ ॥

दुर्जनासि करी साहे । तोही लाहे दंड हे ॥१॥ सिंदळीच्या कुंदणी वाटा। संग खोटा खोट्याचा ॥ २ ॥ येर येरा कांचणी भेटे । आगी उठे तेथूनी ॥३॥ तुका ह्मणे कापूं नाकें । पुढें आणिकें शिकविती ॥४॥

॥ २८०५ ॥

दुर्जनाचें अंग अवघेंचि सरळ । नर्काचा कोथळ सांटवण ॥ १ ॥ खाय अमंगळ बोले अमंगळ । उठवी कपाळ संघष्टणें ॥ २ ॥ सर्पामंत्र चाले धरावया हातीं । खळाची ते जाती निखळचि ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं न साहे उपमा । आणीक अधमा वोखट्याची ॥ ४ ॥

॥ २८०६ ॥

दुर्जनाचा मान । सुखें करावा खंडण ॥ १ ॥ लात हाणोनियां वारी । गुंडा वाट शुद्ध करी ॥ २ ॥ बहुतां पीडी खळ । त्याचा धरावा विटाळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे नखें । काढूनि टाकिजेतीं सुखें ॥ ४ ॥

॥ २८०७ ॥

सापें ज्यासी खावें । तेणें प्राणासी मुकावें ॥ १ ॥ काय लाधला दुर्जन । तोंडावरी थुंकी जन ॥२॥ विंचू हाणी नांगी । अग्न लावी आणिकां अंगीं ॥३॥ तुका ह्मणे जाती । नरक पाउलीं चालती ॥४॥

॥ २८०८ ॥

काय ढोरापुढें घालूनि मिष्टान्न । खरा विलेपन चंदनाचें ॥ १ ॥ नको नको खळाची देवा संगति। रस ज्या पंगती नाहीं कथे ॥ १ ॥

काय सेज बाज माकडा विलास । अळंकारा नास करूनी टाकी ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय पाजूनि नवनीत । सर्पा विष थीत अमृताचें ॥ ४ ॥

॥ २८०९ ॥

दुष्टाचें चित्त न भिन्ने[1] अंतरीं । जरी जन्मवरी उपदेशिला ॥ १ ॥
पालथे घागरी घातलें जीवन । न धरीच जाण तेंही त्याला ॥ २ ॥
जन्मा येउनि तेणें पतनचि साधिलें । तमोगुणें व्यापिलें जया नरा ॥ ३ ॥
जळो जळो हें त्याचें व्यालेपण । कासया हें आलें संवसारा ॥ ४ ॥
पाषाण जीवनीं असतां कल्पवरी । पाहातां अंतरीं कोरडा तो ॥ ५ ॥
कुचर मुग नयेचि पाका । पाहातां सारिखा होता तैसा ॥ ६ ॥
तुका ह्मणे असे उपाय सकळां । न चले या खळा प्रयत्न कांहीं ॥ ७ ॥
ह्मणउनि संग न करितां भला । धरितां अबोला सर्व हित ॥ ८ ॥

॥ २८१० ॥

दुर्जनाची गंधी विष्टेचिया परी । देखोनियां दुरी व्हावें तया ॥ १ ॥
अइका हो तुह्मी मात हे सज्जन । करूं संघष्टन नये बोलों ॥ २ ॥
दुर्जनाचे अंगीं अखंड विटाळ । वाणी रजस्वला स्रवे तैशी ॥ ३ ॥
दुर्जनाचें भय धरावें त्यापरी । पिसाळलेवरी धांवे श्वान ॥ ४ ॥
दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग । बोलिलासे त्याग देशाचा त्या ॥ ५ ॥
तुका ह्मणे किती सांगावें पृथक । अंग कुंभपाक दुर्जनाचें ॥ ६ ॥

॥ २८११ ॥

आड पडे काडी । तरि ते बहुत पाणी खोडी ॥ १ ॥ दुर्जनाचे संगती । बहुतांचे घात होती ॥ २ ॥ एक पडे मासी । तरी ते बहु अन्न नासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे रांड । ऐसी कां ते व्याली भांड ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ भिने.

॥ २८१२ ॥

धिग तो दुर्जन नाहीं भूतदया । व्यर्थ तया माया प्रसवली ॥ १ ॥
कठिण हृदय तया चांडाळाचें । जो नेणे पराचें दुःख कांहीं ॥ २ ॥
आपुला हा प्राण तैसे सकळ लोक । न करी विवेक पशु जैसा ॥ ३ ॥
तुका ह्मणे सुखें कापीतसे गळे । आपुलिया वेळे रडतसे ॥ ४ ॥

॥ २८१३ ॥

नये पाहों मुख मात्रागमन्याचें । तैसें अभक्ताचें गुरुपुत्रा ॥ १ ॥
ह्मणऊनि बरें धरितां एकांत । तेणें नव्हे घात भजनासी ॥ २ ॥
नये होऊं कदा निंदकाची भेटी । जया द्वैत पोटीं चांडाळाच्या ॥ ३ ॥
तुका ह्मणे नका बोलों त्यासी गोष्टी । जयाचिया दृष्टी पाप वाढे ॥ ४ ॥

॥ २८१४ ॥

न विचारितां ठायाठाव । काय भुंके तो गाढव ॥ १ ॥ केला तैसा
लाहे दंड । खळ अविचारी लंड ॥ २ ॥ करावें लाताळें । ऐसें नेणे
कोण्या काळें ॥ ३ ॥ न कळे उचित । तुका ह्मणे नीत हित ॥ ४ ॥

॥ २८१५ ॥

एक ते गाढव मनुष्याचे वेष । हालविती पुंस पुढें दाढी ॥ १ ॥
निंदा हें भोजन जेवण तयांसी । जोडी घरीं रासी पातकांच्या ॥ २ ॥
तुका ह्मणे सुखें बैसोनियां खाती । कुंभपाकीं होती नर्कवासी ॥ ३ ॥

॥ २८१६ ॥

गाढवाचें तानें । पालटलें क्षणक्षणें ॥ १ ॥ तैसे अधमाचे गुण ।
एकविध नाहीं मन ॥ २ ॥ उपजतां बरें दिसे । रूप वाढतां तें
नासे ॥ ३ ॥ तुका ह्मणे भुंकते वेळे । वेळ अवेळ न कळे ॥ ४ ॥

॥ २८१७ ॥

रासभ धुतला महा तीर्थामाजी । नव्हे जैसा तेजी शामकर्ण ॥ १ ॥

तेवीं खळा काय केला उपदेश । नव्हेचि मानस शुद्ध त्याचें ॥ २ ॥
सर्पासी पाजिलें शर्करापीयूष । अंतरींचें विष जाऊं नेणे ॥ ३ ॥
तुका ह्मणे श्वाना क्षिरीचें भोजन । सवेंचि वमन जेवी तया ॥ ४ ॥

॥ २८१८ ॥

अवघ्या कोल्ह्यांचें वर्म अंडीं । धरितां तोंडीं खीळ पडे ॥ १ ॥ भुंकूं नका भुंकूं नका । आला तुका विष्णुदास ॥ २ ॥ कवणे ठायीं सादर व्हावें । नाहीं ठावें गाढवा ॥ ३ ॥ दुर्जनासी पंचानन । तुका रजरेणु संतांचा ॥ ४ ॥

॥ २८१९ ॥

गाढवाचे अंगीं चंदनाची उटी । राखेसवें भेटी केली तेणें ॥ १ ॥
सहज गुण जयाचिये देहीं । पालट ते[1] कांहीं नव्हे तया ॥ २ ॥
माकडाचे गळां मोलाचा तो मणि । घातला चावुनि टाकी थुंकोनी ॥ ३ ॥
तुका ह्मणे खळा नावडे हित । अविद्या वाढवी आपुले मतें ॥ ४ ॥

॥ २८२० ॥

भुंकती तीं द्यावीं भुंकों । आपण त्यांचे नये शिकों ॥ १ ॥ भाविकांनीं दुर्जनाचें । मानूं नये कांहीं साचें ॥ २ ॥ होइल तैसें बळ । फजीत करावे ते खळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्यांचें । पाप नाहीं ताडणाचें ॥ ४ ॥

॥ २८२१ ॥

दिवट्या वाद्यें लावुनि खाणें । करूनि मंडण दिली हातीं ॥ १ ॥ नवरा नेई नवरी घरा । पूजन वरा पाद्याचें ॥ २ ॥ गौरविली विहीण व्याही । घडिलें कांहीं ठेवूं नका ॥ ३ ॥ करूं द्यावें न्हावें वेरें[2] । ठायींचें कां रे न कळेचि ॥ ४ ॥ वऱ्हाडियांचे लागे पाठीं । जैसी उटिका तेली ॥ ५ ॥ तुका ह्मणे जोडिला थुंका । पुढें नरका सामुग्री ॥ ६ ॥

॥ २८२२ ॥

हुंदकी पिसवी हलवी दाढी । मणी वोढी निंदेचे ॥ १ ॥

पाठभेदः—१ ‘ ते ’ नाहीं. २ बरें व्हावें.

त्याचें फळ पाकीं यमाचे दंड । घर केलें कुंड कुंभपाक ॥ २ ॥
क्रोध पोटीं मांग आणिला अंतरा । भुंकोनि कुतरा जप करी ॥ ३ ॥
तुका ह्मणे स्नान केलें मळमूत्रें । जेवविलीं पितरें अमंगळ ॥ ४ ॥

॥ २८२३ ॥

देखोनि पुराणिकांची दाढी । रडे फुंदे नाक ओढी ॥ १ ॥ प्रेम खरें दिसे जना । भिन्न अंतरीं भावना ॥ २ ॥ आवरितां नावरे । खुर आठवी नेवरे ॥ ३ ॥ बोलों नये मुखावाटां । ह्मणे होता ब्यांचा तोटा ॥ ४ ॥ दोन्ही सिंगें चारी पाय । खुणा दावी ह्मणे होय ॥ ५ ॥ मना आणितां बोकड । मेला त्याची चरफड ॥६॥ होता भाव पोटीं । मुखा आलासे सेवटीं ॥ ७ ॥ तुका ह्मणे कुडें । कळों येतें तें रोकडें ॥ ८ ॥

॥ २८२४ ॥

दोराच्या आधारें पर्वत चढला । पाउलासाटीं केला अपघात ॥ १ ॥
अष्टोत्तरशें व्याधि ज्या वैद्यें दवडुनी । तो वैद्य मारूनि उत्तीर्ण जाला ॥२॥
नव मास माया वाइलें उदरीं । ते माता चौबारीं नग्न केली ॥ ३ ॥
गायत्रीचें क्षीर पिळुनी घेउनी । उपवासी बांधोनी ताडन करी ॥४॥
तुका ह्मणे दासां निंदी त्याचें तोंड । पाहातां नरककुंड पूर्वजांसी ॥५॥

॥ २८२५ ॥

रोगिया मिष्टान्न मर्कटा चंदन । कागासी लेपन कर्पूराचें ॥ १ ॥
निर्नासिका जैसा नावडे आरिसा । मूर्खालागीं तैसा शास्त्रबोध ॥२॥
दास तुका ह्मणे विठ्ठल उदारें । अज्ञानअंधारें दूरी केलें ॥ ३ ॥

॥ २८२६ ॥

महारासी सिवे । कोपे ब्राह्मण तो नव्हे ॥१॥ तया प्रायश्चित्त कांहीं । देहत्याग करितां नाहीं ॥ २ ॥ नातळे चांडाळ । त्याचा अंतरीं विटाळ ॥ ३ ॥ ज्याचा संग चित्तीं । तुका ह्मणे तो त्या याती ॥ ४ ॥

॥ २८२७ ॥

जातीचा ब्राह्मण । न करितां संध्यास्नान ॥ १ ॥ तो एक नांवाचा ब्राह्मण । होय हीनाहूनि हीन ॥ २ ॥ सांडूनियां शाळिग्राम । नित्य वेश्येचा समागम ॥ ३ ॥ नेघे संतांचें जो तीर्थ । अखंड वेश्येचा जो आर्त ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसे पापी । पाहूं नका पुनरपि ॥ ५ ॥

॥ २८२८ ॥

अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥ १ ॥
वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयतां कुळयाती ॥ २ ॥
ऐसा ह्या निवाडा जालासे पुराणीं । नोहे माझी वाणी पदरींची ॥ ३ ॥
तुका ह्मणे आगी लागो थोरपणा । दृष्टि त्या दुर्जना न पडो माझी ॥ ४ ॥

॥ २८२९ ॥

मुद्दल जतन जालें । मग लाभाचें काय आलें ॥१॥ घरीं देउनि अंतर गांठी । राखा पारिख्या न सुटे मिठी ॥२॥ घाला पडे थोडेंच वाटे । काम मैंदाचेंच पेटे ॥३॥ तुका ह्मणे वरदळ खोटें । फांसे अंतरिंच्या कपटें ॥४॥

॥ २८३० ॥

बरगासाठीं खादलें शेण । मिळतां अन्न न संडी ॥ १ ॥ फजित तो केला लाहे । ताडण साहे गौरव ॥ २ ॥ ओढाळाची ओंगळ ओढी । उगी खोडी नवजाय ॥ ३ ॥ तुका फजीत करी बुच्या । विसरे कुच्या खोडी तेणें ॥ ४ ॥

॥ २८३१ ॥

नावडे तरि कां येतील हे भांड । घेउनियां तोंड काळें येथें ॥ १ ॥
नासोनियां जाय रस या संगती । खळाचे पंगती नारायण ॥ २ ॥
तोंडावाटा नर्क काढी अमंगळ । मिष्टान्ना विटाळ करी सुणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं संतांची मर्यादा । निंदी तोचि निंदा मायझवा ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ आर्थ. १ निंदे.

॥ २८३२ ॥

जेवीं नवज्वरें तापलें शरीर । लागे तया क्षीर विषातुल्य ॥ १ ॥
तेवीं परमार्थ जींही दुराविला । तयालागीं जाला सन्निपात ॥ २ ॥
कामिनी[1] जयाच्या जाहाली नेत्रासी । देखी तो चंद्रासी पीतवर्ण ॥ ३ ॥
तुका ह्मणे मद्यपानाची आवडी । न रुचे त्या गोडी नवनीताची ॥ ४ ॥

॥ २८३३ ॥

स्मशान ते भूमि प्रेतरूप जन । सेवाभक्तिहीन ग्रामवासी ॥ १ ॥
भरतील पोट श्वानाचिया परी । वस्ति दिली घरीं यमदूतां ॥ २ ॥
अपूज्य लिंग तेथें अतित नेघे थारा । ऐसी वस्ती चोरां कंटकांची ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं ठावी स्थिति मती । यमाची निश्चिंती कुळवाडी ॥ ४ ॥

॥ २८३४ ॥

श्वान शीघ्रकोपी । आपणा घातकर पापी ॥ १ ॥ नाहीं भीड आणि
धीर । उपदेश न जिरे क्षीर ॥ २ ॥ माणसांसि भुंके । विजातीनें
घावे थुंके ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्त । मळिण करा ते फजित ॥ ४ ॥

॥ २८३५ ॥

वृंदावना केलें साकरेचें आळें । न संडे वेगळें कडुपण ॥ १ ॥
कावळयाचें पिलूं कौतुक पोशिलें । न राहे उगलें विष्ठेविण ॥ २ ॥
क्षेम देतां अंगा गांधेलाची पोळी । करवी नादाळी महाशब्द ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसे न होती ते भले । घालिती ते घाले साधुजना ॥ ४ ॥

॥ २८३६ ॥

मणि पाडिला दाढेसी मकरतोंडीं । सुखें हस्तेंचि काढवेल प्रौढी ॥ १ ॥
परि मूर्खाचें चित्त बोधवेना । दुधें कूर्मीच्या पाळवेल सेना ॥ २ ॥
सकळ पृथ्वी हिंडतां कदाचित । ससीसिंगाची प्राप्त होय तेथें ॥ ३ ॥
अतिप्रयत्नें गाळितां वाळुवेतें । दिव्य तेलाची प्राप्त होय तेथें ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ कामिन.

अतिक्रोधें खवळला फणी पाही । धरूं येतो मस्तकीं पुष्पप्रायी ॥ ५ ॥
पाहा ब्रह्मानंदेंचि एकीं हेळा । महापातकी तो तुका मुक्त केला ॥ ६ ॥

॥ २८३७ ॥

अधमाचें चित्त अहंकारीं मन । उपदेश सीण तया केला ॥ १ ॥
पापियाचें मन न करी आचार । विधवे शृंगार व्यर्थ केला ॥ २ ॥
अधमाचें चित्त दुश्चित ऐकेना । वांयां सीण मना करूं काय ॥ ३ ॥
गर्दभासी दिली चंदनाची उटी । केशर लल्हाटीं शुकराच्या ॥ ४ ॥
पतिवंचकेसी सांगतां उदंड । परि ते पाषांड तिचे मनीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे तैसें अभाविका सांगतां । वाउगाचि चित्ता सीण होय ॥ ६ ॥

॥ २८३८ ॥

दावूनियां मांडे[1] । पुरे न करीती[2] भांड ॥ १ ॥ जळो जळो तैसें
जिणें । फटमरे लाजिरवाणें ॥ २ ॥ घेतलें तैसें[3] सोंग । बरवें संपा-
दावें सांग ॥ ३ ॥ तुका ह्मणे धीरें । देव नुपेक्षील खरें ॥ ४ ॥

॥ २८३९ ॥

घरीं रांडा पोरें मरती उपवासी । सांगे लोकांपासीं थोरपण ॥ १ ॥
नेऊनियां घरा दाखवावें काय । काळतोंडा जाय चुकावूनि ॥ २ ॥
तुका ह्मणे आह्मी जाणों त्या प्रमाण । ठकावे हे जन तैसे नहों ॥ ३ ॥

॥ २८४० ॥

गुरुपादाम्बींचें जळ । त्यास मानी जो विटाळ ॥ १ ॥ संतीं वाळिला
जो खळ । नरकीं पचे चिरकाळ ॥ २ ॥ गुरुतीर्थी अनमान । यथा-
सांग मद्यपान ॥ ३ ॥ गुरुअंगुष्टा न चोखी । मुख घाली वेश्येमुखीं
॥ ४ ॥ तुका ह्मणे सांगों किती । मुखीं पडो त्याचे माती ॥ ५ ॥

पाठभेद:—१ बंड. २ करी तें. ३ तें.

॥ २८४१ ॥

जातों वाराणसी । निरवीं गाई घोडे ह्मैसी ॥ १ ॥ गेलों येतों नाहीं ऐसा । सत्य मानावा भरवसा ॥ २ ॥ नका काढूं माझीं पेवें । तुह्मी वरळा भूस खावें ॥ ३ ॥ भिकारियाचे पाठीं । तुह्मी घेउनि लागा काटी ॥४॥ सांगाल जेवाया ब्राह्मण । तरी कापाल माझी मान ॥ ५ ॥ वोकलिया वोका । म्यां खर्चिला नाहीं रुका ॥ ६ ॥ तुह्मीं खावें ताकपाणी । जतन करा तूप लोणी ॥ ७ ॥ नाहीं माझें मनीं । पोरें रांडा नागवणी ॥ ८ ॥ तुका ह्मणे नष्ट । होतें तैसें बोले स्पष्ट ॥९॥

॥ २८४२ ॥

उद्धत त्या जाती । द्रवें रंगल्या उद्धती ॥ १ ॥ ह्मणऊनि बहु फार । त्यांसी असावें अंतर ॥ २ ॥ कैंचें पाठी पोट । गोडविषासी सेवट ॥ ३ ॥ तुका ह्मणे सापा । न कळे कुरवाळिलें बापा ॥ ४ ॥

॥ २८४३ ॥

जेवितांही धरी । नाक हागतिया परी ॥ १ ॥ ऐसियाचा करी चाळा । आपुलीच आवकळा ॥ २ ॥ सांडावें मांडावें । काय ऐसें नाहीं ठावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे करी । ताकादुधा एक सरी ॥ ४ ॥

॥ २८४४ ॥

शिंदळा साल्याचा नाहीं हा विश्वास । बाईल तो त्यास न विसंबे ॥ १ ॥
दुष्ट बुद्धि चोरी करी निरंतर । तो ह्मणे इतर लोक तैसे ॥ २ ॥
तुका ह्मणे जया चित्तीं जे वासना । तयाची भावना तयापरी ॥ ३ ॥

॥ २८४५ ॥

चुंबळीचा करी चुंबळीशीं संग । अंगीं वसे रंग क्रियाहीन ॥ १ ॥
बीजा ऐसें फळ दावी परिपाकीं । परिमळ लौकिकीं जाती ऐसा ॥२॥
माकडाच्या गळां रत्न कुळांगना । सांडूनियां सुना विदी धुंडी ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसा व्याली ते गाढवी । फजिती ती व्हावी आहे पुढें ॥४॥

॥ २८४६ ॥

आधींच आळशी । वरी गुरूचा उपदेशी ॥ १ ॥ मग त्या कैंची अड-काठी । विधिनिषेधाची भेटी ॥ २ ॥ नाचरवे धर्म । न करवे विधिकर्म ॥ ३ ॥ तुका ह्मणे ते गाढव । घेती मनासवें धांव ॥ ४ ॥

॥ २८४७ ॥

नेणे सुनें चोर पाहुणा मागता । देखून भलता भुंकतसे ॥ १ ॥
शिकविलें कांहीं न चले ते तया । बोलियेले वांयां बोल जाती ॥ २ ॥
क्षीर ओकुनियां खाय अमंगळ । आपुली ते ढाळ जाऊं नेदी ॥ ३ ॥
वंदूं निंदूं संता काय दुराचार । खळाचा विचार तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ २८४८ ॥

कुचराचे श्रवण । गुणदोषांवरि मन ॥ १ ॥ असोनियां नसे कथे । मूर्ख अभागी तें तेथें ॥ २ ॥ निरर्थक कारणीं । कान डोळे वेची वाणी ॥ ३ ॥ पापाचे सांगाती । तोंडीं ओढाळांचे माती ॥ ४ ॥ हिताचिया नांवें । वोस पडिले देहभावें ॥ ५ ॥ फजीत करूनि सोडी । तुका करी बोडाबोडी ॥ ६ ॥

॥ २८४९ ॥

शादीचें तें सोंग । संपादितां राजा व्यंग ॥ १ ॥ पाहा कैसी विटंबना । मूर्खा अभाग्याची जना ॥ २ ॥ दिसतें तें लोपी । झिंज्या बोडुनियां पापी ॥३॥ सिंदळी त्या सती । तुका ह्मणे थुंका घेती ॥ ४ ॥

॥ २८५० ॥

गयाळाचें काम हिताचा आवारा । लाज फजितखोरा असत नाहीं ॥१॥
चित्ता न मिळे तें डोळां सलों येतें । असावें परतें जवळूनि ॥ २ ॥
न करावा संग न बोलावी मात । सावधान चित्त नाहीं त्यासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे दुःख देतील माकडें । चालिती सांकडें उफराटें ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ अभाग्य.

॥ २८५१ ॥

मर्दें मातलें नागवें नाचे । अनुचित वाचे बडबडी ॥ १ ॥
आतां शिकवावा कोणासी विचार । कर्म तें दुस्तर करवी धीट ॥२॥
आलें अंगासी तें बळिवंत गाढें । काय वेड्यापुढें धर्मनीत ॥ ३ ॥
तुका ह्मणे कळों येईल तो भाव । अंगावरि घाव उमटतां ॥ ४ ॥

॥ २८५२ ॥

कर्कश संगति । दुःख उदंड फजिती ॥ १ ॥ नाहीं इह ना परलोक ।
मजुर दिसे जैसें रंक ॥ २ ॥ वचन सैंटावर । त्याचें ठेवूनि धिक्कार
॥ ३ ॥ तुका ह्मणे पायीं बेडी । पडिली कपाळीं कुऱ्हाडी ॥ ४ ॥

॥ २८५३ ॥

ह्यागिल्याचे सिंके वोणवाचि राहे । अपशकून पाहे वेडगळ ॥ १ ॥
अत्यंत समय नेणतां अवकळा । येऊं नये बळा सिंक धरा ॥ २ ॥
भोजनसमयीं ओकाचा आठव । ठकोनियां जीव कष्टी करी ॥ ३ ॥
तुका ह्मणे किती सांगों उगवून । अभाग्याचे गुण अनावर ॥ ४ ॥

॥ २८५४ ॥

वेडिया उपचार करितां सोहाळे । काय सुख कळे तयासी तें ।
अंधापुढें दीप नाचती नाचणें । भक्तिभावेंविण भक्ति तैसी ॥ १ ॥
तिमार्णे राखण ठेवियेलें सेता । घालुनियां माथां चुना तया ।
खादलें ह्मणोनि सेवटीं बोंबली । ठायींची भुली कां नेणां रया ॥ २ ॥
मुकियापासाव सांगतां पुराण । रोगिया मिष्टान्न काय होय ।
नपुंसका काय करील पद्मिणी । रुचिविण वाणी तैसे होय ॥ ३ ॥
हात पाय नाहीं करिल तो काय । वृक्षा फळ आहे अमोलिक ।
हातां नये तैसा वांयांच तळमळी । भावेंविण भोळीं ह्मणे तुका ॥४॥

॥ २८५५ ॥

क्षीर मागे तया रायतें वाढी । पाधानी गधडी ऐशा नांवें ॥ १ ॥
समयो जाणां समयो जाणां । भलतें नाणां भलतेथें ॥ २ ॥

अमंगळ वाणी वदवी मंगळी । अशुभ वोंगळी शोभन तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे नेणें समयो ठाया ठाव । राहाडी ते वाव नरकाडी ॥ ४ ॥

॥ २८५६ ॥

फोडुनि सांगडी बांधली माजासी । पैल थडी कैसी पावे सहजीं ॥ १ ॥
आपला घात आपणचि करी । आणिक सांगतां नाइके तरी ॥ २ ॥
भुकेंभेणें विष देऊं[1] पाहे आतां । आपल्याचि घाता करूं पाहे ॥ ३ ॥
तुका ह्मणे एक चालतील पुढें । तयांसी वांकडें जातां ठके ॥ ४ ॥

॥ २८५७ ॥

कामातुर चवी सांडी । बरळ तोंडीं बरळे ॥ १ ॥ रंगलें तें अंगीं दावी । विष देववी आसडे ॥ २ ॥ धनसोसें लागे वेड । ते बडबड शमेना ॥ ३ ॥ तुका ह्मणे वेसनें दोन्ही । नर्कखाणी भोगावया ॥ ४ ॥

॥ २८५८ ॥

कामातुरा भय लाज ना विचार । शरीर असार तृणतुल्य ॥ १ ॥
नवल हे लीळा करि त्याचें लाघव । प्रारब्धें भाव दाखविले ॥ २ ॥
लोभालोभ एका धनाचिया ठायीं । आणिकांची सोई चाड नाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे मूक न विचारी प्रकार । योजे तें तें सार यथाकाळीं ॥ ४ ॥

॥ २८५९ ॥

देहा लावी वात । पालव घाली जाली रात ॥ १ ॥ वेडी ते वेडी बहुतच वेडी । चाखतां गोडी चवी नेणे ॥ २ ॥ कडिये मूल भोंवतें भोंये । मोकलुनि रडे धाये ॥ ३ ॥ लेंकरें वित्त पुसे जगा । माझा गोहो कोण तो सांगा ॥ ४ ॥ आपुली शुद्धि जया नाहीं । आणिकांची ते जाणे काई ॥५॥ तुका ह्मणे ऐसे जन । नर्का जातां राखे कोण ॥६॥

॥ २८६० ॥

मांडवाच्या दारा । पुढें आणिला ह्मातारा ॥ १ ॥ ह्मणे नवरी आणा

पाठभेदः—१ घेऊं.

रांड । जाळा नवऱ्याचें तोंड ॥ २ ॥ समय न कळे । काय उपयोगीं ये वेळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे खरा । येथूनियां दूर करा ॥ ४ ॥

॥ २८६१ ॥

मातेचीं जो थानें फाडी । तया जोडी कोण ते ॥ १ ॥ वेदां निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकीया खळ ॥ २ ॥ अगी लावी घरा । मग वसती कोठें थारा ॥३॥ तुका [१]जाणे वर्म । येरा नाचवितो भ्रम ॥ ४ ॥

॥ २८६२ ॥

अति जालें उत्तम वेश्येचें लावण्य । परि ते सवासीण न ह्मणावी ॥ १ ॥ उचित अनुचित केले ठाया ठाव । गुणां मोल वाव थोरपणा ॥ २ ॥ शूरत्वावांचूनि शूरांमाजी ठाव । नाहीं आविर्भाव आणिलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे सोंग पोटाचे उपाय । कारण कमाईविण नाहीं ॥ ४ ॥

॥ २८६३ ॥

सावित्रीचें विटंबण । रांडपण करीतसे ॥ १ ॥ काय जाळावें तें नांव । अवघें वाव असे तें ॥२॥ कुबेर नांव मोळी वाहे । कैसी पाहें फजिती ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठुणगुण देखें । उगी मूर्ख फुंदतां ॥ ४ ॥

॥ २८६४ ॥

सामावे कारण । नाहीं सोसत धरणें ॥ १ ॥ [२]लाही थींके लाजिरवाणी । हीनकमाईची घाणी ॥ २ ॥ पुष्प जवळी नाका । दुर्गंधीच्या नांवें थुंका ॥ ३ ॥ तुका ह्मणे किती । उपदेशहीन जाती ॥ ४ ॥

॥ २८६५ ॥

[३]वडिलीं दिलें भूमिदान । तें जो मागे अभिळासून ॥ १ ॥ अग्रपूजेचा अधिकारी । श्रेष्ठ दंड यमा घरीं ॥ २ ॥ उभयकुल समवेत । नर्की प्रवेश अद्भुत ॥ ३ ॥ तप्तलोहें भेटी । तुका ह्मणे कल्पकोटी ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ ह्मणे. २ लादी. ३ वडिलें.

॥ २८६६ ॥

आचरे दोष न धरी धाक । परीपाक दुःखाचा ॥ १ ॥ चांडाळ तो दुराचारी । अंगीकारी कोण त्या ॥२॥ नव्हे संतान वोस घर । अंधकार कुळासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचें दान । घेतां पतन दुःखासी ॥ ४ ॥

॥ २८६७ ॥

सदा तळमळ । चिंत्ताचिये हळहळ ॥ १ ॥ त्याचें दर्शन न व्हावें । शव असतां तो जिवे ॥ २ ॥ कुशब्दाची घाणी । अमंगळविली वाणी ॥ ३ ॥ नेणें शब्द पर । तुका ह्मणे परउपकार ॥ ४ ॥

॥ २८६८ ॥

काय केलें जळचरीं । ढिवर त्यांच्या घातावरी ॥१॥ हा तों ठायींचा विचार । आहे यातिवैराकार ॥ २ ॥ श्वापदातें वधी । निरपराधें पारधी ॥ ३ ॥ तुका ह्मणे खळ । संतां पीडिती चांडाळ ॥ ४ ॥

॥ २८६९ ॥

अंगा भरला ताठा । नये वळणी जैसा खुंटा ॥ १ ॥ कैसें न कळे त्या डेंगा । हित आदळलें अंगा ॥ २ ॥ जीव जाते वेळे । भरे लकडा ताठी डोळे ॥३॥ मुसळाचें धनु । तुका ह्मणे नव्हे अनु ॥ ४ ॥

॥ २८७० ॥

दर्पणासी बुजे । नखटे तोंड पळवी लाजे ॥ १ ॥ गुण ज्याचे जो अंतरीं । तोचि त्यासि पीडा करी ॥ २ ॥ चोरा रुचे निशी । देखोनियां विटे शशी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जन । देवा असे भाग्यहीन ॥ ४ ॥

॥ २८७१ ॥

काय ह्याचें घ्यावें । नित्यनित्य कोणें गावें ॥ १ ॥ केलें हरिकथेनें वाज । अंतरोनि जाते निज ॥ २ ॥ काम संसार । अंतरीं हे करकर ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंड । ऐसे मानिती ते लंड ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ चित्ताची हे.

॥ २८७२ ॥

माणिकांच्या घातें । ज्यांचीं निवतील चित्तें ॥ १ ॥ तेचि ओळखावे
पापी । निरयवासी शीघ्रकोपी ॥ २ ॥ कान पसरोनी । ऐके वदे दुष्ट
वाणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे भांडा । धीर नाहीं ज्याच्या तोंडा ॥ ४ ॥

॥ २८७३ ॥

जाळें घातलें सागरीं । बिंदु न राहे भीतरी ॥ १ ॥ तैसें पापियाचें
मन । तया नावडे कीर्तन ॥ २ ॥ गाढव गंगेसी न्हाणिलें । जाउनि
उकरड्यावरी लोळे ॥ ३ ॥ प्रीति पोसिलें काउळें । जाउनि विष्ठेवरी
लोळे ॥ ४ ॥ तुका ह्मणे तैसी हरी । कीरव्या नावडे कस्तुरी ॥ ५ ॥

॥ २८७४ ॥

निंदक तो परउपकारी । काय वर्णूं त्याची थोरी । तो रजकाहुनि
भला । परि सर्व गुणें आगळा ॥ १ ॥ नेघे मोल धुतो फुका । पाप
वरच्यावरी देखा । करीतसे साधका । शुद्ध सरते तिहीं लोकीं
॥ २ ॥ मुखसंवदणी सांगातें । अवघें सांटविलें तेथें । जिव्हा
साबण निरुते । दोष काढी जन्माचे ॥३॥ तया ठाव यमपुरीं। वास
करणें अघोरीं । त्यासी दंडण करी । तुका ह्मणे न्हाणी ते ॥ ४ ॥

॥ २८७५ ॥

जीवें जीव नेणे पापी सारिकाचि । नळी दुजयाची कापूं बैसे ॥ १ ॥
आत्मा नारायण सर्वां घटीं आहे । पशुमध्यें काय कळों नये ॥ २ ॥
देखत हा जीव हुंबरे वरडत । निष्ठुराचे हात वाहाती कैसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे तया चांडाळासी नर्क । भोगिती अनेक महादुःखें ॥ ४ ॥

॥ २८७६ ॥

मेलियांच्या रांडा इच्छितील[1] करूं । लाज नाहीं धरूं प्रीत कैशी ॥ १ ॥
मागिलां पुढिलां एका सरोवरी । काळाची पेटारी खांदा वाहे ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ इच्छिती लेंकरूं.

आन दिसे परी मरणेंचि खरें । सांपळा उंदिरें सामाविलीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाली मनाची परती । निवळली ज्योती दिसों आली ॥ ४ ॥

॥ २८७७ ॥

चाकरीवांचून । खाणें अनुचित वेतन ॥ १ ॥ धणी काढोनियां निजा । करील ये कामाची पूजा ॥ २ ॥ उचिता वेगळें । अभिळासें तोंड काळें ॥ ३ ॥ सांगे तरी तुका । लाज नाहीं लोकां ॥ ४ ॥

॥ २८७८ ॥

गहूं एकजाती । परी त्या पाधाणी नासिती ॥ १ ॥ वर्म जाणावें तें सार । कोठें काय थोडें फार ॥ २ ॥ कमाईच्या सारें । जाती दा-विती प्रकार ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोल । गुणा मिथ्या फिके बोल ॥ ४ ॥

॥ २८७९ ॥

गोमट्या बीजाचीं फळेंही गोमटीं । बाहे तेचि पोटीं समतुक ॥ १ ॥ जातीच्या संतोषें चित्तासी विश्रांति । परतोनि मागुती फिरों नेणें ॥ २ ॥ खऱ्याचे पारखीं येत नाहीं तोटा । निवडे तो खोटा ढाळें दुरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज सत्याची आवडी । करितां तांतडी येत नाहीं ॥ ४ ॥

॥ २८८० ॥

जाणे वर्तमान । परि तें न वारे त्याच्यानें ॥ १ ॥ तोही कारणांचा दास । देव ह्मणवितां पावे नास ॥ २ ॥ वेची अनुष्ठान । सिद्धी कराया प्रसन्न ॥ ३ ॥ तुका ह्मणे त्याचें । मुदल गेलें हाटवेचें ॥ ४ ॥

॥ २८८१ ॥

लटिकें तें रुचे । साच कोणांही न पचे ॥ १ ॥ ऐसा माजल्याचा गुण । भोगें कळों येइल सीण ॥ २ ॥ वाढवी ममता । नाहीं वरपडला तो दूतां ॥ ३ ॥ कांहीं न मनी हेकड । तुका उपदेश माकड ॥ ४ ॥

॥ २८८२ ॥

वंदनाचे गांवीं सर्पांची वसति । भोगिती ते होती द्वीपांतरीं ॥ १ ॥
एका ओझें एका लाभ घडे देवा । संचिताचा ठेवा वेगळाला ॥ २ ॥
क्षीराची वसति अशुद्ध सेवावें । जळली तें जावें भोगें दुरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसी बुद्धि ज्याची जड । त्याहुनी दगड बरे देवा ॥ ४ ॥

॥ २८८३ ॥

तोडुनि पुष्पवाटिका फळवृक्षयाती । बाभळा राखती करूनि सार॥१॥
कोण हित तेणें देखिलें आपुलें । आणीक पाहिलें सुख काई ॥ २ ॥
धान्य बीजें जेणें जाळिलीं सकळें । पेरितो कार्[1]ळें जिरें बीज ॥ ३ ॥
मोडोनियां वाटां पुढिलांची सोय । आड रानें जाय घेउनि लोकां॥४॥
विषाचें अमृत ठेवूनियां नाम । करितो अधम ब्रह्महत्या ॥ ५ ॥
तुका ह्मणे त्यास नाइके सांगतां । तया हाल करितां पाप नाहीं ॥ ६ ॥

॥ २८८४ ॥

बांधे [2]सोडी हें तों धन्याचिये हातीं । हेंकडें गोविती आपणां बळें॥१॥
भुललियासी नाहीं देहाचा आठव । धोतऱ्यानें भाव पालटिला ॥ २ ॥
घरांत रिघावें दाराचिये सोई । भिंतीसवें डोई घेउनि फोडी ॥ ३ ॥
तुका ह्मणे देवा गेलीं विसरोन । आतां वर्म कोण दावी यांसी ॥ ४ ॥

॥ २८८५ ॥

पूर्वजांसी नर्का । जाणे तें आइका ॥ १ ॥ निंदा करावी चाहाडी । मनीं
धरूनि आवडी ॥ २ ॥ मात्रागमना ऐसी । जोडी पातकांची रासी ॥
॥ ३ ॥ तुका ह्मणे वाट । कुंभपाकाची ते नीट ॥ ४ ॥

॥ २८८६ ॥

नाहीं पाइतन भूपतीशीं दावा । धिग त्या कर्तव्या आगी लागो ॥ १ ॥

पाठभेदः—१ काळें, २ सोडे.

मुंगियांच्या मुखा गजाचा आहार । न साहावे भार जाय जीवें ॥२॥ तुका ह्मणे आधीं करावा विचार । शूरपणीं तीर मोकलावा ॥ ३ ॥

॥ २८८७ ॥

सेवटासी जरी आलें । तरी जालें आंधळें ॥ १ ॥ स्वहिताचा लेश नाहीं । दगडा कांहीं अंतरीं ॥२॥ काय परिसासवें भेटी । खापरखुंटी जालिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे अधम जन । अवगुणचि वाढवी ॥ ४ ॥

॥ २८८८ ॥

चाबळलें काय न करी बडबड । न ह्मणे फिकें गोड भुकेलें तें ॥ १ ॥ उमजल्याविण न धरी सांभाळ । असो खळखळ जनाची हे ॥ २ ॥ गरज्या न कळे आपुलिया चाडा । करावी ते पीडा कोणा काई ॥३॥ तुका ह्मणे भोग भोगितलि भोगें । संचित तें जोगें आहे कोणा ॥४॥

॥ २८८९ ॥

तेज्या इशारती । तटा फोकावरी घेती ॥ १ ॥ काय सांगावें त्याहुनी । ऐका रे धरा मनीं ॥ २ ॥ नव्हे भांडखोर । ओढूनि धरू पदर ॥ ३ ॥ तुका ह्मणे तोंड । काळें करा खालीं मुंड ॥ ४ ॥

॥ २८९० ॥

आचरणा ठाव । नाहीं अंगीं स्वतां भाव ॥१॥ करवी आणिकांचे घात । खोडी काढूनि पंडित ॥ २ ॥ श्वानाचिया परी । मिष्टान्नासि विटाळ करी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसा । सटवेचिना पांचा दिसां ॥ ४ ॥

॥ २८९१ ॥

वेशा नाहीं बोल अवगुण दूषीले । ऐशा बोला भले ह्मणें क्षोभा ॥१॥ कोण नेणे अन्न जीवाचें जीवन । विषमेळवण विष होय ॥ २ ॥ सोनें शुद्ध नेणे कोण हा विचार । डांकें हीनवर केलें त्यासी ॥ ३ ॥ याती शुद्ध परि अधम लक्षण । वांयां गेलें तेणें सोंगेंही तें ॥ ४ ॥ तुका ह्मणे शूर तोचि पावे मान । आणीक मंडण भार वाही ॥ ५ ॥

---

पाठभेद:—१ नाहीं.

॥ २८९२ ॥

जीवींचें जाणावें या नांवें आवडी । हेंकड तें ओढी अमंगळ ॥ १ ॥
चित्ताच्या संकोचें कांहींच न घडे । अतिशय वेडे चार तेचि ॥ २ ॥
काळाविण कांहीं नाहीं रुचों येत । करूनि संकेत ठेवियेला ॥ ३ ॥
तुका ह्मणे कळे वचनें चांचणी । काय बोलवूनि वेळोवेळां ॥ ४ ॥

॥ २८९३ ॥

गेला तरी जावो सुखें नरकासी । कळंकी याविशीं शिवों नये ॥ १ ॥
रजस्वला करी वेलासी आघात । अंतरें तों हित दुरी बरें ॥ २ ॥
उगीच कां आलीं नासवावीं फळें । विटाळ विटाळें कालवूनि ॥ ३ ॥
तुका ह्मणे लोणी घालोनि शेणांत । उपेगाची मात काय असे ॥ ४ ॥

॥ २८९४ ॥

अतित्याई बुडे गंगे । पाप लागे त्याचें त्या ॥ १ ॥ हें तों आपुलिया गुणें । असे जेणें योजिलें ॥ २ ॥ अवचटें अग्नि जाळी । न सांभाळी दुःख पावे ॥३॥ जैसें तैसें दावी आरसा । नकटा कैसा पालटे ॥४॥

॥ २८९५ ॥

हेंदऱ्याचे भरितां कान । हलवी मान भोंक रितें ॥१॥ नाहीं मी येथें सांगों स्पष्ट । भावें नष्ट घेत नाहीं ॥२॥ अवगुणी बाटलें चित्त । तया हित आतळे ना ॥३॥ तुका ह्मणे फजितखोरा । ह्मणतां बरा उगी रहा ॥४॥

॥ २८९६ ॥

ऊचाळाच्या कामा नाहीं ताळावाळा । न कळे वोंगळा उपदेश ॥ १ ॥
वचनचर्येची न कळे चांचणी । ऐसी संघष्टनी अमंगळ ॥ २ ॥
समयो न कळे वेडगळ बुद्धि । विजाती ते शुद्धि चांच चाडे ॥ ३ ॥
तुका ह्मणे याचा धिकारचि बरा । बहुमति खराहूनि हीन ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ मेला. २ थाट.

॥ २८९७ ॥

न ह्मणे वो आह्मीं आपुलेनि चित्तीं । निःशेष अतिप्रीति विषयीं तो ॥ १ ॥
खोटा तो विटाळ खोटा तो विटाळ । ह्मणोनि गाबाळ सांडियेलें ॥२॥
भांगतमाखूचा चित्ताचा आदर । कोरडें उत्तर चाटावें तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी नव्हों फजितखोर । तुटींचा व्यापार करावया ॥ ४ ॥

॥ २८९८ ॥

न मिळती एका एक । जये नगरीचे लोक ॥ १ ॥ भलीं तेथें राहूं नये । क्षणें होईल न कळे काय ॥२॥ न करितां अन्याय । बळें करिती अपाय ॥३॥ नाहीं पुराणाची प्रीति । ठायींठायीं पंचायती ॥४॥ भल्या बुऱ्या मारी । होतां कोणी न निवारी ॥५॥ अविचाऱ्या हातीं । देऊनि प्रजा नागविती ॥ ६ ॥ तुका ह्मणे दरी । सुखें सेवावी ते बरी ॥ ७ ॥

॥ २८९९ ॥

मायबापें सांभाळिती । लोभाकारणें पाळिती ॥१॥ तैसा नव्हे देवराव । याचा कृपाळु स्वभाव ॥ २ ॥ मनासारिखें न होता । बाळकासी मारी माता ॥३॥ तुका ह्मणें सांगूं किती । बाप लेंकासी मारिती ॥ ४ ॥

॥ २९०० ॥

सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥
येथें अळंकार शोभती सकळ । भावबळें फळ इच्छेचें तें ॥ २ ॥
अंतरींचें बीज जाणे कळवळा । व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळ घडी आल्याविण ॥ ४ ॥

॥ २९०१ ॥

काळाचिया सत्ता ते नाहीं घटिका । पंढरीनायका आठवितां ॥ १ ॥
सदा काळ गणना करी आयुष्याची । कथेचे वेळेची आज्ञा नाहीं ॥ २ ॥
याकारणें माझ्या विठोबाची कीर्ति । आहे हे त्रिजगतीं थोर वाट ॥ ३ ॥
तुका ह्मणे जन्मा आलियाचें फळ । स्मरावा गोपाळ तेंचि खरें ॥ ४ ॥

॥ २९०२ ॥

जाणे अंतरींचा भाव । तोचि करितो उपाव ॥ १ ॥ नलगे सांगावें मागावें । जीवें भावें अनुसरावें । अविनाश घ्यावें । फळ धीर धरोनि ॥ २ ॥ बाळा न मागतां भोजन । माता घाली पाचारून ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरी । एकीं लंघियेले गिरी ॥ ४ ॥

॥ २९०३ ॥

करीं ऐसी धांवाधांवी । चित्त लावीं चरणापें ॥ १ ॥ मग तो माझा मायबाप । घेइल ताप हरूनी ॥ २ ॥ बहुतांच्या मतें गोवा । होऊं जीवा नेदावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे करुणा बोलें । धीर विठ्ठलें निघेना ॥ ४ ॥

॥ २९०४ ॥

देव भक्तालागीं करूं नेदी संसार । अंगें वारासार करीतसे ॥ १ ॥ भाग्य द्यावें तरी अंगें भरे ताठा । ह्मणोनि करंटा करोनि ठेवी ॥ २ ॥ स्त्री द्यावी गुणवंती नसती गुंते आशा । यालागीं कर्कशा पाठी लावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मज प्रचित आली देखा । आणीक या लोकां काय सांगों ॥ ४ ॥

॥ २९०५ ॥

विश्वंभरा वोळे । बहुत हात कान डोळे ॥ १ ॥ जेथें असे तेथें देखें । मागितलें तें आइकें ॥ २ ॥ जें जें वाटे गोड । तैसें पुरवितो कोड ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेटी । कांहीं पडों नेदी तुटी ॥ ४ ॥

॥ २९०६ ॥

पाचारितां धांवे । ऐसी ठायींची हे सवे ॥ १ ॥ बोले करुणा वचनीं । करी कृपा लावी स्तनीं ॥ २ ॥ जाणे कळवळा । भावसिद्धींचा जिव्हाळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाम । मागें मागें धांवे प्रेम ॥ ४ ॥

॥ २९०७ ॥

वर्णावे ते किती । केले पवाडे श्रीपति ॥ १ ॥ विश्वासिया घडे लाभ ।

---

पाठभेदः—१ वारावार.

देइल तरी पद्मनाभ ॥ २ ॥ भाव शुद्ध तरी । सांगितलें काम करी ॥ ३ ॥ तुका ह्मणे भोळा देव । परी हा नागवी संदेह ॥ ४ ॥

॥ २९०८ ॥

धीर नव्हे मनें । काय तयापाशीं उणें ॥ १ ॥ भार घातलियावरी । दासां नुपेक्षील हरी ॥ २ ॥ याच्याऐसी आटी । द्यावी द्रव्याचिये साटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे पोटें । देवा बहु केलें खोटें ॥ ४ ॥

॥ २९०९ ॥

पाठवील ठाया । पांडुरंग चिंतिलिया ॥ १ ॥ त्यासी चिंतिलिया मनीं । चिंता करी गंवसणी ॥ २ ॥ पावावया फळ । अंगीं असावें हें बळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे तईं । सिद्धि वोळंगती पायीं ॥ ४ ॥

॥ २९१० ॥

न करावी चिंता । भय न धरावें सर्वथा ॥ १ ॥ दासां साहे नारायण । होय रक्षिता आपण ॥ २ ॥ नलगे परिहार । कांहीं योजावें उत्तर ॥ ३ ॥ न धरावी शंका । नये बोलों ह्मणे तुका ॥ ४ ॥

॥ २९११ ॥

मधुरा उत्तरासवें नाहीं चाड । अंतरंगीं वाड भाव असो ॥ १ ॥
प्राणावेगळा न करी नारायण । मग नसो ज्ञान मूर्ख बरा ॥ २ ॥
जनानिंदा होय तो बरा विचार । थोरवीचा भार कामा नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे चित्तीं भाव निष्टावंत । दया क्षमा शांति सर्वांभूतीं ॥ ४ ॥

॥ २९१२ ॥

भय हरिजनीं । कांहीं न धरावें मनीं ॥ १ ॥ नारायण ऐसा सखा । काय जगाचा हा लेखा ॥ २ ॥ चित्त वित्त देवा । समर्पून राहा देवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मन । असों द्यावें समाधान ॥ ४ ॥

---

पाठभेद:—१ याऐसी. २ पावतील. ३ शांती.

॥ २९१३ ॥

अभिमानी पांडुरंग । गोवा काशाचा हो मग ॥ १ ॥ अनुसरा लव-लाहीं । नका विचार करूं कांहीं ॥ २ ॥ कोठें राहातील पापें । जालिया हो अनुताप ॥ ३ ॥ तुका ह्मणे येचि घडी । उभ्या पाववील थडी ॥ ४ ॥

॥ २९१४ ॥

वैद्य एक पंढरिराव । अंतर्भाव तो जाणे ॥ १ ॥ रोगाऐशा द्याव्या वल्ली । जाणे जाली बाधा ते ॥ २ ॥ नेदी रुका वेचों मोल । पाहे बोल प्रीतीचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे दयावंता । सदा चिंता दिनांची ॥ ४ ॥

॥ २९१५ ॥

चित्तीं नाहीं आस । त्याचा पांडुरंग दास ॥ १ ॥ असे भक्तांचिये घरीं । काम न सांगतां करी ॥ २ ॥ अनाथाचा बंधु । असे अंगीं हा संबंधु ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें । देवा सत्ता राबवावें ॥ ४ ॥

॥ २९१६ ॥

भाविकां हें वर्म सांपडलें निकें । सेविती कवतुकें धणीवरि ॥ १ ॥
इच्छितील तैसा नाचे त्यांचे छंदें । वंदिती तीं पदें सकुमारें ॥ २ ॥
विसरले मुक्ती भक्तिअभिळासें । ओढत सरिसें सुख आलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं मागायाची आस । पांडुरंग त्यांस विसंबेना ॥ ४ ॥

॥ २९१७ ॥

सत्य सत्यें देतें फळ । नाहीं लागतचि बळ ॥ १ ॥ ध्यावे देवाचे ते पाय । धीर सकळ उपाय ॥ २ ॥ करावीच चिंता । नाहीं लागत तत्वता ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें । शरण ह्मणवितां बरवें ॥ ४ ॥

॥ २९१८ ॥

शूरत्वासी मोल । नये कामा फिके बोल ॥ १ ॥ केला न संडी के-

वाड । जीवेंसाटीं तो हें कोडें ॥ २ ॥ धीर तो कारण । साह्य होतो नारायण ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरि । दासा रक्षितो निर्धारीं ॥ ४ ॥

॥ २९१९ ॥

लाभ पुढें करी । घात नारायण वारी ॥ १ ॥ ऐसी भक्तांची माउली । करी कृपेची साउली ॥ २ ॥ माय बाळकासी । जीव भाव वेची तैसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे लाड । नाहीं शरणागता आड ॥ ४ ॥

॥ २९२० ॥

अनंत ब्रह्मांडें । एके गर्मी ऐसें पेंडें ॥ १ ॥ तो या गौळियांचे घरीं । उंबरा चढतां टेंका धरी ॥ २ ॥ मारी दैत्य गाढे । ज्यांचे पुराणीं पवाडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ॥ ४ ॥

॥ २९२१ ॥

एवढा प्रभु भावें । तेणें संपुष्टीं राहावें ॥१॥ होय भक्तीं केला तैसा। पुरवी धरावी ते इच्छा ॥ २ ॥ एवढा जगदानी । मागे तुळसीदळ पाणी ॥ ३ ॥ आला नांवा रूपा । तुका ह्मणे जाला सोपा ॥ ४ ॥

॥ २९२२ ॥

कृपावंत किती । दीनें बहु आवडती ॥ १ ॥ त्यांचा भार वाहे माथां । करी योगक्षेमचिंता ॥ २ ॥ भुलों नेदी वाट । करीं धरूनि दावी नीट ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीवें । अनुसरतां एका भावें ॥ ४ ॥

॥ २९२३ ॥

करितां कोणाचें ही काज । नाहीं लाज देवासी ॥ १ ॥ बरें करावें हें काम । धरिलें नाम दीनबंधु ॥ २ ॥ करूनि अराणूक पाहे । भलत्या साह्य व्हावया ॥३॥ बोले तैसी करणी करी । तुका ह्मणे एक हरि ॥४॥

॥ २९२४ ॥

घेऊनियां चक्र गदा । हाचि धंदा करी तो ॥ १ ॥ भक्तां राखे पाया-

पाठभेदः—१ होड. २ चाड.

पासीं । दुर्जनासी संहारी ॥ २ ॥ अव्यक्त तें आकारलें । रूपा आलें गुणवंत ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुरवी इच्छा । जया तैसा विठ्ठल ॥ ४ ॥

॥ २९२५ ॥

भक्ताविण देवा । कैंचें रूप घडे सेवा ॥ १ ॥ शोभविलें येर येरां । सोनें एके ठायीं हिरा ॥ २ ॥ देवाविण भक्ता । कोण देता निष्कामता ॥ ३ ॥ तुका ह्मणे बाळ । माता जैसें स्नेहजाळ ॥ ४ ॥

॥ २९२६ ॥

भक्त देवाघरींचा सुना । देव भक्ताचा पोसणा ॥ १ ॥ येर येरां जडलें कैसें । जीवा अंग जैसें तैसें ॥ २ ॥ देव भक्ताची कृपाळु माता । भक्त देवाचा जनिता ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंगें । एक एकाचिया संगें ॥ ४ ॥

॥ २९२७ ॥

देव राखे तया मारील कोण । न मोडे कांटा हिंडतां वन ॥ १ ॥ न जळे[१] न बुडे नव्हे कांहीं । विष तेंही अमृत पाहीं ॥ २ ॥ न चुके वाट न पडे फंदीं । नव्हे कधीं यमबाधा ३ तुका ह्मणे नारायण । येतां गोळ्या वारी बाण ॥४॥

॥ २९२८ ॥

आवडीनें धरिलीं नांवें । प्रियभावें चिंतन ॥ १ ॥ वेडा जाला वेडा जाला । लांचावला भक्तीसी ॥ २ ॥ निचाड[२] हा चाड धरी । तुळसी करीं दळ मागे ॥ ३ ॥ धरिला संग न करी बळ । तुका ह्मणे कळ पायीं ॥ ४ ॥

॥ २९२९ ॥

प्रथम भेटी आलिंगण । मग चरण वंदावे ॥ १ ॥ ऐसा माझा भोळा बाप । हरी ताप कवळोनि ॥ २ ॥ न सांगतां सीण भाग । पांडुरंग जाणतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे कृपावंतें[३] । खातें[४] मातें न मागतां ॥ ४ ॥

॥ २९३० ॥

देवाचा तो ख्रूण आला ज्याच्या घरा । त्याच्या पडे चिरा मनुष्यपणा ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ जळे, २ निचाड्या, ३ प्रेमभरी, ४ मातें.

देवाची ते खूण करावें वाटोळें । आपणा वेगळें कोणी नाहीं ॥ २ ॥
देवाची ते खूण गुंतों नेदी आशा । ममतेच्या पाशा शिवों नेदी ॥ ३ ॥
देवाची ते खूण गुंतों नेदी वाचा । लागों असत्याचा मळ नेदी ॥ ४ ॥
देवाची ते खूण तोडी मायाजाळ । आणि हें सकळ जग हरी ॥ ५ ॥
पहा देवें तेंचि बळकाविलें स्थळ । तुक्यापें सकळ चिन्हें त्याचीं ॥६॥

॥ २९३१ ॥

देवाच्या प्रसादें करा रे भोजन । व्हाल कोण कोण अधिकारी ते ॥१॥
ब्रह्मादिकांसि हें दुर्लभ उच्छिष्ट । नका मानूं वीट ब्रह्मरसीं ॥ २ ॥
अवघियांपुरतें वोसंडलें पात्र । अधिकार सर्वत्र आहे येथें ॥ ३ ॥
इच्छादानी येथें वळला समर्थ । अवघेंचि आर्त पुरवितो ॥ ४ ॥
सरे येथें ऐसें नाहीं कदाकाळीं । पुढती वाटे कवळीं घ्यावें ऐसें ॥५॥
तुका ह्मणे पाक लक्षुमीच्या हातें । कामारी सांगातें निरुपम ॥ ६ ॥

॥ २९३२ ॥

देव आमुचा[1] देव आमुचा । जीव सकळ जीवांचा ॥ १ ॥ देव आहे
देव आहे । जवळी आह्मां अंतर बाहे ॥ २ ॥ देव गोड देव गोड । पुरवी
कोडाचेंही कोड ॥ ३ ॥ देव आह्मां राखे राखे । घाली कळीकाळासी
काखे ॥ ४ ॥ देव दयाळ देव दयाळ । करी तुक्याचा सांभाळ ॥५॥

॥ २९३३ ॥

देव पाहों देव पाहों । उंचे ठायीं उभे राहों ॥ १ ॥ देव देखिला देव
देखिला । तो नाहीं कोणां भ्याला ॥२॥ देवा[2]सी कांहीं मागों मागों ।
जीव भाव त्यासी सांगों ॥३॥ देव जाणे देव जाणे । पुरवीं मनींचिये
खुणे ॥ ४ ॥ देव कातर देव कातर । तुका ह्मणे अभ्यंतर ॥ ५ ॥

॥ २९३४ ॥

देव भला देव भला । मिळोनि जाय जैसा त्याला ॥ १ ॥ देव उदार

पाठभेदः—१ 'आमुचा' एकदांच आहे. २ देवा.

देव उदार । देतां नाहीं थोडें फार ॥२॥ देव बळी देव बळी । जोडा नाहीं भूमंडळीं ॥ ३ ॥ देव व्हावा देव व्हावा । आवडे तो सर्वा जीवा ॥ ४ ॥ देव चांगला देव चांगला । तुका[1] चरणासीं लागला ॥ ५ ॥

॥ २९३५ ॥

देव दयाळ देव दयाळ । साहे कोल्हाळ बहुतांचा ॥ १ ॥ देव उदार देव उदार । थोड्यासाटीं फार देऊं जाणे ॥ २ ॥ देव चांगला देव चांगला । तुका लागला चरणीं ॥ ३ ॥

॥ २९३६ ॥

देव बराडी देव बराडी । घाली देंठासाटीं उडी ॥ १ ॥ देव भ्याड देव भ्याड । राखे बळीचें कवाड ॥ २ ॥ देव भाविक देव भाविक । होय दासांचा सेवक ॥ ३ ॥ देव होया देव होया । जैसा ह्मणे तैसा तया ॥ ४ ॥ देव लाहान देव लाहान । तुका ह्मणे अनुरेण ॥ ५ ॥

॥ २९३७ ॥

देव मजुर देव मजुर । नाहीं उजूर सेवेपुढें ॥ १ ॥ देव गांढ्याळ देव गांढ्याळ । देखोनियां बळ लपतसे ॥ २ ॥ देव तर काई देव तर काई । तुका ह्मणे राई तरी मोटी ॥ ३ ॥

॥ २९३८ ॥

देव जाणता देव जाणता । आपलीया सत्ता एकाएकीं ॥ १ ॥ देव चतुर देव चतुर । जाणोनि अंतर वर्ततसे ॥ २ ॥ देव निराळा देव निराळा । अलिप्त विटाळा तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ २९३९ ॥

देव निढळ देव निढळ । मूळ नाहीं डाळ परदेशी ॥१॥ देव अकुळी देव अकुळी । भलते ठायीं सोयरीक ॥ २ ॥ देव लिगाड्या देव लिगाड्या । तुका ह्मणे भाड्या दंभें ठकी ॥ ३ ॥

---

पाठभेदः—१ तुका ह्मणे.

॥ २९४० ॥

देव बासर देव बासर । असे निरंतर जेथें तेथें ॥ १ ॥ देव खोळंबा देव खोळंबा । मज झळंबा ह्मण कोंडी ॥ २ ॥ देव लागट देव लागट । लाविलिया चट जीवीं जडे ॥ ३ ॥ देव बावळा देव बावळा । भावें जवळा लुडबुडी ॥ ४ ॥ देव न व्हावा देव न व्हावा । तुका ह्मणे गोवा करी कामीं ॥ ५ ॥

॥ २९४१ ॥

देव घ्या कोणी देव घ्या कोणी । आइता आला घर पुसोनी ॥ १ ॥ देव न लगे देव न लगे । सांटवणेंचे रुधले जागे ॥ २ ॥ देव मंदला देव मंदला । भाव बुडाला काय करूं ॥ ३ ॥ देव घ्या फुका देव घ्या फुका । न लगे रुका मोल कांहीं ॥ ४ ॥ दुबळा तुका भावहीण । उधारा देव घेतला रुणें ॥ ५ ॥

॥ २९४२ ॥

अंतरींची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥ १ ॥ देव सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ॥ २ ॥ आपुलयाच वैभवें । शृंगारावें निर्मळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे जेवी सवें । प्रेम द्यावें प्रीतीचें ॥ ४ ॥

॥ २९४३ ॥

हरिहरां भेद । नाहीं करूं नये वाद ॥ १ ॥ एक एकाचे हृदयीं । गोडी साखरेच्या ठायीं ॥ २ ॥ भेदकासी नाड । एक वेलांटीच आड ॥ ३ ॥ उजवें वामांग । तुका ह्मणे एकचि अंग ॥ ४ ॥

॥ २९४४ ॥

सांटविला हरी । जींहीं हृदयमंदिरीं ॥ १ ॥ त्यांची सरली येरझार । झाला सफळ व्यापार ॥ २ ॥ हरी आला हातां । मग कैंची भयचिंता ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरी । कांहीं उरों नेदी उरी ॥ ४ ॥

॥ २९४५ ॥

भक्तऋणी देव बोलती पुराणें । निर्धार वचनें साच करीं ॥ १ ॥
मागें काय जाणों अइकिली वार्त्ता । कबिर सातें जातां घडिया वांटी ॥२॥
माघारिया धन आणिलें घरासि । न घे केला त्यासि त्याग तेणें ॥३॥
नामदेवाचिया घरासि आणिलें । तेणें लुटविलें द्विजां हातीं ॥ ४ ॥
प्रत्यक्षासि काय द्यावें हें प्रमाण । येंकोबाचें ऋण फेडियलें ॥ ५ ॥
बीज दळोनियां केली आराधना । लागे नारायणा पेरणें तें ॥ ६ ॥
तुका ह्मणे नाहीं जयासि निर्धार । नाडला साचार तोचि एक ॥ ७ ॥

॥ २९४६ ॥

कांहीं न मागती देवा । त्यांची करूं धांवे सेवा ॥ १ ॥ हळूहळू फेडी
ऋण । होऊनियां रूपें दीन ॥ २ ॥ होऊं न सके वेगळा । क्षण एक
त्यां निराळा ॥३॥ तुका ह्मणे भक्तिभाव । हाचि देवाचाही देव ॥४॥

॥ २९४७ ॥

उंच[1] निंच कांहीं नेणें भगवंतीं । तिष्ठे भावभक्ती देखोनियां ॥ १ ॥
दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्याघरीं रक्षी प्रल्हादासी ॥२॥
चर्म रंगूं लागे रोहिदासा संगें । कबिराचे मागीं विणी शेले ॥ ३ ॥
सजनकसाया विकूं लागे मास । माळ्या सांवत्यास खुरपूं लागे ॥४॥
नरहरिसोनारा घडूं फुंकूं लागे । चोख्यामेळ्यासंगें ढोरें ओढी ॥५॥
नामयाची जनी सवें वेची शेणी । धर्मा घरीं पाणी वाहे झाडी ॥६॥
नाम्या सवें जेवी नव्हे संकोचित । ज्ञानियाची भिंत अंगीं ओढी ॥७॥
अर्जुनाचे[2] रथीं होय हा सारथी । भक्षी पोहे प्रीति सुदाम्याचे ॥ ८ ॥
गौळियांचे घरीं गाई अंगें वळी । द्वारपाळ बळी द्वारीं जाला ॥ ९ ॥
येंकोबाचें ऋण फेडी हृषीकेशी । आंबऋषीचे सोशी गर्भवास ॥१०॥

---

पाठभेदः—१ उंच निंच कांहीं नेणे हा भगवंत । तिष्ठे भावभक्त देखोनियां ॥
२ अर्जुनाचीं घोडीं हाकी.

मिराबाई साटीं घेतो विषप्याला । दामाजी जाला पाडेवार ॥ ११ ॥
कडी माती वाहे गोऱ्या कुंभाराची । हुंडी मेहत्याची अंगें भरी ॥ १२ ॥
पुंडलिकासाटीं अझूनि तिष्ठत । तुका ह्मणे मात धन्य त्याची ॥ १३ ॥

॥ २९४८ ॥

अंगीकार ज्याचा केला नारायणें । निंद्य तेहि तेणें वंद्य केलें ॥ १ ॥
अजामेळ भिल्ली तारिली कुंटणी । प्रत्यक्ष पुराणीं वंद्य केली ॥ २ ॥
ब्रह्महत्यारासी पातकें अपार । वाल्मीक किंकर वंद्य केला ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें भजन प्रमाण । काय थोरपण जाळावें तें ॥ ४ ॥

॥ २९४९ ॥

यातिगुणें रूपें काय ते वानर । तयांच्या विचारें वर्ते राम ॥ १ ॥
ब्रह्महत्यारासी पातकी अनेक । तो वंद्य वाल्मीक तिहीं लोकीं ॥ २ ॥
तुका ह्मणे नव्हे चोरीचा व्यापार । ह्मणा रघुवीर वेळोवेळीं ॥ ३ ॥

॥ २९५० ॥

ऐका महिमा आवडीचीं । बोरें खाय भिलटीचीं ॥ १ ॥ थोर प्रे-
माचा भुकेला । ह्याचि दुष्काळ तयाला ॥ २ ॥ अष्टमा सिद्धींला ॥
न मनी क्षीरसागराला ॥ ३ ॥ पोहे सुदाम देवाचे । फके मारी को-
रडेच ॥४॥ न ह्मणे उच्छिष्ट अथवा थोडे । तुका ह्मणे भक्तीपुढें ॥५॥

॥ २९५१ ॥

पाहा कैसे कैसे । देवें उद्धरिले अनायासें ॥ १ ॥ ऐका नवल्याची
ठेव । नेणतां भक्तिभाव ॥ २ ॥ कैलासासी नेला । भिल्ल पानेडी
बैसला ॥ ३ ॥ पांखांच्या फडत्कारीं । उद्धरुनी नेली घारी ॥ ४ ॥
चोरें पिंडीं दिला पाव । त्या पूजनें धाये देव ॥ ५ ॥ तुका ह्मणे
भोळा । स्वामी माझा हो कोंवळा ॥ ६ ॥

॥ २९५२ ॥

ह्मणउनि शरण जावें । सर्वभावें देवासी ॥१॥ तो हा उतरील पार ।

भवदुस्तरनदीचा ॥ २ ॥ बहु आहे करुणावंत । अनंत हें नाम ज्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे साक्षी आलें । तरी केलें प्रगट ॥ ४ ॥

॥ २९५३ ॥

तयासी नेणतीं बहु आवडती । होय जया चित्तीं एक भाव ॥ १ ॥ उपमन्यु धुरु हे काय जाणती । प्रल्हादाच्या चित्तीं नारायण ॥ २ ॥ कोळी भिल्ल पशु श्वापदें अपारें । कृपेच्या सागरें तारियेलीं ॥ ३ ॥ काय तीं गोपाळें चांगलीं शाहाणीं । तया चक्रपाणी जेवी सवें ॥ ४ ॥ तुका ह्मणे भोळा भाविक हा देव । आह्मी त्याचे पाव धरुनी ठेलों ॥५॥

॥ २९५४ ॥

विश्वाचा जनिता । ह्मणे यशोदेसि माता ॥ १ ॥ ऐसा भक्तांचा अंकित । लागे तैसी लावी प्रीत ॥ २ ॥ निष्काम निराळा । गोपी लावियेल्या चाळा ॥३॥ तुका ह्मणे आलें । रूपा अव्यक्त चांगलें ॥४॥

॥ २९५५ ॥

गौळीयाचीं ताकपिरें । कोण पोरें चांगलीं ॥ १ ॥ येवढा त्यांचा छंद देवा । काय सेवा भक्ती ते ॥ २ ॥ काय उपास पडिले होते । कण्याभोंवते विदुराच्या ॥३॥ तुका ह्मणे कुब्जा दासी । रूपरासी हीनकळा ॥ ४ ॥

॥ २९५६ ॥

शुकसनकादिकीं उभारिला बाहो । परिक्षितीला हो दिसा सातां ॥१॥ उठाउठी करी स्मरणाचा धांवा । धरवत देवा नाहीं धीर ॥ २ ॥ त्वरा जाली गरुड टाकियेला मागें । द्रौपदीच्या लागें नारायणें ॥३॥ तुका ह्मणे करी बहुच तांतडी । प्रेमाची आवडी लोभ फार ॥ ४ ॥

॥ २९५७ ॥

सोडिला संसार । माया तयावरि फार ॥ १ ॥ धांवे[1] चाले मागें

पाठभेदः—१ धांवत.

मागें । सुखदुःख साहे अंगें ॥ २ ॥ यानें घ्यावें नाम । तीसी करणें त्याचें काम ॥ ३ ॥ तुका ह्मणे भोळी । विठ्ठलकृपेची कोंवळी ॥ ४ ॥

॥ २९५८ ॥

बोलिलों उत्कर्षें । प्रेमरस दासत्वें ॥ १ ॥ साच करिता नारायण । जया शरण गेलों तो ॥ २ ॥ समर्थ तो आहे ऐसा । धरिली इच्छा पुरवी ॥ ३ ॥ तुका ह्मणे लडिवाळाचें । द्यावें साचें करूनियां ॥४॥

॥ २९५९ ॥

पाहातां रूप डोळां भरे । अंतर नुरे वेगळें । इच्छावशें खेळ मांडी । अवघें सांडी बाहेरी ॥१॥ तो हा नंदानंदन बाइये । यासी काय परिचार वो ॥२॥ दिसतो हा नव्हे तैसा । असे दिशाव्यापक । लाघव हा खोळेसाटीं । होतां भेटी परतेना ॥ ३ ॥ ह्मणोनि उभी ठाकलीये । परतलीये या वाटा । आड करोनियां तुका । जो या लोकां दाखवितो ॥४॥

॥ २९६० ॥

भाविकांचें काज अंगें देव करी । काढी धर्माघरीं उच्छिष्ट तें ॥ १ ॥ उच्छिष्ट तीं फळें खाय भिल्लटीचीं । आवडी तयांची मोठी देवा ॥२॥ काय देवा घरीं न मिळेचि अन्न । मागे भाजीपान द्रौपदीसी ॥ ३ ॥ अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें । संकटें बहुतें निवारिलीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे ऐसीं आवडती लडिवाळें । जाणिवेचें काळें तोंड देवा ॥५॥

॥ २९६१ ॥

उद्धाराचा संदेह नाहीं । याच्या कांहीं सेवकां ॥ १ ॥ पांडुरंग अभिमानी । जीवदानीं कोंवसा ॥ २ ॥ बुडतां जळीं जळतां अगीं । ते प्रसंगीं राखावें ॥३॥ तुका ह्मणे आह्मांसाटीं । कृपा पोटीं वागवी ॥४॥

॥ २९६२ ॥

आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा कृपावंत वाचा त्याची ॥१॥

---

पाठभेदः—१ भगवंत.

साळुंकी मंजूळ बोलतसे वाणी । शिकविता धणी वेगळाची ॥ २ ॥
काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे त्याची कोण जाणे कळा । चालवी पांगुळा पायांविण ॥ ४ ॥

॥ २९६३ ॥

आवडीचें दान देतो नारायण । बाहे उभारोन राहिलासे ॥ १ ॥
जें जयासी रुचे तें करी समोर । सर्वज्ञ उदार मायबाप ॥ २ ॥
ठायीं पडिलिया तेंचि लागे खावें । ठायींचेंचि घ्यावें विचारूनि ॥ ३ ॥
बीज पेरूनियां तेंचि घ्यावें फळ । डोरलीस केळ कैंचें लागे ॥ ४ ॥
तुका ह्मणे देवा कांहीं बोल नाहीं । तुझा तूंचि पाहीं शत्रु सखा ॥ ५ ॥

॥ २९६४ ॥

बैसोनि निश्चळ करीं त्याचें ध्यान । देईल तो अन्नवस्त्रदाता ॥ १ ॥
काय आह्मां करणें अधिक सांचुनी । देव जाला ऋणी पुरविता ॥ २ ॥
दयाळ मयाळ जाणे कळवळा । शरणागतां लळा राखों जाणे ॥ ३ ॥
नलगे मागणें सांगणें तयासी । जाणे इच्छा तैसी पुरवी त्याची ॥ ४ ॥
तुका ह्मणे लेई अळंकार अंगीं । विठ्ठल हा जगीं तूंचि होसी ॥ ५ ॥

॥ २९६५ ॥

जैसा निर्मळ गंगा ओघ । तैसा भाग वोगरीं ॥ १ ॥ प्रेम वाढे ग्रासो-
ग्रासीं । ब्रह्मरसीं भोजन ॥ २ ॥ तृप्तीवरि आवडी उरे । ऐसे बरे
प्रकार ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाख मन । नारायण तें भोगी ॥ ४ ॥

॥ २९६६ ॥

वर्णावी ते थोरी एका विठ्ठलाची । कीर्ति मानवाची बोलों नये ॥ १ ॥
उदंडचि जाले जन्मोनियां मेले । होवोनियां गेले राव रंक ॥ २ ॥
त्यांचें नाम कोणी नेघे चराचरीं । साही वेद चारी वर्णिताती ॥ ३ ॥

---

पाठभेदः—१ चालवी पांगळा. २ सांगों.

अक्षय अढळ चळेना ढळेना । तया नारायणा ध्यास जावें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुह्मी विठ्ठल चित्तीं ध्यातां । जन्म मरण व्यथा दूर होती ॥ ५ ॥

॥ २९६७ ॥

सावाविलें एका । सरें अवघियां लोकां ॥ १ ॥ आतां आवडीच्या हातीं । भेद नाहीं ये पंगती ॥ २ ॥ मोकळीच पोतीं । नाहीं पुसायाची गुंती ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरा । आहे ढसाळ वेव्हारा ॥ ४ ॥

॥ २९६८ ॥

येणें मार्गें आले । त्यांचें निसंतान केलें ॥ १ ॥ ऐसी अवघड वाट । ऐकोन आलों मी बोभाट ॥ २ ॥ नागविल्या थाटी । उरों नेदीच लंगोटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे चोर । तो हा उभा कटिकर ॥ ४ ॥

॥ २९६९ ॥

जें जें केलें तें तें साहे । कैसें पाहें भाविक ॥ १ ॥ ओंवाळूनि माझी काय । सांडिली यावरूनि ॥ २ ॥ काय होय नव्हे करूं । नेणें धरूं सत्ता ते ॥ ३ ॥ तुका ह्मणे कटीं कर । उभें धीर धरूनि ॥ ४ ॥

॥ २९७० ॥

जिव्हा जाणे फिकें मधुर कीं क्षार । येर मास पर हाता न कळे ॥ १ ॥
देखावें नेत्रीं बोलावें मुखें । चित्ता सुखदुःखें कळों येती ॥ २ ॥
परिमळासी घ्राण ऐकती श्रवण । एकाचें कारण एका नये ॥ ३ ॥
एकदेहीं भिन्न दावियेल्या[1] कळा । नाचवी पुतळा सूत्रधारी ॥ ४ ॥
तुका ह्मणे ऐशी जयाची सत्ता । कां नया अनंता विसरलेती ॥ ५ ॥

॥ २९७१ ॥

सोवळा तो जाला । अंगीकार देवें केला ॥ १ ॥ येर करिती भोजन । पोट पोसाया दुर्जन ॥ २ ॥ चुकला हा भार । तयाचीच येरझार ॥ ३ ॥ तुका ह्मणे दास । जाला तया नाहीं नास ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ ठेवियेल्या.

॥ २९७२ ॥

स्वामीच्या सामर्थ्यें । चाले बोलिला पुरुषार्थ ॥ १ ॥ पाठी देवाचें हें बळ । मग लाभे हातीं काळ ॥ २ ॥ देव ज्यासी साह्य । तेणें केलें सर्व होय ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्वामीसत्ता । मग नाहीं भय चिंता ॥ ४ ॥

॥ २९७३ ॥

न करि त्याचें गांढेपण । नारायण सिद्ध उभा ॥ १ ॥ भवसिंधूचा थडवा केला । बोलाविला पाहिजे ॥ २ ॥ याचे सोई पाउल वेचे । मग कैंचे आडथळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे खरें खोटें । न ह्मणे मोटें लहान ॥ ४ ॥

॥ २९७४ ॥

स्वामिकाज गुरुभक्ति । पितृवचन सेवा पति ॥ १ ॥ हेचि विष्णूची महापूजा । अनुभाव नाहीं दुजा ॥ २ ॥ सत्य बोले मुखें । दुखवे आणिकांच्या दुःखें ॥ ३ ॥ निश्चयाचें बळ । तुका ह्मणे तेंच फळ ॥ ४ ॥

॥ २९७५ ॥

नाहीं काष्ठाचा गुमान । गोंवी भ्रमरा सुमन ॥ १ ॥ प्रेम प्रीतीचें बांधलें । तें न सुटे कांहीं केलें ॥ २ ॥ पदरीं घालीं पिळा । बाप निर्बळ सांटीं बाळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें । भेणें देवें आकारावें ॥ ४ ॥

॥ २९७६ ॥

सुखरूप चाली । हळूहळू उसंतिली ॥ १ ॥ बाळगोपाळांची वाट । सेव्यसेवकता नीट ॥ २ ॥ जरी जाला श्रम । तरी पडों नये भ्रम ॥ ३ ॥ तुका ह्मणे दासां । देव सरिसासरिसा ॥ ४ ॥

॥ २९७७ ॥

आह्मां घरीं एक गाय दुभता हे । पान्हा न समाये त्रिभुवनीं ॥ १ ॥ वान ते सांवळी नांव तें श्रीधरा । चरे वसुंधरा चौदा भुवनें ॥ २ ॥ वत्स नाहीं माय भलत्या सवें जाय । कुर्वाळी तो लाहे भावभरणा ॥ ३ ॥

चहूं धारीं क्षीर वोळली अमुप । धाले सनकादिक सिद्ध मुनी ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझी भूक तेथें काय । जोगावितें माय तिन्हीं लोकां ॥ ५ ॥

॥ २९७८ ॥

देवाच्या संबंधें विश्वचि सोयरें । सूत्र ओढें दोरें एका एक ॥ १ ॥
आहाच हें नव्हे विटायासारिखें । जीव जीवनीं देखें सामावले ॥ २ ॥
आणिकांचें सुख दुःख उमटे अंतरीं । एथील इतरीं तेणें न्यायें ॥ ३ ॥
तुका ह्मणे ठसावलें शुद्ध जातीं । शोभाचि पुढती विशेषता ॥ ४ ॥

॥ २९७९ ॥

धन्य भावशील । ज्याचें हृदय निर्मळ ॥ १ ॥ पूजी प्रतिमेचे देव । संत ह्मणती तेथें भाव ॥ २ ॥ विधिनिषेध नेणती । एक निष्ठा धरुनी चित्तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे तैसें देवा । होणें लागे त्यांच्या भावा ॥ ४ ॥

॥ २९८० ॥

त्रैलोक्य पाळितां । उबगला नाहीं । आमचें त्या काई असे ओझें ॥ १ ॥
पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर । तया मुखीं चार कोण घाली ॥ २ ॥
पक्षी अजगर न करी संचित । तयासि अनंत प्रतिपाळी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तया भार घातलिया । उपेक्षिना दयासिंधु माझा ॥ ४ ॥

॥ २९८१ ॥

राजा करी तैसे दाम । तेही चाम चालती ॥ १ ॥ कारण ते सत्ता शिरीं । कोण करी अव्हेर ॥ २ ॥ वाइलें तें सुने खांदीं । चाले पदीं बैसविलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे विश्वंभरें । करुणाकरें राखिलें ॥ ४ ॥

॥ २९८२ ॥

सुखाचे व्यवहारीं सुखलाभ जाला । आनंद कोंदला मागें पुढें ॥ १ ॥
संगतीं पंगती देवासवें घडे । नित्यानित्य पडे तोंचि सांचा ॥ २ ॥
समर्थाचे घरीं सकळ संपदा । नाहीं तुटी कदा कासयाची ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें लाभाचिया कोटी । बहु वाव पोटीं समर्थाचे ॥ ४ ॥

॥ २९८३ ॥

मथनीचें नवनीत । सर्व हितकारक ॥ १ ॥ दंडवत दंडा परी । मागें उरी नुगवी ॥ २ ॥ वचनाचा तो पसरु काई । तांतडी डोई-पाशींच ॥ ३ ॥ तुका ह्मणे जगजेठी । लावीं कंठीं उचलूनि ॥ ४ ॥

॥ २९८४ ॥

संसारा आलिया एक सुख आहे । आठवावे पाये विठोबाचे ॥ १ ॥
येणें होय सर्व संसार सुखाचा । नलगे दुःखाचा लेश कांहीं ॥ २ ॥
घेतील तयांसी सोपें आहे सुख । बोलियेलें मुखें नारायण ॥ ३ ॥
सांगितली सोय करुणासागरें । तुह्मां कां हो बरें न वाटे तें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तेणें उपकार केला । भोळ्या भाविकांला तरावया ॥ ५ ॥

॥ २९८५ ॥

सुख नाहीं कोठें आलिया संसारीं । वांयां हांवभरी होऊं नका ॥ १ ॥
दुःखबांदवडी आहे हा संसार । सुखाचा विचार नाहीं कोठें ॥ २ ॥
चवदा कल्पेंवरी आयुष्य जयाला । परी तो राहिला ताटीतळीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे वेगीं जाय सुटोनियां । धरुनि हृदयामाजी हरि ॥ ४ ॥

॥ २९८६ ॥

सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वताएवढें ॥ १ ॥ धरीं धरीं आठवण । मानीं संतांचें वचन ॥ २ ॥ नेलें रात्रीनें तें अर्धें । बाळपण जराव्याधें ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुढा । घाणा जुंतीजसी मूढा ॥ ४ ॥

॥ २९८७ ॥

सावधान ऐसें काय तें विचारा । आले हो संसारा सकळही ॥ १ ॥
अंतीं समयाचा करणें विचार । वेचती सादर घटिका पळें ॥ २ ॥
मंगळ हें नोहे कन्यापुत्रादिक । राहिला लौकिक अंतरपाट ॥ ३ ॥
तुका ह्मणे देव अंतरला दुरी । डोळिया अंधारी पडलीसे ॥ ४ ॥

॥ २९८८ ॥

वैभव तें राज्य संपत्ती टाकावी । उदरार्थ मागावी माधोकरी ॥ १ ॥
आपुलें तें आधीं करावें स्वहित। ऐसी आहे नीत स्वधर्माची ॥ २ ॥
वर्ण कुळ जाति याचा अभिमान। त्यजावा सन्मान लौकिकाचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे राहे एकाकी निःशंक । देउनियां हांक कंठीं काळ ॥ ४ ॥

॥ २९८९ ॥

क्षणक्षणा हाचि करावा विचार । तरावया पार भवसिंधु ॥ १ ॥
नाशिवंत देह जाणार सकळ। आयुष्य खातो काळ सावधान ॥ २ ॥
संतसमागमीं धरावी[1] आवडी। करावी तांतडी परमार्थी ॥ ३ ॥
तुका ह्मणे इहलोकींचा वेव्हार[2] । नये डोळे धूर भरूनि राहों ॥ ४ ॥

॥ २९९० ॥

येऊनि नरदेहा विचारावें सार । धरावा पैं धीर भजनमार्गी ॥ १ ॥
चंचळ चित्तासी ठेवूनियां ठायीं । संतांचिये पायीं लीन व्हावें ॥ २ ॥
भावाचा पैं हात धरावा निश्चयें । तेणें भवभय देशधडी ॥ ३ ॥
नामापरतें जगीं साधन सोपें नाहीं। आवडीनें गाई सर्वकाळ ॥ ४ ॥
तुका ह्मणे धन्य वंश त्या नराचा। ऐसा निश्चयाचा मेरू जाला ॥ ५ ॥

॥ २९९१ ॥

उपजला प्राणी न राहे संसारीं। बैसला सेजारीं काळ उसां ॥ १ ॥
पाहा तो उंदीर घेउनि जाय बोका। तैसा काळ लोकां नेत असे ॥ २ ॥
खाटिकाचे घरीं अजापुत्र पाहे । कसाबाची गाय वांचे कैसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे कांहीं करा काढाकाढी। जातीं ऐसी घडी पुन्हा नये ॥ ४ ॥

॥ २९९२ ॥

संवसारसांते आले हो आइका । तुटीचें तें नका केणें भरूं ॥ १ ॥
लाभाचा हा काळ अवघे बिचारा। पारखी ते करा साह्य येथें ॥ २ ॥

---

पाठभेद:—१ भरूनी. २ इहलोकींच्या वेव्हारे ॥ नये डोळे धुरे.

शृंगारिलें दिसे न कळे अंतर । गोंविला पदर उगवेना ॥ ३ ॥
तुका ह्मणे खोटें गुंपतां विसारें । हातिंचिया खरें हातीं द्यावें ॥ ४ ॥

॥ २९९३ ॥

कोणाशीं विचार करावा सेवटीं । एवढ्या लाभें तुटी जाल्या तरे ॥ १ ॥
सांभाळितो शूर आला घावडाव । पुढें दिला पाव न करी मागें ॥ २ ॥
घात तो या नांवें येथें अंतराय । अंतरल्या पाय गोविंदाचे ॥ ३ ॥
तुका ह्मणे गडसंदीचा हा ठाव । केला तो उपाव कार्या येतो ॥ ४ ॥

॥ २९९४ ॥

पोटापुरतें काम । परि अगत्य तो राम ॥ १ ॥ कारण तें हेंचि करीं ।
चित्तीं पांडुरंग धरीं ॥ २ ॥ प्रारब्धीं हेवा । जोडी देवाची ते सेवा
॥ ३ ॥ तुका ह्मणे बळ । बुद्धी वेचूनि सकळ ॥ ४ ॥

॥ २९९५ ॥

कृष्ण गातां गीतीं कृष्ण ध्यातां चित्तीं । तेही कृष्ण होती कृष्णध्यानें ॥ १ ॥
आसनीं शयनीं भोजनीं जेवितां । ह्मणारे हा भोक्ता नारायण ॥ २ ॥
ओवियें दळणीं गावा नारायण । कांडितां कांडण करितां काम ॥ ३ ॥
नर नारी याति हो कोणी भलतीं । भावें एका प्रीतीं नारायणा ॥ ४ ॥
तुका ह्मणे एका भावें भजा हरी । कांति ते दुसरी रूप एक ॥ ५ ॥

॥ २९९६ ॥

सवंग जालें सवंग जालें । घरा आलें बंदरींचें ॥ १ ॥ आतां हेवा करा
सोस । भक्तिरस बहु गोड ॥ २ ॥ पाउल वेचे चिंता नाहीं । आड
कांहीं मग नये ॥ ३ ॥ तुका ह्मणे संचिताचें । नेणें काचें राहों तें ॥ ४ ॥

॥ २९९७ ॥

नये अरी तुज मधुर उत्तर । दिधला सुस्वर नाहीं देवें ॥ १ ॥ नाहीं

---

पाठभेदः—भोगिता.

तयाविण भुकेला विठ्ठल । येइल तैसा बोल रामकृष्ण ॥२॥ देवापाशीं मागे आवडीची भक्ति । विश्वासेंशीं प्रीति भावबळें ॥३॥ तुका ह्मणे मना सांगतों विचार । धरावा निर्धार दिसेंदिस ॥ ४ ॥

॥ २९९८ ॥

साधनें तरी हींच दोन्हीं । जरी कोणी साधील ॥ १ ॥ परद्रव्य परनारी । यांचा धरी विटाळ ॥ २ ॥ देव भाग्यें घरा येती । संपत्ती त्या सकळा ॥३॥ तुका ह्मणे तें शरीर । गृह भांडार देवाचें ॥ ४ ॥

॥ २९९९ ॥

विटाळ तो परद्रव्य परनारी । येथुनि जो दुरी सोंवळा तो ॥ १ ॥ गद्य पद्य कांहीं न धरावी उपाधी । स्वाधीनचि बुद्धि करूनी ठेवा ॥२॥ विचाराचें कांहीं करावें स्वहित । पापपुण्यातीत[1] भांडवल ॥ ३ ॥ तुका ह्मणे न लगे जावें वनांतरा । विश्व विश्वंभरा सारिखेंचि ॥४॥

॥ ३००० ॥

शांतीपरतें नाहीं सुख । येर अवघेंची दुःख ॥१॥ ह्मणउनी शांति धरा । उतराल पैल तीरा ॥२॥ खवळलिया कामक्रोधीं । अंगीं भरती आधिव्याधी ॥३॥ तुका ह्मणे त्रिविध ताप । जाती मग आपेंआप ॥ ४ ॥

॥ ३००१ ॥

सांडूनियां सर्व लौकिकाची लाज । आळवा यदुराज भक्तिभावें ॥१॥ पाहूनियां झाडें वरवडूनि पाला । खाऊनि विठ्ठला आळवावें ॥ २ ॥ वेंचूनियां चिंध्या भरूनियां धागा । गुंडाळूनि ढुंगा आळवावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें मांडिल्या निर्वाण । तया नारायण उपेक्षीना ॥ ४ ॥

॥ ३००२ ॥

भावें गावें गीत । शुद्ध करूनियां चित्त ॥१॥ तुज व्हावा आहे देव । तरि हा सुलभ उपाव ॥२॥ आणिकांचे कानीं । गुण दोष मना नाणीं ॥३॥

---

पाठभेदः—१ पापपुण्यांचीत.

मस्तक ठेंगणा । करीं संतांच्या चरणा ॥ ४ ॥ वेचीं तें वचन । जेणें राहे समाधान ॥५॥ तुका ह्मणे फार । थोडा तरी पर उपकार ॥६॥

॥ ३००३ ॥

आलिया भोगासी असावें सादर । देवावरी भार घालूं नये ॥ १ ॥
मग तो कृपासिंधु निवारी सांकडें । येर तें बापुडें काय रंक ॥ २ ॥
भयाचिये पोटीं दुःखाचिया रासी । शरण देवासी जातां भलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे नव्हे काय त्या करितां । चिंतावा तो आतां विश्वंभर ॥ ४ ॥

॥ ३००४ ॥

तरिच जन्मा यावें । दास विठ्ठलाचें व्हावें ॥ १ ॥ नाहीं तरि काय थोडीं । श्वानशूकरें बापुडीं ॥ २ ॥ ज्यालयाचें तें फळ । अंगीं लागों नेदी मळ ॥३॥ तुका ह्मणे भले । ज्याच्या नांवें मानावलें ॥ ४ ॥

॥ ३००५ ॥

निर्वैर व्हावें सर्वभूतांसवें । साधन बरवें हेंचि एक ॥ १ ॥ तरीच अंगीकार करील नारायण । बडबडतो सीण येणेंविण ॥ २ ॥ सोइरें पिशुन समानचि घडे । चित्त पर ओढे उपकारीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्त जालिया निर्मळ । तरिच सकळ केलें होय ॥ ४ ॥

॥ ३००६ ॥

थोर ती गळाली[1] पाहिजे अहंता । उपदेश घेतां सुख वाटे ॥ १ ॥
व्यर्थ भराभर केलें पाठांतर । जोंवरि अंतर शुद्ध नाहीं ॥ २ ॥
घोडें काय थोडें वागवितें ओझें । भावेंविण वांझें[2] पाठांतर ॥ ३ ॥
तुका ह्मणे धरा निष्टावंत भाव । जरी पंढरीराव पाहिजे तो ॥ ४ ॥

॥ ३००७ ॥

जिंकावा संसार । येणें नांवें तरी शूर ॥१॥ येरें काय तीं बापुडीं ।

---

पाठभेदः—१ पाहिजे गळाली. २ तैसें.

कीर अहंकाराचीं घोडीं ॥ २ ॥ पण ऐशा नांवें । देव धरिजेतो भावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्यावें । संत कीर्तिनें बरवें ॥ ४ ॥

॥ ३००८ ॥

हालवूनि खुंट । आधीं करावा बळकट ॥ १ ॥ मग तयाच्या आधारें। करणें तें अवघें बरें ॥२॥ सुख दुःख साहे । हर्षामर्षीं भंगा नये ॥३॥ तुका ह्मणे जीवें । आधीं मरोनि राहावें ॥ ४ ॥

॥ ३००९ ॥

होऊं नको कांहीं या मना आधीन । नाइकें वचन याचें कांहीं ॥ १ ॥ हटियाची गोष्टी मोडून टाकावी । सोई ही धरावी विठोबाची ॥ २ ॥ आपुले आधीन करूनियां ठेवा । नाहीं तरि जीवा घातक हें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाले जे मना आधीन । तयासी बंधन यम करी ॥ ४ ॥

॥ ३०१० ॥

मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धींचें कारण । मोक्ष अथवा बंधन । सुख समाधान इच्छा ते ॥ १ ॥ मनें प्रतिमा स्थापिली । मनें मना पूजा केली । मनें इच्छा पुरविली । मन माउली सकळांची ॥२॥ मन गुरु आणि शिष्य । करी आपुलेंचि दास्य । प्रसन्न आपआपणास । गति अथवा अधोगति ॥ ३ ॥ साधक वाचक पंडित । श्रोते वक्ते ऐका मात । नाहीं नाहीं आन दैवत । तुका ह्मणे दुसरें ॥ ४ ॥

॥ ३०११ ॥

कथनीं पठणीं करूनि काय । वांचुनि रहणी वांयां जाय ॥ १ ॥ मुखीं वाणी अमृतगोडी । मिथ्या भुकें चरफडी ॥ २ ॥ पिळणी पाक करितां दगडा । काय जडा होय तें ॥ ३ ॥ मधु मेळवूनि माशी । आणिकां सांसी पारधिया ॥४॥ मेळवूनि धन मेळवी माती । लोभ्या हातीं तेंचि मुखीं ॥ ५ ॥ आपलें केलें आपण खाय । तुका वंदी त्याचे पाय ॥६॥

॥ ३०१२ ॥

अवघेचि निजों नका अवघिये ठायीं । वेळ अवेळ तरी सांभाळावी कांहीं ॥ १ ॥ जतन करा रे जतन करा । घालूं पाहे घरावरी घाला चोरटें ॥ २ ॥ सीतरिलीं फार खाती भोंवताले फेरे । गेलें नये हातां सेकीं तळमळ उरे ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी करूं आपलें जतन । नलगे कांहीं कोणां द्यावें उघडा रे कान ॥ ४ ॥

॥ ३०१३ ॥

सरलें आतां नाहीं । न ह्मणे वेळकाळ कांहीं ॥ १ ॥ विठ्ठल कृपाळु माउली । सदा प्रेम पान्हायेली ॥ २ ॥ सीण विचारी भाग । नव्हे निष्ठुर नाहीं राग ॥ ३ ॥ भेदाभेद नाहीं । तुका ह्मणे तिच्याठायीं ॥४॥

॥ ३०१४ ॥

देह तंव असे भोगाचे आधीन । याचें सुखसीण क्षणभंगुर ॥ १ ॥ अविनाश जोडी देवापायीं भाव । कल्याणाचा ठाव सकळही ॥ २ ॥ क्षणभंगुर हा येथील पसारा । आलिया आकारा अवघें नासे ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें सकळ विश्रांति । आठवावा चित्तीं नारायण ॥ ४ ॥

॥ ३०१५ ॥

चालिलें न वाटे । गाऊनियां जातां वाटे ॥ १ ॥ बरवा वैष्णवांचा संग । येतो सामोरा श्रीरंग ॥ २ ॥ नाहीं भय आड । कांहीं विषमांचें जड ॥ ३ ॥ तुका ह्मणे भक्ति । सुखरूप आदीअंतीं ॥ ४ ॥

॥ ३०१६ ॥

बहुतां पुरे ऐसा वाण । आलें धन घरासी ॥१॥ घ्या रे फुका मोलेंविण । नारायण न भुला ॥ २ ॥ ऐका निवळल्या मनें । बरवें कानें सादर ॥ ३ ॥ तुका ह्मणे करूनि अंतीं । निश्चिंती हे ठेवावी ॥ ४ ॥

॥ ३०१७ ॥

मेघवृष्टीनें करावा उपदेश । परि गुरुनें न करावा शिष्य । वांटा लाभे

त्यास । केल्या अधर्मकर्माचा ॥ १ ॥ द्रव्य वेचावें अन्नछत्रीं । भूतीं द्यावें सर्वत्र । नेदावा हा पुत्र । उत्तमयाती पोसणा ॥ २ ॥ बीज तें पेरावें खडकीं । ओल नाहीं ज्याचे बुडखीं । थीतां ठके सेकीं । पाठी लागे दिवाण ॥ ३ ॥ गुज बोलावें संतांशीं । पत्नी राखावी जैसी दासी । लाड देतां तियेसी । वांटा पावे कर्माचा ॥ ४ ॥ शुद्ध कसूनि पाहावें । वरि रंगा न भुलावें । तुका ह्मणे घ्यावें । जया नये तुटी तें ॥ ५ ॥

॥ ३०१८ ॥

मारगीं चालतां पाउलापाउलीं । चिंतावी माउली पांडुरंग ॥ १ ॥ सर्व सुख लागे घेऊनियां पाठीं । आवडीचा कंठीं रस ओती ॥ २ ॥ पीतांबर छाया करी लोभापर । पाहे तें उत्तर आवडीचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे हेंचि करावें जीवन । वाचे नारायण तान भूक ॥ ४ ॥

॥ ३०१९ ॥

नका वांटूं मन विधिनिषेधासीं । स्मरावा मानसीं पांडुरंग ॥ १ ॥ खादलिया अन्ना मासीं बोलों नये । अवघेंचि जाय एका घासें ॥ २ ॥ जोडी होते परी ते बहु कठिण । करितां जतन सांभाळावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें न मना विषाद । निंबेंविण व्याध तुटों नये ॥ ४ ॥

॥ ३०२० ॥

घ्या रे भाई घ्या रे भाई । कोणी कांहीं थोडें बहु ॥ १ ॥ येच हाटीं येच हाटीं । बांध गांठी पारखून ॥ २ ॥ वेच आहे वेच आहे । सरलें पाहे मग खोटें ॥ ३ ॥ उघडें दुकान उघडें दुकान । रात्री जाली कोण सोडी मग ॥ ४ ॥ तुका ह्मणे अंतकाळीं । जाती टाळीं बैसोनि ॥५॥

॥ ३०२१ ॥

येइल घरा देव न धरीं संदेहा । फकिराचा यावा व्हावा जेव्हां ॥ १ ॥

---

पाठभेद:—१ न.

होईल फकीर योगी महानुभाव । घडी घडी देव सांभाळील ॥ २ ॥
तुका ह्मणे ऐसें बोलती बहुत । येणें गुणें संत जाले राम ॥ ३ ॥

॥ ३०२२ ॥

भागल्याचें तारूं शिणल्याची साउली । भुकेलिया घाली प्रेमपान्हा ॥ १ ॥
ऐसी हे कृपाळू अनाथांची वेशी । सुखाचीच राशी पांडुरंग ॥ २ ॥
सकळां सन्मुख कृपेचिया दृष्टी । पाहे बहु भेटी उतावीळा ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें आतां उरला कैंचा । अनंता जन्मींचा शीण भाग ॥ ४ ॥

॥ ३०२३ ॥

मनीं भाव असे कांहीं । तेथें देव येती पाहीं ॥ १ ॥ पाहा जनाई सुंदरी । तेथें देव पाणी भरी ॥ २ ॥ शुद्ध पाहोनियां भाव । त्याचे हृदयीं वसे देव ॥ ३ ॥ तुका ह्मणे विठोबासी । ठाव देई चरणांपासीं ॥ ४ ॥

॥ ३०२४ ॥

ऐका पंडितजन । तुमचे वंदितों चरण ॥ १ ॥ नका करूं नरस्तुती । माझी परिसा हे विनंती ॥ २ ॥ अन्न आच्छादन । हें तों प्रारब्धा अधीन ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाणी । सुखें वेचा नारायणीं ॥ ४ ॥

॥ ३०२५ ॥

पंडित वाचक जरी जाला पुरता । तरी कृष्णकथा ऐके भावें ॥ १ ॥
क्षीर तुपा साकरे जालिया भेटी । तैसी पडे मिठी गोडपणें ॥ २ ॥
जाणोनियां लाभ घेई हा पदरीं । गोड गोडावरी सेवीं बापा ॥ ३ ॥
जाणिवेचें मूळ उपडोनी खोड । जरी तुज चाड आहे तुझी ॥ ४ ॥
नाना परिमळ द्रव्य उपचार । अंगीं उटी सार चंदनाची ॥ ५ ॥
जेविलियाविण शून्य ते शृंगारीं । तैसी गोडी हरिकथेविण ॥ ६ ॥
ज्याकारणें वेदश्रुति हीं पुराणें । तेंचि विठ्ठल नाणें तिष्ठे कथे ॥ ७ ॥
तुका ह्मणे येर दगडाचीं पेवें । खळखळेंचि आघवें मूळ तेथें ॥ ८ ॥

पाठभेदः—१ शृंगार.

॥ ३०२६ ॥

पर उपकारें कायावाचामन । वेचे सुदर्शन रक्षी तया ॥ १ ॥ याज-सार्टी असें योजिलें श्रीपति । संकल्पाचे हातीं सर्व जोडी ॥२॥ पर-पीडे ज्याची जिव्हा मुंडताळे । यमदूत डाळे करिती पूजा ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंबऋषी दुर्योधना । काय जालें नेणां दुर्वासया ॥ ४ ॥

॥ ३०२७ ॥

उंस वाढवितां वाढली गोडी । गुळ साकर हे त्याची परवडी ॥ १ ॥ सत्यकर्मे आचरें रे । बापा सत्यकर्मे आचरें रे ॥ २ ॥ सत्यकर्मे आ-चरें होईल हित । वारेल दुःख असत्याचें ॥ ३ ॥ साकरेच्या आळां लाविला कांदा । स्थूळसानापरी वाढे दुर्गंधा ॥ ४ ॥ सत्य असत्य हें ऐसिया परी । तुका ह्मणे याचा विचार करीं ॥ ५ ॥

॥ ३०२८ ॥

नयो वाचे अनुचित वाणी । नसो मनीं कुडी बुद्धि ॥ १ ॥ ऐसें मागा अरे जना । नारायणा विनवूनि ॥२॥ कामक्रोधां पडो चिरा । ऐसा बरा सायास ॥ ३ ॥ तुका ह्मणे नानाछंदें । या विनोदें न पडावें ॥ ४ ॥

॥ ३०२९ ॥

भाग्यवंत ह्मणों तयां । शरण गेले पंढरिराया ॥ १ ॥ तरले तरले हा भरवसा । नामधारकांचा ठसा ॥ २ ॥ भुक्तिमुक्तीचें तें स्थळ । भोळे-भाविका निर्मळ ॥ ३ ॥ गाइलें पुराणीं । तुका ह्मणे वेदवाणी ॥ ४ ॥

॥ ३०३० ॥

भार घाली देवा । नलगे देश डोई घ्यावा ॥ १ ॥ देह प्रारब्धा अ-धीन । सोसें अधिक वाढे सीण ॥ २ ॥ व्यवसाय निमित्त । फळ देतसे संचित ॥ ३ ॥ तुका ह्मणे फिरे । भोंवडीनें दम जिरे ॥ ४ ॥

॥ ३०३१ ॥

सेवकासी आज्ञा स्वामीची प्रमाण । जोंवरी हा प्राण जाय त्याचा ॥१॥

आणिकांचा धाक न धरावा मनीं । निरोपावचनीं टळों नये ॥ २ ॥
समय सांभाळूनि आगळें उत्तर । द्यावें भेदी वज्र तयापरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तरी ह्मणवावें सेवक । खादलें तें अन्न एकें होय ॥ ४ ॥

॥ ३०३२ ॥

बीज पेरे सेतीं । मग गाडेवरी वाहती ॥१॥ वायां गेलें ऐसें दिसे । लाभ त्याचे अंगीं वसे ॥ २ ॥ पाल्याची जतन । तरी प्रांतीं येती कण ॥ ३ ॥ तुका ह्मणे आळा । उदक देतां लाभे फळा ॥ ४ ॥

॥ ३०३३ ॥

देव कैंचा तया दुरी । भाकी बरी करुणा ॥ १ ॥ आळवित्या नलगे धर । माय जाणे रे भातुकें ॥२॥ नावेवरी ज्याचा भार । पैल पार जवळी त्या ॥ ३ ॥ आतां परदेशी तुका । जाला लोकां वेगळा ॥ ४ ॥

॥ ३०३४ ॥

किती या काळाचा सोसावा वोळसा । लागला सरिसा पाठोवाठीं ॥१॥
लक्ष चौऱ्याशीची करा सोडवण । रिघा या शरण पांडुरंगा ॥ २ ॥
उपजल्या पिंडा मरण सांगातें । मरतें उपजतें सवेंचितें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माळ गुंतली राहाटीं । गाडग्याची सुटी फुटलिया ॥ ४ ॥

॥ ३०३५ ॥

नको सांडूं अन्न नको सेवूं वन । चिंतीं नारायण सर्व भोगीं ॥ १ ॥
मातेचिये खांदीं बाळ नेणे सीण । भावना त्या भिन्न मुंडाविया॥२॥
नको गुंपों भोगीं नको पडों त्यागीं । लावुनि सरें अंगीं देवाचीया॥३॥
तुका ह्मणे नको पुसों वेळोवेळां । उपदेश वेगळा उरला नाहीं ॥४॥

॥ ३०३६ ॥

निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चुकों नये ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ हक. २ नावेतरी.

निष्काम निश्चळ विठ्ठलीं विश्वास। पाहों नये वास आणिकांची ॥२॥ तुका ह्मणे ऐसा कोण उपेक्षिला। नाहीं ऐकिला ऐसा कोणीं ॥ ३ ॥

॥ ३०३७ ॥

चिंतनासी नलगे वेळ। सर्व काळ करावें॥१॥ सदा वाचे नारायण। तें वदन मंगळ ॥२॥ पढिये सर्वोत्तम भाव। येर वाव पसारा ॥३॥ ऐसें उपदेशी तुका। अवघ्या लोकां सकळां ॥ ४ ॥

॥ ३०३८ ॥

कृपेचीं उत्तरें देवाचा प्रसाद। आनंदीं आनंद वाढवावा ॥ १ ॥ बहुतांच्या भाग्यें लाधलें[1] जहाज। येथें आतां काज लवलाहें ॥ २ ॥ अलभ्य तें आलें दारावरी फुका। येथें आतां चुका न पाहिजे ॥३॥ तुका ह्मणे जिव्हाश्रवणाच्या द्वारें। माप भरा वरें सिगेवरि ॥ ४ ॥

॥ ३०३९ ॥

तप तीर्थ दान व्रत आचरण। गातां हरिगुण वारूं नये ॥ १ ॥ कोटि कुळें त्यांचीं वाटुली पाहाती। त्या तया घडती ब्रह्महत्या ॥२॥ आपुलिया पापें न सुटे सायासें। कोणा काळें ऐसें निस्तरेल ॥ ३ ॥ व्हावें साह्य तया न घालावें भय। फुकासाटीं पाहे लाभ घात॥४॥ तुका ह्मणे हित माना या वचना। सुख दुःख जाणा साधे फुका॥५॥

॥ ३०४० ॥

देवासाटीं जाणा तयासीच आटी। असेल ज्या गांठीं पुण्यराशी॥१॥ निर्बळा पाठवी बळें वाराणसी। मेलों[2] आला त्यासी अर्ध पुण्य ॥२॥ कथेनिद्राभंग करावा भोजनीं। तया सुखा धणी पार नाहीं ॥ ३ ॥ यागीं ऋण घ्यावें द्यावें सुख लाहीं। बुडतां चिंता नाहीं उभयतां॥४॥ तुका ह्मणे वर्म जाणोनि करावें। एक न घलावें एकावरी ॥ ५ ॥

---

पाठभेदः—१ लागलें. २ गेला.

॥ ३०४१ ॥

परस्त्रीतें ह्मणतां माता । चित्त लाजवितें चित्ता ॥ १ ॥ काय बोलो-
नियां तोंडें । मनामाजी कानकोंडें ॥ २ ॥ धर्मधारिष्टगोष्टी सांगे ।
उष्ट्या हातें नुडवी काग ॥३॥ जें जें कर्म वसे अंगीं । तें तें आठवे
प्रसंगीं ॥ ४ ॥ बोले तैसा चाले । तुका ह्मणे तो अमोल ॥ ५ ॥

॥ ३०४२ ॥

असत्य वचन होतां सर्व जोडी । जरी लग्नघडी परउपकार ॥ १ ॥
जाईल पतना यासि संदेह नाहीं । साक्ष आहे कांहीं सांगतों ते ॥२॥
वदविलें मुखें नारायणें धर्मा । अंगुष्ट त्या कर्मासाटीं गेला ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां सांभाळा रे पुढें । अंतरींचें कुडें देइल दुःख ॥ ४ ॥

॥ ३०४३ ॥

जैसें चित्त जयावरी । तैसें जवळी तें दुरी ॥ १ ॥ नलगे द्यावा परि-
हार । या कोरडें उत्तर ॥२॥ असे अभ्यंतर । साक्षभूत जवळी ॥३॥
अवघें जाणे सूत्रधारी । कोण नाचे कोणे परी ॥४॥ तुका ह्मणे बुद्धि ।
ज्याची तेच तया सिद्धि ॥ ५ ॥

॥ ३०४४ ॥

भवसिंधूचें काय कोडें । दावी वाट चाले पुढें ॥१॥ तारूं भला पांडु-
रंग । पाय भिजों नेदी अंग ॥ २ ॥ मागें उतरिले बहुत । पैल तिरीं
साधुसंत ॥३॥ तुका ह्मणे लाग वेगें । जाऊं तयाचिया मागें ॥ ४ ॥

॥ ३०४५ ॥

द्रव्याचिया कोटी । नये गांडीची लंगोटी ॥१॥ अंतीं बोळवणेंसाटीं ।
पांडुरंग धरा कंठीं ॥ २ ॥ लोभाचीं लोभिकें । यांचें सन्निधान फिकें
॥ ३ ॥ तुका ह्मणे हितें । जग नहो पडो रितें ॥ ४ ॥

॥ ३०४६ ॥

ब्रह्मचारी धर्म घोकावें अक्षर । आश्रमीं विचार षटकर्में ॥१॥ वान-

प्रस्थ तरी संयोगीं वियोग । संन्यास तो त्याग संकल्पाचा ॥ २ ॥
परमहंस तरी जाणे सहज वर्म । तेथें याती धर्म कुळ नाहीं ॥ ३ ॥
बोले वर्म जो चाले याविरहित । तो जाणा पतित श्रुति बोले ॥ ४ ॥
तुका ह्मणे कांहीं नाहीं नेमाविण । मोकळा तो सिण दुःख पावे ॥५॥

॥ ३०४७ ॥

कामिनीसी जैसा आवडे भ्रतार । इच्छीत चकोर चंद्र जैसा ॥ १ ॥
तैसी हे आवडी विठ्ठलाचे पायीं । लागलिया नाहीं गर्भवास ॥ २ ॥
दुष्काळें पीडिल्या आवडे भोजन । आणिक जीवन तृषाक्रांता ॥ ३ ॥
कामातुर जैसा भय लज्जा सांडोनी । आवडे कामिनी सर्वभावें ॥४॥
तुका ह्मणे तैसी राहिली आवडी । पांडुरंग थडी पाववील ॥ ५ ॥

॥ ३०४८ ॥

लटिका तो प्रपंच एक हरि साच । हरिविण आहाच सर्व इंद्रियें ॥१॥
लटिकें तें मौन भ्रमाचें तें स्वप्न । हरिविण ध्यान नैश्वर्य अवघें ॥२॥
लटिकिया वित्पात्ति हरिविण करिती । हरि नाहीं चित्तीं तो शव जाणा॥३॥
तुका ह्मणे हरि हें धरिसि निर्धारीं । तरी तूं झडकरी जासी वैकुंठा ॥४॥

॥ ३०४९ ॥

प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही । एकही निदानीं न घडे त्यासी ॥१॥
दोहीं पेंवावरी ठेवूं जातां हात । शेवटीं अपघात शरीराचा ॥ २ ॥
तुका ह्मणे तया दोहींकडे धका । शेवटीं तो नरकामाजी पडे ॥ ३ ॥

॥ ३०५० ॥

काळ सारावा चिंतनें । एकांतवासीं गंगास्नानें । देवाचें पूजन । प्रदक्षणा तुळसीच्या॥ १॥ युक्त अहार वेव्हार। नेम इंद्रियांचा सार। नसावी बासर। निद्रा बहु भाषण॥ २ ॥ परमार्थ महाधन। जोडी देवाचे चरण। व्हावया जतन । हे उपाय लाभाचे ॥ ३ ॥ देह समर्पिजे देवा । भार कांहींच न घ्यावा । होईल आघवा । तुका ह्मणे आनंद ॥ ४ ॥

॥ ३०५१ ॥

दीप न देखे अंधारा। आतां जतन हेंचि[1] करा ॥ १ ॥ नारायण नारायण। गांठीं धन बळकट ॥ २ ॥ चिंतामणीपाशीं चिंता। तत्वता हीं न येल ॥ ३ ॥ तुका ह्मणे उभयलोकीं। हेचि निकी सामग्री ॥ ४ ॥

॥ ३०५२ ॥

मढें झांकुनियां करिती पेरणी। कुणबियाचे वाणी लवलाहें ॥ १ ॥
तयापरी करीं स्वहित आपुलें। जयासी फावलें नरदेह ॥ २ ॥
ओटीच्या परिस मुठीचें तें वाढे। यापरि कैबाडें स्वहिताचें ॥ ३ ॥
नाहीं काळसत्ता आपुलिये हातीं। जाणते हे गुंती उगविती ॥ ४ ॥
तुका ह्मणे पाहें आपुली सूचना। करितो शहाणा मृत्युलोकीं ॥ ५ ॥

॥ ३०५३ ॥

घ्या रे लुटी प्रेम सुख। फेडा आजि भणी। चुकला तो मुकला। जाली बेरझार हाणी ॥ १ ॥ घाला घातला वैकुंठीं। करूनियां जीवें साटी। पुरविली पाठी। वैष्णवीं काळाची ॥ २ ॥ अवघें आणिलें अंबर। विठोसहित तेथें धूर। भेदूनि जिव्हार। नामबाणीं धरियेला ॥ ३ ॥ संचित प्रारब्ध क्रियमाण। अवघीं जालीं गहन। केलीं पापपुण्यें। देशधडी बापुडीं ॥ ४ ॥ आनंदें गर्जती निर्भर। घोष करिती निरंतर। कांपती असुर। वीर कवणा नांगवती ॥ ५ ॥ जें दुर्लभ ब्रह्मादिकां। आजि सांपडलें फुका। घ्या रे ह्मणे तुका। सावचित्त होऊन ॥ ६ ॥

॥ ३०५४ ॥

देव सखा जरी। जग अवघें कृपा करी ॥ १ ॥ ऐसा असोनि अनुभव। कासाविस होती जीव ॥ २ ॥ देवाची जतन। त्यासी बाधूं न शके अग्न ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरी। प्रऱ्हादासि यत्न करी ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ आतां हेंचि करा जतन.

॥ ३०५५ ॥

वैष्णव मुनि विप्रांचा सन्मान । करावा आपण घेऊं नये ॥ १ ॥
प्रभु जाला तरी संसाराचा दास । विहित तयासी यांची सेवा ॥ २ ॥
तुका ह्मणे हे आशीर्वादें बळी । जाईल तो छळी नरका यांसीं ॥ ३ ॥

॥ ३०५६ ॥

परिमळ म्हूण चोळूं नये फूल । खाऊं नये मूल आवडतें ॥ १ ॥
मोतियाचें पाणी चाखूं नये स्वाद । यंत्र भेदुनि नाद पाहूं नये ॥ २ ॥
कर्मफळ ह्मणुनी इच्छूं नये काम । तुका ह्मणे वर्म दावूं लोकां ॥ ३ ॥

॥ ३०५७ ॥

मारगीं बहुत । याचि गेले साधुसंत ॥ १ ॥ नका जाऊं आडराणें । धेंडीं गर्जती पुराणें ॥ २ ॥ चोखाळिल्या वाटा । न लगे पुसाव्या धोपटा ॥ ३ ॥ झळकती पताका । गरुड टके ह्मणे तुका ॥ ४ ॥

॥ ३०५८ ॥

लेखीं दुखण्यासमान । वेचला नारायणीं क्षण । उद्यांचें आजिच मरण । आणोनि ह्मणे हरि भोक्ता ॥ १ ॥ नाहीं कांहीं पडों येत तुटी । जाणें तो आहे सेवटीं । लाभ विचारोनि पोटीं । होई सेवटीं जागृत ॥ २ ॥ आहे ते उरे कटा । लावुनि चळ आपुला फाटा । पुरे हें न पुरे सेवटा । तरण्या बळकटा सदा वास ॥ ३ ॥ ह्मणोनि मोडावा कांटाळा । अविद्यात्मक कोंवळा । होतील प्रबळा । आशा तृष्णा माया ॥ ४ ॥ क्षण या देहाच्या अंतीं । जड होऊनि राहेल माती । परदेश ते परवर होतीं । चिळसविती नाकडोळे ॥ ५ ॥ जंव या नाहीं पातल्या विपत्ति । आयुष्य भविष्य आहे हातीं । लाभ विचारोनी गुंती । तुका ह्मणे अंतीं सर्व पिसुनें ॥ ६ ॥

॥ ३०५९ ॥

करितां देवार्चन । घरा आले संतजन ॥ १ ॥ देव सारावे परते । संत

पूजावे आरते ॥ २ ॥ शाळिग्राम विष्णुमूर्ती । संत हो का भलते याती ॥३॥ तुका ह्मणे संधी । अधिक वैष्णवांची मांदी ॥ ४ ॥

॥ ३०६० ॥

चुकली ते वाट । पुढें सांपडवी नीट ॥ १ ॥ ह्मणउनी गर्भवास । नेणती ते हरिचे दास ॥ २ ॥ संचिताचा संग । काय जाणों पावे भंग ॥ ३ ॥ तुका ह्मणे दृष्टी । उघडितों नव्हे कष्टी ॥ ४ ॥

॥ ३०६१ ॥

गर्भी असतां बाळा । कोण पाळी त्याचा लळा ॥ १ ॥ कैसा लाघवी सूत्रधारी । कृपाळुवा माझा हरी ॥ २ ॥ सर्प पिलीं वितांचि खाय । वांचलिया कोण माय ॥ ३ ॥ गगनीं लागला कोसेरा । कोण पुरवी तेथें चारा ॥ ४ ॥ पोटीं पाषाणांचे जीव । कवण जीव त्याचा भाव ॥ ५ ॥ तुका ह्मणे निश्चळ राहें । होईल तें सहज पाहें ॥ ६ ॥

॥ ३०६२ ॥

भावापुढें बळ । नाहीं कोणाचें सबळ ॥ १ ॥ करी देवावरी सत्ता । कोण त्याहूनि परता ॥ २ ॥ वैसे तेथें येती । न पाचारितां सर्व शक्ति ॥ ३ ॥ तुका ह्मणे राहे । तयाकडे कोण पाहे ॥ ४ ॥

॥ ३०६३ ॥

धांवे माते सोई । बाळ न विचारितां कांहीं ॥ १ ॥ मग त्याचें जाणें निकें । अंग वोडवी कौतुकें ॥ २ ॥ नेणे सर्प दोरी । अगी भलतें हातीं धरी ॥ ३ ॥ तीविणें तें नेणे । आणीक कांहीं तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ३०६४ ॥

अगी देखोनियां सती । अंगीं रोमांच उठती ॥ १ ॥ हा तो नव्हेच उपदेश । सुख अंतरीं उल्हास ॥ २ ॥ वित्तगोतांकडे । चित्त न घाली न रडे ॥ ३ ॥ आठवूनि एका । उडी घाली ह्मणे तुका ॥ ४ ॥

॥ ३०६५ ॥

सकलगुणें संपन्न । एक देवाचें लक्षण ॥ १ ॥ वरकड कोठें कांहीं । एक आहे एक नाहीं ॥ २ ॥ षड्गुण ऐश्वर्य संपन्न । एक भगवंतीं जाण ॥ ३ ॥ तुका ह्मणे जें जें बोला । तें तें साजे या विठ्ठला ॥ ४ ॥

॥ ३०६६ ॥

पाषाण देव पाषाण पायरी । पूजा एकावरी पाय ठेवी ॥ १ ॥ सार तो भाव सार तो भाव । अनुभवीं देव तेचि जाले ॥ २ ॥ उदका भिन्न पालट काई । गंगा गोड येरां चवी काय नाहीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे हें भाविकांचें वर्म । येरी धर्माधर्म विचारावे ॥ ४ ॥

॥ ३०६७ ॥

ऐसा कोणी नाहीं हें जया नावडे । कन्या पुत्र घोडे दारा धन ॥ १ ॥ निंब घेतें रोगी कवणिया सुखें । हरावया दुःखें व्याधि पीडा ॥ २ ॥ काय पळे सुख चोर लागे पाटीं । न घलावी काटी आड तया ॥ ३ ॥ जयाचें कारण तोचि जाणे करूं । नये कोणां वारूं आणिकांसी ॥ ४ ॥ तुका ह्मणे तरी सांपडे निधान । द्यावा ओंवाळून जीव बळी ॥ ५ ॥

॥ ३०६८ ॥

नव्हे मतोळ्याचा वाण । नीच नवा नारायण ॥ १ ॥ सुख उपजे श्रवणें । खरें टांकसाळी नाणें ॥ २ ॥ लाभ हातोहातीं । अधिक पुढतोंपुढतीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेणों किती । पुरोनि उरलें पुढती ॥ ४ ॥

॥ ३०६९ ॥

संकल्पासी अधिष्ठान । नारायण गोमटें ॥ १ ॥ अवघियांचें पुरे कोड । फिटे जड देहत्व ॥ २ ॥ उभय लोकीं उत्तम कीर्ति । देव चित्तीं राहिलिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीव धाय । नये हाय जवळी ॥ ४ ॥

॥ ३०७० ॥

वचनेंचि व्हावें आपण उदार । होईल विश्वंभर संतुष्टचि ॥ १ ॥

सत्यसंकल्पांचीं फळें बीजां ऐसीं । शुद्ध नाहीं नासी पावों येत ॥ २ ॥
वंचिलिया काय येतसे उपेगा । शरीर हें नरकाचेंचि आळें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जीव जितां थारे लावा । पडिलिया गोवा देशधडी ॥ ४ ॥

॥ ३०७१ ॥

दह्यांचिया अंगीं निघे ताक लोणी । एका मोलें दोन्ही मागों नये ॥ १ ॥
आकाशाचे पोटीं चंद्र तारांगणें । दोहींशीं समान पाहों नये ॥ २ ॥
पृथ्वीच्या पोटीं हिरा गारगोटी । दोहींसी संसाटी करूं नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे तैसे संत आणि जन । दोहींसी समान भजूं नये ॥ ४ ॥

॥ ३०७२ ॥

जीव जीती जीवना संगें । मत्स्या मरण त्या वियोगें ॥ १ ॥ जया चित्तीं जैसा भाव । तया जवळि तैसा देव ॥ २ ॥ सकळां पढिये भानु । परि त्या कमळाचें जीवनु ॥ ३ ॥ तुका ह्मणे माता । वाहे तान्हयाची चिंता ॥ ४ ॥

॥ ३०७३ ॥

करिती तया वेवसाव आहे । येथें व्हारे साहे एकांएक ॥ १ ॥
गातां आइकतां समानचि घडे । लाभें लाभ जोडे विशेषता ॥ २ ॥
प्रेमाचें भरतें भातें घ्यावें अंगीं । नटे टाळी रंगीं शूरत्वेंसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे बहुजन्मांचें खंडण । होईल हा सीण निवारोनि ॥ ४ ॥

॥ ३०७४ ॥

भाग्यवंता हे परवडी । करिती [1]जोडी जन्माची ॥ १ ॥ आपुलाल्या लाहों भावें । जें ज्या व्हावें तें आहे ॥ २ ॥ इच्छाभोजनाचा दाता । नलगे चिंता करावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आल्या थाऱ्या । वस्तु बऱ्या मोलाच्या ॥ ४ ॥

॥ ३०७५ ॥

जाणावें तें सार । नाहीं तरी दगा फार ॥ १ ॥ डोळे झांकिलिया रवि ॥

पाठभेदः—१ गोडी.

नाहीं ऐसा होय जेवीं ॥ २ ॥ बहुथोड्या आड । निवारितां लाभें जाड ॥ ३ ॥ तुका ह्मणे खरें । नेलें हातींचें अंधारें ॥ ४ ॥

॥ ३०७६ ॥

बरें सावधान । राहावें समय राखोन ॥ १ ॥ नाहीं सारखिया वेळा । अवघ्या पावतां अवकळा ॥ २ ॥ लाभ अथवा हानी । थोड्यामध्येंच भोवनी ॥३॥ तुका ह्मणे राखा । आपणा नाहीं तोचि वाखा ॥४॥

॥ ३०७७ ॥

कस्तुरीचे अंगीं मीनली मृत्तिका । मग वेगळी कां येईल लेखूं ॥ १ ॥ तयापरि भेद नाहीं देवभक्ती । संदेहाच्या युक्ति सरों द्याव्या ॥२॥ इंधनें तें आगी संयोगाच्या गुणें । सागरा दरुषणें वाहाळ तोंचि॥३॥ तुका ह्मणे माझे साक्षीचें वचन । येथें तो कारण शुद्ध भाव ॥ ४ ॥

॥ ३०७८ ॥

धरितां इच्छा दुरी पळे । पाठीं सोहळे उदासा ॥ १ ॥ ह्मणऊनि असट मन । नका खूण सांगतों ॥ २ ॥ आमिषापाशीं अवघें वर्म । सोस श्रम पाववी ॥३॥ तुका ह्मणे बीज न्यावें । तेथें यावें फळानें ॥ ४ ॥

॥ ३०७९ ॥

देह निरसे तरी । बोलावया नुरे उरी ॥ १ ॥ येर वाचेचें वाग्जाळ । अळंकारापुरते बोल ॥ २ ॥ काचें तरी कढे । जाती ऐसें चित्त ओढे ॥ ३ ॥ विष्णुदास तुका । पूर्ण धनी जाणे चुका ॥ ४ ॥

॥ ३०८० ॥

याचि नांवें दोष । राहे अंतरीं किल्मिष ॥ १ ॥ मना अंगीं पुण्य पाप । शुभ उत्तम संकल्प ॥ २ ॥ बिजाऐसीं फळें । उत्तम कां अमंगळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्त । शुद्ध करावें हे हित ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ नित.

॥ ३०८१ ॥

वेळोवेळां हेंचि सांगें । दान मागें जगासी ॥ १ ॥ विठ्ठल हे मंगळ-वाणी । घेऊं धणी पंगती ॥ २ ॥ वेचतसे पळें पळ । केलें बळ पाहिजे ॥३॥ तुका ह्मणे दुश्चित नका । राहों फुका नाड हा ॥ ४ ॥

॥ ३०८२ ॥

धांवे त्यासी पांवे । दुजें उगवूनि गोवे ॥ १ ॥ घ्यावें भरूनियां वर । मग नाहीं येरझार ॥ २ ॥ धणी उभें केलें । पुंडलिकें या उगलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठसा । गेला पडोनियां ऐसा ॥ ४ ॥

॥ ३०८३ ॥

ब्राह्मण तों याती अंत्यज असतां । मानावा तत्वता निश्चयेसीं ॥ १ ॥ रामकृष्णनामें उच्चारी सरळें । आठवी सांवळें रूप मनीं ॥ २ ॥ शांति क्षमा दया अलंकार अंगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥ ३ ॥ तुका ह्मणे गेल्या षडऊर्मी अंगें । सांडूनियां मग ब्रह्मचि तो ॥ ४ ॥

॥ ३०८४ ॥

पुढें आतां कैंचा जन्म । ऐसा श्रम वारेसा ॥ १ ॥ सर्वथाही फिरों नये । ऐसी सोय लागलिया ॥ २ ॥ पांडुरंगा ऐसी नाव । तारूं भाव असतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे चुकती वापा । पुन्हा खेपा सकळा ॥ ४ ॥

॥ ३०८५ ॥

टाळ दिंडी हातीं । वैकुंठींचे ते सांगाती ॥ १ ॥ जाल तरी कोणी जा गा । करा सिदोरी ते वेगा ॥ २ ॥ जाती सादवीत । तेथें असों द्यावें चित्त ॥ ३ ॥ तुका ह्मणे बोल । जाती बोलत विठ्ठल ॥ ४ ॥

॥ ३०८६ ॥

आह्मीं गावें तुह्मीं कोणीं कांहीं न ह्मणावें । ऐसें तंव आह्मां सांगि-

---

पाठभेदः—१ फावे.

तलें नाहीं देवें ॥ १ ॥ ह्मणा रामराम टाळी वाजवा हातें । नाचा डोला प्रेमें आपुलिया स्वहितें ॥२॥ सहज घडे तया आळस करणें तें काई । अग्नीचें भातुकें हात पोळितां कां पायीं ॥ ३ ॥ येथें नाहीं लाज भक्तिभाव लौकिक । हांसे तया घडे ब्रह्महत्यापातक॥४॥जया जैसा भाव निरोपण करावा । येथें नाहीं चाड ताळविताळ या देवा ॥५॥ सदैव ज्या कथा काळ घडे श्रवण । तुका ह्मणे येर जन्मा आले पाषाण ॥ ६ ॥

॥ ३०८७ ॥

तेलनीशीं रुसला वेडा । रागें कोरडें खातो भिडा ॥१॥ आपुलें हित आपण पाही । संकोच तो न धरी कांहीं ॥२॥ नाडिलें लोकां टाकिला गोहो । बोडिलें डोकें सांडिला मोहो ॥ ३ ॥ शेजारणीच्या गेली रागें । कुतऱ्यांनीं घर भरिलें मागें ॥४॥ पिसारागें भाजिलें घर । नागविलें तें नेणे फार ॥५॥ तुका ह्मणे यांच्या[1] रागें । फेडिलें सावलें देखिलें जगें ॥६॥

॥ ३०८८ ॥

आलें देवाचिया मना । तेथें कोणाचें चालेना ॥ १ ॥ हरिश्चंद्र ताराराणी । वाहे डोंबा घरीं पाणी ॥ २ ॥ पांडवांचा साहाकारी । राज्यावरोनि केले दुरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे उगेचि राहा । होईल तें सहज पाहा ॥४॥

॥ ३०८९ ॥

मजुरांचें पोट भरे । दाता उरे संचला ॥१॥ या रे या रे हातोहातीं । काम माती सारावी ॥ २ ॥ रोजकीर्दी होतो झाडा । रोकडाचि पर्वत ॥३॥ तुका ह्मणे खोल पाया । वेचों काया क्लेशेसीं ॥४॥

॥ ३०९० ॥

शहाणपणें वेद मुका । गोपिका त्या ताकटी ॥ १ ॥ कैसें येथें कैसें तेथें । शहाणे ते जाणती ॥ २ ॥ यज्ञमुखें खोडी काढी । कोण गोडी बोरांची ॥३॥ तुका ह्मणे भावाविण । अवघा सीण केला तो ॥ ४ ॥

पाठभेदः—१ वांच्या.

॥ ३०९१ ॥

गुरुशिष्यपण । हें तों अधमलक्षण ॥ १ ॥ भूतीं नारायण खरा । आप तैसाचि दुसरा ॥ २ ॥ न कळतां दोरी साप । राहूं नेदावा तो कांप ॥ ३ ॥ तुका ह्मणे गुणदोषी । ऐसें न पडावें सोसीं ॥ ४ ॥

॥ ३०९२ ॥

सेजेचा एकांत अगीपाशीं कळे । झांकिलिया डोळे अधःपात ॥ १ ॥
राहो अथवा मग जळो अगीमधीं । निवाड तो आधीं होऊनि गेला॥२॥
भेणें झडपणी नाहीं येथें दुजें । पादरधिटा ओझें हतियारें ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज नाहीं जी भरवसा । तोंवरि सहसा निवाड तो ॥४॥

॥ ३०९३ ॥

एक एका साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ ॥ १ ॥ कोण जाणे कैसी परी । पुढें उरी ठेवितां ॥ २ ॥ अवघे धन्य होऊं आतां । स्मरवितां स्मरण ॥ ३ ॥ तुका ह्मणे अवघी जोडी । ते आवडी चरणांची ॥४॥

॥ ३०९४ ॥

सोन्याचे पर्वत करवती पाषाण । अवघे रानोरान कल्पतरु ॥ १ ॥
परि या दुर्लभ विठोबाचे पाय । तेथें हे उपाय न सरती ॥ २ ॥
अमृतें सागर भरवती गंगा । ह्मणवेल उगा राहे काळा ॥ ३ ॥
भूत भविष्य कळों येईल वर्तमान। करवती प्रसन्न रिद्धिसिद्धि ॥४॥
स्थान मान कळों येती योगमुद्रा । नेववेल वारा ब्रह्मांडासी ॥ ५ ॥
तुका ह्मणे मोक्ष राहे ऐलीकडे । इतर बापुडें काय तेथें ॥ ६ ॥

॥ ३०९५ ॥

नारे तरि काय नुजेडे कोंबडें । करूनियां वेडें आग्रो दावी ॥ १ ॥
आइत्याचे साहे फुकाचा विभाग । विक्षेपानें जग छी थू करी ॥२॥
नेमून ठेविला करत्यानें काळ । नव्हायेसें बळ करूं पुढें ॥ ३ ॥
तुका ह्मणे देव साहे जाल्यावरी । असांगचि करी सर्व सांग ॥ ४ ॥

॥ ३०९६ ॥

न करावी आतां पोटासाटीं चिंता । आहे त्या संचिता माप लावूं ॥१॥
दृष्टि ते घालावी परमार्थाठायीं । क्षुल्लका उपायीं सिण जाला ॥ २ ॥
येथें तंव नाहीं घेइजेसें सवें । कांहीं नये जीवें वेचों मिथ्या ॥ ३ ॥
खंडणेंचि नव्हे उद्वेग वेरझारीं । बापुडे संसारीं सदा असों ॥ ४ ॥
शेवटा पाववी नावेचें बैसणें । भुजाबळें कोणें कष्टी व्हावें ॥ ५ ॥
तुका ह्मणे आतां सकळांचें सार । करावा व्यापार तरी ऐसा ॥६॥

॥ ३०९७ ॥

अधिकार तैसा दावियेला मार्ग । चालतां हें मग कळों येतें ॥ १ ॥
जाळूं नये नाव पावलेनि पार । मागील आधार बहुतांचा ॥ २ ॥
तुका ह्मणे रोग वैद्याचे अंगीं । नाहीं करी जगीं उपकार ॥ ३ ॥

॥ ३०९८ ॥

देहबुद्धि वसे लोभ जयां चित्तीं । आपुलें जाणतीं परावें जे ॥ १ ॥
तयासी चालतां पाहिजे सिदोरी । दुःख पावे करी असत्य तो ॥२॥
तुका ह्मणे धर्म रक्षाया कारणें । छाया इच्छी उन्हें तापला तो ॥३॥

॥ ३०९९ ॥

अवघे देव साध । परी या अवगुणांचा बाध ॥ १ ॥ ह्मणउनी नव्हे सरी । राहे एका एक दुरी ॥२॥ ऊंस कांदा एक आळां । स्वाद पाहतां निराळा ॥३॥ तुका ह्मणे नव्हे सरी । विष अमृताची परी ॥ ४ ॥

॥ ३१०० ॥

करी संध्यास्नान । वारी खाउनियां अन्न ॥१॥ तया नाहीं लाभहानी । आदा वेंचाचिये मानीं ॥ २ ॥ मजुराचें धन । विळा दोरचि जतन ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं । अधीरासी देव कांहीं ॥ ४ ॥

॥ ३१०१ ॥

अवगुण तों कोणीं नाहीं प्रतिष्ठिले । मागें होत आले शिष्टाचार ॥१॥

दुर्बळाच्या नांवें पिटावा डांगोरा । हा तो नव्हे बरा सत्यवाद ॥२॥ मद्य आणि मधु एकाराशी नांवें । तरि कां तें खावें आधारें त्या ॥३॥ तुका ह्मणे माझा उच्छिष्ट प्रसाद । निवडी भेदाभेद वृष्टिन्यावें[1] ॥४॥

॥ ३१०२ ॥

न सांगावें वर्म । जनीं असों द्यावा भ्रम ॥ १ ॥ उगीच लागतील पाठीं । होतीं रितींच हिंपुटी ॥ २ ॥ सिकविल्या गोटी । सिकोनि न धरिती पोटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सीण । होइल अनुभवाविण ॥४॥

॥ ३१०३ ॥

नसावें ओशाळ । मग मानिती सकळ ॥१॥ जाय तेथें पावे मान । चाले बोलिलें वचन ॥ २ ॥ राहों नेदी बाकी । दान ज्याचें त्यासी टाकी ॥ ३ ॥ होवा वाटे जना । तुका ह्मणे साटीं गुणां ॥ ४ ॥

॥ ३१०४ ॥

नसतां अधिकार । उपदेशासी बळात्कार । तरि ते केले हो चार । माकडा आणि गारोडी ॥१॥ धन धान्य राज्य बोल । वृथा रंजवणें फोल । नाहीं तेथें ओल । बीज वेची मूर्ख तो ॥२॥ नये बांधों गांठीं । पदरा आणी ऐसी तुटी । असोन कसोटी । शिष्टाचार अनुभव ॥३॥ उपदेसी तुका । मेघवृष्टीनें आइका । संकल्पासी धोका । सहज तें उत्तम ॥४॥

॥ ३१०५ ॥

मन गुंतलें लुलयां । जाय धांवोनि त्या ठाया ॥ १ ॥ मागें परतवी तो बळी । शूर एक भूमंडळीं ॥ २ ॥ येऊनियां घाली घाला । नेणों काय होईल तुला ॥३॥ तुका ह्मणे येणें । बहु नाडिले शाहाणे ॥४॥

॥ ३१०६ ॥

पतिव्रते आनंद मनीं । सिंदळ खोंचे व्यभिचारवचनीं ॥ १ ॥ जळो

---

पाठभेदः—१ वृष्टिन्यायें.

वर्म लागो आगी । शुद्धपण भलें जगीं ॥ २ ॥ सुख पुराणीं आचार-
शीळा । दुःख वाटे अनर्गळा ॥ ३ ॥ शूरा उल्हास अंगीं । गांढ्या
मरण ते प्रसंगीं ॥ ४ ॥ शुद्ध सोनें उजळे अगी । हीन काळे धांवे
रंगीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे तोचि हिरा । घनघायें निवडे पुरा ॥ ६ ॥

॥ ३१०७ ॥

न कळतां कोणीं मोडियेलें व्रत । तया प्रायश्चित्त चाले कांहीं ॥ १ ॥
जाणतिया वज्रलेप जाले थोर । तयांस अघोर कुंभपाक ॥ २ ॥
आतां जरी कोणी नाइके सांगतां । तया शिकवितां तेंचि पाप ॥३॥
काय करूं मज देवें बोलविलें । माझें खोळंबलें काय होतें ॥ ४ ॥
तुका ह्मणे जना पाहा विचारूनी । सुख वाटे मनीं तेंचि करा ॥ ५ ॥

॥ ३१०८ ॥

ढेंकणासी बाज गड । उतरचढ केवढी ॥ १ ॥ होता तैसा कळों
भाव । आला वाव अंतरींचा ॥ २ ॥ बोरामध्यें वसे अळी । अठो-
ळीच भोंवतीं ॥ ३ ॥ पोटासाटीं वेंची चणे । राजा ह्मणे तोंडें मी
॥ ४ ॥ बेडकानें चिखल खावा । काय ठावा सागर ॥ ५ ॥ तुका
ह्मणे ऐसें आहे । काय पाहे त्यांत तें ॥ ६ ॥

॥ ३१०९ ॥

पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें । आपुलाल्या दैवें पिके भूमि ॥ १ ॥
बीज तेंचि फळ येईल शेवटीं । लाभहानि तुटी ज्याची तया ॥ २ ॥
दीपाचिये अंगीं नाहीं दुजाभाव । धणी चोर साव सारिखेचि ॥ ३ ॥
काउळें ढोंपरा कंकर तित्तिरा । राजहंस चारा मुक्ताफळें ॥ ४ ॥
तुका ह्मणे येथें आवडी कारण । पिकला नारायण जयां तैसा ॥ ५ ॥

॥ ३११० ॥

दुर्बळा वाणीच्या एक दोनि सिद्धि । सदैवा समाधि विश्वरूपीं ॥ १ ॥
काय त्याचें वांयां गेलें तें एक । सदा प्रेमसुख सर्वकाळ ॥ २ ॥

तीर्थ देव दुरी तया भाग्यहीना । विश्व त्या सज्जना दुमदुमिलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे एक वाह्याती मोळिया । भाग्यें आगळिया घरा येती ॥ ४ ॥

॥ ३१११ ॥

वैद्य वांचविती जीवा । तरी कोण ध्यातें देवा ॥ १ ॥ काय जाणों कैसी परी । प्रारब्ध तें ठेवी उरी ॥ २ ॥ अंगीं दैवत संचरे । मग तेथें काय उरे ॥ ३ ॥ नवसें कन्यापुत्र होती । तरि कां करणें लागे पती ॥ ४ ॥ जाणे हा विचार । स्वामी तुकयाचा दातार ॥ ५ ॥

॥ ३११२ ॥

कांहीं न मागे कोणांसी । तोचि आवडे देवासी ॥ १ ॥ देव तयासी ह्मणावें । त्याचे चरणीं लीन व्हावें ॥ २ ॥ भूतदया ज्याचे मनीं । त्याचे घरीं चक्रपाणी ॥ ३ ॥ नाहीं नाहीं त्या समान । तुका ह्मणे मी जमान ॥ ४ ॥

॥ ३११३ ॥

कासिया पाषाण पूजिती पितळ । अष्ट धातु खळ भावहीन ॥ १ ॥
भावचि कारण भावचि कारण । मोक्षाचें साधन बोलियलें ॥ २ ॥
काय करिल जपमाळा कंठमाळा । करिशी वेळोवेळां विषयजप ॥ ३ ॥
काय करिशील पंडित हे वाणी । अक्षराभिमानी थोर होय ॥ ४ ॥
काय करिशील कुशल गायन । अंतरीं मळीण कुबुद्धि ते ॥ ५ ॥
तुका ह्मणे भाव नाहीं करी सेवा । तेणें काय देवा योग्य होशी ॥ ६ ॥

॥ ३११४ ॥

दिली चाले वाचा । क्षय मागिल्या तपाचा ॥ १ ॥ रिद्धि सिद्धि येती घरा । त्याचा करिती पसारा ॥ २ ॥ मानदंभांसाटीं । पडे देवासवें तुटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मेवा । कैंचा वेठीच्या निदैवा ॥ ४ ॥

॥ ३११५ ॥

आणिकां छळावया जालासी ब्राह्मणा । स्वहिता घातलें खान ॥

आडिके पैके करूनि सायास । कृपणें सांचलें धन ॥ न जिरे क्षीर श्वानासी भक्षितां । याती तयाचा गुण ॥ तारुण्यदशे अधम मातला । दवडी हात पाय कान ॥ १ ॥ काय जालें यांस वांयां कां ठकले । हातीं सांपडलें टाकीतसे ॥ घेउनि स्फटिकमणी टाकी चिंतामणी । नागवले आपुले इच्छे ॥ २ ॥ सिद्धीं सेविलें सेविती अधम । पात्रासारिखें फळ ॥ सिंपिला मोतीं जन्मलें स्वाती । वरुषलें सर्वत्र जळ ॥ कापूस पट नयेचि कारणा । तयास पातला काळ ॥ तेंचि भुजंगें धरिलें कंठीं । मा विष जालें त्याची गरळ ॥ ३ ॥ भक्षूनि मिष्टान्न घृतसाकर । सहित सोलुनि केळें ॥ घालोनियां घसा अंगोळिया । वांती करूं पाहे बळें ॥ कुंथावयाची आवडी देवा । उन्हवणी रडवी बाळें ॥ तुका ह्मणे जे जैसें करिती । ते पावती तैसींच फळें ॥ ४ ॥

॥ ३११६ ॥

बोलावें तें धर्मा मिळे । बरे डोळे उघडूनी ॥ १ ॥ काशासाटीं खावें शेण । जेणें जन थुंकतें ॥ २ ॥ दुजें ऐसें काय बळी । जे या जाळी अग्नीसि ॥ ३ ॥ तुका ह्मणे शूर रणीं । गांढे मनीं बुरबुरी ॥ ४ ॥

॥ ३११७ ॥

आणितां त्या गती । हंस काउळे न होती ॥ १ ॥ सांडा सांडा रे मठारे । येथें गांठीसवें धुरें ॥ २ ॥ नाकेंविण मोतीं । उभ्या बाजारें फजिती । ॥ ३ ॥ हुकुमदाज तुका । येथें कोणी फुंदों नका ॥ ४ ॥

॥ ३११८ ॥

वंचुनियां पिंड । भाता दान करी लंड ॥ १ ॥ जैसी याची चाली वरी । तैसा अंतरला दुरी ॥ २ ॥ मेला राखे दिस । ठ्यालेपण जालें वोस ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । लोभें न पुरेचि सेवा ॥ ४ ॥

॥ ३११९ ॥

धनवंतालागीं । सर्वमान्यता आहे जगीं ॥ १ ॥ माता पिता बंधु

जन । सर्व मानिती वचन ॥ २ ॥ जंव मोठा चाले धंदा । तंव बहिणी ह्मणे दादा ॥ ३ ॥ सदा शृंगारभूषणें । कांता लवे बहु-मानें ॥ ४ ॥ तुका ह्मणे धन । भाग्य अशाश्वत जाण ॥ ५ ॥

॥ ३१२० ॥

मायबापें केवळ काशी । तेणें नवजावें तीर्थासी ॥१॥ पुंडलीकें काय केलें । परब्रह्म उभें ठेलें ॥ २ ॥ तैसा होईं सावधान । हृदयीं धरीं नारायण ॥ ३ ॥ तुका ह्मणे मायबापें । अवघीं देवाचीं स्वरूपें ॥ ४ ॥

॥ ३१२१ ॥

गंधर्व अग्नि सोम भोगिती कुमारी । कोठें चराचरीं त्याग केला ॥१॥
गायत्री स्वमुखें भक्षीतसे मळ । मिळाले वोहाळ गंगाओघ ॥२॥
कागाचिये विष्टें जन्म पिंपळासि । पांडवकुळासि पाहातां दोष ॥३॥
शकुंतळा सूत कर्ण शृंगी व्यास । यांच्या नामें नाश पातकांसि ॥४॥
गणिका अजामेळ कुब्जा तो विदुर । पाहातां विचार पिंगळेचा ॥५॥
वाल्हा विश्वामित्र वसिष्ठ नारद । यांचें पूर्व शुद्ध काय आहे ॥६॥
न व्हावी तीं जालीं कर्में नरनारी । अनुतापें हरी स्मरतां मुक्त ॥७॥
तुका ह्मणे पूर्व नाठवी श्रीहरी । मूळ जो उच्चारी नरक त्यासि ॥८॥

॥ ३१२२ ॥

धाकुट्याचे मुखीं घांस घाली माता । वरी करी सत्ता शाहाणियां ॥१॥
ऐसें जाणपणें पडिलें अंतर । वाढे तों तों थोर अंतराय ॥२॥
दोन्ही उभयतां आपणचि व्याली । आवडीची चाली भिन्न भिन्न ॥३॥
तुका ह्मणे अंगापासूनि निराळें । निवडिलें बळें रडतें स्तनीं ॥४॥

॥ ३१२३ ॥

बाळ बापा ह्मणे काका । तरी कां निरपराध पारिखा ॥ १ ॥ जैसा

---

पाठभेदः—१ 'तरि तो कां निरपराध.'

तैसा भाव गोड । पुरवी कोड विठ्ठल ॥२॥ साकरेसि ह्मणतां धोंडा । तरी कां तोंडा न रुचे ॥३॥ तुका ह्मणे आरुष बोल । नव्हे फोल आहाच ॥४॥

॥ ३१२४ ॥

साधूनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकातें डोळां न पाहवे ॥१॥ साधूनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कांपती देखोनियां ॥२॥ असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका ह्मणे ॥३॥

॥ ३१२५ ॥

हित जाणे चित्त । कळों येतसे उचित ॥ १ ॥ परिहार ते संपादनी । सत्य कारण कारणीं ॥ २ ॥ वरदळ तें नुतरे कसीं । आगीमध्यें तें रसीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे करुनी खरें । ठावितां तें पुढें बरें ॥ ४ ॥

॥ ३१२६ ॥

उचिताचा काळ । साधावया युक्तिबळ । आपलें सकळ । ते प्रसंगीं पाहिजे ॥ १ ॥ नेम नाहीं लाभ हानि । अवचित घडती दोनी । विचारूनि मनीं । पाहिजे तें प्रयोजावें ॥ २ ॥ जाळ जाळा काळें । करपो नेदावें आगळें । जेवितां वेगळें । ज्याचें त्याचें तेथें शोभे ॥३॥ पाळी नांगर पाभारीं । तन निवडूनि सोंकरी । तुका ह्मणे धरी । सेज जमा सेवटीं ॥ ४ ॥

॥ ३१२७ ॥

करणें न करणें वारलें जेथें । जातों तेणें पंथें संतसंगें ॥ १ ॥ संतीं हें पाहिलें लाविलें निशाण । ते खुणा पाहोन गर्जे नाम ॥ २ ॥ तुका ह्मणे तुह्मी चला याचि वाटे । भरवशानें भेटे पांडुरंग ॥ ३ ॥

॥ ३१२८ ॥

मारूं नये सर्प संतांचिया दृष्टी । होतील ते कष्टी व्यापकपणें ॥ १ ॥ एक सूत्र जीवशिवीं आइक्यता । रोम उपडितां अंग कांपे ॥ २ ॥

नाहीं साहों येत दुःखाची ते जाती । परपीडा भूतीं साम्य जालें ॥ ३ ॥ तुका ह्मणे दिला नीतीचा संकेत । पूजा नांवें चित्त सुखी तेणें ॥ ४ ॥

॥ ३१२९ ॥

क्षुधेलिया अन्न । द्यावें पात्र [1] न विचारून ॥१॥ धर्म आहे वर्म अंगीं । कळलें पाहिजे प्रसंगीं ॥ २ ॥ द्रव्य आणि कन्या । येथें कुळ कर्म सोधण्या ॥३॥ तुका ह्मणे पुण्य गाठीं । तरिच उचितासी भेटी ॥४॥

॥ ३१३० ॥

सर्वा भूतीं द्यावें अन्न । द्रव्य पात्र विचारोन । उपतिष्ठे कारण । तेथें बीज पेरीजे ॥ १ ॥ पुण्य करितां होय पाप । दुग्ध पाजोनि पोशिला साप । करोनि अघोराचा जप । दुःख विकत घेतलें ॥ २ ॥ भूमी पाहातां नाहीं वेगळी । माळ बरड एक काळी । उत्तम निराळी । मध्यम ते कनिष्ट ॥ ३ ॥ ह्मणोनि विवेकें । कांहीं करणें तें निकें । तुका ह्मणे फिकें । रुची नेदी मिष्टान्न ॥ ४ ॥

॥ ३१३१ ॥

कवण दिस येइल कैसा । न कळे संपत्तीचा भरंवसा ॥ १ ॥ चौदा चौकडिया लंकापति । त्याची कोण जाली गति ॥२॥ लंकेसारिखें भुवन । त्याचें त्यासि पारखें जाण ॥३॥ तेहतीस कोटी बांदवडी । राज्य जातां न लगे घडी ॥४॥ ऐसें अहंतेनें नाडिले । तुका ह्मणे वांयां गेले ॥५॥

॥ ३१३२ ॥

लंकेमाजी घरें किती तीं आइका । सांगतसें संख्या जैसी तैसी ॥ १ ॥ पांच लक्ष घरें पाषाणांचीं जेथें । सात लक्ष तेथें विटेबंदी ॥ २ ॥ कोटि घरें जेथें कांशा आणि तांब्याचीं । शुद्ध कांचनाचीं सप्त कोटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्याची संपदा एवढी । सांगातें कवडी गेली नाहीं ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ 'न' नाहीं.

॥ ३१३३ ॥

पायरवे अन्न । मग करी क्षीदक्षीण ॥ १ ॥ ऐसे होती घातपात । लाभेविण संगें थीत ॥ २ ॥ जन्माची जोडी । वाताहात एके घडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे शंका । हित आड या लौकिका ॥ ४ ॥

॥ ३१३४ ॥

पुढें जेणें लाभ घडे । तेंचि वेडे नाशिती ॥१॥ येवढी कोठें नागवण । अंधारून विष घ्यावें ॥ २ ॥ होणारासी मिळे बुद्धि । नेदी शुद्धी धरूं तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे जना सोंग । दावी रंग आणीक ॥ ४ ॥

॥ ३१३५ ॥

ग्रंथाचे ते अर्थ नेणती खळ । बहु अनर्गळ जाले विषयीं ॥ १ ॥ नाहीं भेद ह्मूण भलतेंचि आचरे । मोकळा विचरे मनासवें ॥ २ ॥ तुका ह्मणे विषा नांव तें अमृत । पापपुण्या भीत नाहीं नष्ट ॥ ३ ॥

॥ ३१३६ ॥

चळेती[1] आड वाटा । आणिकां दाविती जे नीटा ॥ १ ॥ न मनीं तयांचे उपकार । नाहीं जोडा तो गंव्हार ॥२॥ विष सेवूनि वारी मागें । प्राण जातां जेणें संगें ॥३॥ बुडतां हाक मारी । ठाव नाहीं आणिकां वारी ॥४॥ तुका ह्मणे न करीं हिंकों[2] । गुण घेऊन अवगुण टाका ॥५॥

॥ ३१३७ ॥

जरी आलें राज्य मोळविक्या हातां । तरी तो मागुता व्यवसायी॥१॥ तृष्णेचीं मजुरें नेणती विसांवा । वाढे हांव हांवां काम कामीं ॥२॥ वैभवाचीं सुखें नातळतां अंगा । चिंता करी भोगा विघ्न जाळी ॥३॥ तुका ह्मणे वाहे मरणाचें भय । रक्षण उपाय करूनि असे ॥ ४ ॥

॥ ३१३८ ॥

अभिमानाचें तोंड काळें । दावी बळें अंधार ॥१॥ लाभ न्यावा हातो-

---

पाठभेदः—१ चालिती. २ हिका.

हातीं । तोंडीं माती पाडोनि ॥२॥ लागलीसे पाठी लाज । जालें काज नासाया ॥ ३ ॥ तुका ह्मणे कुश्चळ मनीं । विटंबणीं पडिलीं तीं ॥४॥

॥ ३१३९ ॥

चातुर्याच्या अनंतकळा । सत्या विरळा जाणता ॥ १ ॥ हांसत्यासवें हांसे जन । रडतां भिन्न पालटे॥२॥जळो ऐसे वांजट बोल । गुणां मोल भूस मिथ्या ॥३॥ तुका ह्मणे अंधळ्याऐसें । वोंगळ पिसें कौतुक ॥४॥

॥ ३१४० ॥

गेली वीरसरी । मग त्यासि रांड मारी ॥१॥ मग नये तैसी सत्ता । गेली मागील आणितां ॥ २ ॥ भंगलिया चित्ता । न ये काशानें सांधितां ॥ ३ ॥ तुका ह्मणे धीर । भंगलिया पाठीं कीर ॥ ४ ॥

॥ ३१४१ ॥

खोट्याचा विकरा । येथें नव्हे कांच हिरा ॥ १ ॥ काय दावायाचें काम । उगाच वाढवावा श्रम ॥ २ ॥ परीक्षकाविण । मिरवों जाणा तें तें हीण ॥ ३ ॥ तुका पायां पडे । वाद पुरे हे झगडे ॥ ४ ॥

॥ ३१४२ ॥

बोलविसी माझे मुखें[1] । परी या जना वाटे दुःख ॥१॥ जया जयाची आवडी । तया लागीं तें चरफडी ॥२॥ कठीण देतां काढा । जल्पे रोगी मेळवी दाढा ॥३॥ खाऊं नये तेंचि मागे । निवारितां रडों लागे ॥४॥ वैद्या भीड काय । अतित्याई जीवें जाय॥५॥नये भिडा सांगो आन । पथ्य औषधा कारण ॥ ६ ॥ धन माया पुत्र दारा । हे तो आवडी नरका थारा ॥७॥ तुका ह्मणे यांत । आवडे ते करा मात ॥८॥

॥ ३१४३ ॥

सर्वथाही खोटा संग । उपजे भंग मनासी ॥१॥ बहु रंगें भरलें जन ।

---

पाठभेदः—१ मुखें.

संपन्नचि भवगुणीं ॥ २ ॥ सेविलिया निष्कामबुद्धि । मर्दे शुद्धी सांडावी ॥ ३ ॥ त्रासोनियां बोले तुका । आतां लोकां दंडवत ॥४॥

॥ ३१४४ ॥

भोगें घडे त्याग । त्यागें अंगा येती भोग ॥ १ ॥ ऐसें उफराटें वर्म । धर्मा अंगींच अधर्म ॥ २ ॥ देव अंतरे तें पाप । खोटे उगवा संकल्प ॥ ३ ॥ तुका ह्मणे भीड खोटी । लाभ विचारावा पोटीं ॥४॥

॥ ३१४५ ॥

या रे हरिदासानो जिंकों कळिकाळा । आमुचिया बळा पुढें किती बापुडें ॥ १ ॥ रंग सुरंग घमंडी नाना छंदें । हास्यविनोदें मनाचिये आवडी ॥ २ ॥ येणें तेणें प्रकारें बहुतां सुख जोडे । पूजन तें घडे नारायणा अंतरीं ॥ ३ ॥ वांकड्या माना बोल बोलावे आर्ष । येईल तो त्यांस छंद पढीयें गोविंदा ॥ ४ ॥ आपुलाले आवडी एकापुढें एक नटा । नाहीं थोर मोठा लहान या प्रसंगीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे येथें प्रेम भंगूं नये कोणीं । देव भक्त दोन्ही निवडितां पातक ॥ ६ ॥

॥ ३१४६ ॥

वचनांचे मांडे दावावे प्रकार । काय त्या साचार कौतुकाचे ॥ १ ॥
जातां घरा मागें उरों नेणें खंती । मिळाल्या बहुती फांकलिया ॥ २ ॥
उदयींच अस्त उदयो संपादला । कल्पनेचा केला जागेपणें ॥ ३ ॥
जाणोनियां गेला हांडोरियां पोरां । सावध इतरां करुनी तुका ॥ ४ ॥

॥ ३१४७ ॥

न पालटे जाती जीवाचिये साटीं । बाहे तेंचि पोटीं दावी वरी ॥ १ ॥
अंतरीं सबाहीं सारिखाचि रंग । वीट आणि भंग नाहीं रसा ॥ २ ॥
घणाचिया घायें पोटीं शिरे हिरा । सांडूं नेणे धीरा आपुलिया ॥ ३ ॥
तुका ह्मणे कढे करावी शीतळ । ऐसें जातिबळ चंदनाचें ॥ ४ ॥

॥ ३१४८ ॥

प्राक्तनाच्या योगें आळशावरी गंगा । स्नान काय जगा करूं नये ॥ १ ॥ उभी कामधेनु मांगाचे अंगणीं । तिसी काय ब्राह्मणीं वंदूं नये ॥ २ ॥ कोढियाचे हातें परिसें होय सोनें । अपवित्र ह्मणोन घेऊं नये ॥ ३ ॥ यातिहीन जाला गांवींचा मोकासी । त्याच्या वचनासी मानूं नये ॥ ४ ॥ भावारूढ तुका मुद्रा विठोबाची । न मनी तयांचीं तोंडें काळीं ॥ ५ ॥

॥ ३१४९ ॥

शीतळ तें शीतळाहुनी । पायवणी चरणींचें ॥ १ ॥ सेवन हें शिरसा धरीं । अंतरीं ही वरदळा ॥ २ ॥ अवघेंचि नासी पाप । तीर्थ बाप माझ्याचें ॥ ३ ॥ बैसोनियां तुका तळीं । त्या कल्लोळीं डौरला ॥ ४ ॥

॥ ३१५० ॥

विष पोटीं सर्पा । जन भीत तया दर्पा ॥ १ ॥ पंच भूतें नाहीं भिन्न । गुण दुःख देती क्षीण ॥ २ ॥ चंदन प्रिय वासें । आवडती जाती ऐसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे दाणा । कुचर मिळों नये अन्ना ॥ ४ ॥

॥ ३१५१ ॥

कारणापें असतां दृष्टी । शंका पोटीं उपजेना ॥ १ ॥ शूर मिरवे रणांगणीं । मरणींच संतोष ॥ २ ॥ पाहिजे तो कळवळा । मग बळा काय उणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे उदारपणें । काय उणें मनाचें ॥ ४ ॥

॥ ३१५२ ॥

झरा लागला सुखाचा । ऐसा मापारी कइंचा ॥ १ ॥ जो हें माप तोंडें धरी । सळी जाली ते आवरी ॥ २ ॥ जाले बहु काळ । कोणा नाहीं ऐसें बळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे तळ । नाहीं पाहेसा सकळ ॥ ४ ॥

॥ ३१५३ ॥

बळ बुद्धी वेचुनियां शक्ती । उदक चालवावें युक्तीं ॥ १ ॥ नाहीं चळण

तया अंगीं । धांवें लवणामागें वेगीं ॥ २ ॥ पाट मोट कळा । भरित पखाला सागळा ॥ ३ ॥ बीजा ज्यासी द्यावें[1] । तुका ह्मणे तैसें व्हावें ॥ ४ ॥

॥ ३१५४ ॥

जायांचें अंगुलें लेतां नाहीं मान । शोभा नेदी जन हांसविलें ॥ १ ॥
घुसळितां ताक कांडितां भूस । साध्य नाहीं क्लेश जाती वांयां ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं स्वता भांडवल । भिकेचें तें फोल बीज नव्हे ॥ ३ ॥

॥ ३१५५ ॥

समर्थाचें केलें । कोणा जाईल मोडिलें ॥ १ ॥ वांयां करावी ते उरे । खटपट सोस पुरे ॥ २ ॥ ठेविला जो ठेवा । आपुलाला तैसा खावा ॥ ३ ॥ ज्याचें त्याचे हातीं । भुंके तयाची फजिती ॥४॥ तुका ह्मणे कोटी । वाळे जाले शूळ पोटीं ॥ ५ ॥

॥ ३१५६ ॥

इच्छिलें ते शकुनवंती । होय देती तात्काळ ॥ १ ॥ क्षीरा नीरा निवाड करी । बराबरी विठ्ठल ॥ २ ॥ भाग्याविण कैचें फळ । अंतर मळमूत्राचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे संचित कुडें । तें बापुडें करीतसे ॥ ४ ॥

॥ ३१५७ ॥

वैभवाचे धणी सकळां शरणागत । सत्यभावें चित्त अर्पिलें तें ॥ १ ॥
नेदी उरों देव आपणावेगळें । भावाचिया बळें ठायाठाव ॥ २ ॥
[illegible]णोनि नेणोनि अंगा आली दशा । मग होय इच्छा आपणच ॥ ३ ॥
[illegible]ह्मणे बरें धाकट्याचें जिणें । माता स्तनपानें वाढविते ॥ ४ ॥

॥ ३१५८ ॥

जें जें [illegible] संकल्पें । तेंचि पुण्य होय पाप ॥ १ ॥ कारण तें मनापासीं । भ[illegible] या मिळे रसीं ॥ २ ॥ सांडी मांडी हाली चाली । राहे तरि भलें [illegible] ॥३॥ तुका ह्मणे सार । नांव जीवनाचे सागर ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ ध्यावें.

॥ ३१५९ ॥

आणिकांच्या घातें मानितां संतोष । सुखदुःख दोष अंगीं लागे ॥ १ ॥ ऐसे मनीं वाहूं न येती संकल्प । करूं नये पाप भांडवल ॥ २ ॥ किल्मिषाची चित्तीं राहातां कांचणी । अग्नींत टाकोनी ठाव जाळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे कोपें घडे पुण्यक्षय । होणार तें होय प्रारब्धींचें ॥ ४ ॥

॥ ३१६० ॥

मथनासाटीं धर्माधर्म । त्याचें वर्म नवनीत ॥ १ ॥ तेंचि तें घाटूं नये । आलें जाय नासूनि ॥ २ ॥ सांभाळावें बराबर । वर्म दूर न वजावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे घालें पोट । मग बोटचाटणी ॥ ४ ॥

॥ ३१६१ ॥

वदे साक्षत्वेंसीं वाणी । नारायणीं मिश्रित ॥ १ ॥ नलगे कांहीं चाचपावें । जातों भावें पेरीत ॥ २ ॥ भांडार त्या दातियाचें । मी कैंचें ये ठायीं ॥ ३ ॥ सादावीत गेला तुका । येथें एकाएकीं तो ॥ ४ ॥

॥ ३१६२ ॥

फळ पिकें देंटीं । निमित्य वारियाची भेटी ॥ १ ॥ हा तों अनुभव रोकडा । कळों येतो खरा कुडा ॥२॥ तोडिलिया बळें । वांयां जाती कार्चीं फळें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मन । तेथें सकळ कारण ॥ ४ ॥

॥ ३१६३ ॥

फळ देंटींहून झडे । मग मागुतें न जोडे ॥ १ ॥ ह्मणउनि तांतडी खोटी । कारण उचिताचे पोटीं ॥ २ ॥ पुढें चढे हात । त्याग मागिलां उचित ॥ ३ ॥ तुका ह्मणे रणीं । नये पाहों परतोनि ॥ ४ ॥

॥ ३१६४ ॥

अवघी मिथ्या आटी । राम नाहीं तंव कंठीं ॥१॥ सावधान सावधान । उगवीं संकल्पीं हें मन ॥२॥ सांडिलें तें मांडे । आग्रह उरल्या काळ दंडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे आलें भागा । देउनि चिंतीं पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ३१६५ ॥

नये इच्छूं सेवा स्वइच्छा जगाची । अवज्ञा देवाची घडे तेणें ॥ १ ॥ देहाचा निग्रही त्याचें तो सांभाळी । मग नये कळि अंगावरी ॥ २ ॥ आपलिया इच्छा माता सेवा करी । न बाधी ते थोरी येणें क्षोभें ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांडा देखीचे दिमाख । मोडसीचें दुःख गांड फाडी ॥ ४ ॥

॥ ३१६६ ॥

शिळा जया देव । तैसा फळे त्याचा भाव ॥ १ ॥ होय जतन तें गोड । अंतरा येती नाड ॥ २ ॥ देव जोडे भावें । इच्छेचें तें प्रेम घ्यावें ॥३॥ तुका ह्मणे मोड दावी । तैशीं फळें आलीं व्हावीं ॥ ४ ॥

॥ ३१६७ ॥

अंतरींचें गोड । राहे आवडीचें कोड ॥ १ ॥ संघष्टणें येती अंगा । गुणदोष मनोभंगा ॥ २ ॥ उचिताच्या कळा । नाहीं कळत सकळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे अभावना । भावीं मूळ तें पतना ॥ ४ ॥

॥ ३१६८ ॥

धनवंता घरीं । करी धनाचि चाकरी ॥ १ ॥ होय बैसल्या व्यापार । नलगे सांडावेंचि घर ॥ २ ॥ रानीं वनीं [1]दीपीं । असतीं होतीं सोपीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोल । देतां कांहीं नव्हे खोल ॥ ४ ॥

॥ ३१६९ ॥

जया शिरीं कारभार । बुद्धि सार तयाची ॥ १ ॥ वर्ते तैसें वर्ते जन । बहुतां गुण एकाचा ॥ २ ॥ आपणीयां पाक करीं । तो इतरीं सेविजे ॥ ३ ॥ तुका ह्मणे शूर राखे । गांढ्या वाखे सांगातें ॥ ४ ॥

॥ ३१७० ॥

कल्पतरूअंगीं इच्छिलें तें फळ । अभागी दुर्बळ भावें सिद्धी ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ द्वीपीं.

धन्य त्या जाती धन्य त्या जाती। नारायण चित्तीं सांटविला ॥ २ ॥ बीजाऐसा द्यावा उदकें अंकुर । गुणाचे प्रकार ज्याचे तया ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळे पारखिया हिरा । ओझें पाठी खरा चंदनाचें ॥ ४ ॥

॥ ३१७१ ॥

जळो अगी पडो खाण । नारायण भोगिता ॥ १ ॥ ऐसी ज्याची वदे वाणी । नारायणीं ते पावे ॥ २ ॥ भोजनकाळीं करितां धंदा। ह्मणा गोविंदा पावलें ॥३॥ तुका ह्मणे नलगे मोल। देवा बोल आवडती ॥४॥

॥ ३१७२ ॥

देईल तें उणें नाहीं। याचें कांहीं पदरीं ॥१॥ पाहिजे तें संचित आतां। येथें सत्ता करावया ॥ २ ॥ गुणां ऐसा भरणा भरी । जो जें विचारी तें लाभे ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवीं देव । फळे भाव आपुला ॥ ४ ॥

॥ ३१७३ ॥

नाहीं लोपों येत गुण । वेधी आणिकां चंदन ॥ १ ॥ न संगतां पडे ताळा । रूप दर्पणीं सकळां ॥ २ ॥ सारविलें वरी । आहाच ते क्षण-भरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वोहळें । सागराच्या ऐसें व्हावें ॥ ४ ॥

॥ ३१७४ ॥

कल्पतरूखालीं । फळें येती मागीतलीं ॥१॥ येथें बैसल्याचा भाव । विचारूनि बोले ठाव ॥ २ ॥ द्यावें हें उत्तर । येतो प्रतित्याचा फेर ॥ ३ ॥ तुका ह्मणे मनीं । आपुलियाचि लाभहानि ॥ ४ ॥

॥ ३१७५ ॥

चोराचिया धुडका मनीं। वसे ध्यानीं लंछन ॥१॥ ऐशा आह्मी करणें काय। वरसों न्यायें पर्जन्य ॥२॥ ज्याच्या वैसे खतावरी । ते चुरचुरी दुखवूनि ॥३॥ तुका ह्मणे ज्याची खोडी। त्याची जोडी त्या पीडी ॥४॥

॥ ३१७६ ॥

कुंभ अवघा एक आवा। पाकीं एकीं गुंफे डावा ॥ १ ॥ ऐसे भिन्न

भिन्न साटे। केले प्रारब्धानें वांटे ॥२॥ हिरे दगड एक खाणी । कैचें विजातीळा पाणी ॥३॥ तुका ह्मणे शिरीं। एक एकाची पायरी ॥ ४ ॥

॥ ३१७७ ॥

भले ह्मणवितां संतांचे सेवक । आइत्याची भीक सुखरूप ॥ १ ॥ ठसावितां बहु लागती सायास । चुकल्या घडे नास अल्प वर्मे ॥ २ ॥ पाकसिद्धी लागे संचित आइतें । घडतां सोई तें तेव्हां गोड ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरे सांगतांचि गोष्टी । रणभूमि दृष्टी न पडे तों ॥ ४ ॥

॥ ३१७८ ॥

येथील हा ठसा । गेला पडोनियां ऐसा ॥ १ ॥ घरीं देवाचे अ-बोला । त्यासि तेचि सवे त्याला ॥ २ ॥ नाहीं पाहावें लागत । एका-एकींच तें रितें ॥३॥ तुका ह्मणे जन । तयामध्यें येवढें भिन्न ॥ ४ ॥

॥ ३१७९ ॥

एकांचीं उत्तरें । गोड अमृत मधुरें ॥ १ ॥ ऐशा देवाच्या विभूती । भिन्न प्रारब्धाची गती ॥ २ ॥ एकांचीं वचनें । कडू अत्यंत तीक्ष्णें ॥ ३ ॥ प्रकाराचें तीन । तुका ह्मणे केलें जन ॥ ४ ॥

॥ ३१८० ॥

सांटविला वाण । पैस घातला दुकान ॥ १ ॥ जें ज्या पाहिजे जे काळीं । आहे सिद्धचि जवळी ॥२॥ निवडिलें साचें । उत्तममध्यम-कनिष्ठाचें ॥३॥ तुका बैसला दुकानीं । दावी मोला ऐसी वाणी ॥४॥

॥ ३१८१ ॥

घातला दुकान । पढीये तैसा आहे वान ॥ १ ॥ आह्मी भांडारी देवाचे । द्यावें घ्यावें माप वाचे ॥ २ ॥ उगवूं जाणे मोडी । जाली नव्हे त्याची जोडी ॥३॥ तुका ह्मणे पुडी। मोला तैसी खरी कुडी ॥४॥

॥ ३१८२ ॥

भोंवंडीसरिसें । अवघें भोंवताचि दिसे ॥१॥ ठायीं राहिल्या निश्चळ।

आहे अचळीं अचळ ॥२॥ एक हाकेचा कपाटीं । तेथें आणीक नाद उठी ॥ ३ ॥ अभ्रें धांवे शशी । तुका ह्मणे दुसरें भासी ॥ ४ ॥

॥ ३१८३ ॥

राजा चाले तेथें वैभव सांगातें । हें काय लागतें सांगावें त्या ॥ १ ॥
कोणी कोणा येथें न मनी जी फुका । कृपेविण एका देवाचिया ॥२॥
शृंगारिलें नाहीं तगों येत वरि । उमटे लौकरि जैसें तैसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे घरीं वसे नारायण । कृपेचि ते खूण साम्या येते ॥ ४ ॥

॥ ३१८४ ॥

मोहोऱ्याच्या संगें । सुत नव्हे आगीजोगें ॥ १ ॥ नाहीं तरी त्याचें भक्ष । काय सांगणें ते साक्ष ॥ २ ॥ स्वामीचिया अंगें । रूप नव्हे कोणाजोगें ॥ ३ ॥ तुका ह्मणे खोडी । देवमनी न देती दडी ॥४॥

॥ ३१८५ ॥

महुरा ऐसीं फळें नाहीं । आलीं कांहीं गळती ॥ १ ॥ पक्कदशे येती थोडीं । नास आढी वेंचे तों ॥२॥ विरुळा पावे विरुळा पावे । अवघड गोवे सेवटाचे॥३॥उंच निंच परिवार देवी । धन्या ठावी चाकरी ॥४॥ झळके तेथें पावे आणी । ऐसे क्षणीं बहु थोडे ॥ ५ ॥ पावेल तो पैल थडी । ह्मणों गडी आपुला ॥६॥ तुका ह्मणे उभाऱ्यानें । कोण खरें मानितसे ॥७॥

॥ ३१८६ ॥

धन्य शुद्ध जाती । धरीं लौकरी परती ॥ १ ॥ ऐकिलें तेंचि कानीं । होय परिपाक मनीं ॥ २ ॥ कळवळा पोटीं । सावधान हितासाटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव । ज्याचा तोचि जाणा देव ॥ ४ ॥

॥ ३१८७ ॥

आणिकांसी तारी ऐसा नाहीं कोणी । धड तें नासोनि भलता टाकी ॥१॥
सोनें शुद्ध होतें अविट तें घरीं । नासिलें सोनारीं अळंकारीं ॥२॥
ओल शुद्ध काळी काळें जिरें बीज । कैंचें लागे निज हातीं तेथें ॥३॥

एक गहू करिती अनेक प्रकार । सांजा दिवसीं क्षीर घुगरिया ॥ ४ ॥
तुका ह्मणे विषा रुचि एका हातीं । पाधानी नासिती नवनीत ॥ ५ ॥

॥ ३१८८ ॥

दधिमाजीं लोणी जाणती सकळ । तें काढी निराळें जाणे मथन ॥१॥
अग्नि काष्टामाजी ऐसें जाणे जन । मथिलियाविण कैसा जाळी ॥ २ ॥
तुका ह्मणे मुख मळीण दर्पणीं । उजळिल्यावांचूनि कैसें भासे ॥ ३ ॥

॥ ३१८९ ॥

आपुल्याचा भोत चाटी । मारी करंटी पारख्यां ॥१॥ ऐसें जन भुललें देवा । मिथ्या हेवा वाढवी ॥२॥ गळ गिळी आमिषें मासा । प्राण आशा घेतला ॥३॥ तुका ह्मणे बोकडमोहो । धरी पहाहो खाटिक ॥४॥

॥ ३१९० ॥

विषय तो मरणसंगीं । नेणे सुटिका अभागी ॥ १ ॥ शास्त्राचा केला लुंडा । तोंडीं पाडियेला धोंडा ॥ २ ॥ अगदीं मोक्ष नाहीं ठावा । काय सांगावें गाढवा ॥३॥ तुका ह्मणे ग्यानगड । सुखें पावो देवा नाड ॥४॥

॥ ३१९१ ॥

उकरडा आधीं अंगीं नरकाडी । जातीची ते जोडी तेचि चित्तीं ॥१॥
कासयानें देखे अंधळें माणिकें । चवीविण फिके वांयां जाय ॥ २ ॥
काय जाणे विष पालटों उपचारें । मुखासी अंतर तोंचि बरें ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय उपदेश वेड्या । संगें होतो रेड्यासवें कष्ट ॥ ४ ॥

॥ ३१९२ ॥

विंचा पीडी नांगी । ज्याचा दोष त्याचे अंगीं ॥ १ ॥ केला पाहिजे विचार । मन मित्र दावेदार ॥ २ ॥ मधुरा उत्तरीं । रांवा खेळे उरावरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे रेडा । सुखें जाती ऐशा पीडा ॥ ४ ॥

॥ ३१९३ ॥

मुळीं नेणपण । जाला तरी अभिमान ॥१॥ वांयां जावें हेंचि खरें ।

केलें तेणेंचि प्रकारें ॥ २ ॥ अराणूक नाहीं कधीं । जाली तरि भेद-
बुद्धि ॥ ३ ॥ अंतरली नाव । तुका ह्मणे नाहीं ठाव ॥ ४ ॥

॥ ३१९४ ॥

प्रायश्चित्तें देतो तुका । जातो लोकां सकळां ॥१॥ धरितील ते तरती
मनीं । जाती घाणी वांयां त्या ॥ २ ॥ निग्रहअनुग्रहाचे ठाय । देतो
घाय पाहोनि ॥३॥ तुका जाला नरसिंहीं । भय नाहीं कृपेनें ॥ ४ ॥

॥ ३१९५ ॥

वेचावें तें जीवें । पूजा घडे ऐशा नांवें ॥ १ ॥ विगारीची ते बि-
गारी । साक्षी अंतरींचा हरी ॥ २ ॥ फळ बीजा ऐसें । कार्यकारणा-
सारिसें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मान । लवणासारिखें लवण ॥ ४ ॥

॥ ३१९६ ॥

बारा वर्षें बाळपण । तेंही वेचलें अज्ञानें ॥ १ ॥ ऐसा जन्म गेला
वांयां । न भजतां पंढरिराया ॥ २ ॥ बाकी उरलीं आठ्यांशीं[1] । तीस
वेचलीं कामासी ॥ ३ ॥ बाकी उरलीं आठावन्न । तीस वेचलीं मम-
तेनें ॥ ४ ॥ बाकी उरलीं आठावीस । देहगेह विसरलास ॥ ५ ॥
तुका ह्मणे ऐसा झाडा । संसार हा आहे थोडा ॥ ६ ॥

॥ ३१९७ ॥

बाळपणें ऐसीं वरुषें गेलीं बारा । खेळतां या पोरा नानामतें ॥ १ ॥
विटू दांडू चेंडू लगोऱ्या वाघोडीं । चंपे पेंड घेडी[2] एकीबेकी ॥ २ ॥
हमामा हुंबरी पकव्याच्या बारे । खेळे जंगीभोंवरे चुंबाचुंबी ॥ ३ ॥
सेलडेरा आणि निसरभोंवडी । उचली बाले धोंडी अंगबळें ॥ ४ ॥
तुका ह्मणे ऐसें बाळपण गेलें । मग तारुण्य आलें गर्वमूळ ॥ ५ ॥

---

पाठभेदः—१ आठ्यायशीं. २ खडी.

॥ ३१९८ ॥

तारुण्याच्या मदें न मनी कोणासी । सदा मुसमुसी घुळी जैसा ॥१॥
अटोनी वेठोनी बांधला मुंडासा । फिरतसे ह्मैसा जनामधीं ॥ २ ॥
हातीं दीडपान वरती करी* मान । नाहीं तो सन्मान भलियांसी ॥३॥
श्वानाचिया परी हिंडे दारोदारीं । पाहे परनारी पापदृष्टी ॥ ४ ॥
तुका ह्मणे ऐसी[1] थोर हान जाली । करितां टवाळी जन्म गेला ॥ ५ ॥

॥ ३१९९ ॥

ह्मातारपणीं थेटे पडसें खोकला । हात कपाळाला लावुनि बैसे ॥ १ ॥
खोबरीयाची वाटी जालें असें मुख । गळतसे नाक श्लेष्मपुरी ॥ २ ॥
बोलों जातां शब्द नयेचि हा नीट । गडगडी कंठ कफ भारी ॥ ३ ॥
सेजारी ह्मणती मरेना कां मेला । आणिला कांटाळा येणें आह्मां ॥४॥
तुका ह्मणे आतां सांडुनी[2] द्या काम । स्मरा राम राम क्षणक्षणा ॥५॥

॥ ३२०० ॥

वृद्धपणीं आली जरा । शरीर कांपे थरथरा ॥ १ ॥ आयुष्य गेलें हें कळेना । स्मरा वेगीं पंढरिराणा ॥ २ ॥ दांत दाढा पडिल्या ओस । हनुवटि भेटे नाकास ॥३॥ हात पाय राहिले कान । नेत्रा पाझर हाले मान ॥४॥ अंगकांति परतली । चिरगुटा ऐसी जाली ॥५॥ आड पडे जिव्हा लोटे । शब्द नये मुखा वाटे ॥६॥ लांब लोंबताती अंड । भरभरा वाजे गांड ॥७॥ तुका ह्मणे आतां तरी । स्मरा वेंगी हरी हरी ॥ ८ ॥

॥ ३२०१ ॥

वृद्धपणीं न पुसे कोणी । विटंबणी देहाची ॥ १ ॥ नवद्वारें जाली मोकळीक । गांड सरली वाजती ॥२॥ दंत दाढा गळे थुंका । लागे नाका हनुवटी ॥ ३ ॥ शब्द नये मुखावाटा । करिती चेष्टा पोरें तीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे अजून तरि । स्मरें श्रीहरी सोडवील ॥ ५ ॥

---

पाठभेदः—* च. १ ऐसा थोर हा गयाळी ॥ २ सांडुनियां.

॥ ३२०२ ॥

ओले मातीचा भरवसा। कां रे धरिशी मानसा ॥१॥ डोळे चिरीव चांगले। वृद्धपणीं सरक्या झाले ॥ २ ॥ नाक सरळ चांगलें। येउन हनवटीं लागलें ॥३॥ तुका ह्मणे आलें नाहीं। तंव हरिला भज रे कांहीं ॥४॥

॥ ३२०३ ॥

बहु टाळाटाळी। होतां भोवताहे काळी ॥ १ ॥ बरें नव्हेल सेवटीं। भय असों द्यावें पोटीं ॥ २ ॥ मुरगोळीतां[1] कान। घुसमांडील सावधान ॥ ३ ॥ अबोलणा तुका। ऐसें कोणी लेखूं नका ॥ ४ ॥

॥ ३२०४ ॥

देवावरी भार। वृत्ति अयाचित सार ॥ १ ॥ देह देवाचे सांभाळी। सार योजे यथाकाळीं ॥ २ ॥ विश्वासी निर्धार। विस्तारील विश्वंभर ॥ ३ ॥ तुका ह्मणे व्हावें। बळ एकचि जाणावें ॥ ४ ॥

॥ ३२०५ ॥

वाघें उपदेशिला कोल्हा। सुखें खावों द्यावें मला ॥१॥ अंतीं मरसी त न चुके। मज कां मारितोसी भुकें ॥ २ ॥ येरू ह्मणे भला भला। निवाड तुझ्या तोंडें जाला ॥ ३ ॥ देह तों जाणार। घडेल हा परउपकार[2] ॥४॥ येरू ह्मणे मनीं। ऐसें जावें समजोनि ॥ ५ ॥ गांठीं पडली ठकाठका। त्याचें वर्म बोले तुका ॥ ६ ॥

॥ ३२०६ ॥

दुधाळ गाढवी जरी जाली पाहे। पावेल ते काय धेनुसरी ॥ १ ॥ कागाचिया गळा पुष्पाचिया माळा। हंसाची तो कळा काय जाणें॥२॥ मर्कटें अंघोळी लावियेले टिळे। ब्राह्मणांचे लीळे वर्तू नेणे ॥ ३ ॥ जरी तो ब्राह्मण जाला कर्मभ्रष्ट। तुका ह्मणे श्रेष्ठ तिहीं लोकीं ॥४॥

---

पाठभेदः—१ मुरगाळी. २ उपकार.

॥ ३२०७ ॥

भक्तिप्रेमसुख नेणवे आणिकां । पंडित वाचकां ज्ञानियांसी ॥ १ ॥
आत्मनिष्ठ जरी जाले जीवन्मुक्त । तरी भक्तिसुख दुर्लभ त्यां ॥ २ ॥
तुका ह्मणे कृपा करिल नारायण । तरिच हें वर्म पडे ठायीं ॥ ३ ॥

॥ ३२०८ ॥

भल्याचें दर्शन । तेथें शुभाचि वचन ॥ १ ॥ बोलावी हे धर्मनीत ।
क्षोभें होत नाहीं हित ॥ २ ॥ मर्यादा ते बरी । वेळ जाणावी च-
तुरीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे बहु । लांगे ऐसें बरें मऊ ॥ ४ ॥

॥ ३२०९ ॥

बसतां चोरापाशीं तैसी होय बुद्धि । देखतांचि चिंधी मन धांवे ॥ १ ॥
व्यभिचाऱ्यापासीं बैसतां क्षणभरी । देखतांचि नारी मन धांवे ॥ २ ॥
प्रपंचाचा छंद टाकुनियां गोवा । धरावें केशवा हृदयांत ॥ ३ ॥
सांडुनियां देई संसाराची बेडी । कीर्तनाची गोडी धरावी गा ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुला सांगतों मी एक । रुक्मिणीनायक [illegible] गावा ॥५॥

॥ ३२१० ॥

शिकवणेसाटीं वाटते तळमळ । पुढें येईल काळ फोडों डोई ॥ १ ॥
तेव्हां त्यासी काय देशील उत्तर । मेळउनी अंतर ठेवितोसी ॥ २ ॥
येथींचिया सोंगें भोरपियाचे परी । होईल तें दुरी शृंगारिलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे कां रे राखिलें खरकटें । रागेल्याचे तंट रागेलें का ॥ ४ ॥

॥ ३२११ ॥

समर्थाचे सेवे बहु असे हित । विचार हृदयांत करूनी पाहें ॥ १ ॥
वरकडा ऐसा नव्हे हा समर्थ । क्षणेंचि घडित सृष्टि नासे ॥ २ ॥
ज्याची कृपा होतां आपणा ऐसें करी । उरों नेदी उरी दारिद्राची ॥३॥

---

पाठभेदः—१ लाग.

ऐशालागीं मन वोळगे अहर्निशीं । तेणें वंद्य होशी ब्रह्मादिकां ॥ ४ ॥
तुका ह्मणे हेंचि आहे पैं मुद्दल । सत्य माझा बोल हाचि माना ॥५॥
॥ ३२१२ ॥
सकळ हे माया नागवे कवणा । भांबाविलें जना दाही दिशा ॥ १ ॥
आशा तृष्णा दंभ लागलीं हीं पाठीं । नेदी बैसों हाटीं मोह ठायीं ॥ २ ॥
काम क्रोध घरा लावितील आगी । निंदा हिंसा दोघी पळतां खाती ॥३ ॥
लाज पुढें उभी राहिली आडवी । ते करी गाढवी थोर घात ॥ ४ ॥
तुका ह्मणे चिंता घाली गर्भवासीं । ओढोनियां पाशीं चहूंकडे ॥ ५ ॥
॥ ३२१३ ॥
बरें जालीयाचे अवघे सांगाती । वाइटाचे अंतीं कोणी नाहीं ॥ १ ॥
नोहे मातापिता नोहे कांतासुत । इतरांची मात काय सांगों ॥ २ ॥
तुका ह्मणे जन दुतोंडी सावज । सांपडे सहज तिकडे धरी ॥ ३ ॥
॥ ३२१४ ॥
यमाचे हे पाश नाटोपती कोणातें । आह्मां दिनानाथें रक्षियेलें ॥१॥
यम नेतां तुह्मां रक्षील हें कोण । तुह्मां धन्यधन्य कोण ह्मणती ॥२॥
संतसज्जनमेळा पवित्र संतकीर्ति । त्यांनीं उत्तम स्थिति सांगितली ॥३॥
तेंचि धरोनि चित्तीं तुका हित करी । यमासी पांपरी हाणे आतां ॥४॥
॥ ३२१५ ॥
भरणी आली मुक्त पेठा । करा लाटा व्यापार ॥ १ ॥ उधार घ्या रे उधार घ्या रे । अवघे या रे जातीचे ॥ २ ॥ येथें पंक्तिभेद नाहीं । मोठें कांहीं लहान ॥३॥ तुका ह्मणे लाभ घ्यावा । मुद्दल भावा जतन ॥ ४ ॥
॥ ३२१६ ॥
आजि नव्हे कालिच्या ऐसें । अनारिसें पालटे ॥ १ ॥ आतां लागवेग करा । ज्याचें धरा ठाकें तें ॥२॥ नका सांगों वाउग्या गोष्टी । चाहुल खोटी ये ठायीं ॥३॥ तुका ह्मणे मोडा माग । आपल्या लाग करूनी ॥४॥

तेणें माझें चित्त होय समाधान । विलास मिष्टान्न नलगे सोनें ॥ २ ॥
व्रत एकादशी द्वारीं वृंदावन । कंठीं त्यारे लेणें तुळसीमाळा ॥ ३ ॥
तुका ह्मणे त्याचे घरींची उष्टावळी । मज ते दिवाळी दसरा सण ॥ ४ ॥

॥ ३२२८ ॥

आपणा लागे काम वाण्याघरीं गुळ । त्याचें यातिकुळ काय कीजे ॥ १ ॥
उकरड्यावरी वाढली तुळसी । टाकावी ते कैसी ठायागुणें ॥ २ ॥
गाईचा जो भक्ष अमंगळ खाय । तिचें दूध काय सेवूं नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय सलपटासी काज । फणसांतील बीज काढुनि घ्यावें ॥ ४ ॥

॥ ३२२९ ॥

तीर्थांचिये पंथें चाले तो निदैव । पाविजे तो ठाव अंतराय ॥ १ ॥
ह्मणऊनि भलें निश्चळचि स्थळीं । मनाचिये मुळीं बैसोनियां ॥ २ ॥
संकल्पारूढ तें पराधीन जिणें । कार्याचि कारणें वाढतसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे कामा नाहीं एक मुख । जिरवितां सुख होतें पोटीं ॥ ४ ॥

॥ ३२३० ॥

अहंकार तो नासा भेद । जगीं निंद्य ओंवळा ॥ १ ॥ नातळे तो धन्य त्यासी । जाला वंशीं दीपक ॥ २ ॥ करवितो आत्महत्या । नेदी सत्या आतळों ॥ ३ ॥ तुका ह्मणे गुरुगुरी । माथां थोरी धरोनि ॥ ४ ॥

॥ ३२३१ ॥

पाडावी ते बरी । गांठी धुरेसवें खरी ॥ १ ॥ नये मरों लंडीपणें । काय बापुडें तें जिणें ॥ २ ॥ लुटावें भांडार । तरी जया नाहीं पार ॥ ३ ॥ तुका ह्मणे नांवें । कीर्ती आगळीनें ज्यावें ॥ ४ ॥

॥ ३२३२ ॥

भजनेंचि जालें । मग जीवाचें काय आलें ॥ १ ॥ येऊं नेदावी पुढती

पाठभेदः—१ आह्मां.

आड भयाची ते जाती ॥ २ ॥ करितां सरोबरी । कांहीं न ठेवावी उरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे शूर । व्हावे धुरेसींच धूर ॥ ४ ॥

॥ ३२३३ ॥

भूक पोटापुरती । तृष्णा भरवी वाखती । करवी फजीती । हावें भार वाढला ॥ १ ॥ कुळिकेसी लांस फांस । डोई दाढी बोडवी दोष । अविहित नाश । करवी वचन चुकतां ॥ २ ॥ विधिसेवनें विहितें । कार्यकारणापुरतें । न वाटे जो चित्तें । अधर्माच्या तो त्यागी ॥ ३ ॥ आज्ञा पाळणें ते सेवा । भय धरोनियां जीवा । तुका ह्मणे ठेवा । ठेविला तो जतन ॥ ४ ॥

॥ ३२३४ ॥

आवडीची सलगी पूजा । विषम दुजा भाव तो ॥ १ ॥ ऐसीं उफराटीं वर्मे । कळों भ्रमें न येती ॥२॥ नलगे समाधान मोल । रुचती बोल प्रीतीचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे एका जीवें । सूत्र व्हावें गुंतलें ॥ ४ ॥

॥ ३२३५ ॥

शिजल्यावरी जाळ । वांयां जायाचें तें मूळ ॥ १ ॥ ऐसा वारावा तो श्रम । अतिशयीं नाहीं काम ॥ २ ॥ सांभाळावें वर्म । उचिताच्या काळें धर्म ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळे । ऐसें कारणाचे वेळे ॥ ४ ॥

॥ ३२३६ ॥

उभा ऐल थडी । तेणें घालूं नये उडी ॥ १ ॥ पुढें गेल्याचे उपाय । करावे ते केले काय ॥ २ ॥ दिसतें आहारीं । नये जाऊं ऐशावरी ॥ ३ ॥ आळसाची धाडी । तुका ह्मणे बहु नाडी ॥ ४ ॥

॥ ३२३७ ॥

काय करूं सांगतांही न कळे वर्म । उपस्थित भ्रम उपजवितो ॥ १ ॥ मन आधीं ज्याचें आलें होइल हातां । तयावरी सत्ता केली चाले ॥२॥

अभुकेचे अंगीं चवी ना सवाद । मिथ्या ऐसा वाद दुराग्रह ॥ ३ ॥
तुका ह्मणे आप राखावें आपणा। संकोचोंचि कोणा नये आतां ॥ ४ ॥

॥ ३२३८ ॥

मुख्य आधीं विषयत्याग। विधिभाग पाळणें ॥ १ ॥ मन पावे समाधान
हेंचि दान देवाचें ॥२॥ उदासीन वृत्ति देहीं। चाड नाहीं पाळणें ॥३॥
तुका ह्मणे नाहीं भय । सम सोय विषमाची ॥ ४ ॥

॥ ३२३९ ॥

हेंचि सार हेंचि सार । मूळबीज रे आइका ॥ १ ॥ आवडीनें आवडी
उरे । जें ज्या झुरे तें त्यासी ॥ २ ॥ प्रेमाचिया सूत्र दोरी। नाहीं उरी
उरवी ॥ ३ ॥ तुका ह्मणे चिंतन बरें । आहे खरें खऱ्यापें ॥ ४ ॥

॥ ३२४० ॥

मायबाप सर्वे नये धनवित्त। करावें संचित भोगावें तें ॥ १ ॥
म्हणऊनि लाभ काय तो विचारीं। नको चालीवरी चित्त ठेवूं ॥ २ ॥
आयुष्य सेवटीं सांडूनि जाणार । नव्हेचि साचार शरीर हें ॥ ३ ॥
तुका ह्मणे काळें लावियेलें माप । जमा धरी पापपुण्याची हे ॥ ४ ॥

॥ ३२४१ ॥

कैसा होतो कृपावंत । बहुसंत सांगती ॥ १ ॥ पुसणें नाहीं याती कूळ ।
लागों वेळ नेदावी ॥२॥ ऐसी काय जाणों किती। उतरती उतरले ॥३॥
दावी वैकुंठींच्या वाटा । पाहातां मोठा संपन्न ॥४॥ अभिमान तो नाहीं
अंगीं । भक्तालागीं न बैसे ॥ ५ ॥ तुका ह्मणे आळस निद्रा । नाहीं
थारा त्या अंगीं ॥६॥ आलें द्यावें भलत्या काळे। विठ्ठल बळें आगळा ॥७॥

॥ ३२४२ ॥

हित नाहीं ठावें जननीजनका । दाविला लौकिकाचार तिंहीं ॥ १ ॥
अंधळ्याचे काठी लागले अंधळें । घात एका वेळे पुढेंमागें ॥ २ ॥

न धरावी चाली करावा विचार । वरील आहार गळीं लावी ॥ ३ ॥
तुका ह्मणे केला निवाडा रोकडा । राउत हा घोडा हातोहातीं ॥ ४ ॥

॥ ३२४३ ॥

यासी कोणी ह्मणे निंदेचीं उत्तरें । नागवला खरें तोचि एक ॥ १ ॥
आड वाटे जातां लावी नीट सोई । धर्मनीत तेही ऐसी आहे ॥ २ ॥
नाइकतां सुखें करावें ताडण । पाप नाहीं पुण्य असे फार ॥ ३ ॥
जन्म व्याधि फार चुकतील दुःखें । खंडावा हा सुखें मान त्याचा ॥४॥
तुका ह्मणे निंब दिलियावांचून । अंतरींचा सीण केंवी जाय ॥ ५ ॥

॥ ३२४४ ॥

निवडे जेवण सेवटींच्या घांसें । होय त्याच्या ऐसे सकळही ॥ १ ॥
न पाहिजे जाला बुद्धीचा पालट । केली खटपट जाय वांयां ॥ २ ॥
संपादिलें होयें धरिलें तें सोंग । विटंबणा व्यंग पडिलिया ॥ ३ ॥
तुका ह्मणे वर्म नेणतां जो रांधी । पाववी ते बुद्धि अवकळा ॥ ४ ॥

॥ ३२४५ ॥

फटकाळ देव्हारा फटकाळ अंगारा । फटकाळ विचारा चालविलें ॥ १ ॥
फटकाळ तो देव फटकाळ तो भक्त । करवितो घात आणिकां जीवा ॥२॥
तुका ह्मणे अवघें फटकाळ हें जन । अनुभवी खूण जाणतील ॥ ३ ॥

॥ ३२४६ ॥

देहबुद्धि वसे जयाचिये अंगीं । पूज्यता ते जगीं सुख मानी ॥ १ ॥
थोर असे दगा जाला त्यासी हाटीं । सोडोनियां गांठी चोरीं नेली ॥ २ ॥
गांठीचे जाऊनि नव्हे तो मोकळा । बांधवीला गळा दंभलोभें ॥ ३ ॥
पुढिल्या उदिमा जालेसें खंडण । दिसे नागवण पडे गांठी ॥ ४ ॥
तुका ह्मणे ऐसें बोलतील संत । जाणूनियां घात कोण करी ॥ ५ ॥

---

पाठभेदः—१ व्हावें.

॥ ३२४७ ॥

ढेंकणाचे संगें हिरा जो भंगला । कुसंगें नाडला तैसा साधु ॥ १ ॥
ओढाळाच्या संगें सात्विक नासलीं। क्षण एक नाडलीं समागमें ॥२॥
डांकाचे संगती सोनें हीन जालें । मोल तें तुटलें लक्ष कोडी ॥ ३ ॥
विषानें पक्वान्नें गोड कडू जालीं । कुसंगानें केली तैसी परी ॥ ४ ॥
भावें तुका ह्मणे सत्संग हा बरा । कुसंग हा फेरा चौऱ्याशीचा ॥५॥

॥ ३२४८ ॥

आग्रहा नांवें पाप योगीं सारावे संकल्प ॥ १ ॥ सहजा ऐसें भांडवल । असोनि कां सारा बोल ॥२॥ तें न भेटे ते काय। मना अंगींचे उपाय ॥ ३ ॥ तुका ह्मणे धरीं सोय । वासनेची फोडा डोय ॥ ४ ॥

॥ ३२४९ ॥

लागपाठ केला । आतां वाटा नित्य त्याला ॥ १ ॥ करा जोडीचा हव्यास । आले वुरील घरास ॥ २ ॥ फोडिलीं भांडारें । मोहोरलीं एकसरे ॥ ३ ॥ अवघियां पुरतें । तुका ह्मणे घ्यावें हातें ॥ ४ ॥

॥ ३२५० ॥

सरे आह्मांपाशीं एक शुद्धभाव । नाहीं तरी वाव उपचार ॥ १ ॥
कोण मानी वरी रसाळ बोलणें। नाहीं जाली मनें ओळखी तों ॥२॥
तुका ह्मणे आह्मां जाणिवेचें दुःख । न पाहों त्या मुख दुर्जनाचें॥३॥

॥ ३२५१ ॥

देवाच्या निरोपें पिटितों डांगोरा। लाजे नका थारा देऊं कोणी ॥१॥
मोडिलें या रांडे सुपंथ मारग । चालविलें जग यमपंथें ॥ २ ॥
परिचारीं केली आपुलीच रूढी । पोटींची ते कुडी ठावी नाहीं ॥३॥
तुका ह्मणे आणा राउळा धरून । फजित करून सोडूं मग ॥ ४ ॥

॥ ३२५२ ॥

कोरडिया ऐशा सारूनियां गोष्टी । करा उठाउठीं हित आधीं ॥ १ ॥

खोळंबला राहे आपुला मारग । पहावी ते मग तुटी कोठें ॥ २ ॥
लौकिकाचा आड येईल पसारा । मग येरझारा दुःख देती ॥ ३ ॥
तुका ह्मणे डांख लागे अळंकारें । मग नव्हे खरें पुटाविण ॥ ४ ॥

॥ ३२५३ ॥

काळाच सारिखीं वाहाती क्षेत्रें । करितां दुसरें फळ नाहीं ॥ १ ॥
ऐसें करत्यानें ठेविलें करून । भरिलें भरून माप नेमें ॥ २ ॥
शीतउष्णकाळीं मेघ वरुषावे । वरुषतां वाव होय शीण ॥ ३ ॥
तुका ह्मणे विष अमृताचे किडे । पालट न घडे जीणें तया ॥ ४ ॥

॥ ३२५४ ॥

प्रेम नये सांगतां बोलतां दावितां । अनुभव चित्ता चित्त जाणे ॥ १ ॥
कासवीचें बाळ वाढे कृपादृष्टी । दुधा नाहीं भेटी अंगसंगें ॥ २ ॥
पोटामध्यें कोणें सांगितलें सर्पा । उपजत लपा ह्मणऊनि ॥ ३ ॥
बोलों नेणें परी जाणे गोड क्षार । अंतरीं विचार त्यासी ठावा ॥ ४ ॥
तुका ह्मणे बरें विचारावें मनीं । आणिक भल्यांनीं पुसों नये ॥ ५ ॥

॥ ३२५५ ॥

क्षोभ आणि कृपा मातेची समान । विभाग जतन करूनि ठेवी ॥ १ ॥
क्षणभंगुर ते उपजली चिंता । खरी अखंडता आवडीची ॥ २ ॥
सिकवूं जाणे ते गोमटियासाटीं । लोभें नाहीं तुटी निश्चयेंसी ॥ ३ ॥
अवघेंचि मिथ्या समया आरतें । देतां तो उचितें काळ जाणे ॥ ४ ॥
न करी वेव्हार नेदी गांजूं कोणा । भेडसावी तान्हें हाऊ आला ॥५॥
तुका ह्मणे करी जिवाची जतन । दचकूनि मन जवळी आणी ॥६॥

॥ ३२५६ ॥

राहिलों निराळा । पाहों कवतुक डोळां ॥ १ ॥ करूं जगाचा वि-
नोद । डोळां पाहोनियां छंद ॥ २ ॥ भुललिया संसारें । आलें डो-
ळ्यासी माजिरें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माथा । कोणी नुचली सर्वथा ॥ ४ ॥

॥ ३२५७ ॥

जीवें व्हावें साटीं । पडे संवसारें तुटी ॥ १ ॥ ऐशीं बोलिलों वचनें । सर्वें घेउनी नारायणें* ॥ २ ॥ [1]येणें नाहीं जाणें । केलें कोणा न मागणें ॥ ३ ॥ नाहीं जन्मा आलों । करील ऐसें नेदीं बोलों ॥ ४ ॥ ठाव पुसी सेणें । तुका ह्मणे खुंटों येणें ॥ ५ ॥

॥ ३२५८ ॥

तडामोडी करा । परि उत्तम तें भरा ॥ १ ॥ जेणें खंडे एके खेपे । जाय तेथें लाभे वोपे ॥ २ ॥ दाविल्या सारिखें । मागें नसावें पारिखें। ॥ ३ ॥ मागें पुढें ऋण । तुका ह्मणे फिटे हीण ॥ ४ ॥

॥ ३२५९ ॥

उपेक्षिला येणें कोणी शरणागत । ऐसी नाहीं मात आईकिली ॥ १ ॥ आतां काय ब्रीद सांडील आपुलें । ठायींचें धरिलें जाणोनियां ॥ २ ॥ माझ्या दोषासाटीं होईल पाटमोरा । ऐसा कोण पुरा भोग बळी ॥३॥ तुका ह्मणे रूप आमुच्या कैवारें । धरिलें गोजिरें चतुर्भुज ॥ ४ ॥

॥ ३२६० ॥

सुखें न मनी अवगुण । दुःख भोगी त्याचें कोण ॥१॥ हें कां ठायींचें न कळे । राती करा झांकुनि डोळे ॥२॥ चालोनि आड वाटे । पायीं मोडविले कांटे ॥३॥ तुका ह्मणे कोणा । बोल ठेवितो शहाणा ॥४॥

॥ ३२६१ ॥

उगविल्या गुंती । ऐशा मागें नेणों किती ॥१॥ ख्याती केली अजामेळें । होतें निघालें दिवाळें ॥२॥ मोकलिला प्रायश्चित्तीं । कोणी न धरिती हातीं ॥३॥ तुका ह्मणे मुक्त वाट । वैकुंठींची घडघडाट ॥४॥

॥ ३२६२ ॥

गोड नांवें क्षीर । परी साकरेचा धीर ॥ १ ॥ तैसें जाणा ब्रह्मज्ञान । बापुडें तें

---

पाठभेदः—* नारायण. १ हा चरण कांहीं प्रतींत नाहीं.

भक्तीविण॥२॥रुची नेदी अन्न। ज्यांत नसतां लवण॥३॥अंधळ्याचे श्रम। शिकविल्याचेंचि नाम॥४॥तुका ह्मणे तारा। नाव तंबुऱ्याच्या सारा॥५॥

॥ ३२६३ ॥

कोठें नाहीं अधिकार। गेले नर वांयां ते ॥१॥ ऐका हें सोपें वर्म। नलगे श्रम चिंतना ॥ २ ॥ मृत्याचिये अंगीं छाये। उपायेचि खुंटतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे अवघे जन। येथें मन असों द्या ॥ ४ ॥

॥ ३२६४ ॥

आर्तभूतांप्रति। उत्तम योजाव्या त्या शक्ति ॥ १ ॥ फळ आणि समाधान। तेथें उत्तम कारण ॥ २ ॥ अल्पें तो संतोषी। स्थळीं सांपडे उदेसीं ॥ ३ ॥ सहज संगम। तुका ह्मणे तो उत्तम ॥ ४ ॥

॥ ३२६५ ॥

कीर्तनाची गोडी। देव निवडी आपण ॥ १ ॥ कोणी व्हारे अधिकारी। त्यासी हरि देईल ॥ २ ॥ वैराग्याचे बळ। साही खळ जिणावे ॥ ३ ॥ उरेल ना उरी। तुका करी बोभाट ॥ ४ ॥

॥ ३२६६ ॥

चालावा पंथ तो पाविजे त्या ठाया। ऐकिल्या वांयां वारता त्या ॥१॥
ऐका जी वोजे पडतसें पायां। भावाचि तें जाया वाट नव्हे ॥२॥
व्याली कुमारीचा अनुभवें अनुभव। सांगतां तो भाव येत नाहीं॥३॥
तुका ह्मणे येथें पाहिजे आरालें। बिंब निवळलें तरि भासे ॥ ४ ॥

॥ ३२६७ ॥

गावे ह्मणउनि गीत। धरुनि राहे तैसें चित्त॥१॥ हेंचि थोर अवघड आहे। अन्न देखोनि भूक राहे ॥ २ ॥ ऐकावी म्हूण कथा। राहे तैसें धरुनि चित्ता ॥ ३ ॥ तुका ह्मणे धणी। नव्हे जेविल्यावांचुनी ॥ ४ ॥

॥ ३२६८ ॥

गंगेचिया अंताविण काय चाड। आपुलें तें कोड तृषेपाशीं ॥ १ ॥

विठ्ठल हे मूर्ति साजिरी सुंदर। घालूं निरंतर हृदयपुटीं ॥ २ ॥
कारण तें असे नवनीतापाशीं। गाव्राळ तें सोसी येर कोण ॥ ३ ॥
बाळाचे सोईतें घांस घाली माता। अट्टाहास चिंता नाहीं तया ॥४॥
गाऊं नाचों करूं आनंदसोहळा। भावचि वेगळा नाहीं हातां ॥ ५ ॥
तुका ह्मणे अवघें जालें एकमय। परलोकींची काय चाड आतां ॥६॥

॥ ३२६९ ॥

चिंतिलें तें मनिंचें जाणे। पुरवी खुणे अंतरींचें ॥ १ ॥ रात्री न कळे दिवस न कळे। अंगीं खेळे दैवत हें॥२॥नवसियाचे पुरे[1] नवस। भोगी त्यास भिन्न नाहीं॥३॥तुका ह्मणे समचि देणें। समचरण उभा असे ॥४॥

॥ ३२७० ॥

लागलिया मुख स्तनां। घाली पान्हा माउली ॥ १ ॥ उभयतां आवडी लाडें। कोडें कोड पुरतसे ॥ २ ॥ मेळवितां अंगें अंग। प्रेमें रंग वाढतो ॥३॥ तुका ह्मणे जड भारी। अवघें शिरीं जननीचे॥४॥

॥ ३२७१ ॥

पाठीं पोटीं देव। कैंचा हरिदासां भेव ॥ १ ॥ करा आनंदें कीर्तन। नका आशंकित मन ॥ २ ॥ एथें कोठें काळ। करील देवापाशीं बळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे धनी। सपुरता काय वाणी ॥ ४ ॥

॥ ३२७२ ॥

नये जरी कांहीं। तरी भलतेंचि वाही ॥ १ ॥ ह्मणविल्यां दास। कोणी न धरी वेठीस ॥ २ ॥ समर्थाच्या नांवें। भलतैसें विकावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे सत्ता। वरी असते बहुतां ॥ ४ ॥

॥ ३२७३ ॥

ज्याची खरी सेवा। त्याच्या भय काय जीवा ॥ १ ॥ करितां स्वामी-

---

पाठभेदः—१ नवरस.

सर्वें वाद । अधिक अधिक आनंद ॥ २ ॥ असावा तो धर्म । मग साहों जातें वर्म ॥ ३ ॥ वदे वाग्देवी । तुका विठ्ठली गौरवी ॥ ४ ॥

॥ ३२७४ ॥

भाव देवाचें उचित । भाव तोचि भगवंत ॥१॥ धन्यधन्य शुद्ध जाती । संदेह कैंचा तेथें चित्तीं ॥ २ ॥ बहुत बराडी । देव जवळी आवडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे हें रोकडें । लाभ अधिक रिचो खडें ॥ ४ ॥

॥ ३२७५ ॥

वळितें जें गाई । त्यासि फार लागे काई ॥१॥ निवे भावाचे उत्तरीं । भलते एके धणी वरी ॥ २ ॥ न लगती प्रकार । कांहीं मानाचा आदर ॥ ३ ॥ सांडी थोरपणा । तुका ह्मणे सर्वें दीना ॥ ४ ॥

॥ ३२७६ ॥

अवगुणांचे हातीं । आहे अवघी फजीती ॥१॥ नाहीं पात्रासवें चाड । प्रमाण तें फिकें गोड ॥ २ ॥ विष तांब्या वाटी । भरली लावूं नये होटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव । शुद्ध बरा सोंग वाव ॥ ४ ॥

॥ ३२७७ ॥

जैसें तैसें राहे देवाचें हें देणें । यत्न करितां तेणें काय नव्हे ॥ १ ॥ दासां कृपासिंधु नुपेक्षी सर्वथा । अंतरींची व्यथा कळे त्यासी ॥ २ ॥ मागों नेणें परी माय जाणे वर्म । बाळा नेदी श्रम पावों कांहीं ॥३॥ तुका ह्मणे मज अनुभव अंगें । वचन वाउगें मानेना हें ॥ ४ ॥

॥ ३२७८ ॥

नव्हती माझे बोल । अवघें करितो विठ्ठल ॥ १ ॥ कांहीं न धरावी खंती । हित होईल धरा चित्तीं ॥ २ ॥ खोटी ते अहंता । वाट टाकिली सांगतां ॥३॥ ज्याचें तोचि जाणे । मी मापाडें तुका ह्मणे ॥४॥

॥ ३२७९ ॥

ज्याचे गांवीं केला वास । त्यासी नसावें उदास ॥ १ ॥ तरीच जो-

डिलें तें भोगे । कांहीं आघात नलगे ॥ २ ॥ वाढवावी थोरी । मुखें ह्मणे तुझे हरी॥३॥तुका ह्मणे हे गोमटी। दासा न घालावी तुटी॥४॥

॥ ३२८० ॥

पोटीं जन्मती रोग । तरि कां ह्मणावे आप्तवर्ग ॥ १ ॥ रानीं वसती औषधी । तरि कां ह्मणाव्या निपराधी[1] ॥ २ ॥ तैसें शरीराचें नातें । तुका ह्मणे सर्व आप्तें ॥ ३ ॥

॥ ३२८१ ॥

गंधर्वनगरीं क्षण एक राहावें । तेंचि पैं करावें मूळक्षेत्र ॥ १ ॥ खपुष्पाची पूजा बांधोनि निर्गुणा । लक्ष्मीनारायणा तोषवावें ॥ २ ॥ वंध्यापुत्राचा लग्नाचा सोहळा । आपुलिया डोळां पाहों वेगीं ॥ ३ ॥ मृगजळा पोही घालूनि सज्ञाना । तापलिया जना निववावें ॥ ४ ॥ तुका ह्मणे मिथ्या देहेंद्रियकर्में । ब्रह्मार्पण ब्रह्म होय बापा ॥ ५ ॥

॥ ३२८२ ॥

पाण्या निघाली गुजरी । मन ठेविलें दो घागरीं ॥ चाले मोकळ्या पदरीं । परी लक्ष तेथें ॥१॥ वावडी उडाली अंबरीं । हातीं धरोनियां दोरी। दिसे दुरिच्या दुरी । परी लक्ष तेथें ॥२॥ चोर चोरी करी । ठेवी बनांतरीं। वर्ततसे चराचरीं। परी लक्ष तेथें ॥ ३ ॥ व्यभिचारिणी नारी। घराश्रम करी । परपुरुष जिव्हारीं । परी लक्ष तेथें ॥ ४ ॥ तुका ह्मणे असों। भलतिये व्यापारीं । लक्ष सर्वेश्वरीं । चुकों नेदी ॥ ५ ॥

॥ ३२८३ ॥

अर्थेंविण पाठांतर कासया करावें । व्यर्थचि मरावें घोकूनियां ॥ १ ॥ घोकूनियां काय वेगीं अर्थ पाहे । अर्थरूप राहे होऊनियां ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्याला अर्थीं आहे भेटी । नाहीं तरी गोष्टी बोलों नका ॥३॥

---

पाठभेदः—१ निरापराधि.

॥ ३२८४ ॥

बरवे दुकानीं बैसावें । श्रवण मनन असावें ॥ १ ॥ सारअसाराचीं पोतीं । ग्राहक पाहोनि करा रितीं ॥ २ ॥ उगेचि फुगवूं नका गाल । पूर्ण सांठवावा माल ॥ ३ ॥ सत्य तराजू पैं धरा । नका कृत्रिम वि-करा ॥४॥ तुका जाला वाणी । चुकवुनि चौऱ्यासीच्या खाणी ॥ ५ ॥

॥ ३२८५ ॥

गंगा न देखे विटाळ । तेंचि रांजणींही जळ ॥१॥ अल्प महदा नव्हे सरी । विटाळ तो भेद धरी ॥ २ ॥ काय खंडिली भूमिका । वर्णा पाय-रिकां लोकां ॥ ३ ॥ तुका ह्मणे अगीविण । बीजें वेगळीं तो भिन्न ॥ ४ ॥

॥ ३२८६ ॥

अभिमानाची स्वामिनी शांती । महत्व घेती सकळ ॥ १ ॥ कळोनि हे न कळे वर्म । तरि श्रम पावती ॥२॥ सर्व सत्ता करितां धीर । वीर्या वीर्य आगळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे तिखट तिखें । मृदसखें आवडी ॥ ४ ॥

॥ ३२८७ ॥

ज्यानें ज्यानें जैसें द्यावें । तैसें व्हावें कृपाळें ॥ १ ॥ सगुणनिर्गुणांचा ठाव । विटे पाव धरियेले ॥ २ ॥ अवघें साकरेचें अंग । नये व्यंग निवडितां ॥ ३ ॥ तुका ह्मणे जें जें करी । तें तें हरी भोगिता ॥४॥

॥ ३२८८ ॥

चहूं आश्रमांचे धर्म । न राखतां जोडे कर्म ॥ १ ॥ तैसी नव्हे भोळी सेवा । एक भावचि कारण देवा ॥२॥ तपें इंद्रियां आघात । क्षणें एका वाताहात ॥ ३ ॥ मंत्र चळे थोडा । तरि धडचि होय वेडा ॥ ४ ॥ व्रतें करितां सांग । तरी एक चुकतां भंग ॥ ५ ॥ धर्म सत्वचि कारण । नाहीं तरी केला सिण ॥ ६ ॥ भूतदयेसि आघात । वंचनीच वाताहात ॥ ७ ॥ तुका ह्मणे दुजें । विधिनिषेधाचें ओझें ॥ ८ ॥

॥ ३२८९ ॥

नव्हों वैद्य आह्मी अर्थाचे भुकेले । भलते द्यावे पाले भलत्यासी ॥१॥
कुपथ्य करूनि विटंबावे रोगी । काय हे सलगी भीड त्याची ॥ २ ॥
तुका ह्मणे लासूं फांसूं देऊं डाव । सुखाचा उपाव पुढें आहे ॥ ३ ॥

॥ ३२९० ॥

आह्मांपाशीं सरे एक शुद्ध भाव । चतुराई जाणींव नलगे कळा ॥१॥
सर्वजाण माझा स्वामी पांडुरंग । तया अंगसंग गोपाळांसी ॥ २ ॥
तुका ह्मणे कर्म धर्म नये हातां । तयावरि सत्ता भाविकांची ॥ ३ ॥

॥ ३२९१ ॥

अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तेंचि द्यावें ॥ १ ॥
मुंगीवरी भार गजाचें पालाण । घालितां तें कोण कार्यसिद्धि॰ ॥ २ ॥
तुका ह्मणे फांसे वाघुरा कुऱ्हाडी । प्रसंगीं तो काढी पारधी तो ॥३॥

॥ ३२९२ ॥

करावें गोमटें ॥ बाळा माते तें उमटे ॥ १ ॥ आपुलिया जीवाहूनी । असे वाल्हें तें जननी ॥ २ ॥ वियोग तों तिस । त्याच्या उपचारें तें विष ॥३॥ हरणी[1] चुकली पाडसा । धुंडाळीती दाही दिशा ॥४॥ रानीं हिंडों गेली गाय। घरीं वत्स वाट पाहे ॥ ५ ॥ तुका ह्मणे पायें । डोळा सुखावे ज्या न्यायें ॥ ६ ॥

॥ ३२९३ ॥

नाहीं कोणी दिस जात वांयांविण। साध्य नाहीं सीण लटिकाची ॥१॥
एकाचिये माथां असावें निमित्त । नसो नाहीं हित कपाळीं तें ॥२॥
कांहीं एक तरी बोलायाचा जागा । नेदिती वाउगा उभा ठाकों ॥३॥
तुका ह्मणे वर्मे कळों येती कांहीं । ओळखी जे नाहीं होईल ते ॥४॥

---

पाठभेदः—१ हा व पुढचा चरण कांहीं गाथेंतून नाहीं.

॥ ३२९४ ॥

कौलें भरियेली पेंठ । निग्रहाचे खोटे तंट ॥ १ ॥ ऐसें माता जाणे वर्म । बाळा वाढवितां धर्म ॥ २ ॥ कामावितां लोहो कसे । तांतडीनें काम नासे ॥३॥ तुका ह्मणे खडे । देतां अक्षर तें जोडे ॥ ४ ॥

॥ ३२९५ ॥

वैरागरापाशीं रत्नाचिया खाणी । हेचि द्यावी धणी फावेल तों ॥१॥
येथें नाहीं तर्कवितर्कांची चाड । होतसे निवाड खऱ्याखोट्यां ॥ २ ॥
उगाच सारावा वाढिली तो ठाव। वाढितिया भाव कळतसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे नव्हे टांचणीचें पाणी । येथें झरवणी जैशातैसें ॥ ४ ॥

॥ ३२९६ ॥

सोसें वाढे दोष । जाला पालटेना कस ॥ १ ॥ ऐसें बरवें वचन । करितां तें नारायण ॥ २ ॥ असे प्रारब्ध नेमें । श्रमचि उरे श्रमें ॥ ३ ॥ सुख देते शांती । तुका ह्मणे धरितां चित्तीं ॥ ४ ॥

॥ ३२९७ ॥

चंदन तो चंदनपणें । सहज गुणसंपन्न ॥१॥ वेधलिया धन्य जाती । भाग्यें होती सन्मुख ॥ २ ॥ परिसा अंगीं परिसपण । बाणोनि तें राहिलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कैंची खंती । सुजाती ते टाकणी ॥ ४ ॥

॥ ३२९८ ॥

ऐकतों दाट । आले एकांचे बोभाट ॥ १ ॥ नका विश्वासों यावरी । चोर देहाचे खाणोरी ॥ २ ॥ हेचि यांची जोडी । सदा बोडकीं उघडीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे न्यावें । ज्याचे त्यासी नाहीं ठावें ॥ ४ ॥

॥ ३२९९ ॥

पोट लागलें पाठीशीं । हिंडवितें देशोदेशीं ॥ १ ॥ पोटाभेणें जिकडे जावें । तिकडे पोट येतें सवें ॥ २ ॥ जप तप अनुष्ठान । पोटासाठीं

झाले दीन ॥३॥ पोटें सांडियेली चवी । नीचापुढें तें नाचवी ॥ ४ ।
पोट काशियानें भरे । तुका ह्मणे झुरझुरूं मरे ॥ ५ ॥

॥ ३३०० ॥

जग तरि आह्मां देव । परि हे निंदितों स्वभाव ॥ १ ॥ येतो हिताचा कळवळा । पडती हातीं म्हूण काळा ॥ २ ॥ नाहीं कोणी सखा । आह्मां निपराध पारिखा ॥३॥ उपक्रमें वदे । तुका वर्मासी तें भेदे ॥४॥

॥ ३३०१ ॥

मथनें भोगे सार । ताकें घडे उपकार ॥ १ ॥ बरवी सायासाची जोडी । अनुभाविया टावी गोडी ॥ २ ॥ पाक आणि रुची । जेथें तेथें ते कइंची ॥ ३ ॥ वाढितो पंगती । तुका आवडी संगती ॥ ४ ॥

॥ ३३०२ ॥

करितां होया व्हावें चित्ताचि नाहीं । घटापटा कांहीं करूं नये ॥ १ ॥ मग हालताचि नाहीं जवळून । करावा तो सीण सीणवितो ॥ २ ॥ साहृतचि नाहीं कांहीं पांकुळलें । उगल्या उगलें ढळत आहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरी बोलावे झांकून । येथें खुणें खूण पुरतेचि ॥ ४ ॥

॥ ३३०३ ॥

अवघ्या वाटा जाल्या क्षीण । कळीं न घडे साधन । उचित विधि विधान । न कळे न घडे सर्वथा ॥ १ ॥ भक्तिपंथ बहु सोपा । पुण्य नागवया पापा । येणें जाणें खेपा । येणेंचि एक खंडती ॥ २ ॥ उभारोनि बाहे । विठो पालवीत आहे ॥ दासां मीच साहे । मुखें बोले आपुल्या ॥ ३ ॥ भाविक विश्वासी । पार उतरिलें त्यांसी ॥ तुका ह्मणे नासी । कुतर्क्याचे कपाळीं ॥ ४ ॥

॥ ३३०४ ॥

आडवा तो उभा । असे दाटोनियां प्रभा ॥ १ ॥ देव नाहीं एक-

विध । एक भाव असे शुद्ध ॥ २ ॥ भेदाभेद आटी । नाहीं फार कोठें तुटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे गोवा । उगवा वेव्हाराचा हेवा ॥ ४ ॥

॥ ३३०५ ॥

संचितावांचून । पंथ न चलवे कारण ॥ १ ॥ कोरडी ते अवघी आटी । वांयां जाय लाळ घोंटी ॥ २ ॥ धन वित्त जोडे । देव ऐसें तों न घडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे आड । स्वहितासी बहु नाड ॥ ४ ॥

॥ ३३०६ ॥

मागील ते आटी येणें घडे सांग । सुतवेल अंग एका सूत्रें ॥ १ ॥
पाहिपाहुणेर ते सोहळ्यापुरते । तेथूनि आरते उपचार ते ॥ २ ॥
आवश्यक तेथें आगळा आदर । चाली थोडें फार संपादतें ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऋण फिटे एक घडी । अलभ्य ते जोडी हातां आल्या ॥ ४ ॥

॥ ३३०७ ॥

पतनासि जे नेती । तिचा खोटा स्नेह प्रीती ॥ १ ॥ विधिपुरतें कारण । बहु वारावें वचन ॥ २ ॥ सर्वस्वासि नाडी । ऐसी लाघवाची बेडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे दुरी । राखतां हे तोंचि बरी ॥ ४ ॥

॥ ३३०८ ॥

केलें पाप जेणें दिलें अनुमोदन । दोघांसी पतन सारिखेंचि ॥ १ ॥
विष नवनीता विष करी संगें । दुर्जनाच्या त्यागें सर्व हित ॥ २ ॥
देखिलें ओढाळ निघालिया सेता । टाळावें निमित्त्या थैक म्हूण ॥ ३ ॥
तुका ह्मणे जोडे केल्याविण कर्म । देखतां तो श्रम न मनितां ॥ ४ ॥

॥ ३३०९ ॥

आशाबद्ध तो जगाचा दास । पूज्य तो उदास सर्वजना ॥ १ ॥
आहे तें अधीन आपुलें हातीं । आणिकां ठेविती काय बोल ॥ २ ॥

जाणतिया पाठीं लागला उपाध । नेणता तो सावध भोजनासी ॥३॥
तुका ह्मणे भय बांधलेंसे गांठी । चोर लागे पाठी दुम तया ॥ ४ ॥

॥ ३३१० ॥

वाइटानें भलें । हीनें दाविलें चांगलें ॥ १ ॥ एकाविण एका । कैंचें मोल होतें फुका ॥२॥ विषें दाविलें अमृत । कडू गोड घातें हित ॥३॥ काळिमेनें ज्योती । दिवस कळों आला राती ॥ ४ ॥ उंच निंच गारा । हिरा परिस मोहरा ॥ ५ ॥ तुका ह्मणे भले । ऐसे नष्टांनीं कळले ॥ ६ ॥

॥ ३३११ ॥

दिली मान तरी नेघावी शत्रूची । शरण आले त्यासी जतन जीवें ॥१॥
समर्थासी असे विचाराची आण । भलीं पाप पुण्य विचारावें ॥ २ ॥
काकुळतीसाटीं सत्याचा विसर । पडिलें अंतर न पाहिजे ॥ ३ ॥
तुका ह्मणे यश कीर्ति आणि मान । करितां जतन देव जोडे ॥ ४ ॥

॥ ३३१२ ॥

करितां तडातोडी । वत्सा माते सोई ओढी ॥ १ ॥ करित्याचा आग्रह उरे । एक एकासाटीं झुरे ॥ २ ॥ भुके इच्छी अन्न । तेंही त्यासाटीं निर्माण ॥३॥ तुका ह्मणे जाती । एक एकाचिये चित्तीं ॥४॥

॥ ३३१३ ॥

जग अमंगळ । लागे देखतां विटाळ ॥ १ ॥ धर्म भूतांची ते दया । संत[2] कारण ऐसीया ॥ २ ॥ नव्हे माझें मत । साक्षी करूनि सांगें संत ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीवें । दावी उमटूनि अनुभवें ॥ ४ ॥

॥ ३३१४ ॥

लावुनियां गोठी । चुकवूं आदरिली दिठी । देउनियां मिठी । पळे महिमा थुलिया ॥१॥ पुढें तोचि करी आड । तिचा लोभ तिसी नाड । लावूनी चर-

---

पाठभेदः—१ भजनासी. २ सत्य.

फड । हात गोऊनि पळावें ॥२॥ आधीं काकुलती । मोहो घालावा पुढती । तोंडीं पडे माती । फिरतां मागें कैंचा तो ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । यासी रडवी याचा हेवा । भावें कां हें सेवा । सुखें तुह्मां नार्पिती ॥ ४ ॥

॥ ३३१५ ॥

ज्वरल्यासी काढा औषध पाचन । मूढा नारायण स्मरवितो ॥ १ ॥
भवव्याधि येणें तुटेल रोकडा । करूनियां झाडा निश्चयेंसी ॥ २ ॥
आणिकां उपायां अनुपान कठिण । भाग्यें[1] बरें सीण शीघ्रवत ॥ ३ ॥
तुका ह्मणे केला उघडा पसारा । भाग्य आलें घरा दारावरी ॥ ४ ॥

॥ ३३१६ ॥

अतिल्याई देतां जीव । नये कींव देवासी ॥ १ ॥ थोड्यासाटीं राग आला । जीव दिला गंगेंत ॥२॥ त्यासि परलोकीं नाहीं मुक्ति । अधोगति चुकेना ॥३॥ तुका ह्मणे कृष्णराम । स्मरतां श्रम वारती ॥ ४ ॥

॥ ३३१७ ॥

संवदड[2] आपटा रानचारा । हा तो दसऱ्याचा तुरा ॥१॥ एरवीं यासी पुसे कोण । एका देवासाटीं मान ॥२॥ मातीची ते घागरी । पाण्यासाटीं बैसे शिरीं ॥३॥ तुका ह्मणे माय जाण । धान्यासाटीं घेणें देणें ॥ ४ ॥

॥ ३३१८ ॥

श्वासोश्वासीं भाव । तरी देहींच जेवी देव ॥ १ ॥ धरीं स्मरण तें सार । नाहीं दुरी तें अंतर ॥२॥ भोगितां तूं भावें । देव जेवूं बैसे सवें ॥३॥ तुज पावो देवा । भावें अंतरींची सेवा ॥ ४ ॥ गुंतला साधनीं । देव नाहीं त्रिभुवनीं ॥५॥ तुका ह्मणे हातीं । न धरितां गमाविती ॥ ६ ॥

॥ ३३१९ ॥

साच हा विठ्ठल साच हें करणें । संत जें वचनें बोलियेले ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ भोगे. २ आपटा संवदड. हा अभंग इतर गाथांत थोडा निराळा आहे.

साच तें स्वहित साच ते प्रचित । साच वेदें नीत सांगितली ॥ २ ॥ तुका ह्मणे घेती साच साच भावें । लटिकें वर्म ठावें नाहीं त्यांसी ॥३॥

॥ ३३२० ॥

ज्याचे माथां जो जो भार । तेचि फार तयासी ॥ १ ॥ मागें पुढें अवघें रितें । कळों येतें अनुभवें ॥ २ ॥ परिसा अंगीं अमुप सोनें । पोटीं हीन धातूचें ॥३॥ आपुला तो करी धर्म । जाणे वर्म तुका तें ॥४॥

॥ ३३२१ ॥

आवडीचे भेटी निवे । चित्त पावे विश्रांती ॥ १ ॥ बरवियाचा छंद मना । नारायणा अवीट ॥ २ ॥ तुळणे कांहीं साम्या पुरे । हें तों नुरे ये रुचि ॥३॥ तुका ह्मणे बरवें जालें । फावलें हें कळे त्या ॥४॥

॥ ३३२२ ॥

आनंदाचा थारा । सुखें मोहरला झरा ॥ १ ॥ ऐसी प्रभुची ज्या कळा । त्याच्या कोण पाहे बाळा ॥ २ ॥ अंकिता ऐसया । होइल पावविलें ठाया ॥३॥ तुका ह्मणे ऐसें । दिलें आभंड प्रकाशें ॥ ४ ॥

॥ ३३२३ ॥

आहो उभा विटेवरी । भरोवरी चुकविली ॥ १ ॥ निवारलें जाणें येणें । कोणा कोणें रुसावें ॥ २ ॥ संकल्पासी वेचे बळ । भारे फळ निर्माण ॥३॥ तुका ह्मणे उभयतां । भेटी सत्ता लोभाची ॥ ४ ॥

॥ ३३२४ ॥

सत्य त्यागाचि समान । नलगे वेचावें वचन ॥ १ ॥ नारायणा ऐसे दास । येरयेरांचीच आस ॥ २ ॥ मळ नाहीं चित्ता । तेथें देवाचीच सत्ता ॥३॥ तुका ह्मणे जाण । तेंच भल्याचें वचन ॥ ४ ॥

॥ ३३२५ ॥

खाणोरियांचीं पुसो घरें । जीं हीं बरीं पाळती ॥ १ ॥ सांगती त्या

जावें वाटा । धरोनी पोटामध्यें गोष्टी ॥२॥ आली गेली होती ठाया । सत्य छाया कळली॥ ३॥तुका ह्मणे आपुलें बळ । युक्ति काळ कारण॥४॥

॥ ३३२६ ॥

काळें खादला हा अवघा आकार । उत्पत्तिसंहारघडमोडी ॥ १ ॥ बीजे तो अंकुर आच्छादिला पोटीं । अनंता सेवटीं एकाचिया ॥ २ ॥ तुका ह्मणे शब्दें व्यापिलें आकाश । गुढार हें कैसें कळों नये ॥ ३ ॥

॥ ३३२७ ॥

गोदे कांठीं होता आड । करूनि कोड कवतुकें ॥१॥ देखण्यांनीं एक केलें । आइत्या नेलें जिवनापें ॥ २ ॥ राखोनियां होतो ठाव । अल्प जीव लावूनि ॥३॥ तुका ह्मणे फिटे धनी । हे सज्जनीं विश्रांति ॥ ४ ॥

॥ ३३२८ ॥

देती घेती परज गेली । घर खालीं करूनियां ॥ १ ॥ धांवणियाचे न पडे हातीं । खादली राती काळोखी ॥ २ ॥ अवघियांचें अवघें नेलें । कांहीं ठेविलें नाहीं मागें ॥ ३ ॥ सोंग संपादुनि दाविला भाव । गेला आधीं माव वरि होती ॥ ४ ॥ घराकडे पाहूं नयेसेंचि जालें । अमानत केलें दिवाणांत ॥५॥आतां तुका कोणा न लगेचि हातीं ।जाली ते निश्चिती बोलों नये॥६॥

॥ ३३२९ ॥

देव धरी नाना सोंगें । नाम श्रेष्ठ पांडुरंग ॥ १ ॥ तो हा गवळियाचे घरीं । नाम सारितो मुरारि ॥ २ ॥ धन्य यशोदेचें प्रारब्ध । नाचे अंगणीं गोविंद ॥ ३ ॥ ऐशीं भक्तासाटीं देवें । नाना धरियेलीं नांवें ॥ ४ ॥ होय दासांचा जो दास । तुका ह्मणे विठ्ठलास ॥ ५ ॥

॥ ३३३० ॥

पवित्र सोंवळीं । एक तींच भूमंडळीं ॥ १ ॥ ज्यांचा आवडता देव । अखंडित प्रेमभाव ॥ २ ॥ तींच भाग्यवंतें । सरतीं पुरतीं धनवित्तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । त्यांची केली[1] पावे सेवा ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ केल्या.

॥ ३३३१ ॥

मुद्दलामध्यें पडे तोटा । ऐसा खोटा उदीम ॥ १ ॥ आणिकांची कां लाज नाहीं । आळस जिहीं जितीले[1] ॥ २ ॥ एके सांते सारिखीं वित्तें । हानि हित वेगळालीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे हित धरा । नव्हे पुरा गांवढाळ ॥ ४ ॥

॥ ३३३२ ॥

देखण्याच्या तीन जाती । वेठी वार्ता अत्यंतीं ॥ १ ॥ जैसा भाव तैसें फळ । स्वातीतोय एक जळ ॥ २ ॥ पाहे सांगे आणि जेवी । अंतर महदांतर तेवी ॥ ३ ॥ तुका ह्मणे हिरा । पारखियां मूढां गारा ॥ ४ ॥

॥ ३३३३ ॥

हरुष आनंदाचा । घोष करा हरिनामाचा । कोण ह्या दैवाचा । भाग पावे येथील ॥ १ ॥ पुण्य पाहिजे बहुत । जन्मांतरींचें संचित । होईल करीत । आला अधिकारी तो ॥ २ ॥ काय पाहातां हे भाई । हरुषें नाचा धरा घाई । पोटभरी कांहीं । घेतां उरी न ठेवा ॥ ३ ॥ जें सुख दृष्टी आहे । तेंच अंतरीं जो लाहे । तुका ह्मणे काय । कळिकाळ तें बापुडें ॥ ४ ॥

॥ ३३३४ ॥

तिर्थी धोंडा पाणी । देव रोकडा सज्जनीं ॥ १ ॥ मिळालियां संतसंग । समर्पितां भलें अंग ॥ २ ॥ तिर्थी भाव फळे । येथें आनाड तें वळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाप । गेलें गेल्या कळे ताप ॥ ४ ॥

॥ ३३३५ ॥

तरीच हीं केलीं । दानें वाईट चांगलीं ॥ १ ॥ एकें एका शोभवावें । केलें कवतुक देवें ॥ २ ॥ काय त्याची सत्ता । सूत्र आणीक चाळिता ॥ ३ ॥ तुका ह्मणे धुरें । डोळे भरिले परी खरें ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ तजिलें.

॥ ३३३६ ॥

एक परि बाहिर बरें । परि तीं ढोरें ग्यानगडें ॥ १ ॥ कपाळास लागली अगी । अभागी कां जीतसे ॥ २ ॥ एके परी बरें वेडें । तार्किक कुडें जळो तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे खातडवासी । अमृतासी नोळखे ॥ ४ ॥

॥ ३३३७ ॥

करूनि कडविड । जमा घडिली लगड ॥ १ ॥ आतां होतें तेंचि जालें । नाम ठायींचें चांगलें ॥ २ ॥ उतरलें डाई । उत्तम ते सुलाखताई ॥ ३ ॥ हिंडवितां देश । तुका ह्मणे नाहीं नाश ॥ ४ ॥

॥ ३३३८ ॥

मान इच्छी तो अपमान पावे । अमंगळ सवे अभाग्याची ॥ १ ॥ एकाचिये अंगीं दुजियाचा वास । आशा पुढें नाश सिद्ध करी ॥ २ ॥ आधीं फळासी कोठें पावों शके । वासनेची भिकेवरी चाली ॥ ३ ॥ तुका ह्मणे राजहंस ढोरा नांवें । काय तया द्यावें अळंकारांचें ॥ ४ ॥

॥ ३३३९ ॥

नारायणा ऐसा । सेवूं नेणतील रसा ॥ १ ॥ जेणें भवव्याध तुटे । दुःख मागुतें न भेटे ॥ २ ॥ नलगे कांहीं आटी । बाधा राहों न सके पोटीं ॥ ३ ॥ कैवल्य तें जोडे । पालट लवकरी घडे ॥ ४ ॥ जन्ममरण दुःख अटे । जाळें अवघेंचि तुटे ॥ ५ ॥ तुका ह्मणे जाला । याचा गुण बहुतांला ॥ ६ ॥

॥ ३३४० ॥

मोटळें हाटीं सोडिल्या गांठी । विकऱ्या घातले कण ॥ ज्याचे भाग त्यासी देऊनि वारिलें । सारूनि लिगाड दान ॥ खरें माप हातीं घेऊनि बैसलों । मानिती ते चौघे जने ॥ खरें वित्त तेथें आलें चोजवीत । गिऱ्हाइक संतजन ॥ १ ॥ झाडिला पालव केला हाट वेच । जाली सकाळींच अराणूक ॥ याल तरि तुह्मी करा लगबग । आमचे

ते कोणी लोक ॥ २ ॥ एक उत्तम मध्यम कनिष्ठ । वित्ताचे प्रकार तीन ॥ बहुतां जनाचे बहुत प्रकार । वेगळाले वाण ॥ लाभ हाणि कोणा मुद्दल जालें । कोणासी पडिलें खाण ॥ अर्धमर्ध कोणी गुंतोनि राहिले । थोडे तैसे बहु जन ॥ ३ ॥ एके सांते आले एक गांवींहून । येकामेचि नव्हे जाणें ॥ येतां जातां रुजू नाहीं दिवाणा । काळतोंडीं एकें तेणें ॥ लाग भाग एकी एकांनीं गोविलें । मागील पुढलां ऋणें ॥ तुका ह्मणे आतां पाहूं नये वास । साधावें आपुलें पेणें ॥ ४ ॥

॥ ३३४१ ॥

आह्मां कांहीं आह्मां कांहीं । आतां नाहीं या बोलें ॥ १ ॥ मोल सांगा मोल सांगा । घेणें तींहीं गा पुसावें ॥ २ ॥ कैसें घडे कैसें घडे । बडबड तुज मज ॥ ३ ॥ मुद्दलें साटीं मुद्दलें साटीं । लाभ पोटीं त्यामधीं ॥ ॥ ४ ॥ तुका ह्मणे साटवूं घरीं । आडल्या काळें पुसती तरी ॥ ५ ॥

॥ ३३४२ ॥

शिळें खातां आला वीट । सुनें धीट पाय धरी ॥ १ ॥ कान्होबा ते जाणे खूण । उन उन घांस घाली ॥ २ ॥ आपुलिये ठायींचें द्यावें । लाड भावें पाळावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी जुनाट सुने । मोहो तेणें परतला ॥ ४ ॥

॥ ३३४३ ॥

वाखर घेउनि आलें । त्यासी तरवारेनें हालें ॥ १ ॥ नव्हे आपुलें उचित ॥ करुनि टाकावें फजित ॥ २ ॥ अंगुळिया मोडी । त्यासी काय सिलें घोडीं ॥ ३ ॥ नपुंसकासाटीं । तुका ह्मणे नलगे जेठी ॥ ४ ॥

॥ ३३४४ ॥

निवडुनि दिलें नवनीत । संचित ते भोगीत ॥ १ ॥ आतां पुढें भावसार । जविना थार पाहावया ॥ २ ॥ पारखियाचे पडिलें हातीं । चांचपती आंधळीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सेवन घडे । त्यासी जोडे लाभ हा ॥ ४ ॥

॥ ३३४५ ॥

सरे भांडार । भरलें वेचितां अपार ॥ १ ॥ मविल्याचें पोट भरे । ढिलासी पुढें उरे ॥ २ ॥ कारणापुरता । लाहो आपुलाल्या हिता ॥ ३ ॥ का ह्मणे देवा । पुढें केला चाले हेवा ॥ ४ ॥

॥ ३३४६ ॥

नुभवें वदे वाणी । अंतर ध्यानीं आपुलें ॥ १ ॥ कैंची चिका बुध-वी । जरी दावी पांढरें ॥ २ ॥ जाती ऐसा दावी रंग । बहु जग या ांव ॥ ३ ॥ तुका ह्मणे खद्योत तें । ढुंगाभोंवतें आपुलिया ॥ ४ ॥

॥ ३३४७ ॥

एकीं असे एक हेवा । येर अनावडी जीवां ॥ १ ॥ देवें केल्या भिन्न जाती । उत्तम कनिष्ठ मध्यस्ती ॥ २ ॥ प्रीतिसाटीं भेद । कोणी पूज्य कोणी निंद्य ॥३॥ तुका ह्मणे ळळा । त्याचा जाणे हा कळवळा ॥ ४ ॥

॥ ३३४८ ॥

निवडोनि वाण काढिले निराळे । प्रमाण डोहळे यावरि ते ॥ १ ॥
जयाचा विभाग तयासीच फळे । देखणें निराळें कौतुकासी ॥ २ ॥
शूर तो ओळखे घायडायहात । येरां होइल मात सांगायासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी केळवते वाणी । केला निजस्थानीं जाणवसा ॥ ४ ॥

॥ ३३४९ ॥

लोह कफ गारा सिद्ध हे सामुग्री । अग्नि टणत्कारी दिसों येतो ॥ १ ॥
सांगावें तें काई सांगावें तें काई । चित्ता होय ठायीं अनुभव तो ॥२॥
अन्नें सांगों येतो तृप्तीचा अनुभव । करूनि उपाव घेऊं हेवा ॥ ३ ॥
तुका ह्मणे मिळे जीवनीं जीवन । तेथें कोणा कोण नांव ठेवी ॥४॥

॥ ३३५० ॥

एकल्या नव्हे खेळ चांग । धरिला संग ह्मणऊनि ॥ १ ॥ उमटे तेव्हां

कळे नाद । भेदाभेद निवडेना ॥ २ ॥ दुसरा परी एक ऐसा । न वजे रिसा निकुरेंही ॥३॥ तुका ह्मणे कळल्यां कळे । येर खेळे खेळ म्हूण॥४॥

॥ ३३५१ ॥

मुळाचिया मुळें । दुःखें वाढती सकळें ॥ १ ॥ ऐसा योगियांचा धर्म । नव्हे वाढवावा श्रम ॥ २ ॥ न कळे आवडी । कोण आहे कैसी घडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे थीत । दुःख पाववावें चित्त ॥ ४ ॥

॥ ३३५२ ॥

आइत्याची राशी । आली पाकसिद्धीपाशीं ॥ १ ॥ आतां सांडोनी भोजन । भिके जावें वेडेपण ॥ २ ॥ उसंतिली वाट । मागें परतावें फुकट ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाणी । वेचों बैसोन टाकणी ॥ ४ ॥

॥ ३३५३ ॥

जातिविजातींची व्हावयासि भेटी । संकल्प तो पोटीं वाहों नये ॥ १ ॥ होणार तें घडों होणाराच्या गुणें । होइल नारायणें निर्मिलें तें ॥ २ ॥ व्याघ्राचिये भुके वधावी ते गाय । याचें नांव काय पुण्य असे ॥ ३॥ तुका ह्मणे न करी विचार पुरता । गरज्याची माता पिता खर ॥४॥

॥ ३३५४ ॥

केला मातीचा पशुपति । परी मातीसि काय ह्मणती । शिवपुजा शिवासि पावे । माती मातीमाजी समावे ॥ १ ॥ तैसे पूजिती आह्मां संत । पूजा घेतो भगवंत । आह्मी किंकर संतांचे दास । संत पदवी नको आह्मांस ॥ २ ॥ केला पाषाणाचा विष्णु । परि पाषाण नव्हे विष्णु । विष्णुपूजा विष्णुसि अर्पे । पाषाण राहे पाषाणरूपें ॥ ३ ॥ केली कांशाची जगदंबा । परि कांसें नव्हे अंबा । पूजा अंबेची अंबेला घेणें । कांसें राहे कांसेंपणें ॥४॥ ब्रह्मानंद पूर्णामाजी । तुका ह्मणे केली कांजी । ज्याची पूजा तेणेंचि घेणें । आह्मीं पाषाणरूप राहणें ॥ ५ ॥

॥ ३३५५ ॥

ऱगीं ऐसा बाप व्हावा । ज्याचा वंश मुक्तिस जावा ॥ १ ॥ पोटा ऺतां हरलें पापा । ज्ञानदेवा मायबापा ॥ २ ॥ मुळीं पाप होता ज्ञानी । तरी आम्ही लागलों ध्यानीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे मी पोटींचें ऺाळ । माझी पुरवा ब्रह्मींची आळ ॥ ४ ॥

॥ ३३५६ ॥

काय दिवस गेले अवघेंचि वऱ्हाडें । तें आलें सांकडें कथेमाजी ॥ १ ॥
क्षण एके ठायीं मन स्थिर नाहीं । अराणूक कइं होईल पुढें ॥ २ ॥
कथेचे विरसें दोषा मूळ होय । तरण उपाय कैचा माती ॥ ३ ॥
काय तें सांचवूनि उरलें हें मागें । घटिका एक संगें काय गेलें ॥ ४ ॥
तेचि वाणी येथें करा उजळणी । काढावीं मथूनि शब्दरत्नें ॥ ५ ॥
तुका ह्मणे हेंचि बोलावया चाड । उभयतां नाड हित असे ॥ ६ ॥

॥ ३३५७ ॥

लांब धांवे पाय चोरी । भरोवरी जनाच्या ॥ १ ॥ आतां कैसें होय याचें । सिजतां कांचें राहिलें ॥ २ ॥ खाय ओकी वेळोवेळां । कैसी कळा राहेल ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावहीण । त्याचा सीण पावावा ॥ ४ ॥

॥ ३३५८ ॥

आवडी येते कळों । गुणें चिन्हें उमटती ॥ १ ॥ पोटीचें ओटीं उभें राहे । चित्त साहे मनासी ॥ २ ॥ डोहोळियाची भूक गर्भा । ताटीं प्रभा प्रतिबिंबे ॥ ३ ॥ तुका ह्मणे मानोन घ्यावें । वाटे खावें वाटेतें ॥ ४ ॥

॥ ३३५९ ॥

पाषाण परिस भूमि जांबूनद । वंशाचा संबंध धातयाचा ॥ १ ॥
सोनियाची पुरी समुद्राचा वेढा । समुदाय गाढा राक्षसांचा ॥ २ ॥
ऐसी सहस्र त्या सुंदरा कामिनी । माजी मुखरणी मंदोदरी ॥ ३ ॥
पुत्रपौत्रांचा लेखा कोण करी । मुख्य पुत्र हरी इंद्रा आणी ॥ ४ ॥

चौदा चौकडिया आयुष्यगणना । बंधुवर्ग जाणा कुंभकर्ण ॥ ५ ॥
तुका ह्मणे ज्याचे देव बांदवडी । सांगातें कवडी गेली नाहीं ॥ ६ ॥

॥ ३३६० ॥

धन्या आतां काय करूं । माझें तान्हुलें लेंकरूं ॥ १ ॥ धन्या अवचित मरण आलें । मज कोणासी निरविलें ॥ २ ॥ माझें दार नका पाडूं । त्याचे हातपाय तोडूं ॥ ३ ॥ एके हातीं धरली दाढी । दुजे हातीं घे कुऱ्हाडी ॥ ४ ॥ येरी धाव घालूं पाहे । तंव तो उठोनि उभा राहे ॥५॥ तुका ह्मणे अवघीं चोरें । सेखीं रामनाम सोइरें ॥ ६ ॥

॥ ३३६१ ॥

भोग यावे देवा । त्याग भोगींच बरवा ॥ १ ॥ आपण व्हावें एकीकडे । देव कळेवरी जोडे ॥ २ ॥ योजे यथाकाळें । उत्तम पाला कंद मुळें ॥३॥ वंचक त्यासी दोष । तुका ह्मणे मिथ्या सोस ॥ ४ ॥

॥ ३३६२ ॥

आपल्याच स्फुंदें । जेथें तेथें घेती छंदें ॥ १ ॥ पाडिला सत्याचा दुष्काळ । बहु फार जाली घोळ ॥ २ ॥ विश्वासाचे माट । त्याचे कपाळीं तें नाट ॥ ३ ॥ तुका ह्मणे घाणा । मूढा तीर्थ प्रदक्षणा ॥ ४ ॥

॥ ३३६३ ॥

नव्हे हें कवित्व टांकसाळी नाणें । घेती भले जन भले लोक ॥ १ ॥
लागलासे झरा पूर्ण नवनीतें । सेविलियां हित फार होय ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा केला बलात्कार । अंगा आलें फार महंतपण ॥ ३ ॥

॥ ३३६४ ॥

गौरव गौरवापुरतें । फळ सत्याचे संकल्प ॥ १ ॥ कठिण योगाहुनि क्षेम । ओकलिया होतो श्रम ॥ २ ॥ पावलें मरे सिवेपाशीं । क्लेश उरत ते क्लेशीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे बहु आणी । कठिण निघालिया रणीं ॥ ४ ॥

॥ ३३६५ ॥

आदि मध्य अंत दावियला दीपें । हा तो आपणापें यत्न बरा ॥ १ ॥
दासत्वें दाविलें धन्याचें भांडार । तोंतों नव्हे सार येथुनियां ॥ २ ॥
उपायानें सोस नासला सकळ । सत्ते सत्ताबळ अंगा आलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे दृष्टी सकळांचे शिरीं । वचनचि करी बैसोनियां ॥ ४ ॥

॥ ३३६६ ॥

भ्रतारअंगसंगें सुखाची वेवस्था । आधीं तो सांगतां नये कोणा ॥१॥
तथापि सांगणें कुमारिकेपाशीं । ते काय मानसीं सुख मानी ॥ २ ॥
तैसा आत्मबोध आधीं बोलों नये । बोलासी तो काय सांपडेल ॥३॥
तथापि सांगणें बहिर्मुखापाशीं । तो काय संतोषासी मूळ होय ॥ ४ ॥
तुका ह्मणे संत सुखाचे विभागी । ब्रह्मानंद जगीं साधुरूपें ॥ ५ ॥

॥ ३३६७ ॥

सारावीं लिगाडें धरावा सुपंथ । जावें उसंतीत हळूहळू ॥ १ ॥
पुढें जातियाचे उमटले माग । भांबावलें जग आडराणें ॥ २ ॥
मेचल्याचा पाहे वरावरि झाडा । बळाचा निधडा पुढिलिया ॥ ३ ॥
तुका ह्मणे जैसी दाखवावी वाणी । ते द्यावी भरोनी शेवट तों ॥ ४ ॥

॥ ३३६८ ॥

परमार्थी तो न ह्मणावा आपुला । सलगी धाकुला हेळूं नये ॥ १ ॥
थोडाचि स्फुलिंग बहुत दावाग्नि । वाढतां इंधनीं वाढविला ॥ २ ॥
पितियानें तैसा वंदावा कुमर । जयाचें अंतर देव वसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे शिरीं वाहावें खापर । माजी असे सार नवनीत ॥ ४ ॥

॥ ३३६९ ॥

पाहातां ठायाठाव । जातो अंतरोनि देव ॥१॥ नये वाटों गुणदोषी ।
मना जतन येविशीं ॥ २ ॥ त्रिविध देह परिचारा । जनीं जनार्दन
खरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे धीरें । विण कैसें होतें बरें ॥ ४ ॥

॥ ३३७० ॥

करावें चिंतन । तेंचि बरें न भेटून ॥ १ ॥ बरवा अंगीं राहे भाव । तेंचें तोचि जाणा देव ॥ २ ॥ दर्शनाची उरी । अवस्थाचि अंग धरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मन । तेथें सकळ कारण ॥ ४ ॥

॥ ३३७१ ॥

साधनाचे कष्ट मोटे । भय वाटे थोर हें ॥ १ ॥ मुखें गावें भावें गीत । सर्व हित बैसलिया ॥ २ ॥ दासा नव्हे कर्म दान । तन मन निश्चळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे आत्मनिष्ठा । भोगे चेष्टा मनाची ॥ ४ ॥

॥ ३३७२ ॥

शक्ती द्याव्या देवा । नाहीं पार्थिवांची सेवा ॥ १ ॥ मुख्य आहे ऐसा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥ २ ॥ मना पोटीं देव । जाणे जैसा तैसा भाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे सोसें । लागे लाविल्याचें पिसें ॥४॥

॥ ३३७३ ॥

बहु प्रकार ग[3]व्हां । जिव्हा नाचे आवडी ॥ १ ॥ सरलें परि आवडी नवी । सिंधु दावी तरंग ॥ २ ॥ घेतलें घ्यावें वेळोवेळां । माय बाळा न विसंबे ॥ ३ ॥ तुका ह्मणे रस वचनीं । पडताळूनि सेवीतसें ॥ ४ ॥

॥ ३३७४ ॥

भांडवी माउली कवतुकें बाळा । आपणा सकळां साक्षित्वेसीं ॥ १ ॥
माझी माझी ह्मणे एकमेकां मारी । हें तों नाहीं दुरी उभयतां ॥ २ ॥
तुझें थोडें भातें माझें बहु फार । छंद करकर वाद मिथ्या ॥ ३ ॥
तुका ह्मणे एके ठायीं आहे वर्म । हेंचि होय श्रम निवारितें ॥ ४ ॥

॥ ३३७५ ॥

वत्स पळे धेनु धांवे पाठीलागीं । प्रीतीच्या तो अंगीं आविर्भाव ॥१॥
शिकविलें काय येईल कारणा । सूत्र ओढी मना आणिकांच्या ॥२॥

पाठभेदः—१ लग. २ मागे. ३ गव्हांचे.

सांडिलें तें नाहीं येत मेळवितां । ह्मणऊनि लाता मागें सारी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आग्रह करावा न लगे । सांगतसे अंगें अनुभव ॥ ४ ॥

॥ ३३७६ ॥

विषम वाटे दुरवरी । चालूनि परती धरी ॥ मागील ते उरी । नाहीं उरली भयाची ॥१॥ मुख्य न व्हावा तो नाड । सेवटाचे हातीं गोड ॥ सरलिया चाड । मग कैंचे उद्वेग ॥२॥ होता पहिला अभ्यास । समर्थी घालावया कास । तेव्हां लटिके दोष । योगें अनुतापाच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे आहे । बुद्धि केलियानें साहे । जवळीच पाहें। देव वाट स्मरणाची॥४॥

॥ ३३७७ ॥

मृगाचिये अंगीं कस्तुरीचा वास । असे ज्याचा त्यास नसे ठावा ॥१॥ भाग्यवंत घेती वेचूनियां मोलें । भारवाही मेले वाहतां ओझें ॥ २ ॥ चंद्रामृतें तृप्तिपारणें चकोरा । भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥ ३ ॥ अधिकारी येथें घेती हातवटी । परीक्षवंता दृष्टी रत्न जैसें ॥ ४ ॥ तुका ह्मणे काय अंधळिया हातीं । दिलें जैसें मोतीं वांयां जाय ॥५॥

॥ ३३७८ ॥

भोग तो न घडे संचितावांचूनि । करावें तें मनीं समाधान ॥ १ ॥ ह्मणऊनि मनीं मानूं नये खेद । ह्मणावा गोविंद वेळोवेळां ॥ २ ॥ आणिकां रुसावें नलगे बहुतां । आपुल्या संचितावांचूनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे भार घातलियावरी । होईल कैवारी नारायण ॥ ४ ॥

॥ ३३७९ ॥

दिवाळखोर नारायण । यावरी बहुतांचें ऋण ॥ १ ॥ उठतांचि उभे द्वारीं । अवघे दे दे ह्मणती हरी ॥ २ ॥ माजघरीं दडे हरी । माया तडकी आड करी ॥ ३ ॥ युगायुगींचें हें ऋण । ह्मणउनि धरिलेंसे मौन्य ॥ ४ ॥ रोखापत्र पाहीं । वेदशास्त्र देती ग्वाही ॥ ५ ॥ धनकोनाम तुका वाणी । रिणकोनाम विठ्ठल धणी ॥ ६ ॥

॥ ३३८० ॥

डिवेना डसेना बुजेना निर्मळ । परि अमंगळ स्वीकारीना ॥ १ ॥
परंतु गर्दभ अपवित्र जाणा । पर्वकाळीं दाना देऊं नये ॥ २ ॥
डिवी लात्री बुजे बहु नेदी दुध । मुखीं नाहीं शुद्ध विष्टा खाय ॥३॥
परंतु ते गाय पवित्र हो जाणा । पर्वकाळीं दाना देऊंजेते ॥ ४ ॥
ब्राह्मणें ब्राह्मणा सद्गुरू करावा । परि न करावा शूद्रादिक ॥ ५ ॥
तुका ह्मणे देवें सांगितली सोय । ह्मणोनि त्याचे पाय धरिले जीवें ॥ ६ ॥

॥ ३३८१ ॥

पाया जाला नारू । तेथें बांधला कापूरू ॥१॥ तेथें बिबव्याचें काम । अधमासी तों अधम ॥ २ ॥ रुसला गुलाम । धणी करीतो सलाम ॥ ॥ ३ ॥ तेथें चाकराचें काम । अधमासी तों अधम ॥ ४ ॥ रुसली घरची दासी । धणी समजावी तियेसी ॥ ५ ॥ तेथें बटकीचें काम । अधमासी तों अधम ॥ ६ ॥ देव्हाऱ्यावरि विंचू आला । देवपूजा नावडे त्याला ॥७॥ तेथें पैंजारेचें काम । अधमासी तों अधम ॥८॥ तुका ह्मणे जाती । जातीसाटीं खाती माती ॥ ९ ॥

॥ ३३८२ ॥

रत्नाच्या वोवणी कांचे ऐशा धरी । आव्हेरूनी दुरी अधिकारें ॥१॥
जातिस्वभाव आला डोळ्यां आड । तया घडे नाड न कळतां ॥ २ ॥
कामधेनु देखे जैशा गाईह्मैसी । आणिकांतें ऐसी करोनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय बोलोनियां फार । जयाचा वेव्हार तया साजे ॥ ४ ॥

॥ ३३८३ ॥

मागें नेणपणें घडलें तें क्षमा । आतां देतों सीमा करूनियां ॥ १ ॥
परनारीचें जया घडलें गमन । दावीतो वदन जननीरत ॥ २ ॥
उपदेशावरी मन नाहीं हातीं । तो आह्मां पुढती पाहूं नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे साक्षी असों द्यावें मन । घातली ते आण पाळावया ॥४॥

॥ ३३८४ ॥

पूज्या एकासनीं आसनीं आसन । बैसतां गमन मातेशीं तें ॥ १ ॥
सांगतों ते धर्म नीतीचे संकेत । सावधान हित व्हावें तरी ॥ २ ॥
संतां ठाया ठाव पूजनाची इच्छा । जीवनींच वळसा सांपडला ॥३॥
तुका ह्मणे एकाएकीं वरासन । दुजें तेथें भिन्न अशोभ्य तें ॥ ४ ॥

॥ ३३८५ ॥

वीट नेघे ऐसें रांधा । जेणें बाधा उपजेना ॥ १ ॥ तरीच तें गोड राहे । निरें पाहे स्वयंभ ॥२॥ आणिकां गुणां पोटीं वाव । दावी भाव आपुला ॥ ३ ॥ तुका ह्मणे शुद्ध जाती । ते मागुती परतेना ॥ ४ ॥

॥ ३३८६ ॥

पूर आला आनंदाचा । लाटा उसळती प्रेमाच्या॥ १ ॥वांधूं विठ्ठल सांगडी। पोहुनि जाऊं पैल थडी ॥२॥अवघे जन गडी । घाला उडी भाईनो ॥३॥ हें तों नाहीं सर्वकाळ । अमुप अमृताचें जळ ॥ ४ ॥ तुका ह्मणे थोरा पुण्यें । ओघ आला पंथें येणें ॥ ५ ॥

॥ ३३८७ ॥

नको होऊं देऊं भावीं अभावना । याचि नांवें जाणा बहु दोष ॥१॥
मेघवृष्टि येथें होते अनिवार । जिव्हाळ्या उखर लाभ नाड ॥ २ ॥
उत्तमा विभागें कनिष्ठाची इच्छा । कल्पतरु तैसा फळे त्यासीं॥ ३ ॥
तुका ह्मणे जिणें बहु थोडें आहे । आपुलिया पाहें पुढें बरें ॥ ४ ॥

॥ ३३८८ ॥

मायेचा मारिला अंगीं नाहीं घाव । दुःखें तरी लव धडधडी ॥ १ ॥
न लभे हा काळ न सुटे हातींचा । न बोलवे वाचा खोडावली ॥२॥
न पवे धांवणें न पवेची लाग । न चलती माग धरावया ॥ ३ ॥
भेणें तरी अंगा लावियेल्या राखा । परी त्यासी वाखा करीतसे ॥४॥
तुका ह्मणे नेदी हाका मारूं देवा । लोकांपाठी हेवा लागतसे ॥ ५ ॥

॥ ३३८९ ॥

दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचें ॥ १ ॥
पाप त्याचें नांव न विचारी नीत । भलतेंचि उन्मत्त करी सदा ॥२॥
धर्म नीतीचा हा ऐकूनि वेव्हार । निवडीलें सार असार तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे धर्म रक्षावयासाटीं । देवासही आटी जन्म घेणें ॥ ४ ॥

॥ ३३९० ॥

शोकें शोक वाढे । हिंमतीचे धीर गाढे ॥१॥ येथें केलें नव्हे काई । लंडीपण खोटें भाई ॥ २ ॥ करिती होया होय । परी नव्हे कोणी साह्य ॥ ३ ॥ तुका ह्मणे घडी । साधिलिया एक थोडी ॥ ४ ॥

॥ ३३९१ ॥

आशा तृष्णा माया अपमानाचें बीज । नासिलिया पूज्य होइजेतें॥१॥
अधीरासी नाहीं चालों जातां मान । दुर्लभ दर्शन धीर त्याचें ॥२॥
तुका ह्मणे नाहीं आणिकांसी बोल । वांयां जाय मोल बुद्धीपाशीं॥३॥

॥ ३३९२ ॥

चालिले सोबती । काय मानिली निश्चिती ॥ १ ॥ काय करिसी एकला । काळ सन्निध पातला ॥ २ ॥ कांहीं सावध तो बरवा । करीं आपुला काढावा॥३॥ चालिले अगळे । हळूच कान केश डोळे॥४॥ वोसरले दांत । दाढा गडबडल्या आंत ॥५॥ एकली तळमळे । जिव्हा भलते ठायीं लोळे ॥६॥ तुका ह्मणे यांणीं । तुझी मांडिली घालणी ॥७॥

॥ ३३९३ ॥

विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥१॥ मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसान अंतीं ॥२॥ बहु अतिशय खोटा । तर्कें होती बहु वाटा ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें । कृपा करीजे ते देवें ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ हा चरण कांहीं गाथेंत नाहीं, व कांहींत निराळा आहे.

॥ ३३९४ ॥

जीवन मुक्त ज्ञानी पर जाले पावन। तजा हो दुर्जन संगति ही ॥१॥
बहुत अन्न विष मोहरीच्या मानें। अवघेंचि तेणें विष होय ॥ २ ॥
तुका ह्मणे जेणें आपुलें स्वहित। तैसी करी नीत विचारूनि ॥ ३ ॥

॥ ३३९५ ॥

द्रव्याचिया मागें कळिकाळाचा लाग। ह्मणोनियां संग खोटा त्याचा ॥१॥
निरयाचें मूळ घालुनियां मागें। मांडिली प्रसंगें कथा पुढें ॥ २ ॥
आजिच्या प्रसंगें हाचि लाभ घ्यावा। पुढील भार देवावरी घाला ॥३॥
प्रालब्ध कांहीं न पालटे सोसें। तृष्णेचें हें पिसें वांयांविण ॥ ४ ॥
तुका ह्मणे घेई राहे ऐसें धन। सादर श्रवण करोनियां ॥ ५ ॥

॥ ३३९६ ॥

योगाचें तें भाग्य क्षमा। आधीं दमा इंद्रियें ॥१॥ अवघीं भाग्यें येती
घरा। देव सोयरा जालिया ॥२॥ मिरासीचें म्हूण सेत। नाहीं देत
पीक उगें ॥३॥ तुका ह्मणे उचित जाणां। उगीं सिणा काशाला ॥ ४ ॥

॥ ३३९७ ॥

न ह्मणे साना थोर। दुष्ट पापी अथवा चोर ॥ १ ॥ सकळां द्यावी
एक चवी। तान हरूनि निववी ॥२॥ न ह्मणे दिवस राती। सर्वकाळ
सर्वां भूतीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे झारी। घेतां तांब्यानें खापरी ॥ ४ ॥

॥ ३३९८ ॥

सतीचें तें घेतां वाण। बहू कठीण परिणामीं ॥१॥ जिवासाटीं गौरव
वाढे। आहाच जोडे तें नव्हे॥२॥जरि होय उघडी दृष्टी। तरि गोष्टी
युद्धाच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंगा येतां। तरी सत्ता धैर्याची ॥ ४ ॥

॥ ३३९९ ॥

समुद्र हा पिता बंधु हा चंद्रमा। भगिनी ते रमा शंखाची या ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ जीवन हे मुक्त नर.

मेहुणा जयाचा द्वारकेचा हरि । शंख दारोदारीं भीक मागे ॥ २ ॥
दृष्ट हें जाणावें आपुलें स्वहित । तुका ह्मणे मात ऐसी आहे ॥ ३ ॥

॥ ३४०० ॥

करी आणिकांचा अपमान । खळ छळवादी ब्राह्मण । तया देतां दान । नरका जाती उभयतां ॥ १ ॥ तैसें जालें दोघांजणां । मागतिया यजमाना । जाळियलें वना । आपणासहित कांचणी ॥ २ ॥ घडितां दगडाची नाव । मोल क्लेश गेले वाव । तरता नाहीं ठाव । बुडवी तारू तरतीया ॥ ३ ॥ चोरा दिधला सांटा । तेणें मारियेल्या वाटा । तुका ह्मणे ताटा । हें तंव दोघे नाडती ॥ ४ ॥

॥ ३४०१ ॥

एका ह्मणे भलें । आणिकां सहज निंदिलें ॥ १ ॥ कांहीं न करितां आयास । सहज घडले ते दोष ॥ २ ॥ बरें वाइटाचें । नाहीं कांहीं[1] मज साचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाणी । खंडोनि राहावें चिंतनीं ॥ ४ ॥

॥ ३४०२ ॥

संत संगतीं न करावा वास । एखादे गुणदोष अंगा येती ॥ १ ॥
मग तया दोषा नाहीं परिहार । होय अपहार सुकृताचा ॥ २ ॥
तुका ह्मणे नमस्कारावे दुरून । अंतरीं धरून राहें रूप ॥ ३ ॥

॥ ३४०३ ॥

ज्याची जया आस । तयाजवळी त्या वास ॥ १ ॥ येर जवळी तें दुरी । धेनु वत्स सांडी घरीं ॥ २ ॥ गोडी प्रियापाशीं । सुख उपजे येरासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे बोल । घडे तया ठायीं मोल ॥ ४ ॥

॥ ३४०४ ॥

क्षमा शस्त्र जया नराचिया हातीं । दुष्ट तया प्रती काय करी ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ मज कांहीं.

तृण नाहीं तेथें पडिला द्मवाग्नि । जाय तो विझोनि आपसया ॥ २ ॥
तुका ह्मणे क्षमा सर्वांचें स्वहित । धरा अखंडित सुखरूप ॥ ३ ॥

॥ ३४०५ ॥

अनुभवें आलें अंगा । तें या जगा देतसें ॥ १ ॥ नव्हती ह्यातुके बोल । मूळ ओल अंतरींची ॥२॥ उतरूनि दिलें कशीं । शुद्धरसीं सरे तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे दुसरें नाहीं । ऐसी ग्वाही गुजरली ॥ ४ ॥

॥ ३४०६ ॥

स्त्रिया धन हें बा खोटें । नागवले मोठे मोठे॥ १ ॥ह्मणोनि सांडा दोनी । सुख पावाल निदानीं ॥ २ ॥ सर्व दुःखासी कारण । हींच दोन्हींच प्रमाण ॥३॥ आशा सर्वस्वें सांडावी । तेणें निजपदवी पावावी ॥४॥ देह लोभें नाडला । घाला यमाचा पडला॥५॥तुका ह्मणे निरापेक्षा । कांहीं न धरावी अपेक्षा॥६॥

॥ ३४०७ ॥

आपुली कसोटी शुद्ध राखी कारण । आगीनें भूषण अधिक पुट ॥ १ ॥
नाहीं कोणासवें बोलणें लागत । निश्चिंतीनें चित्त समाधान ॥ २ ॥
लपविलें तेंही ढेंकरें उमटे । खोटियाचें खोटें उर फोडी ॥ ३ ॥
तुका ह्मणे निंदा स्तुति दोन्ही वाव । आपुलाला भाव फळा येतो ॥ ४ ॥

॥ ३४०८ ॥

उधानु काटीवरि चोपडुची आस । नवरा राजस मिरवतसे ॥ १ ॥
जिव्हाळ्याच्या काटी उबाळ्याच्या मोटा । नवरा चोहटा मिरवतसे ॥२॥
तुळसीची माळ नवरीचे कंठीं । नोवरा वैकुंठीं वाट पाहे ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसी नोवऱ्याची कथा । परमार्थ वृथा बुडविला ॥ ४ ॥

॥ ३४०९ ॥

हित सांगे तेणें दिलें जीवदान । घातकी तो जाण मनामागें ॥ १ ॥
बळें हे वारावे अधर्म करितां । अंधळें चालतां आडराणें ॥ २ ॥

द्रव्य देऊनियां धाडावें तीर्थासी । नेदावें चोरासी चंद्रबळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे ऐसें आहे हें पुराणीं । नाहीं माझी वाणी पदरींची ॥ ४ ॥

॥ ३४१० ॥

निंदावें हें जग । ऐसा भागा आला भाग ॥ १ ॥ होतें तैसें आलें फळ । गेलें निवडूनि सकळ ॥ २ ॥ दुसऱ्याच्या मता । मिळेनासें जालें चित्ता ॥ ३ ॥ तुका जाला सांडा । विटंबिती पोरें रांडा ॥ ४ ॥

॥ ३४११ ॥

हेंही ऐसें तेंही ऐसें । उभय पिसें अविचार ॥१॥ अभिमानाचे ठेलाठेलीं । मधीं जाली हिंपुष्टी ॥ २ ॥ धीरा शांती ठाव नुरे । ह्याचि उरे आबाळ्या ॥ ३ ॥ कौतुक हें पाहे तुका । कढतां लोकां अधणीं ॥४॥

॥ ३४१२ ॥

भूतीं भगवंत । हा तो जाणतों संकेत ॥ १ ॥ भारी मोकलितो बाण । ज्याचा त्यासी कळे गुण ॥ २ ॥ करावा उपदेश । निवडोनि तरी दोष ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाटे । चुकतां आडराणें कांटे ॥ ४ ॥

॥ ३४१३ ॥

जागा घरटी फिरे । तस्कराची दिवसारातीं ॥ १ ॥ नीदसुरें नाडिलीं । असो ऐसीं मागें किती ॥ २ ॥ हाट करी सकळ जन । वस्तु करा रे जतन ॥ ३ ॥ हुशार ठायीं । निजनिजेलिया पाहीं ॥४॥ सावचित्त असे खरा । लाभ घेऊन जाये घरा ॥५॥ तराळ बोंबे उतराई । राखा आपुलिया भाई ॥६॥ हरिच्या नामीं घालूं जागा । तुका ह्मणे हुशार गा ॥७॥

॥ ३४१४ ॥

चित्त समाधानें । तरी विष वाटे सोनें ॥ १ ॥ बहु खोटा अतिशय । जाणां भले सांगों काय ॥ २ ॥ मनाचे तळमळे । चंदनेंही अंग पोळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे दुजा । उपचार पीडा पूजा ॥ ४ ॥

॥ ३४१५ ॥

एक तटस्थ मानसीं । एक सहजचि आळसी ॥ १ ॥ दोन्ही दिसती सारिखीं । वर्म जाणे तो पारखी ॥ २ ॥ एक ध्यानीं करिती जप । एक बैसुनि घेती झोंप ॥ ३ ॥ एकां सर्वस्वाचा त्याग । एका पोटासाटीं जागे ॥४॥ एकां भक्ति पोटासाटीं । एकां देवासवें गांठी॥५॥ वर्म पोटीं एकां । फळें दोन ह्मणे तुका ॥ ६ ॥

॥ ३४१६ ॥

यथार्थ वाद सांडूनि उपचार । बोलती ते अघोर भोगितील ॥ १ ॥
चोरा धरितां सांगे कुठाऱ्याचें नांव । दोघांचेही पाव हात जाती ॥२॥
तुका ह्मणे असे पुराणीं निवाड । माझी हे बडबड नव्हे कांहीं ॥ ३ ॥

॥ ३४१७ ॥

सर्प विंचू दिसे । धन अभाग्या कोळसे ॥१॥ आला डोळ्यांसी कवळ । तेणें मळलें उजळ ॥ २॥ अंगाचे भोवडी । भोय झाडें[1] फिरे घोंडी ॥३॥ तुका ह्मणे नाड । पाप ठाके हिता आड ॥ ४ ॥

॥ ३४१८ ॥

भक्ति तों कठिण शुळावरील पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥१॥
जेथें पाहे तेथें देखीचा पर्वत । पायाविण भिंतें[2] तांतडीची ॥ २ ॥
कामाविलें तरि पाका ओज घडे । रुचि आणि जोडे श्लाघ्यता हे ॥३॥
तुका ह्मणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दिस जागृतीचा ॥ ४ ॥

॥ ३४१९ ॥

चित्ता मिळे त्याचा संग रुचिकर । क्षोभवितां दूर तोंचि भलें ॥ १ ॥
ऐसी परंपरा आलीसे चालत । भलत्याची नीत त्यागावरी ॥ २ ॥
हो कां पिता पुत्र बंधु कोणी तरी । विजाती संग्रहीं धरूं नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे सत्य पाळावें वचन । अन्यथा आपण करूं नये ॥ ४ ॥

---

पाठभेदः—[1] झाड फिरती. [2] भिंतें.

॥ ३४२० ॥

निगमाचें वन । नका शोधूं करूं सीण ॥१॥ या रे गौळियांच्या घरीं । बांधलेंसे दावें वरी ॥ २ ॥ पडिलेती भ्रमें । वाटा न कळतां वर्मे ॥ ३ ॥ तुका ह्मणे भार । माया टाका अहंकार ॥ ४ ॥

॥ ३४२१ ॥

निरोप सांगतां । न धरीं भय न करीं चिंता ॥ १ ॥ असो ज्याचें त्याचे माथां । आपण करावी ते कथा ॥ २ ॥ उतरावा भार । किंवा न व्हावें सादर ॥३॥ तुका ह्मणे वाहे धाक । तया इह ना परलोक ॥४॥

॥ ३४२२ ॥

पापाचिया मुळें । जालें सत्याचें वाटोळें ॥ १ ॥ दोष जाले बळि-वंत । नाहीं ऐसी जाली नीत ॥ २ ॥ मेघ पडों भीती । पिकें सांडि-येली क्षिती ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं । वेदा वीर्य शक्ति नाहीं ॥ ४ ॥

॥ ३४२३ ॥

उजळितां उजळे दीपकाची वाती । स्वयंभ ते ज्योति हिऱ्या अंगीं ॥१॥
एकीं महाकष्टें मेळविलें धन । एकासी जतन दैवयोगें ॥ २ ॥
परिमळें केलें चंदनाचें चिन्ह । निवडी ते भिन्न गाढव तो ॥ ३ ॥
तुका ह्मणे जया अंगीं हरिठसा । तो तरे सहसा वंद्य होय ॥ ४ ॥

॥ ३४२४ ॥

संचित तैशी बुद्धि उपजे मनामधीं । सांगितलें सिद्धि नव जाय ॥१॥
ज्याचा जैसा ठेवा तो त्यापाशीं धांवे । न लगती करावे उपदेश ॥२॥
घेऊन उठती आपुलाले गुण । भविष्याप्रमाणें तुका ह्मणे ॥३॥

॥ ३४२५ ॥

रडोनियां मान । कोण मागतां भूषण ॥ १ ॥ देवें दिलें तरी गोड । राहे रुचि आणि कोड ॥ २ ॥ लावितां लावणी । विके भीके केज्या दानी ॥ ३ ॥ तुका ह्मणे धीरा । विण कैसा होतो हिरा ॥ ४ ॥

॥ ३४२६ ॥

पाषाण प्रतिमा सोन्याच्या पादुका । हे हो हातीं एका समर्थाचे ॥१॥
अनामिका हातीं समर्थाचा सिक्का । न मानितां लोकां येइल कळों ॥२॥
तुका ह्मणे येथें दुराग्रह खोटा । आपुल्या अदृष्टा शरण जावें ॥३॥

॥ ३४२७ ॥

परद्रव्य परकांता । नातळे जयाचिया चित्ता । आणि कर्मीं तो तत्वता । बांधला नवजाय ॥ १ ॥ ऐसा अनुभव रोकडा । विश्वासीतो जीवा जोडा । एकांत त्या पुढां । अवघा करी उकल ॥ २ ॥ सकट आंबलें अन्न । शोधी तेंचि मद्यदान । विषमानें भिन्न । केलें शुद्धाशुद्ध ॥ ३ ॥ तुका ह्मणे नित । बरवें अनुभवें उचित । तरी काय हित । मोलें घ्यावें लागतें ॥ ४ ॥

॥ ३४२८ ॥

अमृत आव्हेरें उचंबळे जातां । विष आर्त्तभूतां आवश्यक ॥ १ ॥
आदरासी मोल नये लावूं केजें । धीर शुद्धबीजें गोमटा तो ॥ २ ॥
खऱ्याचिये अंगीं आपणचि चाली । लावणी लागली काय लागे ॥३॥
तुका ह्मणे चाडे करा वेवसाव । आह्मांसी तो वाव धीर आहे ॥४॥

॥ ३४२९ ॥

नये स्तवूं काचें होतें क्रियानष्ट । फुंदाचे ते कष्ट भंगा मूळ ॥ १ ॥
नाहीं परमार्थ साधत लौकिकें । धरून होतों फिकें अंगा आलें ॥२॥
पारखिया पुढें नये घालूं तोंड । तुटी लाभा खंड होतो माना ॥ ३ ॥
तुका ह्मणे तरी मिरवतें परवडी । कामाविल्या गोडी अविनाश ॥४॥

॥ ३४३० ॥

असतीं कांटाळा हा नव्हे मत्सर । ब्रह्म तें विकारविरहित ॥ १ ॥
तरि ह्मणां त्याग प्रतिपादिलासे । अनादि हा असे वैराकार ॥ २ ॥

सिजलें हिरवें एका नांवें धान्य । सेवनापें भिन्न निवडे तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे भूतीं साक्ष नारायण । अवगुणीं दंडण गुणीं पूजा ॥ ४ ॥

॥ ३४३१ ॥

आहाच तो मोड वाळलियावरी । अधीराची बुद्धि तेणें न्यायें ॥ १ ॥
ह्मणऊनि संग न करीं दुसरें । चित्त मळीन द्वारें द्वाड पडे ॥ २ ॥
विषासाटीं सर्पा भयाभीत लोक । हें तो सकळीक जाणतसां ॥ ३ ॥
तुका ह्मणे काचें राहे कुळांकुड । अवगुण तो नाड ज्याचा तया ॥ ४ ॥

॥ ३४३२ ॥

नेणें फुंकों कान । नाहीं एकांतींचें ज्ञान ॥ १ ॥ तुह्मी आइका हो संत। माझा सादर वृत्तांत ॥ २ ॥ नाहीं देखिला तो डोळां । देव दाखवूं सकळां ॥ ३ ॥ चिंतनाच्या सुखें । तुका ह्मणे नेणें दुःखें ॥ ४ ॥

॥ ३४३३ ॥

माझा पाहा अनुभव । केला देव आपुला ॥ १ ॥ बोलविलें तेंचि द्यावें। उत्तर व्हावें ते काळीं ॥ २ ॥ सोडिलिया जग निंद्य । मग गोविंद ह्मणियारा ॥ ३ ॥ तुका ह्मणे धीर केला । तेणें याला गोविलें ॥ ४ ॥

॥ ३४३४ ॥

कस्तुरी भिनली जये मृत्तिके । तयेसी आणिके कैसी सरी ॥ १ ॥
लोखंडाचे अंगीं लागतां परिस । तया आणिकास कैसी सरी ॥ २ ॥
तुका ह्मणे मी न वजें यातीवरी । पूज्यमान करीं वैष्णवांसी ॥ ३ ॥

॥ ३४३५ ॥

नये माझा तुह्मां होऊं शब्दस्पर्श । विप्रवृंदा तुह्मां ब्राह्मणांसी ॥ १ ॥
ह्मणोनियां तुह्मां करितों विनंती । द्यावें शेष हातीं उरलें तें ॥ २ ॥
वेदीं कर्म जैसें बोलिलें विहित । करावी ते नीत विचारूनि ॥ ३ ॥
तुमचा स्वधर्म माझा अधिकार । भोजन उत्तर तुका ह्मणे ॥ ४ ॥

पाठभेदः—दोडपडे, द्वाडपडे.

॥ ३४३६ ॥

आह्मी वैकुंठवासी । आलों याचि कारणासी । बोलिले जे ऋषी । साच भावें वर्ताया ॥ १ ॥ झाडूं संतांचे मारग । आडेराणीं भरलें जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरलें तें सेवूं ॥ २ ॥ अर्थ लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें । विषयलोभी मनें । साधनें बुडविलीं ॥ ३ ॥ पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा । तुका ह्मणे करा । जयजयकार आनंदें ॥ ४ ॥

॥ ३४३७ ॥

कास घालोनि बळकट । झालों कळिकाळासी नीट । केली पायवाट । भवसिंधूवरूनि ॥ १ ॥ या रे या रे लाहान थोर । याति भलते नारीनर । करावा विचार । न लगे चिंता कोणासी ॥ २ ॥ कामीं गुंतले रिकामे । जपी तपी येथें जमे । लाविले दमामे । मुक्त आणि मुमुक्षा ॥ ३ ॥ एकंदर सिक्का । पाटविला इहलोका । आलों ह्मणे तुका । मी नामाचा धारक ॥ ४ ॥

॥ ३४३८ ॥

ओलें मूळ भेदी खडकाचें अंग । अभ्यासासी सांग कार्यसिद्धि ॥ १ ॥
नव्हे ऐसें कांहीं नाहीं अवघड । नाहीं कईवाड तोंच वरि ॥ २ ॥
दोरें चिरा कापे पडिला कांचणीं । अभ्यासें सेवनीं विष पडे ॥ ३ ॥
तुका ह्मणे कैंचा बैसण्यासी ठाव । जठरीं बाळा वाव एकाएकीं ॥ ४ ॥

॥ ३४३९ ॥

परिमळें काष्ठ ताजवां तुळविलें । आणीक नांवांचीं थोडीं । एक तीं कांतिवें उभविलीं ढवळारें । एकाचिया कुड मेडी । एक दीनरूप आणिती मोळिया । एक ते बांधोनि माडी ॥ अवघियां बाजार एकचि जाला । मांविकलीं आपुल्या पाडीं ॥ १ ॥ गुण तो सार रूपमध्यकार । अवगुण

---

पाठभेदः—१ सांड्र. २ आडरानें. ३ अभ्यास.

तो फार पीडीतसे ॥ २ ॥ एक गुणें आगळे असती । अमोल्य नांवांचे खडे ॥ एक समर्थ दुबळा घरीं । फार मोलाचे थोडे ॥ एक झगझग करिती वाळवंटीं । कोणी न पाहाती तयांकडे ॥ सभाग्य संपन्न आ-गुलाले घरीं । मायेक दैन्य बापुडें ॥ ३ ॥ एक नामें रूपें सारिख्या असती । अनेकप्रकार याती ॥ ज्याचिया संचितें जैसें आलें पुढें । तयाची तैसीच गति ॥ एक उंचपदीं बैसोनि सुखें । दास्य करवी एका हातीं ॥ तुका ह्मणे कां मानिती सुख । चुकलिया वांयां खंती ॥ ४ ॥

॥ ३४४० ॥

नको नको मना गुंतूं मायाजाळीं । काळ आला जवळी ग्रासावया ॥ १ ॥ काळाची हे उडी पडेल बा जेव्हां । सोडविना तेव्हां मायबाप ॥ २ ॥ सोडविना बंधु पाठीची बहीण । शेजेची कामीन दूर राहे ॥ ३ ॥ सोडविना राजा देशींचा चौधरी । आणीक सोइरीं भलीं भलीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे तुला सोडविना कोणी । एका चक्रपाणीवांचूनियां ॥ ५ ॥

॥ ३४४१ ॥

अधिरा माझ्या मना ऐक एक मात । तूं कां रे दुश्चित निरंतर ॥ १ ॥ हेचि चिंता काय खावें ह्मणऊनि । भले तुजहूनि पक्षिराज ॥ २ ॥ पाहा तें चातक नेघे भूमिजळा । वरुपे उन्हाळा मेघ तया ॥ ३ ॥ सकळयातींमध्यें ठक हा सोनार । त्या घरीं व्यापार झारियाचा ॥ ४ ॥ तुका ह्मणे जळीं वनीं जीव एक । तयापाशीं लेख काय आहे ॥ ५ ॥

॥ ३४४२ ॥

प्रारब्धेंचि जोडे धन । प्रारब्धेंचि वाढे मान ॥ १ ॥ सोस करिसी वांयां । भज मना पंढरीराया ॥ २ ॥ प्रारब्धेंचि होय सुख । प्रारब्धेंचि पावे दुःख ॥ ३ ॥ प्रारब्धेंचि भरे पोट । तुका करीना बोभाट ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ हा चरण कांहीं गाथेंत नाहीं.

॥ ३४४३ ॥

न करीं रे मना कांहींच कल्पना। चित्तीं या चरणां विठोबाच्या ॥ १ ॥
येथें सुखाचिया अमुपचि रासी। पुढें कल्पनेसी ठाव नाहीं ॥ २ ॥
सुखाचें ओतिलें साजिरें श्रीमुख। शोक मोह दुःख पाहातां नाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें होईल विसांवा। तुटतील हांवा पुढिलिया ॥ ४ ॥

॥ ३४४४ ॥

देवाचिये पायीं देई मना बुडी। नको धांवों वोढी इंद्रियांचे ॥ १ ॥
सर्व सुखें तेथें होती एकवेळे। न सरती काळें कल्पांतींही ॥ २ ॥
जाणें येणें खुंटे धांव वेरझार। नलगे डोंगर उसंतावे ॥ ३ ॥
सांगणें तें तुज इतुलेंचि जातां। मानीं धन कांता विषतुल्य ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुझे होती उपकार। उतरों हा पार भवसिंधु ॥ ५ ॥

॥ ३४४५ ॥

मना एक करीं। ह्मणे जाईन पंढरी। उभा विटेवरी। तो पाहेन सांवळा॥ १ ॥ करीन सांगसी तें काम। जरी जपसी हें नाम। नित्य वाचे राम। हरी कृष्ण गोविंद ॥ २ ॥ लागे संतांचिया पायां। कथे उल्हासा गावया। आलों मागावया। शरण देई उचित ॥ ३ ॥ नाचें रंगीं वाहें टाळी। होय सादर ते काळीं। तुका ह्मणे मळी। सांडूनियां अंतरीं ॥ ४ ॥

॥ ३४४६ ॥

श्रीराम सखा ऐसा धरीं भाव। मीपणाचा ठाव पुसीं मना ॥ १ ॥
शरण निरंतर ह्मण तूं गोविंदा। वाचे लावीं धंदा नारायण ॥ २ ॥
यापरि सोपान नाहीं रे साधन। वाहातसें आण तुझी मना ॥ ३ ॥
नको कांहीं करूं आळस अंतरीं। जपें निरंतरीं रघुपती ॥ ४ ॥
तुका ह्मणे मोठा लाभ नरदेहीं। देहींच विदेही होती नामें ॥ ५ ॥

॥ ३४४७ ॥

फजितखोरा मना किती तुज सांगों। नको कोणा लागों मागें मागें ॥ १ ॥

स्नेहवादें दुःख जडलेंसे अंगीं । निष्ठुर हें जगीं प्रेमसुख ॥ २ ॥
निंदास्तुति कोणी करो दयामाया । न धरीं चाड या सुखदुःखें ॥ ३ ॥
योगिराज कां रे न राहाती बैसोनि । एकिये आसनीं याचि गुणें ॥ ४ ॥
तुका ह्मणे मना पाहें विचारून । होईं रे कठिण वज्राऐसें ॥ ५ ॥

॥ ३४४८ ॥

रिकामें तूं नको मना । राहों क्षणक्षणाही ॥ १ ॥ वेळोवेळां पारायण । नारायण हें करीं ॥ २ ॥ भ्रमणांच्या मोडीं वाटा । न भरें फाटा आडराणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझ्या जीवें । हेंचि घ्यावें धणीवरी ॥ ४ ॥

॥ ३४४९ ॥

[1]ब्रह्मज्ञान नव्हे लेंकरांच्या गोष्टी । तेथें व्हावा पोटीं अनुताप ॥ १ ॥
दगडाहूनि जीव करावा कठिण । अंतरींचा सिण तेव्हां जाय ॥ २ ॥
मेल्या मनुष्याची न धरीती आस । तैसा हो उदास संसारासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें करारांचें काम । मग आहे राम जवळीच ॥ ४ ॥

॥ ३४५० ॥

सांवळें सुंदर पाहे दृष्टीभरि । ऐसें कांहीं करीं मन माझें ॥ १ ॥
मना तुज ठाव दिला त्याचे पायीं । राहें विठाबाईसवें सदा ॥ २ ॥
मना नको धरूं आणिकांचा संग । नाहीं पांडुरंग जयां मनीं ॥ ३ ॥
वरपंग भाव नको ह्मणे तुका । करीं प्राणसखा नारायण ॥ ४ ॥

॥ ३४५१ ॥

आतां असों मना अभक्तांची कथा । न होईं दुश्चित्ता हरिनामीं ॥ १ ॥
नये त्याची कदा गोष्टी करूं मात । जिव्हे प्रायश्चित्त त्याच्या नांवें ॥ २ ॥
प्रभातें न घ्यावें नांव माकडाचें । तैसें अभक्तांचें सर्वकाळ ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां आठवूं मंगळ । जेणें सर्वकाळ सुखरूप ॥ ४ ॥

॥ ३४५२ ॥

नको घालूं झांसां । मना उपाधिवोळसा ॥ १ ॥ जे जे वाहावे संकल्प ।

---

पाठभेदः—१ हा अभंग भक्त मंडळांत प्रचलित आहे.

पुण्य तरी तेंचि पाप ॥२॥ उपजतो भेव। होतो कासावीस जीव ॥३॥
तुका ह्मणे पाहों। होइल तें निवांत राहो ॥ ४ ॥

॥ ३४५३ ॥

करीं हेंचि काम। नाम जपें राम राम ॥ १ ॥ लागो हाचि छंद। मना
गोविंद गोविंद ॥ २ ॥ तुका ह्मणे मना। मज भीक द्यावी दीना ॥ ३ ॥

॥ ३४५४ ॥

पंढरी पावन जालें माझें मन। आतां करूं ध्यान विठोबाचें ॥ १ ॥
आतां ऐसें करूं नाम गाऊं गीतीं। सुखाचा सांगाती विठो करूं ॥२॥
संग करूं त्याचा तो सखा आमचा। अनंता जन्मांचा मायबाप ॥ ३ ॥
परतोनि सोई धरीं कां रे मना। विठ्ठलचरणा घालीं मिठी ॥ ४ ॥
घातलीसे मिठी नाहीं भक्तिभाव। उदार पंढरीराव तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ३४५५ ॥

मायारूपें ऐसें मोहिलेंसे जन। भोगिती पतन नानाकर्में ॥ १ ॥
काय याची प्रीती करितां आदर। दुराविता दूर तेंचि भलें ॥ २ ॥
नाना छंद अंगीं बैसती विकार। छळियेले फार तपोनिधि ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसें सिकवितों तुज। आतां धरीं लाज मना पुढें ॥ ४ ॥

॥ ३४५६ ॥

सांगतों या मना तें माझें नाइके। वातावरी टेंके चांडाळ हें ॥ १ ॥
ह्मणऊनि पाहे तरतें बुडतें। न लाहे पुरतें बळ करूं ॥ २ ॥
काय तें संचित न कळे पाहातां। मतिमंद चित्ता उपजतें ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसें बळ नाहीं अंगीं। पाहोनियां वेगीं पार टाकी ॥ ४ ॥

॥ ३४५७ ॥

चित्ता ऐसी नको देऊं आठवण। जेणें देवाचे चरण अंतरे तें ॥ १ ॥
आलिया वचनें रामनामध्वनि। ऐकावीं कानीं ऐसीं गोडें ॥ २ ॥

मत्सराचा ठाव शरीरीं नसावा । लाभेंविण जीवा दुःख देतो ॥ ३ ॥
तुका ह्मणे राहे अंतर शतिळ । शांतीचें तें बळ क्षमा अंगीं ॥ ४ ॥

॥ ३४५८ ॥

नको येऊं लाजे होय तूं परती । भजों दे श्रीपती सखा माझा ॥ १ ॥
तुझे संगतीनें मोटा जाला घात । जालों मी अंकित दुर्जनाचा ॥ २ ॥
तुका ह्मणे रांडे घेइन कांटीवरी । धनी सहाकारी राम केला ॥ ३ ॥

॥ ३४५९ ॥

आजिवरी होतों तुझे सत्तेखालीं । तोंवरी तों केली विटंबणा ॥ १ ॥
आतां तुज राहों नेदीं या देशांत। ऐसा म्यां समर्थ केला धणी ॥ २ ॥
सापें रिग केला कोठें बाळपणीं । होतीसी पापिणी काय जाणों ॥ ३ ॥
तुका ह्मणे म्यां हा बुडविला वेव्हार । तुझेंचि ढोपर सोलावया ॥ ४ ॥

॥ ३४६० ॥

आतां येथें लाजे नाहीं तुझें काम। जाय मज राम आठवूं दे ॥ १ ॥
तुझे भिडे माझे बहु जाले घात । केलों या अंकित दुर्जनाचा ॥ २ ॥
माझें केलें मज पारिखें माहेर । नटोनी साचार चाळविलें ॥ ३ ॥
सुखासाटीं एक वाहियेलें खांदीं । तेणें बहु मांदी मेळविली ॥ ४ ॥
केला चौधाचार नेलों पांचांमधीं । नाहीं दिली शुद्धी धरूं आशा ॥५॥
तुका ह्मणे आतां घेईन कांटीवरी । धनी म्यां कैवारी केला देव ॥ ६ ॥

॥ ३४६१ ॥

कोणाही कोंडावें हा आह्मां अधर्म । जो जो पावे श्रम तो तो देव ॥ १ ॥
ह्मणउनि चित्ता सिकविलें वोजें । आतां हेंचि दुजें न बोलावें ॥ २ ॥
हालविलें जरि परउपकारें । जिव्हे पाप खरें उपाधीचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जीव प्रारब्धा आधीन । कोण वाहे सीण करुणा शोभे ॥४॥

॥ ३४६२ ॥

आतां पुढें धरीं । माझे आठव वैखरी ॥१॥ नको बडबडूं भांडे । कांहीं

वाउगें तें रांडे ॥ २ ॥ विठ्ठल विठ्ठल । ऐसे सांडोनियां बोल ॥ ३ ॥ तुका ह्मणे आण । तुज स्वामीची हे जाण ॥ ४ ॥

॥ ३४६३ ॥

आणीक कांहीं या उत्तराचें काज । नाहीं आतां मज बोलावया ॥ १ ॥
भिन्न भेद हे भावनास्वभाव । नव्हे कांहीं देव एकविध ॥ २ ॥
गुण दोष कोणें निवडावे धर्म । कोण जाणे कर्म अकर्म तें ॥ ३ ॥
तरिच भलें आतां न करावा संग । दु:खाचा प्रसंग तोडावया ॥ ४ ॥
तुका ह्मणे गुण गाई या देवाचे । घेई माझे वाचे हेचि धणी ॥ ५ ॥

॥ ३४६४ ॥

जळो ते जाणींव जळो ते शाहाणींव । राहो माझा भाव विठ्ठलपायीं ॥१॥
जळो तो आचार जळो तो विचार । राहो मन स्थीर विठ्ठलपायीं ॥ २ ॥
जळो हा लौकिक जळो दंभमान । लागो जीवा ध्यान विठ्ठलाचें ॥ ३ ॥
जळो हें शरीर जळो हा संबंध । राहो परमानंद माझ्या कंठीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे येथें अवघेंचि होय । धरीं मना सोय विठोबाची ॥ ५ ॥

॥ ३४६५ ॥

ऐसी जिव्हा निकी। विठ्ठल विठ्ठल कां न घोकी ॥ १ ॥ जेणें पाविजे उद्धार । तेथें राखावें अंतर ॥ २ ॥ गुंपोनि चावटी । तेथें कोणा लाभे भेटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळा । देवाविण अमंगळा ॥ ४ ॥

॥ ३४६६ ॥

आह्मी तेणें सुखी । ह्मणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ॥ १ ॥ तुमचें येर वित्त धन । तें मज मृत्तिकेसमान ॥ २ ॥ कंठीं मिरवा तुळसी । व्रत करा एकादशी ॥ ३ ॥ ह्मणवा हरिचे दास । तुका ह्मणे मज हे आस ॥ ४ ॥

॥ ३४६७ ॥

बोलावा विठ्ठल पाहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ॥ १ ॥

येणें सोसें मन जालें हांवभरी । परती माघारी घेत नाहीं ॥ २ ॥
बंधनापासूनि उकलली गांठी । देतां आली मिठी सावकाशें ॥ ३ ॥
तुका ह्मणे देह भारिला विठ्ठलें । कामक्रोध केलें घर रितें ॥ ४ ॥

॥ ३४६८ ॥

आणीक काळें न चले उपाय । धरावे ते पाय विठोबाचे ॥ १ ॥
अवघेंचि पुण्य असे तया पोटीं । अवघिया तुटी होय पापा ॥ २ ॥
अवघें मोकळें अवघिया काळें । उद्धरती कुळें नरनारी ॥ ३ ॥
काळ वेळ नाहीं गर्भवास दुःखें । उच्चारितां मुखें नाम एक ॥ ४ ॥
तुका ह्मणे कांहीं न लगे सांडावें । सांगतसें भावें घेती तयां ॥ ५ ॥

॥ ३४६९ ॥

बहुतां छंदाचें बहु वसे जन । नये वांटूं मन त्याच्या संगें ॥ १ ॥
करावा जतन आपुला विश्वास । अंगा आला रस आवडीचा ॥ २ ॥
सुखाची समाधि हरिकथा माउली । विश्रांति साउली सिणलियांची ॥३॥
तुका ह्मणे बुडे बांधोनि दगड । तेथें काय कोड धांवायाचें ॥ ४ ॥

॥ ३४७० ॥

भ्रमणा पाउलें वेचिलीं तीं वाव । प्रवेशतां ठाव एक द्वार ॥ १ ॥
सार तीं पाउलें विठोबाचीं जिवीं । कोणी न विसंबावीं क्षणभरी ॥ २ ॥
सुलभ हें केलें सकळां जीवन । फुंकावेचि कान न लगेसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें सकळही कोड । पुरे मूळ खोड विस्ताराचें ॥ ४ ॥

॥ ३४७१ ॥

कांहीं जाणों नये पांडुरंगाविण । पाविजेल सीण संदेहानें ॥ १ ॥
भलतिया नांवें आळविला पिता । तरी तो जाणता कळवळा ॥ २ ॥
अळंकार जातो गौरवितां वाणी । सर्व गात्रां धणी हरिकथा ॥ ३ ॥
तुका ह्मणे उपजे विल्हाळें आवडी । करावा तो घडीघडी लाहो ॥ ४ ॥

॥ ३४७२ ॥

नाहीं विचारीत । मेघ हगणदारी सेत ॥ १ ॥ नये पाहों त्याचा अंत । ठेवीं कारणापें चित्त ॥ २ ॥ वर्जित गंगा नाहीं उत्तम अधम जगा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मळ । नाहीं अग्नीसी विटाळ ॥ ४ ॥

॥ ३४७३ ॥

गुळ सांडुनि गोडी घ्यावी । मीठ सांडुनि चवि चाखावी ॥ १ ॥ ऐसा प्रपंच सांडुनि द्यावा । मग परमार्थ जोडावा ॥ २ ॥ साकरेचा नव्हे ऊंस । आह्मां कैंचा गर्भवास ॥३॥ बीज भाजुनि केली लाही । जन्ममरण आह्मां नाहीं ॥ ४ ॥ आकारासी कैंचा ठाव । देह प्रत्यक्ष जाला वाव ॥ ५ ॥ तुका ह्मणे अवघें जग । सर्वां घटीं पांडुरंग ॥ ६ ॥

॥ ३४७४ ॥

ह्मणविती ऐसे आइकतों संत । न देखिजे होत डोळां कोणी ॥ १ ॥ ऐसियांचा कोण मानितें विश्वास । निवडे तो रस घाईडाई ॥ २ ॥ पर्जन्याचे काळीं वोहाळाचें नद । ओसरतां बुंद न थारेचि ॥ ३ ॥ हिऱ्या ऐशा गारा दिसती दुरोन । तुका ह्मणे घन न भेटे तों ॥ ४ ॥

॥ ३४७५ ॥

अंगीं देवी खेळे । कां रे तुह्मांसी न कळे । कोणाचे हे चाळे । सुख दुःख न मानितां ॥ १ ॥ मी तों आतां येथें नाहीं । ओळखी वचनाच्या ठायीं । पालटाचा येई । भाव खरें लोपे ना ॥ २ ॥ आपुलाले तुह्मी पुसा । सोवा एव्याच सरिसा । स्थिरावल्या कैसा । काय जाणों विचार ॥ ३ ॥ तुका ह्मणे लाभकाळ । तेथें नसावें शीतळ । मग तैशी वेळ । कोठें जाते सांपडों ॥ ४ ॥

॥ ३४७६ ॥

जप करितां राग । आला जवळी तो मांग ॥ १ ॥ नको भोंवताले

जगीं । पाहों जवळी राख अंगीं ॥ २ ॥ कुड्याची संगती । सदा भोजन पंगती ॥ ३ ॥ तुका ह्मणे ब्रह्म । साधी विरहित कर्म ॥ ४ ॥

॥ ३४७७ ॥

तामसाचीं तपें पापाची सिदोरी । तमोगुणें भरी घातले ते ॥ १ ॥
राज्यमदा आड सुखाची संपत्ति । उलंघूनि जाती निरयगांवा ॥ २ ॥
इंद्रियें दमिलीं इच्छा जीती जीवीं । नागविती ठावीं नाहीं पुढें ॥ ३ ॥
तुका ह्मणे हरिभजनावांचून । करिती तो सीण पाहों नये ॥ ४ ॥

॥ ३४७८ ॥

फिरंगी वाखर लोखंडाचे विळे । परि ते निराळे गुणमोल ॥ १ ॥
पायरी प्रतिमा एकचि पाषाण । परि तें महिमान वेगळालें ॥ २ ॥
तुका ह्मणे तैशा नव्हतील परी । संत जना सरी सारिखिया ॥ ३ ॥

॥ ३४७९ ॥

अविश्वासीयाचें शरीर सुतकी । विटाळ पातकी भेदवाही ॥ १ ॥
काय त्याचा वेल जाईल मांडवा । होता तैसा ठेवा आला पुढें ॥२॥
मावेचा संकल्प व्हावा राजबिंडा । कपाळींचा धोंडा उभा ठाके ॥३॥
तुका ह्मणे जैसा कुचराचा दाणा । परिपाकीं अन्ना न मिळे जैसा ॥४॥

॥ ३४८० ॥

अतिवादें[1] लावी । एक बोट सोंग दावी ॥ १ ॥ त्याचा बहु रूपी नट । नव्हे वैष्णव तो चाट ॥ २ ॥ प्रतिपादी वाळी । एका पुजी एका छळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं । भूतदया ज्याचे ठायीं ॥ ४ ॥

॥ ३४८१ ॥

पोटाचे ते नट पाहों नये छंद । विषयांचे भेद विषयरूप ॥ १ ॥
अर्थी परमार्थ कैसा घडों सके । चित्त लोभी भीके सोंग वांयां ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ अतिवाद.

देवाचीं चरित्रें दाखविती लीळा । लाघवाच्या कळा मोहावया ॥३॥
तुका ह्मणे चित्तीं राहे अभिळास । दोघां नरकवास सारिखाचि ॥४॥

॥ ३४८२ ॥

आतां माझ्या मना । हेची घडो उपासना ॥ १ ॥ ऐसें करीं पांडुरंगा । प्रेम वोसंडेसें अंगा ॥२॥ सर्व काळ नये । वाचे वीट आड भये ॥३॥ तुका वैष्णवांसंगती । हेचि भजनपंगती ॥ ४ ॥

॥ ३४८३ ॥

जरी माझी कोणी कापितील मान । तरी नको आन वदों जिव्हे ॥१॥
सकळां इंद्रियां हे माझी विनंती । नका होऊं परतीं पांडुरंगा ॥ २ ॥
आणिकांची मात नाइकावी कानीं । आणीक नयनीं न पाहावें ॥३॥
चित्ता तुवां पायीं रहावें अखंडित । होउनी निश्चित एकविध ॥ ४ ॥
चला हात पाय हेंचि काम करा । माझ्या नमस्कारा विठोबासी ॥५॥
तुका ह्मणे तुह्मां भय काय करी । आमुचा कैवारी नारायण ॥ ६ ॥

॥ ३४८४ ॥

घेई[1] घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥ तुह्मी घ्या रे डोळे सुख । पाहा विठोबाचें मुख ॥२॥ तुह्मी ऐका रे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ ३ ॥ मना तेथें धांव घेई । राहे विठोबाचे पायीं ॥ ४ ॥ तुका ह्मणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ५ ॥

॥ ३४८५ ॥

ऐका ऐका भाविक जन । कोण कोण व्हाल तें ॥ १ ॥ तार्किकांचा टाका संग । पांडुरंग स्मरा हो ॥ २ ॥ नका शोधूं मतांतरें । नुमगे खरें बुडाल ॥ ३ ॥ कलिमध्यें दास तुका । जातो लोकां सांगत ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ घेई एकदांच आहे.

# अद्वैतपर अभंग.

॥ ३४८६ ॥

ॐ तत्सदिति सूत्राचें सार । कृपेचा सागर पांडुरंग ॥ १ ॥
हरिः ॐ सहित उदत्त अनुदत्त । प्रचुरीश्वरासहित पांडुरंग ॥ २ ॥
गोब्राह्मणहिता होऊनि निराळे । वेदाचें तें मूळ तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ३४८७ ॥

पाहतां तव एकला दिसे । कैसा असे व्यापक ॥ १ ॥ त्याचे त्यांच[1] मिळणीं मिळे । तरी खेळे बहुरूपी ॥ २ ॥ जाणिवेचें नेदी अंग । दिसों रंग निवडीना ॥ ३ ॥ तुका ह्मणे येचि ठायीं । हें तो नाहीं सर्वत्र ॥ ४ ॥

॥ ३४८८ ॥

जीवाचें जीवन अमृताची तनु । ब्रह्मांड भूषणू नारायण ॥ १ ॥
सुखाचा सांगात अंतकासी अंत । निजांचा निवांत नारायण ॥ २ ॥
गोडाचेंही गोड हर्षाचेंही कोड । प्रीतिचाही लाड नारायण ॥ ३ ॥
भावाचा निजभाव नांवांचाही नांव । अवघा पंढरिराव अवतरलासे ॥४॥
तुका ह्मणे जें हें साराचें हें सार । माझा अंगीकार तेणें केला ॥ ५ ॥

॥ ३४८९ ॥

जिकडे पाहें तिकडे उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ १ ॥ डोळां बैसलें बैसलें । रूप राहोनि संचलें ॥ २ ॥ न वर्जितां दाही दिशा । जिकडे पाहें तिकडे सरिसा ॥३॥ तुका ह्मणे समपदीं । उभा दिठीचिये आधीं ॥४॥

॥ ३४९० ॥

जयापासोनि सकळ । महीमंडळ हें जालें ॥ १ ॥ तो एक पंढरीचा राणा ।

---

पाठभेदः—१ त्याचे.

अनुमाना श्रुतीसी[1] ॥ २ ॥ विवादती जयासाटीं । जेगजेठी तो वि-
ठ्ठल ॥ ३ ॥ तुका ह्मणे तो आकळ । आहे सकळ व्यापक ॥ ४ ॥

॥ ३४९१ ॥

पाहा रे हें दैवत कैसें। भक्तिपिसें भाविक ॥ १ ॥ पाचारिल्या सरिसें
पावे । ऐसी[2] सवें वराडी ॥ २ ॥ शुष्ककाष्ठीं गुरगुरी । लाज हरि
न धरी[3] ॥ ३ ॥ तुका ह्मणे अर्धनारी । ऐसीं धरी रूपडीं ॥ ४ ॥

॥ ३४९२ ॥

आंत हरि बाहेर हरि। हरिनें घरीं कोंडिलें ॥१॥ हरिनें कामा घातला
चिरा। चित्तवरा मुकविलें ॥२॥ हरिनें जीवें केली साटी। पाडिली तुटी
सकळांसी ॥३॥ तुका ह्मणे वेगळा नव्हे। हरि भोवे भोंवताला ॥ ४ ॥

॥ ३४९३ ॥

दाता नारायण । स्वयें भोगितां आपण ॥ १ ॥ आतां काय उरलें
वाचे । पुढें शब्द बोलायाचे ॥ २ ॥ देखतीं जे डोळे । रूप आपुलें
तें खेळे ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाद । जाला अवघा गोविंद ॥ ४ ॥

॥ ३४९४ ॥

ब्रह्म न लिंपे त्या मेळें । कर्माअकर्मा वेगळें ॥ १ ॥ तोचि एक तया
जाणे। पावे अनुभविलें खुणें ॥ २ ॥ शौच अशौचाचे संधी। तन आळा
तना मधीं ॥३॥ पापपुण्या नाहीं ठाव । तुका ह्मणे सहज भाव ॥ ४ ॥

॥ ३४९५ ॥

लक्षूनियां योगी पाहाती आभास। तें दिसे आह्मांस दृष्टी पुढें ॥ १ ॥
कर दोनी कटी राहिलासे उभा । सांवळी हे प्रभा अंगकांती ॥ २ ॥
व्यापूनि वेगळें राहिलेंसें दुरी । सकळां अंतरीं निर्विकार ॥ ३ ॥
रूप नाहीं रेखा नामही जयासी। आपुल्या मनासीं[4] शिव ध्याय ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ नये श्रुती अनुमाना. २ ऐसें सेवे. ३ धरीतां. ४ मानसीं.

अंत नाहीं पार वर्णी नाहीं थार । कुळ याति शिर हस्त पाद ॥ ५ ॥
अचेत चेतलें भक्तीचिया सुखें । आपुल्या कौतुकें तुका ह्मणे ॥ ६ ॥

॥ ३४९६ ॥

तुझे वर्णूं गुण ऐसी नाहीं मती । राहिल्या त्या श्रुती मौन्यपणें ॥ १ ॥
मौन्यपणें वाचा थोंटावल्या चारी । ऐसें तुझें हरी रूप आहे ॥ २ ॥
रूप तुझें ऐसें डोळां न देखवे । जेथें आहे झकवे ब्रह्मादिक ॥ ३ ॥
ब्रह्मादिकां देवां कर्माची कचाटी । ह्मणोनि आटाटी फार त्यांसी ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुझें गुण नाम रूप । आहेसी अमूप वाणूं काई ॥ ५ ॥

॥ ३४९७ ॥

तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं । दुजा कोणी तीहीं त्रिभुवनीं ॥ १ ॥
सहस्रमुखें शेष सिणला बापुडा । चिरलिया धडा जिव्हा त्याच्या ॥२॥
अव्यक्ता अलक्षा अपारा अनंता । निर्गुणा सच्चिदा नारायणा ॥ ३ ॥
रूप नाम घेसी आपुल्या स्वइच्छा । होसी भाव तैसा त्याकारणें ॥ ४ ॥
तुका ह्मणे जरी दाविसी आपणा । तरिच नारायणा कळों येसी ॥ ५ ॥

॥ ३४९८ ॥

स्तुति करूं तरी नव्हेचि या वेदा । तेथें माझा धंदा कोणीकडे ॥ १ ॥
परी हे वैखरी गोडावली सुखें । रसना रस मुखें इच्छीतसे ॥ २ ॥
रूप वर्णावया कोठें पुरे मती । रोमीं होती जाती ब्रह्मांडें हीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तूंच ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा जाली नाहीं ॥ ४ ॥

॥ ३४९९ ॥

ज्याचे गर्जतां पवाडे । श्रुतिशास्त्रां मौन्य पडे ॥ १ ॥ तेथें माझी वाचा
किती । पुरे करावया स्तुती ॥ २ ॥ सिणलीं सहस्र तोंडें । शेषाफणी-
ऐसें धेंडें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मही । पत्र सिंधु न पुरे शाही ॥ ४ ॥

॥ ३५०० ॥

आवडीसारिखें संपादिलें सोंग । अनंत हें मग जालें नाम ॥ १ ॥

॥ ३५०१ ॥

कळे ऐशा वाटा रचिल्या सुलभा । दुर्गम या नभाचाही साक्षी ॥२॥
हातें जेवी एक मुखीं मागे घांस । माउली जयास तैसी बाळा ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझें ध्यान विटेवरी । तैसीच गोजिरी दिसे मूर्ति ॥ ४ ॥

॥ ३५०२ ॥

जाणोनि नेणतें करीं माझें मन । तुझी प्रेमखूण देऊनियां ॥ १ ॥
मग मी व्यवहारीं असेन वर्तत । जेवीं जळा आंत पद्मपत्र ॥ २ ॥
ऐकोनि नाइकें निंदास्तुति कानीं । जैसा कां उन्मनी योगिराज ॥३॥
देखोनि न देखें प्रपंच हा दृष्टी । स्वप्नींचिया सृष्टि चेविल्या जेवीं ॥४॥
तुका ह्मणे ऐसें जालियावांचून । करणें तें तें सीण वाटतसे ॥ ५ ॥

॥ ३५०३ ॥

उपाधिवेगळे तुह्मी निर्विकार । कांहींच संसार तुम्हा नाहीं ॥ १ ॥
ऐसें मज करूनि ठेवा नारायणा । समूळ वासना नुरवावी ॥ २ ॥
निःसंग तुम्हांसी राहणें एकट । नाहीं कटकट साहों येत ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं मिळों येत शिळा । रंगासी सकळा स्पटिकाची ॥ ४ ॥

॥ ३५०४ ॥

पडिला प्रसंग कां मी ऐसा नेणें । संकल्प ते मनें जिरवले ॥ १ ॥
चेष्टविलें तरी सांगावें कारण । भक्ती ते उजवण करावया ॥ २ ॥
लावूनियां दृष्टि घेतली सामोरी । बैसलें जिव्हारीं डसोन तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जीवा लाविला तो चाळा । करावें गोपाळा शीघ्र दान ॥४॥

॥ ३५०५ ॥

प्रगट व्हावें हे अज्ञानवासना । माझी नारायणा हीनबुद्धि ॥ १ ॥
खाणीवाणी होसी काष्ठीं तूं पाषाणीं । जंतु जीवजनीं प्रसिद्ध हा ॥२॥
ज्ञानहीन तुज पाहें अल्पमति । लहान हा चित्तीं धरोनियां ॥ ३ ॥

परि तूं कृपाळ होसी देवराणा । ब्रीदें तुझीं जना प्रसिद्ध हें ॥ ४ ॥ उतावीळ बहु भक्तांचिया काजा। होसी केशीराजा तुका ह्मणे ॥५॥

॥ ३५०६ ॥

गायनाचे रंगीं । शक्ति अद्भुत हे अंगीं ॥१॥ हें तों देणें तुमचें देवा। घ्यावी अखंडित सेवा ॥ २ ॥ अंगीं प्रेमाचें भरतें । नेघे[1] उतार चढतें ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाणी । परमे[2] अमृताची खाणी ॥ ४ ॥

॥ ३५०७ ॥

सेवटींची विनंती । ऐका ऐका कमळापती ॥१॥ काया वाचा मन । चरणीं असे समर्पण ॥ २ ॥ जीवपरमात्मा ऐक्यासि । सदा वसो हृदयेंसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । कंठीं वसावें केशवा ॥ ४ ॥

॥ ३५०८ ॥

आह्मी तरी आस । जालों टाकोनि उदास ॥ १ ॥ आतां कोण भय धरी । पुढें मरणाचें हरी ॥ २ ॥ भलते ठायीं पडों । देह तुरंगीं हा चढो॥३॥ तुमचें तुह्मांपासीं । आह्मी आहों जैसीं तैसीं ॥४॥ गेले मानामान । सुख दु:खाचें खंडन॥५॥तुका ह्मणे चित्तीं ।नाहीं वागवीत खंती।६।

॥ ३५०९ ॥

आह्मी जाणों तुझा भाव । कैंचा भक्त कैंचा देव । बीजा नाहीं ठाव । कैंचें फळ सेवटीं ॥ १ ॥ संपादिलें बहु रूप । कैंचें पुण्य कैंचें पाप । नव्हतों आह्मी आप। आपणां[3]जी देखिलें ॥२॥ एके ठायीं घरिच्याघरीं। न कळतां जाली चोरी । तेथें तेचि दुरी । जाणें येणें खुंटलें ॥३॥ तुका ह्मणे धरूनि हातीं।उरी ठेविली मागुती।एकांतीं लोकांतीं।देवभक्ति सोहळा॥४॥

॥ ३५१० ॥

भोगावरि आह्मीं घातला पाषाण । मरणा मरण आणियेलें ॥ १ ॥ विश्व तूं व्यापक काय मी निराळा । काशासाटीं बळा येऊं आतां ॥२॥

---

पाठभेद:—१ नाहीं. २ नाम. ३ आपणासी.

काय सारूनियां काढावें बाहेरी । आणूनि भीतरी काय ठेवूं ॥ ३ ॥
केला तरि उरे शीर्णचि कोरडा । बळें घ्यावी पीडा स्वपनींची ॥ ४ ॥
आवघेचि वाण आले तुह्मां घरा । मजुरी मजुरा रोजकीर्दी ॥ ५ ॥
तुका ह्मणे कांहीं नेणें लाभ हानी । असेल तो धनी राखो वाडा ॥६॥

॥ ३५११ ॥

तरुवर बीजा पोटीं । बीज तरुवरा सेवटीं ॥१॥ तैसें तुह्मां आह्मां जालें । एकीं एक सामावलें ॥ २ ॥ उदकावरील तरंग । तरंग उदकाचें अंग ॥ ३ ॥ तुका ह्मणे बिंबछाया । ठायीं पावली विलया ॥ ४ ॥

॥ ३५१२ ॥

क्षरला सागर गंगा ओघीं मिळे । आपणाचि खेळे आपणाशीं ॥ १ ॥
मधील ते वाव अवघी उपाधि । तुह्मां आह्मांमधीं तेचि परी ॥ २ ॥
घट मठ झाले आकाशाचे पोटीं । वचनेंचि तुटी तेथेंचि तें ॥ ३ ॥
तुका ह्मणे बीजें बीज दाखविलें । फल पुष्प आलें गेलें वांयां ॥ ४ ॥

॥ ३५१३ ॥

दूरि तोंचि होतों आपुले आशंके । नव्हतें ठाउकें मूळभेद ॥ १ ॥
आतां जेथें तेथें येईन सांगातें । लपाया पुरतें उरों नेदीं ॥ २ ॥
मिथ्या मोहें मज लाविला उशीर । तरी हें अंतर जालें होतें ॥ ३ ॥
तुका ह्मणे कां रे दाखविसी भिन्न । लटिकाचि सीण लपंडाई ॥ ४ ॥

॥ ३५१४ ॥

लवण मेळवितां जळें । काय उरलें निराळें ॥ १ ॥ तैसा समरस जालों । तुजमाजी हरपलों ॥ २ ॥ अग्निकर्पुराच्या मेळीं । काय उरली काजळी ॥३॥ तुका ह्मणे होती । तुझी माझी एक ज्योती ॥४॥

॥ ३५१५ ॥

तुज मज नाहीं भेद । केला सहज विनोद ॥१॥ तूं माझा आकार । मी तों

पाठभेदः—१ वादचि. २ बिंबच्छाया.

तूंच निर्धार ॥२॥ मी तुजमाजी देवा । घेसी माझ्या अंगें सेवा ॥३॥ मी तुजमाजी अचळ। मजमाजी तूं सबळ ॥४॥तूं बोलसी माझ्या मुखें। मी तों तुजमाजी सुखें ॥५॥ तुका ह्मणे देवा। विपरीत ठायीं नांवा ॥६॥

॥ ३५१६ ॥

तुज मज ऐसी परी । जैसे तरंग सागरीं ॥१॥ दोहींमाजी एक जाणा। विठ्ठल पंढरीचा राणा ॥ २ ॥ देव भक्त ऐसी बोली । जंव भ्रांति नाहीं गेली ॥३॥ तंतु पट जेवीं एक । तैसा विश्वेसीं व्यापक ॥ ४ ॥

॥ ३५१७ ॥

जें जें कांहीं करितों देवा । तें तें सेवा समर्पें ॥१॥ भेद नाहीं सर्वात्मना । नारायणा तुज मज ॥२॥ आह्मी दुजें नेणों कोणा। हेंचि मना मन साक्ष ॥३॥ तुका ह्मणे जगन्नाथा । हें अन्यथा नव्हे कीं ॥ ४ ॥

॥ ३५१८ ॥

मीचि मज व्यालों । पोटा आपुलिया आलों ॥ १ ॥ आतां पुरले नवस । निरसोनि गेली आस ॥ २ ॥ जालों बरा बळी। गेलों मरोनि ते काळीं ॥ ३ ॥ दोहींकडे पाहे । तुका आहे तैसा आहे ॥ ४ ॥

॥ ३५१९ ॥

रज्जु धरूनियां हातीं। भेडसाविलीं नेणतीं। कळों येतां चित्तीं।दोरी दोघां सारिखी ॥१॥ तुह्मां आह्मांमध्यें हरी। जाली होती तैसी परी। मृगजळाचे पुरीं। ठाव पाहों तरावया ॥ २ ॥ सरी चिताक भोंवरी। अळंकाराचिया परी। नामें जालीं दुरी। एक सोनें आटितां ॥३॥ पिसांचीं पारवीं। करोनि बाजागिरी दावी। तुका ह्मणे तेवीं। मज नको चाळवूं ॥ ४ ॥

॥ ३५२० ॥

खडा खाळी साकर। जाला नामाचाचि फेर। न दिसे अंतर।गोडी ठायीं निवडितां ॥१॥ तुह्मी आह्मी पांडुरंगा। भिन्न ऐसें काय सांगा। चाळविलें जगा। मी हें माझें यासाटीं ॥ २ ॥ पायीं हातीं नाकीं शिरीं। हेम राहे

अळंकारीं। मुसे आल्यावरी। काय निवडे वेगळें ॥ ३ ॥ निजलिया लाभ
हानी। तोंच खरी ते स्वप्नीं। तुका ह्मणे दोन्ही। निवारलीं जागतां ॥४॥

॥ ३५२१ ॥

अस्त नाहीं आतां एकचि मोहोरा। पासूनि अंधारा दुरि जालों ॥ १ ॥
साक्षत्वें या जालों गुणाचा देखणा। करीं नारायणा तरी खरें ॥ २ ॥
आठवें विसरु पडियेला मागें। आलें तेंचि भागें यत्न केलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझा विनोद देवासीं। आह्मी तुह्मां ऐसीं दोन्ही नव्हों ॥४॥

॥ ३५२२ ॥

धन्य मी मानीन आपुलें संचित। राहिलीसे प्रीत तुझे नामीं ॥ १ ॥
धन्य जालों आतां यासि संदेह नाहीं। न पडों या वाही काळा हातीं॥२॥
ब्रह्मरस करूं भोजन पंगती। संतांचे संगती सर्वकाळ ॥ ३ ॥
तुका ह्मणे पोट धालेंचि न धाये। खादलेंचि खायें आवडीनें ॥ ४ ॥

॥ ३५२३ ॥

कासियानें पूजा करूं केशीराजा। हाचि संदेह माझा फेडी आतां॥१॥
उदकें न्हाणूं तरी स्वरूपचि तुझें। तेथें देवा माझें काय वेचे ॥ २ ॥
गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमल। तेथें मी दुर्बळ काय वाहूं ॥ ३ ॥
वाहूं परी दक्षिणा धातु नारायणा। अन्न परब्रह्म दुजें नाहीं ॥ ४ ॥
गातां तूं ओंकार टाळी नादेश्वर। नाचावया थार नाहीं कोठें॥ ५ ॥
फळदाता तूंच तांबोल अक्षता। तेथें[3] मी अनंता काय वाहूं ॥ ६ ॥
तुका ह्मणे मज अवघें तुझें नाम। धूप दीप रामकृष्णहरि ॥ ७ ॥

॥ ३५२४ ॥

कवणा पाषाणासी धरूनि भाव। कवणावरी पाव ठेवूं आतां ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ करूं. २ वाहूं दक्षिणा जरी धातु नारायण। ब्रह्म तेंचि अन्न दुजें काई ॥ ३ तरी काय आतां वाहों तुज ॥ ४ हरी सर्व.

ह्मणऊनि निश्चिंत राहिलों मनीं । तूंचि सर्वां खाणीं देखोनियां ॥ २
कवणाचें कारण नलगेचि कांहीं । सर्वां सर्वां ठायीं तूं मज एक ॥ ३
कायावाचामन ठेविलें तुझ्या पायीं । आतां उरलें काई न दिसे देवा ॥ ४
जळें जळ काय धोवियेलें एक । कवण तें पातक हरलें तेथें ॥ ५
पापपुण्य हे वासना सकळ । ते तुज समूळ समर्पिली ॥ ६
पितरस्वरूपी तूंचि जनार्दन । सव्य तें कवण अपसव्य ॥ ७
तुका ह्मणे जीत पिंड तुह्मां हातीं । देऊनि निश्चिंती मानियेली ॥ ८

॥ ३५२५ ॥

जन्ममरणांची विसरलों चिंता । तूं माझा अनंता मायबाप[1] ॥ १
होतील ते डोळां पाहेन प्रकार । भय आणि भार निरसलीं ॥ २
लिंगाडाचें मूळ होतीं पंचभूतें । त्यांचें या पुरतें विभागिलें ॥ ३
तुका ह्मणे जाला प्रपंच पारिखा । जिवासी तूं सखा पांडुरंगा ॥ ४

॥ ३५२६ ॥

वंदीन मी भूतें । आतां अवघींचि समस्तें ॥ १ ॥ तुमची क
भावना । पदोपदीं नारायणा ॥ २ ॥ गाळुनियां भेद । प्रमाण तो
वेद ॥ ३ ॥ तुका ह्मणे मग । नव्हे दुजयाचा संग ॥ ४ ॥

॥ ३५२७ ॥

जेथें जेथें जासी । तेथें मजचि तूं पाहसी ॥ १ ॥ ऐसा पसरीन भ
रिता नाहीं कोणी ठाव ॥ २ ॥ चित्त जडलें पायीं । पाळती हें ट
ठायीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे पोटीं । देव घालूनि सांगें गोष्टी ॥ ४ ॥

॥ ३५२८ ॥

आह्मी न देखों अवगुणां । पापी पवित्र शाहाणा ॥ १ ॥ अवघीं
तुह्मी देवा । वंदूं भावें करूं सेवा ॥ २ ॥ मज भक्ती सवें चाड ।
पाषाण धातु वाड ॥ ३ ॥ तुका ह्मणे घोटीं । विष अमृत तुजसाटीं ।

पाठभेदः—१ मायबाप.

॥ ३५२९ ॥

तुज करितां होती ऐसे । मूढ चतुर पंडित पिसे ॥ १ ॥ परि वर्म नेणे तें कोणी । पीडाखाणी भोगितील ॥ २ ॥ उलंघितें पांगुळ गिरी । मुकें करी अनुवाद ॥ ३ ॥ पापी होय पुण्यवंत । न करी घात दुर्जन ॥ ४ ॥ अवघें हेळामात्रें हरि । मुक्त करी ब्रह्मांड ॥ ५ ॥ तुका ह्मणे खेळे लीळा । पाहे वेगळा व्यापूनि ॥ ६ ॥

॥ ३५३० ॥

कडसणी धरितां अडचणीचा ठाव । ह्मणऊनि जीव त्रासलासे ॥ १ ॥ लौकिकाबाहेरि राहिलों निराळा । तुजविण वेगळा नाहीं दुजा ॥ २ ॥ संकोचानें नाहीं होत धणीवरी । उरवूनि उरी काय काज ॥ ३ ॥ तुका ह्मणे केलें इच्छेचि सारिखें । नाहींसे पारिखें येथें कोणी ॥ ४ ॥

॥ ३५३१ ॥

अंतराय पडे गोविंदीं अंतर । जो जो घ्यावा भार तोचि बाधी ॥ १ ॥ बैसलिये ठायीं आठवीन पाय । पाहीन तो ठाय तुझा देवा ॥ २ ॥ अखंड तें खंडें संकल्पीं विकल्प । मनोजन्य पाप रज्जुसर्प ॥ ३ ॥ तुका ह्मणे विश्वीं विश्वंभर वसे । राहों ऐसे दशे सुखरूप ॥ ४ ॥

॥ ३५३२ ॥

माझिया वैशाची मज नाहीं चाड । कोठें करूं कोड आणिकांचें ॥ १ ॥ इच्छितां ते मान मागा देवापासीं । असा संचितासी गुंपले हो ॥ २ ॥ देह आह्मी केला भोगाचे सांभाळीं । राहिलों निराळीं मानामानां ॥ ३ ॥ तुका ह्मणे कोणें वेचावें वचन । नसता तो सीण वाढवावा ॥ ४ ॥

॥ ३५३३ ॥

बोळविला देह आपुलेनि हातें । हुताशिलीं भूतें ब्रह्माग्नीसी ॥ १ ॥ एक वेळे जालें सकळ कारण । आतां नारायण नारायण ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ देहाची.

अमृतसंजीवनी निवविली खाई । अंगें तये ठायीं हारपलीं ॥
एकादशीविध जागरण उपवास । बारावा दिवस भोजनाचा ॥
अवघीं कर्मे जालीं घटस्पोटापाशीं । संबंध एकेसी उरला नामीं ॥
तुका ह्मणे आतां आनंदीं आनंदु । गोविंदें गोविंदु विस्तारला ॥

॥ ३५३४ ॥

नलगे मरावें । ऐसा ठाव दिला देवें ॥ १ ॥ माझ्या उपकारासा[illegible] वागविला म्हूण कंठीं ॥ २ ॥ घरीं दिला ठाव । अवघा सक[illegible] वाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे एके ठायीं । कोठें माझें तुझें नाहीं ॥ [illegible]

॥ ३५३५ ॥

एकाएकीं आतां अ[illegible] केलें ॥ १
[illegible] करुना दारीं माजीं वसा ॥
[illegible] आधार । सवें हुद्देदार चेष्टाविला ॥ ३
[illegible] नय होतें तोंचि वरी । होती कांहीं उरीं स्वामिसेवा ॥ [illegible]

॥ ३५३६ ॥

सोसोनि विपत्ती । जोडी दिली तुझे हातीं ॥ १ ॥ त्याचा हाचि उ[illegible] कार । अंतीं आह्मांशीं व्रेव्हार ॥ २ ॥ नामरूपा केला ठाव । तुज को[illegible] ह्मणतें देव ॥ ३ ॥ तुका ह्मणे हरी । तुज ठाव दिला घरीं ॥ ४

॥ ३५३७ ॥

जेथें देखें तेथें उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ १ ॥ डोळां बैसलें बै सलें । ध्यान राहोनि संचलें ॥ २ ॥ सरसावलें मन । केलें सोज्व[illegible] लोचन ॥ ३ ॥ तुका ह्मणे सवें । आतां असिजेत देवें ॥ ४ ॥

॥ ३५३८ ॥

होचि तुझी पूजा । आतां करीन केशीराजा ॥ १ ॥ अवघीं तुझींच

---

पाठभेदः—१ डाव.

पदें । नमस्कारीन अभेदें ॥ २ ॥ न वार्जित दिशा । जाय तेथेंचि
सरिसा ॥ ३ ॥ नव्हे एकदेशी । तुका ह्मणे संकल्पेंसी[1] ॥ ४ ॥

॥ ३५३९ ॥

वेठी ऐसा भाव । न करी आह्माच उपाव ॥ १ ॥ रूप उसवी न
जीवा । अवघा येच ठायीं हेवा ॥ २ ॥ कृपणाचे परी । लेखा पळ नि
मिषेवरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे असा । संनिधचि जगदीशा ॥ ४ ॥

॥ ३५४० ॥

नेलें सळेंबळें । चित्ताविताचें गांठोळें ॥ १ ॥ साह्य जालीं घरिच्या
घरीं । होतां ठायींच कुठोरी ॥ २ ॥ मी पातलों या भावा । कपट
नेणें देवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे उघडें केलें । माझें माझ्या हातें नेलें ॥ ४

॥ ३५४१ ॥

एका वेळे केलें रितें कळिवर । आंत दिली थार पांडुरंगा ॥ १
पाळण पोषण लागलें ते सोई । देहाचें तें काई सर्व भाव ॥ २
माझिया मरणें जाली हे वसति । लागली ते ज्योती अविनाशा ॥ ३
जाला ऐसा एका घायें येथें नाहीं । तुका ह्मणे कांहीं बोलों नये ॥ ४

॥ ३५४२ ॥

नटनाट्य तुह्मी केले याचसाटीं । कवतुकें दृष्टी निववावी ॥ १
नाहीं तरि काय कळलेंचि आहे । वाघ आणि गाय लांकडाची ॥ २
अभेदचि असे मांडियेलें खेळा । केल्या दीपकळा बहुएकी ॥ ३
तुका ह्मणे रूप नाहीं दर्पणांत । संतोषाची मात दुसरें तें ॥ ४

॥ ३५४३ ॥

अज्ञान हा देह स्वरूपीं मीनला । सर्व वोसावला देहपात ॥ १
ज्ञानस्वरूपाची सांगड मिळाली । अंतरीं पाहिली ज्ञानज्योति ॥ २
तुका ह्मणे चित्त स्वरूपीं राहिलें । देह विसावलें तुझ्या पायीं ॥ ३

---

पाठभेदः—१ गुणदोषीं.

॥ ३५४४ ॥

मुसावलें अंग । रंगीं मेळविला रंग ॥ १ ॥ एकीं एक दृढ जालें । मुळा आपुलिया आलें ॥ २ ॥ सागरीं थेंबुटा[1] । पडिल्या निवडे कोण्या वाटा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नवें । नव्हे जाणावें हें देवें ॥ ४ ॥

॥ ३५४५ ॥

तुझे पाय माझे राहियेले चित्तीं । ते मज दाविती वर्म देवा ॥ १ ॥
आह्मां अंधां तुझ्या पायांचा आधार । जाणसी विचार चालवितां ॥ २ ॥
मन स्थीर ठेलें इंद्रियें निश्चळ । हें तों माझें बळ नव्हे देवा ॥ ३ ॥
पापपुण्य भेद नासिलें तिमिर । त्रिगुण शरीर सांडियेलें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुझा प्रताप हा खरा । मी जाणें दातारा शरणागत ॥ ५ ॥

॥ ३५४६ ॥

जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनियां ॥ १ ॥
चालों वाटे आह्मी तुझाचि आधार । चालविसी भार सवें माझा ॥ २ ॥
बोलों जातां बरळ करिसी तें नीट । नेली लाज धीट केलों देवा ॥ ३ ॥
अवघे जन मज जाले लोकपाळ । सोइरे सकळ प्राणसखे ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां खेळतों कौतुकें । जालें तुझें सुख अंतर्बाहीं ॥ ५ ॥

॥ ३५४७ ॥

रूपीं जडले लोचन । पायीं स्थिरावलें मन ॥ १ ॥ देहभाव हरपला । तुज पाहातां विठ्ठला ॥ २ ॥ कळों नेदी[2] सुखदुःख । तान हरपली भूक ॥ ४ ॥ तुका ह्मणे नव्हे परती । तुझ्या दर्शनें मागुती ॥ ४ ॥

॥ ३५४८ ॥

तेव्हां होतों भोगाधीन । तुह्मां भिन्न पासूनि ॥ १ ॥ आतां बोलों नये ऐसें । अनारिसें वेगळें ॥ २ ॥ सन्मुख जालों स्वामीकडे

---

पाठभेदः—१ थेंबुडा. २ नये.

भव आंगेडे[1] निराळें ॥ ३ ॥ चिंतिलें तें चिंतामणी । फिटे धणी तों द्यावें ॥ ४ ॥ सहज स्थिति आहे अंगीं । प्रसंगीं ते वंचेना ॥ ५ ॥ तुमची देवा धरिली कास । केला नास प्रपंचों[2] ॥ ६ ॥ तुका ह्मणे जाणोनि वर्म । कर्माकर्म ठेविलीं ॥ ७ ॥

॥ ३५४९ ॥

देव सखा आतां केलें नव्हे काई । तेणें सकळही सोइरींच ॥ १ ॥
भाग्यवंत जालों गोतें सपुरतीं । आतां पुण्य नीती पार नाहीं ॥ २ ॥
पाहातां दिसती भरलिया दिशा । ठसावला ठसा लोकत्रयीं ॥ ३ ॥
अविनाश जोडी आम्हां भाग्यवंतां । जाली होती सत्ता संचिताची ॥ ४ ॥
पायांवरी डोई ठेवाया आरोथा[3] । जाली द्यावी सत्ता क्षेम ऐसी ॥ ५ ॥
तुका ह्मणे जीव पावला विसावा । ह्मणवितां देवा तुमचींसीं ॥ ६ ॥

॥ ३५५० ॥

करूनि उचित खेळें भोवतालें । चित्त येथें आलें पायांपाशीं ॥ १ ॥
येथें नाहीं खोटा चालत परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ २ ॥
सुख दुःख तुज देऊनि सकळ । नाहीं ऐसा काळ केला आह्मी ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाला देहाचा विसर । आतां आप पर नाहीं कोणी ॥ ४ ॥

॥ ३५५१ ॥

तेणें सुखें माझें निवालें हें अंग । विठ्ठल हें जग देखियेलें ॥ १ ॥
कवतुकें करुणा भाकितसें लाडें । आवडी बोबडें बोलोनियां ॥ २ ॥
मज नाहीं दशा अंतरीं दुःखाची । भावना भेदाची समूळ गेली ॥ ३ ॥
तुका ह्मणे सुख जालें माझ्या जीवा । रंगलें केशवा तुझ्या रंगें ॥ ४ ॥

॥ ३५५२ ॥

दिला जीव भाव । तेव्हां सांडिला म्यां ठाव ॥ १ ॥ आतां वर्ते तुझी

---

पाठभेदः—१ ओंठडे निराळे. २ प्रपंचाचा. ३ अरोथा. ४ चिंतन.

सत्ता । येथें सकळ अनंता ॥ २ ॥ माझिया मरणें । तुह्मी बैसविलें ठाणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं । मीं हें माझें येथें नाहीं ॥ ४ ॥

॥ ३५५३ ॥

आपुलिया काजा । आह्मीं सांडियेली लाजा ॥ १ ॥ तुह्मां असों जागवीत । आपुलिये हातीं हित ॥ २ ॥ तुह्मी देहशून्य । आह्मां कळे पापपुण्य ॥ ३ ॥ सांगायासी लोकां । उरउरीत उरला तुका ॥ ४ ॥

॥ ३५५४ ॥

पदोपदीं दिलें अंग । जालें सांग कारण ॥ १ ॥ रुधवूनि ठेलों ठाव । जागा वाव सकळ ॥ २ ॥ पुढती चाली मनालाहो । वाढे देहो संतोष ॥ ३ ॥ तुका ह्मणे क्षरभागीं । जालों जगीं व्यापक ॥ ४ ॥

॥ ३५५५ ॥

तुझें अंगभूत । आह्मी जाणतों समस्त ॥ १ ॥ येरा वाटतसे जना । गुढारसें नारायणा ॥ २ ॥ ठावा थारा मारा । घराचिया संव चोरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेदा । करूनि करितों संवादा ॥ ४ ॥

॥ ३५५६ ॥

नाहीं मज कोणी उरला दुर्जन । मायबापाविण ब्रह्मांडांत ॥ १ ॥ कासया जिकीर करणें येविसीं । भयची मानसीं चिंता खंती ॥ २ ॥ विश्वंभराचिये लागलों सांभाळीं । सत्तेनें¹ तो चाळी आपुलिये ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें पाळणपोषण । करितां आपण पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ३५५७ ॥

श्रमपरिहारा । मूळ हें जालें दातारा ॥ १ ॥ देह निवेदूनि पायीं । जालों रिकामा उतराई ॥ २ ॥ आपली ते सत्ता । येथें असों नेदीं आतां ॥ ३ ॥ राहिला निराळा । तुका कटकटे वेगळा ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ संत नेती चाली आपुलिया.

॥ ३५५८ ॥

मनाचिये साक्षी जाली सांगों मात । सकळ वृत्तांत आपला तो ॥१॥
तुह्मां परामृश घेणें सत्ताबळें । धरितां निराळें कैसीं वांचों ॥ २ ॥
मी माझें सांडून थावया पसारा । आणीक दातारा काय काज ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी तुजविण एका । निढळ लौकिका माजी असों ॥४॥

॥ ३५५९ ॥

पंचभूतांचिये सांपडलों संदीं । घातलोंसे[1] बंदीं अहंकारें ॥ १ ॥
आपुला आपण बांधविला गळा । नेणेंचि निराळा असतां ही ॥ २ ॥
कासया हा सत्य मानिला[2] संसार । कां हे केले चार माझें माझें ॥ ३ ॥
कां नाहीं शरण गेलों नारायणा । कां नाहीं वासना आवरिली ॥ ४ ॥
किंचित सुखाचा धरिला अभिळास । तेणें केला नास बहु पुढें ॥ ५ ॥
तुका ह्मणे आतां देह देऊं बळी । करुनि सांडूं होळी संचिताची॥६॥

॥ ३५६० ॥

स्थिरावली वृत्ति पांगुळला प्राण । अंतरींची खूण पावूनियां ॥ १ ॥
पुंजाळले नेत्र जाले अर्धोन्मीलित । कंठ सद्गदित रोमांच आले ॥२॥
चित्त चाकाटलें स्वरूपामाझारीं । न निघे बाहेरी सुखावलों ॥ ३ ॥
सुनीळ प्रकाश उदेजला दिन । अमृताचें पान जीवनकळा ॥ ४ ॥
शशिसूर्यां जाली जीवें ओंवाळणी । आनंदा दाटणी आनंदाची ॥ ५ ॥
तुका ह्मणे सुखें प्रेमेंसी डुलत । विरालों निश्चित निश्चितीनें ॥ ६ ॥

॥ ३५६१ ॥

देवासी लागे सकळांसी पोसावें । आह्मां नलगे खावें काय चिंता ॥१॥
देवा विचारावें लागे पापपुण्य । आह्मासी हें जन अवघें भलें ॥ २ ॥
देवासी उत्पत्ति लागला संहार । आह्मां नाहीं फार थोडें कांहीं ॥ ३ ॥

---

पाठभेदः—१ ठाकलोंसे. २ लेखिला.

देवासी काम लागला धंदा । आह्मासी ते सदा रिकामीक ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मी भले देवाहून । विचारितां गुण सर्वभावें ॥ ५ ॥

॥ ३५६२ ॥

आतां मी सर्वथा नव्हें गा दुर्बळ । यातिहीन कुळ दैन्यवाणा ॥ १ ॥
माय रखुमाई पांडुरंग पिता । शुद्ध उभयतां पक्ष दोन्ही ॥ २ ॥
बापुडा मी नव्हें दुर्बळ ठेंगणा । पांगिला हा कोणा आणिकांसी ॥ ३ ॥
दुष्ट नव्हों आह्मी अभागी अनाथ । आमुचा समर्थ कैवारी हा ॥ ४ ॥
संवसार आह्मां सरला सकळ । लपोनियां काळ ठेला धाकें ॥ ५ ॥
तुका ह्मणे जालों निर्भर मानसीं । जोडलिया रासी सुखाचिया ॥ ६ ॥

॥ ३५६३ ॥

माझे मनोरथ पावले जैं सिद्धी[1] । तई पायीं बुद्धि स्थिरावली ॥ १ ॥
समाधान जीव राहिला निश्चळ । गेली हळहळ स्मरणें हे ॥ २ ॥
त्रिविध तापाचें जालेंसे[2] दहन । सुखावलें मन प्रेमसुखें ॥ ३ ॥
महालाभ वाचे वसे पांडुरंग । अंगाअंगीं संग अखंडित ॥ ४ ॥
जीवनाचा जाला ओलावा अंतरीं । विश्व विश्वंभरीं सामावलें ॥ ५ ॥
तुका ह्मणे माप भरीं आलें सिगे । धारबोळ गंगे पूर वाहे ॥ ६ ॥

॥ ३५६४ ॥

स्वप्नींचिया गोष्टी । मज धरिलें होतें वेटीं । जालिया सेवटीं ।
जागे लटिकें सकळ ॥ १ ॥ वांयां भाकिली करुणा । मूळ पावावया
सिणा । राव रंक राणा । कैंचे स्थानावरी आहे ॥ २ ॥ सोसिलें तें
अंगें । खरें होतें नव्हतां जागें । अनुभवही सांगे । दुःखें डोळे उघ-
डिले ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतीं । सावचित केलें अंतीं । नाहीं तरि
होती । वाळी वैसोनि राहिली ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ पावविले सिद्धी. २ जालें.

॥ ३५६५ ॥

निंदी कोणी मारी । वंदी कोणी पूजा करी ॥ १ ॥ मज हेंही तेंही नाहीं । वेगळा दोहींपासूनी ॥ २ ॥ देहभोग भोगें घडे । जें जें जोडे तें बरें ॥ ३ ॥ अवघें पावे नारायणीं । जनार्दनीं तुकयाचें ॥ ४ ॥

॥ ३५६६ ॥

जन विजन जालें आह्मां । विठ्ठलनामाप्रमाणें ॥ १ ॥ पाहे तिकडे बापमाय । विठ्ठल आहे रखुमाई ॥ २ ॥ वन पट्टण एकभाव । अवघा ठाव सरता जाला ॥ ३ ॥ आठव नाहीं सुखदुःखा । नाचे तुका कवतुकें ॥ ४ ॥

॥ ३५६७ ॥

माझिया मीपणा । जाला यावरी उगाणा ॥ १ ॥ भोगी त्यागी पांडुरंग । त्यानें वसविलें अंग ॥ २ ॥ टाळिलें निमित्त । फार थोडें घात हित ॥ ३ ॥ यावें कामावरी । तुका ह्मणे नाहीं उरी ॥ ४ ॥

॥ ३५६८ ॥

न देखोन कांहीं । म्यां पाहिलें सकळही ॥ १ ॥ जालों अवघियांपरी । मी हें माझें ठेलें दुरी ॥ २ ॥ न घेतां घेतलें । हातें पायें उसंतिलें ३ खादलें न खातां । रसना रस जाली घेतां ॥४॥ न बोलोनि बोलें । केलें प्रगट झांकिलें ॥५॥ नाइकिलें कानीं । तुका ह्मणे आलें मनीं ॥ ६ ॥

॥ ३५६९ ॥

माझें माझ्या हाता आलें । आतां भलें सकळ ॥ १ ॥ काशासाटीं विषम थारा । तो अंतरा विटाळ ॥ २ ॥ जालीं तया दुःखें तुटी । मागिल पोटीं नसावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे शुद्ध कुळ । तेथें मळ काशाचा ॥ ४ ॥

॥ ३५७० ॥

रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न । चिन्मय अंजन सुदलें डोळां ॥ १॥ तेणें अंजनगुणें दिव्यदृष्टि जाली । कल्पना निवाली द्वैताद्वैत ॥ २ ॥ देशकालवस्तु भेद मावळला । आत्मा निर्वाळला विश्वाकार ॥ ३ ॥

न जाला प्रपंच आहे परब्रह्म । अहंसोहं ब्रह्म आकळलें ॥ ४ ॥
तत्त्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग । तेंचि जाला अंगें तुका आतां ॥ ५ ॥

॥ ३५७१ ॥

पिकलिये सेंदे कडुपण गेलें । तैसें आह्मां केलें पांडुरंगें ॥ १ ॥
काम क्रोध लोभ निमाले ठायींचि । सर्व आनंदाची सृष्टि जाली ॥ २ ॥
आठव नाठव गेले भावाभाव । जाला स्वयमेव पांडुरंग ॥ ३ ॥
तुका ह्मणे भाग्य या नांवें ह्मणीजे । संसारीं जन्मीजे याचि लागीं ॥ ४ ॥

॥ ३५७२ ॥

सदा नामघोष करूं हरिकथा । तेणें सदा चित्ता समाधान ॥ १ ॥
सर्वसुख ल्यालों सर्व अलंकार । आनंदें निर्भर डुलतसों ॥ २ ॥
असों ऐसा कोठें आठवही नाहीं । देहींच विदेही भोगूं दशा ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी जालों अग्निरूप । लागों नेदूं पापपुण्य अंगा ॥ ४ ॥

॥ ३५७३ ॥

पुण्यपापा ठाव नाहीं सुखदुःखा । हानि लाभ शंका नासलिया ॥ १ ॥
जितां मरण आलें आप पर गेलें । मूळ छेदियेलें संसाराचें ॥ २ ॥
अधिकार जाती वर्णधर्मयाती । ठाव नाहीं सत्य असत्याशी ॥ ३ ॥
जन वन भिन्न अचेत चळण । नाहीं दुर्जेपण ठाव यासी ॥ ४ ॥
तुका ह्मणे देह वाहिला विठ्ठलीं । तेव्हांच घडली सर्व पूजा ॥ ५ ॥

॥ ३५७४ ॥

भोगी जाला त्याग । गीती गातां पांडुरंग । इंद्रियांचा लाग । आह्मां वरूनि चुकला ॥ १ ॥ करूनि ठेविलों निश्चळ । भय नाहीं तळमळ । घेतला सकळ । अवघा भार विठ्ठलें ॥ २ ॥ तळीं पक्षिणीचे परी । नखें चोंची चारा धरीं । आणुनियां घरीं । मुखीं घाली बाळका ॥ ३ ॥ तुका ह्मणे ये आवडी । आह्मी पायीं दिली बुडी । आहे तेथें जोडी । जन्मांतरींचें ठेवणें ॥ ४ ॥

॥ ३५७५ ॥

पडिलों बाहेरि आपुल्या कर्तव्यें । संसाराचा जीवें वीट आला ॥ १ ॥
एकामध्यें एक नाहीं मिळों येत । ताक नवनीत निवडलिया ॥ २ ॥
दोन्ही जालीं नांवें एकाच्या मथनें । भुस सार गुणें वेगळालीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे कोठें वसे मुक्ताफळ । सिंपल्याचें स्थळ खंडलिया ॥ ४ ॥

॥ ३५७६ ॥

बहुतां दिसाची आजि जाली भेटी । जाली होती तुटी काळगती ॥ १ ॥
येथें सावकाश घेईन ते धणी । गेली अडचणी उगवोनि ॥ २ ॥
बहु दुःख दिलें होतें घरीं कामें । वाढला हा श्रमें श्रम होता ॥ ३ ॥
बहु दिस होता पडिला मारग । क्लेशाचा त्या त्याग आजि जाला ॥ ४ ॥
बहु होती केली सोंगसंपादणी । लौकिकापासूनि निर्गमलें ॥ ५ ॥
तुका ह्मणे येथें जालें अवसान । परमानंदीं मन विसावलें ॥ ६ ॥

॥ ३५७७ ॥

न मनावी चिंता । कांहीं माझेविशीं आतां ॥ १ ॥ ज्याणें लौकिक हा
केला । तो हें निवारिता भला ॥ २ ॥ माझे इच्छे काय । होणार ते
एक ठाय ॥ ३ ॥ सुखा आणि दुःखा । ह्मणे वेगळा मी तुका ॥ ४ ॥

॥ ३५७८ ॥

आम्ही मेलों तेव्हां देह दिला देवा । आतां करूं सेवा कोणाची मी ॥ १ ॥
सूत्रधारी जैसा हालवितो कळा । नाचतो पुतळा नाचे छंदें ॥ २ ॥
बोलतसें जैसें बोलवितो देव । नाहीं हा संदेह कासयाचा ॥ ३ ॥
पाप पुण्य ज्याचें तोचि जाणे कांहीं । संबंध हा नाहीं आह्मां सवें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुह्मी आइका हो मात । आह्मी या अतीत देहाहूनी ॥ ५ ॥

॥ ३५७९ ॥

आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो जाला सोहळा अनुपम्य ॥ १ ॥
आनंदें दाटलीं तिन्हीं त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग जाला ॥ २ ॥

एकदेशीं होतों अहंकारें आथिला । त्याच्या त्यागें जाला सुकाळ हा ॥३॥
फिटलें सुतक जन्ममरणाचें । मी माझ्या संकोचें दुरी जालों ॥ ४ ॥
नारायणें दिला वसतीस ठाव । ठेवूनियां भाव ठेलों पायीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे दिलें उमटूनि जगीं । घेतलें तें अंगीं लावूनियां ॥ ६ ॥

॥ ३५८० ॥

मरण माझें मरोन गेलें । मज केलें अमर ॥ १ ॥ ठाव पुसिलें बुड पुसिलें । वोस वोसलें देहभावा ॥ २ ॥ आला होता गेला पुर । धरिला धीर जीवनीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे बुनादीचें । जालें साचें उजवणें ॥ ४ ॥

॥ ३५८१ ॥

जगा काळ खाय । आह्मी माथां दिले पाय ॥ १ ॥ नाचों तेथें उभा राहे । जातां व्यंग करी साहे ॥ २ ॥ हरिच्या गुणें धाला । होता खातचि भुकेला ॥ ३ ॥ तुका ह्मणे हळू । जाला कढत शितळू ॥ ४ ॥

॥ ३५८२ ॥

हातीं घेऊनियां काठी । तुका लागला काळिवरा पाठी ॥ १ ॥ नेऊनि निजविलें स्मशानीं । माणसें जाळी ते ठाकणीं ॥ २ ॥ काढिलें तें ओढें । मागील उपचाराचें पुढें ॥ ३ ॥ नाहीं वाटो आला भेव । सुख दुःख भोगिता देव ॥ ४ ॥ याजसाटीं हें निर्वाण । केलें कासियेलें मन ॥ ५ ॥ तुका ह्मणे अनुभव खरा[1] । नाहीं तरी शास्त्र होय चोरा ॥ ६ ॥

॥ ३५८३ ॥

मरणा हातीं सुटली काया । विचारें या निश्चयें ॥ १ ॥ नासोनियां गेली खंती । सहजस्थिति भोगाचे ॥ २ ॥ न देखेंसें जालें श्रम । आलें वर्म हातां हें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कैंची कींव । कोठें जीव निराळा ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ बरा.

॥ ३५८४ ॥

जाला प्रेतरूप शरीराचा भाव । लक्षियेला ठाव स्मशानींचा ॥ १ ॥
रडती रात्रदिवस कामक्रोध माया । म्हणती हायहाया यमधर्म ॥ २ ॥
वैराग्याच्या शेणी लागल्या शरीरा । ज्ञानाग्नि भरभरां जीवित्वेसी ॥ ३ ॥
फिरविला घट फोडिला चरणीं । महावाक्य ध्वनीं बोंब जाली ॥ ४ ॥
दिली तिळांजुळी कुळनाम रूपासी । शरीर ज्याचे त्यासी समर्पिलें ॥५॥
तुका ह्मणे रक्षा जाली आपींआप । उजळीला दीप गुरुकृपा ॥६॥

॥ ३५८५ ॥

कोण आतां कळिकाळा । येऊं बळा देईल ॥१॥ सत्ता जाली त्रिभु-
वनीं । चक्रपाणी कोंवसा ॥ २ ॥ लंडिवाळांचा भार वाहे । उभा
आहे कुडावया ॥३॥ तुका ह्मणे घटिका दिस । निमिषही न विसंभे ॥४॥

॥ ३५८६ ॥

आह्मां शरणागतां । एवढी काय करणें चिंता ॥ १ ॥ परि हे कौतु-
काचे खेळ । अवघे पाहातों सकळ ॥ २ ॥ अभयदानवृंदें । आह्मां
कैंचीं भयद्वंद्वें ॥३॥ तुका ह्मणे आह्मी । हरिजन साधनाचे स्वामी ॥४॥

॥ ३५८७ ॥

अणुरणीयां थोकडा । तुका आकाशाएवढा ॥ १ ॥ गिळुनि सांडिलें
कळिवर । भवभ्रमाचा आकार ॥ २ ॥ सांडिली त्रिपुटी । दीप उज-
ळला घटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां । उरलों उपकारापुरता ॥ ४ ॥

॥ ३५८८ ॥

संचित प्रारब्ध क्रियमाण । अवघा जाला नारायण ॥१॥ नाहीं आ-
ह्मांसी संबंधु । जरा मरण कांहीं बाधु ॥ २ ॥ द्वैताद्वैतभावें । अवघें
व्यापियेलें देवें ॥३॥ तुका ह्मणे हरि । आम्हांमाजी क्रीडा करी ॥४॥

---

पाठभेदः—१ जनीं.

॥ ३५८९ ॥

पिंडदान पिंडें ठेविलें करून । तिळीं तिळवण मूळत्रयीं ॥ १ ॥
सारिलें संकल्प एकाचि वचनें । ब्रह्मीं ब्रह्मार्पण सेवटींच्या ॥ २ ॥
सव्य अपसव्य बुडालें हें कर्म । एकाएकी वर्म एकोविष्णु ॥ ३ ॥
पित्यापुत्रत्वाचें जालें अवसान । जनीं जनार्दन अभेदेंसी ॥ ४ ॥
आहे तैसी पूजा पावली सकळ । सहज तो काळ सारियेला[1] ॥ ५ ॥
तुका ह्मणे केला अवघ्यांचा उद्धार । आतां नमस्कार सेवटींचा ॥ ६ ॥

॥ ३५९० ॥

नभोमय जालें जळ । एकीं सकळ हरपलें ॥ १ ॥ आतां काय सारासारी । त्याच्या लहरी तयांत ॥ २ ॥ कैंचा तेथ यावा सांडी । आप कोंडी आपणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे कल्प जाला । अस्त गेला उदयो[2] ॥ ४ ॥

॥ ३५९१ ॥

उद्वेगाची धांव बैसली आसनीं । पडिलें नारायणीं मोटळें हें ॥ १ ॥
सकळ निश्चिंती जाली हा भरवसा । नाहीं गर्भवासा येणें ऐसा ॥ २ ॥
आपुलिया नांवें नाहीं आह्मां जिणें । अभिमान तेणें नेला देवें ॥ ३ ॥
का ह्मणे चळे एकाचिया सत्ता । आपुलें मिरवितां पणें ऐसें ॥ ४ ॥

॥ ३५९२ ॥

सहज लीळा मी साक्षी याचा । नये वेचूं वाचा ऐसें जालें ॥ १ ॥
उपक्रमें वदे निशब्दाची वाणी । जे कोठें बंधनीं गुंपों नेणें ॥ २ ॥
तम नासी परि वेव्हारा वेगळा । रविप्रभाकळा वर्ते जन ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें गेला अतिशय । आतां पुन्हा नये तोंड दावूं ॥ ४ ॥

॥ ३५९३ ॥

भयाची तों आह्मां चिर्त्ती । राहो खंती सकेना ॥ १ ॥ समर्पिलों जीवें

पाठभेदः—१ साधियेला २ उदय.

भावें । काशा भ्यावें कारणें ॥ २ ॥ करीन तें कवतुकें । अवघें निकें शोभेल ॥ ३ ॥ तुका ह्मणे माप भरूं । दिस सारूं कवतुकें ॥ ४ ॥

॥ ३५९४ ॥

इहलोकीं आह्मां वस्तीचें पेणें । उदासीन तेणें देहभावीं ॥ १ ॥
[1]काय पुरतें कारण मारगीं । उलंघूनि वेगीं जावें स्थळा ॥ २ ॥
सोंग संपादणी चालवितों वेव्हार । अत्यंतीं आदरें नाहीं गोवा ॥ ३ ॥
तुका ह्मणे वेंच लाविला संचिता । होईल घेतां देतां लाभ कोणां ॥ ४ ॥

॥ ३५९५ ॥

नाहीं आह्मां शत्रु सासुरें पिशुन । दाटलें हें घन माहियेर ॥ १ ॥
पाहें तेथें पांडुरंग रखुमाई । सत्यभामा राही जननिया ॥ २ ॥
लज्जा भय कांहीं आह्मां चिंता नाहीं । सर्वसुखें पायीं वोळगती ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी सदैवाचीं बाळें । जालों लडिवाळें सकळांचीं ॥ ४ ॥

॥ ३५९६ ॥

शुभ जाल्या दिशा अवघाचि काळ । अशुभ मंगळ मंगळाचें ॥ १ ॥
हातींचिया दीपें दुराविली निशी । न देखिजे कैसी आहे तेही ॥ २ ॥
सुख दुःखाहूनि नाहीं विपरीत । देतील आघात हितफळें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आता आह्मांसी हें भलें । अवघेचि जाले जीव जंत ॥ ४ ॥

॥ ३५९७ ॥

जालें पीक आह्मां अवघा सुकाळ । घेऊं अवघा काळ प्रेमसुख ॥ १ ॥
जाली अराणुक अवघियांपासून । अवघा गेला सीणभाग आतां ॥ २ ॥
अवघा जाला आह्मां एक पांडुरंग । आतां नाहीं जग माझें तुझें ॥ ३ ॥
अवघेचि आह्मी ल्यालों अळंकार । शोभलोंहि फार अवघ्यांवरी ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मी सदैवांचे दास । करणें नलगे आस आणिकांची ॥ ५ ॥

---

पाठभेदः—१ कार्यापुरतें.

॥ ३५९८ ॥

आनंदाच्या कोटी । सांठवल्या आम्हां पोटीं ॥ १ ॥ प्रेम चालिला प्रवाहो । नामओघ लवलाहो ॥ २ ॥ अखंड खंडेना जीवन । राम कृष्ण नारायण ॥३॥ थडी आहिक्य परत्र । तुका ह्मणे सम तीर ॥४॥

॥ ३५९९ ॥

संचितचि खावें । पुढें कोणाचें न घ्यावें ॥ १ ॥ आतां पुरे हे चाकरी । राहों बैसोनियां घरीं ॥ २ ॥ नाहीं काम हातीं । आराणुक दिवसराती ॥३॥ तुका ह्मणे सत्ता । पुरे पराधीनता आतां ॥ ४ ॥

॥ ३६०० ॥

आतां बरें जालें । माझें माथांचें निघालें ॥ १ ॥ चुकली हे मरमर । भार माथांचे डोंगर ॥ २ ॥ नसतां कांहीं जोडी । करिती बहुतें तडातोडी ॥३॥ जाला झाडापाडा । तुका ह्मणे गेली पीडा ॥ ४ ॥

॥ ३६०१ ॥

भावाचिया बळें । आह्मी निर्भर दुर्बळें ॥१॥ नाहीं आणिकांची सत्ता । सदा समाधान चित्ता ॥ २ ॥ तर्का नाहीं ठाव । येथें रिघावया वाव ॥ ३ ॥ एकछत्री राज । तुक्या पांडुरंगीं काज ॥ ४ ॥

॥ ३६०२ ॥

धालों सुखें ढेंकर देऊं । [illegible] जेवूं तोंवरी ॥१॥ क्रीडा करूं निरंजनीं । न पुरे धणी हरिसवें ॥ २ ॥ अवघे खेळों अवघ्यामधीं । डाई न पडों ऐसी बुद्धि ॥ ३ ॥ तुका ह्मणे वांचवितां । आह्मां सत्ता समर्थ ॥ ४ ॥

॥ ३६०३ ॥

आमचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास ॥ १ ॥ मायबापाची लाडकीं ।

कळों आलें हें लौकिकीं ॥ २ ॥ नाहीं निपराद । कोणां आह्मांमध्यें भेद ॥ ३ ॥ तुका ह्मणे नामें । अवघें आमचें हें धाम ॥ ४ ॥

॥ ३६०४ ॥

विषयीं विसर पडिला निःशेष । अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥ १ ॥ माझी मज जाली अनावर वाचा । छंद या नामाचा घेतलासे ॥ २ ॥ लाभाचिया सोसें पुढें चाले मन । धनाचा कृपण लोभी जैसा ॥ ३ ॥ तुका ह्मणे गंगा सागरसंगमीं । अवघ्या झाल्या ऊर्मि एकमय ॥ ४ ॥

॥ ३६०५ ॥

तान्हे तान्ह प्याली । भूक भुकेनें खादली ॥१॥ जेथें तेंच नाहीं जालें । झाडा घेतला विठ्ठलें ॥ २ ॥ वास वासनेसी नाहीं । मन पांगुळलें पायीं ॥ ३ ॥ शेष उरला तुका । जीवीं जीवा जाला चुका ॥ ४ ॥

॥ ३६०६ ॥

घटीं अलिप्त असे रवि । अग्नि काष्ठामाजी जेवी । तैसा नारायण जीवीं । जीवसाक्षी वर्तनें ॥१॥ भोग ज्याचे तया अंगीं । भिन्न प्रारब्ध जगीं । विचित्र ये रंगीं । रंगें रंगला गोसावी ॥ २ ॥ देह संकल्पासारिखें । एक एकांसी पारिखें । सुख आणि दुःखें । अंगीं कर्में त्रिविध ॥३॥ तुका ह्मणे कोडें । न कळे तयासी सांकडें । त्याचिया निवाडें । उगवे केलें विंदान॥४॥

॥ ३६०७ ॥

आह्मी क्षेत्रींचे संन्यासी । देहभरित हृषीकेशी । नाहीं केली ऐशी । आशाकामबोहरी ॥१॥ आलें अयाचित अंगा । सहज तें आह्मां भागा । दाता पांडुरंगा । ऐसा करितां निश्चिती ॥२॥ दंड धरिला दंडायमान । मुळीं मुंडिलें मुंडण । बंदीं बंदाचा कौपीन । बहिरवास औठडें ॥३॥

---

पाठभेदः—१ तुका ह्मणे मान । अवघें आमचें हें धन. २ पुढें चाली मना । धनाचा कृपणा लोभ जैसा.

काळें साधियेला काळ। मन करूनि निश्चळ। लौकिकीं विटाळ। धरूनि असों एकांत ॥ ४ ॥ कार्यकारणाची चाली । वाचावाचत्वें नेमिली । एका नेमें चाली । स्वरूपींच राहाणें ॥ ५ ॥ नव्हे वेषधारी । तुका आह्मांच बरवरी । आहे तैसीं बरीं । खंडें निवडितों वेदांचीं ॥ ६ ॥

॥ ३६०८ ॥

काम नाहीं काम नाहीं। जालों पाहीं रिकामा ॥१॥ फावल्या या करूं चेष्टा । निश्चळ द्रष्टा बैसोनि ॥२॥ नसत्या छंदें नसत्या छंदें। जग विनोदें वि[1]ठ्ठळतसे ॥३॥ एकाएकीं एकाएकीं। तुका लोकीं निराळा ॥४॥

॥ ३६०९ ॥

सर्वरसीं मीनलें चित्त । अखंडित आनंदु ॥१॥ गोत पति विश्वंभरीं। जाला हरि सोयरा ॥ २ ॥ वोळखी ते एका नांवें। इतर भाव खंडणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नांवें रूपें । दुसरीं पापें हारपलीं ॥ ४ ॥

॥ ३६१० ॥

ज्या ज्या आह्मांपाशीं होतील ज्या शक्ति। तेणें हा श्रीपती अळंकारूं ॥१॥
अवघा पायांपाशीं दिला जीव भाव। जन्ममरण ठाव पुसियेला ॥ २ ॥
ज्याचें देणें त्यासी घातला संकल्प । बंधनाचें पाप चुकविलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें उरला विठ्ठल । खाये बोले बोल गाये नाचे ॥ ४ ॥

॥ ३६११ ॥

याजसाटीं केला होता आटाहास । सेवटींचा दिस गोड व्हावा ॥१॥
आतां निश्चितीनें पावलों विसांवा । खुंटलिया धांवा तृष्णेचिया ॥२॥
कवतुक वाटे जालिया वेचावें । नांव मंगळाचें तेणें गुणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे मुक्ति परिणिली नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळीं ॥४॥

॥ ३६१२ ॥

अनुभवें अनुभव अवघाचि साधिला। तरि स्थिरावला मनु ठायीं ॥१॥

पाठभेद:—१ विन्हडतसे,

पिटूनियां मुसे आला अळंकार । दग्ध तें असार होऊनियां ॥ २ ॥
एकचि उरलें कायावाचामना । आनंद भुवनामाजी त्रयीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी जिंकिला संसार । होऊनि किंकर विठोबाचे ॥ ४ ॥

॥ ३६१३ ॥

यज्ञ भूतांच्या पाळणा । भेद कारिया कारणा । पावावया उपासना । ब्रह्म-स्थानीं प्रस्थान ॥ १ ॥ एक परी पडिलें भागीं । फळ बीजाचिये अंगीं । धन्य तोचि जगीं । आदि अंत सांभाळी ॥ २ ॥ आवश्यक तो शेवट । मार्गें अवघी खटपट । चालों जाणे वाट । ऐसा विरळा एखादा ॥ ३ ॥ तुका होवोनि निराळा । क्षराक्षरा वेगळा । पाहे निगमकळा । बोले विठ्ठलप्रसादें ॥ ४ ॥

॥ ३६१४ ॥

थुंकोनियां मान । दंभ करितों कीर्तन ॥ १ ॥ जालों उदासीन देहीं । एकाविण चाड नाहीं ॥ २ ॥ अर्थ अनर्थ सारिखा । करूनि ठेविला पारिखा ॥ ३ ॥ उपाधि वेगळा । तुका राहिला सोंवळा ॥ ४ ॥

॥ ३६१५ ॥

अवघ्या भूतांचें केलें संतर्पण । अवघीच दान दिली भूमि ॥ १ ॥
अवघाचि काळ दिनरात्रशुद्धी । साधियेली विधि पर्वकाळ ॥ २ ॥
अवघींच तीर्थें व्रतें केले याग । अवघेंचि सांग जालें कर्म ॥ ३ ॥
अवघेंचि फळ आलें आह्मां हातां । अवघेंचि अनंता समर्पिलें ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां बोलों अबोलणें । कायावाचामनें उरलों नाहीं ॥ ५ ॥

॥ ३६१६ ॥

मज अंगाच्या अनुभवें । काई वाईट बरें ठावें ॥ १ ॥ जालों दोहींचा देखणा । नये मागें पुढेंही मना ॥ २ ॥ वोस वसती ठावी । परि हे चाली दुःख पावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे घेऊं देवा । सवें करूनि बोळावा ॥ ४ ॥

॥ ३६१७ ॥

अंतरींची ज्योती प्रकाशली दीप्ति । मुळींची जे होती आच्छादिली ॥ १ ॥

तेथींचा आनंद ब्रह्मांडीं न समाये । उपमेशीं काये देऊं सुखा ॥ २ ॥
भावाचे मथिलें निर्गुण संचलें । तें हें उभें केलें विटेवरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां ब्रह्मांड पंढरी । प्रेमाची जे थोरी सांटवण ॥ ४ ॥

॥ ३६१८ ॥

कृष्णांजनें जाले सोज्वळ लोचन । तेणें दिलें धान निवडुनी ॥ १ ॥
निरोपाच्या मापें करी लडबड । त्याचें तेणें गोड नारायणें ॥ २ ॥
भाग्यवंतांघरीं करितां विश्वासें । कार्य त्यासारिसें होईजेतें ॥ ३ ॥
तुका ह्मणे पोट भरे बरेवोजा । निज ठाव निजा निजस्थानीं ॥ ४ ॥

॥ ३६१९ ॥

चिंतनें अर्चित राहिलों निश्चळ । तेंचि किती काळ वाढवावें ॥ १ ॥
अबोल्याचा काळ आतां ऐशावरी । वचनाची उरी उरली नाहीं ॥२॥
करूं आला तों तों केला लवलाहो । उरोंच संदेहो दिला नाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे मोहो परतेचि ना मागें । ह्मणउनि त्यागें त्याग जाला ॥४॥

॥ ३६२० ॥

उपाधीच्या नांवें घेतला सिंतोडा । नेदूं आतां पीडा आतळों ते ॥ १ ॥
काशासाटीं हात भरूनि धुवावे । चालतिया गोवें मारगासि ॥ २ ॥
काय नाहीं देवें करूनि ठेविलें । असे तें आपुलें ते ते ठायीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे जेव्हां गेला अहंकार । तेव्हां आपपर बोळविले ॥ ४ ॥

॥ ३६२१ ॥

बोलों अबोलणें मरोनियां जिणें । असोनि नसणें जनीं आह्मां ॥ १ ॥
भोगीं त्याग जाला संगींच असंग । तोडियेले लाग माग दोन्ही ॥ २ ॥
तुका ह्मणे नव्हें दिसतों मी तैसा । पुसणें तें पुसा पांडुरंगा ॥ ३ ॥

॥ ३६२२ ॥

अनुहातीं गुंतला नेणे बाह्य रंग । वृत्ति येतां मग बळ लागे ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ माये.

मदें मातें तया नाहीं देहभाव । आपुले अवयव आवरितां ॥ २ ॥
आणिकांची वाणी वेंदे तेणें मुखें । उपचार दुःखें नाठवती ॥ ३ ॥
तें सुख बोलतां आश्चर्य या जना । विपरीत मना भासतसे ॥ ४ ॥
तुका ह्मणे बाह्य रंग ते विठ्ठले । अंतर निवालें ब्रह्मरसें ॥ ५ ॥

॥ ३६२३ ॥

रंगलें या रंगें पालट न धरी । खेवलें अंतरीं पालटेना ॥ १ ॥
सावळें निखळ कृष्णनाम ठसे । अंगसंगें कैसें शोभा देती ॥ २ ॥
पवित्र जालें तें न लिंपे विटाळा । नेदी बैसों मळा आडवरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे काळें काळें केलें तोंड । प्रकाश अभंड देखोनियां ॥ ४ ॥

॥ ३६२४ ॥

लटिका प्रपंच वांझेची संतति । तत्त्वज्ञा हे भ्रांति बाधूं नेणे ॥ १ ॥
सूर्यबिंबीं काय अंधार रिघेल । मृगजळें तिंबेल नभ काई ॥ २ ॥
तैसा दृश्यभास नाडळेचि डोळां । प्रकाश सोहळा भोगीतसे ॥ ३ ॥
भोग भोग्य भोक्ता नाडळेचि कांहीं । चैतन्यविग्रहीं पूर्णकाम ॥ ४ ॥
तुका ब्रह्मानंदीं आहे तुक ब्रह्म । प्रपंचाचें बंड न देखे डोळां ॥ ५ ॥

॥ ३६२५ ॥

पय दधि घृत आणि नवनीत । तैसें दृश्यजात एकपणें ॥ १ ॥
कनकाचे पाहीं अलंकार केले । कनकत्वा आले एकपणें ॥ २ ॥
मृत्तिकेचे घट जाले नानापरी । मृत्तिका अवधारीं एकपणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे एक एक ते अनेक । अनेकत्वीं एक एकपणा ॥ ४ ॥

॥ ३६२६ ॥

येथूनियां ठाव । अवघे लक्षायाचे भाव ॥ १ ॥ उंची देवाचे चरण ।

---

पाठभेदः—१ वेद. २ ना ढळेचि.

तेथें जालें अधिष्ठान ॥ २ ॥ आघातावेगळा । असे ठाव हा निराळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे स्थळ । धरूनि राहिलों अचळ ॥ ४ ॥

॥ ३६२७ ॥

गोडेपणें[1] जैसा गूळ। तैसा देव जाला सकळ ॥ १ ॥ आतां भजों कोणे परी। देव सबाह्य अंतरीं ॥२॥ उदका वेगळा। नव्हे तरंग निराळा ॥३॥ हेम अळंकारा नामीं। तुका ह्मणे तैसे आह्मी ॥ ४ ॥

॥ ३६२८ ॥

ज्यांच्या संगें होतों पडिलों भोवनीं। ते केली धोवनी सांडोनियां[2] ॥ १ ॥ आतां एकाएकीं मनासीं विचार। करूं नाहीं भार दुजियाचा ॥२॥ प्रसादसेवनें आली उष्टावळी। उचित ते काळीं अवचित ॥ ३ ॥ तुका ह्मणे वर्म सांपडलें हातीं। सांडिली ते खंती चिंता देवा ॥ ४ ॥

॥ ३६२९ ॥

मायाबापांचिया[3] भेटी। अवघ्या तुटी संकोचा ॥१॥ भोगिलें तें आहे सुख। खातां मुख मोकळें ॥ २ ॥ उत्तम तें बाळासाटीं। लावी ओठीं माउली ॥३॥ तुका ह्मणे जाली धणी। आनंद मनीं न समाये ॥४॥

॥ ३६३० ॥

देव जाले अवघे जन। गुण[4] दोष हारपले ॥ १ ॥ बरवें जालें बरवें जालें। चित्त धालें महालाभें ॥ २ ॥ दर्पणींचें दुसरें भासे। परि तें असे एक तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे सिंधुभेटी। उदका तुटी वाहाळासी ॥४॥

॥ ३६३१ ॥

ध्यानीं ध्यातां पंढरिराया। मनासहित पालटे काया ॥१॥ तेथें बोला कैंची उरी। माझें मीपण जाला हरि ॥ २ ॥ चित्तचैतन्यीं पडतां

---

पाठभेदः—१ गोडीपणें. २ झाडोनियां. ३ मायबापांचिये. ४ माझे गुण.

मिठी । दिसे हरिरूप अवघी सृष्टि ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांगों काय । एकाएकीं हरिवृत्तिमय ॥ ४ ॥

॥ ३६३२ ॥

लटिकें हासें लटिकें रडें । लटिकें उडें लटिक्यापें ॥१॥ लटिकें माझें लटिकें तुझें । लटिकें ओझें लटिक्याचें ॥ २ ॥ लटिकें गायें लटिकें ध्यायें । लटिकें जायें लटिक्यापें ॥ ३ ॥ लटिका भोगी लटिका त्यागी । लटिका जोगी जग माया ॥४॥ लटिका तुका लटिक्या भावें । लटिकें बोले लटिक्यासवें ॥५॥

॥ ३६३३ ॥

देव जडला जाइना अंगा । यासी काय करूं सांगा ॥ १ ॥ वरकड देव येती जाती । हा देव जन्माचा सांगाती ॥ २ ॥ अंगीं भरलें देवाचें वारें । देव जगचि दिसे सारें ॥ ३ ॥ भूत न बोले निरुतें । कांहीं केल्या न सुटे तें ॥ ४ ॥ जीव खादला दैवतें । माझा येणें महाभूतें ॥ ५ ॥ तुका ह्मणे वाडें कोडें । उभें पुंडलिकापुढें ॥ ६ ॥

॥ ३६३४ ॥

मानूं कांहीं आह्मी आपुलिया इच्छा । नाहीं तरि सरिसा रंकरावो ॥ १ ॥ आपुल्या उदास आहों देहभावीं । मग लज्जाजीवीं चाड नाहीं ॥ २ ॥ तुका ह्मणे खेळों आह्मी सहज लीळे । ह्मणोनी निराळें सुखदुःखा ॥३॥

॥ ३६३५ ॥

शोधूनि अन्वय वंश वंशावळी । परस्परा कुळीं उच्चारण ॥ १ ॥ ह्मणविलें मागें पुढें चाले कैसें । केला सामरस्यें अभिषेक ॥ २ ॥ एकछत्र झळके उन्मनी निशाणी । अनुहात ध्वनी गगन गर्जे ॥ ३ ॥ तुकयास्वामी स्थापी निजपदीं दासा । करूनी उल्हासा सप्रेमता ॥४॥

॥ ३६३६ ॥

मागें बहुत जाले खेळ । आतां बळ वोसरलें ॥ १ ॥ हालों नये चाले

आतां । घट रिता पोकळ ॥ २ ॥ भाजल्याची दिसे घडी । पट ओढी न साहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाहतां घडी । जगा जोडी अंगारा ॥४॥

॥ ३६३७ ॥

उपचारासी वाज जालों । नका बोलों यावरी ॥ १ ॥ असेल तें असो तैसें । भेटीसरिसें नमन ॥ २ ॥ दुसऱ्यामध्यें कोण मिळे । छंद चाळे बहु मतें ॥ ३ ॥ एकाएकीं आतां तुका । लौकिका या बाहेरी ॥ ४ ॥

॥ ३६३८ ॥

तन मन धन दिलें पंढरिराया । आतां सांगावया उरलें नाहीं ॥ १ ॥ अर्थचाड चिंता नाहीं मनीं आशा । तोडियेला फांसा उपाधीचा ॥२॥ तुका ह्मणे एक विठोबाचें नाम । आहे जवळी दाम नाहीं रुका॥३॥

॥ ३६३९ ॥

ह्मणउनि जाली तुटी । नाहीं भेटी अहंकारें ॥ १ ॥ दाखविलें देवें वर्म । अवघा भ्रम नासला ॥ २ ॥ हातें मुरगळितां कान । नाहीं भिन्न वेदना ॥ ३ ॥ तुका ह्मणे एकांतसुखें । अवघें गोतें गुंतलें ॥ ४ ॥

॥ ३६४० ॥

मागें पुढें नाहीं । दुजें यावेगळें कांहीं ॥ १ ॥ नाहीं उरलें आणीक। केला झाडा सकळिक ॥ २ ॥ विश्वा[1]वांचून । नांवें दुजियाचें शून्य ॥ ३ ॥ देवाविण कांहीं । तुका ह्मणे उरी नाहीं ॥ ४ ॥

॥ ३६४१ ॥

विश्वीं विश्वंभर । बोले वेदांतींचा सार ॥ १ ॥ जगीं जगदीश । शास्त्रें वदती सावकाश ॥ २ ॥ व्यापिलें हें नारायणें । ऐसीं गर्जतीं पुराणें ॥ ३ ॥ जनीं जनार्दन । संत बोलती वचन ॥ ४ ॥ सूर्याचिया परी । तुका लोकीं क्रीडा करी ॥ ५ ॥

---

पाठभेदः—१ विश्वासावांचून.

॥ ३६४२ ॥

भय होतें आह्मीपणें । पाटी येणें घातलें ॥ १ ॥ अवघा आपुलाचि देश । काळा लेश उरेचि ना ॥ २ ॥ समर्थाचें नाम घेतां । मग चिंता काशाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे नारायणें । जालें जिणें सुखाचें ॥ ४ ॥

॥ ३६४३ ॥

हारपोनि गेली निशी । निद्रा कैसी न देखों ॥ १ ॥ नारायणीं [1]वसलें घर । निरंतर आनंद ॥ २ ॥ अवघा रुधविला ठाव । नेला वाव मी माझें ॥ ३ ॥ तुका ह्मणे एके ठायीं । असूं नाहीं क्षण भिन्न ॥ ४ ॥

॥ ३६४४ ॥

एके ठायीं अन्नपाणी । ग्रासोग्रासीं चिंतनीं ॥ १ ॥ वेळोवेळां जागवितों । दुजें येइल म्हूण भीतों ॥२॥ नाहीं गुंतत उपचारीं । मानदंभाचे वेव्हारीं ॥ ३ ॥ तुका जालासे शाहाणा । आड लपे नारायणा ॥४॥

॥ ३६४५ ॥

स्वामीचिया सत्ता । आधीं वर्म येतें हाता । पुढती विशेषता । लाभें लाभ आगळा ॥ १ ॥ करीं कवतुकाचे बोल । परि जिव्हाळ्याची ओल । आवडे रसाळ । मायबापा लाडाचें ॥ २ ॥ मनें मेळविलें मना । नाहीं अभावीं शाहाणा । अंतरींच्या खुणा । वरि दिल्या उमटोनि ॥ ३ ॥ नाहीं पराश्रमें काळा । अवघ्या जागविल्या वेळा । देवासी निराळा । तुका क्षण न सोडी ॥ ४ ॥

॥ ३६४६ ॥

पडिलिया ताळा । मग अवघाचि निर्वाळा । तेथें कोणी बळा । नाहीं येत कोणासी ॥ १ ॥ जोडिलें तें लागे हातीं । आपआपली निश्चिंती । हर्ष आणि खंती । तेथें दोनी नासलीं ॥ २ ॥ सहज

पाठभेदः—१ बैसलें.

सरलिया कारण । मग एकला आपण । दिसे तरी भिन्न । वचनाचा प्रसंग ॥ ३ ॥ करूनि झाडा पाडा । तुका वेगळा लिगाडा । निश्चिंतीच्या गोडा । गोष्टी म्हूण लागती ॥ ४ ॥

॥ ३६४७ ॥

याची कोठें लागली चट । बहु तट जालेंसे ॥ १ ॥ देवपिसीं देवपिसीं । मजऐसीं जग ह्मणे ॥ २ ॥ एकांताचें बाहेर आलें । लपविलें झांकेना ॥३॥ तुका ह्मणे याचे भेटी । जाली तुटी आपल्यांसी ॥४॥

॥ ३६४८ ॥

माझिया मनाची बैसली आवडी । अवसान घडी एकी नेघे ॥ १ ॥ पाय चित्तीं रूप डोळांच राहिलें । चिंतनें गोविलें मुख सदा ॥ २ ॥ अवघियांचा जाला विसर हा मागें । वेध हा श्रीरंगें लावियेला ॥ ३ ॥ तुका ह्मणे कानीं आइकली मात । तोंचि जाला घात जीवपणा ॥ ४ ॥

॥ ३६४९ ॥

खादलेंच खावें वाटे । भेटलें भेटे आवडी ॥ १ ॥ वीट नाहीं पांडुरंगीं । वाढे अंगीं आर्त तें ॥ २ ॥ इंद्रियांची हांव पुरे । परि हें उरे चिंतन ॥ ३ ॥ तुका ह्मणे पोट भरे । परि ते उरे भूक पुढें ॥ ४ ॥

॥ ३६५० ॥

चक्रफेरी गळीं गळा । होता गोवियेला माळा ॥१॥ फुटोनियां गेला कुंभ । जालों निष्काम स्वयंभ ॥२॥ धरितचि नाहीं थारा । वेठी भ्रमण खोंकरा ॥३॥ तुका ह्मणे कौतुक कोडें । आगी काय जाणें मढें ॥४॥

॥ ३६५१ ॥

पाहातां हें बरवें जालें । कळों आलें यावरी ॥ १ ॥ मागिलांचा जाला झाडा । त्या निवाडास्तव ॥२॥ विसांवलें अंग दिसे । सरिसे बुद्धि अनुभव ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरें जालें । देवें नेलें गबसूनि ॥ ४ ॥

॥ ३६५२ ॥

चुकलों या ऐशा वर्मा । तरी कर्मा सांपडलों ॥ १ ॥ पाठी लागे करी नास । गर्भवास भोगवी ॥२॥ माझें तुझें भिन्नभावें । गळां दावें मोहाचें ॥३॥ तुका ह्मणे पाठेळ केलों । नसत्या भ्यालों छंदासी ॥४॥

॥ ३६५३ ॥

आतां नव्हे गोड कांहीं करितां संसार । आणीक संचार जाला माजी ॥१॥
ब्रह्मरसें गेलें भरूनियां अंग । आधील तो रंग पालटला ॥ २ ॥
रसनेचिये रुची कंठीं नारायण । बैसोनियां मन निववीलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां बैसलों ठाकणीं । इच्छेची ते धणी पुरईल ॥ ४ ॥

॥ ३६५४ ॥

विचारिलें आधीं आपुल्या मानसीं । वांचों येथें कैसीं कोण्या द्वारें ॥१॥
तंव जाला साह्य हृदयनिवासी । बुद्धि दिली ऐसी नास नाहीं ॥ २ ॥
उद्वेगाचे होतों पडिलों समुद्रीं । कोणे रीती तरी पाविजेल ॥ ३ ॥
तुका ह्मणे दुःखें आला आयुर्भाव । जाला बहु जीव कासावीस ॥४॥

॥ ३६५५ ॥

प्रवृत्तिनिवृत्तीचे आटूनियां भाग । उतरिलें चांग रसायण ॥ १ ॥
ज्ञानाग्निहुताशीं कडशिले बोजा । आत्मसिद्धिकाजा लागूनियां ॥ २ ॥
ब्रह्मीं ब्रह्मरस शीघ्र जाला पाक । घेतला रुचीक[1] प्रतीतिमुखें ॥ ३ ॥
स्वानुभवें अंगीं जाला समरस । साधनीं निजध्यास ग्रासोग्रासीं ॥ ४ ॥
अरोग्यता तुका पावला अष्टांगीं । मिरविला रंगीं निजात्मरंगें ॥ ५ ॥

॥ ३६५६ ॥

एकाचिये वेठी । सांपडलों फुकासाटीं ॥ १ ॥ घेतों काम सत्ताबळें । माझें करूनि भेंडोळें ॥ २ ॥ धावें मागें मागें । जाय तिकडेचि लागे ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेलें । माझें सर्वस्व विठ्ठलें ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ रुचक प्रतीती सुखें.

॥ ३६५७ ॥

शरणागत जालों । तेणें मीपणा मुकलों ॥ १ ॥ आतां दिल्याचीच वाट । पाहों नाहीं खटपट ॥ २ ॥ नलगे उचित । कांहीं पाहावें संचित ॥ ३ ॥ तुका ह्मणे सेवा । माने तैसी करूं देवा ॥ ४ ॥

॥ ३६५८ ॥

रुसलों संसारा । आह्मी आणीक व्यापारा ॥ १ ॥ ह्मणऊनि केली सांडी । देऊनि पडिलों मुरकुंडी ॥ २ ॥ परतेचि ना मागें । मोहो निष्ठुर जालों अंगें ॥ ३ ॥ सांपडला देव । तुका ह्मणे गेला भेव ॥४॥

॥ ३६५९ ॥

धवळलें जगदाकार । आंधार तो निरसला ॥ १ ॥ लपों जातां नाहीं ठाव । प्रगट पाहें प्रसारा ॥२॥ खरियाचा दिवस आला । वाढी बोला न पुरे ॥३॥ तुका ह्मणे जीवें साटीं । पडिली मिटी धुरेसी ॥ ४ ॥

॥ ३६६० ॥

नाहीं लाग माग । न देखें हें केलें जग ॥१॥ आतां बैसोनियां खावें । दिलें आइतें या देवें ॥ २ ॥ निवारिलें भय । नाहीं दुसऱ्याची सोय ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं । बोलायाचें काम नाहीं ॥ ४ ॥

॥ ३६६१ ॥

आनंदाचे डोहीं आनंदतरंग । आनंदचि अंग आनंदाचें ॥ १ ॥
काय सांगों जालें कांहींचियाबाही । पुढें चाली नाहीं आवडीनें ॥ २ ॥
गर्भाचे आवडी मातेचा डोहळा । तेथींचा जिव्हाळा तेथें बिंबे ॥ ३ ॥
तुका ह्मणे तैसा ओतलासे ठसा । अनुभव सरिसा मुखा आला ॥ ४ ॥

॥ ३६६२ ॥

आसन शयन भोजन गोविंदें । भरलें आनंदें त्रिभुवन ॥ १ ॥
अवघिया केली काळें तडातोडी । अवसर घडी पुरों नये ॥ २ ॥

पाठभेदः—२ देखेंसे.

वाटणी घातले शरीराचे भाग । दुजियाचा लाग खंडियेला ॥ ३ ॥
आवडीच्या आलें आहारासी रूप । पृथक संकल्प मावळले ॥ ४ ॥
काम तरी क्रोध बुद्धि मन नासे । भ्रमाचे वोळसे गिळिले शांती ॥ ५ ॥
तुका ह्मणे मना श्रीरंगाचा रंग । बैसला अभंग एकविध ॥ ६ ॥

॥ ३६६३ ॥

आतां येणेंविण नाहीं आह्मां चाड । कोण बडबड करी वांयां ॥ १ ॥
सुख तेंचि दुःख पुण्यपाप खरें । हें तों आह्मां बरें कळों आलें ॥ २ ॥
तुका ह्मणे वाचा वाहिली अनंता । बोलायाचें आतां काम नाहीं ॥ ३ ॥

॥ ३६६४ ॥

इच्छावें तें जवळी आलें । काय बोलें कारण ॥ १ ॥ नामरूपीं पडिली गांठी । अवघ्या गोष्टी सरल्या ॥ २ ॥ मुकियाचे परी जीवीं । साकर जेवीं खादली ॥ ३ ॥ तुका ह्मणे काय बोलें । आतां भलें मौन्यची ॥ ४ ॥

॥ ३६६५ ॥

हेचि भेटी साच रूपाचा आठव । विसावला जीव आवडीपें ॥ १ ॥
सुखाचें भातुकें करावें जतन । सेविल्या ताहान भूक जाय ॥ २ ॥
दुरील जवळी आपणचि होतें । कवळिलें चित्तें जीवेंनासीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाम घेतां वेळोवेळां । होतील सकळा शीतळा नाडी ॥ ४ ॥

॥ ३६६६ ॥

कां रे तुम्हीं ठेवा बहुतां निमित्तें । माझिया संचितें वोडवलें ॥ १ ॥
भक्तिप्रेमगोडी बैसली जिव्हारीं । आनंद अंतरीं येणें जाला ॥ २ ॥
पुसिलें पडळ त्रिमिर विठ्ठलें । जगाचि भरलें ब्रह्मानंदें ॥ ३ ॥
तुका ह्मणे केलों कामने वेगळा । आवडी गोपाळावरी असे ॥ ४ ॥

॥ ३६६७ ॥

मीचि विखळ मीचि विखळ । येर सकळ बहु बरें ॥ १ ॥ पाहिजे हें

---

पाठभेदः—१ जिवापासीं. २ घेतों. ३ वसे.

चाली देवाचिया सत्ता ॥ २ ॥ पराधीन तें जिणें । केलें सत्ता नारायणें ॥३॥ तुका ह्मणे जाणें पाय । खुंटले आणीक उपाय ॥ ४ ॥

॥ ३६७८ ॥

जेथें माझी दृष्टि जाय । तेथें पाय भावीन ॥ १ ॥ असेन या समाधानें । पूजा मनें करीन ॥ २ ॥ अवघाच अवघे देसी । सुखरासी संपन्न ॥ ३ ॥ तुका ह्मणे बंधन नाहीं । ऐसें कांहीं तें करूं ॥ ४ ॥

॥ ३६७९ ॥

वेद जया गाती । आह्मां तयाची संगती ॥ १ ॥ नाम धरियेलें कंठीं । अवघा सांटविला पोटीं ॥ २ ॥ ॐकाराचें बीज । हातीं आमुचे तें निज ॥ ३ ॥ तुका ह्मणे बहु मोटें । अणुरेणुया धाकुटें ॥ ४ ॥

॥ ३६८० ॥

तेणें वेशें माझीं चोरिलीं अंगें । मानात्रया जग आत्मपणें ॥ नाहीं चाड भीड संसाराचें कोड । उदासीन सर्व गुणें ॥ भय मोह लज्जा निरसली शंका । अवघियां एकचि पणें ॥ विठ्ठलाच्या पायीं बैसोनि राहिलीं । भागलीं तुटितें[1] तेणें ॥१॥ आतां त्यांसीं काय चाले माझें बळ । जालोंसें दुर्बळ सत्त्वहीन ॥ दग्ध पट दिसे संगेंति[2] बरवंट । काय त्याचें कारण ॥२॥ आळसें दृष्टि न पाहे आपुलें । एकचि देखिलें सर्वरूप ॥ मानामान तेथें खुंटोनि राहिलें । पिशुन तो कोण बाप ॥ ज्योति ना अंधार अवघा एककार । तेथें काय पुण्यपाप ॥ विठ्ठलावांचुनि कांहींच नावडे । वेगळाल्या भावें रूप ॥३॥ बळबडिवार लौकिक वेव्हार । गेली आशा तृष्णा माया ॥ सुखदुःखाची वार्ता नाइके । अंतरलों दुरी तया । मीतूंपणानिष्काम होऊनि । राहिलों आपुलियां ठायां ॥ तुजविण आतां मज नाहीं कोणी । तुका ह्मणे देवराया ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ तुटित. २ संगीत.

॥ ३६८१ ॥

प्रेमअमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ॥ १ ॥
सकळही तेथें वोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥ २ ॥
सकळ इंद्रियें जालीं ब्रह्मरूप । ओतलें स्वरूप माजी तया ॥ ३ ॥
तुका ह्मणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥ ४ ॥

॥ ३६८२ ॥

जोडिलें तें आतां न सरे सारितां । जीव बळी देतां हाता आलें ॥ १ ॥
संचित सारूनि बांधिले धरणें । तुंबिलें जीवन साक्षेपें हें ॥ २ ॥
शीत उष्ण तेथें सुखदुःख नाहीं । अंतर सबाही एक जालें ॥ ३ ॥
बीज तो अंकुर पत्र शाखा फळें । प्राप्तबीज मुळें अवघें नासे ॥ ४ ॥
तुका ह्मणे नामीं राहिलीसे गोडी । बीजाच्या परवडी होती जाती ॥ ५ ॥

॥ ३६८३ ॥

आमुचें जीवन हें कथाअमृत । आणिकही संत समागम ॥ १ ॥
सारूं एके ठायीं भोजन परवडी । स्वादरसें गोडी पदोपदीं ॥ २ ॥
धालिया ढेंकर येती आनंदाचे । वोसंडलें वाचे प्रेमसुख ॥ ३ ॥
पिकलें स्वरूप आलिया घुमरी । रासी ते अंबरीं न समाये ॥ ४ ॥
मोजितां तयाचा अंत नाहीं पार । खुंटला व्यापार तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ३६८४ ॥

साधनें आमुचीं आज्ञेचीं धारकें । प्रमाण सेवकें स्वामिसत्ता ॥ १ ॥
प्रकाशिलें जग आपुल्या प्रकाशें । रवि कर्मरसें अलिप्त त्या ॥ २ ॥
सांगणें तें नाहीं करणें[1] आपण । मोलही वचन बाध जालें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां भांडवल हातीं । येरझारा खाती केवढियें ॥ ४ ॥

॥ ३६८५ ॥

आठवों नेदी आवडी आणीक । भरूनियां लोक तिन्ही राहे ॥ १ ॥

पाठभेदः—१ करणें तें.

मन धांवे तेथें तिचेंचि दुभतें । संपूर्ण आइतें सर्वकाळ ॥ २ ॥ नलगे वळावीं इंद्रियें धांवतां । ठाव नाहीं रिता उरों दिला ॥ ३ ॥ तुका ह्मणे समपाउलांचा खुंट । केला बळकट हालों नेदी ॥ ४ ॥

॥ ३६८६ ॥

सांगतां गोष्टी लागती गोडा । हा तो रोकडा अनुभव ॥ १ ॥ सुख जालें सुख आलें । नये बोलें बोलतां ॥ २ ॥ अंतर तें नये दिसों । आतां सोस कासया ॥३॥ तुका ह्मणे जतन करूं । हेंचि धरूं जीवेंसी ॥४॥

॥ ३६८७ ॥

पाणिपात्र दिगंबरा । हस्त करा सारिखे ॥ १ ॥ आवश्यक देव मनीं । चिंतनींच सादर ॥ २ ॥ भिक्षाकामधेनुऐशी । अवकाशीं शयन ॥ ३ ॥ पांघरोनि तुका दिशा । केला वास अलक्षीं ॥ ४ ॥

॥ ३६८८ ॥

पटे ढाळूं आह्मी विष्णुदास जगीं । लागों नेदूं अंगीं पापपुण्य ॥१॥ निर्भर अंतरीं सदा सर्वकाळ । घेतला सकळ भार देवें ॥ २ ॥ बळिवंत जेणें रचिलें सकळ । आह्मां त्याचें बळ अंकितांसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी देखतचि नाहीं । देवावीण कांहीं दुसरें तें ॥ ४ ॥

॥ ३६८९ ॥

बोलणेंचि नाहीं । आतां देवाविण कांहीं ॥ १ ॥ एकसरें केला नेम । देवा दिले क्रोध काम ॥ २ ॥ पाहेन ते पाय । जोंवरि हे दृष्टी धाय ॥ ३ ॥ तुका ह्मणे मनें । हेंचि संकल्प वाहाणें ॥ ४ ॥

॥ ३६९० ॥

अवघाचि आकार ग्रासियेला काळें । एकचि निराळें हरिचें नाम ॥१॥ धरूनि राहिलों अविनाश कंठीं । जीवन हें पोटीं सांटविलें ॥ २ ॥ शरीरसंपत्ति मृगजळभान । जाईल नासोन खरें नव्हे ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां उपाधीच्या नांवें । आणियेला देवें वीट मज ॥ ४ ॥

॥ ३६९१ ॥

समर्पिली वाणी । पांडुरंगीं घेती धणी ॥ १ ॥ पूजा होते मुक्ताफळीं । रस वोविया मंगळीं ॥ २ ॥ धार अखंडीत । ओघ चालियेला नित्य ॥ ३ ॥ पूर्णाहुति जीवें । तुका घेऊनि ठेला भावें ॥ ४ ॥

॥ ३६९२ ॥

नव्हतियाचा सोस होता । झडो आतां पदर ॥ १ ॥ देखणें तें देखियेलें । आतां भलें साक्षित्वें ॥ २ ॥ लाभ कळों आली हानि । राहों दोन्हीं निराळीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे एकाएकीं । हा कां लोकीं पसारा ॥ ४ ॥

॥ ३६९३ ॥

जळो आतां नांव रूप । माझें पाप गांठीचें ॥ १ ॥ संतांचिया चरणरजें । उतरूं ओझें मातीचें ॥ २ ॥ लटिकयाचा अभिमान । होता सीण [1]पावित ॥ ३ ॥ तुका ह्मणे अरूपींचें । सुख साचे निनांवें ॥ ४ ॥

॥ ३६९४ ॥

जाणपण बरें देवाचिये शिरीं । आह्मी ऐसीं बरीं नेणतींच ॥ १ ॥
देखणियांपुढें रुचे कवतुक । उभयतां सुख वाढतसे ॥ २ ॥
आशंकेची बाधा नाहीं लडिवाळां । चित्त वरि खेळा समबुद्धि ॥ ३ ॥
तुका ह्मणे दिशा मोकळ्या सकळा । अवकाशीं खेळा ठाव जाला ॥ ४ ॥

॥ ३६९५ ॥

भक्तीचिया पोटीं रत्नाचिया खाणी । ब्रह्मींची ठेवणी सकळ वस्तु ॥ १ ॥
माउलीचे मागें बाळकांची हरी । एका सूत्रें दोरी ओढतसे ॥ २ ॥
जेथील जें मागे तें रायासमोर । नाहींसें उत्तर येत नाहीं ॥ ३ ॥
सेवेचिये सत्ते धनीच सेवक । आपुलें तें एक न वंची कांहीं ॥ ४ ॥
आदि अंता ठाव असे मध्यभाग । भोंवतें भासे मग उंचासन ॥ ५ ॥
भावारूढ तुका जाला एकाएकीं । देवच लौकिकीं अवघा केला ॥ ६ ॥

---

पाठभेदः—१ पावित.

॥ ३६९६ ॥

ऐसिया संपत्ती आह्मां संवसारीं । भोगाचिया परि काय सांगों ॥१॥
काम तो कामना भोगीतसे देवा । आलिंगणें हेवा चरण चुंबीं ॥ २ ॥
शांतीच्या संयोगें निरसला ताप । दुसरें यां पाप भेदबुद्धि ॥ ३ ॥
तुका ह्मणे पाहें तिकडे सारिखें । आपुलें पारिखें निरसलें ॥ ४ ॥

॥ ३६९७ ॥

सांपडला हातीं । जेणें जाली हे निश्चिंती ॥ १ ॥ नाहीं धांवा घेत मन । इंद्रियांचें समाधान ॥ २ ॥ सांडियेला हेवा । अवघा संचिताचा ठेवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे काम । निरसुनियां घेतां नाम ॥ ४ ॥

॥ ३६९८ ॥

उत्तम पाळावें आमुचिये सुखीं । निचागावें दुःखी होऊनि तें ॥ १ ॥
न पेंगे न वजे जवळूनि दुरी । मागें पुढें वारी घात पात ॥ २ ॥
नाहीं लज्जा आम्हां मळलिये ठायीं । माखलें पाहीं दैनाहेत ॥ ३ ॥
तुका ह्मणे सार धनका विठ्ठलें । अंतरीं भरलें बाह्य रूप ॥ ४ ॥

॥ ३६९९ ॥

एक वेळे प्रायश्चित्त । केलें चित्त मुंडण ॥ १ ॥ अहंकारा नांवें दोष । त्याचें ओस पाडिलें ॥ २ ॥ अनुतापें स्नानविधि । यज्ञ सिद्धि देहहोम ॥ ३ ॥ जीवशिवा होतां चुका । येथें तुका विनटला ॥ ४ ॥

॥ ३७०० ॥

मन बोळीं मना । बुद्धि बुद्धी क्षणक्षणां ॥ १ ॥ मीच मज राखण जालों । ज्याणें तेथेंचि धरिलों ॥ २ ॥ जें जें जेथें उठी । तें तें तया हातें कुंटी ॥३॥ भाजिली ख्यांजनी । तुका साक्ष उरला दोन्ही ॥ ४ ॥

॥ ३७०१ ॥

अक्षई तें जालें । आतां न मोडे रचिलें ॥ १ ॥ पाया पडिला खोले

पाठभेदः—१ तें. २ तरी.

ठायीं । तेथें पुढें चाली नाहीं ॥ २ ॥ होतें विखुरलें । ताळा जमे झड-
ती आलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे बोली । पुढें कुंठितचि जाली ॥ ४ ॥

॥ ३७०२ ॥

देव आड जाला । तो भोगिता मी उगला । अवघा निवारिला । सीण शुभाअशुभाचा ॥ १ ॥ जीवशिवाचें भातुकें । केलें होतें कवतुकें । कैचीं येथें लोकें । आभास अनित्य ॥ २ ॥ विष्णुमय खरें जग । येथें लागतसे लाग । वांटिले विभाग । वर्णधर्म हा खेळ ॥ ३ ॥ अवघी एकाचीच वीण । तेथें कैचें भिन्नाभिन्न । वेदपुरुष नारायण । तेणें केला निवाडा ॥ ४ ॥ प्रसादाचा रस । तुका लाधला सौरस । पायापाशीं वास । निकट नव्हे निराळा ॥ ५ ॥

॥ ३७०३ ॥

पावे ऐसा नाश । अवघियां दिला त्रास ॥ १ ॥ अविटाचा केला संग । सर्व भोगी पांडुरंग ॥ २ ॥ आइताची पाक । संयोगाचा सकळिक ॥ ३ ॥ तुका ह्मणे धणी । सीमा राहिली होउनी ॥ ४ ॥

॥ ३७०४ ॥

डोळियांचें दैव आजि उभें ठेलें । निधान देखिलें पंढरीये ॥ १ ॥
काय तें वानावें वाचेचे पालवें । वेदा न बोलवे रूप ज्याचें ॥ २ ॥
आनंदाच्या रसें ओंतींव चांगलें । देखतां रंगलें चित्त माझें ॥ ३ ॥
तुका ह्मणे मी तों सगळाच विरालों । विठ्ठलचि जालों दर्शनानें ॥ ४ ॥

॥ ३७०५ ॥

नेसणें आलें होतें गळया । लोक रळया करिती ॥ १ ॥ आपणियां सावरिलें । जग भलें आपण ॥ २ ॥ संबंध तो तुटला येणें । जागेपणें चेष्टांचा ॥ ३ ॥ भलती सेवा होती अंगें । वारस वेगें पडिलें ॥ ४ ॥ सावरिलें नीट वोजा । दृष्टिलाजा पुढिलांच्या ॥ ५ ॥ बरे उघडिले डोळे । हळहळेपासूनि ॥ ६ ॥ तुका ह्मणे विटंबणा । नारायणा चुकली ॥ ७ ॥

॥ ३७०६ ॥

मुखें सती इंद्रियें जती । आणिक नेणें भाव भक्ती ॥ १ ॥ देवा हेचि दोन्ही पदें । येर गाइलीं विनोदें ॥२॥ चित्ताचें आसन । तुका करितो कीर्तन॥३॥

॥ ३७०७ ॥

ब्रह्मरसगोडी तयांसी फावली । वासना निमाली सकळ ज्यांची ॥ १ ॥
नाहीं त्यां विटाळ अखंड सोंवळीं । उपाधी वेगळीं जाणिवेच्या ॥ २ ॥
मन हें निश्चळ जालें एके ठायीं । तयां उणें काई निजसुखा ॥ ३ ॥
तींचि पुण्यवंतें पर उपकारी । प्रबोधी त्या नारीनरलोकां ॥ ४ ॥
तुका ह्मणे त्यांचे पायीं पायपोस । होऊनियां वास करिन तेथें ॥ ५ ॥

॥ ३७०८ ॥

तोंच हीं क्षुल्लकें सखीं सहोदरें । नाहीं विश्वंभरें वोळखी तों ॥ १ ॥
नारायण विश्वंभर विश्वपिता । प्रमाण तो होतां सकळ मिथ्या ॥ २ ॥
रवि नुगवे तों दीपिकांचें काज । प्रकाश तें तेज सहज लोपे ॥ ३ ॥
तुका ह्मणे देहसंबंध संचितें । कारण निरुतें नारायणीं ॥ ४ ॥

॥ ३७०९ ॥

भरला दिसे हाट । अवघी वाढली खटपट । संचिताचे वाट । वाटाऊनि फांकती ॥१॥ भोगा ऐसे ठायाठाव । कर्मा त्रिविधाचे भाव । द्रष्टा येथें देव । विरहित संकल्पा ॥ २ ॥ दिला पाडोनियां धडा । पापपुण्यांचा निवाडा । आचरती गोडा । आचरणें आपुलाल्या ॥३॥ तुका ह्मणे पराधीनें । जालीं ओढलिया ऋणें । तुटतीं बंधनें । जरि देवा आळविते ॥ ४ ॥

॥ ३७१० ॥

उंबरांतील कीटका । हेंचि ब्रह्मांड ऐसें लेखा ॥ १ ॥ ऐसीं उंबरें किती झाडीं । ऐशीं झाडें किती नव खंडीं ॥ २ ॥ हेंचि ब्रह्मांड आह्मांसी । ऐशीं अगणित अंडें कैसीं ॥३॥ विराटाचे अंगीं तैसे । मोजूं जातां अगणित केश ॥४॥ ऐशा विराटाच्या कोटी । सांटवल्या ज्याच्या पोटीं ॥ ५ ॥

तो हा नंदाचा बाळमुकुंद । तान्हा ह्मणवी परमानंद ॥ ६ ॥ ऐशी अगम्य ईश्वरी लीळा । ब्रह्मानंदीं गम्य तुक्याला ॥ ७ ॥

॥ ३७११ ॥

पंचभूतांचा गोंधळ । केला एकेठायीं मेळ । लाविला सबळ । अहंकार त्यापाठीं ॥ १ ॥ तेथें काय मी तें माझें । कोण वागवी हें ओझें । देहा केवीं रिझे । हें काळाचें भातुकें ॥ २ ॥ जीव न देखे मरण । धरी नवी सांडी जीर्ण । संचित प्रमाण । भोग शुभा अशुभा ॥ ३ ॥ इच्छा वाढवी ते वेल । खुंटावा तो खरा बोल । तुका ह्मणे मोल । झांकलें तें पावेल ॥ ४ ॥

॥ ३७१२ ॥

मी हें ऐसें काय जाती । अवघड किती पाहातां ॥ १ ॥ नाहीं होत उल्लंघन । नसतां भिन्न दुसरें ॥ २ ॥ अंधारानें तेज नेलें । दृष्टीखालें अंतर ॥ ३ ॥ तुका ह्मणे सर्व देव । घेतां ठाव दावील ॥ ४ ॥

॥ ३७१३ ॥

मुक्त कासया ह्मणावें । बंधन तें नाहीं ठावें ॥ १ ॥ सुखें करितों कीर्तन । भय विसरलें मन ॥ २ ॥ देखिजेना नास । घालूं कोणावरी कास ॥ ३ ॥ तुका ह्मणे साहे । देव आहे तैसा आहे ॥ ४ ॥

॥ ३७१४ ॥

रूप नांव माया बोलावया ठाव । भागा आले भाव तयावरि ॥ १ ॥ सींव वाटे परी न खंडे पृथिवी । शाहाणे ते जीवीं समजती ॥ २ ॥ पोटा आलें तिच्या लोळे मांडीवरि[1] । पारखी न करी खंती चित्तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भक्तिसाटीं हरिहर । अरूपीचें क्षर विभाग हें ॥ ४ ॥

॥ ३७१५ ॥

देवाची भांडारी । आद्य विनियोग करी ॥ १ ॥ आतां न माखे हात-

---

पाठभेदः—१ मांड्यांवरि.

पाय । नेणों होतें ऐसें काय ॥ २ ॥ देवें नेली चिंता । जाला सकळ करिता ॥ ३ ॥ तुका ह्मणे धणी । त्यासी अवघी पुरवणी ॥ ४ ॥

॥ ३७१६ ॥

सुख सुखा विरजण जालें । तें मथलें नवनीत ॥१॥ हाले डोले हरुपे काया । निवती बाह्या नयन ॥ २ ॥ प्रबल तो नारायण । गुणें गुण वाढला ॥ ३ ॥ तुका ह्मणे भरली सीग । वरी मग वोसंडे ॥ ४ ॥

॥ ३७१७ ॥

बहुतां जातीचा केला अंगीकार । बहुतही फार सर्वोत्तमें ॥ १ ॥ सरलाचि नाहीं कोणांचिये वेचें । अक्षोभ ठायींचें ठायीं आहे ॥ २ ॥ लागतचि नाहीं घेतां अंतपार । वसवी अंतर अणूचेंही ॥ ३ ॥ तुका ह्मणे केला होय टाकी ऐसा । पुरवावी इच्छा धरिली ते ॥ ४ ॥

॥ ३७१८ ॥

कासया जी ऐसा माझे माथां ठेवा । भार तुह्मी देवा संतजन ॥१॥ विचित्र विंदानीं नानाकळा खेळे । नाचवी पुतळे नारायण ॥ २ ॥ काय वानरांची अंगींची ते शक्ति । उदक तरती वरी शिळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे करी निमित्यचि आड । चेष्टवूनि जड दावी पुढें ॥ ४ ॥

॥ ३७१९ ॥

वाजतील तुरें । येणें आनंदें गजरें ॥ १ ॥ जिंकोनियां अहंकार । पावटणी केलें शिर ॥ २ ॥ काळा नाहीं वाव । परा श्रमा कोठें ठाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां । सोपें वैकुंठासी जातां ॥ ४ ॥

॥ ३७२० ॥

नव्हे शब्द एक देशी । सांडी गिवशी[1] कोणाला ॥ १ ॥ जाली माझी हे वैखरी । विश्वंभरी व्यापक ॥ २ ॥ मोकालिलें जावें बाणें । भाता जेणें वाईलें ॥३॥ आतां येथें कैचा तुका । बोले सिका स्वामीचा ॥४॥

पाठभेदः—१ गवशी.

॥ ३७२१ ॥

आपलें तों कांहीं । येथें सांगिजेसें नाहीं ॥ १ ॥ परि हे वाणी वायचळ । छंद करविते बरळ ॥२॥ पंचभूतांचा हा मेळा । देह सत्यत्वें निराळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे भुली । ईंची उफराटी चाली ॥ ४ ॥

॥ ३७२२ ॥

हीनसुरबुद्धीपासीं । आकृतीसी भेद नाहीं ॥ १ ॥ एक दांडी एक खांदी । पदीं पदीं भोगणें ॥ २ ॥ एकाऐसें एक नाहीं । भिन्न पाहीं प्रकृती ॥ ३ ॥ तुका ह्मणे भूमी खंडे । पीक दंडे जेथें तें ॥ ४ ॥

॥ ३७२३ ॥

देवासी तो पुरे एकभाव गांठी । तोचि त्याचे मिठी देइल पायीं ॥१॥
पाहोनि राहीन कवतुकें निराळा । मी मज वेगळा होऊनियां ॥ २ ॥
कांहीं नेघें शिरीं निमित्त्याचा भार । नलगे उत्तर वेचावेंचि ॥ ३ ॥
तुका ह्मणे जीवें पडिलिया गांठी । मग नाहीं मिठी सुटों येत ॥ ४ ॥

॥ ३७२४ ॥

जाय तिकडे लागे पाठीं । नाहीं तुटी आठवाची ॥ १ ॥ हिरोनियां[२] नेलें चित्त । माझें थीत भांडवल ॥ २ ॥ दावूनियां[३] रूप डोळा । मन चाळा लावियेलें ॥ ३ ॥ आणीक तोंडा पडिली मिठी । कान गोठी[४] नाइकती ॥ ४ ॥ बोलिल्याचा आठव न घडे । वाणी ओढे ते सोई ॥ ५ ॥ तुका ह्मणे प्रेमधगी । भरली अंगीं अखंड ॥ ६ ॥

॥ ३७२५ ॥

देवाचे घरीं देवें केली चोरी । देवें देव नागवूनि केला भिकारी ॥ १ ॥
धांवणियां धांवा धांवणियां धांवा । मागचि नाहीं जावें कवणिया गांवा ॥२॥
सवेंचि होता चोर घरिंचिया घरीं । फावलियावरी केलें अवघें वाटोळें ॥३॥
तुका ह्मणे येथें[१] कोणीच नाहीं । नागवलें कोण गेलें कोणाचें काई ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ इच्या. २ हरूनियां. ३ लावूनियां. ४ गोडी.

॥ ३७२६ ॥

जाले आतां सांटे । कासयाचे लहान मोटे ॥ १ ॥ एक एका पडिलों हातीं । जाली तेव्हांचि निश्चिंती ॥२॥ नाहीं फिरों येत मागें । जालें साक्षीचिया अंगें ॥३॥ तुका ह्मणे देवा । आतां येथें कोठें हेवा ॥४॥

॥ ३७२७ ॥

वचन हा नाड । न बोले तें मुकें खोड ॥ १ ॥ दोहीं वेगळें तें हित । बोली अबोलणी नीत ॥ २ ॥ अंधार प्रकाशीं । जाय दिवस पावे निशी ॥ ३ ॥ बीज पृथिवीच्या पोटीं । तुका ह्मणे दावी दृष्टी ॥ ४ ॥

॥ ३७२८ ॥

वसवावें घर । देवें बरें निरंतर ॥ १ ॥ संग आसनीं शयनीं । घडे भोजनीं गमनीं ॥ २ ॥ संकल्प विकल्प । मावळोनि पुण्यपाप ॥ ३ ॥ तुका ह्मणे काळ । अवघा गोविंदीं[१] सुकाळ ॥ ४ ॥

॥ ३७२९ ॥

याजसाटीं भक्ति । जगीं रूढवावया ख्याति ॥ १ ॥ नाहीं तरी कोठें दुजें । आहे बोलाया सहजें ॥ २ ॥ गौरवासाटीं[२] । स्वामिसेवेची कसोटी ॥३॥ तुका ह्मणे अळंकारा । देवभक्त लोकीं खरा ॥४॥

॥ ३७३० ॥

माझ्या मुखें मज बोलवितो हरि । सकळा अंतरीं नारायण ॥ १ ॥ न करावा द्वेष भूतांचा मत्सर । हा तंव विचार जाणों आह्मी ॥ २ ॥ तुका ह्मणे दोष नाहीं या विचारें । हिताचीं उत्तरें शिकवितां ॥ ३ ॥

॥ ३७३१ ॥

हेचि थोर भक्ति आवडती देवा । संकल्पावी माया संसाराची ॥ १ ॥ ठेविलें अनंतें तैसेंचि राहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ गोविंदें. २ गौरव या साटीं.

वाहिल्या उद्वेग दुःखचि केवळ । भोगणें तें फळ संचिताचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे घालं तयावरी भार । वाहूं हा संसार देवापायीं ॥ ४ ॥

॥ ३७३२ ॥

आपला तो एक देव करुनि घ्यावा । तेणेंविण जीवा सुख नव्हे ॥ १ ॥
येर तीं माईकें दुःखाचीं जनितीं । नाहीं आदिअंतीं अवसान ॥ २ ॥
अविनाश करी आपुलिया ऐसें । लावी मना पिसें गोविंदाच्या ॥ ३ ॥
तुका ह्मणे एका मरणेंचि सरे । उत्तमचि उरे कीर्ति मागें ॥ ४ ॥

॥ ३७३३ ॥

देवाचिये माथां घालुनियां भार । सांडीं कळिवर ओंवाळूनि ॥ १ ॥
नाथिला हा छंद अभिमान अंगीं । निमित्याचे वेगीं सारीं ओझें ॥ २ ॥
करुणा वचनीं लाहो एकसरें । नेदावें दुसरें आड येऊं ॥ ३ ॥
तुका ह्मणे सांडीं लटिक्याचा संग । आनंद तो मग प्रगटेल ॥ ४ ॥

॥ ३७३४ ॥

थोडें आहे थोडें आहे । चित्त साहे जालिया ॥ १ ॥ हर्षामर्ष नाहीं
अंगीं । पांडुरंग सरलें तें ॥ २ ॥ अवघ्या साधनांचें सार । न लगे
फार शोधावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे लटिकें पाहें । सांडीं देह अभिमान ॥ ४ ॥

॥ ३७३५ ॥

मान अपमान गोवे । अवघे गुंडूनि ठेवावे ॥ १ ॥ हेंचि देवाचें दर्शन ।
सदा राहे समाधान ॥ २ ॥ शांतीची वसती । तेथें खुंटे काळ-
गती ॥ ३ ॥ आली ऊर्मी साहे । तुका ह्मणे थोडें आहे ॥ ४ ॥

॥ ३७३६ ॥

चाले हें शरीर कोणाचिये सत्ते । कोण बोलवितें हरीविण ॥ १ ॥
देखवी ऐकवी[1] एक नारायण । तयाचें भजन चुको नका ॥ २ ॥

पाठभेदः—१ दाखवी.

मानसाची देव चालवी अहंता । मीचि एक कर्त्ता ह्मणोनियां ॥ ३ ॥
वृक्षाचेंही पान हाले त्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठें ॥ ४ ॥
तुका ह्मणे विठो भरला सबाहीं[1] । तया उणें कांहीं चराचरीं ॥ ५ ॥

॥ ३७३७ ॥

ऐसें कां हो न करा कांहीं । पुढें नाहीं नास ज्या ॥ १ ॥ विश्वंभरा शरणागत । भूतजात वंदूनि ॥ २ ॥ श्रुतीचें कां नेघा फळ । सारमूळ जाणोनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे पुढें कांहीं । वाट नाहीं यावरी ॥ ४ ॥

॥ ३७३८ ॥

ऐसा घेईं कां रे संन्यास । करीं संकल्पाचा न्यास ॥ १ ॥ मग तूं राहें भलते ठायीं । जनीं वनीं खाटे भोई ॥ २ ॥ तोडीं जाणिवेची कळा । होई वृत्तीसी वेगळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नभा । परता[2] आणूचाही गाभा ॥ ४ ॥

॥ ३७३९ ॥

न करीं रे संग राहें रे निश्चळ । लागों नेदी मळ ममतेचा ॥ १ ॥
या नांवें अद्वैत खरें ब्रह्मज्ञान । अनुभवावांचून बडबड ते ॥ २ ॥
इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पाही न ये वरी मन ॥ ३ ॥
तुका ह्मणे न ये जाणीव अंतरा । अंतरीं या थारा आनंदाचा ॥ ४ ॥

॥ ३७४० ॥

भक्ति तें नमन वैराग्य तो त्याग । ज्ञान ब्रह्मीं भोग ब्रह्मतनु ॥ १ ॥
देहाच्या निरसनें पाविजे या ठाया । माझी ऐसी काया जंव नव्हे ॥ २ ॥
उदक अग्नि धान्य जाल्या घडे पाक । एकाविण एक कामा नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज कळे ते चांचणी । बडबडीची वाणी अथवा सत्य ॥ ४ ॥

॥ ३७४१ ॥

क्षणक्षणा सांभाळितों । साक्षी होतों आपुला ॥ १ ॥ न घडावी पायीं

---

पाठभेदः—१ सबाह्य. २ होई आमुचाही भागा.

तुटी । मनें[1] मिठी घातली ॥ २ ॥ विचारतों वचनां आधीं । धरूनि शुद्धी ठेविली ॥३॥ तुका ह्मणे मागें भ्यालों । तरी जालों जागृत ॥ ४ ॥

॥ ३७४२ ॥

शिखा सूत्र तुझा गुंतला जमान । तंववरि तूं जाण श्रुतिदास ॥ १ ॥ त्याची तुज कांहीं चुकतांचि नीत । होसील पतित नरकवासी ॥ २ ॥ बहु[2] तूं लाजसी चतुर शाहाणा । शुद्ध आचरणा चुकों नको ॥ ३ ॥ शिखा सूत्र याचा तोडीं तूं संबंध । मग तुज बाध नाहीं नाहीं ॥४॥ तुका ह्मणे तरि वर्तूनि निराळा । उमटती कळा ब्रह्मींचिया ॥ ५ ॥

॥ ३७४३ ॥

आपुलिया[3] तुह्मी रूपासी समजा । कासया वरजा आरसिया ॥ १ ॥ हें तों नव्हे देहबुद्धीचें कारण । होईल नारायणें दान केलें ॥ २ ॥ बभ्रूचिया बाणें वर्मासि स्पर्शावें । हें तों नाहीं ठावें मोकलित्या ॥३॥ तुका ह्मणे बहु सुखें[4] या वचना । सत्याविण जाणा चाली नाहीं ॥ ४ ॥

॥ ३७४४ ॥

सहज पावतां भगवंतीं । परि हीं विकल्पें परतीं । फुकाची हे चित्तीं । आठवण कां न धरिती ॥ १ ॥ हरि व्यापक सर्वगत । हें तव मुख्यत्वें वेदान्त । चिंतनासी चित्त । असों द्यावें सावध ॥ २ ॥ विरजाहोम याचि नांवें । देह नव्हे मी जाणावें । मग कां जी यावें । वरि लागे संकल्पा ॥ ३ ॥ कामक्रोधें देह मळिण । स्वाहाकारीं कैंचें पुण्य । मंत्रीं पूजियेला यज्ञ । मनमुंडण नव्हेचि ॥४॥ अनन्यभक्तीचे उपाय । ते या विठोबाचे पाय । ध्याइल तो काय । जाणें चुकों मारग ॥५॥ आतां सांगे तुका । एक तुह्मी चुकों नका । सांडीमांडी धोका । शरण रिघतां गोमटें ॥ ६ ॥

---

पाठभेदः—१ मन मुठी घातलें. २ बहु तूं जाणतासि. बहुत जाणतासि. ३ आपुलाल्या. ४ सुखें.

॥ ३७४५ ॥

सरतें माझें तुझें । तरि हें उतरतें ओझें ॥ १ ॥ नलगे सांडावें मांडावें । आहे शुद्धचि स्वभावें ॥ २ ॥ घातला तो आशा । मोहोजाळें गळां फासा ॥ ३ ॥ सुखाचा तो मान । नाहीं दुःखाचा तो सीण ॥ ४ ॥ करितां नारायण । एवढें वेचितां वचन ॥ ५ ॥ लाभ हानि हे समान । तैसा मान अपमान ॥ ६ ॥ तुका ह्मणे याचें । नांव सोंवळें साचें ॥ ७ ॥

॥ ३७४६ ॥

हेंचि याच्या ऐसें मागावें दान । वंदूनि चरण नारायणा ॥ १ ॥
धीर उदारीव निर्मळ निर्मत्सर । येणें सर्वेश्वर ऐसें नांव ॥ २ ॥
हाचि होईजेल याचिया विभागें । अनुभवी[1] अंगें अनुभववील ॥ ३ ॥
जोडे तयाचे कां न करावे सायास । जाला तरि अळस दीनपणें ॥ ४ ॥
पावल्यामागें कां न घालावी धांव । धरिल्या तरि हांव बळ येतें ॥ ५ ॥
तुका ह्मणे घालूं खंडीमध्यें टांक । देवाचे हें एक करूनी घेऊं ॥ ६ ॥

॥ ३७४७ ॥

वाढलियां मान न मनावी निश्चिती । भूतांचिये प्रीती भूतपण ॥ १ ॥
ह्मणऊनि मना लावावी कांचणी । इंद्रियांचे झणी ओढी भरे ॥ २ ॥
एका एकपणें एकाचिये अंगीं । लागे रंग रंगीं मिळलिया ॥ ३ ॥
तुका ह्मणे देव निष्काम निराळा । जीवदशे चाळा चळणांचा ॥ ४ ॥

॥ ३७४८ ॥

विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ॥ १ ॥
आइका जी तुम्ही भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ॥ २ ॥
कोणाही जिवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे एका देहाचे अवयव । सुख दुःख जीव भोग पावे ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ अनुभववी.

॥ ३७४९ ॥

पुसावें तें ठाई आपुल्या आपण । अहंकारा शून्य घालूनियां ॥ १ ॥
येर वाग्जाळ मायेचा अहंकार । वचनाशीं थार अज्ञान तें ॥ २ ॥
फळ तेंचि बीज बीज तेंचि फळ । उपनांवें मूळ न पालटे ॥ ३ ॥
तुका ह्मणे अवघे गव्हांचे प्रकार । सोनें अलंकार मिथ्या नांव ॥ ४ ॥

॥ ३७५० ॥

चित्ताचें बांधलें जवळी तें वसे । प्रकाशीं प्रकाशे सर्वकाळ ॥ १ ॥
अंतरीं वसावी उत्तम ते भेटी । होऊं कांहीं तुटी न सकेची ॥ २ ॥
ब्रह्मांड कवळे आठवणेसाटीं । धरावा तो पोटीं वाव बरा ॥ ३ ॥
तुका ह्मणे लाभ घरींचिया घरीं । प्रेमतंतु दोरी न तुटतां ॥ ४ ॥

॥ ३७५१ ॥

साधावा तो देव सर्वस्वाचे साटीं । प्रारब्ध तुटी क्रियमाण ॥ १ ॥
मग कासयानें पुन्हा संवसार । बीजाचे अंकुर दग्ध होती ॥ २ ॥
जिणें दिल्हें त्यासी द्यावा[1] पिंड दान । उत्तीर्ण चरण धरूनि व्हावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे निज भोगईल निजता । नाहीं होइल सत्ता दुजियाची ॥ ४ ॥

॥ ३७५२ ॥

आपुलें आपण जाणावें स्वहित । जेणें राहे चित्त समाधान ॥ १ ॥
बहुरंगें माया असे विखुरली । कुंटितचि चाली होतां बरी ॥ २ ॥
पूजा ते अबोला चित्ताच्या प्रकारीं । भाव विश्वंभरीं समर्पावा ॥ ३ ॥
तुका ह्मणे गेला फिटोनियां भेव । मग होतो देव मनाचाचि ॥ ४ ॥

॥ ३७५३ ॥

चंचळीं चंचळ निश्चळीं निश्चळ । वाजवी खळाळ उदकासी ॥ १ ॥
सोपें वर्म परि मन नाहीं हातीं । हा हा भूत चित्तीं भ्रम गाढा ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ यावें पिंडदान.

रविबिंब माहीं तुटत उदका । छायेची ते नका सरी धरूं ॥ ३ ॥
तुका ह्मणे भय धरी रज्जूसाटीं । नाहीं साच पोटीं कळलें तों ॥ ४ ॥

॥ ३७५४ ॥

दुजें खंडे तरी । उरला तो अवघा हरि । आपगावाहेरि । न लगे ठाय धुंडावा ॥ १ ॥ इतुलें जाणावया जाणा । कोंडे तरी मनें मना । पारधीच्या खुणा । जाणेतेणेंचि साधाव्या ॥ २ ॥ देह आधीं काय खरा । देहसंबंध पसारा । बुजगावणें चोरा । रखुगसें भासतें ॥ ३ ॥ तुका करी जागा । नको वासपूं वाउगा । आहेसि तूं आगा । अंगीं डोळे उघडी ॥ ४ ॥

॥ ३७५५ ॥

मृगजळा काय करावा उतार । पावावया पार पैलथडी ॥ १ ॥
खापराचे होन खेळती लेंकुरें । कोण त्या वेव्हारें लाभ हाणि ॥ २ ॥
मंगळदायक करिती कुमारी । काय त्यांची खरी सोयरीक ॥ ३ ॥
स्वप्नींचें जें सुख दुःख झालें कांहीं । जागृतीं तो नाहीं साच भाव ॥ ४ ॥
सार्गे जालीं मेलीं लटिकें वचन । बद्धमुक्त सीण तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ३७५६ ॥

माया तेंचि ब्रह्म ब्रह्म तेचि माया । अंग आणि छाया तयापरी ॥ १ ॥
तोडितां न तुटे सारितां निराळी । लोटांगणांतळीं हारपते ॥ २ ॥
दुजे नाहीं येथें[2] बळ कोणासाटीं । आणीक ते अटी विचाराची ॥ ३ ॥
तुका ह्मणे उंच वाढे उंचपणें । टेंगणीं लवणें जैसीं तैसीं ॥ ४ ॥

॥ ३७५७ ॥

गति अधोगति मनाची हे युक्ति । मन लावी एकांतीं साधुसंगें ॥ १ ॥
जतन करा जतन करा । धांवतें सैरा ओढाळ तें ॥ २ ॥

---

पाठभेद:—१ ठाय. २ तेथें.

मान अपमान मनाचें लक्षण। लाविलिया ध्यान तेंचि करी ॥ ३ ॥ तुका ह्मणे मन उतरी भवसिंधु । मन करी बंधु चौऱ्याशीचा ॥ ४ ॥

॥ ३७५८ ॥

विचारा वांचून । न पवीजे समाधान ॥ १ ॥ देह त्रिगुणांचा बांधा। माजी नाहीं गुण सुदा ॥ २ ॥ देवाचिये चाडे । देवा द्यावें जें जें घडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे होतें । बहु गोमटें उचितें ॥ ४ ॥

॥ ३७५९ ॥

देह नव्हे मी हें सरे । उरला उरे विठ्ठल ॥१॥ ह्मणऊनि लाहो करा। काळ सारा चिंतनें ॥ २ ॥ पाळणाची नाहीं चिंता । ठाव रिता देवाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीवासाटीं । देव पोटीं पडेल ॥ ४ ॥

॥ ३७६० ॥

सर्वस्वाची साटी । तरिच देवासवें गांठी ॥ १ ॥ नाहीं तरी जया तैसा । भोग भोगवील इच्छा ॥२॥ द्यावें तेंचि घ्यावें। ह्मणउनि जीवें जावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे उरी । मागें नुरवितां वरी ॥ ४ ॥

॥ ३७६१ ॥

अमर आह्मां अमर आह्मां। खरे कीं पाहा खोटें हें ॥१॥ न ह्मणां देह माझा ऐसा। मग भरवसा कळेल ॥२॥ कैंचा धाक कैंचा धाक । सकळिक हें आपुलें ॥३॥ देवचि बरे देवचि बरे। तुका ह्मणे खरे तुह्मी ॥४॥

॥ ३७६२ ॥

आधीं देह पाहतां वाव। कैंचा प्रारब्धासी ठाव ॥१॥ कां रे रडतोसी माना । लागें विठ्ठल चरणा ॥ २ ॥ दुर्जेपण जालें वाव । त्रिभुवनीं नाहीं ठाव ॥३॥ तुका ह्मणे खरें पाहें। विठ्ठल पाहोनियां राहें ॥ ४ ॥

॥ ३७६३ ॥

नाहीं शब्दाधीन वर्म आहे दुरी । नव्हे तंत्रीं मंत्रीं अनुभव तो ॥ १ ॥

हर्षामर्षें अंगीं आदळती लाटा । कामक्रोधें तटा सांडियेलें ॥ २ ॥
न सरे ते भक्ति विठोबाचे पायीं । उपरति नाहीं जेथें चित्ता ॥ ३ ॥
तुका ह्मणे सुख देहनिरसनें । चिंतन चिंतनें तद्रूपता ॥ ४ ॥

॥ ३७६४ ॥

इच्छा चाड नाहीं । न धरी संकोचही कांहीं ॥ १ ॥ उदका नेलें तिकडे जावें । केलें तैसें सहज व्हावें ॥ २ ॥ मोहरी कांदा ऊंस । एक वाफा भिन्न रस ॥३॥ तुका ह्मणे सुख । पीडा इच्छा पावे दुःख ॥४॥

॥ ३७६५ ॥

संदेह बाधक आपआपणयांतें । रज्जुसर्पवत भासतसे ॥ १ ॥
भेऊनियां काय देखिलें येणें । मारें घायेंविण लोळतसे ॥ २ ॥
आपणचि तारी आपणचि मारी । आपण उद्धरी आपणयां ॥ ३ ॥
शुकनळिकेन्यायें गुंतलासी काय । विचारूनि पाहें मोकळिया ॥ ४ ॥
पापपुण्य कैसे भांजिले अंक । दशकाचा एक उरविला ॥ ५ ॥
जाणोनियां काय होतोसि नेणता । शून्या ठाव रिता नाहीं नाहीं ॥६॥
दुरा दृष्टी पाहें न्याहाळूनि । मृगजळा पाणी न ह्मणे चाडा ॥ ७ ॥
धांवतांचि फुटे नव्हे समाधान । तुका ह्मणे जाण पावे पीडा ॥ ८ ॥

॥ ३७६६ ॥

जें जें जेथें पावे । तें तें समर्पावें सेवे ॥१॥ सहज पूजा याचि नांवें । गळित अभिमानें व्हावें ॥ २ ॥ अवघें भोगितां गोसावी । आदीं आवसानीं जीवीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे सिण । न धरितां नव्हे भिन्न ॥ ४ ॥

॥ ३७६७ ॥

योग तप याचि नांवें । गळित व्हावें अभिमानें ॥ १ ॥ करणें तें हेंचि करा । सत्यें बरा व्यापार ॥ २ ॥ तरि खंडे येरझार । निघे भार देहाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे मानामान । हें बंधन नसावें ॥ ४ ॥

॥ ३७६८ ॥

देह हा सादर पाहावा निश्चित । सर्व सुख एथें नाम आहे ॥ १ ॥
ब्रह्म जें देखणें द्वैत जेव्हां गेलें । शरीर तें जालें ब्रह्मरूप ॥ २ ॥
यजन याजन तप व्रत करिती । विकल्पें नागवती शुद्ध पुण्या ॥३॥
तुका ह्मणे सर्व सुख एथें आहे । भ्रांति दूर पाहें टाकुनियां ॥ ४ ॥

॥ ३७६९ ॥

अक्षरांचा श्रम केला । फळ आला तेणें तो ॥ १ ॥ अवघियाचा
तळ धरी । जीवा उरी नुरउनी ॥२॥ फळलें तें लवे भारें । पिक खरें
आलें तई ॥ ३ ॥ तुका ह्मणे हा गे देव । पुढें भाव सारावा ॥ ४ ॥

॥ ३७७० ॥

आशा ते करविते बुद्धीचा लोप । संदेह तें पाप कैसें नव्हे ॥ १ ॥
आपला आपण करावा विचार । प्रसन्न तें सार मन ग्वाही ॥ २ ॥
नांवें रूपें अंगीं लाविला विटाळ । होतें त्या निर्मळ शुद्ध बुद्ध ॥ ३ ॥
अंधळ्यानें नये देखण्याची चाली । चाला ऐसी बोली तुका बोले ॥४॥

॥ ३७७१ ॥

साहोनियां टोले उरवावें सार । मग अंगीकार खऱ्या मोलें ॥ १ ॥
भोगाचे सांभाळीं द्यावें कळिवर । संचिताची थार मोडूनियां ॥ २ ॥
महत्त्वाचे ठायीं भोगावी अप्रतिष्ठा । विटवावें नष्टां पंचभूतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे मग कैंचा संवसार । जयाचा आदर तेंचि व्हावें ॥ ४ ॥

॥ ३७७२ ॥

भोग भोगावरी द्यावा । संचिताचा करूनी ठेवा ॥ १ ॥ शांती धरणें
जिवासाटीं । दया उत्तम गोमटी ॥ २ ॥ देह लेखावें असार । सत्य
परउपकार ॥३॥ तुका ह्मणे हे मिरासी । बुडी द्यावी ब्रह्मरसीं ॥४॥

---

पाठभेदः—१ तुका ह्मणे देवा.

॥ ३७७३ ॥

त्याग तरी ऐसा करा । अहंकारा दवडावें ॥१॥ मग जैसा तैसा राहें । काय पाहें उरलें तें ॥ २ ॥ अंतरींचें विषम गाढें । येऊं पुढें नेदावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे शुद्ध मन । समाधान पाहिजे ॥ ४ ॥

॥ ३७७४ ॥

शुद्ध ऐसें ब्रह्मज्ञान । करा मन सादर ॥ १ ॥ रवि रसां सकळां शोषी । गुणदोषीं न लिंपे ॥ २ ॥ कोणासवें नाहीं चोरी । सकळांवरी समत्व ॥ ३ ॥ सत्य तरी ऐसें आहे । तुका पाहे उपदेशीं॥४॥

॥ ३७७५ ॥

भूतांचिये नांदे जीवीं । गोसावीच सकळां ॥ १ ॥ क्षण क्षणां जागा ठायीं । दृढ पायीं विश्वास ॥ २ ॥ दावूनियां सोंग दुजें । अंतर बीजें वसतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाणे धर्म । धरीं तें वर्म चिंतन ॥ ४ ॥

॥ ३७७६ ॥

आधीं सोज्वळ करावा मारग । चालतां तें मग गोवी नाहीं ॥ १ ॥
ऐसा चालोनियां आला शिष्टाचार । गोवीचा वेव्हार पापपुण्य ॥ २ ॥
पळणें तों पळा सांडूनि कांबळें । उपाधीच्या मुळें लाग पावे ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें शूर तो निवडे । पडिले बापुडें काळचक्रीं ॥ ४ ॥

॥ ३७७७ ॥

एकविध नारायण । तेथें विषमाचा सीण । पालटेंचि भिन्न । नये अणुप्रमाण ॥ १ ॥ अवघें सारावें गाबाळ । चुकवूनियां कोल्हाळ । आनंदाचें स्थळ । एकाएकीं एकांत ॥२॥ कायावाचामन स्वरूपींच अनुसंधान । लक्ष भेदी बाण । येणें पाडें लवलाहो ॥३॥ तुका ह्मणे आळस निद्रा । येथें देउनियां चिरा । देउनियां धिरा । मिठी जाणा जागृती ॥४॥

॥ ३७७८ ॥

देव तींहीं बळें धरिला सायासें । करूनियां नास उपाधीचा ॥ १ ॥

पूर्वपक्षीं धातु धि:कारिलें जन । स्वयें जनार्दन तेचि जाले ॥ २ ॥
तुका ह्मणे यासी न चले तांतडी । अनुभवें गोडी येईल कळों ॥ ३ ॥

॥ ३७७९ ॥

भक्तीचें तें वर्म जयाचिये हातीं । तया घरीं शांति क्षमा दया ॥ १ ॥
अष्ट महा सिद्धि वोळगती द्वारीं । न वजती दुरी दवडितां ॥ २ ॥
येथें दुष्ट गुण न मिळे निशेष । चैतन्याचा वास जयामाजी ॥ ३ ॥
संतुष्ट हें चित्त सदा सर्व काळ । तुटली हळहळ त्रिगुणाची ॥ ४ ॥
तुका ह्मणे येथें काय तो संदेह । आमचें गौरव आह्मी करूं ॥ ५ ॥

॥ ३७८० ॥

सर्वस्वाचा त्याग तो सदा सोंवळा । न लिंपे विटाळा अग्नि जैसा॥१॥
सत्यवादी करी संसार सकळ । अलिप्त कमळ जळीं जैसें ॥२॥ घडे
ज्या उपकार भूतांची ते दया । आत्मस्थिति तया अंगीं वसे ॥३॥ न
बोले गुणदोष नाइके जो कानीं । वर्तोनि तो जनीं जनार्दन ॥ ४ ॥
तुका ह्मणे वर्म जाणितल्याविण । पावे करितां सीण सांडीमांडी ॥ ५ ॥

॥ ३७८१ ॥

पंडित[1] तो भला । नित्य भजे जो विठ्ठला ॥१॥ अवघें सम ब्रह्म पाहे ।
सर्वां भूतीं विठ्ठल आहे ॥ २ ॥ रिता नाहीं कोणी ठाव । सर्वां भूतीं
वासुदेव ॥३॥ तुका ह्मणे तोचि दास । त्या देखिल्या जाती दोष ॥४॥

॥ ३७८२ ॥

अनुसरे तो अमर जाला । अंतरला संसारा ॥१॥ न देखती गर्भवास ।
कधीं दास विष्णूचे ॥२॥ विसंभेना माता बाळा । तैसा लळा पाळावा ।
॥ ३ ॥ त्रिभुवनीं ज्याची सत्ता । तुक्या राखिता तो जाला ॥ ४ ॥

॥ ३७८३ ॥

संवसार तीहीं केला पाठमोरा । नाहीं द्रव्य दारा जया चित्तीं ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ पंडित तोचि एक भला ॥

शुभाशुभ नाहीं हर्षामर्ष अंगीं । जनार्दन जगीं होऊनि ठेला ॥ २ ॥
तुका ह्मणे देह[1] दिला एकसरें । जयासि दुसरें नाहीं मग ॥ ३ ॥

॥ ३७८४ ॥

जरि हा हो कृपा करिल नारायण । तरी हेंचि ज्ञान ब्रह्म होय ॥ १ ॥
कोठोनियां कांहीं नलगे आणावें । नलगे कोठें जावें तरावया ॥ २ ॥
जरी देव कांहीं धरिल पैं चित्तीं । तरि हेचि होती दिव्य चक्षु ॥ ३ ॥
तुका ह्मणे देव दावील आपणा । तरि जीवपणा ठाव नाहीं ॥ ४ ॥

॥ ३७८५ ॥

देवें देऊळ सेविलें । उदक कोरडेंचि ठेविलें ॥ १ ॥ नव्हे मत गूढ उमानें कांहीं । तूं आपआपणापें पाहीं ॥ २ ॥ पाठें पूर वोसंडला । सरिता सागर तुंबोनि ठेला ॥ ३ ॥ वांज घरीं बाळ तान्हा । एक बाळी दों कानां ॥ ४ ॥ तुका ह्मणे पैस । अनुभविया ठावा गोडी रस ॥ ५ ॥

॥ ३७८६ ॥

आहे सकळां वेगळा । खेळे कळा चोरोनि ॥ १ ॥ खांबसुत्राचिये परी । देव दोरी हालवितो ॥ २ ॥ आपण राहोनि निराळा । कैसी कळा नाचवी ॥ ३ ॥ जेव्हां असुडितो दोरी । भूमीवरी पडे तेव्हां ॥ ४ ॥ तुका ह्मणे तो जाणावा । सखा करावा आपुला ॥ ५ ॥

॥ ३७८७ ॥

नाहीं रूप नाहीं नांव । नाहीं ठाव धराया ॥ १ ॥ जेथें जावें तेथें आहे । विठ्ठल मायबहीण ॥ २ ॥ नाहीं आकार विकार । चराचर भरलेंसे ॥ ३ ॥ नव्हे निर्गुण सगुण । जाणे कोण तयासी ॥ ४ ॥ तुका ह्मणे भावाविण । त्याचें मन वोळेना ॥ ५ ॥

---

पाठभेदः—१ देहें.

॥ ३७८८ ॥

जेथें देखें तेथें तुझींच पाउलें । विश्व अवघें कोंदाटलें ॥ रूप गुण नाम अवघा मेघश्याम । वेगळें तें काय उरलें ॥ जातां लोटांगणीं अवघीच मेदिनी । सकळ देव पाट जालें ॥ सदा सर्वकाळ सुदिन सुवेळ । चित्त प्रेमें असे धालें ॥१॥ अवघा आह्मां तूंच जालासी देवा । संसार हेवा कामधंदा ॥ नलगे जाणें कोठें कांहींच करणें । मुखीं नाम ध्यान सदा ॥२॥ वाचा बोले ते तुझेचि गुणवाद । मंत्र जप कथा स्तुति ॥ भोजन सारूं ठायीं फल तांबोल कांहीं । पूजा नैवेद्य तुज होती ॥ चालतां प्रदक्षिणा निद्रा लोटांगण । दंडवत तुजप्रति ॥ देखो न दृष्टी परस्परें गोष्टी । अवघ्या तुझ्या मूर्ति ॥ ३ ॥ जाल्या तीर्थरूप वावी नदी कूप । अवघें गंगाजळ जालें ॥ महाल मंदिरें माड्या तनघरें । झोंपड्या अवघीं देव देवाइलें ॥ ऐकें कानीं त्या हरिनामध्वनी । नाना शब्द होत जाले । तुका ह्मणे आह्मी या विठोबाचे दास । सदा प्रेम सुखें धालों ॥ ४ ॥

॥ ३७८९ ॥

प्रसिद्ध हा असे जगा । अवघ्या रंगारंगाचा ॥१॥ तरी वाटा न वजे कोणी । नारायणीं घरबुडीं ॥२॥ बहुतां ऐसें केलें मागें । लाग लागें लागेना ॥३॥ हो कां नर अथवा नारी । लहान थोरीं आदर ॥४॥ जालें वेगळें लोकीं पुरे । मग नुरे समूळ ॥ ५ ॥ कळेना तो आहे कैसा । कोणी दिशा बहु थोडा ॥६॥ तुका ह्मणे दुसऱ्या भावें । छाये नावें न देखवे ॥७॥

॥ ३७९० ॥

घालुनियां मापीं । देवभक्त बैसले जपीं ॥ १ ॥ तैसी होते सांडउलंडी । निजनिजांची मुकुंडी ॥ २ ॥ अमुपीं उखतें । आपण वोस आपण यातें ॥ ३ ॥ देव आतां जाला । उगवे संकोच वहिला ॥ ४ ॥ अखंड नेलें वेठी । भार सत्याविण गांठी ॥ ५ ॥ आडकिला झोंपा ।

रिता कळिवराचा खोंपा ॥ ६ ॥ गोदातीरीं आड । करिते करविते द्वाड ॥ ७ ॥ तुका ह्मणे बळें । उपदेशाचें तोंड काळें ॥ ८ ॥

॥ ३७९१ ॥

ब्रह्मस्वरूपाचीं[1] कर्मे ब्रह्मरूप । विरहित संकल्प होती जाती ॥ १ ॥ ठेविलिया दिसे रंगाऐसी शिळा । उपाधि निराळा स्पटिक मणि ॥ २ ॥ नानाभाषामतें आळविती बाळा । प्रबोधी तो मूळा जननीठायीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें नमन जाणतियां । लागतसें पायां वेळोवेळां ॥ ४ ॥

॥ ३७९२ ॥

स्वयें पाक करी । संशय तोचि धरी । संदेह सागरीं । आणीक परी बुडती ॥ १ ॥ जाणे विरळा एक । जालें तेथींचें हें सुख । देखिले बहुतेक । पुसतां वाट चुकले ॥ २ ॥ तोचि जाणे सोंवळें । शोधी विकल्पाचीं मुळें । नाचती पाल्हाळें । जे विटाळें कोंडिले ॥ ३ ॥

॥ ३७९३ ॥

तोचि साधी संधी । सावधान त्रिकाळ बुद्धि । संदेहाचा संधी । वेठी आणीक धरियेले[2] ॥ ४ ॥ अखंड तें ध्यान । समबुद्धि समाधान । सोंग वांयांविण । ते झांकून बैसती ॥ ५ ॥ करणें जयासाटीं । जो नातुडे कवणे आटी । तुका ह्मणे साटी । चित्तवित्तेंवांचूनि ॥ ६ ॥

॥ ३७९४ ॥

चित्ताचा चाळक । त्याचें उभय सूत्र एक ॥ १ ॥ नाचवितें नीच छंदें । सुखें आपुल्या विनोदें ॥ २ ॥ चंद्र कमळणी । नाहीं धाडीत सांगोनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे उठी । लोह चुंबकाचे दृष्टी ॥ ४ ॥

॥ ३७९५ ॥

काय नाहीं माझे अंतरीं वसति । व्यापक हा भूतीं सकळां नांदे ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ ब्रह्मरूपाचीं. २ धरियेली. ३ नाना.

चित्तासी प्रसाद होईल चळण । तेंचि तें वळण मनासही ॥ २ ॥
सर्व शक्ति जीवीं राहिल्या कुंटित । नाहीं केलें होत आपुलें तें ॥३॥
तुका ह्मणे दोरी खांब सूत्र्या हातीं । नाचवी नाचतीं जडें तैसीं ॥४॥

॥ ३७१६ ॥

चित्त तें चिंतन कल्पनेची धांव । जे जे वाढे हांव इंद्रियांची ॥ १ ॥
हात पाव दिसे शरीर चालतां । नांवें भेद सत्ता जीवाची ते ॥ २ ॥
रवीचिये अंगीं प्रकाशें[1] सकळा । वचनें निराळा भेद दिला ॥ ३ ॥
तुका ह्मणे माप वचनाच्या अंगीं । मौन्य काय रंगीं निवडावें ॥४॥

॥ ३७१७ ॥

परिसाचे अंगें सोनें जाला विळा । वाकणें या कळा हीन नव्हे ॥ १ ॥
अंतरीं पालट घडला कारण । मग समाधान तेंचि गोड ॥ २ ॥
पिकली या सेंद पूर्वकर्मा नये । अव्हेरु तो काये घडे मग ॥ ३ ॥
तुका ह्मणे आणा पंगती सुरण । पृथक ते गुण केलें पाकें ॥ ४ ॥

॥ ३७१८ ॥

शुद्धाशुद्ध निवडे कैसें । चर्म मास भिन्न नाहीं ॥ १ ॥ कांहीं अधिक नाहीं उणें । कवण्या गुणें देवासी ॥२॥ उदक असे भिन्न काई । वाहाळ बावी स-रिता नई ॥ ३ ॥ सूर्य तेजें निवडी काय । रश्मी रसा सकळा खाय ॥ ४ ॥ वर्णी भिन्न दुधा नाहीं । सकळा गाई सारखें ॥ ५ ॥ करितां भिन्न नाहीं माती । मडक्या गति भिन्न नांवें ॥ ६ ॥ वर्त्ते एकविध अग्नि । नाहीं मनीं शुद्धाशुद्ध ॥७॥ तुका ह्मणे पात्र चाड । किंवा विषें अमृत गोड ॥८॥

॥ ३७१९ ॥

जीविता तो माझा पिता । उखता तो उखत्यांचा ॥ १ ॥ जनार्दनीं सरती कर्में । बाधा भ्रमें अन्यत्रें ॥२॥ अपसव्य सव्यामधीं । ऐसी शुद्धी न धरितां ॥३॥ तुका ह्मणे खांद्या पानें । सिंचतां भिन्न कोरडीं ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ प्रकाशक कळा.

॥ ३८०० ॥

अग्नीमाजी पडे धातु। लीन होउनि राहे आंतु ॥ होय शुद्ध न पवे घातु। पटतंतुप्रमाण ॥ १ ॥ बाह्यरंगाचें कारण। मिथ्या अवघेंचि भाषण ॥ गर्व ताठा हें अज्ञान। मरण सवें वाहातसे ॥ २ ॥ पुरें मातलिया नदी। लव्हा नांदे जीवनसंधी ॥ वृक्ष उन्मळोनि भेदी। परि तो कधीं भंगेना॥३॥ हस्ती परदळा जो भंगी। तया पायीं न मरे मुंगी ॥ कोण जाय संगी। पाणीवाणी तयाच्या ॥४॥ पिटितां घणें वरि सैरा। तया पोटीं राहे हिरा ॥ तैशा काय तगती गारा। तया थोरा होऊनि ॥ ५ ॥ लीन दीन हेंचि सार। भव उतरावया पार ॥ बुडे माथां भार। तुका ह्मणे वाहोनि ॥ ६ ॥

॥ ३८०१ ॥

योगियाची संपदा त्याग आणि शांति। उभयलोकीं कीर्ति सोहळा मान॥ १ ॥
येरयेरांवरी जायांचें उसणें। भाग्यस्थळीं देणें झाडावेसीं ॥ २ ॥
केलिया फावला ठायींचा तो लाहो। तृष्णेचा तो काहो काव्हवितो ॥ ३ ॥
तुका ह्मणे लाभ अकर्तव्या नांवें। शिवपद जीवें भोगिजेल ॥ ४ ॥

॥ ३८०२ ॥

आहे तें सकळ कृष्णाशी अर्पण। न कळतां मन दुजें भावी ॥ १ ॥
ह्मणउनी पाठी लागतील भूतें। येती गिवसीत पांचजणें ॥ २ ॥
ज्याचें त्या वंचलें आठव न होतां। दंड या निमित्ताकारणें हा ॥ ३ ॥
तुका ह्मणे काळें चेंपियेला गळा। मी मी वेळोवेळां करीतसे ॥ ४ ॥

॥ ३८०३ ॥

ओनाम्याच्या काळें। खडे मांडविले बाळें ॥ १ ॥ तेंचि पुढें पुढें काई। मग लागलिया सोई ॥ २ ॥ रज्जु सर्प होता। तोंवरीचि न कळतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे साचें। भय नाहीं बागुलाचें ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ पावे. २ उसिणें. ३ काहावितो. ४ कृष्णाचि.

॥ ३८०४ ॥

चित्त ग्वाही तेथें लौकिकाचें काई । स्वहित तें ठायीं आपणापें ॥ १ ॥
मनासीं विचार तोचि साच भाव । व्यापक हा देव अंतर्बाहीं ॥ २ ॥
शुद्ध भावा न लगे सुचावा परिहार । उमटे साचार आणिकें ठायीं ॥ ३ ॥
भोगित्यासी काज अंतरींचें गोड । बाहिरल्या चाड नाहीं रंगें ॥ ४ ॥
तुका ह्मणे भाव शुद्ध हें कारण । भाट नारायण होइल त्यांचा ॥ ५ ॥

॥ ३८०५ ॥

देखीचा दिमाख शिकोनियां दावी । हिऱ्या ऐसी केवीं गारगोटी ॥ १ ॥
मर्यादा ते जाणें[1] अरे अभागिया । देवाच्या ऐसिया सकळ मूर्ति ॥ २ ॥
काय पडिलेंसी लटिक्याचे भरी । वोंवाळुनि थोरी परती सांडीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे पुढें दिसतसे घात । करितों फजित ह्मणऊनि ॥ ४ ॥

॥ ३८०६ ॥

ठेवा जाणीव गुंडून । येथें भावचि प्रमाण ॥ १ ॥ एका अनुसरल्या
काज । अवघें जाणे पंढरिराज ॥ २ ॥ तर्कवितर्कासी । वाव नलगे
सायासीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावेंविण । अवघा बोलती तो सीण ॥ ४ ॥

॥ ३८०७ ॥

येथें दुसरी न सरे आटी । देवा भेटी जावया ॥ १ ॥ तोचि ध्यावा
एक चित्तें । करूनि रितें कळिवर ॥ २ ॥ पडउर्मी हृदयांत । यांचा
अंत पुरवूनि ॥ ३ ॥ तुका ह्मणे खुंटे आस । तेथें वास करी तो ॥ ४ ॥

॥ ३८०८ ॥

मुक्त तो आशंका नाहीं जया अंगीं । बद्ध मोहोसंगीं लज्जा चिंता ॥ १ ॥
सुख पावे शांती धरूनि एकांत । दुःखी तो लोकांत दंभ करी ॥ २ ॥
तुका ह्मणे लागे थोडाच विचार । परी हे प्रकार नागवती[2] ॥ ३ ॥

---

पाठभेदः—१ जाण. २ नागविती.

॥ ३८०९ ॥

कुशळ वक्ता नव्हे जाणीव श्रोता । राहे भाव चित्ता धरूनियां ॥ १ ॥
धन्य तो जगीं धन्य तो जगीं । ब्रह्म तया अंगीं वसतसे ॥ २ ॥
न धोवी तोंड न करी अंघोळी । जपे सदाकाळीं रामनाम[1] ॥ ३ ॥
जप तप ध्यान नेणे योग युक्ति । कृपाळु जो भूतीं दयावंत ॥ ४ ॥
तुका ह्मणे होय जाणोनि नेणता । आवडे अनंता जीवाहूनि ॥ ५ ॥

॥ ३८१० ॥

वासनेच्या मुखीं अदळूनि भीतें । निर्वाहापुरतें कारण तें ॥ १ ॥
या नांवें अंतरा आला नारायण । चित्त समाधान खूण त्याची ॥ २ ॥
सर्वकाळ हाचि करणें विचार । विवेकीं सादर आत्मतत्त्वाचे ॥ ३ ॥
तुका ह्मणे जों जों भजनासी वेळे[2] । अंगीं तों तों कळे सन्निधता ॥ ४ ॥

॥ ३८११ ॥

देह आणि देहसंबंधें निंदावीं । इतरें वंदावीं श्वानशूकरें ॥ १ ॥
येणें नांवें ज़ाला मी माझ्याचा झाडा । मोहा नांवें खोडा गर्भवास ॥ २ ॥
गृह आणि वित्त स्वदेशा विटावें । इतरां भेटावें श्वापदाझाडां ॥ ३ ॥
तुका ह्मणे मी हें माझें न यो वाचे । येणें नांवें साचे साधुजन ॥ ४ ॥

॥ ३८१२ ॥

अंतरींचें ध्यान । मुख्य या नांवें पूजन ॥ १ ॥ उपाधि तें अवघें पाप ।
गोड निरसतां संकल्प ॥ २ ॥ आज्ञा पाळावी हा धर्म । जाणते हो
जाणा वर्म ॥ ३ ॥ तुका ह्मणे वृत्ति । अविट हे सहज स्थिति ॥ ४ ॥

॥ ३८१३ ॥

मुक्त होता परी बळें ज़ाला बद्ध । घेउनियां छंद माझें माझें ॥ १ ॥
पाप पुण्य अंगीं घेतलें जडून । वर्म नेणे कोण करिता तो ॥ २ ॥
तुका ह्मणे व्यर्थ गेलें वांयां[3] विण । मृग पावे शीण मृगजळीं ॥ ३ ॥

---

पाठभेदः—१ रामराम. २ वोळे. ३ वांयां गेलें वांयां विण ॥ जैसा मृगशीण मृगजळा.

॥ ३८१४ ॥

तापल्यावांचून नव्हे अळंकार । पिटूनियां सार उरलें तें ॥ १ ॥
मग कदाकाळीं नव्हे शुद्ध जाति । नासें शत्रु होती मित्र तेचि ॥ २ ॥
काळिवर बरें भोगूं द्यावें भोगा । फांसिलें तें रोगा द्वारीं सुटे ॥ ३ ॥
तुका ह्मणे मन करावें पाठेळ । साहावेचि जाळ सिजेवरि ॥ ४ ॥

॥ ३८१५ ॥

वचन तें नाहीं तोडीत शरीरा । भेदन अंतरा वज्राऐसें ॥ १ ॥
कांहीं न सहावे काशाही कारणें । संदेह निधान देह बळी ॥ २ ॥
नाहीं शब्द मुखीं लागत तिखट । नाहीं जड होत पोट तेणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जरी गिळे अहंकार । तरी वसे घर नारायण ॥ ४ ॥

॥ ३८१६ ॥

देवाच्या उद्देशें जेथें जेथें भाव । तो तो वसे ठाव विश्वंभरें ॥ १ ॥
लोभाचें संकल्प पळालियावरी । कैंची तेथें उरी पापपुण्या ॥ २ ॥
शुद्ध भक्ती मन जालिया निर्मळ । कुश्चळी विटाळ वज्रलेप ॥ ३ ॥
तुका ह्मणे ज्याचें तयासीच कळे । प्रांत येतो फळें कळों मग ॥ ४ ॥

॥ ३८१७ ॥

लौकिकासाटीं या पसाऱ्याचा गोवा । कांहीं नाहीं देवा लागों येत ॥ १ ॥
ठेवावा माथा तो तुचलावा पायीं । ठायींच्चिये ठायीं हालों नये ॥ २ ॥
ढवळिल्या मनें वितळिलें रूप । नांव ऐसें पाप उपाधीचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे देव प्रीतीनें कवळीं । ठेवील जवळी उठवूनि ॥ ४ ॥

॥ ३८१८ ॥

भूतीं भगवद्भाव । मात्रासहित जीव । अद्वैत तो ठाव । निरंजन ए-
कला ॥ १ ॥ ऐसीं गर्जती पुराणें । वेदवाणी सकळ जन । संत गर्ज-
तील तेणें । अनुभवें निर्भर ॥ २ ॥ माझें तुझें हा विकार । निरसतां

एकंकार । नलगे कांहीं फार । विचाराचि करणें ॥३॥ तुका ह्मणे दुजें । हें तों नाहींच सहजें । संकल्पाच्या काजें । आपेंआप वाढलें ॥ ४ ॥

॥ ३८१९ ॥

रवि रश्मिमकळा । नये काढितां निराळा ॥ १ ॥ तैसा आह्मां जाला भाव । अंगीं जडोनि ठेला देव ॥ २ ॥ गोडी साकरेपासूनी । कैसी निवडिती दोन्ही ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाद उठी । विरोनि जाय नभा पोटीं ॥ ४ ॥

॥ ३८२० ॥

हारपल्याची नका चिंत्तीं । धरूं खंती वांयांच ॥ १ ॥ पावलें तें ह्मणा देवा । सहच सेवा या नांव ॥२॥ होणार तें तें भोगें घडे । लाभ जोडे संकल्पें ॥ ३ ॥ तुका ह्मणे मोकळें मन । अवघें पुण्य या नांवें ॥४॥

॥ ३८२१ ॥

आहार निद्रे नलगे आदर । आपण सादर तेचि होय ॥ १ ॥ परिमितीविणें बोलणें तें वांयां । फार थोडें काया पिंड पीडी ॥ २ ॥ समाधान त्याचें तोचि एक जाणे । आपुलिया खुणे पावोनियां ॥ ३ ॥ तुका ह्मणे होय पीडा ते न करीं । मग राहें परी भलतिये ॥ ४ ॥

॥ ३८२२ ॥

भूमि अवघी शुद्ध जाणा । अमंगळ हे वासना ॥ १ ॥ तैसे वोसपले जीव । सांडी नसतां अंगीं घाव ॥ २ ॥ जीव अवघे देव । खोटा नागवी संदेह ॥ ३ ॥ तुका ह्मणे शुद्ध । मग तुटलिया भेद ॥ ४ ॥

॥ ३८२३ ॥

निघालें दिवाळें । जालें देवाचें वाटोळें ॥ १ ॥ आतां वेचूं नये वाणी । विचारावें मनिंच्या मनीं ॥ २ ॥ गुंडाळिलीं पोतीं । भीतरी लावियेली वाती ॥ ३ ॥ तुका ह्मणे करा । ऐसा राहे माजी घरा ॥ ४ ॥

॥ ३८२४ ॥

काय साधनाच्या कोटी । केल्या आटी होती त्या ॥ १ ॥ देव कृपा करी जरी । होय उजरी स्वरूपीं ॥२॥ केले होते व्यर्थ श्रम । उपरम न होतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे कळों आलें । सर्व जालें आपरूप ॥ ४ ॥

॥ ३८२५ ॥

हात पाय मिळोनि मेळा । चला ह्मणती पाहों डोळां ॥ १ ॥
देखणी नव्हे देखती कैसे । सकळांचा देखणा डोळाचि असे ॥ २ ॥
डोळ्याचा डोळा पाहों गेला । तुका ह्मणे तो पाहों ठेला ॥ ३ ॥

॥ ३८२६ ॥

प्रगटलें ज्ञान । नारायण भूतीं तें ॥ १ ॥ अनुभवचि घेऊं व्हावा । विनंती देवा करूनियां ॥ २ ॥ देखोवेखीं वदे वाणी । पडिल्या कानीं प्रमाणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे योगक्षेम । घडे तें वर्म साधावें ॥ ४ ॥

॥ ३८२७ ॥

देव आहे सुकाळ देशीं । अभाग्यासी दुर्भिक्षा ॥ १ ॥ नेणती हा करूं सांटा । भरले फांटा आडराणें ॥ २ ॥ वसवूनि असे घर । माग दूर घातला ॥ ३ ॥ तुका ह्मणे मन मुरे । मग जें उरे तेंचि तूं ॥ ४ ॥

॥ ३८२८ ॥

होईल जाला अंगें देव जो आपण । तयासी हे जन अवघे देव ॥१॥
येरांनीं सांगावी रेमट काहाणी । चित्तारंजविणी करावया ॥ २ ॥
धाला आणिकांची नेणे तान भूक । सुखें पाहे सुख आपुलिया ॥३॥
तुका ह्मणे येथें पाहिजे अनुभव । शब्दाचें गौरव कामा नये ॥ ४ ॥

॥ ३८२९ ॥

आहे ऐसा देव वदवावी वाणी । नाहीं ऐसा मनीं अनुभवावा ॥१॥
आवडी आवडी कळिवरा कळिवरीं । वरिली अंतरीं ताळी पडे ॥२॥

अपूर्व दर्शन मातेपुत्रां भेटी । रडूं मागे तुटी हर्षयोगें ॥ ३ ॥ तुका ह्मणे एकें कळतें दुसरें । बरियाचें बरें आहाचें आहाच ॥ ४ ॥

॥ ३८३० ॥

तेंही नव्हे जें करितां कांहीं । ध्यातां ध्यायीं तेंही नव्हे ॥ १ ॥ तेंही नव्हे जें जाणवी जना । वाटे मना तेंही नव्हे ॥२॥ त्रास मानिजे कांटाळा । अशुभ वाचाळ तेंही नव्हे ॥ ३ ॥ तेंही नव्हे जें भोंवतें भोंवे । नागवें धांवे तेंही नव्हे ॥४॥ तुका ह्मणे एकचि आहे । सहजीं पाहें सहज ॥ ५ ॥

---

# स्थितिपर अभंग.

---

## देवाशीं उद्गार.

॥ ३८३१ ॥

असा जी सोंवळे । आहां तैसेचि निराळे ॥१॥ आम्हीं न यों तुमच्या वाटा । काय छटिकाचि ताठा ॥ २ ॥ चिंतनचि पुरे । काय सलगी सर्वें धुरे ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । नका नावडे ते सेवा ॥ ४ ॥

॥ ३८३२ ॥

अवघाच अन्यायी । तेथें एकल्याचें काई ॥ १ ॥ आतां अवघें एक वेळे । जळोनि सरो तें निराळें ॥ २ ॥ काय माझें खरें । एवढें राखों बरें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां । परिहार न लगे चित्ता ॥ ४ ॥

॥ ३८३३ ॥

अपराधी ह्मणोनि येतों काकुलती । नाहीं तरी होती काय चाड ॥१॥
येइल तारूं तरी ताराजी देवा । नाहीं तरी सेवा घ्या वो भार ॥२॥
कासया मी आतां वंचूं हें शरीर । आहें बारगीर जाईं जनें ॥३॥
तुका ह्मणे मन करूनि मोकळें । आहें साळेंढाळें उदार मी ॥४॥

---

पाठभेदः—१ अहाचावें.

॥ ३८३४ ॥

अनुभव ऐसा । मज लागला सरिसा ॥ १ ॥ पाठी बैसली सेजारीं । नव्हे शांत कोणे परी ॥ २ ॥ कोठें न लगे जावें । कांहीं घालावया ठावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कोटि । दुःखाच्याच तये पोटीं ॥ ४ ॥

॥ ३८३५ ॥

अनुभवें कळों येतें पांडुरंगा । रुसावें तें कां गा तुह्मांवरी ॥ १ ॥
आवरितां चित्त नावरे दुर्जन । घात करी मन माझें मज ॥ २ ॥
अंतरीं संसार भक्ति बाह्यात्कार । ह्मणोनि अंतर तुझ्या पायीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे काय करूं नेणें वर्म । आलें तसें कर्म सोसूं पुढें ॥ ४ ॥

॥ ३८३६ ॥

अनाथां जीवन । आह्मां तुमचे चरण । करूनि सांटवण । धरीयेलें हृदयीं ॥१॥ पुष्ट जाली अंगकांति । आनंद न समाये चित्तीं । कवतुकें प्रीती । गाऊं नाचों उल्हासें ॥ २ ॥ करुणा उत्तरीं । करूं आळवण हरी । जाऊं नेदूं दुरी । प्रेम प्रीति पडिभरें ॥ ३ ॥ मोहो माते करी गोवा । ऐसें आहे जी केशवा । तुका ह्मणे सेवा । आणीक नाहीं जाणता ॥ ४ ॥

॥ ३८३७ ॥

असोत हे तुझे प्रकार सकळ । काय खळखळ करावी हे ॥ १ ॥
आमुचें स्वहित जाणतसों आह्मी । तुझें वर्म नामीं आहे तुझ्या ॥ २ ॥
विचारितां आयुष्य जातें वांयांविण । रोज नागवण पडतसे ॥ ३ ॥
राहेन मी तुझे पाय आठवूनी । आणीक तें मनीं येऊं नेदीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे [१]येथे येसी अनायासें । थोर तुज पिसें कीर्तनाचें ॥ ५ ॥

॥ ३८३८ ॥

अवचित या तुमच्या पायां । देवराया पावलों ॥१॥ बरवें जालें देशा-

पाठभेदः—१ तेथें.

उर। आल्या दुर सारिखें ॥ २ ॥ राहोनियां जातों ठायां। आलियाची निशाणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे चरणसेवा। जोडी हेवा लाधली ॥ ४ ॥

॥ ३८३९ ॥

अनाथाचा नाथ पतितपावन। दीनाचें रक्षण करीतसे ॥ १ ॥
ऐसें जाणोनियां नामीं विश्वासलों। भीमातीरा आलों धांवतचि ॥ २ ॥
स्नान हें करितां त्रिताप निवाले। महाद्वारा आलें मन माझें ॥ ३ ॥
तेथें अनुमात्र रीग नव्हे याचा। परतलों साचा तेथूनियां ॥ ४ ॥
पुंडलिकापाशीं येऊनि पुसिलें। चिन्मय दाटलें जनार्दन ॥ ५ ॥
तुका ह्मणे आतां दुजा देव नाहीं। बाप तरी आई तोचि विठो ॥ ६ ॥

॥ ३८४० ॥

आतां येणें पडिपाडें। रस सेवूं हा निवाडें। मुंगी नेली गोडें। ठेविलिये अडचणी ॥ १ ॥ तैसें होय माझ्या जीवा। चरण न सोडीं केशवा। विषयबुद्धि हेवा। वोस पडो सकळ ॥ २ ॥ भुकेलिया श्वाना। गांठ पडे सवें अन्ना। भुंको पाहे प्राणा। परि तोंडींची न सोडी ॥ ३ ॥ काय जिंकियेलें मन। जीवित्व कामातुरा तृण। मागे अभिचारिणे[१]। भक्ती तुका ये जाती ॥ ४ ॥

॥ ३८४१ ॥

आतां कोठें धांवे मन। तुझे चरण देखिलिया ॥ १ ॥ भाग गेला सीण गेला। अवघा जाला आनंदु ॥ २ ॥ प्रेमरसें बैसली मिठी। आवडी लाठी मुखासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मांजोगें। विठ्ठल घोगें खरें माप ॥ ४ ॥

॥ ३८४२ ॥

आतां आह्मां हेंचि काम। वाचे स्मरों रामराम ॥ १ ॥ ऐसी मोलाची हे घडी। धरूं पायांची आवडी ॥ २ ॥ अमृताची खाणी। तये ठायीं वेचूं वाणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे पांडुरंगा। माझ्या जीवींच्या जिवलगा ॥ ४ ॥

---

पाठ भेदः—१धर्म. २ विभिचारिण.

॥ ३८४३ ॥

आहें तैसा आतां आहे ठायीं बरा। ठेविलों दातारा उचितें त्या ॥ १ ॥
वचनाचा भार पडिलिया शिरीं। जालें मग भारी उतरेना ॥ २ ॥
अबोल्याची सवे लावुनियां मना। फाकों नेदूं गुणा ऐसें करूं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां गोंवळ्याचा संग। राखतें तें अंग जाणतसों ॥ ४ ॥

॥ ३८४४ ॥

आळी करावी ते कळतें बाळका। बुझवावें हें कां नेणां तुह्मी ॥ १ ॥
निवाड तो तेथें असे पायांपाशीं। तुह्मां आह्मांविशीं एकेठायीं ॥ २ ॥
आणीक तों आह्मी न देखोंसें जालें। जाणावें शिणलें भागलेंसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मां लागतें सांगावें। अंतरींचें ठावें काय नाहीं ॥ ४ ॥

॥ ३८४५ ॥

आपुलिये टाकीं। करीन कांहीं तरी एकी ॥ १ ॥ करीन पायांशीं
वोळखी। करिसी तें करीं सुखीं ॥२॥ कायाक्लेशगंगाजळ। समर्पीन
तुळसीदळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा। कर जोडीन ते सेवा ॥ ४ ॥

॥ ३८४६ ॥

आतां तुझें नाम गात असें गीतीं। ह्मणोनि मानिती लोक मज ॥ १ ॥
अन्नवस्त्रचिंता नाहीं या पोटाची। वारिली देहाचि थोर पीडा ॥ २ ॥
सज्जन संबंधीं तुटली उपाधी। रोकडी या बंदीं सुटलोंसें ॥ ३ ॥
घ्यावा द्यावा कोणें करावा सायास। गेली आशा पाश वारोनियां ॥४॥
तुका ह्मणे तुज कळेल तें आतां। करा जी अनंता मायबापा ॥ ५ ॥

॥ ३८४७ ॥

आतां मी पतित ऐसा साच भावें। कळों अनुभवें आलें देवा ॥ १ ॥
काय करावें तें रोकडेंचि करी। राहिली हे उरी नाहीं दोघां ॥ २ ॥
येर येरा दृष्टी द्यावया उत्तरा। यासी काय करा गोही आतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे मेलों सांगतसांगतां। तेंचि आलें आतां कळों तुह्मां ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ गेले.

॥ ३८४८ ॥

आतां भय नाहीं ऐसें वाटे जीवा। घडलिया सेवा समर्थाची ॥ १ ॥
आतां माझ्या मनें धरावा निर्धार। चिंतनीं अंतर न पडावें ॥ २ ॥
येथें नाहीं जाली कोणाची निरास। आल्या याचकास कृपेविशीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें नाहीं दुजी परी। राया रंका सरी देवा पायीं ॥ ४ ॥

॥ ३८४९ ॥

आतां सर्वभावें हा माझा निर्धार। न करीं विचार आणिकांसी ॥ १ ॥
सर्वभावें नाम गाईन आवडी। सर्व माझी जोडी पाय तुझे ॥ २ ॥
लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं। पाहीन भरोनि डोळे मुख ॥ ३ ॥
निर्लज्ज होऊनि नाचेन रंगणीं। येऊं नेदीं मनीं शंका कांहीं ॥ ४ ॥
अंकित आंकिला दास तुझा देवा। संकल्प हा जीवा तुका ह्मणे ॥५॥

॥ ३८५० ॥

आतां येथें जाली जीवासवें साटी। होतें तैसें पोटीं फळ आलें ॥१॥
आतां धरिले ते न सोडीं चरण। सांपडलें धन निजठेवा ॥ २ ॥
आतां हा आळस असो परता दुरी। नेदावी ते उरी उरों कांहीं ॥३॥
आतां याचा मज न व्हावा विसर। भरोनि अंतर राहो रूप ॥४॥
आतां लोकलाज नयो येथें आड। वहु जालें गोड ब्रह्मरस ॥ ५ ॥
तुका ह्मणे आतां जन्म हा सफळ। अंतरीं गोपाळ स्थिरावला ॥ ६ ॥

॥ ३८५१ ॥

आतां आह्मां हेंचि काम। वांचूं[२] गाऊं[३] तुझें नाम। वाहुनियां टाळी प्रेम। सुखें आनंदें नाचावें ॥ १ ॥ अवघी जाली आराणूक। मागें पुढें सकाळिक। त्रिपुटीचें दुःख। प्रारब्ध सारिलें ॥ २ ॥ गोदातटें निर्मळें। देव देवांचीं देवळें। संत महंत मेळें। दिवस जाय सुखाचा ॥ ३ ॥ तुका ह्मणे पंढरीनाथा। आणिक नाहीं मज चिंता। योगक्षेम माथां। भार तुझ्या घातला ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ आतां माझा सर्व भावें हा निर्धार. २ न विसंभावें तुझें नाम. ३ गोऊं.

॥ ३८५२ ॥

आतां गाऊं तुज ओविया मंगळी । करूं गदारोळी हरिकथा ॥ १ ॥
होसि निवारिता आमुचें सकळ । भय तळमळ पापपुण्य ॥ २ ॥
भोगिले ते भोग लावूं तुझे अंगीं । अलिप्त या जगीं होउनि राहों ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी लाडिकीं लेंकुरें । न राहों अंतरें पायांविण ॥ ४ ॥

॥ ३८५३ ॥

आह्मी सर्वकाळ कैंचीं सावधान । व्यवसायें मन अभ्यासलें ॥ १ ॥
तरी ह्मणा मोट ठेविली चरणीं । केलों गुणागुणीं कासावीस ॥ २ ॥
याचे कानसुलीं मागीतसे हाका । सज घाटूं नका सर्वां आतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे निद्रा जागृति सुषुप्ति । तुह्मी हो श्रीपती साक्षी येथें ॥ ४ ॥

॥ ३८५४ ॥

आह्मीं असों निश्चिंतीनें । एका्या गुणें तुमाचिया ॥ १ ॥ दुराचारी तरले नामें । घेतां प्रेमें ह्मणोनि ॥ २ ॥ नाहीं तुह्मां धांव घेतां । कृपावंता आळस ॥ ३ ॥ तुका ह्मणे विसरूं काई । तुज वो आई विठ्ठले ॥ ४ ॥

॥ ३८५५ ॥

आह्मांसी सांगाती । होती अराले ते होती ॥ १ ॥ येती आइकतां हाक । दोन मिळोन ह्मणती एक ॥ २ ॥ आणिकां उत्तरीं । नसे गोविली वैखरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे बोल । खूण पहाती विठ्ठल ॥ ४ ॥

॥ ३८५६ ॥

आह्मां घरीं धन शब्दांचींच रत्नें । शब्दांचींच [1]वस्त्रें यत्न करूं ॥ १ ॥
शब्दचि आमुच्या जीवाचें जीवन । शब्दें वांटूं धन जनलोकां ॥ २ ॥
तुका ह्मणे पहा शब्दचि हा देव । शब्देंचि गौरव पूजा करूं ॥ ३ ॥

॥ ३८५७ ॥

आह्मांसी सकळ । तुझ्या नामाचेंचि बळ ॥ १ ॥ करूं अमृताचें

---

पाठभेद—१ शस्त्र.

पान । दुजें नेणों कांहीं आन ॥ २ ॥ जयाचा जो भोग । सुख दुःख पीडा रोग ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । तुझे पायीं माझा हेवा ॥ ४ ॥

॥ ३८५८ ॥

आह्मां सर्वभावें हेंचि काम। न विसंबावें तुझें नाम ॥ १ ॥ नलगे करावी हे चिंता। तरणें करणें काय आतां ॥ २ ॥ आसनीं भोजनीं शयनीं। दुजें नाहीं ध्यानीं मनीं॥३॥तुका ह्मणे कृपानिधी। माझी तोडिली उपाधी ॥४॥

॥ ३८५९ ॥

आह्मी मागों ऐसें नाहीं तुजपाशीं। जरी तूं भीतोसि पांडुरंगा ॥ १ ॥
पाहें विचारूनि आहे तुज ठावें। आह्मी धालों नांवें तुझ्या एका ॥ २ ॥
ऋद्धिसिद्धि तुझें मुख्य भांडवल। हें तों आह्मां फोल भक्तीपुढें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाऊं वैकुंठा चालत। बैसोनि निवांत सुख भोगूं ॥ ४ ॥

॥ ३८६० ॥

आह्मी रामाचे राऊत। वीर जुंजार बहुत ॥ १ ॥ मनपवनतुरंग। हातीं नामाची फिरंग ॥ २ ॥ वारू चालवूं चहूंखुरीं। घाला घालूं यमपुरी॥ ३ ॥ तुका ह्मणे पेणें। आह्मां वैकुंठासी जाणें ॥ ४ ॥

॥ ३८६१ ॥

उतरलों पार। सत्य जाला हा निर्धार[1] ॥ १ ॥ तुझें नाम धरिलें कंठीं। केली संसारासी तुटी ॥ २ ॥ आतां नव्हे बाधा। कोणविशीं कांहीं कदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं। आतां उरलें देसें नाहीं ॥ ४ ॥

॥ ३८६२ ॥

उपासा सेवटीं अन्नासवें भेटी। तैसी माझी मिठी पडो पायीं ॥ १ ॥
पुरवीं वासना साच सर्वजाणा। आह्मां नारायणा अंकिताची ॥ २ ॥
बहुदिसां पुत्रा मातेसवें भेटी। तैसा दाटो पोटीं प्रीतिउभड ॥ ३ ॥
तुका ह्मणे धन कृपणा सोइरें। यापरि दुसरें नहो आतां ॥ ४ ॥

---

पाठभेद—१ निश्चित.

॥ ३८६३ ॥

एक वेळे तरी जाईन माहेरा । बहुजन्म फेरा जाल्यावरी ॥ १ ॥
चित्ता हे बैसली अविट आवडी । पालट ती घडी नेघे एकी ॥ २ ॥
करावें तें करी कारण शरीर । अंतरीं त्या धीर जीवनाचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे तरी होईल विलंब । परी माझा लाभ खरा जाला ॥ ४ ॥

॥ ३८६४ ॥

एकाएकीं[1] हातोफळी । ठाया वळी पावले ते ॥ १ ॥ आह्मी देवा शक्तिहीनें । भाकूं तेणें करुणा ॥ २ ॥ पावटणी केला काळ । जया बळ होतें तें ॥ ३ ॥ तुका ह्मणे वीर्यावीर । संतधीर समुद्र ॥ ४ ॥

॥ ३८६५ ॥

ऐसा सर्व भाव तुज निरोपिला । तूं मज एकला सर्वभावें ॥ १ ॥
अंतरींची कां हे नेणसील गोष्टी । परि सुखासाटीं बोलविसी ॥ २ ॥
सर्व माझा भार तुज चालवणें । तेथें म्यां बोलणें काय एक ॥ ३ ॥
स्वभावें स्वहित हिताचें कारण । कौतुक करून निवडिसी ॥ ४ ॥
तुका ह्मणे तूं हें जाणसी गा देवा । आमुच्या स्वभावा अंतरींच्या ॥५॥

॥ ३८६६ ॥

करीं ऐसें जागें। वेळोवेळां पायां लागें ॥ १ ॥ प्रेम झोंबे[2] कंठीं। देह धरणिये लोटीं ॥ २ ॥ राहे लोकाचार। पडे अवघा विसर ॥ ३ ॥ तुका ह्मणे ध्यावें। तुज व्यभिचारभावें ॥ ४ ॥

॥ ३८६७ ॥

कपट कांहीं एक । नेणें भुलवायाचे लोक ॥ १ ॥ तुमचें करितों कीर्तन । गातों उत्तम ते गुण ॥ २ ॥ दाऊं नेणें जडीबुटी । चमत्कार उठाउठी ॥ ३ ॥ नाहीं शिष्यशाखा। सांगों अयाचित लोकां ॥ ४ ॥ नव्हें मठपति । नाहीं चाहुरांची वृत्ति ॥ ५ ॥ नाहीं देवा-

पाठभेद:—१ एकाकेली. २ झोंबो.

चेन । असें मांडिलें दुकान ॥ ६ ॥ नाहीं वेताळ प्रसन्न । कांहीं सांगों खाण खुण ॥ ७ ॥ नव्हें पुराणिक । करणें सांगणें आणिक ॥ ८ ॥ नेणें वाद घटा पटा । करितां पंडित करंटा ॥ ९ ॥ नाहीं जाळीत भणदीं । उदो ह्मणोनि आनंदी ॥ १ ॥ नाहीं हालवीत माळ । भोंवतें मेळवुनि गाबाळ ॥ ११ ॥ आगमीचें कुडें नेणें । स्तंभन मोहन उच्चाटणें ॥ १ ॥ नव्हे यांच्या ऐसा । तुका निरयवासी पिसा ॥ १३ ॥

॥ ३८६८ ॥

कमोदिनी काय जाणे तो परिमळ । भ्रमर सकळ भोगीतसे ॥ १ ॥
तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आह्मीच तें प्रेमसुख जाणों ॥ २ ॥
माते तृण बाळा दुधाची ते गोडी । ज्याची नये जोडी त्यासी कामा ॥३॥
तुका ह्मणे मुक्ताफळ शिंपी पोटीं । नाहीं त्याची भेटी भोग तिये ॥ ४ ॥

॥ ३८६९ ॥

कराल तें करा । हातें आपुल्या दातारा ॥ १ ॥ बळियाचीं आह्मीं बाळें । असों निर्भर या सळे ॥ २ ॥ आतां कोठें काळ । मधीं[1] रिघेल ओंगळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे पंढरीराया । थापटितों ठोक बाह्या ॥ ४ ॥

॥ ३८७० ॥

करीं धंदा परि आवडती पाय । प्रीती सांगों काय नेणां देवा ॥ १ ॥
रूप डोळां देखें सदा सर्वकाळ । संपादितों आळ प्रपंचाचा ॥ २ ॥
नेमून ठेविली काया[2] हे कारणीं । आमुचि[3] हे वाणी गुण वदे ॥ ३ ॥
मनासीं उत्कंठा दर्शनाचा हेवा । नाहीं लोभ जीवा धन धान्य ॥ ४ ॥
उसंतितों पंथ वेंठीचिया परी । जीवनसूत्र दोरीपाशीं ओढ ॥ ५ ॥
तुका ह्मणे ऐसें करितों निर्वाण । जीव तुह्मां भिन्न नाहीं माझा ॥ ६ ॥

॥ ३८७१ ॥

करूनि राहों जरी आत्माचि प्रमाण । निश्चळ नव्हे मन काय करूं ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ करील देवापाशीं बळ. २ कारया कारणीं ३ आमुचिये.

जेवालिया विण काशाचे ढेंकर । शब्दाचे प्रकार शब्दचि ते ॥ २ ॥
पुरे पुरे आतां तुमचें ब्रह्मज्ञान । आह्मासी चरण न सोडणें ॥ ३ ॥
विरोधें विरोध वाढे पुढता पुढती । वासनेचे हातीं गर्भवास ॥ ४ ॥
सांडीमांडीअंगीं वसे पुण्यपाप । बंधन संकल्प याचि नांवें ॥ ५ ॥
तुका ह्मणे नाहीं मुक्तता मोकळी । ऐसा कोण बळी निरसी देह ॥ ६ ॥

॥ ३८७२ ॥

कळस वाहियेला शिरीं । सहस्रनामें पूजा करीं ॥ १ ॥ पीक पिकलें पिकलें । घन दाटोनियां आलें ॥ २ ॥ शेंवटचें दान । भागा आला नारायण ॥ ३ ॥ तुका ह्मणे पोट । भरलें [1]वारलें बोभाट ॥ ४ ॥

॥ ३८७३ ॥

कळेल हें तैसें गाईन मी तुज । जनाम्बवें काज काय माझें ॥ १ ॥
करीन मी स्तुती आपुले आवडी । जैसी माझ्या गोडी वाटे जीवा ॥ २ ॥
होऊनि निर्भर नाचेन मी छंदें । आपुल्या आनंदें करूनियां ॥ ३ ॥
काय करूं कळा युक्ति या कुसरी । जाणिवेच्या परी सकळिका ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझें जयासवें काज । भोळा तो सहज पांडुरंग ॥ ५ ॥

॥ ३८७४ ॥

काम क्रोध आड पडले पर्वत । राहिला अनंत पलीकडे ॥ १ ॥
नुलंघवे मज न सांपडे वाट । दुस्तर हा घाट वैरियांचा ॥ २ ॥
आतां कैंचा मज सखा नारायण । गेला अंतरोन पांडुरंग ॥ ३ ॥
तुका ह्मणे व्यर्थ मोलाचें शरीर । गेलें हा विचार कळों आला ॥ ४ ॥

॥ ३८७५ ॥

काय मागावें कवणासी । ज्यासी मागों तो मजपाशीं ॥ १ ॥ जरी मागों पद इंद्राचें । तरी शाश्वत नाहीं त्याचें ॥ २ ॥ जरी मागों ब्रपद । तरी त्यासी येथीळ छंद ॥ ३ ॥ स्वर्गभोग मागों पूर्ण ।

---

पाठभेदः—१ वारला.

पुण्य सरल्या मागुती येणें ॥ ४ ॥ आयुष्य मागों चिरंजीव । जीवा मरण नाहीं स्वभावें ॥५॥ तुका ह्मणे एक मागें । एकपणा नाहीं भंग ॥६॥

॥ ३८७६ ॥

काय ऐसी वेळ । वोडवली अमंगळ ॥ १ ॥ आजि दुखवलें मन । कथाकाळीं जाला सीण ॥ २ ॥ पापाचिया गुणें । त्यांचिया वेळे दर्शनें ॥ ३ ॥ तुका ह्मणे कानीं । घालूं आलें दुष्टवाणी ॥ ४ ॥

॥ ३८७७ ॥

काय मज एवढा भार । हे वेव्हार चालवाया ॥ १ ॥ उकल तो जाणे धणी । मज भोजनीं कारण ॥२॥ चिंता ज्याची तया शिरीं । लेंकरीं तें खेळावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे सेवट जाला । देव बोलाया भोगिता ॥ ४ ॥

॥ ३८७८ ॥

काय सांगों तुझ्या चरणांच्या सुखा । अनुभव ठाउका नाहीं तुज ॥१॥ बोलतां हें कैसें वाटे खरेपण । अमृताचे गुण अमृतासी ॥ २ ॥ आह्मीं एकएका ग्वाही मायपुतें । जाणों तें निरुतें सुख दोघें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मां मोक्षाचा कांटाळा । कां तुह्मी गोपाळां नेणां ऐसें ॥ ४ ॥

॥ ३८७९ ॥

काय पुण्यराशी । गेल्या भेदूनि आकाशीं ॥ १ ॥ तुह्मी जालेति कृपाळ । माझा केला जी सांभाळ ॥ २ ॥ काय वोळलें संचित । ऐसें नेणें अगणित ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेणें । काय केलें नारायणें ॥ ४ ॥

॥ ३८८० ॥

काय ऐसा जन्म जावा वांयांविण । कांहीं तरी ऋण असो माथां ॥ १ ॥ कोणे तरी काळें होईल आठव । नाहीं जरी भाव भार खरा ॥ २ ॥ शवा एका तरी जन्माच्या सेवटीं । कृपाळुवा पोटीं येईल दया ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं फांकों तरी देत । सर्वांचें उचित सांपडलें ॥ ४ ॥

॥ ३८८१ ॥

कार्ये करुनि करीं धंदा । चित्त गोविंदा तुझे पायीं ॥ १ ॥ ऐशा संकल्पाची संधि । माझे बुद्धि धीर देवा ॥ २ ॥ कुटुंबाचा तुह्मां भार । मज व्यवहार निमित्त ॥ ३ ॥ तुका ह्मणे करितां काम । हृदयीं नाम धरीन ॥ ४ ॥

॥ ३८८२ ॥

कासया गा मज घातलें संसारीं । चित्त पायांवरी नाहीं तुझ्या ॥ १ ॥
कासया गा मज घातलें या जन्मा । नाहीं तुझा प्रेमा नित्य नवा ॥ २ ॥
नामाविण माझी वाचा अमंगळ । ऐसा कां चांडाळ निर्मियेलों ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी जळो जळो काया । विठ्ठला सखया वांचूनियां ॥ ४ ॥

॥ ३८८३ ॥

कांहीं जडभारी । पडतां ते अवसरीं ॥ १ ॥ तुज आठवावे पाय । आह्मीं मोकलूनि धाय ॥ २ ॥ तान पीडी भूक । शीत उष्ण वाटे दुःख ॥ ३ ॥ तुका ह्मणे लाड । तेथें पुरे माझें कोड ॥ ४ ॥

॥ ३८८४ ॥

कोठें भोग उरला आतां । आठवितां तुज मज ॥ १ ॥ आड कांहीं नये दुजें । फळ बीजें आणिलें ॥ २ ॥ उद्वेग ते वांयांविण । कैंचा सीण चिंतनें ॥ ३ ॥ तुका ह्मणे गेला भ्रम । तुमच्या धर्में पायांच्या ॥ ४ ॥

॥ ३८८५ ॥

कोठें देवा आलें अंगा थोरपण । बरें होतें दीन होतों तरी ॥ १ ॥
साधन ते सेवा संतांची उत्तम । आवडीनें नाम गाईजे तें ॥ २ ॥
न पुसतें कोणी कोठें ही असतां । समाधान चित्ताचिया सुखें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जन अव्हेरितें मज । तरी केशीराज सांभाळिता ॥ ४ ॥

॥ ३८८६ ॥

खावें ल्यावें द्यावें । जमाखर्चे तुझ्या नांवें ॥ १ ॥ आतां चुकली

खटपट । झाड्यापाड्याचा बोभाट ॥ २ ॥ आहे नाहीं त्याचें । आह्मां काम सांगायाचें ॥ ३ ॥ तुका ह्मणे चिंता । भार वाही [1]तुईया माथां ॥ ४ ॥

॥ ३८८७ ॥

गाऊं नेणें कळा कुसरी । कान धरोनि ह्मणें हरी ॥ १ ॥ माझ्या बोबडिया बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला ॥ २ ॥ मज हंसतील लोक । परि मी गाईन निःशंक ॥ ३ ॥ तुझे नामीं मी निर्लज्ज । काय जनासवें काज ॥ ४ ॥ तुका ह्मणे माझी विनंती । तुह्मी परिसा कमळापती ॥ ५ ॥

॥ ३८८८ ॥

घेईन मी जन्म याजसाटीं देवा । तुझी चरणसेवा साधावया ॥ १ ॥
हरिनामकीर्तन संतांचें पूजन । घालूं लोटांगण महाद्वारीं ॥ २ ॥
आनंदें निर्भर असों भलते ठायीं । सुखदुःखा नाहीं चाड आह्मां ॥ ३ ॥
आणीक सायास न करीं न धरीं आस । होईन उदास सर्वभावें ॥ ४ ॥
मोक्ष आह्मां घरीं कामारी ते दासी । होय सांगों तैसी तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ३८८९ ॥

चंदनाच्या वासें धरितील नाक । नावडे कनक न घडे हें ॥ १ ॥
साकरेची गोडी सारिखी सकळां । थोरां मोठ्यां बाळां धाकुटियां ॥ २ ॥
तुका ह्मणे माझें चित्त शुद्ध होतें । तरि कां निंदिते जन मज ॥ ३ ॥

॥ ३८९० ॥

चित्तीं तुझे पाय डोळां रूपाचें ध्यान । अखंड मुखीं नाम [2]तुमचे वर्णावे गुण ॥ १ ॥ हेंचि एक देवा तुह्मां मागणें दातारा । उचित तें करा भाव जाणूनि खरा ॥ २ ॥ खुंटली जाणीव कांहीं बोलणें आतां । कळों येईल तैसी करा बाळाची चिंता ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां नका देऊं अंतर । न कळे पुढें काय कैसा होईल विचार ॥ ४ ॥

॥ ३८९१ ॥

[3]जन्मोजन्मींचें संचित । भेटी जाली अकस्मात ॥ १ ॥ आतां सोडितां

पाठभेदः—१ त्याचे. २ 'तुमचे' नाहीं. ३ जन्मोजन्मांची संगत.

सुटेना । तंतु प्रीतीचा तुटेना ॥ २ ॥ माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडिली पंढरिराया ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंतीं । तुझी माझी एक गति ॥ ४ ॥

॥ ३८९२ ॥

जरि न भरे पोट । तरि खेवूं दगडूं ॥ १ ॥ परि न घालूं तुज भार । हाचि आमुचा निर्धार ॥ २ ॥ तुझें नाम अमोलिक । नेणती हे ब्रह्मादिक ॥ ३ ॥ ऐसें नाम तुझें खरें । तुका ह्मणे भासे पुरें ॥ ४ ॥

॥ ३८९३ ॥

आणावें तें काय नेणावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥ १ ॥ करावें तें काय न करावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥ २ ॥ बोलावें तें काय न बोलावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥ ३ ॥ जावें तें कोठें न जावें तें आतां । बरवें आठवितां नाम तुझें ॥ ४ ॥ तुका ह्मणे तूं करिसी तें सोपें । पुण्यें होती पापें आमुच्या मतें ॥ ५ ॥

॥ ३८९४ ॥

जाला हा डांगोरा । मुखीं लहानाचे थोरा ॥ १ ॥ नागविलों जनाचारीं । कोणी बैसों नेदी दारीं ॥ २ ॥ संचिताचा ठेवा । आतां आला तैसा घ्यावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवें । ह्मणों केलें हें बरवें ॥ ४ ॥

॥ ३८९५ ॥

जालें समाधान । तुमचे धरिले चरण ॥ १ ॥ आतां उठावेंसें मना । येत नाहीं नारायणा ॥ २ ॥ सुखाडिकपणें । येथें सांपडलें केणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाग । गेला निवारला लाग ॥ ३ ॥

॥ ३८९६ ॥

जालों बळिवंत । होऊनियां शरणागत ॥ १ ॥ केला घरांत रिघावा । ठायीं पडियेला ठेवा ॥ २ ॥ हातां चढे धन । ऐसें रचिलें कारण ॥ ३ ॥ तुका ह्मणे मिठी । पायीं देउनि केली लुटी ॥ ४ ॥

॥ ३८९७ ॥

जालों निर्भर मानसीं । ह्मणऊनि कळलासी ॥ १ ॥ तुझे ह्मणविती त्यांस । भय चिंता नाहीं आस ॥ २ ॥ चुकविती पाश । गर्भवास यातना ॥ ३ ॥ तुझें जाणोनियां वर्म । कंठीं धरियेलें नाम ॥ ४ ॥ तुका ह्मणे तेणें सुखें । विसरलों जन्मदुःखें ॥ ५ ॥

॥ ३८९८ ॥

जीवन उपाय । वैद्यवाणी तुझे पाय ॥ १ ॥ ते मी नाठवीं घडि घडी । ह्मणोनियां चरफडीं ॥ २ ॥ तुटे भवरोग । जेथें सर्व सुखें भोग ॥ ३ ॥ तुका ह्मणे विटे । धरियेलें जें गोमटें ॥ ४ ॥

॥ ३८९९ ॥

जो मानी तो देईल काई । न मनी तो नेईल काई ॥ १ ॥ आह्मां विठ्ठल सर्वभूतीं । राहो चित्तीं भलतैसा ॥ २ ॥ आधीन तें जना काई । जल्पें वांयांविण ठायीं ॥ ३ ॥ वंदी निंदी तुज तो गा । तुका ह्मणे पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ३९०० ॥

तरिच हा जीव संसारीं उदास । धरिला विश्वास तुह्मां सोई ॥ १ ॥
एके जातीविण नाहीं कळवळा । ओढली गोपाळा सूत्रदोरी ॥ २ ॥
फुटतसे प्राण क्षणांच्या विसरें । हें तों परस्परें सारिखेंचि ॥ ३ ॥
तुका ह्मणे चित्तीं राखिला अनुभव । तेणें हा संदेह निवारला ॥ ४ ॥

॥ ३९०१ ॥

तरी हांव केली अमुपा व्यापारें । व्हावें एकसरें धनवंत ॥ १ ॥
जालों हरिदास शूरत्वाचे नेमें । जालीं ठावीं वर्में पुढिलांचीं ॥ २ ॥
जनावेगळें हें असे अभिन्नव । बळी दिला जीव ह्मणऊनि ॥ ३ ॥
तुका ह्मणे तरी लागलों विल्हेसी । चालतिया दिसीं स्वामी ऋणी ॥ ४ ॥

॥ ३९०२ ॥

तुजविण कोणा । शरण जाऊं नारायणा ॥ १ ॥ ऐसा न देखें मी

कोणी । दुजा तिहीं त्रिभुवनीं ॥ २ ॥ पाहिलीं पुराणें । धांडोळिलीं दरुषणें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठायीं । जडुन ठेलों तुझ्या पायीं ॥ ४ ॥

॥ ३९०३ ॥

तुजविण कांहीं । स्थिर राहे ऐसें नाहीं ॥ १ ॥ कळों आलें बहुता रीती । पांडुरंगा माझ्या चित्तीं ॥ २ ॥ मोकलिली आस । सर्वभावें जालों दास ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूंचि खरा । येर वाउगा पसारा ॥ ४ ॥

॥ ३९०४ ॥

तुजविण चाड आणिकांची कांहीं । धरीन हें नाहीं तुज ठावें ॥ १ ॥
तरणउपाय योगक्षेम माझा । ठेवियेला तुझ्या पायीं देवा ॥ २ ॥
कोण मज आळी काय हे तांतडी । सोनियाची घडी जाय दिस ॥ ३ ॥
तुझिया नामाचें ल्यालोंसें भूषण । कृपा संतजन करितील ॥ ४ ॥
तुका ह्मणे जाला आनंदाचा वास । हृदया या नास नव्हे कधीं ॥ ५ ॥

॥ ३९०५ ॥

तुज दिला देह । आजुनि वागवितों भय । ऐसा विश्वासघातकी । घडली कळतां हे चुकी ॥ २ ॥ बोलतों जें तोंडें । नाहीं अनुभविलें लंडें ॥ ३ ॥ दंड लाहे केला । तुका ह्मणे जी विठ्ठला ॥ ४ ॥

॥ ३९०६ ॥

तुज पाहावें हे धरितों वासना । परि आचरणा नाहीं ठाव ॥ १ ॥
करिसी कैवार आपुलिया सत्ता । तरिच देखता होईन पाय ॥ २ ॥
बाहेरल्या वेषें उत्तम दंडलें । भीतरी मुंडलें नाहीं तैसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे वांयां गेलोंच मी आहे । जरि तुह्मी साहे न व्हा देवा ॥ ४ ॥

॥ ३९०७ ॥

तुमच्या पाळणा ओढतसे मन । गेलों विसरोन आपणासी ॥ १ ॥
लागेल पालटें फेडावें उसणें । येणेंचि प्रमाणें पांडुरंगा ॥ २ ॥
तुमचे आवडी संबंधाचा त्याग । घेतला ये लाग जगनिंदेचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे जैसा माझा जीव ओढे । तैसेंचि तिकडे पाहिजेल ॥ ४ ॥

॥ ३९०८ ॥

तुझें वर्म ठावें । माझ्या पाडियेलें भावें ॥ १ ॥ रूप कासवाचे परी । धरूनि राहिलों अंतरीं ॥ २ ॥ नेदी होऊं तुटी । मेळवीन दृष्टा-दृष्टी ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । चिंतन ते तुझी सेवा ॥ ४ ॥

॥ ३९०९ ॥

तुझें वर्म हातीं । दिलें सांगोनियां संतीं ॥ १ ॥ मुखीं नाम धरीन कंठीं । अवघा सांटवीन पोटीं ॥ २ ॥ नवविधा वेढिन आधीं । सांपडलासी भावसंधी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वळिये गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ ४ ॥

॥ ३९१० ॥

तुझें वर्म आह्मां कळों आलें सुखें । संतांचिया मुखें पांडुरंगा ॥ १ ॥
अवघाचि नट वाउगा पसारा । चेईला तो खरा तूंचि एक ॥ २ ॥
ह्मणऊनि देहबुद्धि नासिवंता । नातळे या चित्ता नेदावया ॥ ३ ॥
सोय हे लागली पुढिलांची वाट । पावले जे नीट तुजपाशीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे नाहीं कोणासवें लाज । बोलायाचें मज अंतरींचें ॥ ५ ॥

॥ ३९११ ॥

तुझें नाम गाऊं आतां । तुझ्या रंगीं नाचों था था ॥ १ ॥ तुझ्या नामाचा विश्वास । आह्मां कैंचा गर्भवास ॥ २ ॥ तुझे नामीं विसर पडे । तरी कोटी हत्या घडे ॥ ३ ॥ नाम घ्या रे कोणी फुका । भावें सांगतसे तुका ॥ ४ ॥

॥ ३९१२ ॥

तुह्मीं जावें निजमंदिरा । आह्मी जातों आपुल्या घरा ॥ १ ॥
विटोबा लोभ असों देई । आह्मी असों तुमचे पाईं ॥ २ ॥
चित करी सेवा । आह्मी जातों आपुल्या गांवा ॥ ३ ॥
तुका ह्मणे दिशा भुललों । फिरोन पायांपाशीं आलों ॥ ४ ॥

॥ ३९१३ ॥

तूं माझी माउली तूं माझी साउली । पाहातों वाटुली पांडुरंगे ॥ १ ॥

तूं मज येकुला वडील धाकुला । तूं मज आपुला सोइरा जीव ॥ २ ॥
तुका ह्मणे जीव तुजपाशीं असे । तुझियानें ओस सर्व दिशा ॥ ३ ॥

॥ ३९१४ ॥

तैसें नव्हों आह्मी विठोबाचे दास । यावें आणिकांस काकुलती ॥ १ ॥
स्वामिचिया सत्ता ठेंगणें सकळ । आला कळिकाळ हाताखालीं ॥ २ ॥
अंकिताचा असे अभिमान देवा । समर्पूनि हेवा असों पायीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मा इच्छेचें खेळणें । कोड नारायणें पुरवावें ॥ ४ ॥

॥ ३९१५ ॥

त्याग तंव मज न वजतां केला । कांहींच विठ्ठला मनांतूनि ॥ १ ॥
भागलिया आला उबग सहज । न धरितां काज जालें मनीं ॥ २ ॥
देह जड जाले ऋणाच्या आभारें । केलें संवसारें कासावीस ॥ ३ ॥
तुका ह्मणे गेला आळस किळस । अकर्तव्य ते[3] दोष निवारले ॥ ४ ॥

॥ ३९१६ ॥

त्यागें भोग माझ्या येतील अंतरा । मग मी दातारा काय करूं ॥ १ ॥
आतां असो तुझे पायीं हें मोटळें । इंद्रियें सकळें काया मन ॥ २ ॥
सांडीमांडी विधिनिषेधाचा ठाव । न कळतां भाव जाइल वांयां ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां नको उजगरा । लपवीं दातारा अंगीं मज ॥ ४ ॥

॥ ३९१७ ॥

दुष्ट आचरण ग्वाही माझें मन । मज ठावे गुण दोष माझे ॥ १ ॥
आतां तुह्मी सर्वजाण पांडुरंगा । पाहिजे प्रसंगाऐसें केलें ॥ २ ॥
व्याघ्राजांवयांचे पंगति दुर्बळ । वंचिजे तो काळ नव्हे कांहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां जालों शरणागत । पुढील उचित तुह्मां हातीं ॥ ४ ॥

॥ ३९१८ ॥

*दुःखाची संगति । तिच्याठायीं कोण प्रीति ॥ १ ॥ अवघें असो हें

पाठभेदः—१ तुजविण. २ विठ्ठलाचे. ३ 'ते' नाहीं.

निराळें। करूं सोइरें सावळें ॥ २ ॥ क्षणभंगुर तो ठाव । करूनि सांडा-
वाचि वाव ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरा । ठाव पावलों हा थारा ॥ ४ ॥

॥ ३९१९ ॥

देऊं कपाट । कीं[1] कोण काळ राखों वाट ॥ १ ॥ काय येईल तें शिरीं ।
आज्ञा धरोनियां करीं ॥ २ ॥ करूं कळे ऐसी मात । किंवा राखावा
एकांत ॥ ३ ॥ तुका ह्मणे जागों । किंवा कोणा नेदूं वागों ॥ ४ ॥

॥ ३९२० ॥

देखोनियां तुझ्या रूपाचा आकार । उभा कटीं कर ठेवूनियां ॥ १ ॥
तेणें माझ्या चित्ता होतें समाधान । वाटतें चरण न सोडावे ॥ २ ॥
मुखें[3] गातों गीत वाजवितों टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळही ॥ ४ ॥

॥ ३९२१ ॥

देखिलें तें धरिन मनें। समाधानें राहेन ॥ १ ॥ भाव माझी सांटवण ।
जगजीवन कळावया ॥ २ ॥ बोळवीन एकसरें । उत्तरें या करु-
णेच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे नयो रूपा । काय बापा करीसी ॥ ४ ॥

॥ ३९२२ ॥

देव आतां आह्मीं केला असे ऋणी । आणिकावांचूनि काय गुंता ॥ १ ॥
एकाचे आर्जव करूं एकनिष्ठ । आणिकांचा बोभाट कामा नये ॥ २ ॥
बहुतांचे आर्जव केलिया खटपट । नाहीं हा शेवट शुद्ध होत ॥ ३ ॥
पुरता विचार आणोनि मानसीं । अंतरलों सर्वांसी पई देखा ॥ ४ ॥
तुका ह्मणे देवा चरणीं असो भाव । तेणें माझा जीव संतोषे हा ॥ ५ ॥

॥ ३९२३ ॥

देह तुझ्या पायीं । ठेवूनि जालों उतराई ॥ १ ॥ आतां माझ्या
जीवा । करणें तें करीं देवा ॥ २ ॥ बहु अपराधी । मतिमंद हीन-
बुद्धि ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेणें । भावभक्तीचीं लक्षणें ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ पैं कोण. २ होईल. ३ मुखें.

॥ ३९२४ ॥

घाल माळ जरी पडेन मी पायां । दंडवत वांयां कोण वेंची ॥ १ ॥
आलें तें हिशोबें अवधिया प्रमाण । द्यावें तरी दान मान होतो ॥ २ ॥
मोकाळिया मनें घ्याल जरी सेवा । प्रसाद पाठवा लवकरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी जालिया कृपण । नामाची[1] जतन मग कैंची ॥ ४ ॥

॥ ३९२५ ॥

धनासींच धन । करी आपण जतन ॥ १ ॥ तुज आळवितां गोडी ।
पांडुरंगा खरी जोडी ॥ २ ॥ जेविल्याचें खरें । वरी उमटे ढेंकरें ॥ ३ ॥
तुका ह्मणे धाय । तेथें कोठें उरे हाय ॥ ४ ॥

॥ ३९२६ ॥

धरूनियां चाली हांवा । येईन गांवां धांवत ॥ १ ॥ पाठविसी
मूळ तरी । लवकरी विठ्ठले ॥ २ ॥ नाचेन त्या प्रेमसुखें । कीर्ती
मुखें गाईन ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतमेळीं । पायधुळी वंदीन ॥ ४ ॥

॥ ३९२७ ॥

धांवोनियां आलों पहावया मुख । गेलें माझें दुःख जन्मांतरिंचें ॥ १ ॥
ऐकिलेंही होतें तैसेंचि पाहिलें । मन स्थिरावलें तुझ्या पायीं ॥ २ ॥
तुका ह्मणे माझी इच्छा पूर्ण जाली । कांहीं न राहिली वासना हे ॥ ३ ॥

॥ ३९२८ ॥

न कळे तत्वज्ञान मूढ माझी मती । परि ध्यातों चित्तीं चरणकमळ ॥ १ ॥
आगमाचे भेद मी तों काय जाणें । काळ तो चिंतनें सारीतसें ॥ २ ॥
कांहीं नेणें परि ह्मणवितों दास । होइल त्याचा त्यास अभिमान ॥ ३ ॥
संसाराची सोय सांडिला मारग । दुराविलें जग एका घायें ॥ ४ ॥
मागिल्या लागाचें केलेंसें खंडण । एकाएकीं मन राखियेलें ॥ ५ ॥
तुका ह्मणे अगा रखुमादेवी[2] वरा । भक्तकरुणाकरा सांभाळावें ॥ ६ ॥

---

पाठभेदः—१ नामाचें जतन मग कैंचें ॥ २ रखुमादेवीच्या.

॥ ३९२९ ॥

नलगे पाहावें अबद्ध वांकडें । उच्चारावें कोडें नाम तुझें ॥ १ ॥
नाहीं वेळ नाहीं पंडितांचा धाक । होत कां वाचक वेदवक्ते ॥ २ ॥
पुराणींही कोठें न मिळे पाहातां । तैशीं या अनंता ठेवूं नामें ॥ ३ ॥
आपुलिया मना उपजे आनंद । तैसे करूं छंद कथाकाळीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मी आनंदेंचि धालों । आनंदाचि ल्यालों अळंकार ॥ ५ ॥

॥ ३९३० ॥

न लगावी दिठी । माझी तुझे मुखवटी ॥ १ ॥ आधीं पाउलें पाउलें । तें मी पाहेन तें भलें ॥ २ ॥ देईन हे काया । वरि सांडणें सांडाया ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । बहु आवडसी जीवा ॥ ४ ॥

॥ ३९३१ ॥

नव्हे कांहीं कवणाचा । भाव जाणतला साचा ॥ १ ॥ ह्मणोनि तुझ्या पायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥ २ ॥ शरीर जायाचें कोंपट । याची काय खटपट ॥ ३ ॥ तुका ह्मणे वांयांविण । देवा कळों आला सीण ॥ ४ ॥

॥ ३९३२ ॥

नव्हतें तें कळों आलें । तरी बोलें अबोला ॥ १ ॥ तुज मज घातली तुटी । एके भेटीपासूनि ॥ २ ॥ आतां याची न धरीं चाड । कांहीं कोड कवतुकें ॥ ३ ॥ तुका ह्मणे यावें जावें । एका भावें खंडलें ॥ ४ ॥

॥ ३९३३ ॥

न व्हावें तें जालें देखियेले पाय । आतां फिरूं काय मागें देवा ॥ १ ॥
बहु दिस होतों करीत हे आस । तें आलें सायासें फळ आजी ॥ २ ॥
कोठवरि जिणें संसाराच्या आशा । उगवो हा फांसा एथूनियां ॥ ३ ॥
बुडालीं तयांचा मूळ ना मारग । लागला तो लाग सोडूनियां ॥ ४ ॥
पुढें उल्लंघितां दुःखाचे डोंगर । नाहीं अंत पार गर्भवासा ॥ ५ ॥
तुका ह्मणे कास धरीन पीतांबरीं । तूं भवसागरीं तारूं देवा ॥ ६ ॥

---

पाठभेदः — १ लागे तो लाग सांडूनियां.

॥ ३१३४ ॥

नसताचि दाऊनि भेव । केला जीव हिंपुटी ॥ १ ॥ जालों तेव्हां कळलें जगा । वाउगा हा आकांत ॥ २ ॥ गंवसिलों पुढें मागें । लाग लागे पावला ॥ ३ ॥ तुका ह्मणे केली आंणी । सलगीच्यांनीं सन्मुख ॥ ४ ॥

॥ ३१३५ ॥

न होय निग्रह देहासी दंडण । न वजे भूकतान सहावली ॥ १ ॥
तरि नित्य नित्य करीं आळवण । माझा अभिमान असों द्यावा ॥ २ ॥
नाहीं विटाळिलें कायावाचामन । संकल्पासी भिन्न असेंचि या ॥ ३ ॥
तुका ह्मणे भवसागरीं उतार । करावया आधार इच्छीतसें ॥ ४ ॥

॥ ३१३६ ॥

नाम घेतां मन निवे । जिव्हे अमृतचि स्रवे । होताती बरवे । ऐसे शकुन लाभाचे ॥ १ ॥ मन रंगलें रंगलें । तुझ्या चरणीं स्थिरावलें । केलिया विठ्ठलें । ऐसी कृपा जाणावी ॥ २ ॥ जालें भोजनसें दिसे । चिरा पडोनि ठेला इच्छे । धालियाच्या ऐसे । अंगा येती उद्गार ॥ ३ ॥ सुखभेटीं आलें सुखा । निध सांपडला मुखा । तुका ह्मणे लेखा । आतां नाहीं आनंदा ॥ ४ ॥

॥ ३१३७ ॥

निरोधती परि न मोडे विकार । बहु हीं दुस्तर विषयद्वारें ॥ १ ॥
राहातेति तुह्मी भरोनि अंतरीं । होतों तदाकारी निर्विषयची ॥ २ ॥
कृपेचिया साक्षी असती जवळी । वचनें मोकळीं सरत नाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे ताळा मेळवणीपाशीं । विनंती पायांपाशीं हेचि करीं ॥ ४ ॥

॥ ३१३८ ॥

नाहीं संसाराची चाड । गाऊं हरिचें नाम गोड ॥ १ ॥ हो कां प्राणाचाही घात । परि हा न सोडीं अनंत ॥ २ ॥ जन्मोजन्मीं हाचि धंदा । संतसंग राहो सदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे भाव । तो हा जाणा पंढरिराव ॥ ४ ॥

---

पाठभेद:—१ आथणी.

॥ ३९३९ ॥

नाहीं कांटाळलों परि वाटे भय । करावें तें काय न कळतां ॥ १ ॥
जन वन आह्मां समानचि जालें । कामक्रोध केले पावटणी ॥ २ ॥
षडऊर्मी शत्रु जिंतिले[2] अनंता । नामाचिया सत्ताबळें तुझ्या ॥ ३ ॥
मुख्य धर्म आह्मां सेवकांचा ऐसा । स्वामी करी शिरसा पाळावे ते ॥ ४ ॥
ह्मणऊनि तुका अवलोकुनी पाय । वचनाची पाहे वास एका ॥ ५ ॥

॥ ३९४० ॥

नेणें गाणें कंठ नाहीं हा सुस्वर । घालूं तुज भार पांडुरंगा ॥ १ ॥
नेणें राग वेळ काळ घात मात । तुझे पायीं चित्त ठेवीं देवा ॥ २ ॥
तुका ह्मणे मज चाड नाहीं जना । तुज नारायणा वांचूनियां ॥ ३ ॥

॥ ३९४१ ॥

नेणती वेद श्रुति कोणी । आह्मां भाविकां वांचोनी ॥१॥ रूप आवडे
आह्माशी । तैसी जोडी हृषीकेशी ॥२॥ आह्मीं भावें बळिवंत । तुज
घालूं हृदयांत ॥३॥ तुका ह्मणे तुज धाक । देतां पावसील हाक ॥४॥

॥ ३९४२ ॥

परि आतां माझी परिसावी विनंती । रखुमाईच्या पति पांडुरंगा ॥ १ ॥
चुकलिया बाळा न मारावें जीवें । हित तें करावें मायबापीं ॥ २ ॥
तुका ह्मणे तुझा ह्मणताती मज । आतां आहे लाज हेचि तुह्मां ॥ ३ ॥

॥ ३९४३ ॥

पवित्र होईन चरित्रउच्चारें । रूपाच्या आधारें गोजिरिया ॥ १ ॥
आपुरती बुद्धि पुण्य नाहीं गांठीं । पायीं घालीं मिठी पाहें डोळां ॥ २ ॥
गाईन ओविया शिष्टांच्या आधारें । सारीन विचारें आयुष्या या ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुझें नाम नारायणा । ठेवीन मी मना आपुलिया ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ गेले. २ जिंकिले.

॥ ३९४४ ॥

पाठीलागा काळ येतसे या लागें । मी माझें वाउगें मंढीऐसें ॥ १ ॥
आतां अगी लागो ऐसिया वेव्हारा । तूं माझा सोइरा पांडुरंगा ॥ २ ॥
वागविला माथां नसताचि भार । नव्हे तें साचार जाणिलें तों ॥ ३ ॥
तुका ह्मणे केलें जवळील दुरी । मृगजळ वरी आड आलें ॥ ४ ॥

॥ ३९४५ ॥

पाहें प्रसादाची वाट । द्यावें धोवोनियां ताट ॥ १ ॥ शेष घेऊनी जाइन । तुमचें जालिया भोजन ॥२॥ जालों एकसवा । तुह्मां आडुनियां देवा ॥३॥ तुका ह्मणे चित्त । करोनि राहिलों निश्चिंत[1] ॥ ४ ॥

॥ ३९४६ ॥

प्रारब्धा हातीं जन । सुख सीण पावतसे ॥ १ ॥ करितां घायाळाचा संग । अंगें अंग माखावें ॥२॥ आविसा अंगें पीडा वसे । त्यागें असे बहु सुख ॥३॥ तुका ह्मणे जीव भ्याला । अवघ्या आला बाहेरी ॥४॥

॥ ३९४७ ॥

प्रेम जडलें तुझे पायीं । आणीक न सुचे मजला कांहीं ॥ १ ॥ रात्रीदिवस तुझें ध्यान । तेंचि माझें अनुष्ठान ॥ २ ॥ नामापरतें नेणें दुजें । ऐसें कळलें मजला निज ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंतकाळीं । आह्मां सोडवीं तात्काळीं ॥ ४ ॥

॥ ३९४८ ॥

बरवें ऐसें आलें मना । नारायणा या काळें ॥ १ ॥ देव आह्मां प्राणसखा । जालें दुःखा खंडण ॥ २ ॥ जन्मांतरिंच्या पुण्यरासी । होत्या त्यांसी फळ आलें ॥३॥ तुका ह्मणे निज ठेवा । होईल देवा लाधलों ॥४॥

॥ ३९४९ ॥

बरा देवा[2] कुणबी केलों । नाहीं तरि दंभें असतों मेलों ॥१॥ भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पायां ॥ २ ॥ विद्या असती कांहीं । तरी पडतों

पाठभेदः—१ निवांत. २ 'देवा' हें नाहीं.

अपायीं ॥३॥ सेवा चुकतों संतांची ।नागवण हे फुकाची॥४॥गर्व होता ताठा। जातों यमपंथें वाटा ॥५॥ तुका ह्मणे थोरपणें । नरक होती अभिमानें ॥६॥

॥ ३९५० ॥

बराडियाची आवडी पुरे । जया झुरे सार्टी तें ॥१॥ तैसें जालें माझ्या मना । नुठी चरणावरूनि ॥ २ ॥ भागलिया पेणें पावे । विसांवे ते ठाकणीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे छाया भेटे । बरें वाटे तापे त्या ॥ ४ ॥

॥ ३९५१ ॥

बहु उतावीळ भक्तीचिया काजा । होसी केशीराजा मायबापा ॥१॥ तुझ्या पायीं मज जालासे विश्वास । ह्मणोनियां आस मोकलिली ॥२॥ ऋषि मुनि सिद्ध साधक अपार । कळला विचार त्यांसी तुझा ॥३॥ नाहीं नास तें सुख दिलें तयांस । जाले जे उदास सर्वभावें ॥४॥ तुका ह्मणे सुख न माये मानसीं । धरिले जीवेंसी पाय तुझे ॥५॥

॥ ३९५२ ॥

बळिवंत कर्म । करी आपुला तो धर्म ॥ १ ॥ पुढें घालुनियां सत्ता । न्यावें पतना पतिता ॥ २ ॥ आचरणें खोटीं । केलीं सलताती पोटीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । नाहीं भजन केली सेवा ॥ ४ ॥

॥ ३९५३ ॥

बहु दूरवरी । वेठी ओझें होतें शिरीं ॥ १ ॥ आतां उतरला भार । तुह्मीं केला अंगीकार ॥ २ ॥ बहु काकुलती । आलों असे मागें किती ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । आजि सफळ जाली सेवा ॥ ४ ॥

॥ ३९५४ ॥

बहुजन्में सोस केला । त्याचा जाला परिणाम ॥ १ ॥ विठ्ठलसें नाम कंठीं । आवडी पोटीं संचितें ॥ २ ॥ येथुन तेथवरी आतां । नलगे चिंता करावी ॥३॥ तुका ह्मणे धालें मन । हेंचि दान शकुनाचें ॥४॥

॥ ३९५५ ॥

बाळ माते निष्ठुर होये । परि तें स्नेह करीत आहे ॥ १ ॥ तैसा तूं गा पुरुषोत्तमा । घडी न विसंबसि आह्मां ॥ २ ॥ नेणती भागली । कडे घेतां अंग घाली ॥ ३ ॥ भूक साहे ताहान । त्याचें राखे समाधान ॥ ४ ॥ त्याच्या दुःखें धाये । आपला जीव देऊं पाहे ॥ ५ ॥ नांवें घाली उडी । तुका ह्मणे प्राण काढी ॥ ६ ॥

॥ ३९५६ ॥

बाप मेला न कळतां । नव्हती संसाराची चिंता ॥ १ ॥ विठो तुझें माझें राज्य । नाहीं दुसऱ्याचें काज ॥ २ ॥ बाईल मेली मुक्त जाली । देवें माया सोडविली ॥ ३ ॥ पोरें[2] मेलीं बरें जालें । देवें माया विरहित केलें ॥ ४ ॥ माता मेली मज देखतां । तुका ह्मणे हरली चिंता ॥ ५ ॥

॥ ३९५७ ॥

बैसूं[3] खेळूं जेवूं । तेथें नाम तुझें गाऊं ॥ १ ॥ रामकृष्णनाममाळा । घालूं ओवुनियां गळां ॥ २ ॥ विश्वास हा धरूं । नाम बळकट करूं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां । आह्मां जीवन शरणागतां ॥ ४ ॥

॥ ३९५८ ॥

बोलोनियां काय दावूं । तुह्मी जीऊ जगाचे ॥ १ ॥ हेचि आतां माझी सेवा । चिंतन देवा करितों ॥ २ ॥ विरक्तासी देह तुच्छ । नाहीं आस काशाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे पायापाशीं । येइन ऐसी वासना ॥ ४ ॥

॥ ३९५९ ॥

मज कोणी कांहीं करी । उमटे तुमचे अंतरीं ॥ १ ॥ ज्याला वाढविलें म्हूण । मज सुख तुज सीण ॥ २ ॥ माझें पोट धालें । तुझें अंगीं उमटलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे खेळें । तेथें तुमचिया बळें ॥ ४ ॥

॥ ३९६० ॥

मज माझा उपदेश । आणिकां नये याचा रीस ॥ १ ॥ तुह्मी अवघे

---

पाठभेदः—१ पहिला चरण कांहीं प्रतीत नाहीं. २ पोरें मेलें. ३ बैसों.

पांडुरंग । मीच दुष्ट सकळ चांग ॥ २ ॥ तुमचा मी शरणागत । कांहीं करा माझें हित ॥३॥ तुका पाय धरी । मी हें माझें दूर करीं ॥४॥

॥ ३९६१ ॥

मतिविण काय वर्णू तुझें ध्यान । जेथें पडिलें मौन वेदश्रुती ॥ १ ॥
करूनि गोजिरा आपुलिये मति । धरियेलें चित्तीं चरणकमळ ॥ २ ॥
सुखाचें ओतिलें पाहों तें श्रीमुख । तेणें हरे भूक तान माझी ॥ ३ ॥
रसना गोडावली ओंव्या गातां गीत । पावलेंसें चित्त समाधान ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझी दृष्टि चरणांवरी । पाउलें गोजिरीं कुंकुमाचीं ॥ ५ ॥

॥ ३९६२ ॥

माझा घात पात अथवा हित फार । अवघा विचार तुझ्या हातीं ॥१॥
ठेवुनि जीव भाव तुझ्या ठायीं चित्त । राहिलों निवांत पांडुरंगा ॥२॥
चित्ताचा चाळक बुद्धीचा जनिता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥३॥
तुका ह्मणे काय करिसी तें पाहीन । ठेविसी राहीन सुखें तेथें ॥४॥

॥ ३९६३ ॥

माझिया जीवासी[1] हेचि पैं विश्रांति । तुझे पाय चित्तीं पांडुरंगा ॥ १ ॥
भांडवल गांठी आलें सपुरतें । समाधान चित्तें मानियेलें ॥ २ ॥
उदंड उच्चारें घातला पसरु । रूपावरी भरु आवडीचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज भक्तीची आवडी । अभेदीं तांतडी नाहीं म्हूण ॥ ४ ॥

॥ ३९६४ ॥

माझे तों स्वभाव मज अनावर । तुजही देतां भार कांहीं नव्हे ॥१॥
ऐसें कळों आलें मज नारायणा । जागृती स्वपना ताळ नाहीं ॥ २ ॥
संपादितों तो हा अवघा बाह्य रंग । तुझा नाहीं संग अभ्यंतरीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे सत्या नाहीं पाठी पोट । असतें निघोंट एकी जाती ॥ ४ ॥

॥ ३९६५ ॥

माझे तों फुकाचे कायेचेचि कष्ट । नव्हे क्रियानष्ट तुह्मां ऐसा ॥ १ ॥

पाठभेदः—१ जीवाची.

कांहींच न वंचीं आजिच्या प्रसंगीं । सकळाही अंगीं करीन पूजा ॥ २ ॥
द्यावें कांहीं तुह्मी हे तों नाहीं आस । असों या उदास देहभावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी मावळली खंती । समाधान चित्तीं सर्वकाळ ॥ ४ ॥

॥ ३९६६ ॥

माझें मन पाहे कसून । चित्त न ढळे तुजपासून ॥ १ ॥ कापुनि देईन शिर । पाहा कृपण कीं उदार ॥ २ ॥ मजवरि घालीं घण । परि मी न सोडीं चरण ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंतीं । तुजवांचूनि नाहीं गति ॥ ४ ॥

॥ ३९६७ ॥

माझें मागणें तें किती । दाता लक्ष्मीचा पति ॥ १ ॥ जोंणे[1] तान्हेल्याची तान । पीतां गंगा नव्हे न्यून ॥ २ ॥ कल्पतरू जाला देता । तेथें पोटाचा मागता ॥ ३ ॥ तुका ह्मणे संतत[2] ध्यातां । परब्रह्मेचि[3] आलें हाता ॥ ४ ॥

॥ ३९६८ ॥

ह्मणवितों दास ते नाहीं करणी । आंत वरी दोन्ही भिन्न भाव ॥ १ ॥
गातों नाचतों तें दाखवितों जना । प्रेम नारायणा नाहीं अंगीं ॥ २ ॥
पाविजे तें वर्म न कळेचि कांहीं । बुडालों या डोहीं दंभाचिया ॥ ३ ॥
भांडवल काळें हातोहातीं नेलें । माप या लागलें आयुष्यासी ॥ ४ ॥
तुका ह्मणे वांयां गेलों ऐसा दिसें । होईल या हांसें लौकिकाचें ॥ ५ ॥

॥ ३९६९ ॥

याजसाटीं वनांतरा । जातों सांडुनियां घरा ॥ १ ॥ माझें दिठावेल प्रेम । बुद्धि होईल निष्काम ॥ २ ॥ अद्वैताची वाणी । नाहीं ऐकत मी कानीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे अहंब्रह्म । आड येऊं नेदीं भ्रम ॥ ४ ॥

॥ ३९७० ॥

यातिहीन मज काय तो अभिमान । मानी तुज जन नारायणा ॥ १ ॥

---

पाठभेद—१ तान्हेल्यानें पीतां पाणी । तेणें गंगा नव्हे उणी ॥ २ संतां, सतंत. ३ 'चि' नाहीं.

काय सुख मज तयाची हे खंती । आपुलाला घेती गुणभाव ॥ २ ॥
द्रव्यामुळें माथां वाहियेली चिंधी । होन जयामधीं होता गांठी ॥ ३ ॥
तुका ह्मणे जन वंदितो वेगळा । मजसी दुबेळा काय चाड ॥ ४ ॥

॥ ३९७१ ॥

राम कृष्ण ऐसीं उच्चारितां नामें । नाचेन मी प्रेमें संतांपुढें ॥ १ ॥
काय घडेल तें घडो ये सेवटीं । लाभ आणि तुटी देव जाणे ॥ २ ॥
चिंता मोह आशा ठेवूनि निराळीं । देईन हा बळी जीव पायीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे कांहीं उरों नेदी उरी । सांडीन हे थोरी ओवाळोनी ॥ ४ ॥

॥ ३९७२ ॥

रात्री दिवस आम्हां युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ॥ १ ॥
जीवाही आगोज पडती आघात । येऊनियां नित्य नित्य करी ॥ २ ॥
तुका ह्मणे तुझ्या नामाचिया बळें । अवघियांचें काळें केलें तोंड ॥ ३ ॥

॥ ३९७३ ॥

राहो येचि ठायीं । माझा भाव तुझे पायीं ॥ १ ॥ करीन नामाचें
चिंतन । जाऊं नेदीं कोठें मन ॥ २ ॥ देईन ये रसीं । आतां बुडी सर्व-
विशीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । सार्टी करोनियां जीवा ॥ ४ ॥

॥ ३९७४ ॥

रोजकीर्दी जमा धरूनी सकळ । खताविला काळ बराबरी ॥ १ ॥
नाहीं होत झाड्यापाड्याचें लिगाड । हुजराती ते गोड सेवा रुजू ॥ २ ॥
चोरासाटीं रदबदल आटाहास । जळो जिणें दास्य बहुतांचें ॥ ३ ॥
सावधान तुका निर्भर मानसीं । सालझाड्यापाशीं गुंपों नेणें ॥ ४ ॥

॥ ३९७५ ॥

लाज वाटे मज मानिती हे लोक । हें तों नाहीं एक माझे अंगीं ॥ १ ॥
मोजुनि झिजलों मापाचिया परी । जाळावी ते थोरी लाभाविण ॥ २ ॥

कोमळ कंटक तीक्ष्ण अगरीं । पोचट ते वरी अंगकांति ॥ ३ ॥
चित्रींचें लेप शृंगारिलें निकें । जीवेंविण फिकें रूप त्याचें ॥ ४ ॥
तुका ह्मणे दिसें वांयां गेलों देवा । अनुभव ठावा नाहीं तेणें ॥ ५ ॥

॥ ३९७६ ॥

लोक म्हणती मज देव । हा तों अधर्म उपाव ॥ १ ॥ आतां कळेल तें करीं । सीस तुझे हातीं सुरी ॥ २ ॥ अधिकार नाहीं । पूजा करिती तैसा कांहीं ॥ ३ ॥ मन जाणे पापा । तुका ह्मणे मायबापा ॥ ४ ॥

॥ ३९७७ ॥

वाचेच्या चापल्यें बहु जालों कुशळ । नाहीं बीजमूळ हातां आलें ॥ १ ॥
ह्मणोनि पंढरिराया दुःखी होतें मन । अंतरींचें कोण जाणे माझें ॥ २ ॥
पूज्य जालों अंगा आला अभिमान । पुढील कारण खोळंबलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे खूण न कळेचि निरुती । सांपडलों हातीं अहंकाराचे ॥ ४ ॥

॥ ३९७८ ॥

वांयांविण वाढविला हा लौकिक । आणिला लटिक वाद दोघां ॥ १ ॥
नाहीं ऐसा जाला देव माझ्या मतें । भुकेलें जेवितें काय जाणे ॥ २ ॥
शब्दज्ञानें गौरविली हे वैखरी । साच तें अंतरीं बिंबेचि ना ॥ ३ ॥
जालों परदेशी गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे देवा ॥ ४ ॥
तुका ह्मणे मागें कळों येतें ऐसें । न घेतों हें पिसें लावूनियां ॥ ५ ॥

॥ ३९७९ ॥

विठ्ठल सोयरा सज्जन विसांवा । जाइन त्याच्या गांवा भेटावया ॥ १ ॥
सीण भाग त्यासी सांगेन आपुला । तो माझा बापुला सर्व जाणे ॥ २ ॥
माय माउलिया बंधुवर्गा जाणा । भाकीन करुणा सकळिकांसी ॥ ३ ॥
संत महंत सिद्ध महानुभाव मुनि । जीवभाव जाऊनि सांगेन त्या ॥ ४ ॥
माझिये माहेरीं सुखा काय उणें । नलगे येणें जाणें तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ३९८० ॥

विभ्रंशिली बुद्धि देहांतीं[1] जवळी । काळाची अवकाळीं[2] वायचाळा ॥ १ ॥
पालटलें जैसें देंठ सांडी पान । पिकलें आपण तयापरी ॥ २ ॥
न मारितां हीन बुद्धि दुःख पावी । माजल्याची गोवी तयापरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे गळ लागलिया मत्स्या । तळमळेचा तैसा लवलाहो ॥ ४ ॥

॥ ३९८१ ॥

व्यापक हा विश्वंभर । चराचर याचेनी ॥ १ ॥ पंढरिराव विटेवरी । त्याचीं घरीं पाउलें ॥ २ ॥ अवघियांचा हाचि ठाव । देवोदेवीं सकळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे न करीं सोस । भेदें दोष उफराटे ॥ ४ ॥

॥ ३९८२ ॥

शूद्रवंशीं जन्मलों । ह्मणोनि दंभें मोकलिलों ॥ १ ॥ अरे तूंचि माझा आतां । मायबाप पंढरिनाथा ॥ २ ॥ घोकाया अक्षर । मज नाहीं अधिकार ॥ ३ ॥ सर्वभावें दीन । तुका ह्मणे यातिहीन ॥ ४ ॥

॥ ३९८३ ॥

सिणलेती सेवकां देउनि इच्छादान । केला अभिमानें[3] अंगीकार ॥ १ ॥
अहो दीनानाथा आनंदमुरती । तुह्मांसि शोभती ब्रीदें ऐसीं ॥ २ ॥
बहुतांनीं विनविलें[4] बहुतां प्रकारीं । सकळां ठायीं हरी पुरलेती[5] ॥ ३ ॥
तुका ह्मणे अगा कुटुंबवत्सळा । कोण तुझी लीळा जाणे ऐसी ॥ ४ ॥

॥ ३९८४ ॥

सकळ सत्ताधारी । व्हावें ऐसें काय हरी ॥ १ ॥ परी या कृपेच्या वोरसें । कुढावयाचेंचि पिसें ॥ २ ॥ अंगें सर्वोत्तम । अवघाचि पूर्णकाम ॥ ३ ॥ तुका ह्मणे दाता । तरि हा जीव दान देतां ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ देहांत. २ अकाळीं. ३ अभिमान अंगीकारा. ४ निरविलें ५ पुरविती.

॥ ३९८५ ॥

संगतीनें होतो पंगतीचा लाभ । अशोभीं अनुभव असिजेतें ॥ १ ॥
जैसी तैसी असों पुढिलांचे सोई । धरिती हातीं पायीं आचारियें ॥ २ ॥
उपकारी नाहीं देखत आपदा । पुढिलांची सदा दया चित्तीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तरी सज्जनाची कीर्ति । पुरवावी आर्ति निर्बळांची ॥ ४ ॥

॥ ३९८६ ॥

संगें वाढे सीण न घडे भजन । त्रिविध हें जन बहु देवा ॥ १ ॥
याचिमुळें आला संगाचा कांटाळा । दिसताती डोळां नानाछंद ॥ २ ॥
एकविध भाव राहावया ठाव । नेदी हा संदेह राहों चित्तीं ॥ ३ ॥
शब्दज्ञानी हित नेणती आपुलें । आणीक देखिलें नावडे त्या ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां एकलेंचि भलें । बैसोनि उगलें राहावें तें ॥ ५ ॥

॥ ३९८७ ॥

सत्तावळें येतो मागतां विभाग । लावावया लाग निमित्य करूं ॥ १ ॥
तुह्मीं ऐसीं मुखें करूं उच्चारण । बोले नारायण सांपडवूं ॥ २ ॥
आसेविण नाहीं उपजत मोहो । तरिच हा गोहो न पडे फंदीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां व्हावें याजऐसें । सरिसे सरिसें समागमें ॥ ४ ॥

॥ ३९८८ ॥

सत्य तो आवडे । विकल्पानें भाव उडे ॥ १ ॥ आम्ही तुमच्या कृपा-
दानें । जाणों शुद्ध मंद सोनें ॥ २ ॥ आला भोग अंगा । न लवूं
उसीर त्या त्यागा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । अंजन ते तुझी सेवा ॥ ४ ॥

॥ ३९८९ ॥

सर्वात्मकपण । माझें हिरोनि नेसी कोण ॥ १ ॥ मनीं भक्तीची आवडी ।
हेवा व्हावी ऐशी जोडी ॥ २ ॥ घेईन जन्मांतरें । हेंचि करावया
खरें ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । ऋणी करूनि ठेवूं सेवा ॥ ४ ॥

---

पाठभेद:—१ भक्ताची.

॥ ३९९० ॥
सांखळिलों प्रीती गळां । भुंके वेळा जाणोनियां ॥ १ ॥ तुमचें मी केशीराजा । सुनें या काजा पाळिलों ॥ २ ॥ आलें गेलें कळे वाटा । कोण निटा वाकुडिया ॥ ३ ॥ तुका ह्मणे आलें वारी । दुरितें दुरी नातळतां ॥ ४ ॥

॥ ३९९१ ॥
सांडोनियां दों अक्षरां । काय करूं हा पसारा । विधिनिषेधाचा भारा । तेणें दातारा नातुडसी ॥ १ ॥ ह्मणोनि बोबड्या उत्तरीं । वाचे जपें निरंतरीं । नाम तुझें हरी । भवसागरीं तारूं तें ॥ २ ॥ सर्वमय ऐसें वेदांचें वचन । श्रुति गर्जती पुराणें । नाहीं आणीक ध्यान । साधनें[१] मज चाड ॥ ३ ॥ सेवटीं ब्रह्मार्पण । याचि मंत्राचें कारण । काना मात्रा वांयांविण । तुका ह्मणे बिंदुलीं ॥ ४ ॥

॥ ३९९२ ॥
स्त्रिया पुत्र कळत्र हें तंव मायावंत । शेवटींचा अंत नाहीं कोणी ॥ १ ॥ यमाचिये हातीं बांधोनियां देती । भूपणेंही घेती काढूनियां ॥ २ ॥ ऐसिया चोरांचा कैसा हा विश्वास । धरिली तुझी कास तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ३९९३ ॥
सुख सुखा भेटे । मग तोडिल्या न तुटे ॥ १ ॥ रविरश्मिकळा । नये घालितां पैं डोळां ॥ २ ॥ दुरि तें जवळी । स्नेहें आकाशें[२] कवळी ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्त । माझें पायीं आखंडित ॥ ४ ॥

॥ ३९९४ ॥
सुनियांची आवडी देवा । घेत सेवा नाहीं कांहीं ॥ १ ॥ सिकविलें जवळी बैसों । जेथें असों तेथेंचि ॥ २ ॥ नेदी दुजें बोलों करूं । गुरुगुरु न साहे ॥ ३ ॥ तुका ह्मणे कुर्वाळितां । अंगें सत्ता संगाची ॥ ४ ॥

॥ ३९९५ ॥
सुनियांचा हाचि भाव । आपुला ठाव राखावा ॥ १ ॥ दुजियाचा

---

पाठभेदः—१ रे साधन मज चाड. २ आकाशा.

येऊं वारा । नेदूं घरावरी येऊं ॥ २ ॥ केली याची फाडाफाडी । सडा-
मोडी क्षेत्राची ॥ ३ ॥ पातेजत नाहीं लोकां । तुका देवावांचूनि ॥ ४ ॥

॥ ३९९६ ॥

सेवट तो भला । माझा बहु गोड जाला ॥ १ ॥ आलों निजांच्या मा-
हेरा । भेटों रखुमाईच्या वरा ॥ २ ॥ परिहार जाला । अवघ्या दुःखा-
चा मागिल्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाणी । गेली आतां घेऊं धणी ॥ ४ ॥

॥ ३९९७ ॥

स्मशानीं आह्मां न्याहालीचें सुख । या नांवें कौतुक तुमची कृपा ॥ १ ॥
नाहीं तरी वांयां अवघेंचि निर्फळ । शब्द ते पोकळ बडबड ॥ २ ॥
झाडें झुडें जीव सोइरे पाषाण । होती तई दान तुह्मीं केलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां पाहे अनुभव । घेऊनि हातीं जीव पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ३९९८ ॥

स्वामीचें हें देणें । येथें पावलों दरुषणें ॥ १ ॥ करूं आवडीनें वाद ।
तुमच्या सुखाचा संवाद ॥ २ ॥ कळावया वर्म । हा तों पायांचाचि-
धर्म ॥ ३ ॥ तुका ह्मणे सिद्धी । हेचि पाववावी बुद्धी ॥ ४ ॥

॥ ३९९९ ॥

हागतांही खोडी । चळण मोडवितें काडी ॥ १ ॥ ऐसे अनावर
गुण । आवरावे काय म्हूण ॥ २ ॥ नाहीं जरी संग । तरी बडबड-
विती रंग ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । तुमची न घडेचि सेवा ॥ ४ ॥

॥ ४००० ॥

हीन माझी याती । वरि स्तुती केली संतीं ॥ १ ॥ अंगीं वसूं पाहे गर्व ।
माझें हरावया सर्व ॥ २ ॥ मी एक जाणता । ऐसें वाटतसे चित्ता ॥ ३ ॥
राख राख गेलों वांयां । तुका ह्मणे पंढरीराया ॥ ४ ॥

॥ ४००१ ॥

होईन भिकारी । पंढरीचा वारकरी ॥ १ ॥ हाचि माझा नेम धर्म ।

मुखीं विठोबाचें नाम ॥ २ ॥ हेचि माझी उपासना । लागे संतांच्या चरणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । करीन ते भोळी सेवा ॥ ४ ॥

॥ ४००२ ॥

कां रे माझा तुज नये कळवळा । असोनि जवळा हृदयस्था ॥ १ ॥
अगा नारायणा निष्ठुरा निर्गुणा । केला शोक नेणां कंठस्फोट ॥ २ ॥
कां हें चित्त नाहीं पावलें विश्रांति । इंद्रियांची गति कुंठेचिना ॥ ३ ॥
तुका ह्मणे कां रे धरियेला कोप । सरलें नेणों पाप पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ४००३ ॥

यत्न आतां तुह्मी करा । मज दातारा सत्तेनें ॥ १ ॥ विश्वास तो पायांवरी । ठेवूनि हरी राहिलों ॥ २ ॥ जाणताचि दुजें नाहीं । आणीक कांहीं प्रकार ॥ ३ ॥ तुका ह्मणे शरण आलों । नेणें बोलों विनवितां ॥ ४ ॥

॥ ४००४ ॥

ह्मणऊनि लवलाहें । पाय आहें चिंतीत ॥ १ ॥ पाठी लागा येतो काळ । तूं कृपाळ माउली ॥ २ ॥ बहु उसंतीत आलों । तयां भ्यालों स्थळासी ॥ ३ ॥ तुका ह्मणे तूं जननी । ये निर्वाणी विठ्ठले ॥ ४ ॥

॥ ४००५ ॥

आपुलेंसें करूनि घ्यावें । आश्वासावें नाभींसें ॥ १ ॥ ह्मणउनि धरिले पाय । आवो माय विठ्ठले ॥ २ ॥ कळलासे सीण चित्ता । शम आतां करावा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीवीं वसें । मज नसे वेगळा ॥ ४ ॥

॥ ४००६ ॥

तुजवीण मज कोण आहे देवा । मुकुंदा केशवा नारायणा ॥ १ ॥
जोडोनियां कर कृपेच्या सागरा । गोपी मनोहरा पांडुरंगा ॥ २ ॥
साच करीं हरी आपुली ब्रिदावळी । कृपेनें सांभाळीं मायबापा ॥ ३ ॥

---

पाठभेदः—१ अवघें. २ लागेन.

साह्य होसी जरी जाती सहा वैरी । मग ध्यान करीं आवडीनें ॥ ८ ॥
सर्व अपराध क्षमा करीं माझा । लडिवाळ तुझा पांडुरंगा ॥ ५ ॥
कृपा करोनियां द्यावी क्षमाशांति । तेणें तुझी भक्ति घडेल देवा ॥ ६ ॥
ऐसें तों सामर्थ्य नाहीं नारायणा । जरी तुज करुणा येइल कांहीं ॥ ७ ॥
तुका ह्मणे आतां अपंगावें मज । राखें माझी लाज पांडुरंगा ॥ ८ ॥

॥ ४००७ ॥

कंठीं राहो नाम । अंगीं भरोनियां प्रेम ॥ १ ॥ ऐसें द्यावें कांहीं दान । आलों पतित शरण ॥ २ ॥ संतांचिये पायीं । वेळोंवेळां ठेवीं डोई ॥ ३ ॥ तुका ह्मणे तरे । भवसिंधु एका सरे ॥ ४ ॥

॥ ४००८ ॥

रणीं निघतां शूर न पाहे माघारें । ऐशा मज धीरें राख आतां ॥१॥
संवसारा हातीं अंतरलों दुरी । आतां कृपा करीं नारायणा ॥ २ ॥
वागवितों तुझिया नामाचें हत्यार । हाचि बडिवार मिरवितों ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज फिरतां माघारें । तेथें उणें पुरें तुह्मी जाणा ॥४॥

॥ ४००९ ॥

जाणोनी अंतर । टाळिसील करकर ॥ १ ॥ तुज लागली हे खोडी । पांडुरंगा बहु कुडी ॥ २ ॥ उठविसी दारीं । धरणें एकादिया परी ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाय । कैसे सोडीन तें पाहें ॥ ४ ॥

॥ ४०१० ॥

उपास कराडी । तिहीं करावीं बापुडीं ॥ १ ॥ आह्मी विठोबाचे दास । चिंता झुगारिली आस ॥ २ ॥ भक्तीच्या उत्कर्षे । नाहीं मुक्तीचें तें पिसें ॥३॥ तुका ह्मणे बळ । अंगीं आमुच्या सकळ ॥४॥

॥ ४०११ ॥

न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥१॥
ऐसी माझी वाचा मज उपदेशी । आणीक लोकांसी हेंचि सांगें ॥२॥

विटंबो शरीर होत कां विपत्ती । परि राहो चित्तीं नारायण ॥ ३ ॥
तुका ह्मणे नासिवंत हें सकळ । आठवे गोपाळ तेंचि हित ॥ ४ ॥

॥ ४०१२ ॥

तिहीं त्रिभुवनीं । आह्मी वैभवाचे धनी ॥१॥ हातां आले घाव डाव । आमचा मायबाप देव ॥ २ ॥ काय त्रिभुवनीं बळ । अंगीं आमुच्या सकळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे सत्ता । अवघी आमुचीच आतां ॥ ४ ॥

॥ ४०१३ ॥

नव्हे सुख मज न लगे हा मान । न राहे हें जन काय करूं ॥ १ ॥
देहउपचारें पोळतसें अंग । विषतुल्य चांग मिष्टान्न तें ॥ २ ॥
नाइकवे स्तुति वाणितां थोरीव । होतो माझा जीव कासावीस ॥ ३ ॥
तुज पावें ऐसी सांग कांहीं कळा । नको मृगजळा गोवूं मज ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां करीं माझें हित । काढावें जळत आगींतूनि ॥ ५ ॥

---

## जनाशीं उद्गार.

॥ ४०१४ ॥

अचळ न चळे ऐसें जालें मन । धरूनि निज खुण राहिलोंसें ॥ १ ॥
आवडी बैसली गुणांची अंतरीं । करूं धणीवरी सेवन तें ॥ २ ॥
एकविध भाव नव्हे अभावना । आणीकया गुणां न मिळवे ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझें पडिलें आहारीं । ध्यान विटेवरी ठाकलें तें ॥ ४ ॥

॥ ४०१५ ॥

अनुभवाचे रस देऊं आर्त्तभूतां । सोडूं चोजवितां पुढें पोतीं॥ १ ॥
देवाचा प्रसाद रत्नाच्या ओवणी । शोभतील गुणीं आपुलिया ॥ २ ॥
आधीं भाव सार शुद्ध ते भूमिका । बीज आणि पिका चिंता नाहीं ॥३॥
तुका ह्मणे ज्याचें नाम गुणवंत । तें नाहीं लागत पसरावें ॥ ४ ॥

॥ ४०१६ ॥

अनुभवा आलें । माझें चित्तींचें क्षरलें ॥ १ ॥ असे जवळी अंतरे । फिरे आवडीच्या फेरें ॥ २ ॥ खादलेंचि वाटे । खावें भेटलेंचि भेटे ॥ ३ ॥ तुका ह्मणे उभें । आम्ही राखियेलें लोभें ॥ ४ ॥

॥ ४०१७ ॥

अभयाचें स्थळ । तें हें एक अचळ ॥ १ ॥ तरि धरिला विश्वास । ठेलों होउनियां दास ॥ २ ॥ पुरली आवडी । पायीं लागलीसे गोडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे कंठीं नाम । अंगीं भरलेंसें प्रेम ॥ ४ ॥

॥ ४०१८ ॥

असो खळ ऐसे फार । आह्मां तयांचे उपकार ॥ १ ॥ करिती पातकांची धुर्णी[1] । मोल न घेतां साबणीं ॥ २ ॥ फुकाचे मजुर । ओझें वागविती भार ॥ ३ ॥ पार उतरून ह्मणे तुका । आह्मां आपण जाती नरका ॥ ४ ॥

॥ ४०१९ ॥

असोत लोकांचे बोल शिरावरी । माझी मज बरी विठाबाई ॥ १ ॥
आपंगिलें मज आहे ते कृपाळु । बहुत कनवाळु अंतरींची ॥ २ ॥
वेदशास्त्रें जिसी वर्णिती पुराणें । तिचें मी पोसणें लडिवाळ ॥ ३ ॥
जिचें नाम कामधेनु कल्पतरू । तिचें मी लेंकरूं तुका ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४०२० ॥

अवचिताचि हातीं ठेवा । दिला सेवा न करितां ॥ १ ॥ भाग्य फळलें जाली भेटी । नेघें तुटी यावरी ॥ २ ॥ दैन्य गेलें हरली चिंता । सदैव आतां यावरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वांटा जाला । बोलों बोली देवासीं ॥ ४ ॥

॥ ४०२१ ॥

आपुल्यांचा करीन मोळा । माझ्या कुळाचारांचा ॥ १ ॥ अवघियांचें

---

पाठभेदः—१ धुनी.

वंदिन पाय । ठायाठाय न देखें ॥ २ ॥ नेदीं तुटों समाधान । थांबों जन सकळ ॥३॥ तुका ह्मणे झाडा होय । तों हे सोय न संडीं ॥४॥

॥ ४०२२ ॥

आतां आह्मां भय नाहीं बा कोणाचें । बळ विठोबाचें जालें असे ॥ १ ॥
धीर दिला आह्मां येणें पांडुरंगें । न पांगों या पांगें संसाराच्या ॥ २ ॥
तुका ह्मणे माझा कैवारी हा देव । नाहीं भय भेव त्याच्या संगें ॥ ३ ॥

॥ ४०२३ ॥

आतां कांहीं सोस न करीं आणीक । धरीन तें एक हेंचि दृढ ॥ १ ॥
जेणें भवसिंधु उतरिजे पार । तुटे हा दुस्तर गर्भवास ॥ २ ॥
जोडीन तें आतां देवाचे चरण । अविनाश धन परमार्थ ॥ ३ ॥
तुका ह्मणे बरा जोडला हा देह । मनुष्यपणें इहलोका आलों ॥ ४ ॥

॥ ४०२४ ॥

आतां चुकलें बंधन । गेलें विसरोनि दान । आपुले ते वाण । सावकाश विकावे ॥ १ ॥ लाभ जोडला अनंत । घरीं सांपडलें वित्त । हातोंहातीं थीत । उरों तळ नल्हाची ॥ २ ॥ होतें गोविलें विसारें । माप जालें एकसरें । होतें होरे वारें । तोंचि लाहो साधिला ॥ ३ ॥ कराया जतन । तुका ह्मणे निजधन । केला नारायण । साह्य नेदी विसंबों ॥ ४ ॥

॥ ४०२५ ॥

आतां देह अवसान । हें जतन तोंवरी ॥ १ ॥ गाऊं नाचूं गदा रोळें । जिंकों बळें संसार ॥ २ ॥ याचि जीऊं अभिमानें । सेवाधनें बळकट ॥ ३ ॥ तुका ह्मणे न सरें मागें । होईन लागें आगळा ॥ ४ ॥

॥ ४०२६ ॥

आतां वांटों नेदी आपुलें हें मन । न सोडीं चरण विठोबाचे ॥ १ ॥
दुजियाचा संग लागों नेदी वारा । आपुल्या शरीरावरुनियां ॥ २ ॥
यावें जावें आह्मीं देवाच सांगातें । मागूनि करीत हेंचि आलों ॥ ३ ॥

काय वांयां गेलों तो करूं उद्वेग । उभा पांडुरंग मागें पुढें ॥ ४ ॥
तुका ह्मणे प्रेम मागतों आगळें । येथें भोगूं फळें वैकुंठींचीं ॥ ५ ॥

॥ ४०२७ ॥

आतां पुढें मना । चाली जाली नारायणा ॥ १ ॥ येथें राहिलें राहिलें । कैसें गुंतोनि उगलें ॥ २ ॥ भोवतें भोंवनी । आलियांची जाली धणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे रंग रंगे । रंगलें पांडुरंगे ॥ ४ ॥

॥ ४०२८ ॥

आतां होईन धरणेकरी । भीतरीच कोंडीन ॥ १ ॥ नाहीं केली जीवें-साटीं। तों कां गोष्टी रुचे ते ॥ २ ॥ आधीं निर्धार तो सार । मग भार सोसीन ॥ ३ ॥ तुका ह्मणे खाऊं जेऊं । नेदूं होऊं वेगळा ॥ ४ ॥

॥ ४०२९ ॥

आधीं नाहीं कळों आला हा उपाय । नाहीं तरी काय चुकी होती ॥ १ ॥
घालितों पायांसी मिठी एकसरें । नेदीं तों दुसरें आड येऊं ॥ २ ॥
कासया पडतों लटिक्याचे भरी । नव्हता का शिरीं भार घेतों ॥ ३ ॥
संसाराचा हाट फिरतो दुकान । भरोवरी धन मेळवितो ॥ ४ ॥
तुका ह्मणे कां हे घेतों गर्भवास । कां या होतों दास कुटुंबाचा ॥ ५ ॥

॥ ४०३० ॥

आनंदाचा कंद गाइयेला गीतीं । पाहियेला चित्तीं देवराव ॥ १ ॥
देवराव तोही आहे निश्चयेसीं । अखंड नामासी बोलवितो ॥ २ ॥
बोलवितो मज कृपा तो करूनि । तुका ह्मणे मनीं धरा भाव ॥ ३ ॥

॥ ४०३१ ॥

आनंदें एकांतीं प्रेमें वोसंडत । घेऊं अगणित प्रेमसुख ॥ १ ॥
गोप्य धन नये वारा लागों यास । पाहों नये वास दुर्जनासी ॥ २ ॥
ह्मणी दृष्टि लागे आवडीच्या रसा । सेवूं जिरे तैसा आपणासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे हें बहु सकुमार । न साहावे भार वचनाचा ॥ ४ ॥

॥ ४०३२ ॥

आपुला तो देह आह्मां उपेक्षीत। कोठें जाऊं हित सांगों कोणा॥ १ ॥
कोण नाहीं दुःख करितां संसार। आह्मीं हा विचार वमन केला॥ २ ॥
नाहीं या घरीत जीवित्वाची चाड। कोठें करूं कोड आणिकांचें॥ ३ ॥
तुका ह्मणे असों चिंतोनियां देवा। मी माझें हा हेवा सारूनियां॥ ४ ॥

॥ ४०३३ ॥

आपुलाला लाहो करूं। केणें भरूं हा विठ्ठल॥ १ ॥ भाग्य पावलों
या ठायां। आतां काया कुरवंडी॥ २ ॥ पुढती कोठें घडे ऐसें। बहुतां
दिसें फावलें॥ ३ ॥ तुका ह्मणे जाली जोडी। चरण घडी न विसंबें॥ ४ ॥

॥ ४०३४ ॥

आपुल्या[1] विचार करीन जिवाशीं। काय या जनाशीं चाड मज॥ १ ॥
आपुलें स्वहित जाणती सकळें[2]। निरोदितां बळें दुःख वाटे॥ २ ॥
आइको नाइको कथा कोणी तरी। जाऊनियां घरीं निजो सुखें॥ ३ ॥
माझी कोण वोज जाला हा शेवट। देखोनियां वाट आणिकां लावूं॥ ४ ॥
तुका ह्मणे भाकूं आपुली करुणा। जयाची वासना तया फळे॥ ५ ॥

॥ ४०३५ ॥

आमुची जोडी ते देवाचे चरण। करावें चिंतन विठोबाचें॥ १ ॥
लागेल तरी कोणी घ्यावें धणीवरी। अमुपाचि परि आवडीच्या॥ २ ॥
उभारिला कर प्रसिद्ध या जग। करूं केला त्याग मागें पुढें॥ ३ ॥
तुका ह्मणे होय दरिद्र विच्छिन्न। ऐसें देऊं दान एकवेळे[3]॥ ४ ॥

॥ ४०३६ ॥

आवडी भोजन प्रकार परवडी। भिन्न भिन्न गोडी एका रसा॥ १ ॥
भोगित्या पंगती लाधलों प्रसाद। तिंहीं नाहीं भेद राखियेला॥ २ ॥

---

पाठभेदः—१ आपुला. २ सकळ, बळ. ३ एकवेळा.

पाकसिद्धि स्वहस्तकें विनियोग। आवडीचे भाग सिद्ध केले ॥ ३ ॥
तुका ह्मणे आला उच्छिष्ट प्रसाद। तेणें हा आनंद माझ्या जीवा ॥ ४ ॥

॥ ४०३७ ॥

आह्मां अळंकार मुद्रांचे शृंगार। तुळसीचे हार वाहों कंठीं ॥ १ ॥
लाडिके डिंगर पंढरिरायाचे। निरंतर वाचे नामघोष ॥ २ ॥
आह्मां आणिकांची चाड चित्तीं नाहीं। सर्व सुखें पायीं विठोबाच्या ॥३॥
तुका ह्मणे आह्मीं नेघोंचि या मुक्ती। एकाविण चित्तीं दुजें नाहीं ॥ ४ ॥

॥ ४०३८ ॥

आह्मां आवडे नांव घेतां। तोही पिता संतोषे ॥ १ ॥ उभयतां एकचित्त। तरी प्रीत वाढली ॥ २ ॥ आह्मी शोभों निकटवासें। अनारिसें न दिसे ॥३॥ तुका ह्मणे पांडुरंगे। अवघीं अंगें निवालीं ॥४॥

॥ ४०३९ ॥

आह्मां कथा आवश्यक। येर संपादूं लौकिक ॥१॥ जैसी तैसी मान्य बरी। मानिल्या त्या माना येरी ॥ २ ॥ व्यालीचा कळवळा। जीव बहुत कोंवळा ॥३॥ कवतुकें वावरें। तुका ह्मणे या आधारें ॥ ४ ॥

॥ ४०४० ॥

आह्मां भय धाक कोणाचा रे पाहें। काळ मशक काय मानव हे ॥१॥
आह्मांसी ते काय चिंता या पोटाची। माउली आमुची पांडुरंग ॥२॥
काय करावी हे कोणाची मान्यता। करितां अनंता कोण वारी ॥३॥
नाहीं शीण आह्मां जालें कवतुक। पुनीत हे लोक करावया ॥ ४ ॥
तुका ह्मणे खातों आनंदाचे लाडू। नका चरफडूं घ्यारे तुह्मी ॥ ५ ॥

॥ ४०४१ ॥

आह्मां वैष्णवांचा। नेम काया मनें वाचा ॥ १ ॥ धीर धरूं जिवा-

---

पाठभेदः—१ चाडचि पै नाहीं. २ सुख.

सार्टी । येऊं नेदूं लाभा तुटी ॥ २ ॥ उचित समय । लाज निवारावें भय ॥ ३ ॥ तुका ह्मणे काळा । जाणों नेम नाहीं बाळा ॥ ४ ॥

॥ ४०४२ ॥

आह्मां हरिच्या दासां कांहीं । भय नाहीं त्रैलोकीं ॥ १ ॥ देव उभा मागें पुढें । उगवी कोडें संकट ॥ २ ॥ जैसा केला तैसा होय । धांवे सोय धरोनि ॥३॥ तुका ह्मणे असों सुखें । गाऊं मुखें विठोबा ॥४॥

॥ ४०४३ ॥

आह्मी आइते जेवणार । नलगे सोसावे डोंगर । सुखाचा वेव्हार । तेणेंचि वाढलें ॥ १ ॥ ठेवा जोडला मिरासी । ठाव जाला पायांपासी । नव्हे आणिकांसी । रीघ तेथें यावया ॥ २ ॥ बळी दिला जीवभाव । नेणें आणिकांचें नांव । धरिला एक भाव । तो विश्वास फळला ॥ ३ ॥ तुका ह्मणे जालों वळी । आह्मी निकट जवळी । बोलिलों तें पाळीं । वचन स्वामी आमचें ॥ ४ ॥

॥ ४०४४ ॥

आह्मी भाग्याचे भाग्याचे । आह्मां तांबे भोपळ्याचे ॥ १ ॥ लोकां घरीं गाई ह्मैसी । आह्मा घरीं उंदिरघुसी ॥ २ ॥ लोकां घरीं तांबे थाळे । आह्मां घरीं परळ काळे ॥ ३ ॥ लोकां घरीं हत्ती घोडे । आह्मां आधोडीचे जोडे ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मी सुडके । आह्मां देखोनि काळ धाके ॥ ५ ॥

॥ ४०४५ ॥

आह्मी वीर जुंझार । करूं जमदाढे मार । तापेटिले भार । मोड जाला दोषांचा ॥ १ ॥ जाला हाहाकार । आले हांकीत जुंझार । शंखचक्रांचे शृंगार । कंठीं हार तुळसीचे ॥ २ ॥ रामनामांकित

पाठभेदः—१ हा चरण कोठें कोठें नाहीं. २ थापटिले.

बाण । गोपी लाविला चंदन । झळकती निशाणें । गरुडटके पताका ॥ ३ ॥ तुका ह्मणे काळ । जालों जिंकोनि निश्चळ । पावला सकळ । भोग आह्मां आमचा ॥ ४ ॥

॥ ४०४६ ॥

आह्मी सदैव सुडके । जवळीं येतां चोर धाके । जाऊं पुढी भिकें। कुतरीं घर राखती ॥ १ ॥ नांदणूका ऐसी सांगा । नाहीं तरी वांयां भागा । थोरपण अंगा । तरी ऐसें आणावें ॥ २ ॥ अक्षय साचार । केलें सायासांनीं घर । एरंडासिवार । दुजा भार न साहती ॥ ३ ॥ धन कण घरोघरीं । पोट भरे भिकेवरी । जतन तीं करी । कोण गुरें वासरें ॥ ४ ॥ जाली सकळ निश्चिंती । भांडवल शेण माती । झळझळीत भिंती । वृंदावनें तुळसीचीं ॥५॥ तुका ह्मणे देवा । अवघा निरसला[1] हेवा । कुटुंबाची सेवा । तोचि करी आमुच्या ॥ ६ ॥

॥ ४०४७ ॥

आह्मी हरिचे संवगडे । जुने ठायींचे वेडे बागडे । हातीं धरूनि कडे । पाठीं सवें वागविलों ॥ १ ॥ ह्मणोनि भिन्न भेद नाहीं । देवा आह्मां एकदेहीं । नाहीं जालों कहीं । एका एक वेगळे ॥ २ ॥ निद्रा करितां होतों पायीं । सवेंचि लंका घेतली तई । वानरें गोवळ गाई । सवें चारित फिरतसों ॥ ३ ॥ आह्मां नामाचें चिंतन । राम कृष्ण नारायण । तुका ह्मणे क्षण । खातां जेवितां न विसंबो ॥ ४ ॥

॥ ४०४८ ॥

आह्मी हरिचे हरिचे । शूर कळिकाळा यमाचे ॥ १ ॥ नामघोष बाण साचे । भाले तुळसी मंजुरेचे ॥२॥ आह्मी हरिचे हरिचे दास । कळिकाळावरि घालूं कास ॥ ३ ॥ आह्मी हरिचे हरिचे दूत । पुढें पळती यमदूत ॥ ४ ॥ तुका ह्मणे आह्मांवरी । सुदर्शन घरटी करी ॥ ५ ॥

---

पाठभेदः—१ निराविला, निरसविला.

॥ ४०४९ ॥

इहलोकीं आह्मां भूषण अवकळा । भोपळा वाकळा आणि भिक्षा ॥१॥
निमोली संपदा भयविरहित । सर्वकाळ चित्त समाधान ॥ २ ॥
छिद्राचा आश्रम उंदीरकुळवाडी । धन नाम जोडी देवाची ते ॥३॥
तुका ह्मणे एक सेवटीं राहाणें । वर्ततों या जना विरहित ॥ ४ ॥

॥ ४०५० ॥

इहलोकींचा हा देहे । देव इच्छिताती पाहे ॥१॥ धन्य आह्मी जन्मा आलों । दास विठोबाचे जालों ॥२॥ आयुष्याच्या या साधनें । सच्चिदानंद पदवी घेणें ॥३॥ तुका ह्मणे पाठवणी । करूं स्वर्गाची निशाणी ॥४॥

॥ ४०५१ ॥

उखतें आयुष्य जायांचें कलिवर । अवघें वोडंबर विषयांचें ॥ १ ॥
कोणासी हा लागे पुसणें विचार । मनेंचि सादर करूं आतां ॥ २ ॥
उत्पत्ति प्रळय पडिलें दळण । पाकाचें भोजन बीज वाढे ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाऊं अभयाच्या ठायां । रिघों देवराया शरण वेगीं ॥४॥

॥ ४०५२ ॥

उभे चंद्रभागे तीरीं । कट धरोनियां करीं । पाउलें गोजिरीं । विटेवरी शोभलीं ॥१॥ त्याचा छंद माझ्या जीवा । काया वाचा मनें हेवा । संचिताचा ठेवा । जोडी हातीं लागली ॥ २ ॥ रूप डोळियां आवडे । कीर्ति श्रवणीं पवाडे । मस्तक नावडे । उठों पायांवरोनि ॥३॥ तुका ह्मणे नाम । ज्याचें नासी क्रोध काम । हरी भवश्रम । उच्चारितां वाचेसी ॥४॥

॥ ४०५३ ॥

उपजोनियां मरें । परि हेंचि वाटे बरें ॥१॥ नाहीं आवडीसी पार । न ह्मणवे जालें फार ॥ २ ॥ अमृताची खाणी । उघडली नव्हे धणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे पचे । विठ्ठल हें मुखा रुचे ॥ ४ ॥

पाठभेदः—१ अन्नभिक्षा. २ देवाचें तें. ३ पावटणी. ४ ह्मणावें. ५ साचें.

॥ ४०५४ ॥

उलंघिली लाज । तेणें साधियेलें काज ॥ १ ॥ सुखें नाचे पैलतीरीं । गेलों भवाचे सागरीं ॥ १ ॥ नामाची सांगडी । सुखें बांधली आवडी ॥ ३ ॥ तुका ह्मणे लोकां । उरली वाचा मारीं हाका ॥ ४ ॥

॥ ४०५५ ॥

एक भाव चित्तीं । तरी नलगे कांहीं युक्ती ॥ १ ॥ कळों आलें जीवें । मज माझियाचि भावें ॥२॥ आठवचि पुरे । सुख अवघें मोहोरें ॥३॥ तुका ह्मणे मन । पूजा इच्छी नारायण ॥ ४ ॥

॥ ४०५६ ॥

एका ऐसें एक होतें कोणा काळें । समर्थाच्या बळें काय नव्हे ॥ १ ॥
घालूनि बैसलों मिरासीस पाया । जिंकों देवराया संदेह नाहीं ॥ २ ॥
केला तो न संडीं आतां कइवाड । वारीन हे आड कामक्रोध ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाळीं अळसाची धाडी । नव्हती आली जोडी कळों साच॥४॥

॥ ४०५७ ॥

एकांतीं लोकांतीं करूं गदारोळ । लेश तोही मळ नाहीं येथें ॥ १ ॥
द्यावें घावें आह्मीं आपुलिया सत्ता। न देखों पुसता दुजा कोणी ॥ २ ॥
भांडाराची किली माझे हातीं आहे। पाहिजे तो पाहें वान येथें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां विश्वासाच्या बळें। ठेविलें मोकळें देवें येथें ॥ ४ ॥

॥ ४०५८ ॥

एकविध वृत्ति न राहे अंतरीं । स्मरणींच हरी विस्मृति हे ॥ १ ॥
कैसा हा नवलाव वाटतो अनुभवें। मज माझ्या जीवें साक्षित्वेसी ॥२॥
न राहे निश्चळ जागवितां मन । किती क्षणेंक्षण सावरावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे बहु केले वेवसाव । तेणें रंगें जीव रंगलासे ॥ ४ ॥

॥ ४०५९ ॥

ऐसा दुस्तर भवसागर । नेणों कैसा उतरूं पार ॥ १ ॥ कामक्रोधादि

सावजें थोर । दिसताती भयंकर ॥ २ ॥ मायाममतेचे भोवरे । घेती भयानक फेरे ॥ ३ ॥ वासनेच्या लहरी येती । उद्योग हेलकावे बसती ॥४॥ तरावया एक युक्ति असे । तुका नामनावेमधीं बैसे ॥५॥

॥ ४०६० ॥

ऐसीं वर्मे आह्मां असोनियां हातीं । कां होऊं नेणतीं दिशाभुली ॥ १ ॥
पोटाळुनी पाय कवळीन उभा । कृपे पद्मनाभा हालों नेदीं ॥ २ ॥
आपुले इच्छेसी घालीन संपुष्टीं । श्रीमुख तें दृष्टी न्याहाळीन ॥ ३ ॥
तुका ह्मणे बहु सांडियेलीं मतें । आपुल्या पुरतें धरुनी ठेलों ॥ ४ ॥

॥ ४०६१ ॥

ऐसीं ठावीं वर्मे । तरी सांडवलों भ्रमें ॥१॥ सुखें नाचतां कीर्तनीं । नाहीं आशंकित मनीं ॥२॥ ऐसें आलें हाता । बळ तरी गेली चिंता ॥३॥ सुख येथें जालें तरी । नाहीं आणिकांची उरी ॥ ४ ॥ ऐसें केलें देवें । पुढें कांहींचि न व्हावें ॥५॥ तुका ह्मणे मन । आतां जालें समाधान ॥६॥

॥ ४०६२ ॥

कई मात माझे आइकती कान । बोलतां वचन संतां मुखीं ॥ १ ॥
केला पांडुरंगें तुझा अंगिकार । मग होइल धीर माझ्या जीवा ॥ २ ॥
ह्मणऊनि मुख अवलोकितों पाय । हेचि मज आहे थोरी आशा ॥३॥
माझिया मनाचा हाचि पैं विश्वास । न करीं सायास साधनांचे ॥४॥
तुका ह्मणे मज होईल भरवसा । तरलों मी ऐसा साच भावें[1] ॥ ५ ॥

॥ ४०६३ ॥

करितों कवित्व ह्मणाल हें कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ १ ॥
माझिये युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो ॥ २ ॥
काय मी पामर जाणें अर्थभेद । वदवी गोविंद तेंचि वदें ॥ ३ ॥

पाठभेदः—१ भावें.

निमित्त मापासी बैसविलों आहें । मी तों कांहीं नव्हे स्वामिसत्ता ॥४॥
तुका ह्मणे आहें पाईकचि खरा । वागवितों मुद्रा नामाची हे ॥ ५ ॥

॥ ४०६४ ॥

करूं तैसें पाठांतर । करुणाकर भाषण । जिहीं केला मूर्तिमंत । ऐसा संतप्रसाद ॥ २ ॥ सोज्वळ केल्या वाटा । आइत्या नीटा मागीलां ॥ ३ ॥ तुका ह्मणे घेऊं धांवा । करूं हांवा ते जोडी ॥ ४ ॥

॥ ४०६५ ॥

करूं याची कथा नामाचा गजर । आह्मा संवसार काय करी ॥ १ ॥
ह्मणवूं हरिचे दास लेऊं तीं भूषणें । कांपे तयाभेणें कळिकाळ ॥ २ ॥
आशा भय लाज आड नये चिंता । ऐसी तया सत्ता समर्थाची ॥३॥
तुका ह्मणे करूं ऐसियांचा संग । जेणें नव्हे भंग चिंतनाचा ॥ ४ ॥

॥ ४०६६ ॥

कल्याण या आशीर्वादें । जाती द्वंद्वें नासोनि ॥ १ ॥ आश्वासिलें नारायणें । प्रेमदानें अंतरिंच्या ॥ २ ॥ गेली निवारोनि आतां । सकळ चिंता यावरी ॥३॥ तुका ह्मणे गातां गीत । आलें हित सामोरें ॥४॥

॥ ४०६७ ॥

काग बग रिठा मारिले बाळपणीं । अवघी दैत्यखाणी बुडविली ॥ १ ॥
तो मज दावा तो मज दावा । नंदानंदन जीवा आवडे तो ॥ २ ॥
गोवर्धन गिरी उचलिला करीं । गोकुळ भीतरी राखियेलें ॥ ३ ॥
वधुनि भौमासुरा आणिल्या गोपांगना । राज्य उग्रसेना मथुरेचें ॥ ४ ॥
पांडव जोहरीं राखिलें कुसरी । विवराभीतरीं चालविले ॥ ५ ॥
तुका ह्मणे हा तों भक्तांचा कृपाळ । दुष्ट जना काळ नारायण ॥६॥

---

पाठभेदः—१ ऐसे. २ 'तों' नाहीं.

॥ ४०६८ ॥

काय उणें मज पांडुरंगा पायीं । रिद्धिसिद्धि ठायीं वोळगती ॥ १ ॥
कोण पाहे सुखा नासिवंताकडे । तृष्णेचें बापुडें नव्हों आह्मी ॥ २ ॥
स्वर्गसुखें आह्मीं केलीं पावटणी । पापपुण्यें दोन्ही उलंडिलीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे घरीं आणिलें वैकुंठ । वसविली पेठ वैष्णवांची ॥ ४ ॥

॥ ४०६९ ॥

काय कृपेविण घालावें सांकडें । निश्चिती निवाडें कोण्या एका ॥ १ ॥
आह्मों तैसीं पुढें असों दीनपणें । वेचुनि वचनें करुणेचीं ॥ २ ॥
धरुनि[1] भय आतां काय वाहों चिंता । काय करूं आतां आप्तपण ॥३॥
तुका ह्मणे आह्मी भावहीन जीव । ह्मणउनी देव दुरे दूरी ॥ ४ ॥

॥ ४०७० ॥

काय शरीरापें काम । कृपा साधावया प्रेम । उचिताचे धर्म । भागा
आले ते करूं ॥ १ ॥ देईन हाक नारायणा । तें तों नाकळे बंधना ।
पंढरीचा राणा । आइकोन धांवेल ॥ २ ॥ सातांपांचांचें गोठलें ।
प्रारब्धें आकारलें । आतां हें संचलें । असो भोगा सांभाळीं ॥ ३ ॥
फावली ते बरवी संधि । सावधान करूं बुद्धी । तुका ह्मणे मधीं ।
कोठें नेघें विसावा ॥ ४ ॥

॥ ४०७१ ॥

काळाचे ही काळ । आह्मी विठोबाचे लडिवाळ ॥ १ ॥ करूं सत्ता
सर्वां ठायीं । वसों निकटवासें पायीं ॥ २ ॥ ऐसी कोणाची वैखरी ।
वदे आमुचे समोरी॥३॥तुका ह्मणे बाण । हातीं हरिनाम तीक्षण॥ ४ ॥

॥ ४०७२ ॥

कासया गुणदोष पाहों आणिकांचे । मज काय त्यांचें उणें असे ॥१॥

---

पाठभेदः—१ धरूं.

काय पापपुण्य पाहों आणिकांचें । मज काय त्यांचें उणें असे ॥ २ ॥ नष्टदुष्टपण कवणाचें वाणूं । तयाहून अणु अधिक माझें ॥ ३ ॥ कुचर खोटा मज कोण असे आगळा । तो मी पाहों डोळां आपुलिये ॥ ४ ॥ तुका ह्मणे मी भांडवलें पुरता । तुजसी पंढरिनाथा लावियेलें ॥ ५ ॥

॥ ४०७३ ॥

किती एका दिवशीं । बुद्धी जाली होती ऐसी ॥ १ ॥ कांहीं करावें स्वहित । तों हें न घडे उचित ॥ २ ॥ अवलंबुनी भीक । लाज सांडिली लौकिक ॥ ३ ॥ तुका ह्मणे दीन । जालों मनुष्यपणा हीन ॥ ४ ॥

॥ ४०७४ ॥

कितीवेळां जन्मा यावें । नित्य व्हावें फजीत ॥ १ ॥ ह्मणऊनि जीव भ्याला । शरण गेला विठोबासी ॥ २ ॥ प्रारब्ध पाठी गाढें । न सरे पुढें चालतां ॥ ३ ॥ तुका ह्मणे रोकडी हे । होती पाहें फजीती ॥ ४ ॥

॥ ४०७५ ॥

कुरुवंडी करीन काया । वरोनि पायां गोजिरिया ॥ १ ॥ बैसलें तें रूप डोळां । मन चाळा लागलें ॥ २ ॥ परतें न सरवे दुरी । आवडी पुरी बैसली ॥ ३ ॥ तुका ह्मणे विसावलों । येथें धालों धणीवरि ॥ ४ ॥

॥ ४०७६ ॥

केलें शकुनें प्रयाण । आतां मागें फिरे कोण ॥ १ ॥ होय तैसें होय आतां । देह बळी काय चिंता ॥ २ ॥ पडिलें पाळवीं । त्याचा धाक वाहे जीवीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीणें । देव काय हीनपणें ॥ ४ ॥

॥ ४०७७ ॥

कोण सांगायास । गेलें होतें देशोदेश ॥ १ ॥ नेलें वाऱ्या हातीं माप । समर्थ तो माझा बाप ॥ २ ॥ कोणाची हे सत्ता । जाली वाचा वदविता ॥ ३ ॥ तुका ह्मणे या निश्चयें । माझें निरसलें भय ॥ ४ ॥

॥ ४०७८ ॥

कोणापाशीं आतां सांगों मी बोभाट । कधीं खटपट सरेल हे ॥ १ ॥
कोणां आराणूक होईल कोणे काळीं । आपुलालीं जाळीं उगवूनि ॥२॥
माझा येणें दुःखें फुटतसे प्राण । न कळतां जन सुखी असे ॥ ३ ॥
भोगा आधीं मनें मानिलासे त्रास । पाहे लपायास ठाव कोठें ॥ ४ ॥
तुका ह्मणे देतों देवाचें गाऱ्हाणें । माझें ऋण येणें सोसियेलें ॥ ५ ॥

॥ ४०७९ ॥

कोणी निंदा कोणी वंदा । आह्मां स्वहिताचा धंदा ॥ १ ॥ काय तुह्मांसी गरज । आह्मी भजूं पंढरिराज ॥२॥ तुह्मांसारिखें चालावें । तेव्हां स्वहिता मुकावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे हो कां कांहीं । गळ दिला विठ्ठलपायीं ॥ ४ ॥

॥ ४०८० ॥

कोणें गांवीं आहे सांगा हा विठ्ठल । जरी ठावा असेल तुह्मां कोणा ॥ १ ॥
लागतसें पायां येतों लोटांगणीं । मात तरी कोणी सांगा याची ॥ २ ॥
गुण रूप याचे वाणिती या संतां । मज क्षेम देतां सुख वाटे ॥ ३ ॥
सर्वस्वें हा जीव ठेवीन चरणीं । पांडुरंग कोणी दावी तया ॥ ४ ॥
तुका ह्मणे गाईवत्सा तडातोडी । तैसी जाते घडी एकी मज ॥ ५ ॥

॥ ४०८१ ॥

कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता । बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा॥ १ ॥
कृष्ण माझा गुरु कृष्ण माझें तारूं । उतरी पैलपारु भवनदीची ॥ २ ॥
कृष्ण माझें मन कृष्ण माझें जन । सोइरा सज्जन कृष्ण माझा ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझा श्रीकृष्ण विसावा । वाटे न करावा परता जीवा ॥ ४ ॥

॥ ४०८२ ॥

कृपेचे सागर हेचि साधुजन । तिंहीं कृपादान केलें मज ॥ १ ॥
बोबडे वाणीचा केला अंगीकार । तेणें माझा स्थिर केला जीव ॥ २ ॥
तेणें सुखें मन स्थिर जालें ठायीं । संतीं दिला पायीं ठाव मज ॥ ३ ॥

नाभी नाभी ऐसें बोलिलें वचन। तें माझें कल्याण सर्वस्वही ॥ ४ ॥
तुका ह्मणे जालों आनंदनिर्भर । नाम निरंतर घोष करूं ॥ ५ ॥

॥ ४०८३ ॥

खरें नानवट निक्षेपींचें जुनें । काढिलें ठेवणें समर्थांचें ॥ १ ॥
मजुराच्या हातें मापाचा उकल । मी तों येथें फोल सत्ता त्याची ॥ २ ॥
कुलाळाच्या हातें घटाच्या उत्पत्ति । पाठवी त्या जाती पाकस्छळा ॥ ३ ॥
तुका ह्मणे जीवन तें नारायणीं । प्रभा जाते कीर्णीं प्रकाशाची ॥ ४ ॥

॥ ४०८४ ॥

खेळतों ते खेळ पायांच्या प्रसादें। नव्हती हीं छंदें नासिवंतें ॥ १ ॥
माझा मायबाप उभा विटेवरी । कवतुकें करीं कृपादान ॥ २ ॥
प्रसादाची वाणी वदे तीं उत्तरें । नाहीं मतांतरें जोडियेलीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे रस वाढितीया अंगें । छाया पांडुरंगें केली वरी ॥ ४ ॥

॥ ४०८५ ॥

खेळों मनासवें जीवाच्या संवादें । कौतुक विनोदें निरंजनीं ॥ १ ॥
पचीं पडिलें तें रुचे वेळोवेळां । होतसे डोहळा आवडीस ॥ २ ॥
एकांताचें सुख जडलें जिव्हारीं । वीट परीचारीं बरा आला ॥ ३ ॥
जगा ऐसी बुद्धि नव्हे आतां कदा । लंपट गोविंदा जालों पायीं ॥ ४ ॥
आणीक ते चिंता नलगे करावी । नित्य नित्य नवी आवडी हे ॥ ५ ॥
तुका ह्मणे घडा राहिला पडोन । पांडुरंगीं मन विसांवलें ॥ ६ ॥

॥ ४०८६ ॥

गाऊं नेणें परी मी कांहीं गाईन । शरण जाईन पांडुरंगा ॥ १ ॥
ब्रह्मांडनायक मी त्याचा अंकित । काय यमदूत करिती काळ ॥ २ ॥
वेश्या ज्याच्या नामें तारिली गणिका। अजामेळासारिखा पापरासी ॥ ३ ॥

चरणींच्या रजें आहिल्या तारिली । रूपवंत केली कुबजा दासी ॥ ४ ॥
पृथिवी तारिली पाताळासी जातां । तुका ह्मणे आतां आह्मी किती ॥ ५ ॥

॥ ४०८७ ॥

गाढवाचें घोडें । आह्मी करूं दृष्टीपुढें ॥ १ ॥ चघळी वाहाणा । माघारिया बांडा सुना ॥ २ ॥ सोंगसंपादणी । तरि करूं शुद्ध वाणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे खळ । करूं समर्यां निर्मळ ॥ ४ ॥

॥ ४०८८ ॥

गुणांची आवडी वाचेचा पसरु । पडिला विसरु सर्वरेसां ॥ १ ॥
आदिमध्यअंतीं नाहीं अवसान । जीवनीं जीवन मिळोनि गेलें ॥ २ ॥
रामकृष्णनाममाळा हे साजिरी । ओविली गोजिरी कंठाजोगी ॥ ३ ॥
तुका ह्मणे तनु जालीसे शीतळ । अवघी सकळ ब्रह्मानंदें ॥ ४ ॥

॥ ४०८९ ॥

घालूनि लोळणी पडिलों अंगणीं । सिंचा सिंचवणी तीर्थ वरि ॥ १ ॥
वोल्हावेल तनु होईल शीतळ । जाली हळहळ बहुतापें ॥ २ ॥
पावेन या ठाया कई जालें होतें । आलों अवचितें उष्टयावरि ॥ ३ ॥
तुका ह्मणे कोणी जाणवा राउळीं । येईल जवळी पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ४०९० ॥

चतुर मी जालों आपुल्या भोंवता । भावेंविण रिता फुंजें अंगीं ॥ १ ॥
आतां पुढें वांयां जावें हें तें काई । कामक्रोधें ठायीं वास केला ॥ २ ॥
गुणदोष आले जगाचे अंतरा । भूताच्या मत्सरावरी बुद्धि ॥ ३ ॥
तुका ह्मणे करूं उपदेश लोकां । नाहीं जालों एका परता दोषा ॥ ४ ॥

॥ ४०९१ ॥

चित्तीं धरीन मी पाउलें सकुमार । सकळ बिढार संपत्तीचें ॥ १ ॥
कंठीं धरिन मी नाम अमृताची वल्ली । होईल राहिली शतिळ तनु ॥ २ ॥

पाठभेदः—१ क्षणें. २ इतरांचा. ३ स्फुंद.

पाहेन श्रीमुख साजिरें सुंदर । सकळां अगर लावण्याचें ॥ ३ ॥
करिन अंगसंग बाळकाचे परी । बैसेन तों वरी नुतरीं कडिये ॥ ४ ॥
तुका ह्मणे हा केला तैसा होय । धरिली मनें सोय विठोबाची ॥ ५ ॥

॥ ४०९२ ॥

चरणीं नमन सद्गुरूच्या पूर्ण । नित्य हरिगुण गाऊं सदा ॥ १ ॥
गोवर्धन जेणें नखीं हो धरिला । काळ्या नाथिला महाबळी ॥ २ ॥
ऐसे हरिगुण गातो वाचेवरी । पतितासी तारी जनार्दन ॥ ३ ॥
तुका ह्मणे हेंचि सज्जना जीवन । वाचेसी स्मरण गोविंदाचें ॥ ४ ॥

॥ ४०९३ ॥

चवदा भुवनें जयाचिये पोटीं । तोचि आह्मी कंठीं साटविला ॥१॥
काय एक उणें आमुचिये घरीं । वोळगती द्वारीं रिद्धिसिद्धी ॥२॥
असुर जयानें घातले तोरडीं । तो आह्मांसि जोडी कर दोन्ही ॥३॥
रूप नाहीं रेखा जयासि आकार । आह्मीं तो साकार भक्तीं केला ॥४॥
अनंत ब्रह्मांडें जयाचिये अंगीं । समान तो मुंगी आह्मासाटीं ॥५॥
तुका ह्मणे आह्मी देवाहूनि बळी। जालों हे निराळी ठेवुनि आशा ॥६॥

॥ ४०९४ ॥

जननी हे जाणे बाळकाचें वर्म । सुखदुःख धर्म जें जें कांहीं ॥ १ ॥
अंधापुढें जेणें दिधला आधार । त्याचा हा विचार तोचि जाणे ॥२॥
शरणागता जेणें घातलें पाठीशीं । तो जाणें तेविशीं राखों तया ॥ ३ ॥
कासे लागे तया न लगती सायास । पोहोणारा त्यास पार पावी ॥४॥
तुका ह्मणें जीव विठ्ठलाचे हातीं । दिला त्याची गति तोचि जाणे ॥५॥

॥ ४०९५ ॥

जरि हे आड येती लाज । कैसें काज साधतें ॥१॥ करणें केलें उठा-

उठी । पायीं मिठी घातली ॥ २ ॥ समर्पिला जीव भाव । धरिला भाव अखंड ॥३॥ तुका ह्मणे आड कांहीं । काळ नाहीं घातला ॥४॥

॥ ४०९६ ॥

जाऊं देवाचिया गांवा । देव देईल विसांवा ॥ १ ॥ देवा सांगों सुख दुःख । देव निवारील भूक ॥ २ ॥ घालूं देवासीच भार । देव सुखाचा सागर ॥ ३ ॥ राहों जवळी देवापाशीं । आतां जडोनि पायांसी ॥४॥ तुका ह्मणे आह्मी बाळें । या देवाचीं लडिवाळें ॥५॥

॥ ४०९७ ॥

जालें भांडवल । अवघा पिकला विठ्ठल ॥ १ ॥ आतां वाणी काशा-साटीं । धीर धरावाच पोटीं ॥ २ ॥ आपुल्या संकोचें । ह्मणऊनि तेथें टांचे ॥ ३ ॥ घेतों खऱ्या मापें । तुका देखोनियां सोपें ॥ ४ ॥

॥ ४०९८ ॥

जाळी महा कर्में । दावी निजसुख वर्में ॥ १ ॥ ऐसें कळलें आह्मां एक । जालों नामाचे धारक ॥ २ ॥ तपाचे सायास । नलगे ध्यावा वनवास ॥ ३ ॥ तुका ह्मणे येणें । कळिकाळ हें ठेंगणें ॥ ४ ॥

॥ ४०९९ ॥

जिव्हे जाला चळ । नेघे अवसान ते पळ ॥ १ ॥ हेंचि वोसनावोनी उटी । देव सांटविला पोटीं ॥२॥ नाहीं ओढा वारा । पडिला प्रसंग तो बरा ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाली । मज हे अनावरु बोली ॥ ४ ॥

॥ ४१०० ॥

जे गाती अखंड विठ्ठलाचें गीत । त्यांचे पायीं चित्त ठेवीन मी ॥१॥ जयांसी आवडे विठ्ठलाचें नाम । ते माझे परम प्राणसखे ॥ २ ॥ जयांसी विठ्ठल आवडे लोचनीं । त्यांचें पायवणी स्वीकारीन ॥ ३ ॥ विठ्ठलासी जिहीं दिला सर्व भाव । त्यांच्या पायीं ठाव मागईन ॥४॥ तुका ह्मणे रज होईन चरणींचा । ह्मणविती त्यांचा हरिचे दास ॥५॥

॥ ४१०१ ॥

जेथें लक्ष्मीचा वास । गंगा आली पापानास ॥ १ ॥ तें म्यां हृदयीं धरिलें । ताप हरण पाउलें ॥२॥ सेवा केली संतजनीं । सुखें राहिले लपोनी ॥ ३ ॥ तुका ह्मणे वांकी । भाट जाली तिहीं लोकीं ॥ ४ ॥

॥ ४१०२ ॥

जेविले ते संत मागें उष्टावळी । अवघ्या पत्रावळी करुनी झाडा ॥१॥
सोंवळ्या ओंवळ्या राहिलों निराळा । पासूनि सकळां अवघ्यां दुरीं ॥२॥
परें परतें मज न लगे सांगावें । हें तों देवें बरें शिकविलें ॥ ३ ॥
दुसऱ्यातें आह्मी नाहीं आतळत । जाणोनि संकेत उभा असे ॥ ४ ॥
येथें कोणीं कांहीं न धरावी शंका । मज चाड एका भोजनाची ॥ ५ ॥
लांचावला तुका मारितसे झड । पुरविलें कोड नारायणें ॥ ६ ॥

॥ ४१०३ ॥

ज्यानें आड यावें कांहीं । त्याचें नाहीं बळ आतां ॥ १ ॥ मन येथें साह्य जालें । हरिच्या धालें गुणवादीं ॥ २ ॥ चुकुर तो गेला काळ । जालें बळ संगाचें ॥३॥ तुका ह्मणे धरूं सत्ता । होईल आतां करूं तें ॥४॥

॥ ४१०४ ॥

डोळां भरियलें रूप । चित्तीं[1] पायांचा संकल्प ॥ १ ॥ अवघी घातली वांटणी । प्रेम राहिलें कीर्तनीं ॥ २ ॥ वाचा केली माप । राशीं हरि-नाम अमुप ॥ ३ ॥ भरूनियां भाग । तुका बैसला पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ४१०५ ॥

तपासी तें मन करूं पाहे घात । धरोनि सांगात इंद्रियांचा ॥ १ ॥
ह्मणोनि कीर्तन आवडलें मज । सांडोनियां लाज हेंचि करीं ॥ २ ॥
पाहातां आगमानिगमाचा[2] ठाव । तेथें नाहीं भाव एकविध ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें नाहीं वो विकार । नाम एक सार विठोबाचें ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ चित्ता पायांपें संकल्प. २ आगमानिगमाचे.

॥ ४१०६ ॥

तरीच म्यां देवा । साटी करूनियां जीवा ॥ १ ॥ येथें बैसलों[1] धरणें । दृढ कायावाचामनें ॥ २ ॥ आवरिल्या वृत्ति । मन घेऊनियां हातीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे जरा । बाहेर येऊं नेदीं घरा ॥ ४ ॥

॥ ४१०७ ॥

तीर्थीची अपेक्षा स्थळीं वाढे धर्म । जाणावें तें वर्म बहु पुण्य ॥ १ ॥
बहु बरी ऐसी भाविकांची जोडी । काळ नाहीं घडी जात वांयां ॥ २ ॥
करूनि चिंतन करवावें आणिकां । तो या जाला लोकां नाव जगीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे ऐसे परउपकारी । त्यांच्या पायांवरी डोई माझी ॥ ४ ॥

॥ ४१०८ ॥

तोंवरि तोंवरि जंबुक करि गर्जना । जंव त्या पंचानना देखिलें नाहीं ॥ १ ॥
तोंवरि तोंवरि सिंधु करि गर्जना । जंव त्या अगस्तिब्राह्मणा देखिलें नाहीं २
तोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टी पडिली नाहीं ३
तोंवरि तोंवरि शूरत्वाच्या गोष्टी।जंव परमाईचा पुत्र दृष्टी देखिला नाहीं ४
तोंवरि तोंवरि माळामुद्रांचीं भूषणें । जंव तुक्याचें दर्शन जालें नाहीं ॥५॥

॥ ४१०९ ॥

तोंवरि तोंवरि शोभतील गारा । जंव नाहीं हिरा प्रकाशला ॥ १ ॥
तोंवरि तोंवरि शोभती दीपिका । नुगवतां एका भास्करासी ॥ २ ॥
तोंवरि तोंवरि सांगती संताचिया गोष्टी । जंव नाहीं भेटी तुक्यासवें ॥३॥

॥ ४११० ॥

दिनरजनीं ह्याचि धंदा । गोविंदाचे पवाडे ॥ १ ॥ संकल्पिला देह देवा । सकळ हेवा तयेठायीं ॥ २ ॥ नाहीं अवसान घडी । सकळ जोडी इंद्रियां ॥ ३ ॥ कीर्ति मुखें गर्जे तुका । करी लोकां सावध ॥४॥

---

पाठभेदः—१ बैसली.

॥ ४१११ ॥

देवकीनंदनें । केलें आपुल्या चिंतनें ॥ १ ॥ मज आपुलिया ऐसें । मना लावूनियां पिसें ॥ २ ॥ गोवळे गोपाळां । केलें लावूनियां चाळा ॥ ३ ॥ तुका ह्मणे संग । केला दुरि नव्हे मग ॥ ४ ॥

॥ ४११२ ॥

देव तिळीं आला । गोडें गोड जीव धाला ॥ १ ॥ साधला हा पर्व-काळ । गेला अंतरींचा मळ ॥ २ ॥ पापपुण्य गेलें । एका स्नानेंचि [1]खंडिलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाणी । शुद्ध जनार्दनीं जनीं ॥ ४ ॥

॥ ४११३ ॥

देवाचें निर्माल्य कोण शिवे हातीं । संकल्पासी होती विकल्प ते ॥ १ ॥ वाहिलें देह हें देवा एकसरें । होईल तें बरें तेणें द्वारें ॥ २ ॥ होता भार त्याची निवारली खंती । येथें आतां रिती साटवण ॥३॥ तुका ह्मणे इच्छे पावविले कष्ट । ह्मणऊनि नष्ट दुरावली ॥ ४ ॥

॥ ४११४ ॥

देवावरिल भार । काढूं नये कांहीं पर ॥ १ ॥ तानभुके आठवण । घडे तें बरें चिंतन ॥ २ ॥ देखावी निश्चिंती । तेचि अंतर श्रीपती ॥ ३ ॥ वैभव सकळ । तुका मानितो विटाळ ॥ ४ ॥

॥ ४११५ ॥

देवें जीव धाला । संसार तो कडू जाला ॥ १ ॥ तेचि येतील ढेंकर । आनंदाचे हरिहर ॥ २ ॥ वेधी आणिकांस । ऐसा जया अंगीं कस ॥ ३ ॥ तुका ह्मणे भूक । येणें न लगे आणीक ॥ ४ ॥

॥ ४११६ ॥

देहभाव आह्मी राहिलों ठेवूनि । निवांत चरणीं विठोबाच्या ॥ १ ॥ आमुच्या हिताचा जाणोनि उपाव । तोचि पुढें देव करीतसे ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ खुंटलें.

ह्मणउनी नाहीं सुख दु:ख मनीं । ऐकिलिया कानीं वचनाचें ॥ ३ ॥
जालों मी नि:संग निवांत एकला । भार त्या विठ्ठला घालूनियां ॥४॥
तुका ह्मणे जालों जयाचे अंकित । तोचि माझें हित सर्व जाणे ॥ ५ ॥

॥ ४११७ ॥

दैन्य दु:ख आह्मां न येती जवळी । दहन हे होळी होती दोष ॥ १ ॥
सर्व सुखें येती मानें लोटांगणीं । कोण यांसी आणी दृष्टीपुढें ॥ २ ॥
आमुची आवडी संतसमागम । आणीक त्या नाम विठोबाचें ॥ ३ ॥
आमचें मागणें मागों त्याची सेवा । मोक्षाची निर्देवा कोणा चाड ॥ ४ ॥
तुका ह्मणे पोटीं सांटविला देव । न्यून तो हा भाव कोण आह्मां ॥५॥

॥ ४११८ ॥

दोहीं बाहीं आह्मां वास । असों कास घालूनि ॥ १ ॥ बोल बोलों उभयतां । स्वामीसत्ता सेवेची ॥ २ ॥ एकसरें आज्ञा केली । असों चाली ते नीती ॥ ३ ॥ तुका ह्मणे जोहारितों । आहें होतों ते ठायीं ॥ ४ ॥

॥ ४११९ ॥

द्रव्याचा तो आह्मी धरितों विटाळ । तया पाठीं काळ लाग करी ॥ १ ॥
करोनियां हेंचि राहिलों जीवन । एक नारायण नाम ऐसें ॥ २ ॥
तुका ह्मणे हेंचि करूनि जतन । आलिया ही दान याचकासी ॥ ३ ॥

॥ ४१२० ॥

धर्म रक्षावयासाटीं । करणें आटी आह्मांसी ॥ १ ॥ वाचा बोलों वेद-नीती । करूं संतीं केलें तें ॥ २ ॥ न बाणतां स्थिति अंगीं । कर्म त्यागी लंड तो ॥ ३ ॥ तुका ह्मणे अधम त्यासी । भक्ति दूषी हरीची ॥ ४ ॥

॥ ४१२१ ॥

धर्माचें पाळण । करणें पाषांड खंडण ॥ १ ॥ हेंचि आह्मां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥ २ ॥ तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरें ॥ ३ ॥ नाहीं भीड भार । तुका ह्मणे साना थोर ॥ ४ ॥

॥ ४१२२ ॥

धरावें तों भय । अंतरोनि जाती पाय ॥ १ ॥ जाल्या तुटी देवासवें । काय वांचोनि करावें ॥ २ ॥ कोणासी पारिखें । लेखूं आपणासारिखें ॥ ३ ॥ तुका ह्मणे असो । अथवा हें आतां नसो ॥ ४ ॥

॥ ४१२३ ॥

धरिलीं जीं होतीं चित्तीं । डोळां तींचे[1] दिसती ॥ १ ॥ आलें आवडीसी फळ । जालें कारण सकळ ॥ २ ॥ घेईन भातुकें । मागोनियां कवतुकें ॥ ३ ॥ तुका ह्मणे लाड । विठोबा पुरवील कोड ॥ ४ ॥

॥ ४१२४ ॥

धरोनि दोन्ही रूपें पाळणें संहार । करी कोप रुद्र दयाळ विष्णु ॥१॥
जटाजूट एका मुगुट माथां शिरीं । कमळापति गौरीहर एक ॥ २ ॥
भस्मउद्धळण लक्ष्मीचा भोग । शंकर श्रीरंग उभयरूपीं ॥ ३ ॥
वैजयंती माळा वासुगीचा हार । लेणें अळंकार हरिहरा ॥ ४ ॥
कपाळ झोळी एका स्मशानींचा वास । एक जगन्निवास विश्वंभर ॥५॥
तुका ह्मणे मज उभयरूपीं एक । सारोनि संकल्प शरण आलों ॥ ६ ॥

॥ ४१२५ ॥

धन्य देहूं गांव पुण्यभूमि ठाव । तेथें नांदे देव पांडुरंग ॥ १ ॥
धन्य क्षेत्रवासी लोक ते दैवाचे । उच्चारिती वाचे नामघोष ॥ २ ॥
कर कटी उभा विश्वाचा जनिता । वामांगीं ते माता रखुमादेवी ॥३॥
गरुड पारीं उभा जोडुनियां कर । अश्वत्थ समोर उत्तरामुख ॥ ४ ॥
दक्षिणे शंकर लिंग हरेश्वर । शोभे गंगानीर[2] इंद्रायणी ॥ ५ ॥
लक्ष्मी नारायण बल्लाळाचें बन । तेथें अधिष्ठान सिद्धेश्वर ॥ ६ ॥

पाठभेदः—१ तेचि. २ गंगातीर.

विघ्नराज द्वारीं बहिरव बाहेरी । हनुमंत शेजारीं सहित दोघे ॥ ७ ॥ तेथें दास तुका करितो कीर्तन । हृदयीं चरण विठोबाचे ॥ ८ ॥

॥ ४१२६ ॥

नका मजपाशीं । वदों प्रपंचाचे विशीं ॥ १ ॥ आतां नाइकावी कानीं । मज देवाविण वाणी ॥ २ ॥ येऊनियां रूपा । कोण पाहे पुण्यपापा ॥ ३ ॥ मागें आजिवरी । जालें माप नेलें चोरीं ॥ ४ ॥ खांडियेलीं पानें । पुढें पिका अवलोकन ॥ ५ ॥ पडों नेदी तुका । आड गुंपूं कांहीं चुका ॥ ६ ॥

॥ ४१२७ ॥

नको ऐसें जालें अन्न । भूक तान ते गेली ॥ १ ॥ गोविंदाची आवडी जीवा । करीन सेवा धणीवरी ॥ २ ॥ राहिलें तें राहो काम । सकळ धर्म देहींचे ॥ ३ ॥ देह धरिला त्याचें फळ । आणीक काळ धन्य हा ॥ ४ ॥ जाऊं नेदीं करितां सोस । क्षमा दोष करवीन ॥ ५ ॥ तुका ह्मणे याच पाटी । आतां साटी जीवाची ॥ ६ ॥

॥ ४१२८ ॥

न पडो आतां हाडीं घाव । मध्यें कींव नाशीक[1] ॥ १ ॥ करविली आत्महत्या । जीवा कां त्या द्वंद्वाच्या ॥ २ ॥ आशापाशीं गुंतलों गळा । तेणें कळाहीन जालों ॥ ३ ॥ तुका ह्मणे लावूं मुळी । जीवकुळी थारेसी ॥ ४ ॥

॥ ४१२९ ॥

नये पुसों आज्ञा केली एकसरें । आह्मांसी दुसरें आतां नाहीं ॥ १ ॥ ज्यांचे[2] तो बळिवंत सर्व निवारिता । आह्मां काय चिंता करणें लागे ॥२॥ बुद्धीचा जनिता विश्वाचा व्यापक । काय नाहीं एक अंगीं तया ॥३॥ तुका ह्मणे मज होईल वारिता । तरी काय सत्ता नाहीं हातीं ॥ ४ ॥

पाठभेदः—१ नासक, २ ज्याचा.

॥ ४१३० ॥

नव्हती भेटी तोंचि बरें । होतां चोरें नाडिलें ॥ १ ॥ अवघियांचा केला झाडा । रिता वाडा खोंकर ॥ २ ॥ चिंतनाचें मूळ चित्त । नेलें वित्त हरूनि ॥३॥ तुका ह्मणे मूळा आलें । होतें केलें तैसेंचि ॥ ४ ॥

॥ ४१३१ ॥

नव्हतों सावचित । तेणें अंतरलें हित ॥ १ ॥ पडिला नामाचा विसर । वाढविला संवसार ॥ २ ॥ लटिक्याचे पुरीं । वाहोनियां गेलों दुरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाव । आह्मां सांपडला भाव ॥ ४ ॥

॥ ४१३२ ॥

न संडावा ठाव । ऐसा निश्चयाचा भाव ॥ १ ॥ आतां पुरे पुन्हा यात्रा । हेंचि सारूनि सर्वत्रा ॥ २ ॥ संनिधचि सेवा । असों करूनियां देवा ॥ ३ ॥ आज्ञेच्या पाळणें । असें तुका संतां ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४१३३ ॥

नाचावेंसें वाटे मना । छंद गुणा अधीन ॥ १ ॥ चेष्टविलीं माझीं गात्रें । सत्तासूत्रें हालतीं ॥ २ ॥ नामरूपें रंगा आलीं । तेचि चाली स्वभावें ॥ ३ ॥ तुका ह्मणे पांडुरंगे । अंग संगें कवळिलें ॥ ४ ॥

॥ ४१३४ ॥

नाहीं दिलें कधीं कठिण उत्तर । तरी कां अंतर पडियेलें ॥ १ ॥
ह्मणऊनि आतां वियोग न साहे । लांचावलें देहे संघट्टणें ॥ २ ॥
वेळोवेळां वाचे आठवितों नाम । अधिकचि प्रेम चढे घेतां ॥ ३ ॥
तुका ह्मणे पांडुरंगे जननिये । घेऊनि कडिये बुझाविलें ॥ ४ ॥

॥ ४१३५ ॥

नाहीं मज कृपा केली पांडुरंगें । संताचिया संगें पोट भरीं ॥ १ ॥
चतुराचे सभे पंडित कुशळ । मी काय दुर्बळ विष्णुदास ॥ २ ॥
तुका ह्मणे नेणें करूं समाधान । धरिले चरण विठोबाचे ॥ ३ ॥

॥ ४१३६ ॥

नाहीं म्यां वंचिला मंत्र कोणापाशीं । राहिलों जीवेंसी[1] धरूनियां ॥ १ ॥
विटेवरी भावें ठेवियेलें मन । पाउलें समान चिंतीतसें ॥ २ ॥
पावविलों पार धरिला विश्वास । घालूनियां कास बळकट ॥ ३ ॥
तुका ह्मणे मागें पावले उद्धार । तिहीं हा आधार ठेविलासे ॥ ४ ॥

॥ ४१३७ ॥

नाहीं त्रिभुवनीं सुख या समान । ह्मणऊनि मन स्थिरावलें ॥ १ ॥
धरियेलीं जीवीं पाउलें कोमळीं । कंठीं[2] एकावळी नाममाळा ॥ २ ॥
शीतळ होऊनियां पावलों विश्रांती । न साहे पुढतीं घाली चित्ता ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाले सकळ सोहळे । पुरविले डोहळे पांडुरंगें ॥ ४ ॥

॥ ४१३८ ॥

निरोधाचें मज न साहे वचन । बहु होतें मन कासावीस ॥ १ ॥
ह्मणऊनि जीवा न साहे संगति । बैसतां एकांतीं गोड वाटे ॥ २ ॥
देहाची भावना वासनेचा संग । नावडे उबग आला यांचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे देव अंतरे यामुळें । आशामोहजाळें दुःख वाढे ॥ ४ ॥

॥ ४१३९ ॥

नेणें अर्थ कांहीं नव्हती माझे बोल । विनवितों कोपाल संत झणी ॥ १ ॥
नव्हती माझे बोल बोले पांडुरंग । असे अंगसंगें व्यापूनियां ॥ २ ॥
मज मूढा शक्ति कैंचा हा विचार । निगमादिकां पार बोलावया ॥ ३ ॥
राम कृष्ण हरी मुकुंदा मुरारि । बोबड्या उत्तरीं हेंचि ध्यान ॥ ४ ॥
तुका ह्मणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगें भार घेतला माझा ॥ ५ ॥

॥ ४१४० ॥

नेणें जप तप अनुष्ठान याग । काळें तंव लाग घेतलासे ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ जीवासीं धरूनि तो. २ केली.

रिघालों या भेणें देवाचे पाठीसीं । लागे त्याचें त्यासी सांभाळणें ॥ २ ॥
मापें पापं सळे चालिली चढती । जाली मग राती काय चाले ॥३॥
तुका ह्मणे चोरा हातीं जें वांचलें । लाभावरी आलें वारिलेशु ॥ ४ ॥

॥ ४१४१ ॥

न्यावयासी मूळ पाठवील कधीं । मज कृपानिधि पांडुरंग ॥ १ ॥
प्राण फुटे माझा त्याचिया वियोगें । घडी जाय युगे येकी येकी ॥ २ ॥
त्याचिये गांवींची आवड ती जीवा । जीव हा सांडावा वोवाळुनी ॥ ३ ॥
दिनो दिन चिंता वाटते बहूत । नावडे संचित करावें हें ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां आहे तेंचि सरो । कोण करी भरोवरी मग ॥ ५ ॥

॥ ४१४२ ॥

पडिलों भोवेंणीं । होतों बहु चिंतवेंणी ॥ १ ॥ होतों चुकलों मारग । लाहो केला लाग वेग ॥ २ ॥ इंद्रियांचे संदी । होतों सांपडलों बंदीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे बरें जालें । विठ्ठलसें वाचे आलें ॥ ४ ॥

॥ ४१४३ ॥

पढीयंतें मागा पांडुरंगापाशीं । मज दुर्बळासी काय पीडा ॥ १ ॥
याचसाटीं दुराविला संवसार । वाढे हे अपार माया तृष्णा ॥ २ ॥
कांहीं करितां कोठें नव्हे समाधान । विचारितां पुण्य तेंचि पाप ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां निश्चळचि भलें । तुज आठविलें पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ४१४४ ॥

पसरोनि मुखें । कैसे धालों बा हारीखें ॥१॥ ब्रह्मादिका दुर्लभ वांटा । आह्मां फावला राणटा ॥२॥ गोड लागे काय तरि । कृपावंत जाला हरी ॥३॥ उडती थेंबुटें । अमृताहुनि गोमटें ॥४॥ गोडाहुनि गोड । जिव्हा नाचे वाटे कोड ॥५॥ खुणावुनि तुका । दावी वर्म बोलों नका ॥६॥

---

पाठभेदः—१ माप. २ भोवनीं. ३ चिंतवनीं.

॥ ४१४५ ॥

पाप पुण्य दोन्ही वाह्याती मारग । स्वर्गनर्क भोग यांचीं पेणीं ॥ १ ॥
एका आड एक नलगे पुसावें । जेविल्या देखावें मागें भूक ॥ २ ॥
रहाटीं पडिलें भरोनियां रितीं । होतील मागुतीं येतीं जातीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी खेळतियां मधीं । नाहीं केली बुद्धि स्थिर पाहों ॥ ४ ॥

॥ ४१४६ ॥

पाववावें ठाया । ऐसें सवें बोलों तया ॥ १ ॥ भावा ऐसी क्रिया
राखे । खोट्या खोटेपणें वाखे ॥ २ ॥ न ठेवूं अंतर । कांहीं भेदाचा
पदर ॥ ३ ॥ तुका ह्मणे जीवें भावें । सत्य[1] मानवीजे देवें ॥ ४ ॥

॥ ४१४७ ॥

पावलों प्रसाद इच्छा केली तैसी । जालें या चित्तासी समाधान ॥ १ ॥
मायबाप माझा उभा कृपादानी । विटे सम जोडोनि पादांबुजें ॥ २ ॥
सांभाळासी येऊं नेदीच उणीव । अधिकारगौरव राखे तैसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे सर्व अंतर्बाह्य आहे । जया तैसा राहे कवळुनी ॥ ४ ॥

॥ ४१४८ ॥

पाहातां श्रीमुख सुखावलें सुख । डोळियांची भूक न वजे माझ्या[2] ॥ १ ॥
जिव्हे गोडी[3] तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिकें पुढें ॥ २ ॥
श्रवणीची वाट चोखाळली शुद्ध । गेले भेदाभेद वारोनियां ॥ ३ ॥
महामळें मन होतें जें गांदलें । शुद्ध चोखाळलें स्पटिक जैसें ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझ्या जीवाचें जीवन । विठ्ठल निधान सांपडलें ॥ ५ ॥

॥ ४१४९ ॥

पाळियेले ळळे । माझे विठ्ठले कृपाळे ॥ १ ॥ बहुजन्मांचें पोसणें ।
सरतें पायांपाशीं तेणें ॥ २ ॥ सर्वे दिली लागों । भातें आवडीचें
मागों ॥ ३ ॥ तुका ह्मणे भिन्न । नाहीं दिसों दिलें क्षण ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ सत्या पावविजे. २ माझी. ३ गोड.

॥ ४१५० ॥

पाळिला विध तो आजि फळा आला। ऐसा हा कळला साच भाव ॥ १ ॥
नामाची आवडी लागलीसे चित्ता। पाय आठवितां सुख वाटे ॥ २ ॥
धरिल्या देहाचें साधलें कारण। पुढिल्या खंडण गर्भवासा ॥ ३ ॥
तुका ह्मणे लाभ जाला एकसरें। आणिक दुसरें नाहीं आतां ॥ ४ ॥

॥ ४१५१ ॥

पाळुंनियां मोठे केले। त्यासी बोलें बोळखी ॥ १ ॥ जवळुनी नवजे दुरी। लाडें करी कवतुक ॥ २ ॥ खुण उभा विटेवरी। कट करीं धरियेले ॥ ३ ॥ तुका ह्मणे घातली वरी। झुली थोरी मोलाची ॥ ४ ॥

॥ ४१५२ ॥

पुसावेंसें हेंचि वाटे। जें जें भेटे तयासी ॥ १ ॥ देव कृपा करील मज। काय लाज राखील ॥ २ ॥ अवघियांचा विसर जाला। हा राहिला उद्योग ॥ ३ ॥ तुका ह्मणे चिंता वाटे। कोण भेटे सांगेसें ॥ ४ ॥

॥ ४१५३ ॥

पुष्ट कांति निवती डोळे। हे सोहळे श्रीरंगीं ॥ १ ॥ अंतर्बाहीं विलेपन। हें भूषण मिरवूं ॥ २ ॥ इच्छेऐसी आवड पुरे। विश्वंभरे जवळीं ॥ ३ ॥ तुका करी नारायण। या या सेवन नामाचें ॥ ४ ॥

॥ ४१५४ ॥

पोट धालें आतां जीवनीं आवडी। पुरवावे परवडी बहुतांचे ॥ १ ॥
काय आंचवणा तांतडीचें काम। मागीलां श्रम न पवीं ॥ २ ॥
वाढितिया पोटीं बहु असे वाव। सांभाळितां ठाव काय वेचे² ॥ ३ ॥
दाविल्यावांचूनि नाहीं कळों येत। तथेंही दुश्चित एकपणें ॥ ४ ॥
नावेचा भार तो उदकाचे शिरीं। काय हळू भारी तये ठायीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे गीतीं गाऊनि गोविंद। करूं ब्रह्मानंद एकसरें ॥ ६ ॥

---

पाठभेदः—१ पाळुनिआं गोमटें। त्याच्या बोलें बोळखी. २ वांचे. ३ एकपण.

॥ ४१५५ ॥

प्रेमसूत्र दोरी । नेतो तिकडे जातों हरी ॥ १ ॥ मनेंसहित वाचा काया । अवघें दिलें पंढरीराया ॥ २ ॥ सत्ता सकळ तया हातीं । माझी कींव काकुलती ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठेवी तैसें । आह्मी राहों त्याचे इच्छे ॥ ४ ॥

॥ ४१५६ ॥

बरवयांबरवंट । विटे चरण सम नीट ॥ १ ॥ ते म्यां हृदयीं धरिले । तापशमन पाउलें ॥ २ ॥ सकळ तीर्थां अधिष्ठान । करी लक्ष्मी संवाहन ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंतीं । ठाव मागितला संतीं ॥ ४ ॥

॥ ४१५७ ॥

बरवें[1] जालें आलों ज्याचीं त्याच्या घरा । चुकला पान्हेरा[2] ओढाळांचा॥१॥
बहु केले दुःखी त्यांचिया सांभाळें । आतां तोंड काळें तेणें लोभें ॥ २ ॥
त्यांचिया अन्यायें भोगा माझें अंग । सकळ ही लाग द्यावा लागे ॥३॥
नाहीं कोठें स्थिर राहों दिलें क्षण । आजिवरी सिण पावलों तो ॥ ४ ॥
वेगळाल्या खोडी केली तडातडी । सांगावया घडी नाहीं सुख ॥ ५ ॥
निरवूनि तुका चालिला गोवारें । देवापाशीं भार सांडवूनि ॥ ६ ॥

॥ ४१५८ ॥

बळिवंत आह्मी समर्थाचे दास । घातली या कास कळिकाळासी ॥१॥
तेथें मानसाचा कोण आला पाड । उलंघोनि जड गेलों आधीं ॥२॥
संसाराचे बळी साधिलें निधान । मारिले दुर्जन षड्वर्ग ॥ ३ ॥
तुका ह्मणे एक उरला धरिता ठाव । येर केलें वाव तृणवत ॥ ४ ॥

॥ ४१५९ ॥

बळियाचे अंकित । आह्मी जालों बळिवंत ॥ १ ॥ लाता[3] ह्मणोनि संसारा । केला षड ऊर्मीचा मार्ग[4] ॥२॥ जन धन तन । केलें तृणाही समान ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां । आह्मी मुक्तीचिया माथां ॥ ४ ॥

---

पाठभेद:—१ बरें. २ पान्हेरा. ३ लाताळिला संसार. ४ मार.

॥ ४१६० ॥

बळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग । नाहीं जाला त्याग अंतरींचा ॥ १ ॥
ऐसें येतें नित्य माझ्या अनुभवा । मनासी हा ठावा समाचार ॥ २ ॥
जागृतीचा नाहीं अनुभव सपनीं । जातों विसरूनि सकळ हें ॥ ३ ॥
प्रपंचाबाहेरि नाहीं आलें चित्त । केलें करी नित्य वेवसाय ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज भोरप्याचि परी । जालें सोंग वरी आंत तैसें ॥ ५ ॥

॥ ४१६१ ॥

बहु कृपावंतें माझीं मायबापें । मी माझ्या संकल्पें अंतरलों ॥ १ ॥
संचितानें नाहीं चुकों दिली वाट । लाविलें अदृष्ट मजसवें ॥ २ ॥
आतां मी रुसतों न कळतां वर्म । परी ठावे धर्म सर्व देवा ॥ ३ ॥
तुका ह्मणे उभा राहिला न बैसे । आमुची माय असे उद्वेग त्या॥४॥

॥ ४१६२ ॥

बहुजन्म[1] केला लाग । तो हा भाग लाधलों ॥ १ ॥ जीव देइन हा बळी । करीन होळी संसारा ॥ २ ॥ गेलें मग नये हातां । पुढती चिंता वाटतसे ॥३॥ तुका ह्मणे तांतड करूं । पाय धरूं बळकट ॥४॥

॥ ४१६३ ॥

बहु बरें एकाएकीं । संग चुकी करावा ॥ १ ॥ ऐसें बरें जालें ठावें। अनुभवें आपुलया ॥ २ ॥ सांगावें तें काम मना । सलगी जना नेदावी ॥ ३ ॥ तुका ह्मणे निघे अगी । दुजे संगीं आतळतां ॥ ४ ॥

॥ ४१६४ ॥

बाळ काय जाणे जीवनउपाय । मायबाप वाहे सर्व चिंता ॥ १ ॥
आइतें भोजन खेळणें अंतरीं । अंकिताचे शिरीं भार नाहीं ॥ २ ॥
आपुलें शरीर रक्षितां न कळे । सांभाळूनि लळे पाळी माय ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझा विठ्ठल जनिता । आमुची ते सत्ता तयावरी ॥ ४ ॥

---

पाठभेद—१ बहुजन्में.

॥ ४१६५ ॥

बुद्धीचा जनिता लक्ष्मीचा पति । आठवितां चित्तीं काय नव्हे ॥१॥
आणिकां उपाया कोण वांटी मन । सुखाचें निधान पांडुरंग ॥ २ ॥
गीतीं[1] गात्रों नाचों छंदें वाहों[2] टाळी । वैष्णवांचे मेळीं सुखरूप ॥३॥
अनंत ब्रह्मांडें एके रोमावळी । आह्मी केला भोळीं भावें उभा ॥४॥
लटिका हा केला संवसारसिंधु । मोक्ष स्वर्ग बंधु नाहीं पुढें ॥ ५ ॥
तुका ह्मणे ज्याच्या नामाचे अंकित । राहिलों निश्चितें[3] त्याच्या बळें ॥६॥

॥ ४१६६ ॥

बैसोनियां खाऊं जोडी । ओढाओढी चुकवूनि ॥ १ ॥ ऐसें केलें नारायणें । बरवें जिणें सुखाचें ॥ २ ॥ परांच्या घरीं भांडवल । नलगे बोल वेचावे ॥३॥ तुका ह्मणे आटाआटी । चुकली दाटी सकळ ॥ ४ ॥

॥ ४१६७ ॥

बोलणें तें आह्मी बोलों उपयोगीं । पडिलें प्रसंगीं काळाऐसें ॥ १ ॥
जयामध्यें देव आदि मध्यें अंतीं । खोल पाया भिंती न खचेसी ॥ २ ॥
करणें तें आह्मी करूं एका वेळे । पुढिलिया बळें वाढी खुंटे ॥ ३ ॥
तुका ह्मणे असों आज्ञेचीं धारकें । ह्मणउनि एकें घायें सारूं ॥ ४ ॥

॥ ४१६८ ॥

बोलविलें जेणें । तोचि त्यांचें[4] गुह्य जाणे ॥ १ ॥ मी तों काबाडाचा धनी । जेवूं मागावें थिंकोनि ॥ २ ॥ मजुराच्या हातें । मापें केलें जालें रितें[5] ॥ ३ ॥ जाला पुरविता । पांडुरंग माझा पिता ॥ ४ ॥ मायबापासवें । बाळें कौतुकें खेळावें ॥ ५ ॥ जैसा करिती धंदा । तैसा पडोनियां छंदा ॥ ६ ॥ त्याच्या साच गाई ह्मैसी । येणें खेळावें मातीशीं ॥ ७ ॥ तुका ह्मणे बोल । माझा बोलतो विठ्ठल ॥ ८ ॥

॥ ४१६९ ॥

बोलाल या आतां आपुल्यापुरतें । मज या अनंतें गोविंयेलें ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ गीत. २ वावो. ३ निश्चित. ४ याचें. ५ माप जालें गेलें रितें.

झाडिला न सोडी हातींचा पालव । वेंधी वेधें जीव वेधियेला ॥ २ ॥
तुमचे ते शब्द कोरडिया गोष्टी । मज सर्वे मिठी अंगसंगें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मां होईल हे परी । अनुभव वरी येईल मग ॥ ४ ॥

॥ ४१७० ॥

बोले तैसा चाले । त्याचीं वंदीन पाउलें ॥ १ ॥ अंगें झाडीन अंगण । त्याचें दासत्व करीन ॥ २ ॥ त्याचा होईन किंकर । उभा ठाकेन जोडोनि कर ॥३॥ तुका ह्मणे चित्तीं देव । त्याचे चरणीं माझा भाव ॥४॥

॥ ४१७१ ॥

बोलावे म्हूण हे बोलतों उपाय । प्रवाहें[1] हें जाय गंगाजळ ॥ १ ॥
भाग्ययोगें कोणां घडेल सेवन । कैंचे येथें जन अधिकारी ॥ २ ॥
मुखीं देतां घांस पळवितीं तोंडें । अंगींचिया भांडे असुकानें ॥ ३ ॥
तुका ह्मणे पूजा करितों देवाची । आपुलिया रुची मनाचिये ॥ ४ ॥

॥ ४१७२ ॥

बोलावें तें आतां आह्मी अबोलणे । एकाचि वचनें सकळांसी ॥ १ ॥
मेघवृष्टि कांहीं न विचारी ठाव । जैसा ज्याचा भाव त्यासी फळे ॥ २ ॥
तुका ह्मणे नाहीं समाधानें चाड । आपणाही नाड पुढिलांसीं ॥ ३ ॥

॥ ४१७३ ॥

बंधनाचा तोडूं फांसा । देऊं आशा टाकोनि ॥ १ ॥ नाहीं तेंच घेतां शिरीं । होइल दुरी निजपंथ ॥ २ ॥ नाथिलेंचि माझें तुझें । कोण्ण वोझें वागवी ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंतराय । देवीं काय जिणें तें ॥ ४ ॥

॥ ४१७४ ॥

ब्रह्मादिक जया लाभासि ठेंगणे । बळिये आह्मी भले शरणागत ॥ १ ॥
कामनेच्या त्यागें भजनाचा लाभ । केला[2] पद्मनाभ सेवाऋणी ॥ २ ॥
कामधेनूचिया क्षीरा पार नाहीं । इच्छेचिये वाही वरुषावें ॥ ३ ॥
बैसलिये ठायीं लागलें भरतें । त्रिपुटीवरतें भेदी ऐसें ॥ ४ ॥

पाठभेदः—१ प्रवाह. २ जाला.

हांरि[1] नाहीं आह्मा विष्णुदासां जगीं । नारायण अंगीं विसावला ॥ ५ ॥
तुका ह्मणे बहु लाटे हें भोजन । नाहीं रिता कोण रहात राहों ॥ ६ ॥

॥ ४१७५ ॥

भक्ति आह्मी केली सांडुनी उद्वेग । पावलों हें सांग सुख याचें ॥ १ ॥
सुख आह्मां जालें धरितां याचा संग । पळाले उद्वेग सांडूनियां ॥ २ ॥
तुका ह्मणे सुख बहु जालें जिवा । घडली या सेवा विठोबाची ॥ ३ ॥

॥ ४१७६ ॥

भाग्यवंत आह्मी विष्णुदास जगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ॥ १ ॥
नाहीं तें पुरवीत आणूनि जवळी । गाउनी माउली गीत सुखें ॥ २ ॥
प्रीति अंगीं असे सदा सर्वकाळ । वोळलीं सकळ सुखें ठायीं ॥ ३ ॥
आपुल्या स्वभावें जैसे जेथें असों । तैसे तेथें दिसों साजिरेचि ॥ ४ ॥
वासनेचा कंद उपडिलें मूळ । दुरितें सकळ निवारिलीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे भक्तजनांची माउली । करील साउली विठ्ठल आह्मां ॥ ६ ॥

॥ ४१७७ ॥

भूत भविष्य कळों यावें वर्तमान । हें तों भाग्यहीन त्यांची जोडी ॥ १ ॥
आह्मीं विष्णुदासीं देव ध्यावा चित्तें । होणार तें होतें प्रारब्धें ॥ २ ॥
जगरुढीसाटीं घातलें दुकान । जातो नारायण अंतरोनि ॥ ३ ॥
तुका ह्मणे हा हो प्रपंच गाढा । थोरली ते पीडा रिद्धिसिद्धि ॥ ४ ॥

॥ ४१७८ ॥

भूतीं देव ह्मणोनि भेटतों या जना । नाहीं हे भावना नरनारी ॥ १ ॥
जाणे भाव पांडुरंग अंतरींचा । नलगे द्यावा साचा परिहार ॥ २ ॥
दयेसाटीं केला उपाधि पसारा । जड जीवा तारा नाव कथा ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं पडत उपवास । फिरतसे आस धरोनियां ॥ ४ ॥

॥ ४१७९ ॥

भोळे भाविक हे जुनाट चांगले । होय तैसें केलें भक्तिभावें ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ हरि.

ह्मणउनि चिंता नाहीं आह्मां दासां । न भ्यों गर्भवासा जन्म घेतां ॥ २ ॥
आपुलिया इच्छा करूं गदारोळ । भोगूं सर्वकाळ सर्व सुखें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां देवाचा सांगात । नाहीं विसंबत येरयेरां ॥ ४ ॥

॥ ४१८० ॥

मऊ मेणाहूनि आह्मी विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥
मेले जित असों निजोनियां जागे। जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥ २ ॥
भले तरि देऊं गांडीची लंगोटी। नाठ्याळाचे[1] काठी देऊं माथां ॥ ३ ॥
मायबापाहूनि बहु मायावंत । करूं घातपात शत्रूहूनि ॥ ४ ॥
अमृत तें काय गोड आह्मांपुढें । विष तें बापुडें कडू किती ॥ ५ ॥
तुका ह्मणे आह्मी अवघेचि गोड । जया पुरे कोड त्याचेपरी ॥ ६ ॥

॥ ४१८१ ॥

मन जालें भाट। कीर्ति मुखें घडघडाट । पडियेली वाट । येचि चाली स्वभावें ॥१॥ बोलें देवाचे पवाडे। नित्य नवेचि रोकडे। ज्या परी आवडे। तैसा तैसा करूनि ॥२॥ रोखीं रहावें समोर । पुढें मागें चाले भार । करावें उत्तर। सेवा रुजू करोनि ॥ ३ ॥ पूर वर्षला देकारें। संतोषाच्या अभयें करें। अंगींच्या उत्तरें। तुकया स्वामी शृंगारी॥४॥

॥ ४१८२ ॥

मागणें तें मागों देवा । करूं भक्ती त्याची सेवा ॥१॥ काय उणें तयापाशीं । रिद्धिसिद्धी ज्याच्या दासी॥ २ ॥ कायावाचामन। करूं देवा हें अर्पण॥ ३ ॥ तुका ह्मणे विश्वंभर । ज्याच्यानें हें चराचर ॥ ४ ॥

॥ ४१८३ ॥

मागें जैसा होता माझे अंगीं भाव। तैसा एक ठाव नाहीं आतां ॥१॥
ऐसें ग्वाही माझें मन मजपाशीं । तुटी मुदलेंसी दिसे पुढें ॥ २ ॥
पुढिलांचे मना आणी गुणदोष । पूज्य आपणांस करावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे जाली कोंबड्याची परी । पुढेंचि उकरी लाभ नेणें ॥ ४ ॥

पाठभेदः—१ नाठ्याळाचि गांठी.

॥ ४१८४ ॥

मागें बहुतां जन्मीं । हेंचि करित आलों आह्मी । भवताप श्रमीं । दुःखें पीडिलीं निववूं त्यां ॥ १ ॥ गर्जों हरिचे पवाडे । मेळवूं वैष्णव बागडे । पाझर रोकडे । काढूं पाषाणामध्यें ॥ २ ॥ भाव शुद्ध नामावळी । हर्षें नाचों पिटूं टाळी । घालूं पायां तळीं । कळिकाळ त्याबळें ॥ ३ ॥ कामक्रोध बंद[1]खाणी । तुका ह्मणे दिले दोन्ही । इंद्रियांचे धणी । आह्मी जालों गोसांवी ॥ ४ ॥

॥ ४१८५ ॥

माझिये बुद्धीचा खुंटला उपाय । करिसील काय पाहेन तें ॥ १ ॥
सूत्रधारी तूं हें सकळचाळिता । कासया अनंता भार वाहों ॥ २ ॥
वाहिले संकल्प न पवती सिद्धी । येऊं देहबुद्धीवरि नये ॥ ३ ॥
तुका ह्मणे दुःखी करिती तरंग । चिंतूं पांडुरंग आवरून ॥ ४ ॥

॥ ४१८६ ॥

सुखा मुखावाटा नयो हें वचन । व्हावें हें संतान द्रव्य कोणा ॥ १ ॥
फुकाचा विभाग पतनदुःखासी । दोहींमुळें त्यासी तेंचि साध्य ॥ २ ॥
नाइकावी निंदा स्तुति माझ्या कानें । सादर या मनें होऊनियां ॥ ३ ॥
तुका ह्मणे देव असाध्य यामुळें । आशामोहजाळें गुंतलिया ॥ ४ ॥

॥ ४१८७ ॥

मायामोहजाळीं होतों सांपडला । परि या विठ्ठला कृपा आली ॥ १ ॥
काढूनि बाहेरि ठेविलों निराळा । कवतुक डोळां दाखविलें ॥ २ ॥
नाचे उडे माया करी कवतुक । नाशिवंत सुखें साच केलीं ॥ ३ ॥
रडे फुंदे दुःखें कुटितील माथा । एकासी रडतां तेंही मरे ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज वाटतें नवल । सी माझे हे बोल ऐकोनियां ॥ ५ ॥

॥ ४१८८ ॥

माया साक्षी आह्मी नेणों भीड भार । आप आणि पर नाहीं दोन्ही ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ बंदीखाणी.

सत्याचियेसाटीं अवघाचि भरे । नावडे व्यापार तुटीचा तो ॥ २ ॥
पोभाळितां चरे अंतरींचें दुःख । लांसें फांसें मुख उघडावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे नव्हे स्फीतीचा हा ठाव । निवाड्यासी देव साक्षी केला ॥४॥

॥ ४१८९ ॥

मुखीं विठ्ठलाचें नाम । मग कैंचा भवभ्रम ॥ १ ॥ चालतां बोलतां खातां । जेवितां निद्रा करितां ॥ २ ॥ सुखें असों संसारीं । मग जवळीच हरि ॥ ३ ॥ मुक्तिवरील भक्ति जाण । अखंड मुखीं नारायण ॥ ४ ॥ मग देवभक्त जाला । तुका तुकीं उतरला ॥ ५ ॥

॥ ४१९० ॥

मुनि मुक्त जाले भेणें गर्भवासा । आह्मां विष्णुदासां सुलभ तो ॥१॥
अवघाचि संसार केला ब्रह्मरूप । विठ्ठलस्वरूप ह्मणोनियां ॥ २ ॥
पुराणीं उपदेश साधन उद्भट । आह्मां सोपी वाट वैकुंठींची ॥ ३ ॥
तुका ह्मणे जना सकळांसहित । घेऊं अखंडित प्रेमसुख ॥ ४ ॥

॥ ४१९१ ॥

मोक्षपदें तुच्छ केलीं याकारणें । आह्मां जन्म घेणें युगायुगीं ॥ १ ॥
विटे ऐसें सुख नव्हे भक्तिरस । पुडतीपुडती आस सेवावें हें ॥ २ ॥
देवा हातीं रूप धरवूं[1] आकार । नेदूं निराकार होऊं त्यासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे चित्त निवांत राहिलें । ध्याई तीं पाउलें विटेवरि ॥ ४ ॥

॥ ४१९२ ॥

ह्मणउनी खेळ मांडियेला ऐसा । नाहीं कोणी दिशा वर्जीयेली ॥ १ ॥
माझिया गोतें हें वसलें सकळ । न देखिजे मूळ विटाळाचें ॥ २ ॥
करूनि ओळखी दिली एकसरें । न देखों दुसरें विषमासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं काळापाशीं गोवा । स्छिति मति देवा वांचूनियां ॥ ४ ॥

॥ ४१९३ ॥

मृत्यु लोकीं आह्मां आवडती परि । नाहीं एका हरिनामेंविण ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ धरविला.

विटलें हें चित्त प्रपंचापासूनि । वमन हें मनीं बैसलेंसे ॥ २ ॥
सोनें रुपें आह्मां मृत्तिकेसमान । माणिकें पाषाण खडे तैसे ॥ ३ ॥
तुका ह्मणे तैशा दिसतील नारी । रिसाचियापरी आह्मांपुढें ॥ ४ ॥

॥ ४१९४ ॥

याचिया आधारें राहिलों निश्चिंत । ठवूनियां चित्त पायीं सुखें ॥ १ ॥
माझें सुख दुःख जाणे हित फार । घातलासे भार पांडुरंगा ॥ २ ॥
कृपेचीं पोसणीं ठायींचीं अंकिलीं । ह्मणऊनि लागली यास चिंता ॥३॥
मन राखे हातीं घेउनियां काठी । इंद्रियें तापटीं फांकों नेदी ॥ ४ ॥
तुका ह्मणे यासी अवघड नाहीं । शरणागता कांहीं रक्षावया ॥ ५ ॥

॥ ४१९५ ॥

याती मतिहीन रूपें लीन दीन । आणीक अवगुण जाणोनियां ॥ १ ॥
केला त्या विठ्ठलें माझा अंगीकार । ऐसा हा विचार जाणोनियां ॥२॥
जें कांहीं करितों तें माझें स्वहित । आली हे प्रचित कळों चित्ता ॥ ३ ॥
जालें सुख जीवा आनंद अपार । परमानंदें भार घेतला माझा ॥४॥
तुका ह्मणे यासी नांवाचा अभिमान । ह्मणोनि शरण तारी बळें ॥५॥

॥ ४१९६ ॥

येणें जाणें तरी । राहे देव कृपा करी ॥ १ ॥ ऐसें तंव पुण्य नाहीं ।
पाहातां माझे गांठी कांहीं ॥ २ ॥ भय निवारिता । कोण वेगळा
अनंता ॥ ३ ॥ तुका ह्मणे वारे भोग । वारी तरी पांडुरंग ॥ ४ ॥

॥ ४१९७ ॥

राम राज्य राम प्रजा लोकपाळ । एकचि सकळ दुजें नाहीं ॥ १ ॥
मंगळावांचूनि उमटेना वाणी । अखंडचि खाणी एकी रासी ॥ २ ॥
मोडलें हें स्वामी ठायाठांव सेवा । वाढवावा हेवा कोणा अंगें ॥ ३ ॥
तुका ह्मणे अवघें दुमदुमिलें देवें । उरलें तें गावें हेंचि आतां ॥ ४ ॥

---

पाठभेद—१ ठावाठाव. २ वाढवातो.

॥ ४१९८ ॥

रिद्धिसिद्धी दासी कामधेनु घरीं । परि नाहीं भाकरी भक्षावया ॥ १ ॥ लोडें बालिस्तें पलंग सुपति । परि नाहीं लंगोटी नेसावया ॥ २ ॥ पुसाल तरि आह्मां वैकुंठींचा वास । परि नाहीं राह्यास ठाव कोठें ॥३॥ तुका ह्मणे आह्मी राजे त्रैलोक्याचे । परि नाहीं कोणाचे उणें पुरें ॥४॥

॥ ४१९९ ॥

लेंटिकियाचिया आशा । होतों पडिलों वोळसा ॥ होऊनियां दोषा । पात्र मिथ्या अभिमानें ॥१॥ बरवी उघडली दृष्टी । नाहीं तरी होतों कष्टी ॥ आक्रंदते सृष्टी । मात्र या चेष्टांनीं ॥ २ ॥ मरणाची नाहीं शुद्धी । लोभीं प्रवर्तली बुद्धी ॥ परती तों कधीं । घडेचिना माघारीं ॥ ३ ॥ सांचूनि मरे धन । लावी पोरांसी भांडण ॥ नाहीं नारायण । तुका ह्मणे स्मरीला॥४॥

॥ ४२०० ॥

लावुनि काहाळा । सुखें करितों सोहळा ॥ १ ॥ सादवीत गेलों जना । भय नाहीं सत्य जाणा ॥ २ ॥ गात नाचत विनोदें । टाळ घागऱ्यांच्या छंदें ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेव । नाहीं पुढें येतो देव ॥४॥

॥ ४२०१ ॥

लेंकरा आईतें पित्याची जतन । दावी निजधन सर्व जोडी ॥ १ ॥ तयापरि आमचा जालासे सांभाळ । देखिलाचि काळ नाहीं आड ॥२॥ भुकेचे संनिध वसे स्तनपान । उपायाची भिन्न चिंता नाहीं ॥ ३ ॥ आळवूनि तुका उभा पैल थडी । घातली या उडी पांडुरंगें ॥ ४ ॥

॥ ४२०२ ॥

वचनाचा अनुभव हातीं । बोलविती देव मज ॥ १ ॥ परि हें न कळे अभाविकां । जडलोकां जिवांसी ॥ २ ॥ अद्भुत हे प्रसादिक । कृपा भीक स्वामीची ॥ ३ ॥ तुका ह्मणे बराबरी । जातों तरी सांगत॥४॥

---

पाठभेद—१ लटकियाची आशा । होतों पडिलों वळसा ॥

॥ ४२०३ ॥

वचना फिरती अधम जन । नारायण तो नव्हे ॥ १ ॥ केला आतां अंगीकार । न मनी भार समर्थ ॥ २ ॥ संसाराचा नाहीं पांग । देव सांग सकळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे कीर्ति वाणूं । मध्यें नाणूं संकल्प ॥ ४ ॥

॥ ४२०४ ॥

वारकरी पायांपाशीं । आले त्यांसी विनविलें ॥ १ ॥ काय काय तें आइका । विसरों नका रंकासी ॥ २ ॥ चिंतावोनि चिंता केली । हे राहिली अवस्था ॥ ३ ॥ तुका ह्मणे संसारा । रुसलों खरा यासाठीं ॥ ४ ॥

॥ ४२०५ ॥

विठो सांपडावया हातीं । ठावी जाली एक गती । न धरीं भय चित्तीं । बळ किती तयाचें ॥ १ ॥ लागे आपणचि हातीं । किंव भाकावी काकुलती । करी मग चित्तीं । असेल तें तयाचें ॥ २ ॥ एकलिया भावबळें । कैं सांपडे तो काळें । वैष्णवांच्या मेळें । उभा ठाके हाकेसी ॥ ३ ॥ बांधा माझिया जीवासी । तुका ह्मणे प्रेमपाशीं । न सोडीं तयासी । सर्वस्वासी उदार ॥ ४ ॥

॥ ४२०६ ॥

विश्वास तो देव । ह्मणुनि धरियेला भाव ॥ १ ॥ माझी वदविते वाणी । ज्यानें धरिली धरणी ॥ २ ॥ जोडिलीं अक्षरें । नव्हती बुद्धीचीं उत्तरें ॥ ३ ॥ नाहीं केली आटी । कांहीं मानदंभासाठीं ॥ ४ ॥ कोणी भाग्यवंत । तया कळेल उचित ॥ ५ ॥ तुका ह्मणे झरा । आहे मुळींचाचि खरा ॥ ६ ॥

॥ ४२०७ ॥

वेद अनंत बोलिला । अर्थ इतकाचि साधिला ॥ १ ॥ विठोबासी शरण जावें । निर्जनिष्ठें[1] नाम गावें ॥ २ ॥ सकळशास्त्रांचा विचार । अंतीं इतकाचि निर्धार ॥ ३ ॥ अठरापुराणीं सिद्धांत । तुका ह्मणे हाचि हेत ॥ ४ ॥

॥ ४२०८ ॥

वेदाचा तो अर्थ आह्मांसीच ठावा । येरांनीं वाहावा भार माथां ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ निजनिष्ठा.

खादल्याची गोडी देखिल्यासी नाहीं । भार धन वाही मजुरीचें ॥ २ ॥
उत्पत्तिपाळणसंहाराचें निज । जेणें नेलें बीज त्याचे हातीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आलें आपणचि फळ । हातोहातीं मूळ सांपडलें ॥ ४ ॥

॥ ४२०९ ॥

वोखटा तरी मी विटलों देहासी । पुरे आतां ऐसी जोडी पुन्हां ॥ १ ॥
किती मरमर सोसावी पुढती । राहिलों संगती विठोबाचे ॥ २ ॥
आतां कोण याचा करील आदर । जावो कळिवर विटंबोनि ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां सांडीं तेचि सांडीं । कोण फिरे लंडी यासी मागें ॥ ४ ॥

॥ ४२१० ॥

वृक्ष वल्ली आह्मां सोयरीं वनचरें । पक्षीही सुस्वरें आळविती ॥ १ ॥
येणें सुखें रुचे एकांताचा वास । नाहीं गुणदोष अंगा येत ॥ २ ॥
आकाश मंडप पृथिवी आसन । रमे तेथें मन क्रीडा करी ॥ ३ ॥
कंथा कुमंडलू देहउपचारा । जाणवितो वारा अवसरू ॥ ४ ॥
हरिकथा भोजन परवडी विस्तार । करोनि प्रकार सेवूं रुची ॥ ५ ॥
तुका ह्मणे होय मनासी संवाद । आपुलाचि वाद आपणांसी ॥ ६ ॥

॥ ४२११ ॥

शास्त्राचें जें सार वेदांची जो मूर्ति । तो माझा सांगाती प्राणसखा ॥ १ ॥
ह्मणउनी नाहीं आणिकांचा पांग । सर्व जालें सांग नामें एका ॥ २ ॥
सगुण निर्गुण जयाचीं हीं अंगें । तोचि आह्मांसंगें क्रीडा करी ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मी विधीचे जनिते । स्वयंभू आइते केले नव्हों ॥ ४ ॥

॥ ४२१२ ॥

शिकवूनि बोल । केलें कवतुक नवल ॥ १ ॥ आपाणियां रंजविलें । बापें माझिया विठ्ठलें ॥ २ ॥ हातीं प्रेमाचें भातुकें । आह्मां देऊनियां निकें ॥ ३ ॥ तुका करी टाहो । पाहे रखुमाईचा नाहो ॥ ४ ॥

॥ ४२१३ ॥

शीतळ साउली आमुची माउली । विठाई वोळली प्रेमपान्हा ॥ १ ॥

जाऊनि वोसंगा रिघेन वोरसे[1] । लागलें तें इच्छे पीइन वरी ॥ २ ॥
कृपा तनु माझी सांभाळी दुभोनि । अमृतेंजीवनी[2] लोटलीसे ॥ ३ ॥
आनंदाचा ठाव नाहीं माझे चित्तीं । सागर तो किती उपमेसी ॥ ४ ॥
सैर जाये पडे तयेसी सांकडें । सांभाळीत पुढें मागें आस ॥ ५ ॥
तुका ह्मणे चिंता कैसी ते मी नेणें । लडिवाळ तान्हें विठाईचें ॥ ६ ॥

॥ ४२१४ ॥

सद्गुरूचे चरणीं ठेविला मस्तक । देउनियां हस्तक उठविलें ॥ १ ॥
उठविलें मज देउनियां प्रेम । भावार्थें सप्रेम नमस्कारीं ॥ २ ॥
नमस्कारीं त्याला सद्गुरुरायाला । तुका ह्मणे बोला नाम वाचे ॥ ३ ॥

॥ ४२१५ ॥

सद्गुरूनें मज आशीर्वाद दिला । हरुष भरला हृदयीं माझे ॥ १ ॥
हृदयींचा भाव कळला गुरूसी । आनंदउल्हासी बोले मज ॥ २ ॥
बोले मज गुरु कृपा तो करूनि । तुका ह्मणे मनीं आनंदलों ॥ ३ ॥

॥ ४२१६ ॥

सत्तावसें मन । पाळी विठ्ठलाची आण ॥ १ ॥ आज्ञा वाहोनियां
शिरीं । सांगितलें तेंचि करीं ॥२॥ सरलीसे धांव । नलगे वाढवावी
हांव ॥ ३ ॥ आहे नाहीं त्याचें । तुका ह्मणे कळे साचें ॥ ४ ॥

॥ ४२१७ ॥

सर्वकाळ डोळां बैसो नारायण । नयो अभिमान आड मध्यें ॥ १ ॥
धाड पडो माझ्यां[3] थोरपणावरी । वाचे नरहरि उच्चारीना ॥ २ ॥
जळो अंतरींचें सर्व जाणपण । विवादवचन अहंतेचें ॥ ३ ॥
सकळां चरणीं गळित माझा जीव । तुका ह्मणे भाव एकविध ॥ ४ ॥

॥ ४२१८ ॥

सर्वकाळ माझे चित्तीं । हेचि खंती राहिली ॥ १ ॥ बैसलें तें रूप
डोळां । वेळोवेळां आठवे ॥ २ ॥ वेव्हाराची सरली मात । अखंडित
अनुसंधान ॥३॥ तुका ह्मणे वेध जाला । अंगा आला श्रीरंग ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ वोरस. २ अमृतसंजीवनी. ३ तुझ्या.

॥ ४२१९ ॥

सर्वविशीं आह्मीं हेचि जोडी केली । स्वामीची साधिली चरणसेवा ॥१॥
पाहिलेंचि नाहीं मागें परतोनि । जिंकिला तो क्षणीं क्षण काळ ॥२॥
नाहीं पडों दिला विचाराचा गोवा । नाहीं पोटीं[1] हेवा येऊं दिला ॥३॥
केला लाग वेगीं अवघीचि तांतडी । भावना ते कुडी दुराविली ॥४॥
कोठें मग ऐसें होतें साबकास । जळो तया आस वेव्हाराची ॥५॥
तुका ह्मणे लाभ घेतला पालवीं । आतां नाहीं गोवी काशाचीही ॥६॥

॥ ४२२० ॥

संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां गव्हारें जाणावें हें ॥ १ ॥
विठ्ठलाचें नाम घेतां नये शुद्ध । तेथें मज बोध काय कळे ॥ २ ॥
करितों कवतुक बोबडा उत्तरीं । ह्मणी मजवरि कोप धरा ॥ ३ ॥
काय माझी. याति नेणां हा विचार । काय मी तें फार बोलों नेणें ॥४॥
तुका ह्मणे मज बोलवितो देव । अर्थ गुह्य भाव तोचि जाणे ॥ ५ ॥

॥ ४२२१ ॥

संसाराच्या नांवें घालूनियां शून्य । वाढता हा पुण्य केला धर्म ॥१॥
हरिभजनें हें धवळिलें जग । चुकविला लाग कळिकाळाचा ॥ २ ॥
कोणांही नलगे साधनांचा पांग । कारणें केला त्याग देहबुद्धी ॥ ३ ॥
तुका ह्मणे सुख समाधि हरिकथा । नेणें भवव्यथा गाईल तो ॥ ४ ॥

॥ ४२२२ ॥

संसार तो कोण देखे । आह्मां सखे हरिजन ॥ १ ॥ काळ ब्रह्मानंदें सरे । आवडी उरे संचली ॥ २ ॥ सपनीं तेही नाहीं चिंता । रात्री जातां दिवस ॥३॥ तुका ह्मणे ब्रह्मरसें । होय सरिसें भोजन ॥ ४ ॥

॥ ४२२३ ॥

साकरेच्या योगें वर्ख । राजा कागदातें देखे ॥ १ ॥ तैसें आह्मां मनुष्यपण । रामनाम कोण्यागुणें ॥ २ ॥ फिरंगीच्या योगें करी ।

---

पाठभेदः—१ पाठीं.

राजा काष्ट हातीं धरी ॥ ३ ॥ रत्नकनकायोगें लाख । कंठीं धरिती श्रीमंत लोक ॥ ४ ॥ देवा देवपाट । देव्हाऱ्यावरी बैसे स्पष्ट ॥ ५ ॥ ब्रह्मानंदयोगें तुका । पढीयंता सज्जन लोकां ॥ ६ ॥

॥ ४२२४ ॥

सांगों जाणती शकुन । भूत भविष्य वर्तमान ॥ १ ॥ त्यांचा आह्मांसी कांटाळा । पाहों नावडती डोळां ॥ २ ॥ रिद्धिसिद्धींचे साधक । वाचासिद्ध होती एक ॥३॥ तुका ह्मणे जाती । पुण्यक्षयें अधोगती ॥ ४ ॥

॥ ४२२५ ॥

सावध जालों सावध जालों । हरिच्या आलों जागरणा ॥ १ ॥ तेथें वैष्णवांचे भार । जयजयकार गर्जतसे ॥ २ ॥ पळोनियां गेली झोंप । होतें पाप आड तें ॥३॥ तुका ह्मणे तया ठाया । ओल छाया कृपेची॥४॥

॥ ४२२६ ॥

सोसें सोसें मारूं हाका । होईल चुका ह्मणऊनि ॥ १ ॥ मागें पुढें क्षणभंग । नव्हे दुगी अंतर ॥२॥ नाम मुखीं बैसला चाळा । वेळोवेळां पडताळीं ॥३॥ तुका ह्मणे सुखी केलें । या विठ्ठलें बहुतांसी ॥ ४ ॥

॥ ४२२७ ॥

शिकविला तैसा पढों जाणे पुसा । कैंची साच दशा तैसी अंगीं ॥१॥
स्वप्नींच्या सुखें नाहीं होत राजा । तैसा दिसे माझा अनुभव ॥ २ ॥
कामया हा केला जिव्हे अळंकार । पायांसीं अंतर दिसतसे ॥ ३ ॥
दर्पणींचें धन हातीं ना पदरीं । डोळां दिसे परी सत्याचिये ॥ ४ ॥
आस केली तरी लाळचि घोंटावी । ठकाठकी तेवीं दिसतसे ॥ ५ ॥
कवित्वें रसाळ वदविली वाणी । साक्षही पुराणीं घडे ऐसी ॥ ६ ॥
तुका ह्मणे गुरें राखोनि गोंवारी । माझीं ह्मणे परि लाभ नाहीं ॥ ७ ॥

॥ ४२२८ ॥

सुकाळ हा दिवस रजनी । नित्य धणी नवीच ॥ १ ॥ करुण सेवूं

नानापरी । राहे उरी गोडीनें ॥ २ ॥ सरे ऐसा नाहीं झरा । पंक्ती करा समवेत ॥३॥ तुका ह्मणे बरवा पान्हा । कान्हाबाई माउलीचा ॥४॥

॥ ४२२९ ॥

सुखाचें ओतलें । दिसे श्रीमुख चांगलें ॥ १ ॥ मनें धरिला अभिळास । मिठी घातली पायांस ॥२॥ होतां दृष्टादृष्टी । ताप गेला उठाउठी ॥ ३ ॥ तुका ह्मणे जाला । लाभें लाभ दुणावला ॥ ४ ॥

॥ ४२३० ॥

सुखें होतों कोठें घेतली सुती । बांधविला गळा आपुले हातीं ॥ १ ॥
काय करूं बहु गुंतलों आतां । नये सरतां मागें पुढें ॥ २ ॥
होतें गांठी तें सरलें येतां । आणीक माथां ऋण जालें ॥ ३ ॥
सोंकरलियाविण गमाविलें पिक । रांडापोरें भिके लावियेलीं ॥ ४ ॥
बहुतांचीं बहु घेतलीं घरें । न पडे पुरें कांहीं केल्या ॥ ५ ॥
तुका ह्मणे कांहीं न धरावी आस । जावें हें सर्वस्व टाकोनियां ॥ ६ ॥

॥ ४२३१ ॥

स्मरतां कां घडे नास । विष्णुदास यावरी ॥ १ ॥ ऐसी सीमा जाली जगीं । तरी मी वेगीं अनुसरलों ॥२॥ धरिलें तें निवडे आतां । न घडे चित्तावेगळें ॥३॥ तुका ह्मणे नाश नाहीं । पुराणेंही गर्जती ॥४॥

॥ ४२३२ ॥

हरिनामाचें करूनि तारूं । भवसिंधुपार उतरलों ॥ १ ॥ फावलें फावलें आतां । पायीं संतां विनटलों ॥ २ ॥ हरिनामाचा शस्त्र घोडा । संसार गाढा छेदिला ॥ ३ ॥ हरिनामाचीं धनुष्यकांडें । विन्मुख तोंडें कळिकाळ ॥४॥ येणेंचि बळें सरते आह्मी । हरिच्या नामीं लोकीं तिहीं ॥ ५ ॥ तुका ह्मणे जालों साचे । श्रीविठ्ठलाचे डिंगर ॥ ६ ॥

॥ ४२३३ ॥

हा गे माझा अनुभव । भक्तिभाव भाग्याचा ॥ १ ॥ केला ऋणी ना-

पाठभेदः—१ हरिचें.

रायण । नव्हे क्षण वेगळा ॥ २ ॥ घालोनियां भार माथां । अवघी चिंता वारली ॥३॥ तुका ह्मणे वचनासाटीं । नाम कंठीं धरोनि ॥४॥

॥ ४२३४ ॥

हाचि परमानंद आळंगीन बाहीं । क्षेम देतां ठायीं द्वैत तुटे ॥ १ ॥
बोलायासि मात मन निवे हर्षे चित्त । दुणी वाढे प्रीत प्रेमसुख ॥ २ ॥
जनांत भूषण वैकुंठीं सरता । फावलें स्वहिता सर्वभावें ॥ ३ ॥
तुटला वेव्हार माया लोकाचार । समूळ संसार पारुषला ॥ ४ ॥
तुका ह्मणे तो हा विठ्ठलचि व्हावा । आणिकी या जीवा चाड नाहीं ॥५॥

॥ ४२३५ ॥

हो कां नर अथवा नारी । ज्यांचा आवडता हरी ॥१॥ ते मज विठोबासमान । नमूं आवडी ते जन ॥ २ ॥ ज्याचें अंतर निर्मळ । त्याचें सबाह्य कोमळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे भावें । जिव्हे प्रेमें वोसंडावें ॥४॥

॥ ४२३६ ॥

होतें तैसें पायीं केलें निवेदन । अंतरलों दिन बहुत होतों ॥ १ ॥
संबोखुनी केलें समाधान चित्त । वोगरूनि भातें प्रेमरस ॥ २ ॥
नामरत्नमणी करूनि भूषण । अळंकारमंडण माळा दिली ॥ ३ ॥
तुका ह्मणे सुखें जालों निरामय । नामीं नामसोय निमग्नता ॥ ४ ॥

॥ ४२३७ ॥

होतों सांपडलों वेटी । जातां भेटी संसारा ॥१॥ तों या वाटे कृपा केली । भेटी जाली विठोबासी ॥ २ ॥ होता भार माथां माझे । बहु ओझें असुप ॥ ३ ॥ तुका ह्मणे केली चिंता । कोण दाता भेटेल ॥ ४ ॥

॥ ४२३८ ॥

विठ्ठल माझा जीव विठ्ठल माझा भाव । कुळधर्म देव विठ्ठल माझा ॥१॥
विठ्ठल माझा गुरु विठ्ठल माझा तारूं । उतरील पारु भवनदीचा ॥ २ ॥
विठ्ठल माझी माता विठ्ठल माझा पिता । विठ्ठल चुलता बहिणीबंधु ॥३॥
विठ्ठल हे जन विठ्ठल माझें मन । सोइरा सज्जन विठ्ठल माझा ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझा विठ्ठल विसावा । नश्वरित गांवा जाइन त्याच्या ॥५॥

॥ ४२३९ ॥

उजळावया आलों वाटा । खरा खोटा निवाड ॥ १ ॥ बोलविलें बोल बोलें । धनी विठ्ठला सन्निध ॥ २ ॥ तरी मनीं नाहीं शंका । बळें एका स्वामींच्या ॥ ३ ॥ तुका ह्मणे नये आह्मां । पुढें कामा गबाळ ॥ ४ ॥

॥ ४२४० ॥

दिनदिन शंका वाढे[1] । आयुष्य नेणवतां गाढें ॥ १ ॥ कैसीं भुललीं बापुडीं । दंभविषयांचे सांकडीं ॥ २ ॥ विसरलीं[2] मरण । त्याची नाहीं आठवण ॥ ३ ॥ देखत देखत पाहीं । तुका ह्मणे आठव नाहीं ॥ ४ ॥

॥ ४२४१ ॥

करविली तैसी केली कटकट । वांकडें कीं नीट देव जाणे ॥ १ ॥ कोणाकारणें हें जालेंसे निर्माण । देवाचें कारण देव जाणे ॥ २ ॥ तुका ह्मणे मी या अभिमाना वेगळा । घालूनि गोपाळा भार असें ॥ ३ ॥

॥ ४२४२ ॥

आमचा विनोद तें जगा मरण । करितो भावहीण देखोवेखी ॥ १ ॥ न कळे संतत हिताचा विचार । तों हे दारोदार खाती फेरे ॥ २ ॥ वंदिलें वंदावें निंदिलें निंदावें । एक गेलें जावें त्याचि वाटा ॥ ३ ॥ तुका ह्मणे कोणी नाइके सांगतां । होती यमदूता वरपडे ॥ ४ ॥

॥ ४२४३ ॥

नटनाट्य अवघें संपादिलें सोंग । भेद दाऊं रंग न पालटे ॥ १ ॥ मांडियेला खेळ कौतुकें[3] बहुरूप । आपुलें स्वरूप जाणतसों ॥ २ ॥ स्पटिकाची शिळा उपाधि न मिळे । भाव दावी पिंवळे लाल संगें ॥ ३ ॥ तुका ह्मणे आह्मी या जनाविरहित । होउनि निश्चिंत क्रीडा करूं ॥ ४ ॥

॥ ४२४४ ॥

असें येथीचिया दीनें । भाग्यहीन सकळां ॥ १ ॥ भांडवल एवढें

---

पाठभेदः—१ वाटे. २ विसरला. ३ कौतुक.

गांठीं । नाम कंठीं धरियेलें ॥२॥ आणीक तें दुजें कांहीं । मज नाहीं यावरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे केला कोणें । एवढा नेणें लौकिक ॥ ४ ॥

॥ ४२४५ ॥

कांहींच मी नव्हे कोणिये गांवींचा । एकटे[1] ठायींचा ठायीं एक ॥१॥
नाहीं जात कोठें येत फिरोनियां । अवघेंचि वायांविण बोलें ॥ २ ॥
नाहीं मज कोणी आपुलें दुसरें । कोणाचा मी खरें कांहीं नव्हे ॥३॥
नाहीं आह्मां ज्यावें मरावें लागत । आहों अखंडित जैसे तैसे ॥ ४ ॥
तुका ह्मणे नांव रूप नाहीं आह्मां । वेगळा त्या कर्मा अकर्मासी ॥ ५ ॥

॥ ४२४६ ॥

ठेविलें जतन । करूनियां निज धन ॥ १ ॥ जयापासाव उत्पत्ति । तें हें बीज धरिलें हातीं ॥ २ ॥ निवडिलें वरळा भूस । सार आइन जिन्नस ॥ ३ ॥ तुका ह्मणे नारायण । भाग संचिताचा गुण ॥ ४ ॥

॥ ४२४७ ॥

साधनांच्या कळा आकार आकृति । कारण नवनीतीं मथनाचें ॥ १ ॥
पक्षियासी नाहीं मारणीं आडताळा । अंतरिक्षीं फळासीचि पावे ॥२॥
भक्तीची जोडी ते उखत्याचि साटीं । उणें पुरें तुटी तेथें नाहीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे आलें सांचत सांचणी । आजी झाली धणी एकसरें ॥ ४ ॥

॥ ४२४८ ॥

नाहीं येथें वाणी । सकळां वर्णीं घ्यावी धणी ॥ १ ॥ जालें दर्पणाचें अंग । ज्याचा त्यासी दावी रंग ॥ २ ॥ एका भावाचा एकांत । पीक पिकला अनंत ॥३॥ तुका खळे दाणीं । करी बैसोनी वांटणी ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ एकटा.

# प्रासंगिक अभंग.

## तुकोबावर सद्गुरुकृपा.

॥ ४२४९ ॥

सद्गुरुरायें कृपा मज केली । परी नाहीं घडली सेवा कांहीं ॥ १ ॥
सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥ २ ॥
भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥ ३ ॥
कांहीं कळे उपजला अंतराय । ह्मणोनियां काय त्वरा जाली ॥ ४ ॥
राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥ ५ ॥
बाबाजी आपलें सांगितलें नाम । मंत्र दिला राम कृष्ण हरि ॥ ६ ॥
माघशुद्ध दशमी पाहूनि गुरुवार । केला अंगीकार तुका ह्मणे ॥ ७ ॥

॥ ४२५० ॥

माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुराजा ॥ १ ॥
आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नव्हे गुंपा कांहीं कोठें ॥ २ ॥
जाती पुढें एक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥ ३ ॥
जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरु पांडुरंग ॥ ५ ॥

॥ ४२५१ ॥

घालुनियां भार राहिलों निश्चिंतीं । निरविलें संतीं विठोबासी ॥ १ ॥
लावूनियां हातें कुरवाळिला माथा । सांगितलें चिंता न करावी ॥ २ ॥
कटीं कर समचरण साजिरे । राहिला भीवरे तिरीं उभा ॥ ३ ॥
खुंटले सायास आणीक या जीवा । धरिलें केशवा पाय तुझे ॥ ४ ॥
तुज वाटे आतां तें करीं अनंता । तुका ह्मणे संता लाज माझी ॥ ५ ॥

॥ ४२५२ ॥

माझिये मनींचा जाणा हा निर्धार । जिवासी उदार जालों आतां ॥ १ ॥
तुजविण दुजें न धरीं आणिका । भय लज्जा शंका टाकियेली ॥ २ ॥

ठायींचा संबंध तुज मज होता । विशेष अनंता केला संतीं ॥ ३ ॥
जीवभाव तुझ्या ठवियेला पायीं । हेचि आतां नाहीं लाज तुह्मां ॥ ४ ॥
तुका ह्मणे संतीं घातला हावाला । न सोडीं विठ्ठला पाय आतां ॥ ५ ॥

## तुकोबास कवित्व करण्याविषयीं दृष्टांत.

॥ ४२५३ ॥

नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें । सवें पांडुरंगें येऊनियां ॥ १ ॥
सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको ॥ २ ॥
माप टाकी सळ धरिली विठ्ठलें । थापटोनि केलें सावधान ॥ ३ ॥
प्रमाणाची संख्या सांगे शत कोटी । उरले ते[1] सेवटीं लावी तुका ॥ ४ ॥

॥ ४२५४ ॥

द्याल ठाव तरि राहेन संगती । संतांचे पंगती पायांपाशीं ॥ १ ॥
आवडीचा ठाव आलोंसें टाकून । आतां उदासीन न धरावें ॥ २ ॥
सेवटील स्थळ नीच माझी वृत्ति । आधारें विश्रांती पावईन ॥ ३ ॥
नामदेवापायीं तुक्या सपनीं भेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे ॥ ४ ॥

॥ ४२५५ ॥

संत कृपा जाली । इमारत फळा आली ॥ १ ॥ ज्ञानदेवें रचिलें पाया । [2]रचियेलें देवालया ॥ २ ॥ नामा तयाचा किंकर । तेणें केला हा विस्तार ॥ ३ ॥ जनार्दन एकनाथ । ध्वज उभारिला भागवत ॥ ४ ॥ भजन करा सावकाश । तुका जालासे कळस ॥ ५ ॥

## कवित्वाचा निषेध व त्याचा परिहार.

॥ ४२५६ ॥

भूतबाधा आह्मां घरीं । हें तों आश्चर्य गा हरी ॥ १ ॥ जाला भक्तीचा कळस । आले वसतीसी दोष ॥ २ ॥ जागरणाचें फळ । दिली जोडोनि तळमळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । आहाच कळों आली सेवा ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ 'तें' नाहीं. २ उभारिलें.

॥ ४२५७ ॥

करूं कवित्व काय नाहीं आतां लाज । मज भक्तराज हांसतील ॥ १ ॥
आतां आला एका निवाड्याचा दिस । सत्याविण रस विरसला ॥ २ ॥
अनुभवाविण कोण करी पाप । रितेंचि संकल्प लाजलावे ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां न धरवे धीर । नव्हे जीव स्थिर माझा मज ॥ ४ ॥

॥ ४२५८ ॥

पावावे संतोष । तुह्मी यासाटीं सायास ॥ १ ॥ करीं आवडीं वचनें । पालटूनि क्षणक्षणें ॥ २ ॥ द्यावें अभयदान । भूमी न पडावें वचन ॥ ३ ॥ तुका ह्मणे परस्परें । कांहीं वाढवीं उत्तरें ॥ ४ ॥

॥ ४२५९ ॥

आतां नेम जाला । याच कळसीं विठ्ठला ॥ १ ॥ हातीं न धरीं लेखणी । काय भुसकट ते वाणी ॥ २ ॥ जाणें तेणें काळ । उरला सारीन सकळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे घाटी । चाटू कोरडा शेवटीं ॥ ४ ॥

॥ ४२६० ॥

कांहींच न लगे आदि अवसान । बहुत कठीण दिसतसां ॥ १ ॥
अवघ्याच माझ्या वेचविल्या शक्ति । न चलेसी युक्ति जाली पुढें ॥२॥
बोलिलें वचन हारपलें नभीं । उतरलों तों उभीं आहों तैसीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे कांहीं न करावेंसें जालें । थकिताचि ठेलें चित्त उगें ॥ ४ ॥

॥ ४२६१ ॥

केल्यापुरती आळी । कांहीं होते टाळाटाळी ॥ १ ॥ सत्यसंकल्पाचें फळ । होतां न दिसेचि बळ ॥ २ ॥ दळणाऱ्या ओंव्या । रित्या [1]खरें मापें द्याव्या ॥३॥ जातीं उखळें चाटूं । तुका ह्मणे राज्य घाटूं ॥४॥

॥ ४२६२ ॥

स्तुति तरी करूं काय कोणापासीं । कीर्ति तरी कैसी वाखाणावी ॥१॥
खोट्या तंव नाहीं अनुवादाचें काम । उरला तो भ्रम वरिवरा ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ खऱ्या.

ह्मणवावें त्याची खुण नाहीं हातीं । अवकळा फजिती सावकाश[1] ॥३॥
तुका ह्मणे हेंगे तुमचें माझें तोंड । होऊनियां लंड आळवितों ॥४॥

॥ ४२६३ ॥

मागितल्यास कर पसरी । पळतां भरी वा त्रती[2] ॥ १ ॥ काय आह्मी नेणों वर्म । केला श्रम नेणतां ॥ २ ॥ बोलतां बरें येतां रागा। कठीण लागा मागेंमागें ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें बोली । असे चाली उफराटी ॥ ४ ॥

॥ ४२६४ ॥

आतां काय खावें कोणीकडे जावें । गांवांत राहावें कोण्या बळें ॥ १ ॥
कोपला पाटील गांवींचे हे लोक । आतां मज भीके[2] कोण घाली ॥ २ ॥
आतां येणें चवी सांडिली ह्मणती । निवाडा करिती दिवाणांत ॥ ३ ॥
भल्या लोकांपासीं सांगितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥ ४ ॥
तुका ह्मणे याचा संग नव्हे भला । शोधीत विठ्ठला जाऊं आतां ॥ ५ ॥

॥ ४२६५ ॥

काशासाटीं बैसों करूनियां हाट । वाउगा बोभाट डांगोरा हा ॥ १ ॥
काय आलें एका जिवाच्या उद्धारें[3] । पावशी उत्तरें काय हो तें ॥ २ ॥
नेदी पट परी अन्नें तों न मारी । आपुलिये थोरीसाटीं राजा ॥ ३ ॥
तुका ह्मणे आतां अव्हेरिलें तरी । मग कोण करी दुकान हा ॥ ४ ॥

॥ ४२६६ ॥

सांगा दास नव्हें तुमचा मी कैसा । ऐसें पंढरीशा विचारूनी ॥ १ ॥
कोणासाटीं केली प्रपंचाची होळी । या पायां वेगळी मायबापा ॥२॥
नसेल तो द्यावा सत्यत्वासी धीर । नये भाजूं हीर उफराटे ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां आहिक्य परत्रीं । नाहीं कुळगोत्रीं तुजविण कांहीं ॥ ४ ॥

॥ ४२६७ ॥

असो तुझें तुजपाशीं । आह्मां त्यांसी[4] काय चाड ॥ १ ॥ निरोधें[5] कां

पाठभेदः—१ सावकाशें. २ भिका. ३ उदारें, उधारें. ४ त्याची. ५ विरोधें.

कोंडूं मन । समाधान असोनी ॥ २ ॥ करावा तो वरे आट । खटपट वाढतसे ॥ ३ ॥ तुका ह्मणे येउनि रागा । कां मी भा[1]गा मुकेन ॥४॥

॥ ४२६८ ॥

अनन्यासी ठाव एक सर्वकाजें । एकाविण दुजें नेणे चित्त ॥ १ ॥
न पुरतां आळी देशधडी व्हावें । हें काय बरवें दिसतसे ॥ २ ॥
लेंकराचा भार माउलीचे शिरीं । निढळ तें दुरी धरिलिया ॥ ३ ॥
तुका ह्मणे किती घातली लांबणी । समर्थ होउनी केवळ्यासाटीं ॥ ४ ॥

॥ ४२६९ ॥

आहे तेंचि पुढें पाहों । बरे आहों येथेंचि ॥१॥ काय वाढवूनि काम । उगाच श्रम तृष्णेचा ॥ २ ॥ स्थिरावतां ओघीं बरें । चाली पुरें पडेना ॥ ३ ॥ तुका ह्मणे वळितां मन । आह्मां क्षण न लगे ॥ ४ ॥

॥ ४२७० ॥

नाहीं जों वेचलों जिवाचिया त्यागें । तोंवरी वाउगें काय बोलों ॥ १ ॥
जाणिवलें आतां करीं ये उद्देश । जोडी किंवा नाश तुमची जीवें ॥ २ ॥
ठायींचेंचि आलें होतें ऐसें मना । जावें ऐसें वना दृढ जालें ॥ ३ ॥
तुका ह्मणे मग वेचीन उत्तरें । उद्देशिलें खरें जाल्यावरी ॥ ४ ॥

॥ ४२७१ ॥

कांहीं मागणें हें आह्मां अनुचित । वडिलांची रीत जाणतसों ॥ १ ॥
देह तुच्छ जालें सकळ उपाधी । सेवेपाशीं बुद्धि राहिलीसे ॥ २ ॥
शब्द तो उपाधि अचळ निश्चळ । अनुभव हा काय नाहीं अंगीं ॥३॥
तुका ह्मणे देह फांकिला विभागीं । उपकार अंगीं उरविला ॥ ४ ॥

॥ ४२७२ ॥

माझा मज नाहीं । आला उबग तो कांहीं ॥ १ ॥ तुमच्या नामाची

पाठभेदः—१ विभागा.

जतन । नव्हतां थोर वाटे सीण ॥२॥ न पडावी निंदा । कानीं स्वामीची गोविंदा ॥ ३ ॥ तुका ह्मणे लाज । आह्मां स्वामीचें तें काज ॥ ४ ॥

॥ ४२७३ ॥

बोलतां वचन असा पाठमोरे । मज भाव बरे कळों आले ॥ १ ॥
मागितलें नये अरुचीनें हातां । नाहीं वरी सत्ता आदराची ॥ २ ॥
समाधानासाटीं लाविलासे कान । चोरलें तें मन दिसतसां ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां तुमचेचि फंद । वरदळ छंद कळों येती ॥ ४ ॥

॥ ४२७४ ॥

नव्हे तुह्मां सरी । येवढें कारण सुगरी ॥१॥ मग जैसा तैसा काळ । दाट सारावा पातळ ॥ २ ॥ स्वामीचें तें सांडें । पुत्र होतां काळतोंडें ॥ ३ ॥ शब्दा नाहीं रुचि । मग कोठें तुका वेची ॥ ४ ॥

॥ ४२७५ ॥

नाहीं आइकत तुह्मी माझे बोल । कासया हें फोल उपणूं भूस ॥ १ ॥
येसी ते करीन बैसलिया ठाया । तूंचि बुझावया जवळी देवा ॥२ ॥
करावे ते केले सकळ उपाय । आतां पाहों काय अझुनी वास ॥ ३ ॥
तुका ह्मणे आला आह्मेसी संवट । होऊनियां नीट पायां पडों ॥ ४ ॥

॥ ४२७६ ॥

रूपें गोविलें चित्त । पायीं राहिलें निश्चिंत ॥ १ ॥ तुह्मी देवा अवघेचि गोमटे । मुख देखतां दुःख न भेटे ॥२॥ जाली इंद्रियां विश्रांति । भ्रमतां पीडित होतीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे भेटी । सुटली भवबंदाची गांठी ॥ ४ ॥

॥ ४२७७ ॥

थोर अन्याय केला । तुझा अंत म्यां पाहिला । जनाचिया बोला । साटीं चित्त क्षोभविलें ॥१॥ भागविलासी केला सीण । अधम मी यातिहीन । झांकूनि लोचन । दिवस तेरा राहिलों ॥२॥ अवघें घालूनियां कोडें । तानभुकेचें सांकडें । योगक्षेम पुढें । तुज करणें लागेल ॥ ३ ॥ उदकीं राखिले कागद । चुकविला जनवाद । तुका ह्मणे ब्रीद । साच केलें आपुलें ॥४॥

॥ ४२७८ ॥

नव्हती आलीसी सासुरी । अथवा घायें पाठीवरी । तो म्यां केला हरी । एवढा तुझां आकांत॥ १॥बांटिलासी दोहीं ठायीं । मजपाशीं आणि डोहीं । लागों दिला नाहीं । येथें तेथें आघात ॥२॥ जीव घेती मायबापें । थोड्या अन्यायाच्या कोपें।हें तो नव्हे सोपें।साहों त्यांचि जाणितलें॥ ३॥तुका ह्मणे कृपावंता । तुज ऐसा नाहीं दाता ।काय वाणूं आतां।वाणी माझी कुंठली।४।

॥ ४२७९ ॥

कापो कोणी माझी मान । सुखें पीडोत दुर्जन । तुज होय सीण । तें मी न करीं सर्वथा ॥ १ ॥ चुकी जाली एकवेळा । मजपासूनि चांडाळा । उभें करोनियां जळा । माजी वह्या राखिल्या॥ २ ॥नाहीं केला हा विचार। माझा कोण अधिकार । समर्थासी भार । न कळे कैसा घालावा ॥ ३॥ गेलें होऊनियां मागें। नये बोलों तें वाउगें ।पुढिलिया प्रसंगें । तुका ह्मणे जाणावें४

॥ ४२८० ॥

तूं कृपाळू माउली । आह्मां दीनांची साउली । न संवरीत आली । बाळवेशें जवळी ॥ १ ॥ माझें केलें समाधान । रूप गोजिरें सगुण । निवविलें मन । आलिंगन देऊनी ॥२॥ कृपा केली जना हातीं । पायीं ठाव दिला संतीं । कळों नये चित्तीं । दुःख कैसें आहे तें ॥३॥ तुका ह्मणे मी अन्यायी। क्षमा करीं वो आझे आई । आतां पुढें काई । तुज घालूं सांकडें ॥४॥

॥ ४२८१ ॥

काय जाणें मी पामर । पांडुरंगा तुझा पार । धरिलिया धीर । काय एक न करिसी ॥१॥ उताविळ जालों आधीं । मतिमंद हीनबुद्धि । परि तूं कृपानिधि । नाहीं केला अव्हेर ॥२॥ तूं देवांचाही देव । अवघ्या ब्रह्मांडाचा जीव । आह्मां दासा कींव । कां भाकणें लागली ॥३॥ तुका ह्मणे विश्वंभरा । मी तों पतितचि खरा । अन्याय दुसरा ।दारीं धरणें बैसलों॥ ४॥

---

पाठभेदः—१ घाव.

॥ ४२८२ ॥

तूं माउलीहून मयाळ । चंद्राहूनी शीतळ । पाणियाहूनी पातळ । कल्लोळ प्रेमाचा ॥१॥ देऊं काशाची उपमा । दुजी तुज पुरुषोत्तमा । ओंवाळूनि नामा । तुझ्या वरूनी टाकिलों ॥ २ ॥ तुवां केलें रे अमृता । गोड त्याही तूं परता । पांचातत्वांचा जनिता । सकळ सत्तानायक ॥ ३ ॥ कांहीं न बोलोनि आतां । उगाच चरणीं ठेवितों माथा । तुका ह्मणे पंढरिनाथा । क्षमा करीं अपराध ॥ ४ ॥

॥ ४२८३ ॥

मी अवगुणी अन्यायी । किती ह्मणोन सांगों काई । आतां मज पायीं । ठाव देई विठ्ठले ॥ १ ॥ पुरे पुरे हा संसार । कर्म बळिवंत दुस्तर । राहों नेदी स्थिर । एके ठायीं निश्चळ ॥ २ ॥ अनेक बुद्धीचे तरंग । क्षणक्षणां पालटती रंग । धरूं जातां संग । तंव तो होतो बाधक ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां । अवघी तोडीं माझी चिंता । येऊनियां पंढरिनाथा । वास करीं हृदयीं ॥ ४ ॥

## ज्ञानेश्वर महाराजांनीं एका धरणेकरी ब्राह्मणास तुकोबाकडे पाठविलें होतें त्याविषयीं अभंग.

॥ ४२८४ ॥

काय ज्ञानेश्वरीं उणें । तिहीं पाठविलें धरणें ॥ १ ॥ ऐकोनियां लिखित । ह्मण जाणवली हे मात ॥ २ ॥ तरी जाणे धनी । वदे सेवकाची वाणी ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठेवा । होतां सांभाळावें देवा ॥ ४ ॥

॥ ४२८५ ॥

काय मी जाणता । तुह्माहूनि अनंता ॥ १ ॥ जो हा करूं अतिशय । कां तुह्मां दया नये ॥ २ ॥ काय तुज नाहीं कृपा । विश्वाचिया मायबापा ॥ ३ ॥ तुका ह्मणे वाणी । माझी वदे तुह्मांहूनी ॥ ४ ॥

॥ ४२८६ ॥

नव्हे दास खरा । परि जाला हा डांगोरा ॥ १ ॥ यासी काय करूं आतां । तूं हें सकळ जाणता ॥ २ ॥ नाहीं पुण्य गांठी । जें हें वेचूं कोणासाटीं ॥३॥ तुका ह्मणे कां उपाधि । वाढविली कृपानिधि ॥ ४ ॥

॥ ४२८७ ॥

तुजविण सत्ता । नाहीं वाचा वदविता ॥ १ ॥ ऐसें आह्मी जाणों दास । ह्मणोनि जालों उदास ॥ २ ॥ तुह्मी दिला धीर । तेणें मन झालें स्थीर ॥ ३ ॥ तुका ह्मणे आड । केलों मी हें तुझें कोड ॥ ४ ॥

॥ ४२८८ ॥

ठेवूनियां डोई । पायीं जालों उतराई ॥ १ ॥ कारण तें तुह्मी जाणा। मी तराळ नारायणा ॥ २ ॥ प्रसंगीं वचन । दिलें तेंचि खावें अन्न ॥ ३ ॥ तुका ह्मणे भार । तुह्मी जाणा थोडा फार ॥ ४ ॥

॥ ४२८९ ॥

अगा ये उदारा अगा विश्वंभरा । रखुमाईच्या वरा पांडुरंगा ॥ १ ॥
अगा सर्वोत्तमा अगा कृष्णा रामा । अगा मेघश्यामा विश्वजनित्या ॥२॥
अगा कृपावंता जीवन तूं दाता । अगा सर्वसत्ता धरितया ॥ ३ ॥
अगा सर्वजाणा अगा नारायणा । करुणावचना चित्त द्यावें ॥ ४ ॥
तुका ह्मणे नाहीं अधिकार तैसी । सरतीं पायांपाशीं केली मागें ॥५॥

॥ ४२९० ॥

श्रीपंढरीशा पतितपावना । एक विज्ञापना पायांपाशीं ॥ १ ॥
अनाथा जीवांचा तूं काजकैवारी । ऐसी चराचरी ब्रीद्रावळी ॥ २ ॥
न सांगतां कळे अंतरींचें गुज । आतां तुझी लाज तुज देवा ॥ ३ ॥
आळिकर ज्याचें करिसी समाधान । अभयाचें दान देऊनियां ॥ ४ ॥
तुका ह्मणे तूंचि खेळें दोहीं ठायीं । नसेल तो देई धीर मना ॥ ५ ॥

॥ ४२९१ ॥

काय तुह्मी जाणा । करूं अव्हेर नारायणा ॥ १ ॥ तरी या लटि-

क्याची गोष्टी । निवडली दुसरे ठायीं ॥ २ ॥ कळों अंतरींचा गुण। नये फिटल्यावांचून ॥ ३ ॥ आणिलें अनुभवा । जनाच्या हें ज्ञानदेवा ॥ ४ ॥ आणीक कोणी भिती । त्यांच्या चिंतनें विश्रांति ॥ ५ ॥ तुका ह्मणे बीज पोटीं । फळ तैसेंचि सेवटीं ॥ ६ ॥

## धरणेकऱ्यास उपदेश.

॥ ४२९२ ॥

नको कांहीं पडों ग्रंथाचिये भरीं । शीघ्र व्रत करीं हेंचि एक ॥ १ ॥
देवाचिये चाडे आळवावें देवा । ओस देह भावा पाडोनियां ॥ २ ॥
साधनें घालिती काळाचिये मुखीं । गर्भवास सेखीं न चुकती ॥ ३ ॥
उधाराचा मोक्ष होय नव्हे ऐसा । पतनासी इच्छा आवश्यक ॥ ४ ॥
रोकडी पातली अंगसंगें जरा । आतां उजगरा कोठवरी ॥ ५ ॥
तुका ह्मणे घालीं नामासाटीं उडी । पांडुरंग थडी पाववील ॥ ६ ॥

॥ ४२९३ ॥

पाहुनियां ग्रंथ करावें कीर्तन । तेव्हां आलें जाण फळ त्याचें ॥ १ ॥
नाहीं तरी वांयां केली तोंडपिटी । उगी ते शेवटीं उरलीसे ॥ २ ॥
पढोनियां वेद हरिगुण गावे । ठावें तें जाणावें तेव्हां जालें ॥ ३ ॥
तपतीर्थाटणें तेव्हां कार्यसिद्धि। स्थिर राहे बुद्धि हरिच्या नामीं ॥ ४ ॥
यागयज्ञादिक काय दानधर्म । तरि फळ नाम कंठीं राहे ॥ ५ ॥
तुका ह्मणे नको काबाडाचे भरी । पडों सार धरीं हेंचि एक ॥ ६ ॥

॥ ४२९४ ॥

गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥ १ ॥ मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ २ ॥ आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥ ३ ॥ तुका ह्मणे आळी । जेंवी नुरेचि वेगळी ॥ ४ ॥

॥ ४२९५ ॥

ज्याचें जया ध्यान । तेंचि होय त्याचें मन ॥ १ ॥ ह्मणऊनि अवघें

सारा । पांडुरंग दृढ धरा ॥ २ ॥ सम खूण ज्याचे पाय । उभा व्यापक
विटे ठाय ॥ ३ ॥ तुका ह्मणे नभा । परता अनूचाही गाभा ॥ ४ ॥

॥ ४२९६ ॥

सुखें खावें अन्न । त्याचें करावें चिंतन ॥ १ ॥ त्याचें दिलें त्यासी ।
पावे फळ आपणासी ॥ २ ॥ आहे हा आधार । नाम त्याचें विश्वं-
भर ॥ ३ ॥ नाहीं रिता ठाव । तुका ह्मणे पसरीं भाव ॥ ४ ॥

॥ ४२९७ ॥

नाहीं देवापाशीं मोक्षाचें गांठोळें । आणूनि निराळें द्यावें हातीं ॥ १ ॥
इंद्रियांचा जय साधूनियां मन । निर्विषय कारण असे तेथें ॥ २ ॥
उपास पारणीं अक्षरांची अटी । सत्कर्मा शेवटीं असे फळ ॥ ३ ॥
आदरें संकल्प वारीं अतिशय । सहज तें काय दुःख जाण ॥ ४ ॥
सपनींच्या घायें विवळसी वांयां । रडें रडतियासवें मिथ्या ॥ ५ ॥
तुका ह्मणे फळ आहे मूळापाशीं । शरण देवासीं जाय वेगीं ॥ ६ ॥

॥ ४२९८ ॥

त्यजिलें भेटवी आणूनि वासना । दाविल्याचें जना काय काज ॥ १ ॥
आळवावें देवा भाकूनि करुणा । आपुलिया मना साक्ष करीं ॥ २ ॥
नाहीं जावें यावें दुरूनी लागत । आहे साक्षभूत अंतरींचा ॥ ३ ॥
तुका ह्मणे हा आहे कृपासिंधु । तोडी भवबंधु तात्काळिक ॥ ४ ॥

॥ ४२९९ ॥

संकोचोनि काय जालासी लाहान । घेई अपोशण ब्रह्मांडाचें ॥ १ ॥
करोनि पारणें आंचवें संसारा । उशीर उशिरा लावूं नको ॥ २ ॥
घरकुलानें होता पडिला अंधार । तेणें केलें फार कासावीस ॥ ३ ॥
झुगारूनि दुरी लपविलें काखे । तुका ह्मणे वाखे कवतुकाचे ॥ ४ ॥

॥ ४३०० ॥

माझ्या बापें मज दिधलें भातुकें । ह्मणोनि कवतुकें क्रीडा करीं ॥ १ ॥

केली आळी पुढें बोलिलों वचन । उत्तम हें ज्ञान आलें त्याचें ॥ २ ॥
घेऊनि विभाग जावें लवलाह्या । आलेती त्या ठाया आपुलिया ॥ ३ ॥
तुका ह्मणे ज्ञानदेवीं समुदाय । करावा मीं पाय येइन वंदूं ॥ ४ ॥

॥ ४३०१ ॥

जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ । अंगीं ऐसें बळ रेडा बोले ॥ १ ॥
करील तें काय नव्हे महाराज । परि पाहे बीज शुद्ध अंगीं ॥ २ ॥
जेणें हे घातली मुक्तीची गवांदी । मेळविली मांदी वैष्णवांची ॥ ३ ॥
तुका ह्मणे तेथें सुखा काय उणें । राहे समाधानें चित्ताचिया ॥ ४ ॥

॥ ४३०२ ॥

सेवकें करावें स्वामीचें वचन । त्यासी हूंतूं पण कामा नये ॥ १ ॥
घेईल जीव कां सारील परतें । भंगलिया चित्तें सांदीजेना ॥ २ ॥
खद्योतें दावावी रवी केवीं वाट । आपुलेंचि नीट उसंतावें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तो ज्ञानाचा सागर । परि नेदी अगर भिजों भेदें ॥ ४ ॥

## धरणेकऱ्यानें अभंग व नारळ टाकून दिल्याबद्दल ज्ञानेश्वर महाराजांस पत्र.

॥ ४३०३ ॥

चला आळंदीला जाऊं । ज्ञानदेवा डोळां पाहूं ॥ १ ॥ होतिल संतांचिया भेटी । सुखाचिया सांगों गोष्टी ॥ २ ॥ ज्ञानेश्वर ज्ञानेश्वर । मुखीं ह्मणतां चुकती फेर ॥ ३ ॥ तुह्मां जन्म नाहीं एक । तुका ह्मणे माझी भाक ॥ ४ ॥

॥ ४३०४ ॥

ज्ञानराजा माझा योग्याची माउली । जेणें निगमावली प्रगट केली ॥ १ ॥ छपन्न भाषेचा केलासे गौरव । भवार्णवीं नाव तरावया ॥ २ ॥ गीता अळंकारी नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंद लहरी प्रगटली ॥ ३ ॥ श्रवणाच्या मिसें बैसावें येवोनि । समरस होवोनि सुखें नांदा ॥ ४ ॥ अध्यात्म विद्येचें करूनियां रूप । उजळिला दीप चैतन्याचा ॥ ५ ॥ तुका ह्मणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओवी अनुभवीं ॥ ६ ॥

॥ ४३०५ ॥

तुह्मी येथें पाठविला धरणेकरी । त्याची जाली परी आइका ते ॥१॥
आतां काय पुढें वाढवूनि विस्तार । जाला समाचार आइका तो ॥२॥
देवाचे उचित एकादश अभंग । महाफळ त्याग करूनि गेला ॥ ३ ॥
तुका ह्मणे सेवा समर्पूनि पायीं । जालों उतराई ठावें असो ॥ ४ ॥

॥ ४३०६ ॥

बोलिलीं लेंकुरें । वेडीं वांकुडीं उत्तरें ॥ १ ॥ करा क्षमा अपराध । महाराज तुह्मी सिद्ध ॥ २ ॥ नाहीं विचारिला । अधिकार म्यां आपुला ॥ ३ ॥ तुका ह्मणे ज्ञानेश्वरा । राखा पायांपें किंकरा ॥ ४ ॥

॥ ४३०७ ॥

ज्ञानियांचा राजा[1] गुरु महाराव । ह्मणती ज्ञानदेव ऐसें तुह्मां ॥ १ ॥
मज पामरा हें काय थोरपण । पायींची वाहाण पायीं बरी ॥ २ ॥
ब्रह्मादिक जेथें तुह्मां वोळगणे । इतर तुळणे काय पुरे ॥ ३ ॥
तुका ह्मणे नेणे युक्तीची ते खोली । ह्मणोनि ठेविली पायीं डोई ॥ ४ ॥

## वाराणसीस यात्रा चालली त्यावेळीं दिलेलें पत्र.

॥ ४३०८ ॥

परिसें वो माते माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
भागीरथी महादोषनिवारणी । सकळां स्वामिणी तीर्थांचिये ॥ २ ॥
जितां भुक्ति मोक्ष मरणें तुझ्या तीरीं । अहिक्यपरत्रीं सुखरूप ॥ ३ ॥
तुका विष्णुदास संतांचें पोसणें । वाक्पुष्प तेणें पाठविलें ॥ ४ ॥

॥ ४३०९ ॥

तुह्मी विश्वनाथ । दीन रंक मी अनाथ ॥ १ ॥ कृपा कराल ते

पाठभेदः—१ गुरु राजा.

थोडी । पायां पडिलों बराडीं ॥ २ ॥ काय उणें तुह्मांपाशीं । मी तों अल्पेंचि संतोषी ॥३॥ तुका ह्मणे देवा । कांहीं भातुकें पाठवा ॥४॥

॥ ४३१० ॥

पिंड पद्मावरी । दिला आपुलिये करीं ॥ १ ॥ माझें जालें गयावर्जन । फिटलें पितरांचें ऋण ॥ २ ॥ केलें कर्मांतर । बोंब मारिली हरिहर ॥ ३ ॥ तुका ह्मणे माझें । भार उतरलें ओझें ॥ ४ ॥

## पंढरीस वारकरी चालले त्यावेळीं देवांस दिलेलें पत्र.

॥ ४३११ ॥

तुह्मी संतजनीं । माझी करावी विनवणी ॥ १ ॥ काय तुक्याचा अन्याय । त्यासी अंतरले पाय ॥ २ ॥ भाका बहुतां रीती । माझी कींव काकुलती ॥ ३ ॥ न देखे पंढरी । तुका चरण विटेवरी ॥ ४ ॥

॥ ४३१२ ॥

येती वारकरी । वाट पाहातों तोंवरी ॥ १ ॥ घालूनियां दंडवत । पुसेन निरोपाची मात ॥ २ ॥ पत्र हातीं दिलें । जयां जेथें पाठविलें ॥ ३ ॥ तुका ह्मणे येती । जाइन सामोरा पुढती ॥ ४ ॥

॥ ४३१३ ॥

रुळे महाद्वारीं । पायांखालील पायरी ॥ १ ॥ तैसें माझें दंडवत । निरोप सांगतील संत ॥ २ ॥ पडे दंडकाठी । देह भलतीसवा लोटी ॥ ३ ॥ तुका ह्मणे बाळ । लोळे न धरितां सांभाळ ॥ ४ ॥

॥ ४३१४ ॥

होइल कृपा दान । तरी मी येईन धांवोन ॥ १ ॥ होती संतांचिया भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ २ ॥ रिघेन मातेपुढें । स्तनपान करीन कोडें ॥ ३ ॥ तुका ह्मणे ताप । हरती देखोनियां बाप ॥ ४ ॥

पाठभेदः—१ अल्प. २ तया तेथें पाठविलें.

॥ ४३१५ ॥

परिसोनी उत्तर । जाब देईजे सत्वर ॥ १ ॥ जरी तूं होसी कृपावंत । तरि हा बोलावीं पतित ॥ २ ॥ नाणीं कांहीं मना । करूनि पापाचा उगाणा ॥ ३ ॥ तुका ह्मणे नाहीं । काय शक्ति तुझे पायीं ॥ ४ ॥

॥ ४३१६ ॥

कोणा मुखें ऐसी ऐकेन मी मात । चाल तुज पंढरिनाथ बोलावितो ॥१॥ मग मी न धरीं आस मागील बोभाट । वेगीं धरिन वाट माहेराची ॥२॥ निरांजलें चित्त करितें तळमळ । केधवां देखती मूळ आलें डोळे ॥३॥ तुका ह्मणे कई भाग्याची उजरी । होईल पंढरी देखावया ॥ ४ ॥

॥ ४३१७ ॥

समर्पक वाणी । नाहीं ऐकिजेसी कानीं ॥ १ ॥ आतां भावें करूनि साचा । पायां पडिलों विठोबाच्या ॥२॥ न कळे उचित । करूं समाधान चित्त ॥३॥ तुका ह्मणे विनंती । विनविली धरा चित्तीं ॥ ४ ॥

॥ ४३१८ ॥

कैंचा मज धीर । कोठें बुद्धि माझी स्थिर ॥ १ ॥ जें या मनासी आवरूं । आंत पोटीं वाव धरूं ॥ २ ॥ कैंची शुद्ध मति । भांडवल ऐसें हातीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे अंगा । कोण दशा आली सांगा ॥ ४ ॥

॥ ४३१९ ॥

पुढें तरी चित्ता । काय येईल तें आतां ॥ १ ॥ मज सांगोनियां धाडीं । वाट पाहातों बराडी ॥ २ ॥ कंठीं धरिला प्राण । पायांपाशीं आलें मन ॥ ३ ॥ तुका ह्मणे चिंता । बहु वाटतसे आतां ॥ ४ ॥

॥ ४३२० ॥

धरितां वासना परी नये फळ । प्राप्तीचा तो काळ नाहीं आला ॥१॥ तळमळी चित्त घातलें खापरीं । फुटतसे परी लाहीचिया ॥ २ ॥

प्रकार ते कांहीं नावडती जीवा । नाहीं पुढें ठावा काळ हातीं ॥ ३ ॥
जातों तळा येतों मागुताला वरी । वोळशाचे फेरी सांपडलों ॥ ४ ॥
तुका ह्मणे बहु करितों विचार । उतरें डोंगर एक चढें ॥ ५ ॥

॥ ४३२१ ॥

कां माझे पंढरी न देखती डोळे । काय हें न कळे पाप यांचें ॥ १ ॥
पाय पंथें कां हे न चलती वाट । कोण हें अदृष्ट कर्म बळी ॥ २ ॥
कां हें पायांवरी न पडे मस्तक । क्षेम कां हस्तक न पवती ॥ ३ ॥
कां या इंद्रियांची न पुरे वासना । पवित्र होईना जिव्हा कीर्ती ॥४॥
तुका ह्मणे कई जाऊनि मोटळें । पडेन हा लोळें महाद्वारीं ॥ ५ ॥

॥ ४३२२ ॥

किती करूं शोक । पुढें वाढे दुःखें दुःख ॥ १ ॥ आतां जाणसी तें करीं । माझें कोण मनीं धरी ॥२॥ पुण्य होतें गांठी । तरि कां लागती हे आटी ॥३॥ तुका ह्मणे जळ । माझी राहिली तळमळ ॥ ४ ॥

॥ ४३२३ ॥

कां माझा विसर पडिला मायबापा । सांडियेली कृपा कोण्या गुणें ॥१॥
कैसा कंठूनियां राहों संवसार । काय एक धीर देऊं मना ॥ २ ॥
नाहीं निरोपाची पावली वारता । करावी ते चिंता ऐसी कांहीं ॥३॥
तुका ह्मणे एक वेचूनि वचन । नाहीं समाधान केलें माझें ॥ ४ ॥

॥ ४३२४ ॥

कांहीं माझे कळों आले गुणदोष । ह्मणऊनि उदास धरिलें ऐसें ॥१॥
नाहीं तरी येथें न घडे अनुचित । नाहीं ऐसी रीत तया घरीं ॥२॥
कळावें तें मना आपुलिया सवें । ठायींचें हें घ्यावें विचारूनि ॥३॥
तुका ह्मणे मज अव्हेरिलें देवें । माझिया कर्तव्यें बुद्धीचिया ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ मागुता लौकरी.

॥ ४३२५ ॥

आतां पाहों पंथ माहेराची वाट । कामाचा बोभाट पडो सुखें ॥ १ ॥
काय करूं आतां न गमेसें जालें । बहुत सोसिलें बहु दिस ॥ २ ॥
घर लागे पाठी चित्ता उभे वारे । आपुलें तें झुरे पाहावया ॥ ३ ॥
तुका ह्मणे जीव गेला तरी जाव । धरिला तो देव भाव सिद्धी ॥ ४ ॥

॥ ४३२६ ॥

विनवीजे ऐसें भाग्य नाहीं देवा । पायांशीं केशवा सलगी केली ॥ १ ॥
धीटपणें पत्र लिहिलें आवडी । पार नेणे थोडी मति माझी ॥ २ ॥
जेथें देवा तुझा न कळेचि पार । तेथें मी पामर काय वाणूं ॥ ३ ॥
जैसे तैसे माझे बोल अंगीकारीं । बोबड्या उत्तरीं गौरवितो ॥ ४ ॥
तुका ह्मणे विटेवरि जीं पाउलें । तेथें म्यां ठेविलें मस्तक हें ॥ ५ ॥

॥ ४३२७ ॥

देवांच्याही देवा गोपिकांच्या पती । उदार हे ख्याती त्रिभुवनीं ॥ १ ॥
पातकांच्या रासी नासितोसी नामें । जळतील कर्मे महा दोष ॥ २ ॥
सर्व सुखें तुझ्या वोळगती पायीं । रिद्धि सिद्धि ठायीं मुक्ति चारी ॥ ३ ॥
इंद्रासी दुर्लभ पाविजे तें पद । गीत गातां छंद वाहातां टाळी ॥ ४ ॥
तुका ह्मणे जड जीव शक्तिहीन । त्यांचें तूं जीवन पांडुरंगा ॥ ५ ॥

॥ ४३२८ ॥

काय जालें नेणों माझिया कपाळा । न देखिजे डोळां मूळ येतां ॥ १ ॥
बहु दिस पाहें वचनाची वास । धरिलें उदास पांडुरंगा ॥ २ ॥
नाहीं निरोपाचें पावलें उत्तर । ऐसें तों निष्ठुर न पाहिजे ॥ ३ ॥
पडिला विसर किंवा कांहीं धंदा । त्याहूनि गोविंदा जरूरसा ॥ ४ ॥
तुका ह्मणे आलें वेचाचें सांकडें । देणें घेणें पुढें तोही धाक ॥ ५ ॥

---

पाठभेदः—१ तों उतर निष्ठुर.

॥ ४३२९ ॥

कांहीं चिंतेविण । नाहीं उपजत सीण ॥ १ ॥ तरी हा पडिला वि-
सर । माझा तुह्मां जाला भार ॥ २ ॥ आली कांहीं तुटी । गेली
सुटोनियां गांठी ॥३॥ तुका ह्मणे घरीं । बहु बैसले रिणकरी ॥ ४ ॥

॥ ४३३० ॥

एवढा संकोच तरि कां व्यालासी । आह्मी कोणांपाशीं तोंड वासूं ॥१॥
कोण मज पुसे सिणलें भागलें । जरी मोकलिलें तुह्मीं देवा ॥ २ ॥
कवणाची वाट पाहों कोणीकडे । कोण मज ओढे जीवलग ॥ ३ ॥
कोण जाणे माझे जीवींचें सांकडें । उगवील कोडें संकटाचें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तुह्मी देखिली निश्चिंती । काय माझे चित्तीं पांडुरंगा ॥५॥

॥ ४३३१ ॥

काय पोरें जालीं फार । किंवा न साहे करकर ॥ १ ॥ ह्मणऊनि
केली सांडी । घांस घेऊं ल्हांन तोंडीं ॥ २ ॥ करूं कलागती । तुज
भांडणें भोंवतीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे टांचें । घरीं जालेंसे[1]वरोचें ॥ ४ ॥

॥ ४३३२ ॥

जोडी कोणांसाटीं । एवढी करितोसी आटी ॥ १ ॥ जरी हें आह्मां
नाहीं सुख । रडों पोरें पोटीं भूक ॥ २ ॥ करूनि जतन । कोणा
देसील हें धन ॥ ३ ॥ आमचे तळमळे । तुझें होईल वाटोळें ॥ ४ ॥
घेसील हा श्राप । माझा होऊनियां बाप ॥ ५ ॥ तुका ह्मणे हरी ।
आतां न ठेवीं यावरी ॥ ६ ॥

॥ ४३३३ ॥

समर्थाचे पोटीं । आह्मी जन्मलों करंटीं ॥ १ ॥ ऐसी जाली जगीं
कीर्ति । तुझ्या नामाची फजिती ॥२॥ येथें नाहीं खाया । न ये कोणी
मूळ न्याया ॥ ३ ॥ तुका ह्मणे जिणें । आतां खोटें जीवपणें ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ जालेंसे वरोचें.

॥ ४३३४ ॥

देईं डोळे भेटी न धरीं संकोच । न घलीं कांहीं वेच तुजवरी ॥ १ ॥
तुज बुडवावें ऐसा कोण धर्म । अहर्निशीं नाम घेतां थोडें ॥ २ ॥
फार थोडें कांहीं करूनि पातळ । त्याजमध्यें काळ कडे लावूं ॥ ३ ॥
आहे माझी तेचि सारीन सिदोरी । भार तुजवरी नेदीं माझा ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मां लेंकराची जाती । भेटावया खंती वाटतसे ॥ ५ ॥

॥ ४३३५ ॥

करील आबाळी । माझ्या दांताची कसाळी ॥ १ ॥ जासी एखादा मरोन । पाठी लागेल हें जन ॥ २ ॥ घरीं लागे कळ्ह[1] । नाहीं जात तो शीतळ ॥ ३ ॥ तुका ह्मणे पोरवडे । मज येतील रोकडे ॥ ४ ॥

॥ ४३३६ ॥

जोडीच्या हव्यासें । लागे धनांचेंचि पिसें ॥ १ ॥ मग आणीक दुसरें । लोभ्या नावडती पोरें ॥ २ ॥ पाहे रुक्याकडे । मग अवघें ओस पडे ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । तुला बहुतचि हेवा ॥ ४ ॥

॥ ४३३७ ॥

सीण भाग हरे तेथींच्या निरोपें । देखिलिया रूप उरी नुरे ॥ १ ॥
इंद्रियांची धांव होईल कुंठित । पावेल हें चित्त समाधान ॥ २ ॥
माहेर आहेसें लौकिकीं कळावें । निढळ बरवें शोभा नेदी ॥ ३ ॥
आस नाहीं परी उरी बरी वाटे । आपलें तें भेटे आपणासी ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझी अविट आवडी । खंडण तांतडी होऊं नेदीं ॥ ५ ॥

॥ ४३३८ ॥

ऐकोनियां कीर्ति । ऐसी वाटती विश्रांती ॥ १ ॥ माते सुख डोळां पडे । तेथें कोण लाभ जोडे ॥ २ ॥ बोलतां ये वाचे । वीट नये जिव्हा नाचे ॥ ३ ॥ तुका ह्मणे धांवे । वासना ते रस घ्यावे ॥ ४ ॥

---

पाठभेद:—१ कळ, कल्हे.

॥ ४३३९ ॥

न बैससी खालीं । सम उभाच पाउलीं ॥ १ ॥ ऐसे जाले बहुत दिस । जालीं युगें अठ्ठाविस ॥ २ ॥ नाहीं भाग सीण । अराणूक एक क्षण ॥ ३ ॥ तुका ह्मणे किती । मापें केलीं देती घेती ॥ ४ ॥

॥ ४३४० ॥

मविलें मविती । नेणों रासी पडिल्या किती ॥ १ ॥ परि तूं धालाचि न धासी । आलें उभाउभीं घेसी ॥ २ ॥ अवघ्यां अवघा काळ । वाटा पाहाती सकळ ॥३॥ तुका ह्मणे नाहीं । अराणूक तुज कांहीं ॥४॥

॥ ४३४१ ॥

करूनि चाहाडी । अवघी बुडवीन जोडी ॥ १ ॥ जरि तूं होऊनि उदास । माझी बुडविसी आस ॥ २ ॥ येथें न करीं काम । मुखें नेघें तुझें नाम ॥ ३ ॥ तुका ह्मणे कुळ । तुझें बुडवीन समूळ ॥ ४ ॥

॥ ४३४२ ॥

निरोपासी वेचे । काय बोलतां फुकाचें ॥ १ ॥ परि हें नेघेवेचि यश । भेओं नको सुखी आस ॥ २ ॥ सुख समाधानें । कोण पाहे देणें घेणें ॥३॥ न लगे निरोपासी मोल । तुका ह्मणे वेचे बोल ॥ ४ ॥

॥ ४३४३ ॥

नव्हे धीर कांहीं पाठवूं निरोप । आला तरी कोप येऊ सुखें ॥ १ ॥
कोपोनियां तरी देईल उत्तर । जैसें तैसें पर फिरावूनि ॥ २ ॥
नाहीं तया तरी काय एक पोर । मज तों माहेर आणीक नाहीं ॥३॥
तुका ह्मणे असे तयामध्यें हित । आपण निवांत असों नये ॥ ४ ॥

॥ ४३४४ ॥

आतां आसीर्वाद । माझा असो सुखें नांद ॥ १ ॥ ह्मणसी कोणा तरी काळें । आहेतसीं माझीं बाळें ॥ २ ॥ दुरी दूरांतर । तरी घेसी समाचार ॥ ३ ॥ नेसी कधीं तरी । तुका ह्मणे लाज हरी ॥ ४ ॥

॥ ४३४५ ॥

आतां हे सेवटीं । माझी आइकावी गोष्टी ॥ १ ॥ आतां द्यावा वचनाचा । जाब कळे तैसा याचा ॥ २ ॥ आतां करकर । पुढें न करीं उत्तर ॥ ३ ॥ तुका ह्मणे ठसा । तुझा आहे राखें तैसा ॥ ४ ॥

॥ ४३४६ ॥

बोलिलों तें आतां । कांहीं जाणतां नेणतां ॥ १ ॥ क्षमा करावे अन्याय । पांडुरंगे माझे माय ॥ २ ॥ स्तुती निंदा केली । लागे पाहिजे साहिली ॥३॥ तुका ह्मणे लाड । दिला तैसें पुरवा कोड ॥४॥

## वारकरी परत येईपर्यंत मनाची स्थिति.

॥ ४३४७ ॥

माहेरींचा काय येईल निरोप । ह्मणऊनि झोंप नाहीं डोळां ॥ १ ॥
वाट पाहें आस धरूनियां जीवीं । निडळा हे ठेवीं वरी बाहे ॥ २ ॥
वाटेवरी माप लेखितों दिवस । होतों कासावीस धीर नाहीं ॥ ३ ॥
काय नेणों संतां पडिला[1] विसर । कीं नव्हे सादर मायबाप ॥ ४ ॥
तुका ह्मणे तेथें होईल दाटणी । कोण माझें आणी मना तेथें ॥ ५ ॥

॥ ४३४८ ॥

परि तो आहे कृपेचा सागर । तोंवरी अंतर पडों नेदी ॥ १ ॥
बहुकानदृष्टी आइके देखणा । पुरोनियां जना उरलासे ॥ २ ॥
सांगितल्याविणें जाणें अंतरिंचें । पुरवावें ज्याचें तैसें कोड ॥ ३ ॥
बहुमुखें कीर्ती आइकली कानीं । विश्वासही मनीं आहे माझ्या ॥ ४ ॥
तुका ह्मणे नाहीं जात वांयांविण । पाळितों वचन बोलिलों तें ॥ ५ ॥

॥ ४३४९ ॥

यावरि न कळे संचित आपुलें । कैसें वोडवलें होइल पुढें ॥ १ ॥
करील विक्षेप धाडितां मुळासी । किंवा धाडा ऐसी तांतडी हे ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ पडेल.

जोंवरी हे डोळां देखे वारकरी । तों हें भरोंवरी करी चित्त ॥ ३ ॥
आस वाढविते बुद्धीचे तरंग । मनाचेही वेग वावडती ॥ ४ ॥
तुका ह्मणे तेव्हां होतील निश्चळ । इंद्रियें सकळ निरोपानें ॥ ५ ॥

॥ ४३५० ॥

होईल निरोप घेतला यावरी । राऊळाभीतरीं जाऊनियां ॥ १ ॥
करूनियां दधिमंगळभोजन । प्रयाण शकुनसुमुहूर्ते ॥ २ ॥
होतील दाटले सद्गदीत कंठीं । भरतें या पोटीं वियोगाचें ॥ ३ ॥
येरयेरां भेटी क्षेम आलिंगनें । केलीं समाधानें होतीं संतीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे चाली न साहे मनास । पाहाती कळस परतोनी[1] ॥ ५ ॥

॥ ४३५१ ॥

ऐसी ते सांडिली होईल पंढरी । येत वारकरी होते वाटे ॥ १ ॥
देखिले सोहळे होती आठवत । चालती ते मात करूनियां ॥ २ ॥
केली आइकिली होईल जे कथा । गाहिलें तें चित्ता होइल प्रेम ॥३॥
गरुडटके टाळ मृदंग पताका । सांगती ते एकांएक सुख ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां येती लवलाहीं । आलिंगूनि बाहीं देइन क्षेम ॥ ५ ॥

॥ ४३५२ ॥

क्षेम मायबाप पुसेन हें आधीं । न घलीं हें मधीं सुखदुःख ॥ १ ॥
न करीं तांतडी आपणांपासूनि । आइकेन कानीं सांगती तें ॥ २ ॥
अंतरींचें संत जाणतील गूज । निरोप तो मज सांगतील ॥ ३ ॥
पायांवरी डोई ठेवीन आदरें । प्रीतिपडिभरें आळिंगून ॥ ४ ॥
तुका ह्मणे काया करीन कुरवंडी । ओंवाळून सांडीं त्यावरून ॥ ५ ॥

॥ ४३५३ ॥

होइल माझी संतीं भाकिली करुणा । जे त्या नारायणा मनीं बैसे ॥१॥
शृंगारूनि माझीं बोबडीं उत्तरें । होतील विस्तारें सांगितलीं ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ पर परतों.

क्षेम आहे ऐसें होइल सांगितलें । पाहिजे धाडिलें शीघ्र मूळ ॥ ३ ॥
अवस्था जे माझी ठावी आहे संतां । होइल कृपावंता निरोपिली ॥४॥
तुका ह्मणे सवें येईल मुऱ्हाळी । किंवा कांहीं उरी राखतील ॥ ५ ॥

॥ ४३५४ ॥

दोहींमध्यें एक घडेल विश्वासें । भातुकें सरिसें मूळ तरी ॥ १ ॥
करिती निरास निःशेष न घडे । कांहीं तरी ओढे चित्त माये ॥ २ ॥
लौकिकाची तरी धरितील लाज । काय माझ्या काज आचरणें ॥३॥
अथवा कोणाचें घेणें लागे रीण । नाहीं तरी हीनें कर्मीं कांहीं ॥४॥
व्यालीचिये अंगीं असती वेधना । तुका ह्मणे मना मन साक्ष ॥ ५ ॥

॥ ४३५५ ॥

बैसतां कोणापें नाहीं समाधान । विवरे हें मन तेचि सोई ॥ १ ॥
घडीघडी मज आठवे माहेर । न पडे विसर क्षणभरी ॥ २ ॥
न बोलावें ऐसा करितों विचार । प्रसंगीं तो फार आठवतें ॥ ३ ॥
इंद्रियांसी वाहो पडिली ते चाली । होती विसांवली येचि ठायीं ॥४॥
एकसरें सोस माहेरासी जावें । तुका ह्मणे जीवें घेतलासे ॥ ५ ॥

॥ ४३५६ ॥

नाहीं होनि परी न रहावे निसुर । न पडे विसर काय करूं ॥ १ ॥
पुसाविसी वाटे मात कापडियां । पाठविती न्याया मूळ मज ॥ २ ॥
आणीक या मना नावडे सोहळा । करितें टकळा माहेरींचा ॥ ३ ॥
बहु कामें केलें बहु कासावीस । बहु जाले दिस भेटी नाहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे त्याचें न कळे अंतर । अवस्था तों फार होते मज ॥ ५ ॥

॥ ४३५७ ॥

तोंवरी म्यां त्यास कैसें निषेधावें । जों नाहीं बरवें कळों आलें ॥१॥
कोणाचिया मुखें तंट नाहीं मागें । वचन वाउगें बोलों नये ॥ २ ॥

पाठभेदः—१ हीनकर्मी. २ हाति.

दिसे हानि परी निरास न घडे । हे तंव रोकडे अनुभव ॥ ३ ॥
आपुलिये भोगें होईल उशीर । तोंवरि कां धीर केला नाहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे गोड करील सेवट । पाहिली ते वाट ठावी आहे ॥ ५ ॥

॥ ४३५८ ॥

माहेरींचें आलें तें मज माहेर [1] सुखाचें उत्तर करिन त्यासी ॥ १ ॥
पायांवरी माथा आलिंगीन बाहीं । घेईन लवलाहीं पायवणी ॥ २ ॥
सुख समाचार पुसेन सकळ । कैसा पर्वकाळ आहे त्यास ॥ ३ ॥
आपुले जीवींचें सुखदु:ख भावें । सांगेन अघवें आहे तैसें ॥ ४ ॥
तुका ह्मणे वीट नेघें आवडीचा । बोलिलीच वाचा बोलवीन ॥ ५ ॥

॥ ४३५९ ॥

वियोग न घडे सन्निध वसलें । अखंड राहिलें होय चित्तीं ॥ १ ॥
विसरु न पडे विकल्प न घडे । आलें तें आवडे तया पंथें ॥ २ ॥
कामाचा विसर नाठवे शरीर । रसना मधुर नेणे फिकें ॥ ३ ॥
निरोपासी काज असो अनामिक । निवाडितां एक नये मज ॥ ४ ॥
तुका ह्मणे हित चित्तें ओढियेलें । जेथें तें उगलें जावें येणें ॥ ५ ॥

॥ ४३६० ॥

आतां माझे सखे येती वारकरी । जीवा आस थोरी लागलीसे ॥१॥
सांगतील माझ्या निरोपाची मात । सकळ वृत्तांत माहेरींचा ॥ २ ॥
काय लाभ जाला काय होतें केणें । काय काय कोणें सांटविलें ॥३॥
मागणें तें काय धाडिलें भातुकें । पुसेन तें सुखें आहेतसी ॥ ४ ॥
तुका ह्मणे काय सांगती ते कानीं । ऐकोनियां मनीं धरुनी राहें ॥५॥

॥ ४३६१ ॥

काय करावें म्यां केले ते विचार । घडेल साचार काय पाहों ॥ १ ॥
काय मन नाहीं धरीत आवडी । प्रारब्धीं जोडी तेचि खरी ॥ २ ॥

पाठभेद:—१ ठायीं.

काय म्यां तेथींचें रांधिलें चाखोनी । तें हें करी मनीं विवंचना ॥ ३ ॥
आणीकही त्यासी बहुत कारणें । बहु असे जिणें ओढीचेंही ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मां बोळविल्यावरी । परती माघारी केली नाहीं ॥ ५ ॥

॥ ४३६२ ॥

आह्मां अराणूक संवसारा हातीं । पडिली नव्हती आजिवरी ॥ १ ॥
पुत्रदाराधन होता मनीं धंदा । गोवियेलों सदा होतों कामें ॥ २ ॥
वोडवलें ऐसें दिसतें कपाळ । राहिलें सकळ आवरोनि ॥ ३ ॥
मागें पुढें कांहीं न दिसे पाहातां । तेथूनियां चिंता उपनली ॥ ४ ॥
तुका ह्मणे वाट पाह्याचे कारण । येथींचिया हीन जालें भाग्य ॥ ५ ॥

॥ ४३६३ ॥

बहु दिस नाहीं माहेरींची भेटी । जाली होती तुटी व्यवसायें ॥ १ ॥
आपुलाल्या होतों गुंतलों व्यासंगें । नाहीं त्या प्रसंगें आठवलें ॥ २ ॥
तोडिलें तुटतें जडती जडलें । आहे तें आपुलें आपणापें ॥ ३ ॥
बहु निरोपाचें पावलें उत्तर । जवळीच पर एक तेंही ॥ ४ ॥
काय जाणों मोह होईल सांडिला । बहु दिस तुटला तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४३६४ ॥

होतीं नेणों जालीं कठिणें कठीण । जवळीच मन मनें ग्वाही ॥ १ ॥
आह्मी होतों सोई सांडिला मारग । घडलें तें मग तिकूनही ॥ २ ॥
निश्चिंतीनें होते पुढिलांची सांडी । न चाली ते कोंडी मायबापा ॥ ३ ॥
आह्मां नाहीं त्यांचा घडिला आठव । त्यांचा बहु जीव विखुरला ॥ ४ ॥
तुका ह्मणे जालें धर्माचें माहेर । पडिलें अंतर आह्मांकूनि ॥ ५ ॥

॥ ४३६५ ॥

आतां करावा कां सोस वांयांविण । लटिकाचि सीण मनासी हा ॥ १ ॥
असेल तें कळों येईल लवकरी । आतां वारकरी आल्यापाठी ॥ २ ॥
बहु विलंबाचें सान्निध पातलें । धीराचें राहिलें फळ पोटीं ॥ ३ ॥

चालिलें तें ठावें पावेल सेवटीं । पुरलिया तुटी पाउलांची ॥ ४ ॥
तुका ह्मणे आसे लागलासे जीव । ह्मणऊनि कींव भाकीतसें ॥ ५ ॥

## वारकरी परत आल्यानंतरचे अभंग.

॥ ४३६६ ॥

भागलेती देवा । माझा नमस्कार घ्यावा ॥ १ ॥ तुह्मी क्षेम कीं सकळ । बाळ अवघे गोपाळ ॥ २ ॥ मारगीं चालतां । श्रमलेती येतां जातां ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं । कृपा आहे माझ्या ठायीं ॥ ४ ॥

॥ ४३६७ ॥

घालूनियां ज्योती । वाट पाहें दिवसराती ॥ १ ॥ बहु उताविळ मन । तुमचें व्हावें दरुषण ॥ २ ॥ आलों बोळवीत । तैसें याचि पंथें चित्त ॥ ३ ॥ तुका ह्मणे पेणी । येतां जातां दिवस गणीं ॥ ४ ॥

॥ ४३६८ ॥

आजि दिवस धन्य । तुमचें जालें दरुषण ॥ १ ॥ सांगा माहेरींची मात । अवघा विस्तारीं वृत्तांत ॥२॥ आइकतों मन । करूनि सादर श्रवण ॥३॥ तुका ह्मणे नाम । माझा सकळ संभ्रम ॥ ४ ॥

॥ ४३६९ ॥

बोलिलीं तीं काय । माझा बाप आणि माय ॥१॥ ऐसें सांगा जी झडकरी । तुह्मी सखे वारकरी ॥ २ ॥ पत्राचें वचन । काय दिलें फिरावून ॥ ३ ॥ तुका ह्मणे कांहीं । मना आणिलें कीं नाहीं ॥ ४ ॥

॥ ४३७० ॥

काय पाठविलें । सांगा भातुकें विठ्ठलें ॥ १ ॥ आसे लागलासे जीव । काय केली माझी कींव ॥ २ ॥ फेडिलें मुडतर । किंवा कांहीं जरजर ॥ ३ ॥ तुका ह्मणे सांगा । कैसे आर्त पांडुरंगा ॥ ४ ॥

॥ ४३७१ ॥

आजिचिया लाभें ब्रह्मांड ठेंगणें । सुखी जालें मन कल्पवेना ॥ १ ॥
आर्तभूत माझा जीव जयांसाठीं । त्यांच्या जाल्या भेटी पायांसवें ॥२॥
वाटुली पहातां सिणले नयन । बहु होतें मन आर्तभूत ॥ ३ ॥
माझ्या निरोपाचें आणिलें उत्तर । होइल समाचार सांगती तो ॥ ४ ॥
तुका ह्मणे भेटी निवारला ताप । फळले संकल्प संत आले ॥ ५ ॥

॥ ४३७२ ॥

आजि बरवें जालें । माझें माहेर भेटलें ॥ १ ॥ डोळां देखिले सज्जन । निवारला भाग सीण ॥ २ ॥ धन्य जालों आतां । क्षेम देऊनियां संतां ॥ ३ ॥ इच्छेचें पावलों । तुका ह्मणे धन्य जालों ॥४॥

॥ ४३७३ ॥

वोरसोनि येती । वत्सें धेनुवेच्या चित्तीं ॥ १ ॥ माझा करा[1] सांभाळ । वोरसोनियां कृपाळ ॥ २ ॥ स्नेहें भूक तान । विसरती जाले सीण ॥ ३ ॥ तुका ह्मणे कवतुकें । दिलें प्रेमाचें भातुकें ॥ ४ ॥

॥ ४३७४ ॥

आलें तें आधीं खाईन भातुकें । मग कवतुकें गाईन ओंव्या ॥ १ ॥
सांगितला आधीं आइकों निरोप । होइल माझा बाप पुसे तो तें ॥२॥
तुका ह्मणे माझे सखे वारकरी । आले हे माहेरीहून आजि ॥ ३ ॥

॥ ४३७५ ॥

आमुप जोडल्या सुखाचिया रासी । पार त्या भाग्यासी नाहीं आतां ॥१॥
काय सांगों सुख जालें आलिंगनें । निवाली दर्शनें कांति माझी ॥ २ ॥
तुका ह्मणे यांच्या उपकारासाटीं । नाहीं माझ्या गांठी कांहीं एक ॥३॥

॥ ४३७६ ॥

पवित्र व्हावया घालीन लोळणी । ठेवीन चरणीं मस्तक हें ॥ १ ॥

---

पाठभेदः—१ करावा.

जोडोनि हस्तक करीन विनवणी । घेईन पायवणी धोवोनियां ॥ २ ॥
तुका ह्मणे माझें भांडवल सुचें । संतां हे ठायींचे ठावें आहे ॥ ३ ॥

## अनघडसिद्धाच्या शब्दानें रामेश्वरास झालेला दाह या अभंगानें शमला.

॥ ४३७७ ॥

चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र ही न खाती सर्प तया ॥ १ ॥
विष तें अमृत आघात तें हित । अकर्तव्य नीत होय त्यासी ॥ २ ॥
दुःख तें देईल सर्व सुख फळ । होतील शीतळ अग्निज्वाळा ॥ ३ ॥
आवडेल जीवां जिवाचिये परी । सकळां अंतरीं एक भाव ॥ ४ ॥
तुका ह्मणे कृपा केली नारायणें । जाणिजेते येणें अनुभवें ॥ ५ ॥

## तुकोबाचें अभंगांतील नांव काढून सालोमालो यांनीं आपलें नांव घातलें त्याबद्दल त्यांचा निषेध.

॥ ४३७८ ॥

नाहीं घाटावें लागत । एका सितें कळे भात ॥१॥ क्षीर निवडितें पाणी । चोंची हंसाचिये आणी ॥ २ ॥ आंगडें फाडुनि घोंगडें करी । अवकळा तये परी ॥३॥ तुका ह्मणे कण । भुसीं निवडे कैंचा सीण ॥ ४ ॥

॥ ४३७९ ॥

सालोमालो हरिचे दास । ह्मणउन केला अवघा नास ॥ १ ॥ अवघें बचमंगळ केलें । ह्मणती एकाचें आपुलें ॥ २ ॥ मोडूनि संतांचीं वचनें करिती आपणां भूषणें ॥३॥ तुका ह्मणे कवी । जगामधीं रूढ दावी ॥४॥

॥ ४३८० ॥

कालवूनि विष । केला अमृताचा नास ॥ १ ॥ ऐशा अभाग्याच्या बुद्धि । सत्य लोपी नाहीं शुद्धि ॥ २ ॥ नाक कापुनि लावी सोनें । कोण अळंकार तेणें ॥३॥ तुका ह्मणे बावी । मोडूनि मदार बांधावी ॥४॥

॥ ४३८१ ॥

कण भुसाच्या आधारें । परि तें निवडितां बरें ॥ १ ॥ काय घों-गाणी पाधाणी । ताकामध्यें घाटी लोणी ॥ २ ॥ सुइणीपुढें चेंटा । काय लपविसी चाटा ॥३॥ तुका ह्मणे ज्ञान । दिमाकाची भनभन ॥ ४॥

॥ ४३८२ ॥

जायांचे अळंकार । बुडवूनि होती चोर ॥ १ ॥ त्यांसी ताडणाची पूजा । योग घडे बऱ्या वोजा ॥ २ ॥ अभिलाषाच्या सुखें । अंतीं होती काळीं मुखें ॥३॥ तुका ह्मणे चोरा । होय भूषण मातेरा ॥४॥

॥ ४३८३ ॥

विकल तेथें विका । माती नांव ठेवूनि बुका ॥१॥ हा तो निवाड्याचा ठाव । खऱ्या खोट्या निवडी भाव ॥२॥ गऱ्हवारे हा विधि । पोट वाढविलें चिंधी ॥३॥ लावूं जाणे विल्हे । तुका साच आणिक कल्हे ॥ ४ ॥

॥ ४३८४ ॥

विषयीं अद्वये । त्यासी आह्मां सिवों नये ॥ १ ॥ देव तेथूनि निराळा । असे निष्काम वेगळा ॥ २ ॥ वासनेची बुंथी । तेथें कैंची ब्रह्मस्थिति ॥३॥ तुका ह्मणे असतां देहीं । तेथें नाहीं जमतीं ॥ ४ ॥

॥ ४३८५ ॥

नमितों या देवा । माझी एके ठायीं सेवा ॥ १ ॥ गुणअवगुण निवाडा । ह्मैस ह्मैस रेडा रेडा ॥ २ ॥ जनीं जनार्दन । साक्ष त्यासी लोटांगण ॥ ३ ॥ तुका ह्मणे खडे । निवडूं दळणीं घडघडे ॥ ४ ॥

## चिंचवडचे महागणपतिभक्त चिंतामणिदेव यांच्याशीं तुकोबाचें भाषण.

॥ ४३८६ ॥

चिंतामणि देवा, गणपतीसी आणा । करवावें भोजना दुजे पात्रीं ॥ १ ॥

देव ह्मणती तुक्या एवढी कैंची थोरी । अभिमानाभीतरी नागवलें ॥ २ ॥
वाढ वेळ जाला सिळें जालें अन्न । तटस्थ ब्राह्मण बैसलेती ॥ ३ ॥
तुका ह्मणे देवा तुमच्या सुकृतें । आणीन त्वरित मोरयासी ॥ ४ ॥

॥ ४३८७ ॥

वांजा गाई दुभती । देवा ऐसी तुझी ख्याति ॥ १ ॥ ऐसें मागत नाहीं तुज । चरण दाखवावे मज ॥ २ ॥ चातक पाखरूं । त्यासी वर्षे मेघधारु ॥ ३ ॥ पक्षी राजहंस । अमोलिक मोतीं त्यास ॥ ४ ॥ तुका ह्मणे देवा । कां गा खोचलासी जीवा ॥ ५ ॥

॥ ४३८८ ॥

भोक्ता नारायण लक्षुमीचा पति । ह्मणोनि प्राणाहुती घेतलिया ॥ १ ॥
भर्ता आणि भोक्ता कर्त्ता आणि करविता । आपण सहजता पूर्णकाम॥२॥
विश्वीं विश्वंभर कृपादृष्टी सांभाळीत । प्रार्थना करीत ब्राह्मणांची ॥ ३ ॥
कवळोकवळीं नाम घ्यावें गोविंदाचें । भोजन भक्तांचें तुका ह्मणे ॥४॥

॥ ४३८९ ॥

माझा स्वामी तुझी वागवितो लात । तेथें मी पतित काय आलों ॥१॥
तीर्थें तुमच्या चरणीं जाहालीं निर्मळ । तेथें मी दुर्बळ काय वाणूं ॥२॥
तुका ह्मणे तुह्मी देवा द्विजवंद्य । मी तों काय निंद्य हीन याति ॥ ३ ॥

॥ ४३९० ॥

परतें मी आहें सहजचि दुरी । वेगळें भिकारी नामरूपा ॥ १ ॥
नलगे रुसावें धरावा संकोच । सहज तें नीच आले भागा ॥ २ ॥
पडिलिये ठायीं उच्छिष्ट सेवावें । आर्थ तेंचि देवें केलें ऐसें ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुह्मी आह्मां जी वेगळे । केलेती निराळे द्विज देवें ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ हा शब्द नाहीं.

## एका ब्रह्मचाऱ्याचा निषेध.

॥ ४३९१ ॥

काखे कडासन आड पडे । खडबड खडबडे हुसकलें ॥ १ ॥ दाद-करा दाद्करा । फजितखोरा लाज नाहीं ॥ २ ॥ अवघा जाला राम राम । कोणी कर्म[1] आचरेना ॥ ३ ॥ हरिदासांच्या पडती पायां । ह्मणती तयां नागवावें ॥ ४ ॥ दोहीं ठायीं फजीत जाले । पारणें केलें अवकळा ॥५॥ तुका ह्मणे नाश केला । विटंबिला वेश जिहीं[2] ॥६॥

॥ ४३९२ ॥

तारतिम बरी तोंडाच पुरतें । अंतरा हें येतें अंतरींचें ॥ १ ॥ ऐसी काय बरी दिसे ठकाठकी । दिसतें लौकिकीं सत्या ऐसें ॥ २ ॥ भोजनांत द्यावें विष कालवूनि । मोह्चाळवणी मारावया ॥ ३ ॥ तुका ह्मणे मैंद देखों नेदी कुडें । आदरेंचि पुढें सोंग दावी ॥ ४ ॥

॥ ४३९३ ॥

ब्रह्मनिष्ठ काडी । जरी जीवानांवें मोडी ॥ १ ॥ तया घडली गुरु-हत्या । गेला उपदेश तो मिथ्या ॥ २ ॥ सांगितलें कानीं । रूप आपुलें वाखाणी ॥ ३ ॥ भूतांच्या मत्सरें । ब्रह्मज्ञान नेलें चोरें ॥ ४ ॥ शिकल्या सांगे गोष्टी । भेद क्रोध वाहे पोटीं ॥ ५ ॥ निंदा स्तुति स्तवनीं । तुका ह्मणे वेंची वाणी ॥ ६ ॥

॥ ४३९४ ॥

कुटुंबाचा केला त्याग । नाहीं राग जंव गेला ॥ १ ॥ भजन तें वोंगळ-वाणें । नरका जाणें चुकेना ॥२॥ अक्षराची केली आटी । जरी पोटीं संत निंदा ॥३॥ तुका ह्मणे मागें पाय । तया जाय स्थळासी ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ वर्म. २ जिणें.

## तुकोबास मंबाजी गोसाव्यानें मारिलें त्याच्या परिहाराबद्दल देवाजवळ मागणें.

॥ ४३९५ ॥

आजि शिवला मांग । माझें विटाळलें आंग ॥ १ ॥ यासी घेऊं प्रायश्चित्त । विठ्ठल विठ्ठल हृदयांत ॥ २ ॥ जाली क्रोधासी भेटी । तोंडावाटे नर्क लोटी ॥३॥ अनुतापीं न्हाऊं । तुका ह्मणे रवी पाहूं ॥ ४ ॥

॥ ४३९६ ॥

न सोडीं न सोडीं न सोडीं । विठोबा चरण न सोडीं ॥ १ ॥ भलतें जड पडो भारी । जीवावरी आगोज ॥२॥ शतखंड देह शस्त्रधारी । करितां परी न भीयें ॥३॥ तुका ह्मणे केली आधीं । दृढ बुद्धि सावध ॥४॥

॥ ४३९७ ॥

बरवें बरवें केलें विठोबा बरवें । पाहोनि आंत[1] क्षमा अंगीं काांटीवरी मारविलें ॥ १ ॥ शिव्या गाळी नीत नाहीं । बहु फार विटंबिलें ॥ २ ॥ तुका ह्मणे क्रोधा हातीं । सोडवूनि घेतलें रे ॥ ३ ॥

॥ ४३९८ ॥

पावलों पावलों । देवा पावलों रे ॥ १ ॥ बरवें संचित होतें तैसें जालें रे । आतां काय बोलों रे ॥ २ ॥ सोज्वळें[2] कंटकवाटा भावें करूं गेलों रें । तुका ह्मणे करूनि वेगळा केलों रे ॥ ३ ॥

॥ ४३९९ ॥

कां होती कां होती । देवा एवढी फजीती ॥ १ ॥ मुळीं वर्म नसतों चुकलों । तो मी ऐसें चिर्त्ती ॥ २ ॥ होणार होऊनि गेलें । मिथ्या आतां खंती रे ॥३॥ तुका ह्मणे पुरे आतां । दुर्जनाची संगती रे[3] ॥४॥

---

पाठभेदः—१ अंत. २ सोज्ज्वळ. ३ 'रे' हा शब्द नाहीं.

॥ ४४०० ॥

सोडवा सोडवा । सोडवा हो अनंता ॥ १ ॥ तुजविण ऐसा । कोण दुजा प्राणदाता ॥२॥ कोणा लाज नेणां ऐसें । आणिकां शरण आह्मी जातां ॥ ३ ॥ तुका ह्मणे सखया । माझ्या रखुमाईच्या कांता ॥४॥

॥ ४४०१ ॥

पुत्राची वारता । शुभ ऐके जेवीं माता ॥ १ ॥ तैसें राहो माझें मन । गातां ऐकतां हरिगुण ॥ २ ॥ नादें लुब्ध जाला मृग । देह विसरला अंग ॥ ३ ॥ तुका ह्मणे पाहे । कासवीचें पिलें माये ॥ ४ ॥

## तुकोबास त्यांच्या स्त्रीचें कठोर भाषण.

॥ ४४०२ ॥

मजचि भोंवता केला येणें जोग । काय याचा भोग अंतरला ॥ १ ॥
चालोनियां घरा सर्व सुखें येती । माझी तों फजीती चुकेचि ना ॥२॥
कोणाची बाईल होऊनियां वोढूं । संवसारीं काढूं आपदा किती ॥३॥
काय तरी देऊं तोडितील पोरें । मरतीं तरी बरें होतें आतां ॥ ४ ॥
कांहीं नेदी वांचों धोवियेलें घर । सारवावया ढोर शेण नाहीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे रांड न करितां विचार । वाहुनियां भार कुंथे माथां ॥ ६ ॥

॥ ४४०३ ॥

काय नेणों होता दावेदार मेला । वैर तो साधिला होउनी गोहो ॥१॥
किती सर्वकाळ सोसावें हें दुःख । किती लोकां मुख वासूं तरी ॥२॥
ह्मवे आपुली आई काय माझें केलें । धड या विठ्ठलें संसाराचें ॥३॥
तुका ह्मणे येती बाइले आसडे । फुंदोनियां रडे हांसे कांहीं ॥ ४ ॥

॥ ४४०४ ॥

गोणी आली घरा । दाणे खाऊं नेदी पोरा ॥ १ ॥ भरी लोकांची पांटोरी । मेला चोरटा खाणोरी ॥ २ ॥ खवळली पिसी । हाता ह्मोंवे जैसी लांसी ॥ ३ ॥ तुका ह्मणे खोटा । रांडे संचिताचा सांटा ॥४॥

॥ ४४०५ ॥

आतां पोरा काय खासी । गोहो जाला देवलसी ॥ १ ॥ डोचकें तिंबी घातल्या माळा । उद्माचा सांडी चाळा ॥२॥ आपल्या पोटा केली थार । आमचा नाहीं येसपार ॥३॥ हातीं टाळ तोंड वासी । गाय देउळीं देवापासीं ॥ ४ ॥ आतां आह्मी करूं काय । न वसे घरीं राना जाय ॥५॥ तुका ह्मणे आतां धीरी । आझुनि नाहीं जालें तरी ॥६॥

॥ ४४०६ ॥

बरें जालें गेलें । आजी अवघें मिळालें ॥ १ ॥ आतां खाईन पोटभरी । ओल्या कोरड्या भाकरी ॥२॥ किती तरी तोंड । याशीं वाजवूं मी रांड ॥३॥ तुका बाइले मानवला । चीथूं[1] करूनियां बोला ॥ ४ ॥

॥ ४४०७ ॥

निजों नेदी सकाळ वेळीं । राती काळीं चिनचिनी ॥ १ ॥ वोंगळानें घेतली पाठी । केली आटी जीवासी ॥२॥ मेळऊनि सर्वे जन । चिंता नेणे देवळींच ॥३॥ तुका ह्मणे आलों घरा । तोंडा घोरा बाइलेच्या ॥४॥

॥ ४४०८ ॥

न करवे धंदा । आइता तोंडीं पडे लोंदा ॥ १ ॥ उठितें तें कुटितें टाळ । अवघा मांडिला कोल्हाळ ॥ २ ॥ जिवंताचि मेले । लाजा वाटूनियां प्याले ॥ ३ ॥ संवसाराकडे । न पाहाती ओस पडे ॥ ४ ॥ तळमळती यांच्या रांडा । घालिती जीवा नांवें धोंडा ॥ ५ ॥ तुका ह्मणे बरें जालें । घेगे बाइले लीहिलें ॥ ६ ॥

॥ ४४०९ ॥

कोण घरा येतें आमुच्या काशाला । काय ज्याचा त्याला नाहीं धंदा ॥१॥ देवासाटीं जालें ब्रह्मांड सोइरें । कोमळ्या उत्तरें काय वेचे ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ छिथू.

मानें पाचारितां नव्हे अराणूक । ऐसे येती लोक प्रीतीसाटीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे रांडे नावडे भूषण । कांतेलेंसें श्वान लागे पाठी ॥ ४ ॥

## तुकोबाचा स्त्रीस उपदेश.

॥ ४४१० ॥

पिकल्या सेताचा आह्मां देतो वांटा । चौधरी गोमटा पांडुरंग ॥ १ ॥
सत्तर टके बाकी उरली मागे तो हा । मागें झडले दाहा आजिवरी ॥२॥
हांडा भांडीं गुरें दाखवी ऐवज । माजघरीं बाजे बैसलासे ॥ ३ ॥
मज यासी भांडतां जाब नेदी बळें । ह्मणे एका वेळे घ्याल वांटा ॥ ४ ॥
तुका ह्मणे स्त्रिये काय वो करावें । नेदितां लपावें काय कोठें ॥ ५ ॥

॥ ४४११ ॥

करितां विचार अवघें एक राज्य । दुजा कोण मज पाठी घाली ॥१॥
कोण्या रीती जावें आह्मी वो पळोनि । मोकळे अंगणीं मागें पुढें ॥२॥
काय तें गव्हाणें हिंडावीं वो किती । दूत ते लागती याचे पाठीं ॥३॥
कोठें याची करूं गेलों कुळवाडी । आतां हा न सोडी जीवें आह्मां ॥४॥
होऊनि बेबाख येथेंचि राहावें । देईल तें खावें तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४४१२ ॥

नागवूनि एकें नागवींच केलीं । फिरोनियां आलीं नाहीं येथें ॥ १ ॥
भेणें सुती कोणी न घेती पालवीं । करूनियां गोवी निसंतान ॥ २ ॥
एकें तीं गोविलीं घेऊनि जमान । हांसतील जन लोक तयां ॥ ३ ॥
सरले तयांसी घालितो वैकुंठीं । न सोडी हे साटी जाली जीवें ॥४॥
तुका ह्मणे जालों जाणोनि नेणतीं । सांपडलों हातीं याचे आह्मी ॥५॥

॥ ४४१३ ॥

काय करूं आतां माझिया संचिता । तेणें जीववित्ता साटी केली ॥१॥

---

पाठभेदः—१ घाली. २ जीवें जालीं.

न ह्मणावें कोणी माझें हें करणें । हुकूम तो येणें देवें केला ॥ २ ॥
करूनि मोकळा सोडिलों भिकारी । पुरविली तरी पाठी माझी ॥ ३ ॥
पाणियां भोंपळा जेवावया पानें । लाविलीं वो येणें देवें आह्मां ॥ ४ ॥
तुका ह्मणे यासी नाहीं वो करुणा । आहे नागवणा ठावा मज ॥ ५ ॥

॥ ४४१४ ॥

आतां तूं तयास होईं वो उदास । आरंभला नास माझ्या जीवा ॥ १ ॥
जरूर हें जालें तुजें कां नावडे । उपास रोकडे येती आतां ॥ २ ॥
बरें म्यां तुझिया जीवाचें तें काय । व्हावें तें हें पाहें विचारूनि ॥ ३ ॥
तुज मज तुटी नव्हे या विचारें । सहित लेंकुरें राहों सुखें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तरी तुझा माझा संग । घडेल वियोग कधीं नव्हे ॥ ५ ॥

॥ ४४१५ ॥

नको धरूं आस व्हावें या बाळांस । निर्माण तें[1] त्यांस त्यांचें आहे ॥ १ ॥
आपुला तूं गळा घेईं उगवुनि । चुकवीं जाचणी गर्भवास ॥ २ ॥
ऐवज देखोनि बांधितील गळा । ह्मणोनि निराळा पळतसें ॥ ३ ॥
देखोनियां त्यांचा अवघड मार । कांपे थरथर जीव माझा ॥ ४ ॥
तुका ह्मणे जरी आहे माझी चाड । तरी करीं वाड चित्त आतां ॥ ५ ॥

॥ ४४१६ ॥

भले लोक तुज बहु मानवती । वाढेल या कीर्ति जगामाजी ॥ १ ॥
ह्मणे मेलीं गुरें भांडीं नेलीं चोरें । नाहींत लेंकुरें जालीं मज ॥ २ ॥
आस निरसूनि कठिण हें मन । करीं वो समान वज्र तैसें ॥ ३ ॥
किंचित हें सुख टाकीं वो थुंकोनि । पावसील धणी[3] परमानंद ॥ ४ ॥
तुका ह्मणे थोर चुकती सायास । भवबंधपाश तुटोनियां ॥ ५ ॥

॥ ४४१७ ॥

ऐक हें सुख होईल दोघांसी । सोहळे हे ऋषि करिती देव ॥ १ ॥

पाठभेदः—१ मज. २ त्यांचें त्यांस. ३ धनी.

जडितविमानें बैसविती मानें । गंधर्वांचें गाणें नामघोष ॥ २ ॥
संत महंत सिद्ध येतील सामोरे । सर्वसुखा पुरे कोड तेथें ॥ ३ ॥
आळिंगूनि लोळों त्यांच्या पायांवरी । जाऊं तेथवरी मायबापें ॥ ४ ॥
तुका ह्मणे तया सुखा वर्णूं काय । जेव्हां बापमाय देखों डोळां ॥५॥

॥ ४४१८ ॥

देव पाहावया करीं वो सायास । न धरीं हे आस नाशिवंत ॥ १ ॥
दिन सोम शुद्ध सकाळीं पातला । द्वादशी घडला पर्वकाळ ॥ २ ॥
द्विजां पाचारूनि शुद्ध करीं मन । देईं वो हें दान यथाविध ॥ ३ ॥
नको चिंता करूं वस्त्रा या पोटाची । माउली आमुची पांडुरंग ॥ ४ ॥
तुका ह्मणे दुरी सांगतों पाल्हाळीं । परी तो जवळी आहे आह्मां ॥५॥

॥ ४४१९ ॥

सुख हें नावडे आह्मां कोण्या बळें । नेणसी अंधळे जालीसी तूं ॥१॥
भूक तान कैसी राहिली निश्चळ । खुंटलें चपळ मन ठायीं ॥ २ ॥
द्रव्य जीवाहूनि आवडे या जना । आह्मांसी पाषाणाहूनि हीन ॥ ३ ॥
सोइरे सज्जन जन आणि वन । अवघें समान काय गुणें ॥ ४ ॥
तुका ह्मणे आह्मां जवळीच आहे । सुख दुःख साहे पांडुरंग ॥ ५ ॥

॥ ४४२० ॥

गुरुकृपे मज बोलविलें देवें । होईल तें[१] घ्यावें हित कांहीं ॥ १ ॥
सत्य देवें माझा केला अंगीकार । आणीक विचार नाहीं आतां ॥ २ ॥
होईं बळकट घालूनियां कास । हाचि उपदेश तुज आतां ॥ ३ ॥
सडा संमार्जन तुळसी वृंदावन । अतीतपूजन ब्राह्मणांचें ॥ ४ ॥
वैष्णवांची दासी होईं सर्वभावें । मुखीं नाम घ्यावें विठोबाचें ॥ ५ ॥
पूर्ण बोध स्त्रीभ्रतारसंवाद । धन्य जिहीं वाद आइकिला ॥ ६ ॥
तुका ह्मणे आहे पांडुरंगकथा । तरेल जो चित्ता धरील कोणी ॥ ७ ॥

पाठभेदः—१ हें.

## शिवाजी राजे यांनीं तुकोबास आपल्या येथें आणविण्याकरितां अबदागिरी, घोडा, कारकून पाठविला त्या वेळचे अभंग.

॥ ४४२१ ॥

दिवट्या छत्री घोडे । हें तों बऱ्यांत न पडे ॥ १ ॥ आतां येथें पंढरिराया । मज गोंविसी कासया ॥ २ ॥ मान दंभ चेष्टा । हे तों शूकराची विष्ठा ॥ ३ ॥ तुका ह्मणे देवा । माझे सोडववणे धांवा ॥ ३ ॥

॥ ४४२२ ॥

नावडे जें चित्ता । तेंचि होसी पुरविता ॥ १ ॥ कां रे पुरविली पाठी । माझी केली जीवें साटीं ॥ २ ॥ न करावा संग । वाटे दुरावावें जग ॥ ३ ॥ सेवावा एकांत । वाटे न बोलावी मात ॥ ४ ॥ जन धन तन । वाटे लेखावें वमन ॥ ५ ॥ तुका ह्मणे सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥ ६ ॥

॥ ४४२३ ॥

काय दिला ठेवा । आह्मां विठ्ठलचि व्हावा ॥ १ ॥ तुह्मी कळलेती उदार । साटीं परिसाची गार ॥ २ ॥ जीव दिला तरी । वचना माझ्या नये सरी ॥ ३ ॥ तुका ह्मणे धन । आह्मां गोमासासमान ॥ ४ ॥

॥ ४४२४ ॥

मुंगी आणि राव । आह्मां सारखाची जीव ॥ १ ॥ गेला मोह आणि आशा । कळिकाळाचा हा फांसा ॥ २ ॥ सोनें आणि माती । आह्मां समान हें चित्तीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आलें । घरा वैकुंठ सगळें ॥ ४ ॥

॥ ४४२५ ॥

विरंचीनें केलें ब्रह्मांड सकळ । तयामाजी खेळ नाना युक्ती ॥ १ ॥
युक्तीचा बाळक ब्रह्मनिष्ठ ज्ञानी । गुरुभक्ति मनीं विश्वासेंसी ॥ २ ॥
ऐसा तुझा प्रेमा कळे कांहीं एक । पाहूनियां लेख पत्रिकींचे ॥ ३ ॥
शिव तुझें नाम ठेविलें पवित्र । छत्रपति सूत्र विश्वाचें कीं ॥ ४ ॥

व्रत नेम तप ध्यानयोग कळा । करूनि मोकळा जालासी तूं ॥ ५ ॥
हा हेत लागला आमुचिये भेटी । पत्रामाजी गोष्टी हेचि थोर ॥ ६ ॥
याचें हें उत्तर एक गा भूपती । लिहिली विनंती हेताची हे ॥ ७ ॥
अरण्यवासी आह्मी फिरों उदासीन । दर्शनही हीन अमंगळ ॥ ८ ॥
वस्त्राविण काया जालीसे मळीन । अन्नरहित हीन फळाहारी ॥ ९ ॥
रोडके हात पाय दिसे अवकळा । काय तो सोहळा दर्शनाचा ॥ १० ॥
तुका ह्मणे माझी विनंती सलगीची । वार्ता हे भेटीची करूं नका ॥ ११ ॥

॥ ४४२६ ॥

तुह्मांपाशीं आह्मी येऊनियां काय । वृथा सीण आहे चालण्याचा ॥ १ ॥
मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर । वस्त्रासी हे थार चिंध्या बिदी ॥ २ ॥
निद्रेसी आसन उत्तम पाषाण । वरी आवरण आकाशाचें ॥ ३ ॥
तेथें काय करणें कवणाची आस । वांयां होय नाश आयुष्याचा ॥ ४ ॥
राजगृहा यावें मानाचिये आसे । तेथें काय वसे समाधान ॥ ५ ॥
रायाचिये घरीं भाग्यवंता मान । इतरां सामान्यां मान नाहीं ॥ ६ ॥
देखोनियां वस्त्रें भूषणांचें जन । तात्काळ मरण येतें मज ॥ ७ ॥
ऐकोनियां मानाल उदासता जरी । तरी आह्मां हरि उपेक्षीना ॥ ८ ॥
आतां हेंचि तुह्मां सांगणें कवतुक । भिक्षेऐसें सुख नाहीं नाहीं ॥ ९ ॥
तपव्रतयाग महा भले जन । आशाबद्ध हीन वर्तताती ॥ १० ॥
तुका ह्मणे तुह्मी श्रीमंत मानाचे । पूर्वींच दैवांचे हरिभक्त ॥ ११ ॥

॥ ४४२७ ॥

ऐसी माझी वाणी दीनरूप पाहे । हे त्या करुणा आहे हृदयस्थाची ॥ १ ॥
नहों कींविलवाणें नाहीं आह्मी दीन । सर्वदा शरण पांडुरंगीं ॥ २ ॥
पांडुरंग आह्मां पाळिता पोसिता । आणिकांची कथा काय तेथें ॥ ३ ॥
तुझी भेट घेणें काय हें मागणें । आशेचें हें शून्य केलें आह्मीं ॥ ४ ॥
निराशेचा गांव दिधला आह्मांसी । प्रवृत्ति भागासी सांडियेलें ॥ ५ ॥

पतिव्रतेचें हें मन पति भेटो । तैसे आह्मी विठोमाजीं नांदों ॥ ६ ॥
विश्व हें विठ्ठल नाहीं दुजें कांहीं । देखणें तुझेंही तयामाजी ॥ ७ ॥
तुजही विठ्ठल ऐसेंचि वाटलें । परि एक आलें आडवें हें ॥ ८ ॥
सद्गुरुश्रीरामदासाचें भूषण । तेथें घाली मन चळों नको ॥ ९ ॥
बहुतां ठायीं वृत्ति चावळली जेव्हां । रामदास्य तेव्हां घडे कैसें ॥१०॥
तुका ह्मणे बापा चातुर्यसागरा । भक्तिभाव तारा भाविकांसी ॥११॥

॥ ४४२८ ॥

आतां एक योग साधावा हा नीट । भल्याचा तो वीट मानूं नये ॥१॥
जेणें योगें तुह्मां घडों पाहे दोष । ऐसा हा सायास करूं नये ॥ २ ॥
निंदक दुर्जन संग्रहीं असती । त्यांची युक्ती चित्तीं आणूं नका ॥ ३ ॥
परीक्षावे कोण राज्याचे रक्षक । विवेकाविवेक पाहोनियां ॥ ४ ॥
सांगणें न लगे सर्वज्ञ तूं राजा । अनाथांच्या काजा साह्य व्हावें ॥ ५ ॥
हेंचि ऐकोनियां चित्त समाधान । आणीक दर्शनें चाड नाहीं ॥ ६ ॥
घेऊनियां भेटी कोण हा संतोष । आयुष्याचे दिस गेले गेले ॥ ७ ॥
एकदोनी कर्मं जाणोनियां वर्म । आपुलिया भ्रमें राहूं आतां ॥ ८ ॥
कल्याणकारक अर्थ याचा एक । सर्वां भूतीं देख एक आत्मा ॥ ९ ॥
आत्मारामीं मन ठेवूनियां राहें । रामदासीं पाहें आपणेयां ॥ १० ॥
तुका ह्मणे राया धन्य जन्म क्षिती । त्रैलोकीं हे ख्याति कीर्ति तुझी ॥ ११ ॥

॥ ४४२९ ॥

आतां हे विनवणी प्रधान अष्टक । प्रभूसी विवेक समजावा ॥ १ ॥
प्रतिनिधि मानरक्षक चतुर । सात्विकाचें घर तुह्मांपाशीं ॥ २ ॥
मजुमुचे धणी लेखनकारक । पत्रींचा विवेक समजावा ॥ ३ ॥
पेशवे सुरनिस चिटनिस डबीर । राजाज्ञा सुमंत सेनापति ॥ ४ ॥
भूषण पंडितराय विद्याधन । वैद्यराजा नमन माझें असे ॥ ५ ॥
पत्राचा हा अर्थ अंतरीं जाणोनि । विवंचोनि श्रवणीं घाला तया ॥ ६ ॥

सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मतें । बोलिलों बहुत कळावया ॥ ७ ॥
यथास्थित निरोप सांगणें हा राया । अर्थ पाहा वांयां जाऊं नेदा ॥ ८ ॥
भिडेसाटीं बोला गाळूनि अर्थातें । अनर्थकारी तुमतें होइल तेणें ॥ ९ ॥
तुका ह्मणे तुह्मां नमन अधिकाऱ्यां । सांगणें तें राया पत्र माझें ॥१०॥

## शिवाजी स्वतः दर्शनास आले त्यावेळीं त्यांस केलेला उपदेश.

॥ ४४३० ॥

रायाछत्रपति ऐकावें वचन । रामदासीं ध्यान[1] लावा वेगीं ॥ १ ॥
रामदासस्वामी सोयरा सज्जन । यांसि[2] तनमन अर्पी बापा ॥ २ ॥
मारुती अवतार स्वामी प्रगटला । उपदेश केला तुजलागीं ॥ ३ ॥
रामनाम मंत्र तारक केवळ । जालासे सीतळ उमाकांत ॥ ४ ॥
उफराटीं नामें जपतां वाल्मीक । जाला पुण्य श्लोक तात्कालिक ॥ ५ ॥
तेंच बीज[3] त्यांसि वसिष्ठ उपदेश । त्याहूनि विशेष काय आहे ॥ ६ ॥
आतां धरूं नका भलत्याचा संग । राम पांडुरंग कृपा करी ॥ ७ ॥
धरूं नको आस आमुची भूपाळा[4] । रामदासीं डोळा लावा[5] वेगीं ॥ ८ ॥
तुझी चाड नाहीं आह्मां छत्रपति । आह्मी पत्रपति त्रैलोक्याचे ॥ ९ ॥
च्यारी दिशीं आह्मा भिक्षेचा अधिकार । नेमिली[6] भाकर भक्षावया ॥१०॥
पांडुरंगीं आमुची जाली पूर्ण भेटी । हातांत नरोटी दिधली देवें ॥११॥
आतां पडूं नको आमुचिया काजा । पवित्र तूं राजा रामभक्त ॥१२॥
विठ्ठलाचे दास केवळ भिकारी । आह्मांलागीं हरी उपेक्षी ना ॥१३॥
शरण असावें रामदासालागीं । नमन साष्टांगीं घालीं त्यासीं ॥१४॥
तुका ह्मणे राया तुज असो कल्याण । सद्गुरू शरण असें बापा ॥१५॥

---

पाठभेदः—१ मन लावीं. २ त्याशीं तूं नमन. ३ मंत्र. ४ कृपाळा. ५ लावी आतां. ६ न मिळे. ७ कधीं. ८ मुळें. ९ राहें.

## कीर्तनप्रसंगीं परचक्रवेढा पडला त्या वेळचे अभंग.

॥ ४४३१ ॥

न देखवे डोळां ऐसा हा आकांत । परपीडे चित्त दुःखी होतें ॥ १ ॥
काय तुह्मी येथें नसालसें जालें । आह्मीं न देखिलें पाहिजे हें ॥ २ ॥
परचक्र कोठें हरिदासांच्या वासें । न देखिजेत देशें राहातिया ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझी लाजविली सेवा । हीनपणें देवा जिणें जालें ॥ ४ ॥

॥ ४४३२ ॥

काय म्यां मानावें हरिकथेचें फळ । तारिजे सकळ जनं ऐसें ॥ १ ॥
उच्छेद तो असे हा गे आरंभला । रोकडें विठ्ठला परचक्र ॥ २ ॥
पापाविण नाहीं पाप येत पुढें । साक्षीसीं रोकडें साक्ष आलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे जेथें वसतील दास । तेथें तुझा वास कैसा आतां ॥ ४ ॥

॥ ४४३३ ॥

भीत नाहीं आतां आपुल्या मरणा । दुःखी होतां जना न देखवे ॥ १ ॥
आमची तो जाती ऐसी परंपरा । कां तुह्मी दातारा नेणां ऐसें ॥२॥
भजनीं विक्षेप तेंचि पैं मरण । न वजावा क्षण एक वांयां ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाहीं आघाताचा वारा । ते स्थळीं दातारा ठाव मागें ॥४॥

## लोहगांवीं कीर्तनांत मेलेलें मूल जीवंत होण्याविषयीं देवापाशीं करुणा.

॥ ४४३४ ॥

अशक्य तों तुह्मां नाहीं नारायणा । निर्जीवा चेतना आणावया ॥१॥
मागें काय जाणें स्वामीचे पवाडे । आतां कां रोकडे दावूं नये ॥ २ ॥
थोर भाग्य आह्मी समर्थाचे कासे । ह्मणवितो दास काय थोडें ॥ ३ ॥
तुका ह्मणे माझे निववावे डोळे । दावूनि सोहळे सामर्थ्याचे ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ जनीं.

॥ ४४३५ ॥

दाता तो एक जाणा । नारायणा स्मरवी ॥ १ ॥ आणीक नासिवंतें काय । न सरे हाय ज्यांच्यानें ॥ २ ॥ यावें तया काकुलती । जे दाविती सुपंथ ॥३॥ तुका ह्मणे डरी नुरे । त्याचे खरे उपकार ॥४॥

## लोहगांवीं स्वामींच्या अंगावर ऊन पाणी घातलें त्यावेळचा अभंग.

॥ ४४३६ ॥

जळे माझी काया लागला वोणवा। धांव रे केशवा मायबापा ॥ १ ॥
पेटली सकळ कांति रोमावळी । नावरे हे होळी दहन जालें ॥ २ ॥
फुटोनियां दोन्ही भाग होऊं पाहे । पाहातोसी काय हृदय माझें ॥३॥
घेऊनि जीवन धांवें लवलाहीं । कवणाचें कांहीं न चले येथें ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझी तूं होसी जननी। आणीक निर्वाणीं कोण राखे ॥ ५ ॥

## विषयसुखप्राप्त्यर्थ एक स्त्री तुकोबाकडे गेली त्यावेळचे अभंग.

॥ ४४३७ ॥

पराविया नारी रखुमाईसमान । हें गेलें नेमून ठायींचेंची ॥ १ ॥
जाई वो तूं माते न करीं सायास । आह्मी विष्णुदास नव्हों तैसे ॥२॥
न साहावे मज तुझें हें पतन । नको हें वचन दुष्ट वदों ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज पाहिजे भ्रतार । तरी[1] का इतर लोक थोडे ॥ ४ ॥

॥ ४४३८ ॥

स्त्रियांचा तो संग नको नारायणा। काष्टा या पाषाणामृत्तिकेच्या॥१॥
नाठवे हा देव न घडे भजन । लांचावलें मन आवरेना ॥ २ ॥

---

पाठभेदः—१ तरी काय नर थोडे जाले.

दृष्टिमुखें मरण इंद्रियांच्या द्वारें । लावण्य तें खरें दुःखमूळ ॥ ३ ॥
तुका ह्मणे जरी अग्नि जाला साधु । परी पावे बाधू संघट्टणें ॥ ४ ॥

॥ ४४३९ ॥

अवघ्या संसाराचा केलासे निर्वंश । जालों हरिदास आवडीनें ॥ १ ॥
घरीं रांडापोरें गांजिताती फार । ह्मणोनि दारोदार फिरतसें ॥ २ ॥
ठायींचा नपुंसक ठावें माझ्या चित्ता । यावरी लोकांता कळलें असे ॥ ३ ॥
काय आमचें जिणें वांयां जावें माये । नायकों तें काय विषय कोडें ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां जालिसी उदासी । नवमास कुसीं वागविलें ॥ ५ ॥

॥ ४४४० ॥

पोसणा मी बेटा देवासी जंजार । दुजा बहुभार घालूं नको ॥ १ ॥
अरबट देह पडो कोणे ठायीं । जन्म याला नाहीं सर्वे याची ॥ २ ॥
कवणाची सेवा घ्यावी कोणाकून । सर्व नारायण प्रकटला ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुज बोलतां उत्तर । अज्ञूनियां फिर माय मागें ॥ ४ ॥

## संतांनीं तुकोबास विचारलें कीं, तुह्मांस वैराग्य कसें झालें, त्याचें उत्तर.

॥ ४४४१ ॥

याती शूद्र वंश केला वेवसाव । आदि तो हा देव कुळपूज्य ॥ १ ॥
नये बोलों परि पाळिलें वचन । केलियाचा प्रश्न तुह्मीं संतीं ॥ २ ॥
संवसारें जालों अतिदुःखें दुःखी । मायबाप सेखीं क्रमिलिया ॥ ३ ॥
दुष्काळें आटिलें द्रव्यें नेला मान । स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली ॥ ४ ॥
लज्जा वाटे जीवा त्रासलों या दुःखें । वेवसाय देखें तुटी येतां ॥ ५ ॥
देवाचें देऊळ होतें तें भंगलें । चित्तासी जें आलें करावेंसें ॥ ६ ॥
आरंभीं कीर्तन करीं एकादशी । नव्हतें अभ्यासीं चित्त आधीं ॥ ७ ॥
कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करोनियां ॥ ८ ॥

गाती पुढें त्यांचें धरावें ध्रुपद । भावें चित्त शुद्ध करोनियां ॥ ९ ॥
संतांचें सेविलें तीर्थ पायवणी । लाज नाहीं मनीं येऊं दिली ॥ १०॥
टाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनि ॥ ११ ॥
वचन मानिलें नाहीं सुहृदांचें । समूळ प्रपंचें वीट आला ॥ १२ ॥
सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमतां ॥ १३ ॥
मानियेला स्वप्नीं गुरुचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥ १४॥
यावरि या जाली कवित्वाची स्फूर्ति । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥ १५॥
निषेधाचा कांहीं पडिला आघात । तेणें मध्यें चित्त दुखविलें ॥ १६ ॥
बुडविल्या वह्या बैसलों धरणें । केलें नारायणें समाधान ॥ १७ ॥
विस्तारीं सांगतां बहुत प्रकार । होईल उशीर आतां पुरे ॥ १८ ॥
आतां आहे तैसा दिसतो विचार । पुढील प्रकार देव जाणे ॥ १९ ॥
भक्तां नारायण नुपेक्षी सर्वथा । कृपावंत ऐसा कळों आलें ॥ २० ॥
तुका ह्मणे माझें सर्व भांडवल । बोलविले बोल पांडुरंगें ॥ २१ ॥

॥ ४४४२ ॥

ऐका वचन हें संत । मी तों आगळा पतित । काय काजें प्रीत । करीतसां आदरें ॥ १ ॥ माझें चित्त मज ग्वाही । सत्य तरलों मी नाहीं । एकांचिये वांहीं । एक देखीं मानिती ॥ २ ॥ बहु पीडिलों संवसारें । मोडीं पुसें पिटीं ढोरें । न पडतां पुरें । या विचारें राहिलों ॥ ३ ॥ सहज सरलें होतें कांहीं । द्रव्य थोडें बहु तेंही । त्याग केला नाहीं । दिलें द्विजां याचकां ॥ ४ ॥ प्रियापुत्रबंधु । यांचा तोडिला संबंधु । सहज जालों मंदु । भाग्यहीन करंटा ॥ ५ ॥ तोंड न दाखवे जना । शिरें सांदीं भरें राणां । एकांत तो आणा । तयासाटीं लागला ॥ ६ ॥ पोटें पिटिलों काहारें । दया नाहीं या विचारें । बोलावितां बरें । सहज ह्मणे यासाटीं ॥ ७ ॥ सहज वडिलां होती

पाठभेदः—१ स्वप्नीं.

सेवा । ह्मणोनि पूजितों या देवा । तुका ह्मणे भावा । साटीं ह्मणी ठ्या कोणी ॥ ८ ॥

॥ ४४४३ ॥

बरें जालें देवा निघालें दिवाळें । बरी या दुष्काळें पीडा केली ॥ १ ॥
अनुतापें तुझें राहिलें चिंतन । जाला हा वमन संवसार ॥ २ ॥
बरें जालें देवा बाईल कर्कशा । बरी हे दुर्दशा जनामध्यें ॥ ३ ॥
बरें जालें जगीं पावलों अपमान । बरें गेलें धन ढोरें गुरें ॥ ४ ॥
बरें जालें नाहीं धरिली लोकलाज । बरा आलों तुज शरण देवा॥५॥
बरें जालें तुझें केलें देवाईल । लेंकरें बाईल उपेक्षिलीं ॥ ६ ॥
तुका ह्मणे बरें व्रत एकादशी । केलें उपवासीं जागरण ॥ ७ ॥

## पक्षी दाणे टिपीत असतां तुकोबास पाहून उडाले त्यामुळें खेद झाला तो अभंग.

॥ ४४४४ ॥

अवघीं भूतें साम्या आलीं । देखिलीं म्यां कैं होतीं ॥ १ ॥ विश्वास तो खरा मग । पांडुरंगकृपेचा ॥ २ ॥ माझी कोणी न धरो शंका । ऐसें[1] हो कां निर्द्वंद्व ॥३॥ तुका ह्मणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें ॥४॥

## दत्तावर अभंग.

॥ ४४४५ ॥

तीन शिरें सहा हात । तया माझें दंडवत ॥ १ ॥ काखे झोळी पुढें श्वान । नित्य जान्हवीचें स्नान ॥ २ ॥ माथां शोभे जटाभार । अंगीं विभूती सुंदर ॥ ३ ॥ शंख चक्र गदा हातीं । पायीं खडावा गर्जती ॥ ४ ॥ तुका ह्मणे दिगंबर । तया माझा नमस्कार ॥ ५ ॥

---

पाठभेदः—१ विश्व. होकां लोकां निर्द्वंद्व.

॥ ४४४६ ॥

नमन माझें गुरुराया । महाराजा दत्तात्रेया ॥ १ ॥ तुझी अवधूत मूर्त्ती । माझ्या जिवाची विश्रांती ॥२॥ जीवींचें सांकडें । कोण उगवील कोडें ॥ ३ ॥ अनसूयासुता । तुका ह्मणे पाव आतां ॥ ४ ॥

## पदें.

॥ ४४४७ ॥

पुरे एकचि पुत्र माय पोटीं ॥ हरी स्मरणें उद्धरी कुळें कोटी ॥ध्रु०॥ धन्य वंशीं जन्मला भगीरथ ॥ गंगा आणोनी पूर्वज केले मुक्त ॥ पुरे एक० ॥ १ ॥ गौतमानें आणिली गोदावरी ॥ आपण तरोनि दुजयासी तारी ॥ पुरे एक० ॥ २ ॥ पांचा वर्षाचें ध्रुव बाळ तान्हें ॥ अढळ पदीं स्थापिलें बहु मानें ॥ पुरे एक० ॥ ३ ॥ तेजःपुंज शीतळ सौख्यदानीं ॥ एक चंद्रप्रकाश त्रिभुवनीं ॥ पुरे एक० ॥ ४ ॥ पहा कैसा तो पुंडलीक धीट ॥ उभा केला वैकुंठ नायक ॥ पुरे एक० ॥५॥ रामरूपी जन्मला कीर्त्तिवंत ॥ अंजनीचे उदरीं हनुमंत ॥ पुरे एक०॥ ॥ ६ ॥ तुका ह्मणे हरिसी विन्मुख ॥ गांधारीचे उदरीं शतमूर्ख ॥ ॥ पुरे एकचि० ॥ ७ ॥

॥ ४४४८ ॥

एथें कोणाचें काय बा गेलें ॥ ज्याचें त्यानेंच अनहित केलें ॥ ध्रु० ॥ संतीं सांगितलें ऐकेना ॥ स्वतां बुद्धिहि असेना ॥ वृत्ति निबरली पिकेना ॥ मूढ कोणाचें ऐकेना ॥ एथें कोणाचें० ॥ १ ॥ अन्य यातिचे संगती लागे ॥ साधु जनांमध्यें न वागे ॥ केल्यावीण पराक्रम सांगे ॥ जेथें सांगे तेथेंचि भीक मागे ॥ एथें कोणाचें० ॥ २ ॥ नीत टाकुनी अनीत चाले ॥ भडभड भलतेंच बोले ॥ मंद होउनि उन्मत्त डोले ॥ अखेर फार वाईट झालें ॥ ऐथें कोणाचें० ॥ ३ ॥ तुका

ह्मणे कांहीं नेम ॥ चित्तीं न धरी अधम ॥ सांग पडलासे भ्रम ॥ अंतीं कुटील त्यासी यम ॥ एथें कोणाचें० ॥ ४ ॥

॥ ४४४९ ॥

पोटापुरतें देईं ॥ मागणें लयि नाहीं लयि नाहीं ॥ ध्रु० ॥ पोळी साजुक अथवा शिळी ॥ देवा देईं भुकेच्या वेळीं ॥ मागणें० ॥ १ ॥ वस्त्र नव अथवा जुन ॥ देवा देईं अंग भरून ॥ मागणें० ॥२॥ देवा कळणा अथवा कोंडा ॥ आह्मां देईं भुकेच्या तोंडा ॥ मागणें० ॥ ३ ॥ तुका ह्मणे आतां ॥ नका करूं पाया परता ॥ मागणें लयि० ॥ ४ ॥

॥ ४४५० ॥

ज्याचें सुख त्याला सुख त्याला ॥ काय असे भलत्याला ॥ ज्याचें ॥ध्रु०॥ एक जेवुनि तृप्त झाला ॥ एक हाका मारि अन्नाला ॥ ज्याचें सु० ॥१॥ एक नदी उतरुनि गेला ॥ एक हाका मारी तारूला ॥ ज्याचें सु०॥ ॥ २ ॥ एक मोक्ष मार्गीं गेला ॥ एक अधोगती चालिला ॥ ज्याचें सु० ॥ ३ ॥ तुका वैकुंठासीं गेला ॥ हाका मारी तो लोकांला ॥ ज्याचें सुख त्याला ॥ ४ ॥

## निर्वाणाचे अभंग.

॥ ४४५१ ॥

शोधितांचि नये । ह्मणोनि वोळगतों पाये ॥ १ ॥ आतां दिसों नये जना । ऐसें करा नारायणा ॥ २ ॥ परतोनि मन । गेलें ठायींचि मुरोन ॥ ३ ॥ विसरला तुका । बोलों चालों जाला मुका ॥ ४ ॥

॥ ४४५२ ॥

तुह्मी सनकादिक संत । ह्मणवितां कृपावंत ॥ १ ॥ एवढा करा उपकार । देवा सांगा नमस्कार ॥ २ ॥ भाकोनि करुणा । विनवा वैकुंठींचा राणा ॥३॥ तुका ह्मणे मज आठवा । मूळ लवकरी पाठवा ॥४॥

॥ ४४५३ ॥

आपुल्या माहेरा जाईन मी आतां । निरोप या संतां हातीं आला ॥१॥
सुख दुःख माझें आइकिलें कानीं । कळवळा मनीं करुणेचा ॥ २ ॥
करूनि सिद्ध मूळ साउलें भातुकें । येती दिसें एकें न्यावयासी ॥३॥
त्याचि पंथें माझें लागलेंसे चित्त । वाट पाहे नित्य माहेराची ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां येतील न्यावया । अंगें आपुलिया मायबाप ॥ ५ ॥

॥ ४४५४ ॥

संतीं केला अंगीकार । त्यासी अभिमान थोर ॥ १ ॥ कांहीं ठेविलें चरणीं । घेती तेंचि पुरवूनि । तुका पायवणी । घेऊनियां निराळा ॥ २ ॥ नसतां कांहीं संचित । भेटी जाली अवचित ॥ ३ ॥ देव मिळोनियां भक्त । तुका केलासे सनाथ ॥ ४ ॥

॥ ४४५५ ॥

संसाराचे अंगीं अवघींच व्यसनें । आह्मी या कीर्तनें शुद्ध जालों ॥१॥
आतां हें सोवळें जालें त्रिभुवन । विषम धोऊन सांडियेलें ॥ २ ॥
ब्रह्मपुरीं वास करणें अखंड । न देखिजे तोंड विटाळाचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मां एकांताचा वास । ब्रह्मीं ब्रह्मरस सेवूं सदा ॥ ४ ॥

॥ ४४५६ ॥

ह्मणवितों दास । परि मी असें उदास ॥ १ ॥ हाचि निश्चय माझा । परि मी निश्चयाहुनि दुजा ॥२॥ सरतें कर्तृत्व माझ्यानें । परि मी त्याहीहून भिन्न ॥३॥ तुका तुकासी तुकला । तुका तुकाहूनि निराळा ॥४॥

॥ ४४५७ ॥

न देखिजे ऐसें केलें । या विठ्ठलें दुःखासी ॥ १ ॥ कृपेचिये सिंहासनीं । अधिष्ठानीं बैसविलें ॥ २ ॥ वाजता तो नलगे वारा । क्षीरसागरा शयनीं ॥३॥ तुका ह्मणे अवघे ठायीं । मज पायीं राखिलें ॥ ४ ॥

॥ ४४५८ ॥

पंधरा दिवसांमाजी साक्षात्कार जाला । विठोबा भेटला निराकार ॥१॥
भांबगिरिपाठारीं वस्ति जाण केली । वृत्ति थिरावली परब्रह्मीं ॥ २ ॥
निर्वाण जाणोनि आसन घातलें । ध्यान आरंभिलें देवाजीचें ॥ ३ ॥
सर्प विंचू व्याघ्र आंगासी झोंबले । पीडूं जे लागले सकळिक ॥ ४ ॥
दीपकीं कर्पूर कैसा तो विराला । तैसा देह जाला तुका ह्मणे ॥ ५ ॥

॥ ४४५९ ॥

पांडुरंगें सत्य केला अनुग्रह । निरसोनि संदेह बुद्धिभेद ॥ १ ॥
जीवशिवा सेज रचिली आनंदें । आउठावे पदीं आरोहण ॥ २ ॥
निजीं निजरूपीं निजविला तुका । अनुहतें बाळका हल्लरु गाती ॥ ३ ॥

॥ ४४६० ॥

निरंजनीं आह्मी बांधियेलें घर । निराकारीं निरंतर राहिलों आह्मी ॥१॥
निराभासीं पूर्ण जालों समरस । अखंड ऐक्यास पावलों आह्मी ॥२॥
तुका ह्मणे आतां नाहीं अहंकार । जालों तदाकार नित्य शुद्ध ॥ ३ ॥

॥ ४४६१ ॥

करावें तें काम । उगाच वाढवावा श्रम ॥ १ ॥ अवघें एकमय । राज्य बोलों चालों नये ॥ २ ॥ दुजयाची सत्ता । न चलेसी जाली आतां ॥ ३ ॥ आतां नाहीं तुका । पुन्हा हारपला लोकां ॥ ४ ॥

॥ ४४६२ ॥

रज्जुसर्पाकार । भासयेलें जगडंबर ॥ १ ॥ ह्मणोनि आठवितों[1] पाय । घेतों आलाय बलाय ॥ २ ॥ दृश्य द्रुमाकार लाणी । केलों सर्वस्वासी धणी ॥ ३ ॥ तुकीं तुकला तुका । विश्वीं भरोनि उरला लोकां ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ आठवती.

॥ ४४६३ ॥

घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्तां आत्मस्थिती सांडवीन ॥ १ ॥
ब्रह्मभूत[1] काया होतसे कीर्तनीं । भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥ २ ॥
तीर्थभ्रामकासी आणीन आळस । कडु स्वर्गवास करिन भोग ॥ ३ ॥
सांडवीन तपोनिधा अभिमान । यज्ञ आणि दान लाजवीन ॥ ४ ॥
भक्तिभाग्यप्रेमा साधीन पुरुषार्थ । ब्रह्मींचा जो अर्थ निजठेवा ॥ ५ ॥
धन्य ह्मणवीन येह लोकीं लोकां । भाग्य आह्मीं तुका देखियेला ॥ ६ ॥

॥ ४४६४ ॥

अवघियांच्या आलों मुळें । एका वेळे न्यावया ॥ १ ॥ सिद्ध व्हावें सिद्ध व्हावें । आधीं ठावें करितों ॥ २ ॥ जोंवरि ते घटिका दुरी । आहे उरी तो काळ ॥३॥ मंगळाचे वेळे उभे । असों शोभे सावध ॥ ४ ॥ अवघियांचा योग घडे । तरी जोडे श्लाघ्यता ॥ ५ ॥ तुका ह्मणे पाहें वाट । बहु आट करूनि ॥ ६ ॥

॥ ४४६५ ॥

चिन्हें उमटती अंगीं । शकुनाजोगीं उत्तम ॥ १ ॥ आठवला बापमाय । येइल काय मूळ नेणों ॥२॥ उत्कंठित जालें मन । तेंचि खुण तेथींचि ॥३॥ तुका ह्मणे कामा[2] वारीं । आळस घरीं करमेना ॥ ४ ॥

॥ ४४६६ ॥

आरोनियां पाहे वाट । कटकट सोसेना ॥१॥ आलियांस पुसें मात । तेथें चित्त लागलें ॥ २ ॥ दळीं कांडीं लोकांऐसें । परि मी नसें ते ठायीं ॥ ३ ॥ तुका ह्मणे येथें पिसें । तेथें तैसें असेल ॥ ४ ॥

॥ ४४६७ ॥

येथीलिया अनुभवें । कळों जीवें येतसे ॥१॥ दोन्ही ठायीं एक जीव ।

---

पाठभेदः—१ ब्रह्मभूत होते कायाच कीर्तनीं । २ काम.

माझी कींव त्या अंगीं ॥ २ ॥ भूक भुकेचि खाउनि धाय । नाहीं हाय अन्नाची ॥ ३ ॥ तुका ह्मणे सुख जालें । अंतर घालें त्यागुणें ॥ ४ ॥

॥ ४४६८ ॥

पैल आले हरि । शंख चक्र शोभे करीं ॥१॥ गरुड येतो फडत्कारें । ना भी ना भी ह्मणे त्वरें ॥२॥ मुगुटकुंडलांच्या दीप्ति । तेजें लोपला गभस्ति ॥३॥ मेघश्यामवर्ण हरि । मूर्ति डोळस साजिरी ॥४॥ चतुर्भुज वैजयंती । गळां माळ हे रुळती ॥५॥ पीतांबर झळके कैसा । उजळल्या दाही दिशा ॥६॥ तुका जालासे संतुष्ट । घरा आलें वैकुंठपीठ ॥७॥

॥ ४४६९ ॥

शंखचक्रगदापद्म । पैल आला पुरुषोत्तम ॥ १ ॥ ना भी ना भी भक्तराया । वेगीं पावलों सखया ॥ २ ॥ दुरूनि येतां दिसे दृष्टी । धाकें दोष पळती सृष्टी ॥३॥ तुका देखोनि एकला । वैकुंठींहूनि हरि आला ॥ ३ ॥

॥ ४४७० ॥

पैल दिसतील भार । दिंडी पताका अपार ॥ १ ॥ आला पंढरीचा राणा । दिसतील त्याच्या खुणा ॥ २ ॥ सुख वाटे मना । डोळे बाह्या स्फुरतां ॥ ३ ॥ उठिले गजर नामाचे । दळभार वैष्णवांचे ॥ ४ ॥ तुका करी रिता ठाव । त्यांसी बैसावया वाव ॥ ५ ॥

॥ ४४७१ ॥

चला जाऊं रे सामोरे । पुढें भेटों विठ्ठल धुरे ॥ १ ॥ तुका आनंदला मनीं । कैसा जातो लोटांगणीं ॥२॥ फेडावया धणी । प्रेमसुखाची आजि ॥ ३ ॥ पुढें आले कृपावंत । मायबाप साधुसंत ॥ ४॥ तुका आळंगिला बाहीं । ठेविला विठोबाचे पायीं ॥ ५ ॥

॥ ४४७२ ॥

सकळही माझी बोळवण करा । परतोनि घरा जावें तुह्मीं ॥ १ ॥

कर्मधर्मे तुह्मां असावें कल्याण । द्या माझें वचन आशीर्वाद ॥ २ ॥
वाढवूनि दिलों एकाचिये हातीं । सकळ निश्चिंती जाली तेथें ॥ ३ ॥
आतां मज जाणें प्राणेश्वरासवें । मी[1] माझिया भावें अनुसरलों ॥ ४ ॥
वाढवितां लोभ होईल उसीर । अवघींच स्थिर करा ठायीं ॥ ५ ॥
धर्म अर्थ काम जाला एके ठायीं । मेळविला जिहीं हाता हात ॥६॥
तुका ह्मणे आतां जाली हेचि भेटी । उरल्या त्या गोष्टी बोलावया॥७॥

॥ ४४७३ ॥

तुका उतरला तुकीं । नवल जालें तिहीं लोकीं ॥ १ ॥ नित्य करितों कीर्तन । हेंचि माझें अनुष्ठान ॥ २ ॥ तुका बैसला विमानीं । संत पाहाती लोचनीं ॥३॥ देव भावाचा भुकेला। तुका वैकुंठासी नेला॥४॥

॥ ४४७४ ॥

वाराणसीपर्यंत असों सुखरूप । सांगावा निरोप संतांसी हा ॥ १ ॥
येथूनियां आह्मां जाणें निजधामा । सवें असे आह्मां गरुड हा ॥ २ ॥
कृपा असों द्यावी मज दीनावरी । जातसों माहेरीं तुका ह्मणे ॥ ३ ॥

॥ ४४७५ ॥

आह्मी जातों आपुल्या गांवा । आमुचा रामराम घ्यावा ॥ १ ॥ तुमची आमची हेचि भेटी । येथूनियां जन्मतुटी ॥२॥ आतां असों द्यावी दया । तुमच्या लागतसें पायां ॥ ३ ॥ येतां निजधामीं कोणी । विठ्ठल विठ्ठल बोला वाणी ॥४॥ रामकृष्ण मुखीं बोला । तुका जातो वैकुंठाला ॥५॥

॥ ४४७६ ॥

आह्मी जातों तुह्मी कृपा असों द्यावी । सकळां सांगावी विनंती माझी॥१॥
वाढवेळ जाला उभा पांडुरंग । वैकुंठा श्रीरंग बोलावितो ॥ २ ॥ अंतकाळीं विठो आह्मांसी पावला । कुडीसहीत जाला गुप्त तुका ॥ ३ ॥

---

पाठभेदः—१ 'मी' नाहीं.

# कान्होबाचे अभंग.

॥ ४४७७ ॥

सुंदर मुख साजिरें । कुंडलें मनोहर गोमटीं वो ॥ नागर नागखोपा । केशर कस्तुरी मळवटीं वो ॥ विशाळ व्यंकट नेत्र । वैजयंती तळपे कंठीं वो ॥ कास पितांबराची । चंदन सुगंध साजे उटी वो ॥ १ ॥ अतिबरवंटा बाळा । आली सुलक्षणी गोंधळा वो ॥ राजस तेजोराशी । मिरवी शिरोमणी वेल्हाळा वो ॥ कोटि रविशशिप्रभा । लोपल्या सकळा वो ॥ न कळे ब्रह्मादिकां । अनुपम्य इची लीळा वो ॥ २ ॥ सावळी सकुमार । गोरी भुजा शोभती चारी वो ॥ सखोल वक्ष-स्थळ । सुढाल पदक झळके वरी वो ॥ कटीं क्षुद्र घंटिका । शब्द करिताती माधुरी वो ॥ गर्जत चरणीं वाकी । अभिनव संगीत नृत्य करी वो ॥३॥ अष्टांगीं मंडित काय । वर्णावी रूपठेवणी वो ॥ शोधिव सुंदरें रसाची ओतिली । सुगंध लावण्यखाणी वो ॥ सर्वकळासंपन्न । मंजुळ बोले हास्यवदनी वो ॥ बहु रूपें नटली । आदिशक्ति नारायणी वो ॥ ४ ॥ घटस्थापना केली । पंढरपुरमहानगरीं वो ॥ अस्मानी मंडप दिला । तिन्ही ताळांवरी वो ॥ आरंभिला गोंधळ इनें । चंद्रभागे-तिरीं वो ॥ आली भक्तिकाजा । कृष्णाबाई योगेश्वरी वो ॥५॥ तेहतीस कोटि देव । चामुंडा अष्ट कोटि भैरव वो ॥ आरत्या कुरवंड्या । करिती पुष्पांचा वरुषाव वो ॥ नारद तुंबर गायन । ब्रह्मानंद करिती गंधर्व वो ॥ वंदी चरण रज । तेथें तुकयाचा बांधव वो ॥ ६ ॥

॥ ४४७८ ॥

पवित्र सुदिन उत्तम दिवस दसरा । सांपडला तो साधा आजि मुहूर्त

---

पाठभेद:—१ सुलक्षणा. २ शुद्ध.

बरा। गर्जा जयजयकार हरि हृदयीं धरा। आळस नका करूं लाहानां सांगतों थोरां ॥१॥ या हो या हो बाइयांनो निघाले हरी। सिलंगणा घेऊनि वेगीं आरत्या करीं। ओवाळूं श्रीमुख वंदूं पाउलें शिरीं। आह्मां दैव आलें येथें घरिच्या घरीं ॥२॥ अक्षय मुहूर्त औटामध्यें साधे तें। मग येरी गर्जे जैसें तैसें होत जातें। ह्मणोनि मागें पुढें कोणी न पाहावें येथें। सांडा परतें काम जाऊं हरी सांगातें ॥३॥ बहुतां बहुतां रीतीं चित्तीं धरा हे मनीं। नका गई करूं आइकाल ज्या कानीं। मग हें सुख कधीं न देखाल स्वप्नीं। उरेल हायहाय मागें होईल कहाणी ॥४॥ ऐसियास वंचती त्यांच्या अभाग्या पार। नाहीं नाहीं नाहीं सत्य जाणा निर्धार। मग हे वेळ घटका न ये अजरामर। कळलें असों द्या मग पडतील विचार ॥ ५ ॥ जयासाटीं ब्रह्मादिक जालेती पिसे। उच्छिष्टा कारणें देव जळीं जाले मासे। अर्द्धांगीं विश्वमाता लक्ष्मी वसे। तो हा तुकयाबंधु ह्मणे आलें अनायासें ॥ ६ ॥

॥ ४४७३ ॥

मनु राजा एक देहपुरी। असे नांदतु त्यासी दोघी नारी। पुत्र-पौत्र संपन्न भारी। तेणें कृपा केली आह्मांवरी गा ॥ १ ॥ ह्मणउनी आलों या देशा। होतों नाहीं तरी भुललों दिशा। दाता तो मज भेटला इच्छा। येउनि मारग दाविला सरीसा गा ॥ २ ॥ सवें घेउनि चौघे-जण। आला कुमर सुलक्षण। कडे चुकवूनि कांटवण। ऐका आणिलीं तीं कोण कोण गा ॥ ३ ॥ पुढें भक्तीनें धरिलें हातीं। मागें ज्ञान वैराग्य धर्म येती। स्थिर केलीं जीं आचपळें होतीं। सिद्ध आणुनि लाविलीं पंथीं गा ॥ ४ ॥ केले उपकार सांगों काय। बाप न करी ऐसी माय। धर्में त्याच्या देखियेले पाय। दिलें अखय भय वारुनि दान गा ॥ ५ ॥ होतों पीडत हिंडतां गांव। पोट भरे ना राहावया ठाव। तो येणें अवघा संदेह। ह्मणे फेडियेला तुकयाचा बांधव गा॥६॥

॥ ४४८० ॥

गातों वासुदेव मी ऐका । चित्त ठेवुनि ठायीं भावें एका । डोळे झांकुनि रात्र करूं नका । काळ करीत बैसला लेखा गा ॥ १ ॥ राम राम स्मरा आधीं । लाहो करा गांठ घाला मूळबंदीं । सांडावी[1] उगिया उपाधी । लक्ष लावुनि राहा गोविंदीं गा ॥ २ ॥ अल्प आयुष्य मानवी देह । शत गणिलें तें अर्ध रात्र खाय । पुढें बालत्व पीडा रोग क्षय । काय भजनासी उरलें तें पाहें गा ॥ ३ ॥ क्षणभंगुर नाहीं भरंवसा । व्हा रे सावध सोडा माया आशा । न चले बळ पडेल मग फांसा । पुढें हुशार थोर आहे ओळसा गा ॥ ४ ॥ कांहीं थोडें बहुत लागपाठ । करा भक्ति भाव धरा बळकट । तन मन ध्यान लावूनियां नीट । जर असेल करणें गोड शेवट गा ॥ ५ ॥ विनवितों सकळां जनां । कर जोडुनि थोरां लाहनां । दान इतुलें द्या मज दीना । ह्मणे तुकयाबंधु राम ह्मणा गा ॥ ६ ॥

॥ ४४८१ ॥

गेले टळले पहार तीन । काय निदसुरा अज्ञान । जागे होउनि करा कांहीं दान । नका ऐकोनि झाकों लोचन गा ॥ १ ॥ हरी राम कृष्ण वासुदेवा । जाणवितसें जना । चिपळ्या टाळ हातीं मुखीं घोष । नारायणा गा ॥ २ ॥ जें टाकेल कोणा कांहीं । फळ पुष्प अथवा तोय । द्या परी मीस घेऊं नका भाई । पुढें विन्मुख होतां बरें नाहीं गा ॥ ३ ॥ देवाकारणें भाव तस्मात । द्यावें न लगे फारसें वित्त । जालें एक चित्त तरी बहुत । तेवढ्यासाठीं नका करूं वाताहात गा ॥ ४ ॥ आलों येथवरी बहु सायासें । करितां दान हेंचि मागायास । नका भार घेऊं करूं निरास । धर्म सारफळ संसारास गा ॥ ५ ॥ आतां मागुता येईल फेरा । हें तों न घडे या नगरा । ह्मणे तुकयाबंधु भाव धरा । ओळखी नाहीं तरी जाल अघोरा गा ॥ ६ ॥

---

पाठभेदः—१ सांडाव्या.

॥ ४४८२ ॥

करूनि आइत सत्यभामा मंदिरीं रे । वाट पाहे टक्रोनि गेली रात्री रे । न येचि देव येती कामलहरी रे । पडिली दुश्चिती तंव तो कवाड टिमकारी रे ॥१॥ सर गा परता कळला तुझा भाव रे । कार्यापुरतें हें दाविसी लाघव रे । बोलतोसी तें अवघी तुझी माव रे । जाणोनि आलासी उजडता समयो रे ॥ २ ॥ मीच वेडी तुजला बोल नाहीं रे । दानावेळे विटंबणा जाली काय रे । मागुती रुद्रासी भेटी दिली तई रे । विश्वासतें तुझ्या बोला अझुनि तरी रे ॥ ३ ॥ भ्रम होता तो अवघा कळों आला रे । मानवत होतें मी भला भला रे । नष्टा क्रिया नाहीं मां तुझ्या बोला रे । तुकयाबंधु स्वामी कानड्या कोसाल्या रे ॥४॥

॥ ४४८३ ॥

तंव तो हरि ह्मणे निजांगने वो । लाइ नीच कां देसील डोहणे वो । मजपें दुजें आलें तें देव जाणे वो । शब्द काय हे बोलसी ते उणे वो ॥ १ ॥ पाहा मनीं विचारूनि आधिं वो । सांडूनि देह भ्रांति करीं स्थिर बुद्धि वो । तंट केलें हें माझें तुझें उपाधि वो । उघडीं डोळे अझुनि तरी धरीं शुद्धि वो ॥ २ ॥ कोठें तरी दुनियांत वर्तलें वो । स्त्रियांनीं भ्रतारा दाना दिलें वो । कैसा मी भला नव्हे तें सोसिलें वो । रुसतेसी तूं उफराटें नवल जालें वो ॥ ३ ॥ काय सांग म्यां दैन्य केली कैसी वो । तुझ्या गर्वें आणविलें हनुमंतासी वो । कष्टी केलें मज गरुडा भीमकीसी वो । तुकयाबंधु ह्मणे खरें खोटें नव्हे यासी वो ॥ ४ ॥

॥ ४४८४ ॥

तंव ते ह्मणे ऐका हृषीकेशी वो । नवाजिलें तुह्मी ह्मणा आपणांसी वो । तरी कां वंचनुक सुमनासी वो । नट नाट्य बरें संपादूं जाणसी वो ॥ १ ॥ सर हो परता आतां हो हरी । ह्मणे सत्राजिताची कुमरी ।

जाणतें मी या शब्दाच्या कुसरी । ऐसेंच करून ठकविलें आजिवरी ॥ २ ॥ भावें गेलें म्हूण न व्हावा वियोग । मनींची आर्त जन्मांतरीं व्हावा संग । तों तों केलें पाठमोरें हें जग । ऐसें काय जाणें हे तुझे रंग ॥ ३ ॥ काय करूं या नागविलें कामें । लागलें तयास्तव इतुकें सोसावें नेमें । नाहीं तरी कां नव्हतीं ठावीं वर्मे । परद्वारीं ऐसा हाकलिती प्रसिद्धनांवें ॥ ४ ॥ काय किती सांगावे तुझे गुण । न फुटे वाणी निष्ठुर ऐसा निर्गुण । आपपर न ह्मणसी माय बहीण । सासूसुनास लावूनि पाहासी भांडण ॥५॥ इतुकियावरी ह्मणे वैकुंठीचा राणा । होऊन गेलें तें नये आणूं मना । आतां न करीं तैसें करी क्रिया आणा । भक्तवत्सल ह्मणे तुकयाबंधु कान्हा ॥ ६ ॥

॥ ४४८५ ॥

अगा ये वैकुंठनायका । अगा ये त्रैलोक्यतारका । अगा जनार्दना जगव्यापका । अगा पालका भक्तांचिया ॥१॥ अगा ये वसुदेवदेवकी-नंदना । अगा ये गोपिकारमणा । अगा बळिबंध वामना । अगा निधाना गुणनिधी ॥ २ ॥ अगा ये द्रौपदीबांधवा । अगा ये सखया पांडवा । अगा जीवाचिये जीवा । अगा माधवा मधुसूदना ॥ ३ ॥ अगा महेश्वरा महाराजा । अगा श्रीहरी गरुडध्वजा । अगा सुंदरा सहस्रभुजा । पार मी तुझा काय वर्णूं ॥ ४ ॥ अगा अंबऋषिपरंपरा । निरालंबा निर्विकारा । अगा गोवर्धनधरणीधरा । अगा माहेरा दीना-चिया ॥५॥ अगा धर्मराया धर्मशीळा । अगा कृपासिंधु कृपाळा । अगा प्रेमाचिया कल्लोळा । सकळकळाप्रवीणा ॥ ६ ॥ अगा चतुरा सुजाणा । मधुरा-गिरा सुलक्षणा । अगा उदारा असुरमर्दना । राखें शरणा तुकयाबंधु ॥ ७ ॥

॥ ४४८६ ॥

देवा मी चांडाळ चांडाळ । ह्मणतां लागताहे वेळ । नसें पाहातां भूमंडळ । ऐसा अमंगळ खळ दुसरा ॥ १ ॥ जन्मा उपजलियापा-

सुनी । असत्य कर्म तें अझुनी । सत्य आचरण नेणें स्वप्नीं । निखळ खाणी अवगुणांची ॥ २ ॥ भक्ति दया अथवा कथा । कानीं न साहवे वार्ता । अखंड विषयांची वेथा । अधम पुरता अधमाहुनी ॥३॥ काम क्रोध दंभ अहंकार । गर्व ताठा मद मत्सर । यांचें तरी माहेरघर । परउपकार वैरी जैसा ॥ ४ ॥ निंदा द्वेष घात विश्वास । करितां नाहीं केला आळस । करूं नये ते केले संतउपहास । अभक्ष तेंही भक्षिलें ॥ ५ ॥ पाळिलें नाहीं पितृवचन । सदा परद्वारीं परधनीं ध्यान । बोलों नये घडलें ऐसें अन्योन्यविण । दासीगमन आदिकरुनी ॥ ६ ॥ कायामनें वाचाइंद्रियांशीं । सकळ पापांचीच राशी । तुकयाबंधु ह्मणे ऐसियासी । आलों हृषीकेशी तुज शरण ॥ ७ ॥

॥ ४४८७ ॥

काय काय करितों या मना । परि नाइके नारायणा । करूं नये त्याची करी विवंचना । पतना नेऊं आदरिलें ॥ १ ॥ भलतिया सवें धांवे सैराट । वाट आडवाट दरे दरकुट । न विचारी कुडें कांहीं कपट । घात बळकट मांडियेला ॥ २ ॥ न पुरती भ्रमणा दाही दिशा । सप्त ही पाताळ आकाशा । घाली उडी बळेंचि देखोनि फांसा । केलों या देशा पाहुणा ॥ ३ ॥ चेतवून इंद्रियें सकळ । आशा तृष्णा कल्पना काम क्रोध काळ । दुगाविली शुद्ध बुद्धि केली राळ । ऐसें चांडाळ अनिवार हें ॥ ४ ॥ आतां काय ऐसें करावें यासी । बहु जाचिलों केलों कासाविसी । तुकयाबंधु ह्मणे हृषीकेशी । धांव मज ऐसी परी जाली ॥ ५ ॥

॥ ४४८८ ॥

एक मागणें हृषीकेशी । चित्त द्यावें सांगतों वचनासी । मज अंतर तुझ्या चरणासी । न पडे ऐसी कृपा करीं ॥ १ ॥ नको दुजी बुद्धि आणीक । रिद्धिसिद्धी परलोक । तूं स्वामी मी सेवक । खंडणा नको करूं ऐसी

॥ २ ॥ मना येईल तो जन्म देईं । भलतें कुळीं भलतें ठायीं । तें मी सांकडें घालीत नाहीं । हृदयींहुनी तुवां नव जावें ॥ ३ ॥ इतुकें करीं भलत्या परी । भलत्या भावें तुझें द्वारीं । राहेन दास होऊनि कामारी । वदो वैखरी नित्य नाम ॥ ४ ॥ नको विचारूं दुसरें आतां । शरण आलों जी पंढरीनाथा । तुकयाबंधु ह्मणे रे अच्युता । आहेसी तूं दाता दानशूर ॥५॥

॥ ४४८९ ॥

तूं बळिया शिरोमणी । आहेसि माजी ये त्रिभुवनीं । रिघालों पाठी तुझी ह्मणउनी । आतां करीन मी असेल तें ॥ १ ॥ तूं देवा प्रताप दिनकर । सुरा असुरांचा सुर । महावीरां वीर धनुर्धर । मी तों पामर काय तेथें ॥ २ ॥ कृपासिंधु दीनवत्सळ । फोडिली देवांची वंद शाळ । संहारूनि राक्षस-दळ । शरणांगत राजीं स्थापिला ॥ ३ ॥ उपक्रम करावा बहुत । तरी तूं जाणसी धर्मनीत । उचित काय तें अनुचित । राखें शरणागत आलों आतां ॥ ४ ॥ किती म्यां काय विनवावें । शरण आलों जीवें भावें । तुकयाबंधु ह्मणे करावें । क्षेम आववें येणें काळें ॥ ५ ॥

॥ ४४९० ॥

उभा देखिला भीमातीरीं । कर मिरवले कटावरी । पाउलें तरी समचि साजिरीं । नाम तरी अनंत अति गोड ॥ १ ॥ शंखचक्रांकित भूपणें । जडित-मेखळा चिद्रत्नें । पीतांबर उटी शोभे गोरेपणें । लोपलीं तेणें रवितेजें ॥ २ ॥ श्रवणीं कुंडलें देती ढाळ । दशांगुळीं मुद्रिका माळ । दंत ओळी हिरे झळाळ । मुख निर्मळ सुखरासी ॥ ३ ॥ कटीं कडदोरा वांकी वेळा । वाहीं बाहुवटे पदक गळां । मृगनाभी रेखिला टिळा । लवती डोळां विद्युल्लता ॥ ४ ॥ सुंदरपणाची साम्यता । काय वर्णूं ते पावे आतां । तुकयाबंधु ह्मणे रे अच्युता । धन्य ते मातापिता प्रसवली ॥ ५ ॥

---

पाठभेदः—१ हृदयींहुनी तूं न वजें.

॥ ४४९१ ॥

कई देखतां होईन डोळीं । सकळां भूतीं मूर्ति सांवळी । जीवा नांव भूमंडळीं । जळीं स्थळीं काष्टीं पाषाणीं ॥ १ ॥ ऐसा कृपा करील नारायण । जीव जगाचा होईन । प्रेमसागरीं बुडईन । होईल स्नान अनुतापीं ॥ २ ॥ ऐसा कई येईन दैवास । दृश्य नासोनि जाईल आस । सदा संतचरणीं देहाचा वास । सेवीन शेष धणीवरी ॥ ३ ॥ कई नवसा येतील अंकुर । सुखा नाहींसा होईल पार । अमृत तें पृथ्वीजळ सागर । वाहाती पूर आनंदाचे ॥ ४ ॥ प्रसन्न दया क्षमा शांति । कई नवविधा होईल भक्ति । भोगीन वैराग्यसंपत्ति । मनोरथ कळती तई पुरले ॥ ५ ॥ तुकयाबंधु ह्मणे सांग । नव्हे तुजविण निरसेना पांग । ह्मणोनि घातलें साष्टांग । पांडुरंगा चरणावरी ॥ ६ ॥

## कान्होबास तुकोबाच्या वियोगानें झालेला विरहताप.

॥ ४४९२ ॥

दुःखें दुभागलें हृदयसंपुष्ट । गहिंवरें कंठ दाटताहे ॥ १ ॥
ऐसें काय केलें सुमित्रा सखया । दिलें टाकोनियां वनामाजीं ॥२॥
आक्रंदती बाळें करुणावचनीं । त्या शोकें मेदिनी फुटों पाहे ॥ ३ ॥
काय हें सामर्थ्य नव्हतें तुजपाशीं । संगें न्यावयासी अंगभूतां ॥ ४ ॥
तुज ठावें आह्मां कोणी नाहीं सखा । उभय लोकीं तुका तुजाविण ॥५॥
कान्हा ह्मणे तुझ्या वियोगें पोरटीं । जालों दे रे भेटी बंधुराया ॥ ६ ॥

॥ ४४९३ ॥

सख्यत्वासी गेलों करीत सलगी । नेणोंचि अभागी महिमा तुझा ॥ १ ॥
पावलों आपुलें केलें[2] लाहे रस । निर्दैवां परिस काय होय ॥ २ ॥
कष्टविलासी म्यां चांडाळें संसारीं । अद्यापिवरि तरी उपदेशीं ॥ ३ ॥
उचित अनुचित सांभाळिलें नाहीं । कान्हा ह्मणे कांहीं बोलों आतां ॥४॥

---

पाठभेदः—१ बरी चरणा. २ केलें लाहेंरास.

॥ ४४९४ ॥

असो आतां कांहीं करोनियां ग्लांती । कोणा काकुलती येइल येथें ॥१॥
करूं कांहीं दिस राहे तों सायास । झोंबों त्या लागास भावाचिये ॥२॥
करितां रोदना बापुडें ह्मणती । परि नये अंतीं कामा कोणी ॥ ३ ॥
तुकयाबंधु ह्मणे पडिलिया वनीं । विचार तो मनीं बोलिला हे ॥ ४ ॥

॥ ४४९५ ॥

चरफडे चरफड शोकें शोक होये । कार्यमूळ आहे धीरापाशीं ॥ १ ॥
कल्पतसे मज ऐसें हें पाहातां । करावी ते चिंता मिथ्या खोटी ॥२॥
न चुके होणार सांडिल्या शूरत्वा । फुकटचि सत्वा होइल हानी ॥३॥
तुकयाबंधु ह्मणे दिल्या वंद मना । वांचूनि निधाना न पवीजे ॥ ४ ॥

## कान्होबाचें तुकोबाच्या वियोगामुळें देवाशीं कठोर भाषण.

॥ ४४९६ ॥

नलगे चिंता आतां अनुमोदन हाता । आलें मूळ भ्राता गेला त्याचें ॥१॥
घरभेद्या येथें आहे तें सुकानु । धरितों कवळून पाय दोन्ही ॥ २ ॥
त्याचें त्याचिया मुखें पडिलें ठावें । नलगे सारावें मागें पुढें ॥ ३ ॥
तुकयाबंधु ह्मणे करील भेटी भावा । सोडीन तेधवां या विठ्ठला ॥४॥

॥ ४४९७ ॥

मूळस्थळ ज्याचें गोमतीचे तीरीं । तो हा सारी दोरी खेळवितो ॥१॥
ऐसें हें कळलें असावें सकळां । चोर त्या वेगळा नाहीं दुजा ॥ २ ॥
वैष्णव हे हेर तयाचे पाळती । खूण हे निरुती सांगितली ॥ ३ ॥
तुकयाबंधु ह्मणे आलें अनुभवास । तेणेंच आह्मांस नागविलें ॥ ४ ॥

॥ ४४९८ ॥

नये सोमसरी उपचाराची हरी । करकरेचें करीं काळें तोंड ॥ १ ॥
मागतों इतुकें जोडुनियां कर । ठेवुनियां शिर पायावरी ॥ २ ॥

तुह्मां आह्मां एके ठायीं सहवास । येथें द्वैत द्वेष काय बरा ॥ ३ ॥
तुकयाबंधु ह्मणे बहुतां बहुतां रीती। अनंता विनंती परिसावी हे ॥४॥

॥ ४४९९ ॥

बरा रे निर्गुणा नष्ट नारायणा । घरबुडवणा भेटलासी ॥ १ ॥
एके घरीं कोणी कोणासी न धरी। ऐसी अपरांपरी केली आह्मां ॥२॥
कान्हा ह्मणे कां रे निष्काम देखिलें। ह्मणोनि मना आलें करितोसी ॥३॥

॥ ४५०० ॥

निनांव हें तुला । नांव साजे रे विठ्ठला । बरा शिरविला । फाटक्यामध्यें पाव ॥ १ ॥ कांहीं तरी विचारिलें । पाप पुण्य ऐसें केलें । भुरळें घातलें । एकाएकीं भावासी ॥ २ ॥ मुद्राधारण माळा टिळे । बोल रसाळ कोंवळे । हातीं फांशाचें गुंडाळें । कोण चाळे गृहस्था हे ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे मिस्किन । करितोसी देखोन । पाहा दुरिवरी विच्छिन्न । केला परी संसार ॥ ४ ॥

॥ ४५०१ ॥

लालुचाईसाटीं बळकाविसी भावा। परि मी जाण देवा जिरों नेदी ॥ १ ॥
असों द्या निश्चय हा मनीं मानसीं। घातली येविशीं दृढ कास ॥ २ ॥
मंज आहे बळ आळीचें सबळ । फोडीन अंत्राळ हृदय तुझें ॥ ३ ॥
करुणारसें तुकयाबंधु ह्मणे भुलवीन । काढूनि घेईन निज वस्तु ॥४॥

॥ ४५०२ ॥

भक्ति मुक्ति तुझें जळों ब्रह्मज्ञान। दे माझ्या आणोनि भावा वेगीं ॥१॥
रिद्धि सिद्धि मोक्ष ठेवीं गुंडाळून। दे माझ्या आणून भावा वेगीं ॥२॥
नको आपुलिया नेऊं वैकुंठासी। दे माझ्या भावासी आणुन वेगीं ॥३॥
नको होऊं कांहीं होसील प्रसन्न। दे माझ्या आणून भावा वेगीं ॥ ४ ॥
तुकयाबंधु ह्मणे पाहा हो नाहीं तरी। हत्या होईल शिरीं पांडुरंगा ॥५॥

॥ ४५०३ ॥

धींदधींद तुझ्या करीन धींदड्या । ऐसें काय वेड्या जाणितलें ॥ १ ॥
केली तरी बरें मज भेटी भावास । नाहीं तरी नास आरंभिला ॥ २ ॥
मरावें मारावें या आलें प्रसंगा । बरें पांडुरंगा कळलेंसावें ॥ ३ ॥
तुकयाबंधु ह्मणे तुझी माझी उरी । उडाली न धरीं भीड कांहीं ॥ ४ ॥

॥ ४५०४ ॥

तुझीं वर्मे आह्मां ठावीं नारायणा । परि तूं शाहाणा होत नाहीं ॥ १ ॥
मग कालाबुली हाका देते वेळे । होतोसि परि डोळे नुघडिसी ॥ २ ॥
जाणोनि अज्ञान करावें मोहरें । खोटी खोडी हे रे तुझी देवा ॥ ३ ॥
तुकयाबंधु ह्मणे कारण प्रचीति । पाहातां वेळ किती तेचि गुण ॥ ४ ॥

॥ ४५०५ ॥

मुख्य आहे आह्मां मातेचा पटंगा । तुज पांडुरंगा कोण लेखी ॥ १ ॥
नको लावूं आह्मां सवें तूं तोंवरी । पाहा दूरवरी विचारूनी ॥ २ ॥
साहे संतजन केले महाराज । न घडे आतां तुज भेईन मी ॥ ३ ॥
तुकयाबंधु ह्मणे अइक्यें ऐक्यता । वाढतें अनंता दुःखें दुःख ॥ ४ ॥

॥ ४५०६ ॥

नाहीं घटिका ह्मणसी । लाग लागला तुजपाशीं । पडिला हृषीकेशी । जाब सकळ करणें ॥ १ ॥ माझें नेलें पांघरूण । ठावें असोन दुर्बळ दीन । माणसांमधून । उठविलें खाणोऱ्या ॥ २ ॥ आह्मी हें जगऊनि होतों पाणी । संदीं देवदेव करूनि । जालासी कोठोनि । पैदा चोरा देहाच्या ॥३॥ तुकयाबंधु ह्मणे केलें । उघडें मजचि उमगिलें । ऐसें काय गेलें । होतें तुज न पुरतें ॥ ४ ॥

॥ ४५०७ ॥

अवघीं तुज बाळें सारिखीं नाहीं तें । नवल वाटतें पांडुरंगा ॥ १ ॥
ह्मणतां लाज नाहीं सकळांची माउली । जवळी धरिलीं एकें दुरी ॥२॥

एका सुख द्यावें घेऊनि वोसंगा । एके दारीं गळा श्रमविती ॥ ३ ॥
एका नवनीत पाजावें दाटून । एकें अन्न अन्न करितील ॥ ४ ॥
एकें वाटतील न वजावीं दुरी । एकांचा मत्सर जवळी येतां ॥ ५ ॥
तुकयाबंधु ह्मणे नावडती त्यांस । कासया व्यालास नारायणा ॥ ६ ॥

॥ ४५०८ ॥

कनवाळ कृपाळ । उदार दयाळ मायाळ । ह्मणवितोसी परि केवळ । गळेकाटू दिसतोसी ॥१॥ काय केलें होतें आह्मी । सांग तुझें एक ये जन्मीं । जालासी जो स्वामी । एवढी सत्ता करावया ॥२॥ भलेपणाचा पवाडा । बरा दाविला रोकडा । करूनि बंधु वेडा । जोडा माझा विखंडिला ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे भला । कैसें ह्मणताती तुजला । जीव आमुचा नेला । अंत पाहिला कांहीं तरी ॥ ४ ॥

॥ ४५०९ ॥

आतां कळों आले गुण । अवघेचि यावरोन । चोखट लक्षण । धरिलें हें घरघेणें ॥ १ ॥ या नांवें कृपासिंधु । ह्मणवितोसी दीनबंधु । मज तरी भेंदु । दिसतोसी पाहातां ॥ २ ॥ अमळ दया नाहीं पोटीं । कठीण तैसाचि कपटी । अंधळयाची काठी । माझी गुदरसीच ना ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे पुरता । नाहीं म्हूण बरें अनंता । एरवीं असतां । तुझा घोंट भरियेला ॥ ४ ॥

॥ ४५१० ॥

काय सांगों हृषीकेशा । आहे अनुताप आला ऐसा । गिळावासी निमिषा । निमिष लागों नेदावें ॥ १ ॥ माझें बुडविलें घर । लेंकरें बाळें दारोदार । लाविलीं काहार । तारातीर करोनि ॥ २ ॥ जीव घ्यावा किंवा द्यावा । तुझा आपुला केशवा । इतुकें उरलें आहे । भावाचिया निमित्यें ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे जग । बरें वाईट ह्मणों मग । या कारणें परी लाग । न संडावा सर्वथा ॥ ४ ॥

॥ ४५११ ॥

मायबाप निमाल्यावरी । घातलें भावाचे आभारीं । तोही परि हरी । तुज जाला असमाई ॥ १ ॥ हे कां भक्तीचे उपकार । नांदतें विध्वंसिलें घर । प्रसन्नता व्यवहार । सेवटीं हे जालासी ॥ २ ॥ एका जीवावरी । होतों दोनी कुटुंबारी । चाळवूं तो तरी । तुज येतो निर्लज्जा ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे भला । आणीक काय ह्मणावें तुला । वेडा त्यानें केला । तुजसवें संबंधु ॥ ४ ॥

॥ ४५१२ ॥

पूर्वी पूर्वजांची गती । हेचि आइकिली होती । सेवे लावूनि श्रीपती । निश्चिंती केली तयांची ॥ १ ॥ कां रे पाठी लागलासी । ऐसा सांग हृषीकेशी । अद्यापवरी न राहासी । अंत पाहासी किती म्हूण ॥ २ ॥ जन्मजन्मांतरीं दावा । आह्मां आपणां केशवा । निमित्य चालवा । काइसयास्तव हें ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे अदेखणा । किती होसी नारायणा । देखों सकवेना । खातयासी न खात्या ॥ ४ ॥

॥ ४५१३ ॥

निसुर संसार करून । होतों पोट भरून । केली विवसी निर्माण । देवपण दाखविलें ॥ १ ॥ ऐसा काढियेला निस । काय म्हूण सहित वंश । आणिलें शेवटास । हाउस तरी न पुरे ॥ २ ॥ उरलों पालव्या सेवटीं । तेंही न देखवे दृष्टी । दोघांमध्यें तुटी । रोकडीचि पाडिली ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे गोड । बहु जालें अति वाड । ह्मणोनि कां बुड । मुळ्यांसहित खावें ॥ ४ ॥

॥ ४५१४ ॥

बरा जाणतोसी धर्मनीति । उचित अनुचित श्रीपती । करूं येते राती । ऐसी डोळे झांकूनि ॥ १ ॥ आतां जाब काय कैसा । देसी तो दे जगदीशा । आणिला वोळसा । आपणां भोंवता ॥ २ ॥ सेवेचिया

सुखास्तव । बळें धरिलें अज्ञानत्व । येईल परि हा भाव । ज्याचा त्यासी कारणा ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे नाहीं । आतां आह्मां बोल कांहीं । जडोनियां पायीं । तुझे त्वांचि घेतलें ॥ ४ ॥

॥ ४५१५ ॥

कांहीं विपत्ति अपत्यां । आतां आमुचिया होतां । काय होईल अनंता । पाहा बोलों कासया ॥ १ ॥ बरें अनायासें जालें । सायासेंविण बोले चाले । कावाड चुकलें । केलें कष्टावेगळें ॥ २ ॥ बरा सांपडलासी बोजा । वर्मावरी केशीराजा । बोलायासी तुझा । उजुरचि नाहींसा ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे दगा । बरा दिला होता [1]बा गा । झडकरी [2]चलागा । चांग दैवें पावलों ॥ ४ ॥

॥ ४५१६ ॥

देवा तुजपें माझ्या पूर्वजांचें ऋण । आहे तें कां नेदिसी अझून । अवगलासी झोंडपणें । परि मी जाण जीवें जिरों नेदीं ॥ १ ॥ कळों येईल रोकडें । उभा करिन संतांपुढें । तुझें काय एवढें । भय आपुलें मागतां ॥ २ ॥ आजिवरी होतों नेणता । तों तुज फावलें रे अनंता । कवडीचा तो आतां । पडों नेदीन फेर ॥ ३ ॥ ठेविला ये जीवनीं जीव । ह्मणे तुकयाचा बांधव । माझा गळा तुझा पाव । एके ठायीं बांधेन ॥ ४ ॥

॥ ४५१७ ॥

मागें असताशी कळला । उमस घेऊं नसता दिला । तेणेंचि काळें केला । असता अवघा निवाडा ॥ १ ॥ इतका न लगता उशीर । न धरितों भीडभार । सिद्धासी व्यवहार । कासयासी लागला ॥२॥ असोनियां माल खरा । किती केल्या येरझारा । धरणेंही दिवस

---

पाठभेदः—१ बागा. २ चलगा.

तेरा । माझ्या भावें घेतलें ॥ ३ ॥ अझुन तरी इतक्यावरी । चुकवीं जनाचार हरी । तुकयाबंधु ह्मणे उरी । नाहीं तरी नुरे कांहीं ॥ ४ ॥

॥ ४५१८ ॥

आतां न राहें क्षण एक । तुझा कळला रे लौकिक । नेदीं हालों एक । कांहीं केल्यावांचूनि ॥ १ ॥ संबंध पडिला कोणाशीं । काय डोळे झांकितोसी । नेईन पांचांपाशीं । दे नाहींतरी वोढूनि ॥ २ ॥ सुखें नेदीस जाणवलें । नास केल्याविण उगलें । तरि तेंही विचारिलें । आह्मी आहे तुज आधीं ॥ ३ ॥ असेंच करूनि किती । नागविलीं नाहीं नीती । तुकयाबंधु ह्मणे अंतीं । न सोडिसी ते खोडी ॥ ४ ॥

॥ ४५१९ ॥

तुज ते सवे आहे ठावें । घ्यावें त्याचें बुडवावें । परि तें आह्मांसवें । आतां न फावे कांहीं ॥ १ ॥ नव्हों सोडायाचे धणी । कष्टें मेळविलें करोनि । पाहा विचारोनी । आढी धरोनि काम नाहीं ॥ २ ॥ अवघे राहिले प्रकार । जालों जीवासी उदार । असा हा निर्धार । कळला असावा असेल ॥ ३ ॥ आतां निदसुर नसावें । गांठ पडली कुणब्यासवें । तुकयाबंधु ह्मणे राखावें । देवा महत्व आपुलें ॥ ४ ॥

॥ ४५२० ॥

बहु बोलणें नये कामा । वाउगें तें पुरुषोत्तमा । एकाचि वचनें आह्मां । काय सांगणें तें सांग ॥ १ ॥ देणें आहे कीं भंडाई । करणें आहे सांग भाई । आतां भीड कांहीं । कोणी न धरी सर्वथा ॥ २ ॥ मागें गेलें जें होउनी । असो तें धरित नाहीं मनीं । आतां पुढें येथूनि । कैसा काय विचार ॥ ३ ॥ सारखी नाहीं अवघी वेळ । हें तों कळतें सकळ । तुकयाबंधु ह्मणे खळखळ । करावी ते उरेल ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ भांडाई.

॥ ४५२१ ॥

आतां हें न सुटे न चुके । बोल कां दवडिसी फिके । जन लोक पारिखें । अवघें केलें म्यां यासाटीं ॥ १ ॥ नये सरतां नव्हे भलें । तुझें लक्षण कळलें । बैसलासी काढिलें । देहाचे मुळीं दिवाळें ॥ २ ॥ दिसतोसी बरा बोल कोंवळे । गुण मैंदाचे चाळे । दिसताती ये-वेळे । काय करूं विसंबोनि ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे देखतां । अंध बहिर ऐकतां । कैसें व्हावें आतां । इतुकियाउपरी ॥ ४ ॥

॥ ४५२२ ॥

तिहीं ताळीं हेचि हाक । ह्मणती पांढरा स्फटिक । अवघा बुडविला लौकिक । सुखेंचि भिके लाविलीं ॥ १ ॥ थोंटा नांव शिरोमणी । नाहीं जोडा त्रिभुवनीं । ह्मणोनि शाहाणे ते कोणी । तुझे दारीं बैसतिना ॥ २ ॥ निर्गुण निलाजिरा निनांवा । लंड झोंड कुडा देवा । नागवणा या नांवा । वांचूनि दुजा नाइकों ॥३॥ सर्वगुणें संपन्न । कळों आलासी संपूर्ण । तुकयाबंधु ह्मणे चरण । आतां जीवें न सोडीं ॥ ४ ॥

॥ ४५२३ ॥

तोचि प्रसंग आला सहज । गुज धरितां नव्हे काज । न सांडितां लाज । पुढें वोज न दिसे ॥ १ ॥ तूं तर न होसी शाहाणा । नये सांगतों तेंही मना । आपण आपणा । आतां प्रयत्न देखावा ॥ २ ॥ न पुरवी पाहातां वाट । द्यावें प्रमाण चोखट । कास घालूनियां नीट । चौघाचार करावा ॥ ३ ॥ आतां श्रमाचें कारण । नव्हे व्हावें उदासीन । न पडे तयाविण । गांठी तुकयाबंधु ह्मणे ॥ ४ ॥

॥ ४५२४ ॥

हळूहळू जाड । होत चालिलें लिगाड । जाणवेल निवाड । न क-रिसी परी पुढें ॥ १ ॥ मी तों सांगून उतराई । जालों आतां तुज

काई । कळों येईल भाई । तैसा करीं विचार ॥ २ ॥ मागें युगें अठ्ठाविस । जालीं दिवसाचा दिवस । मुदल व्याज कासावीस । होसी देवा ये कामें ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे राखें । आतां टाकीं तुझीं तीं सुखें । जगजाहिर ठाउकें । जालें नाहीं खंडलेंसें ॥ ४ ॥

॥ ४५२५ ॥

पत्र उचटिलें प्रेतनें । ग्वाही कराया कारणें । नाहीं तरी पुण्यें । तुझ्या काय उणें आह्मां ॥ १ ॥ नांव तुझेंचि करोनि । आह्मों सुखें पोट भरोनि । केली केली जाणवणी । ह्मणउनि नाहीं ह्मणशील ॥२॥ आतां इतुकिया उपरी । दे नको भलतें करीं । ह्मणती ऋणकरी । आमुचा इतकें उदंड ॥३॥ तुकयाबंधु जागा । अळवावया पांडुरंगा । केला कांहीं मागा । याची नव्हती गरज ॥ ४ ॥

॥ ४५२६ ॥

माझ्या भावें केली जोडी । न सरेसी कल्पकोडी । आणियेलें धाडी । घालूनि अवघें वैकुंठ ॥ १ ॥ आतां नलगे यावें जावें । कोठें कांहींच करावें । जन्मोजन्मीं खावें खावें । सुखें वैसोनसें जालें ॥२॥ असंख्य संख्या नाहीं पार । आनंदें दाटलें अंबर । न माये अपार । त्रिभुवनीं सांटवितां ॥ ३ ॥ अवघें भरलें सदोदित । जाले सुखाचे पर्वत । तुकयाबंधु ह्मणे परमार्थ । धन अद्भुत सांपडलें ॥ ४ ॥

॥ ४५२७ ॥

आतां चुकलें देशाऊर । करणें अकरणें सर्वत्र । घरासी आगर । आलों सकळ सिद्धींचा ॥१॥ जालों निधाई निधानें । लागलें अनंतगुणरत्न । जन्माचें विच्छिन्न । दुःख जालें दारिद्र ॥ २ ॥ तारूं सागरिंचें अवचितें । हेंदोवलें आलें येथें । ओढिले संचितें । पूर्वदत्तें लाधलें ॥३॥

पाठभेदः—१ केला जाणवणी. २ हे दोवलें.

तुकयाबंधु ह्मणे सीमा । नाहीं आमुचिया दैवा । आतां पुरुषोत्तमा । ऐसा सवदागर सांपडला ॥ ४ ॥

॥ ४५२८ ॥

सांपडलें जुनें । आमुच्या वडिलांचें ठेवणें । केली नारायणें । कृपा पुण्यें पूर्वीचिया ॥ १ ॥ सुखें आनंदरूप आतां । आह्मी आहों याकरितां । निवारिली चिंता । देणें घेणें चुकलें ॥ २ ॥ जालें भांडवल घरिंचें । अमुप नाम विठ्ठलाचें । सुकृत भावाचें । हें तयानें दाविलें ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे फिटला । पांग नाहीं बोलायाला । चाड दुसरी विठ्ठला । वांचूनियां आणीक ॥ ४ ॥

॥ ४५२९ ॥

कोठें गुंतलासी द्वारकेच्या राया । वेळ कां सखया लावियेला ॥ १ ॥
दिनानाथ ब्रीद सांभाळीं आपुलें । नको पाहों केलें पापपुण्य ॥ २ ॥
पतितपावन ब्रीदें चराचर । पातकी अपार उद्धरिले ॥ ३ ॥
तुकयाबंधु ह्मणे द्रौपदीचा धांवा । केला तैसा मला पावें आतां ॥ ४ ॥

॥ ४५३० ॥

वचन[1] ऐकें कमळापती । मज रंकाची विनंती ॥ १ ॥ कर जोडितों कथेकाळीं । आपण असावें जवळी ॥ २ ॥ घेई[2] घेई माझी भाक । जरि कां मागेन आणीक ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे देवा । शब्द इतुकाचि राखावा ॥ ४ ॥

॥ ४५३१ ॥

करूनी उचित । प्रेम घालीं हृदयांत ॥ १ ॥ आलों दान मागायास । थोरी करूनियां आस ॥ २ ॥ चिंतन समयीं । सेवा आपलीच देईं ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे भावा । मज निरवावें देवा ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ वचन ऐका कमळापती. २ घेई ऐसी भाक । मागेन जरि कांहीं आणिक.

॥ ४५३२ ॥

आली ललिताची वेळ। असा सावध सकळ ॥ १ ॥ लाहो करा वेगीं स्मरा। टाळी वाउनि विश्वंभरा ॥२॥ जालिया अवसान। न संपडती चरण ॥३॥ तुकयाबंधु ह्मणे थोडे। अवधि उरली आहे पुढें ॥ ४ ॥

॥ ४५३३ ॥

कामक्रोध अहंकार नको देहीं। आशा तृष्णा माया लज्जा चिंता कांहीं। वास पंढरीचा जन्म सदा देईं। आणीक दुजें मागणें तुज नाहीं॥ १॥ कृपा देईं दान हरि मज कृपा देईं दान। नासीं त्रिमिर दाखवीं चरण। आर्त पुरवावें भेटी देऊन। नको उपेक्षूं आलिया शरण॥२॥ नाम अखंड हृदयीं राहो वाणी। न पडे विसर क्षण ज्यागृति स्वप्नीं। संतसमागम ऐसा दे लावूनि। आणीक दुजें कांहीं नेणें तुजवांचूनि ॥ ३ ॥ पंथपुरींचा रविसुत पुरे आतां। आड करावा भवसिंधु ऐसा नव्हता। नाहीं आडताळा त्रैलोक्या माजी सरता। विनवी तुकयाबंधु चरणीं ठेवूनि माथा ॥ ४ ॥

॥ ४५३४ ॥

आतां मागतों तें एक नारायणा। भावपूर्वक मनापासूनियां ॥ १ ॥ असों दे मोकळी जिव्हा जरि गाइल गुण। नाहीं तरी खिळुन टाकीं परती ॥ २ ॥ मातेचिया परि देखती परनारी। ठेवीं नेत्र तरी नाहीं तरि नको ॥ ३ ॥ तरी बरें कांटाळा करिती निंदास्तुतीचा। नाहीं तरी कानांचाही देख प्रेत्न ॥४॥ सकळ इंद्रियांचा निग्रह करूनि एक। राखावीं पृथक तोडोनि भ्रम ॥५॥ तुकयाबंधु ह्मणे तेचि वाट प्राणां। पडतां नारायणा विसर तुझा ॥ ६ ॥

॥ ४५३५ ॥

ह्मणसी दावीन अवस्था। तैसें नको रे अनंता ॥ १ ॥ होउनियां

पाठभेदः—१ वाहोनि.

सहाकार । रूप दाखवीं सुंदर ॥२॥ मृगजळाचियापरी । तैसें न करावें हरी ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे हरी । कामा नये बाह्यात्कारी ॥ ४ ॥

॥ ४५३६ ॥

नेणें गाऊं कांहीं धड बोलतां वचन । कायावाचेमनेंसहित आलों शरण ॥ १ ॥ करीं अंगीकार नको मोकलूं हरी । पतितपावन ब्रीदें करावीं खरीं ॥ २ ॥ नेणें भक्तिभाव तुझा ह्मणवितों दास । जरि देसी अंतर तरी लज्जा कोणास ॥ ३ ॥ ह्मणे तुकयाबंधु तुझे धरियेले पाये । आतां कोण दुजा ऐसा आह्मांसी आहे ॥ ४ ॥

॥ ४५३७ ॥

तूंच मायबाप बंधु सखा आमचा । वित्त गोत जीवलग जीवाचा॥१॥ आणीक प्रमाण नाहीं दुसरें आतां । योगक्षेमभार तुझे घातला माथां॥२॥ तूंच क्रियाकर्म धर्म देव तूं कुळ । तूंच तप तीर्थ व्रत गुरु सकळ॥३॥ ह्मणे तुकयाबंधु करिता कार्यता देवा । तूंच भाव भक्ति पूजा पुनस्कार आघवा ॥ ४ ॥

॥ ४५३८ ॥

गाऊं वाऊं टाळी रंगीं नाचों उदास । सांडोनि भय लज्जा शंका आस निरास ॥१॥ बळियाचा बळी तो कैवारी आमुचा । भक्तिमुक्तिदाता सकळांही सिद्धींचा ॥२॥ मारूं शब्दशस्त्रबाण निःशंक अनिवार । कंटकांचा चूर फोडूं काळाचें शिर ॥ ३ ॥ ह्मणे तुकयाबंधु नाहीं जीवाची चाड । आपुलिया तेथें काय आणिकांची भीड ॥ ४ ॥

॥ ४५३९ ॥

सांडूनि वैकुंठ । उभा विटेवरी नीट ॥१॥ आला आला रे जगजेठी । भक्तापुंडलिकाचे भेटी ॥ २ ॥ पैल चंद्रभागे तिरीं । कट धरूनियां करीं ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे अंबर । गजर होतो जयजयकार ॥४॥

॥ ४५४० ॥

कृपाळू भक्तांचा । ऐसा पति गोपिकांचा ॥ १ ॥ उभा न पाचारितां दारीं । न सांगतां काम करी ॥२॥ भाव देखोनि निर्मळ । रजां वोडवी कपाळ ॥३॥ तुकयाबंधु ह्मणे न भजा । कां रे ऐसा भोळा राजा ॥४॥

॥ ४५४१ ॥

केला अंगीकार पंढरीच्या देवें । आतां काय करितील[1] काळ मशक मानवें ॥१॥ घातलीं बाहेर तीं भय होतें ज्यानें । बैसला आपण तेथें घालुनियां ठाणें ॥ २ ॥ लागों नेदी वारा दुजियाचा अंगासी । हा पुरता निर्धार कळों आला आह्मांसी ॥ ३ ॥ ह्मणे तुकयाबंधु नलगे करावी चिंता । कोणेविशीं आतां बैसलों हस्तीवरी माथां ॥ ४ ॥

## कान्होबा देवाशीं बोलले ते अभंग.

॥ ४५४२ ॥

अगोचरी बोलिलों आज्ञेविण आगळें । परी तें आतां न संडावें राउळें ॥ १ ॥ जाईल रोकडा बोल न पुसती आह्मां । तुझा तुझें ह्मणविलें पाहा पुरुषोत्तमा ॥ २ ॥ न व्हावा न वजावा न कळतां अन्याय । न धरावें तें मनीं भलता करा उपाय ॥ ३ ॥ ह्मणे तुकयाबंधु हीन मी ह्मणोनि लाजसी । वारा लागों पाहातोहे उंच्या झाडासी ॥ ४ ॥

॥ ४५४३ ॥

उदार कृपाळ सांगसी जना । तरी कां त्या रावणा मारियेलें ॥ नित्य नित्य पूजा करी श्रीकमळीं । तेणें तुझें काय केलें ॥ १ ॥ काय बडिवार सांगसी वांयां । ठावा पंढरीराया आहेसि आह्मां ॥ एकलाचि जरी देऊं परिहार । आहे दुरिवरी सीमा ॥ २ ॥ कर्णाऐसा वीर उदार जुंझार । तो तुवां जर्जर केला बाणीं ॥ पाडिला भूमी परी न-

पाठभेदः—१ करिती,

येचि करुणा । दांत पाडियेले दोन्ही ॥३॥ श्रियाळ बापुडे सात्विक-
वाणी । खादलें कापूनि त्याचें पोर ॥ ऐसा कठिण कोण होईल दुसरा ।
उखळीं कांडविलें शिर ॥ ४ ॥ शिबी चक्रवर्ती करितां यज्ञयाग ।
त्याचें चिरिलें अंग ठायीं ठायीं ॥ जाचउनि प्राण घेतला मागें । पुढें
न पाहतां कांहीं ॥५॥ बळीचा अन्याय सांग होता काय । बुडविला
तो पाय देउनि माथां ॥ कोंडिलें दार हा काय कहार । सांगतोसी
चित्र कथा ॥ ६ ॥ हरिचंद्राचें राज्य घेउनियां सर्व । विकविला जीव
डोंबाघरीं ॥ पाडिला विघड नळादमयंतीमधीं । ऐसी तुझी बुद्धि हरि
॥७॥ आणिकही गुण सांगावे किती । केलिया विपत्ति माउसीच्या ।
वधियेला मामा सखा पुरुषोत्तमा । ह्मणे बंधु तुकयाचा ॥ ८ ॥

॥ ४५४४ ॥

मरोनि जाईन गुणनामावरूनि । तुझ्या चक्रपाणी मायबापा ॥ १ ॥
चुकविलीं दुःखें मायेचा वोळसा । तोडोनियां आशापाश तेणें ॥ २ ॥
केली काया तनु हिंवसी शीतळ । चिंता तळमळ नाहीं ऐसी ॥ ३ ॥
काळें तोंड काळ करूनि राहिलें । भूतमात्र जालें सज्जनसखें ॥ ४ ॥
तुकयाबंधु ह्मणे अवघ्या दशदिशा । मुक्त रे परेशा तुझ्या पुण्यें ॥५॥

॥ ४५४५ ॥

तुह्मां आह्मांसी दरुषण । जालें दुर्लभ भाषण ॥ १ ॥ ह्मणऊनि करितां
आतां । दंडवत घ्या समस्तां ॥२॥ भविष्याचें माथां देह । कोण जाणें
होईल काय ॥३॥ ह्मणे तुकयाचा बांधव । आमचा तो जाला भाव॥४॥

॥ ४५४६ ॥

कोण या पुरुषार्थाची गति । आणियेला हातोहातीं ॥ जाहाज पृथ्वी-
पति । केली ख्याती अद्भुत ॥ १ ॥ भलारे पुंडलिका भला । महिमा
नव जाये वर्णिला ॥ दगा देउनि अवघियांला । सांटविलें अविनाश ॥२॥

केलें एके घरीं केणें । भरलीं सदोदित दुकानें ॥ दुमदुमिलीं सुखानें । हे भाग्याची पंढरी ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे किल्या । संतांचे हातीं दिल्या । आंगावेगळें आपुल्या । टाकुनि जाला महिमान ॥ ४ ॥

॥ ४५४७ ॥

चवदा भुवनें लोक तिन्हीं दाढे जो कवळी । संपुष्ट तो[1] संबळीमध्यें देखा ॥१॥ उत्पत्तिसंहार करिता तो पाळण। तो नंदा नंदन ह्मणवीतसे ॥२॥ असुर तोडरी दैत्यांचा काळ। जाला द्वारपाळ बळीचा तो ॥३॥ लक्षुमीचा स्वामी क्षीराच्या सागरा। उच्छिष्टकवळा पसरी मुख ॥४॥ तुकयाबंधु ह्मणे चतुरांचा रावो । भावें तो पाहा हो केला वेडा ॥५॥

॥ ४५४८ ॥

चित्तीं बैसलें चिंतन । नारायण नारायण ॥ १ ॥ नलगे गोड कांहीं आतां । आणीक दुसरें सर्वथा ॥ २ ॥ हरपला द्वैतभाव । तेणें देह जाला वाव ॥३॥ तुकयाबंधु ह्मणे आह्मी । जालों निष्काम ये कामीं ॥४॥

॥ ४५४९ ॥

व्यापिलें सर्वत्र । बाहेरी भीतरी अंतर ॥ १ ॥ ऐसें गोविंदें गोविलें । बोलें न वजाये बोलिलें ॥ २ ॥ संचिताची होळी । करूनि जीव घेतला बळी ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे नाहीं । आतां संसारा उरी कांहीं ॥४॥

॥ ४५५० ॥

केली ह्यार्णोळां अंघोळी । येऊनि बैसलों राउळीं ॥१॥ अजिचें जालें भोजन । राम कृष्ण नारायण ॥ २ ॥ तुकयाबंधु ह्मणे नास । नाहीं कल्पांतीं जयास ॥ ३ ॥

॥ ४५५१ ॥

अनंतजन्में जरी केल्या तपरासी । तरी हा न पवसी ह्मणे देह ॥ १ ॥

पाठभेदः—१ 'तो' नाहीं.

ऐसें जें निधान लागलेंसें हातीं । त्याची केली माती भाग्यहीना ॥ २ ॥
उत्तमाचें सार वेदांचें भांडार । ज्याच्यानें पवित्र तीर्थें होती ॥ ३ ॥
ह्मणे तुकयाबंधु आणीक उपमा । नाहीं या तों जन्मा द्यावयासी ॥४॥

॥ ४५५२ ॥

राम ह्मणतां कामक्रोधांचें दहन । होय अभिमान देशधडी ॥ १ ॥
राम ह्मणतां कर्म तुटेल भवबंधन । नये श्रम सीण स्वप्नींसहीं[1] ॥ २ ॥
राम ह्मणतां जन्म नाहीं गर्भवास । नव्हे दारिद्र्यास पात्र कधीं ॥ ३ ॥
राम ह्मणतां यम शरणागत बापुडें । आढळपद पुढें काय तेथें ॥ ४ ॥
राम ह्मणतां धर्म घडती सकळ । तिमिरपडळ नासे हेळा ॥ ५ ॥
राम ह्मणतां ह्मणे तुकयाचा बंधू । तरिजेल भवसिंधु संदेह नाहीं ॥ ६ ॥

॥ ४५५३ ॥

तटाचे जातीला नाहीं भीड भार । लाता मारी थोर लाहान नेणे ॥ १ ॥
परी त्या विशेष मनुष्य होऊनि । करी खंड मान वडिलांचा ॥ २ ॥
बेरसा गाढव माय ना बहिण । भुंकें चवीविण भलतेंचि ॥ ३ ॥
तुकयाबंधु ह्मणे बोकड मातलें । न विचारी आपुलें तोंडीं मुतें ॥ ४ ॥

॥ ४५५४ ॥

मायझवा खर गाढवाचें बीज । तें ऐसें सहज कळों येतें ॥ १ ॥ अपमानिलें जेणें श्रेष्ठाचें वचन । तेचि त्याची खूण ओळखावी ॥ २ ॥ मद्यपी तो पुरा अधम यातीचा । तया उपदेशाचा राग वांयां ॥ ३ ॥ तुकया बंधु ह्मणे पिसाळलें सुनें । आपपर तेणें न विचारावें ॥ ४ ॥

॥ ४५५५ ॥

हम उदास तीन्हके सुनाहो लोकां । रावणमार बिभीषण दिई लंका ॥ १ ॥
गोवरधन नखपर गोकुल राखा । बर्नन लागा जब मेंहुं फत्तरका ॥ २ ॥
बैकुंठनायक काल कौंसासुरका । दैत डुबाय सब भंगाय गोपिका ॥ ३ ॥
स्तंभ फोड पेट चिरीया कश्यपका। प्रल्हादके लिये कहे भाई तुकयाका ॥ ४ ॥

---

पाठभेदः—१ स्वप्नामाजी.

॥ ४५५६ ॥

चुराचुराकर माखन खाया । गौळनीका नंद कुमर कन्हया ॥ १ ॥ काहे बराई दिखावत मोहि । जानतहुं प्रभुपना तेरा सब हि ॥ २ ॥ और बात सुन उखलसुं गला । बांध लिया आपना तूं गोपाला ॥ ३ ॥ फेरत बनबन गाऊ धरावत । कहे तुकयाबंधु लकरी लेले हात ॥ ४ ॥

॥ ४५५७ ॥

मत्स्यकूर्मशेषा कोणाचा आधार । पृथिवीचा भार वाहावया ॥ १ ॥ काय धाक आह्मां कासयाची चिंता । ऐसा तो असतां साह्याकारी ॥ २ ॥ शंखचक्रगदा आयुधें अपार । वागवितो भार भक्तासाटीं ॥ ३ ॥ पांडवा जोहरी राखिलें कुसरी । तो हा बंधूचा कैवारी तुकयाच्या ॥ ४ ॥

॥ ४५५८ ॥

न गमे न गमे न गमे हरिविण । न गमे न गमे न गमे मेळवा शाम कोणी गे ॥ १ ॥ तळमळ करी तैसा जीव जळाविण मासा। दिसती दिशा ओसा वो ॥ २ ॥ नाठवे भूक तान विकळ जालें मन। घडी जाय प्रमाण जुगा एकी वो ॥ ३ ॥ जरी तुह्मी नोळखा सांगतें ऐका । तुकयाबंधूचा सखा जगजीवन ॥ ४ ॥

॥ ४५५९ ॥

नेत्राची वासना । तुज पाहावें नारायणा ॥ १ ॥ करीं याचें समाधान। काय पाहातोसी अनुमान ॥ २ ॥ भेटावें पंढरिराया। हेंचि इच्छिताती बाह्या ॥ ३ ॥ जावें पंढरीसी । हेंचि ध्यान या मानसीं ॥ ४ ॥ चित्त ह्मणे पायीं । तुझे राहीन निश्चयीं ॥ ५ ॥ ह्मणे बंधु तुकयाचा। देवा भाव पुरवीं साचा ॥ ६ ॥

॥ ४५६० ॥

मन उताविळ । जालें न राहे निश्चळ ॥ १ ॥ दे रे भेटी पंढरिराया।

पाठभेदः—१ सांगतों. २ ह्मणतो जावें पंढरीसी । हेंच ध्यान चरणासी ॥

उभारोनि चारी बाह्या ॥ २ ॥ सर्वांग तळमळी । हात पाय रोमा-
वळी ॥ ३ ॥ तुकयाबंधु ह्मणे कान्हा । भूक लागली नयना ॥ ४ ॥

॥ ४५६१ ॥

बरवा बरवा बरवा रे देवा तूं । जिवाहूनि आवडसी जीवा रे देवा
तूं ॥ १ ॥ पाहातां वदन संतुष्ट लोचन। जाले आइकतां गुण श्रवण
रे देवा ॥ २ ॥ अष्ट अंगें तनु त्रिविध ताप गेला सीण । वर्णितां
लक्षण रे देवा ॥ ३ ॥ मन जालें उन्मन अनुपम ग्रहण । तुकयाबंधु
ह्मणे महिमा नेणें रे ॥ ४ ॥

॥ ४५६२ ॥

नमस्कारी भूतें विसरोनि याती । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ १ ॥
परउपकारीं वेचियेल्या शक्ती । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ २ ॥
द्वैताद्वैतभाव नाहीं जया चित्तीं । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ ३ ॥
जयाचिये वाचे नये निंदास्तुती । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ ४ ॥
उचित अनुचित जाणे धर्मनीती । दृढ भाव भक्ति मानव तो ॥ ५ ॥
तुकयाबंधु ह्मणे वरकड ते येर । संसाराचे खर भारवाही ॥ ६ ॥

॥ ४५६३ ॥

विठ्ठला रे तुझे वर्णितां गुणवाद । विठ्ठला रे दग्ध जालीं पापें ॥ १ ॥
विठ्ठला रे तुझें पाहातां श्रीमुख । विठ्ठला रे सुख जालें नयना ॥ २ ॥
विठ्ठला रे तुज देतां आलिंगन । विठ्ठला तनमन निवाल्या बाह्या ॥ ३ ॥
विठ्ठला रे तुझी ऐकतां कीर्ति । विठ्ठल हे विश्रांति पावले स्मरणें ॥ ४ ॥
विठ्ठला रे तुकयाबंधु ह्मणे देहभाव । विठ्ठला जीवीं पाव धरितां गेला ॥५॥

॥ ४५६४ ॥

आकारवंत मूर्ति । जेव्हां देखेन मी दृष्टी ॥ १ ॥ मग मी राहेन निवांत ।
ठेवूनियां तेथें चित्त ॥ २ ॥ श्रुति वाखाणिती । तैसा येसील प्र-
चिती ॥ ३ ॥ ह्मणे तुकयाचा सेवक । उभा देखेन सन्मुख ॥ ४ ॥

॥ ४५६५ ॥

उठा भागलेती उजगरा। जाला स्वामी निद्रा करा ॥ १ ॥ वाट पाहाते रुक्मिणी। उभी मंचक संवारुणी ॥ २ ॥ केली करा क्षमा। वडबड पुरुषोत्तमा ॥ ३ ॥ लागतो चरणा। तुकयाबंधु नारायणा ॥ ४ ॥

॥ ४५६६ ॥

कंसरायें गर्भ वधियेले सात। म्हणोनि गोकुळासी आले अनंत। घ्यावया अवतार जालें हेंचि निमित्त। असुर संहारूनि तारावे भक्त ॥ १ ॥ जय देव जय देव जय विश्वरूपा। श्रीविश्वरूपा। ओवाळीन तुज देहदीपें बापा ॥ २ ॥ स्थूळरूप होऊनि धरितसे सानें। जैसा भाव तैसा तयांकारणें। दैत्यांसी भासला सिंह गजानें। काळासी महाकाळ यशोदेसी तान्हें ॥ ३ ॥ अनंत वर्णी कोणा न कळेचि पार। सगुण कीं निर्गुण ह्याही निर्धार। पांगलीं साही अठरा करितां वेव्हार। तो वाळितसे गौळियांचें खिल्लार ॥ ४ ॥ तेहतिस कोटि तिहीं देवांसी श्रेष्ठ। पाउलें पाताळीं[1] नेणती स्वर्गी मुगुट। गिळिलीं चौदा भुवनें तरि न भरेचि पोट। तो खाउन धाला गोपाळांचें उच्छिष्ट ॥ ५ ॥ महिमा वर्णूं तरि पांगलिया श्रुति। सिणला शेष चिरल्या जिव्हा करितां स्तुति। भावेंविण कांहीं न चलेचि युक्ति। राखें शरण तुकयाबंधु करी विनंती ॥ ६ ॥

॥ ४५६७ ॥

सकुमार मुखकमळ निजसारनिर्मळ। सावळी सुनीळ तनु भ्रमरांग कुरळ। झळकति दिव्य तेजें दंत माज पातळ। मिरवालें मयूरपत्रें मुगुट कुंडलें माळ ॥ १ ॥ जय देवा जगदीश्वरा। धन्य रखुमाईवरा। आरती करीन काया। ओंवाळिन सुंदरा ॥ २ ॥ गोजिरें ठाणमान भुजा मंडित चारी। शोभती शंख चक्र गदा पद्म मोहरी।

---

पाठभेदः—१ पाउलें पाताळीं स्वर्ग मुगुट.

हृदयीं ब्रह्मपद बाणलें शृंगारीं । गर्जती चरणीं वांकी कंठ कोकिळ-
स्वरीं ॥ ३ ॥ घवघवित उटी अंगीं बावन चंदनांची । ललाटीं क-
स्तुरिचा कास पितांबराची । कटिसूत्र वरि साजिरें प्रभा वर मोति-
यांची । संगीत सकळ मुद्रा पाउलें कुंकुमाचीं ॥ ४ ॥ सौभाग्यसुख-
सागर गुणलावण्यखाणी । लाघवी दीनवत्सळ विश्व लाविलें ध्यानीं ।
आश्चर्य देव करिती ऋषि राहिले मुनि । धन्य ते प्रसवली ऐसिया
नंदपत्नी ॥ ५ ॥ वर्णितां ध्यान महिमा श्रुति राहिल्या नेति । रवि-
कोटि चंद्र तारा प्रकाशा न तुळती । उदार सुर गंभीर पूर्ण आनंद-
मूर्त । तुकयाबंधु ह्मणे स्तवूं मी काय किती ॥ ६ ॥

॥ ४५६८ ॥

परमानंदा परमपुरुषोत्तमरामा । अच्युता अनंता हरि मेघश्यामा ।
अविनाशा अलक्षा परता परब्रह्मा । अकळकळा कमळापती न कळे
महिमा ॥ १ ॥ जय देव जय देव जय जी श्रीपती । मंगळशुभदा-
यका करीन आरती ॥ २ ॥ गोविंदा गोपाळा गोकुळरक्षणा । गिरि-
धरकर भवसागरतारका दधिमथना । मधुसूदन मुनिजीवन धरणी-
श्रमहरणा । दीनवत्सळ सकळां मूळ जय जयनिधाना ॥ ३ ॥
विश्वंभरा सर्वेश्वरा जगदाधारा । चक्रधर करुणाकर पावन गजेंद्रा ।
सुखसागर गुणआगर मुगुटमणी शूरा । कल्याणकैवल्यमूर्त्ति मनो-
हरा ॥ ४ ॥ गरुडासना शेषशयना नरहरी । नारायणा ध्याना सुर-
वरहरगौरी । नंदा नंदनवंदन त्रिभुवनांभीतरी । अनंतनामीं ठसा
आवतारांवरी ॥ ५ ॥ सगुण निर्गुणसाक्ष श्रीमंत संतां । भगवाना
भगवंता कालकृतांता । उत्पत्तिपाळणापासुन संहारणसत्ता । शरण
तुकयाबंधु तारीं रिति बहुतां ॥ ६ ॥

# रामेश्वरभट्टादिकांचे अभंग.

॥ ४५६९ ॥

भक्त भागवत जीवन्मुक्त संत । महिमा अत्यद्भुत चराचरीं ॥ ऐसिया अनंतामाजी तूं अनंत। लीलावेश होत जगत्राता ॥ १ ॥ ब्रह्मानंद तुकें तुळे आला तुका। तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ॥ २ ॥ शास्त्रा श्रेष्ठाचार अविरुद्ध क्रिया । तुझी भक्तराया देखियेली । देऊनि तिळांजुळी काम्य निषिद्धांसी । विधिविणें योगेशीं ब्रह्मार्पण ॥ ३ ॥ संत ग्रहमेळीं जगधंद्या गिळी । पैल उदयाचळीं भानु तुका ॥ संतवृंदें तीर्थ गौतमी हरिकथा । तुकया नर सिंहस्ता भेटों आली ॥ ४ ॥ शांति पतिव्रते जाले परि नयन । काम संतर्पण निष्कामता । क्षमा क्षमापणें प्रसिद्ध प्रथा जगीं । तें तों तुझ्या अंगीं मूर्तिमंत ॥ ५ ॥ दया दिनानाथा तुवां जीवविली । विश्वीं विस्तारली कीर्ति तुझी । वेदवाक्य बाहु उभारिला ध्वज । पूजिले देव द्विज सर्वभूतें ॥ ६ ॥ अधर्म क्षयव्याधि धर्माशीं स्पर्शला । तो त्वां उपचारिला अनन्य भक्ति । ब्रह्म ऐक्यभावें भक्ति विस्तारिली । वाक्यें सफळ केलीं वेदविहितें ॥ ७ ॥ देहबुद्धि जाल्या अभिमानें वंचलों। तो मी उपेक्षिलों न पाहिजे। न घडो याचे पायीं बुद्धीचा व्यभिचार । मागे रामेश्वर रामचंद्र ॥ ८ ॥

॥ ४५७० ॥

तुकाराम तुकाराम । नाम घेतां कापे यम ॥ १ ॥ धन्य तुकोबा समर्थ। जेणें केला पुरुषार्थ ॥२॥ जळीं दगडा सहित वह्या । तारियल्या जैशा लाह्या ॥ ३ ॥ ह्मणे रामेश्वर भट्ट द्विजा। तुका विष्णु नाहीं दुजा ॥४॥

॥ ४५७१ ॥

पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । परि सरी न पवती तुकयाची ॥ १ ॥ शास्त्रही पुराणें गीता नित्य नेम। वाचिताती वर्म न कळे त्यांसी ॥२॥

कर्मे अभिमानें वर्णे अभिमानें । नाडले ब्राह्मण कलियुगीं ॥ ३ ॥
तैसा नव्हे तुका वाणी व्यवसाई । भाव त्याचा पायीं विठोबाचे ॥ ४ ॥
अमृताची वाणी वरुषला शुद्ध । करी त्या अशुद्ध ऐसा कोण ॥ ५ ॥
चहूं वेदांचें हें केलें विवरण । अर्थही गहन करूनियां ॥ ६ ॥
उत्तम मध्यम कनिष्ट वेगळे । करूनि निराळे ठेविले ते ॥ ७ ॥
भक्तिज्ञानें आणि वैराग्यें आगळा । ऐसा नाहीं डोळां देखियेला ॥ ८ ॥
जपतप यज्ञ लाजविलीं दानें । हरिनाम कीर्तनें करूनियां ॥ ९ ॥
मागें कवीश्वर जाले थोर थोर । नेलें कलिवर कोणें सांगा ॥ १० ॥
ह्मणे रामेश्वर सकळा पुसोनि । गेला तो विमानीं बैसोनियां ॥ ११ ॥

॥ ४५७२ ॥

माझी मज आली रोकडी प्रचित । होऊनि फजित दुःख पावें ॥ १ ॥
कांहीं द्वेष त्याचा करितां अंतरीं । व्यथा या शरीरीं बहुत जाली ॥२॥
ज्ञानेश्वरें मज केला उपकार । स्वप्नीं सविस्तर सांगितलें ॥ ३ ॥
तुका सर्वां श्रेष्ठ प्रिय आह्मां थोर । कां जे अवतार नामयाचा ॥ ४ ॥
त्याची तुज कांहीं घडली रे निंदा । ह्मणोनि हे बाधा घडली तुज ॥५॥
आतां एक करीं सांगेन तें तुला । शरण जाई त्याला निश्चयेशीं ॥६॥
दर्शनेंचि तुझ्या दोषा परिहार । होय तो विचार सांगितला ॥ ७ ॥
तोचि हा विश्वास धरोनि मानसीं । जाय कीर्तनासी नित्य काळ ॥८॥
ह्मणे रामेश्वर त्याच्या समागमें । जालें हें आराम देह माझें ॥ ९ ॥

॥ ४५७३ ॥

वैष्णवांची याती वाणी जो आपण । भोगी तो पतन कुंभपाकीं ॥१॥
ऐशीं वेद श्रुति बोलती पुराणें । नाहीं तें दूषण हरिभक्तां ॥ २ ॥
उंच निंच वर्ण न ह्मणावा कोणी । जें कां नारायणीं प्रिय जालें ॥३॥
चहूं वर्णासी हा असे अधिकार । करितां नमस्कार दोष नाहीं ॥ ४ ॥
जैसा शालिग्राम न ह्मणावा पाषाण । होय पूज्यमान सर्वत्रांसी ॥५॥

गुरु परब्रह्म देवाचा तो देव । त्यासी तो मानव ह्मणूं नये ॥ ६ ॥ ह्मणे रामेश्वर नामीं जे रंगले । स्वयेंचि ते जाले देवरूप ॥ ७ ॥

॥ ४५७४ ॥

आरती तुकारामा । स्वामि सद्गुरुधामा । सच्चिदानंदन मूर्ति । पाय दाखवी आह्मां ॥ १ ॥ आरती० ॥ राघवें सागरांत । पाषाण तारिले । तैसे हे तुकोबाचे । अभंग रक्षिले ॥ २ ॥ आरती० ॥ तुकितां तुळणेसी । ब्रह्म तुकासी आलें । ह्मणुनि रामेश्वरें । चरणीं मस्तक ठेविलें ॥ ३ ॥ आरती० ॥

॥ ४५७५ ॥

तूंचि आत्माराम नव्हेसी देहधारी । स्तुति जरी होय ह्मणो माझी वैखरी । पातकी मूढजन पडतील अघोरीं । यालागीं अवतार केला महीवरी ॥ १ ॥ जय जय भक्तराया धर्ममूर्ती तुकया । आरती वोंवाळीं भावें तुझिया पायां ॥ धृ० ॥ २ ॥ तुझे ठायीं असे भ्रम कोणा न कळे नेम । जन हे काय जाणे अनुभविता राम । टाकोनि अभिमान जीवीं धरिलें प्रेम । बोलोनि महिमा तुझा जना दिला विश्राम ॥ ३ ॥ अद्भुत महिमा तुझा काय वर्णूं दातारा । उदकेंविण अन्न दिवस क्रमिले तेरा । आतां हे ऐसी प्राप्ति काय घडेल येरा । उदकीं कागद दिन रक्षिले अठरा ॥ ४ ॥ ऐकतां तुझें वचन मन होय उन्मन । सच्चिदानंद रामा तुजठायीं पूर्ण । नित्य हें असो माझें तुझें पायीं अनुसंधान । करुनि कृपादान देईं इतुकें दान ॥ ५ ॥ शास्त्र आणि वेदांत शिष्टाचार समस्त । आणिला एकवाक्या जनलोक कृतार्थ । विशेष रामेश्वरा प्रेम दिलें बहुत । विनवितों तुज आतां ठेवीं मस्तकीं हात ॥ ६ ॥

# निळोबाकृत.

॥ ४५७६ ॥

प्रपंचरचना सर्वही भोगुनि त्यागिली। अनुतापाचे ज्वाळीं देहबुद्धि हविली। वैराग्याची निष्ठा प्रगटुनि दाखविली। अहंता ममता दवडुनि निजशांति वरिली ॥ १ ॥ जय जयजी सद्गुरू तुकया दातारा। तारक संताचा तूं जिवलग सोयरा ॥ धृ० ॥ हरिभक्तीचा महिमा विशेष वाढविला। विरक्ती ज्ञानाचा ठेवा उघडुनि दाखविला। जगदोद्धारालागीं उपाय सुचविला। निंदक दुर्जनांचा संदेह निरसिला ॥ जय० ॥ २ ॥ तेरा दिवस वह्या रक्षुनियां उदकीं। कोरड्याचि काढूनि दाखविल्या शेखीं। अपार कविता शक्ति मिरवुनि इह लोकीं। कीर्तनश्रवणें तुमच्या उद्धरती जन लोकीं ॥ जय० ॥ ३ ॥ बाळवेष घेउनि श्रीहरी भेटला। विधि ज्या जनिता तोचि आठवा हा दिधला। तेणें ब्रह्मानंदें प्रेमा डोलविला। न तुके ह्मणुनि तुका नामीं गौरविला ॥ जय० ॥ ४ ॥ प्रयाणकाळीं देवें विमान पाठविलें। कलिच्या काळामाजी अद्भुत वर्तविलें। मानवदेह घेउनि निजधामा गेले। निळा ह्मणे सकळ संत तोषविले ॥ जय जयजी सद्गुरु तुकया दातारा ॥ तारक० ॥ ५ ॥

# वामनकृत तुकारामस्तुति.

॥ ४५७७ ॥

जयाची वदे पूर्ण वेदांत वाणी। ह्मणावें कसें हो तयालागिं वाणी ॥
परब्रह्मरूपी असा जो तुकावा। तयाचे तुकीं कोण ऐसा तुकावा ॥ धृ० ॥
जया दर्शनें स्पर्शनें मुक्त होती। तुका नाम वाचे ह्मणे[1] आणिताती ॥
पुनर्जन्म त्या प्राणियालागिं कैंचा। तुकाराम वाणी जया नाम वाचा ॥ १ ॥

पाठभेदः—१ सदा.

परंधाम टाकून कैसा उडाला । जिवन्मुक्त होऊनि ब्रह्मीं बुडाला ।
जयाची तनु ब्रह्मरूपीं बुडाली। भवभ्रांति हे जाण कैसी गळाली ॥२॥
तुकायासि कोठें तुकाया दिसेना। जनीं हिंडतांना तुकावा दिसेना ।
तुकावा कसा तो चतुर्भूज जाला। निराकार ब्रह्मीं स्वरूपीं निराळा ॥३॥
तुका ब्रह्मरूपी स्वरूपीं रहातो । जया दीप न्यायें जयासी पहातो ।
तुका बैसला ज्ञान वैराग्य धामीं । वसे चित्कळा पूर्ण ब्रह्मीं अरा[१]मीं ॥४॥
जयाचे मुखीं भारती वेदमाता । तया प्राप्तिची कायसी जाण चिंता ।
निजानंद आनंद तो मग्न जाला। निराकार ब्रह्मस्वरूपीं मिळाला ॥५॥
कृपासागरें नाव निर्माण केली । असंख्यात बुद्धी तरोनीच गेली ।
पुढेंही तरायासि ऊपाय केला। ह्मणोनी तुका मृत्युलोकासी आला ॥६॥
कसें भर्जिलें बीज तें ऊगवेना । तसें सर्व संपादिलें तें कळेना। पहा
बोध त्या जाहला वामनाला । सुखाचा गमे पूर्ण ठेवा मनाला ॥७॥

## मोरोपंतकृत.

॥ ४५७८ ॥

( आर्या. )

विष्णुयशाचें घाली द्याया अमृता त्रपा दुकान तुका ॥
जरि यासि न देत्रासी श्रीरामासी हि पादुका न तुका ॥ १ ॥
नाइक न गा ह्मणे जो घातुकचि दिसो अघातुकावाणी ॥
प्रेमें ध्यावा गावा भस्म कराया अघा तुकावाणी ॥ २ ॥
नरकांतुनि काढितसे काढुनि बहु पतित पातुकावाणी ॥
तो गुरु कसा नव्हे हो ज्ञानांबुधि अतितपा तुका वाणी ॥ ३ ॥
भगवान् स्वभुजासि ह्मणे तुजसी तारुनि जना तुकों बाहो ॥
नारद मुनिसा सुयशें बहुमत सज्जनमना तुकोबा हो ॥ ४ ॥

पाठभेदः—१ आरामीं.

साधु ह्मणेल मन स्मृति हरिची तैशी न टाकु तुकयाची ॥
कीं औदार्यघनाची ज्याप्रति पावुनि घटा कुतुक याची ॥ ५ ॥
दूत यमाशि कथिति कीं निर्मुनि हरिभजनसेतु कागाळी ॥
ऐकेना बळ इतरा धर्माचें तिळ नसे तुका गाळी ॥ ६ ॥
मेघें न तर्पिला तो सुतृषित चातक करील आ जितुका ॥
जो जो मुमुक्षु त्यातें त्यातें करितो सुतृप्ति आजि तुका ॥ ७ ॥
शरणांगतें बह्यतां वेंचिल देवूनि ओ तुका मास ॥
येइल पर साध तसा व्याघ्रापरि काय ओतु कामास ॥ ८ ॥
धूता पळांत पुण्यें जरि ह्मणतां काय शक्र तुकया धू ॥
वाटे याची माता जेंवि करी तेंवि न क्रतु कयाधू ॥ ९ ॥
भक्तिरसचि मूर्त असा करिति बृहस्पति शतक्रतु कयास ॥
कीं वाटे भगवद्यश सुरभीपय अमृत तक्र तुकयास ॥ १० ॥
विमद विराग विमत्सर तृप्ति सदा सुगुण हे तुकारामीं ॥
ते कैंचे स्वर्गींच्या विविधविषयलाभ हेतुकारामीं ॥ ११ ॥
वाटे बहु माजी तो भागवतशिरोवतंस शुक यातें ॥
कीं जें अनुदिन रुचलें त्या सद्रसिकां तसेंचि तुकयातें ॥ १२ ॥
आश्रम बिभीषणातें श्रीराम कुसंगह्यतुकामातें ॥
साधु ह्मणे व्हावा या मोहत्यागीं हि ह्या तुका मातें ॥ १३ ॥
साधुसभा प्राणप्रिय ज्याचे निर्दोष युक्तिमदभंग ॥
भगवज्जनेतरांचा करिती ज्यांतील उक्ति मदभंग ॥ १४ ॥
ज्याचे अभंग लागति खळहृदया जेंवि बाण रामाचे ॥
ज्या परवाद न मोहिति शर जैसे ईश्वरास कामाचे ॥ १५ ॥
स्वात्मानुभव पह्यतां तुकया केवळ सखाचि जनकाचा ॥
वैराग्यें डोलविला माथा जेणें मुनींद्र सनकाचा ॥ १६ ॥
वाटे भगवत्कीर्तन रुचिनें याहूनि आन नारद न ॥

सद्वृंदा शोभविती ज्याचे गुण जेंवि आनना रदन ॥ १७ ॥
ज्याच्या सदभंगातें सेवी जन जेंवि बाळ आम्यातें ॥
घनसा ह्मणे भरावें सुरसें जें मुख करील आ म्यां तें ॥ १८ ॥
ज्याच्या होय अभंगावांचुनि होऊनि हरिकथा नाहीं ॥
श्रोत्यांसि अभंगा हीं तीं दे जसि माय हरिख थानांहीं ॥ १९ ॥
नाम्याच्या तुकयाच्या गाइन शुक कीं महातपा व्यास ॥
रामाच्या कृष्णाच्या कवण न जोडील हात पान्यास ॥ २० ॥
शोभे कथा अभंगा पावुनियां जेंवि दीप काशाला ॥
सद्भंग कथेंत नको तरि मग शालेंत दीप काशाला ॥ २१ ॥
सुज्ञ शिवाजी राजा न ह्मणे तुकयासि काय साधु निका ॥
तत्पंडित प्रधाना न कळे गुण समज फार आधुनिका ॥ २२ ॥
भक्तिरसिक शुद्रकवन ह्मणवुनि कशास नाक वाहेल ॥
भगवत्पदप्रसादा वुध जेंवि तशास नाक वाहेल ॥ २३ ॥
केला चि गुरु तुकोवा जरि अशुचि पशु तथापि शुनकानें ॥
अधम बद्धमना न ह्मणे परिसुनि हि अशा कथा पिशुन कानें ॥ २४ ॥
प्रभु आपण शतमखसा सदभंग प्रकट जो करी घनसे ॥
नाचति मयूरसे हरिभक्त ह्मणे ज्यांत शोकरीघ नसे ॥ २५ ॥
श्रीराम तसा गेला वैकुंठाला सकाय हा कांहीं ॥
महिमा न भीरु करणें दुष्टांच्या यास काय हाकांहीं ॥ २६ ॥
गडवड बडवड करिती न च येवं दे तुका परिस मोर ॥
प्रभुचा प्रसाद अद्भुत बहुमत केला शुकापरिस मोर ॥ २७ ॥
तूं काय गरुड कींगे खळ जिव्हे मक्षिके तुका वाणी ॥
तेथें लक्ष्मी रावे राहे ज्या पक्षिकेतु कावाणी ॥ २८ ॥
जो कुलज हि अभिमानी ज्याचा प्रद्वेश या तुकारामीं ॥
ह्मणतो तद्विद्येतें सीता तन्मतिस यातुकारा मी. ॥ २९ ॥

भगवद्भक्ति कराया बहु जड जीवांसि जो तुका शिकवी ॥
याच्या दुसरा धरणीवरि येइल कोण हो तुकासि कवी ॥ ३० ॥
परिस अयाचा उडवी सद्भाव तसाचि भक्त यातीस ॥
रामात्मजें मयूरें अर्या रचिल्या सदर्थ या तीस ॥ ३१ ॥
निर्जितगंगाभंगाभंगाकर आर्यकौ तुकारामा ॥
श्रीनारदवाल्मीकिव्याससखो जयति कौ तुकारामा ॥ ३२ ॥

( पद. )

॥ ४५७९ ॥

धन्य धन्य तुका वाणी ॥ ध्रु. ॥ अमृत रसाची क्षितीवर ज्याची । सिंधुची ज्याची वाणी ॥ १ ॥ डोलवितो जडां अजडां ही । हरिच्या वेणुवाणी ॥२॥ मोर वनीं त्याच्या अभंगीं । सुखासी नाहीं वाणी ॥३॥

## गोपाळबुवाकृत.*

( पद. )

॥ ४५८० ॥

करी भक्तियोगें काया ब्रह्मचि हा तुकया ॥ ध्रु० ॥ नसे द्वेष जया देहीं । सर्व भुतांचे ठायीं । अधमोत्तम आपपर नाहीं जया ॥ १ ॥ करी न सरे राव रंक प्राणा । भला ना नष्ट जिवना । मित्र असा जो सर्व भुतांचा ॥ २ ॥ भूतमात्रीं अभयदानी । जैसी बाळक जननी । तैसी सर्व भुतीं संपूर्ण करी दया ॥ ३ ॥ मी माझें न ह्मणे कदा । सदा उच्चारी गोविंदा । काळाचा निजपाश अहंममता छेदुनियां ॥ ४ ॥ सुखदुःख होतां प्राप्त । जैसें आकाश अलिप्त । तशी वृत्ती जया अभेद

* गोपाळबावा हे तुकारामबावांचे नातू होते.

सुख सेवुनियां ॥५॥ क्षमा धरत्रीचे ठायीं। तैसी वाटे जया देहीं । सर्वही साहुनि शांत अनंत जसा । श्रीकांत तसा गुरु गोपाळाचा स्वामिया ॥६॥

## ( आरती. )

॥ ४५८१ ॥

शुद्ध परब्रह्म संता अव्यक्ता । पुरुषोत्तमा क्षर अक्षरातीता । स्वइच्छा प्रगटोनी दाविसी भक्ता । भक्तीनें ऐश्वर्य साधोनी सत्ता ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय सद्गुरू तुकया श्रीसद्गुरु तुकया । सद्भावें आरती ओवाळूं सखया ॥ धृ० ॥ ब्रह्मादि हरिहर क्षेत्र विचार । करिती सिद्ध ऋषी शास्त्रें अवतार । नेणती योगी ज्ञानी मुनी सर्वत्र । जाणोनि तें केलें ब्रह्म शरीर ॥ २ ॥ अनेक महाकवी वेदांत वक्ते । वाक्यें दीप राती अविद्या हंते । त्यामाजीं तव वाक्यें भानू साक्षात । याकारणें श्रीहरी रक्षी उदकांत ॥३॥ देह परब्रह्म वैकुंठा नेणें। ऐसा तुजवांचून न देखें आन। आणिक ही केलीं बहुत कारणें। गोपाळ सद्भावें ओंवाळी चरण ॥४॥

## ( नामावळी. )

॥ ४५८२ ॥

श्रीतुकारामा। प्रिय श्रीरामा । असुरविरामा ॥ चैतन्यभूषणा। पाषांड दुषणा । कथामृतअशना ॥ वक्ता महावाणी । बावाशिष्यशिरोमणी । अमृत संजिवनी। वैराग्य सुरवाणी॥ज्ञानी अमरेंद्रा। बोधामृतचंद्रा। परमसुभद्रा ॥ प्राणेंद्रियदमना। तनुसहितखगमना। हरिशिरींच्या सुमना। जिजाईरमणा ॥ तूं तारक लोकां। महा नामधारका। नारायणजनका। त्रिभुवन व्यापका ॥ जयमुक्तिवर्या । चित्प्रकाशसुर्या । परमाद्भुतधैर्या । श्री विठ्ठलहृदया॥जगद्गुरु भूपा। वेष्टित अमुपा । महासिद्ध स्वरूपा । मायातमदीपा अगोचर लक्ष्मी। जग तव कुक्षी। सर्वांतर साक्षी। देविगुणपक्षी ॥ कुमती नरगंजन। प्रेमळमनरंजन। भवभयगजभंजन। निवासिनीरंजन॥ तनुब्रह्मचि संज्ञा ॥ महा अद्भुतप्रज्ञा। सर्व कळा सुज्ञा। जगीवघवाज्ञा।

द्रव्यतत्वज्ञा । भुवनत्रयीं राज्ञा । त्रैलोक्य कृतज्ञा । उद्धति आज्ञा ॥ षड्रिपु संहर्या । माया नदितर्या । तापत्रयहर्या । मनोजय कार्या ॥ महायोग मंडणा । तरुपाप खंडणा । कळिकाळदंडणा । गण असुर-कंडणा ॥ तूं सुखसागर । महा प्रगार । ब्रह्म तनुनागर । अद्भुत सौदागर ॥ चिन्मय सुखवासी । देहुक्षेत्रानिवासी । तारक लोकांसी ॥

## विठ्ठलनाथकृत.

(पद.)

॥ ४५८३ ॥

जडदेह कसा घेऊनि गेला तुकाराम वाणी ॥ध्रु०॥ भजन पूजन भावबळें । जिंकियले कळिकाळ । गर्जताती तीन ताळ । ऐकताती कानीं ॥ जडदेह० ॥१॥ पंढरिचा देव गडी । पावविला पैल थडी । विठ्ठलनाथ गरीब गडी । त्यासी कोण मानी ॥ जडदेह कसा० ॥ २ ॥

## तुकारामाष्टक.

श्लोक.

( शिखरिणीवृत्त. )

॥ ४५८४ ॥

तुकारामा माझ्या, परम सदया भक्तवरदा ॥ तुझी कीर्ती शोभे विमळ शशि तो जेंवि शरदा ॥ मला दीनालागीं, तुजविण नसे आप्त दुसरा॥ अपेक्षा भेटीची, बहुत मज ये या अवसरा ॥ १ ॥ तुकारामीं ज्याची सतत जडली प्रीति बरवी ॥ रवीवत् तो जाणा, विधि अविधि त्याला न भरवी ॥ रवी जैसी लोणी, ग्रहण करितां तक्र उरतें ॥ रते पादाब्जीं त्या, भवीं सुख मिळे दुःख हरतें ॥ २ ॥ प्रभु श्रीरामाच्या, अति सुलभ नामीं प्रखर तें ॥ असें कीं सामर्थ्य, त्वरित अघ जें नाश

करितें ॥ परी त्याहूनी दों, अधिकचि 'तुका'अक्षर वरीं ॥ जसें चित्ता दे क्षी, बहु हरुष तें भक्ष्य र वरी ॥ ३ ॥ जयाचें वास्तव्य, स्थल सुखद देहू तन मनें ॥ भवाऽग्नी जालेल्या, त्वरित सुख दे हूत नमनें ॥ तिथें वाहे इंद्रा-यणि नदि महाधन्य सुशिला ॥ तशीं झाडें संघ, मनुज महिही वन्य सु शिला ॥ ४ ॥ पिता, माता, भ्राता, स्वजन-गण वा गोतहि तुका ॥ तयावीणें मातें, इतर नरुचे हेत इतुका ॥ दिसे दृष्टीनें हा, अचिर अवघा मात्र जितुका ॥ तयाचा संयोग क्षणिक नरहो! हें मनिं तुका ॥ ५ ॥ जशी वत्सा धेनू, जशि व जननी बालकरिती ॥ जसें इच्छा-दार्ढ्य, स्वशिवजननी बाल करिती॥ तशी माझी प्रीती, सतत चि तुकारामिं जडली ॥ असे कीजे देवा, कधिं हि नवजेती विघडली ॥ ६ ॥ तुकापादाऽब्जींचा मन मधुप माझा मधु पितो ॥ तुका हाची इंदू, मम मन-चकोरा सुखवितो ॥ तुकोबा अंभोदा !, क्षुधित मयुराला मज पहा ॥ सुसौख्याद्या तैशा, पतितहि नरा रामजप हा ॥ ७ ॥ कसें सिंधूचें तें, जल टिटवि पक्षीण उपसे॥ तसें पृथ्वी माजी, तृण किति कदा ना कळतसे ॥ तसें मातें मूढा, सुगुणतुकयाचा न गवसे ॥ असें जाणोनीयां, पदनलिनिं पांडू दडतसे॥८॥

स्रग्धरा.

॥ ४५८५ ॥

ऐसें हें अल्पधीनें निरुपम तुकया अष्टकें वर्णियेलें ॥ कर्णाला गोड ऐसें, सुरस शिखरिणी वृत्त हें जाणियेलें ॥ नाहीं शक्तिस्वतंत्रा, बुध ह्मणति निमित्यासि हा पांडुरंग ॥ कर्ता, भोक्ता, विठोबा, सकल बसवि जो सृष्टिचें अंतरंग ॥ ९ ॥



# अभंगांची
# वर्णानुक्रमणिका.

अभंगाचा अंक.

### अ.



अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.

अभंगाचा अंक.

आ.

अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.

अभंगाचा अंक.



इ.



अभंगाचा अंक.



उ.



अभंगाचा अंक.

अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.

ओ.



क.



अभंगाचा अंक.

अभंगाचा अंक



अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.

अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.

## घ.

अभंगाचा अंक.

अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.



भ.

अभंगाचा अंक.



य.



अभंगाचा अंक.



अभंगाचा अंक.



र.

अभंगाचा अंक.



ल.

अभंगाचा अंक.



क्ष.



ज्ञ.

# गाथेंतील कठीण शब्दांचा कोश.

### अ.

अकळ अथवा आकळ-न कळण्यासारखा.
अखम-अक्षम, पंगु.
अखय-अक्षय.
अगुणा-निर्गुण, गुणशून्य. २ द्वाड, खोडकर.
अंगुळें-अंगठी.
अंगेजणें-अंगीकारणें.
अघोरजप पिशाचमंत्रजप.
अठरा-अठरा पुराणें.
अठोनी वेठोनी-अडवातिडवा, वेडावांकडा.
अडबंद-करदोटा, कटदोरा.
अडांखा अ. आडांखा-धोरण, युक्ति. २ ताळा.
अत्यंत-प्रत्यक्ष अनुभव.
अधीलपणा-श्रेष्ठपणा, मुख्यपणा, पहिलेपणा.
अनगळ-निष्प्रतिबंध, स्वच्छंदी.
अनामिक-अंत्यज, महार इ०
अनारिसें अ. आनारिसें-वेगळें, अन्य.
अनु अ. आणु-अन्य, अणीक.
अनुहात (ध्वनि)-अविच्छिन्न योगादि धारणेनें जो दशनादांचा ध्वनि ऐकूं येतो तो.
अबाळ-हाल, विपत्ति.
अबोलणा-न बोलण्यासारखा.
अभंड-विपुल, पुष्कळ.
अभिनव-नवल, अभिनव.
अभिलास-अभिलाष.
अभुक-भूक नाहीं अशी स्थिति, तृप्ति.
अरोथा—अपूर्व इच्छा.
अवकळा-तेजोहानि, तेजोभंग, फजीती, स्वरूपनाश.
अवगणी-सोंग.
अवगणें अ. आवगणें ओळखणें.
अवश्वरा-अवसरा.
अशुद्ध-रक्त.
अशोर्भी-अशुभीं.
असट-पातळ, पाणचट.
असमाई-असह्य.
असुक-असुख.
असेरया-आश्रया.
असोशी-हांव. उत्कंठा.
अहिक्य अ. आहिक्य-ऐक्य.

### आ.

आइत अ. आइती-सामग्री, तयारी, सामान, साहित्य.
आकळ-सत्यज्ञान, परब्रह्म.
आगळा-अधिक, फार, मोठा.
आगा-मोठा, श्रेष्ठ.
आगोज-अगाध, भयंकर, मोठें.
आचावाचे-बडबड.
आट-आड, हरकत.
आटी-प्रयत्न, खटपट, पराकाष्ठा.
आणी-टोंक, अग्र.
आतळणें-जवळ येणें, शिवणें, स्पर्श करणें.
आतुडणें-सांपडणें, प्राप्त होणें.
आथिलें-असलेलें.

आदा–जमा, उत्पन्न.
आन–अन्य, दुसरा.
आपसया–आपोआप.
आपैतें–आपोआप, एतें.
आयणी–तत्त्वनिर्णयेच्छा.
आरणें–उत्सुक अ. अधीर होणें. २ ओरडणें.
आरंधे–दुःखाचा कोलाहल.
आराइणें–अनुकूल असणें.
आराणूक–शांति, सौख्य, उसंत.
आराला–उत्सुक झालेला.
आरालिया–आराधिल्या ?
आरुष–आर्ष, अडाणी.
आरोगणें–भक्षणें.
आर्त–उत्कट इच्छा.
आर्थ–मागणें.
आलगट–अल्लड, हूड, अडाणी.
आवारा–खटाटोप.
आवर्त–भोंवरा.
आविस–आमिष.
आसडा–अंगास एकाएकीं हिसका बसतो तो व त्यानंतर होणारें दुःख.
आहाकटा–गडबड, ओरड, आक्रोश.
आहाच–वरवर.
आहाचपण–वरवरची कृति.
आहाच वाहाच–सामान्य. २ वरवर.
आळ अ. आळी–छंद, नाद, हट्ट.
आळवण–विनवणें.
आळीकर–छांदिष्ट.

## उ.

उखता अवघा.
उखर–खडबडीत.
उखितें अ० उखतें–अवघे. २ उदासीन.
उगटिलें–वाईट.
उगलें–उगें, व्यर्थ. २ दुसरें. ३ शांत.
उगवणें–उकलणें, सोडवणें.
उगळणें–ओकणें. २ माघारा येणें.
उगाणा–सर्व दोष व पापें आपणावर घेऊन केलेली सोडवणूक. २ गणना.
उगिया–रिकामा, फुकटचा.
उजगरा–जागरण. २ उशीर, विलंब.
उजरी–उदय, उत्कर्ष.
उदेशीं–उद्देशीं.
उदंजणें–उगवणें.
उद्वेग–उद्विग्नपणा, उदासीनपणा, अस्वस्थपणा.
उधानु–तीन ( नंदभाषा. )
उन्मन–लीन.
उन्मनी–मनाची लीनता होते अशी पांचवी अवस्था.–१ जागृति, २ स्वप्न, ३ सुषुप्ति ४ तुर्या. ५ उन्मनी—अशा एकदर पांच अवस्था आहेत.
उन्मीलित–उघडलेला.
उन्हवणी–ऊन पाणी.
उपणणें–झडपणें, पाखडणें.–धान्यांतील भुस, कोंडा इ. वाऱ्याच्या योगानें निराळें करण्याकरितां धान्य पाटींतून उंचावरुन खालीं ओतणें.
उपेग–उपयोग.
उबग–कंटाळा, त्रास.
उभारा–स्थिरता, स्तिमितपणा.
उमस–अवकाश, उसंत. २ विस्तार. ३ उद्भव.
उमानें–उमजणें.
उरी–बाकी, ठाव, स्थिति.
उल्लंघ–उल्लंघणें, २ उल्लंघणारा.
उसंतणें–शेवटास नेणें, आटोपणें.

उमाळणें–हर्षविणें.
उमाळी–हर्षविलें.

ऊ.

ऊर्मी–मनाचे तरंग.

ऋ.

ऋणिया–ऋणकरी, देणेदार.

ए.

एकावळी–एकेरा हार.
एकासवा–एके ठिकाणीं.
एक्याच–उगाच, न बोलतां, स्तब्धपणें.

औ.

औट–साडेतीन ( ३॥. )
औटडें–औटपीठ. ४ स्थान. ( त्रिकूट, श्रियाट, गोलाट, औटपीठ. ) हीं महाकारणस्थानें.

क.

कंकर–खडा. २ निखारा.
कडविड–खिडुकमिडुक, रजगीबिजगी ( सोन्याची, रुप्याची इ. )
कडसणी विचार.
कणव–करुणा.
कुंदु–कांदा.
कप–कापूस अथवा त्यासारखा जलद पेटणारा पदार्थ.
कपाट देणें दार लावणें, बंद करणें.
करबाडें–कडबा.
करमर–शास्त्र विशेष.
करमुर–कळा.
करवडी अ. करवंडी-पोटाचा खांच. अति क्षुधा लागली असतां " करवड वाळली" असें ह्मणतात.
कर्णधार–नावाडी.
कर्दळी-केळ.
कलवड अ. कलवडु-गोवऱ्यांचा ढीग रचून त्याजवर लिंपण घालून ठेवतात तो. २ डेरे वगैरे मडक्यांचें लिंपण.
कल्पणें–वाटणें.
कव–मिठी, वेंग.
कवळ–काविळीनें डोळ्यांवर पिवळेपणा येतो तो. २ ग्रास.
कवळणें–घास घालणें. २ कृपा करणें.
कळस–शेवट. २ कलश.
कळह–कलह, भांडण.
कळांतर–व्याज.
कळी–खडा.
कांचवटी–कांच.
काचाकुची-काचकूच.
काचें–कच्चें.
कार–मळ.
कांटवण–कांटेवन, कांटेरान.
काटी–वीस ( नंदभाषा ).
कानकोंडें–चोरटें.
कानवडें–एका आंगावरलें, वांकडें.
कापडी–यात्रेकरू, निशाण घेऊन नेहमीं वाऱ्या करणारा.
कामारी–सेवक, चाकर.
कामावणें-कमावणें.
कारियाची–कार्याची.
कालावूल अ० कालावुली-कांसावीस.
काव्हविणें त्रासविणें, चिडविणें.
काहाळा-वाद्यविशेष.
काहो–घोष.
काळोसा–काळोख.
कीर–खचीत, निश्चयात्मक.
कुंकारा–मोठी हाक, हरळी.
कुंकुड अ० कुंकड–कोणीकडे.

कुंचा–मोरचल.
कुची–फुकट ( गल्ली कुचीचें ).
कुच्या–खांचा ( भोंवऱ्यानें भोंवऱ्यास पाडतात त्या, ) गुच्चे.
कुटीमिटी-घरदार.
कुठावा–कुडावा, कुडावा, रक्षण. २ भिंत.
कुठोरा-दुसरा.
कुठारि–कोठवर.
कुर्डा–कपटी, वाकर्डा.
कुडें–वक्र, हेवेखोर, वाईट.
कुडणें-मनांतल्या मनांत जळणें.
कुलाकुड–वाईट लांकूड.
कुश्चळ अ० कुश्चिळ-कुत्सित, घाणेरें, मलीन.
कुसरी–कुशळता, कौशल्य.
कुळवर्णा–कोळवर्णा.
कुळीक-अजीर्ण.
कूट–निंदा. कूट खाणें–निंदा करणें.
केजें–धान्य. २ नारळ.
केवा-पाड, थोरी.
केळवणें-केळवण, लग्नाच्या पूर्वीचीं मेजवानी घेणें, मिरवणें.
कैवाड अ० कैवाडें–कारस्थान, युक्ति, नजवीज. २ धीर, अवसान.
कोड-कौतुक, आवड.
कोडिसवाणें–मौजेचें, गोजिरवाणें.
कोप-झोंपडी.
कोपट-घर, झोंपडी.
कोवसा-आश्रय, आधार.
कयाला अ. क्याल्या-कां.
क्रमणें–मरणें, जाणें.

ख.

खड-मक्ता, ठराव.
खत-व्रण, खवंद, क्षत.
खतेला–खचलेला, भरलेला.
खद्योत–काजवा.
खलेती–जींत अर्ज अथवा पत्र घालतात ती थैली.
खळ–छंद, नाद.
खाई-छाया.
खाण अ. खाणें–ठिकाण, स्थान. २ वस्ती, मुक्काम. ३ भक्ष्य, जेवणखाण.
खाणोरा–खादाड, खाणचोर.
खातड–खातेरांत राहणारा.
खान–खानचोर, खणती लावून चोरी करणारा.
खालें–खालीं.
खुडा· अवयव आंखडलेला.
खेदी–दुःख देई.
खेवलें-जडलेलें.
खोंकर–मोडकळीस आलेलें, फुटकें.
खोडणें–वाईट चाल–खोडी लागणें.
खोडावणें-खोडा बिडी होऊन पडणे, लुला होऊन पडणें.
खोळ–गुह्य.
खौसा–खिसमतगार.

ग.

गडसंद-अडचण, कचाटी, पेंच.
गदा–एक आयुध, हत्यार.
गदारोळ–मोठी गर्जना. २ पांडित्य, निरूपण.
गभस्ति–सूर्य.
गरुडटका–गरुड अग्रभागीं असलेला. २ पताका.
गवांदी–अन्नसत्र.
गव्हान–गव्हाण. २ पांगळ्याच्या हातांतील टेंकण. ३ गावानें.
गहिला–वेडा.

गांजिया-जाळें पिशवी ऐवजीं
गाठ्याल-आंतल्या गांठीचा, कपटी.
गांष्मणी-गुह्य.
गांडा-दुर्बळ, नपुंसक, गांडू.
गादणें-मळणें, पीडावणें.
गांवढळ अ. गांवढाळ-अडाणी.
गिऱ्हे-गरीब.
गुज-गुह्य, गुप्त गोष्ट.
गुढार-लमाण, डोंबारी, बेदू, कोल्हांटी यांच्या चटयांच्या झोंपड्या. २ हौदा, अंबारी. ३ गूढ.
गुढी-ध्वज, पताक.
गुंत } -गुंता, घोंटाळा.
गुंती }
गुपणें अ. गुंफणें-जुळणी करणें, रचणें. २ गुंतणें.
गुमान-अभिमान, अहंकार. २ पर्वा.
गेठा-गळ्यांतला एक दागिना.
गोठी-गोष्टी.
गोमटा-सुंदर, चांगला.
गोरवें- गौरवानें.
गोरांजन-नर किंवा नारी ईश्वरप्रीत्यर्थ आपणास जाळून घेतात त्या साधनाचें नांव.
गोऱ्हवाडी-गुखाडी.
गोवळा-गवळी २ भूत.
गोवा-गोंधळ, घोटाळा.
गोवार-शेणखडा.
गोही अ. ग्वाही-साक्षी, साक्षीची जबानी.
ग्यानगड-ज्ञानाचे गड.

## घ.

घमंडी-पुष्कळपणा, वैपुल्य.
घराचारी-गृहस्थाश्रमी, घरंदाज.
घायवटा-जखम.
घालन-धोंका, संकट. घालणीचें रान ह्म. धोक्याचें-संकटाचें-चोराचें-रान.
घुमरी. ( पुष्कळ, ओतप्रोत. )
घुसमांडणें-श्वास कोंडणें, कोंडमारा करणें.
घुळी-पोळ, सांड.
घोंगे-मोठें. २. घबाड.
घोंघाणिया-घामट बायको.

## च.

चपे-सांदीस.
चपेट-झपाटा; सपाटा.
चपेटा-झपाटा.
चर्मक-चांभार.
चर्या-तऱ्हा, प्रकार.
चाकाटणें-चकित होणें.
चांग-चांगला.
चाच-चलाख, चपल, चंचल.
चाट-बडबड्या, बहुभाष.
चाटू-सैपाकाची पळी.
चाम-चामडें, चर्म.
चार-उपचार.
चार-चारी वेद.
चावटी-वाचाळपणा.
चिकरणें अ. विकरणें-विखरणें.
चिंतवनीं-चिंतावनांत.
चितांक अ. चितांग-बायकांच्या गळ्यांतील एक दागिना.
चिंतावणें-चिंतेंत पडणें.
चिरा-धोंडा, दगड, उदाहरण, घालूं जीवपणा चिरा ह्म. जीवपणावर धोंडा घालूं, ह्मणजे तें नाहींसें करूं.
चिनचिनी अ. चिणचिणी-रात्रीं चिनचिन असें ओरडणारा प्राणी, रात्र.
चुंभळ-चोंबडें. २ आशाळभूत.

चेइणें-चेतणें, चैतन्यरूपें व्यापार करणें. २ चेष्टा करणें.

चेडा-चेटक.

चेत-चित्त.

चेवणें-चालू होणें. २ चालू करणें.

चोखटा-चांगला.

चोखडा-चोख, चांगला.

चोजवणें-चकित करणें. २ मोठ्या उल्हासानें करणें इ.

चोपडू-लोणी वगैरे चोपडलेला पदार्थ.

चोहटा-चवाटा.

चौघाचार-चौघांत न्याय, पंचाईत.

चौबार-चवाटा.

### ज.

जति-यति, अवसान. २ बौद्धग्रंथी यति. ३ संन्यासी.

जना-शक्ति, अधिकार. २ जत्रा.

जनाचार-पंचाईत.

जमान-जामीन.

जयेजत- जये ( जेव्हां ) जत ( अद्भुत ) !

जरजर-जीर्ण वस्त्र, फाटकें तुटकें वस्त्र.

जवळिके-जवळ, समीप.

जाडा-झाडा.

जार-गर्भवेष्टन.

जाहाती-जुलूम, जास्ती.

जिव्हार-अंतःकरण. २ बीज. ३ मर्म.

जीणें-वांचणें.

जुग-युग.

जुझार अ० झुंजार-योद्धा, पराक्रमी.

जुंतणें-जुंपणें.

जुंती-जुंपणी.

जेगट-वाद्यविशेष.

जेठी-पहिलवान, मल्ल.

जेवा-जेवण.

जोड अ० जोडी-संपादणी.

जोतिला-जोडला.

जोहर-अग्नि, आग.

जोहारणें-नमणें, जोहार करणें.

ज्यालेपण-जिवंतपण, जन्म.

### झ.

झकणें-चकित होणें, फसणें.

झड-झडप.

झणी-झटकन, लवकर. २ कदाचित्, नाहींतर.

झळई-मृगजळ. २ उष्णता.

झांसा-दहशत, धास्ती.

झोंटि-केश, शेंडी.

### ट.

टकणें-शकणें, करूं शकणें.

टकला-घोप.

टका-अग्रभाग.

टणक-मोठें.

टाकणें-मिळणें, पावणें, घडणें.

टाकी-कृति, २ आवड.

टांचणी-टंचाई, उणीव.

टांचर-जोड्याची टांच.

टांचें-टंचाई, तोटा. २ उणें.

टाहो-घोष, टकळी.

टेवा-ढब, डौल.

टोका-माप. २ काटा, ताजवा.

टोप-युद्धाच्या वेळीं घालण्याचें शिरस्त्राण.

### ठ.

ठकणें-ठकवणें, फसवणें.

ठाकण अ० ठाकणी-ठिकाण.

ठाडा-उभा.

ठाण मान-बांधा-रचना. ( शरीराची ) २ मुरखपणा.
ठावें जागा, ठिकाण.
ठेंगा अ० ठेंग्या-सोडगें, काठी.
ठेणें-गाहणें.
ठोंबरा-करलासुद्धां धान्य.
ठोंबा-दांड्, टिकोरें.

## ड.

डसवणें-चिकटावणें, तादात्म्य करून टाकणें.
डांइ-द्रेषीं, शहांत, गोल्यांत.
डांक-एक वाद्य. ( खुनाचा पत्ता न लागेसा झाला म्हणजे कुंभार ही डांक वाजवितो. म्हणजे खून अंगास येतो व खुनाची हकीकत सांगतो असा कोठें समज आहे.
डांग-काठी.
डाय-द्वेष, अकस.
डाव-डाग ( लोखंड तापवून दिलेला ).
डिंगर-मूल, लेंकरूं.
डिवणें-उपद्रव-इजा देणें, मारणें.
डिवी-मारकट.
डंगा-ढ, जड.
डोबड- म्हसरूं, लाक्षणिक खंदक, दिवा इ०
ढोहणा-टोमणा, ठोसरा. २ विघ्न, आडकाठी.
डौरणें- सजणें, शोभणें.

## ढ.

ढवळार-हवेली, टोलेजंग इमारत.
ढाळ-रीति, चाल.
ढाळणें-झाडणें, हालवणें.
ढिसाळ-उंच.
ढुंग-ढुंगण.

## त.

तजणें-त्याग करणें.
तट-तफावत, अंतर; प्रतरणा. २ भांडण.
तंट-बोभाटा, हकाटा; प्रख्याति.
तडताथवड-तावडतोब, तात्काळ.
तन-तृण, रानझाड, गवत.
ताकट-घामट, ओखट.
ताकपिरें-ताक पिणारीं, ताकट, घामट.
ताटस्थ-तटस्थ.
तानें-बचा, तान्हें बाळ.
तापटणें थापटणें.
तारातीर-ताडातोड, त्रिस्थळी.
ताळी-देहसत्यत्व.
तिमाणें-शेतांतील माणसान्या आकृतींचें बुजगावणें.
तिळतांदळा-सर्वांशीं मिळून चालणारा, मनमिळाव्.
तुक-तोल, वजन, महत्व.
तुटी-तूट, तुटणूक.
तुरतुरा-झपाट्याचा.
तूर-वाजंत्रें.
तेजी-पाणीदार घोडा.
तोंडक-भांडण. २ भांडखोर.
तोडर-तोडा, वाळा.
तोरड-साखळी तोरडी घालणें म्ह० जिंकून कवजांत-ताब्यांत ठेवणें.
त्राहाविली-त्रासविलेली.
त्रिपुटी-ज्ञेय, ज्ञाता, ज्ञान; ध्येय, ध्याता, ध्यान; इत्यादि त्रितय.
त्रिमिर-तिमिर, अंधार.

## थ.

थकित-थक्क झालेला.
थडवा-अल्प जलाशय.
थाटी-जमाव, मंडळी, थवा.
थार-आश्रय.
थिंकणें-खेद-दुःख करणें.

थिता अ० थांता- वांया.
थिल्लर-डबकें.
थांत-वांयां.
थेटें-शैत्य.
थोकडा-लहान, लघु.
थोंट-दांडगा, हरामी, गुलाम.

## द.

दंडणें-सजणें.
दंदी-वादी, द्वेषी.
दमामा-मोरचा.
दर्दुर-बेडूक.
दसडी अ० दसोडी-दशी.
दादुला-नवरा.
दारवंटा-उंबरठा.
दिठी-दृष्टि.
दिंडी-एक तंतुवाद्य.
दिवसें-कणकेचा एक पदार्थ विशेष.
दी-दिवस; उदा० सात दी=सात दिवस दोन दी=दोन दिवस.
दुचाळा-कातरी, चिमटा, दोन टोकांचें हत्यार.
दुडी-घागर.
दुणवणी-दुप्पट करणें.
दुधाणी-दूध तापवण्याचें भांडें. २ दुभत्याचें भांडें.
दुम-धुम.
दुमाला-पिछाडी. २ पाठ.
दुलड-गळ्यांतला दागिना.
दुश्चित-दुःखी, खिन्न.
दुहें-दुप्पट.
देखणा-पाहणारा.
देखी-देखणें, दृष्टि, अवलोकन.
देखीचा ज्ञानाचा, विचाराचा.
देखोवेखी-पाहून.
देवलसी-देवपिसा.
देवाईल-देऊळ, देवालय.
देहाडा-देह.
दो-दोन. उदा० दोपाहारा-दोनप्रहरा.
दोम दोम-भिक्षेच्या वगैरे वेळीं फकीर लोकांच्या ह्मणण्यांत हा शब्द येत असतो.
दोरा-एक दागिना, सुताच्या वाकी, कंगण्या वगैरे.

## ध.

धगी-धग, आग, उष्णता.
धडफुडा-खरा. २ खरोखरी.
धडफुडी अ. धडफाडी-धड फाडणारी. २ खरोखरी.
धण अ. धणी-समाधान, तृप्ति, भर, पूर्ति.
धंद धंद-सोंगें, ढब, ढंग.
धसा-कुटाळ, मूर्ख.
धाटे-दाटे.
धाणें-तृप्त-संतुष्ट होणें.
धाय-हंबरडा.
धारण-घुसळखांब, मुख्यखांबा, ( जमिनी-पासून आढ्यापर्यंत पोंचणारा. )
धाव-बीळ, गुहा.
धिग-धूम, ओतप्रोत, गजरधूम.
धिंद-धिंडवडा.
धिंदधिंद-डांगोरा, जघन्य; प्रसिद्धि.
धीर-अवकाश, विलंब.
धुडका-धडकी.
धुडवणी-पोकळ, डौलाच्या, वायचळ.
धुनी-धुणारी, नदी.
धेंडें-पोकळ अवडंबर.

## न.

नंदुली-नणंद.
नल्हाचि ( नलाहाची )-लाहाणें पाहा.

नळी-नरडी, मान.
नागर-रम्य, सुंदर.
नागवणें अ. नांगवणें-नाटोपणें, अनावर होणें.
नागीवा-नागवा, उघडा.
नाटक-नाटकी, खेळ करणारा.
नाड-विघ्न, अडचण, नड.
नाडियें-नक्कें.
नाड्या-नकास.
नाथणें-पीडा देणें, खोड मोडणें.
नांद्या-नंदीबैल, मूर्ख.
नाहो-नवरा.
निकी-नेटकी, चांगली, खरी.
निकुर-निश्चय.
निगुती-निभ्रांत, खास. निःसंशय.
निगुरा-ज्यानें गुरु केला नाहीं तो.
निघोंट-सघन, परिपूर्ण.
निडळ } -केवळ. २ कपाळ.
निढळ }
निडारणें-भरून येणें.
नित-नित्य.
निदसुरा-झोंपेच्या धुंदींत असलेला.
निधाई-धन्य, कृतकृत्य.
निपट-अगदीं.
निपराध-दुष्ट, नीच.
निपराधी-निरुपयोगी, अप्रयोजक.
निबदेणें-तुच्छ करणें, दोष देणें.
निरंजन-प्रकाशरूप.
निरय-नरक.
निरवणें सोंपवणें, हवालणें.
निरसणें-नाहींसें करणें, निस्तारणें.
निरांजणें-त्रासणें, वैतागणें.
निरुतें-खरें, निश्चित.
निरें-निखालस, शुद्ध, निर्भेळ.
निर्वाण-अंत.
निर्वोळा-निवाडा.
निष्टक-खचीत, निःसंशय.
निसुग-निर्लज्ज, निलाजरा.
निसुर-निखालस, निश्चित.
निक्षेपणें-ठेव ठेवणें, पुरून ठेवणें. ( द्रव्य )
नीस-निवड, पृथक्करण.
नुधवा-न×उधवा=( उधवणें, वर करणें, उचलणें. )
नेट्यां-नेटानें ?
नेपुर-नूपुर, पैंजण, तोरड्या.
नेवरा-खूर, नखी.
नैश्वर्य-नाशवंत.
न्याहाल्या-गाद्या, गिरद्या इ०

## प.

पग-पाऊल, पाय. २ पावलाची खूण.
पच-पचन, संवय.
पटंगा-आसा.
पटे-पट, वस्त्र.
पडदळ-तरवार अडकावण्याचा पट्टा २ सामान.
पडिपाडें-सारखेपणें.
पडिभर-मोठेपणा, डौल. २ आसक्ति.
पढियंता-आवडता.
पढिये-आवडीचा, आवडेलसा.
पतंग-तांबूस रंगाचें एक लांकूड २ पाखरूं.
परताप-दक्षिणा २ प्रताप.
परमाई-वीरसू, वीरजननी.
परवडी-चातुर्यानें २ प्रकार.
परवा-परका.
परावी, परावीया-परकी, परक्या.
परावें-परकें.
पराश्रम-दुसऱ्याचा आश्रम.

परियेळ-परळ, ताटली, तबक.
पहुडणें-पडणें, निजणें.
पव्हे-पाणपोवई, पाणसत्र.
पाईक-सेवक ( मोठ्या इदबाराचा ), अत्यंत विश्वासू व हुशार चाकर.
पाइकी-सेवकपणा.
पांकुळणें-शिथिल होणें, विस्कळणें, सईल होणें, फुटणें.
पाख-शुद्ध, स्वच्छ.
पाखर-कृपा. २ गाय, म्हैस यांचे दोन स्तन.
पांग-पराधीनपणा.
पांगणें-पराधीन होणें २ पसरणें.
पागोरा-झाडाच्या मुळ्यांचीं बारीक मुळें.
पाठोवाटी-पाठोपाठ.
पाख्यळ-ओझ्याचें जनावर, ओझाळ.
पाडवार-महार.
पाणचोरा-भोंकाचा घट, मडकें.
पाणोवाणी-पाठोपाठ.
पातजणें-विश्वासणें.
पातेरा-झाडाचा गळालेला व वाळलेला पाला.
पाधार्णा-अडाणी बायका.
पानसरा-आडवा.
मानेर्डा-पानाआड २ फानदी.
पान्हेरी-पोवई.
पापरी-लात.
पावळीं-तिरीं.
पायरिका-पायरिच्या.
पायवणी-पायाचें पाणी ( तीर्थ. )
पारुषणें-सोडणें, तुच्छ करणें.
पान्हेरा-संगत.
पास-पसंत. २ स्वच्छ.
पाहुनर अ. पाहुणेर-पाहुणचार.
पिटणें अ. पिडणें-दुःख-त्रास देणें.
पिटपिट-चिरचिर, दुरदुर.
पिलंगणे-पुढें पुढें धावणें. २ कोणतीही क्रिया हळू हळू करणें.
पिशवी-गोमुखी.
पिशुन-चाहाड, दुष्ट.
पुंजाळणें-परिपक्वज्ञान भक्तीच्या योगानें नेत्र तेजावून गंभीर दिसणें.
पुट-प्रकार, रूपांतर.
पुंड्र नाम ( कपाळीं लावलेला )
पुनस्कार-पुरस्कार.
पुरलासाटीं-भोगासाटीं, चैनीसाटीं.
पुस अ० पुंस-पुच्छ, शेपुट.
पेंठवणी-पाठवणी-विदागी मागणें.
पेंडा-जोंधळे अ० भातेण यापासून काढलेली दारू.
पेणा अ० पेणें-मुक्काम, वस्ती.
पेणावणें-उठवणीस येणें.
पेसपाड-पेंच पांच, तिखट मीठ.
पैल-पलीकडे.
पोभाळणें-चोळणें, घासणें.
पोरवडा-अव्यवस्था, घोटाळा.
प्रताप-दक्षिणा.

## फ.

फका-एखादा पदार्थ तोंडभर-पिठाचे फके, पोह्यांचे फके ( मारणें. )
फटकाळ-वाईट, दुष्ट.
फटमर-गांड्या, भित्रा, पळपुट्या.
फटमरें-गांडेपणाचें.
फर्डा-निकाल, उलगडा, फाड.
फलकट-पोकळ, फोलकट.
फांजी-आडफाटा, हरकत, अडचण.
फांदा-संकट, घोटाळा, गोता.
फावणें-साधणें, मिळणें, हातीं लागणें, चालणें.

फांसात्रणें-समजणें, उमजणें.
फिका-निस्तेज, बिनहुशिली.
फिरंगी-तरवार, तिखें.
फुंज-अभिमान.
फुंदणें-डौल-गर्व करणें.
फुदी-स्त्रीचें जननेंद्रिय.
फुलबरा-माळ, गजरा.
फोडी-कौर्डी. २ खांड ( सुपारीचें वगैरे )

ब.

बंदखाणी-बंदीखाना.
बरग-एका प्रकारचें बीज.
बरवंट-चांगला सुंदर.
बरवया-बरवायाचें रूप, सुंदर, सुरूप.
बराडी-आशाळभूत, दुकाळलेला.
बहिरवास-बाहेरवास.
बहुडविणें-मागें लावून देणें. जिकडच्या तिकडे धाडणें.
बहुडा-मोटा.
बळरया-बळाची योग्यता.
बळीयाडा-बळकट निश्चयाचा, दृढनिश्चयी.
बाखर-पुरण ( गुळखोबरें अथवा गुळ, साखर यांचें करंज्या वगैरेंत घालतात तें.)
बाजागिरी अ. बाजीगेरी-गारूड विद्या हातचलाखी, गौडबंगाली विद्या.
बांडा-कांहीं काळा व कांहीं पांडरा या दोन रंगांचा.
बांदवडी, बांदोडी -बंदी.
बाधिका-भ्रांति. २ बाधणारी.
बापुला-बाप.
बार-बारी, पाळी. २ घोष, हव्यास.
बालिस्ट-लोड, उशी, तक्या.
बासणें-चालणें.
बाखर-शिळें अन्न. २ रिकामटवळा, उनाड ३ व्यर्थ.
बिडवई-श्रेष्ठ, हितकर्ता.
बिढार-बिऱ्हाड.
बिदी-गल्ली, रस्ता.
बुच्या-निर्लज्ज, मूर्ख.
बुझावणें-समजावणें.
बुंथी-घुंगट, बुरखा २ घुंगट बुरखा ज्याचा [येतात तें वस्त्र.]
बुनादीचें-अनादी काळचें. बहुत दिवसांचें
बुर-भुस्सा ( काढणें. )
बेंबळ-ढिला.
बेरसा-विचारशून्य, दांडगा.
बोटवरी-बोटावर.
बोनें-नैवेद्य, बळी.
बोंभा-हाका, बोंबा.
बोहरी-राखरांगोळी, नाश, क्षय.
बोळावा-सोबती.

भ.

भकांधा-कुचेष्टा, निंदा.
भंडभंड-निरर्थक, वाग्जल्प, रिकामी बडबड.
भरोवरी-सामग्री, श्रम.
भवतारिया-भवतारक.
भाकणें-मागणें, दीनवाणीनें विनवणें.
भाज-भार्या, बायको.
भांजिली खांजणी-क्षयवृद्धि.
भाटबोलीपणा बडबड.
भांड-बहुभाष, भिक्षेनें पोट भरणारा.
भांडाई-भांडखोरपणा.
भाणें-ताट, पात्र.
भातुकें-खाजें, खाऊ.
भातें-मजुरी.
भार-समुदाय, जमाव.
भावणें-भावना करणें, कल्पिणें.
भांस अ. भासी-भाताचा कोंडा, करळें

भिंगुळवाणें-भयानक, भयंकर, उदासवाणी.
भेव-भय.
भोज-आवड.
भोत-सर्वांगाचें कातडें काढल्यावर राहते ती आकृति. २ वाईट भाग.
भोरडी-एकपक्षी, क्रौंचपक्षी, करकोचा.
भोंवरी-बुगडी.

म.

मठारे-ढोंगी साधु.
मंडण-भूषण.
मतोळा-हीण, घोटाळ; घाला.
मंदला-स्वस्त झाला, भाव उतरला.
मदार-मुसलमानाचें थडगें.
मनणें-मानणें.
मरो-मरण.
मवणें-मोजणें.
मविता-मोजणारा.
मवेश-मायेश.
महजर-हुकूम, सनद.
माजिरा-माजोरी, उन्मत्त.
माजिरें-माज, धुंदी.
माठ-मंद.
मातीं-देह ( अलंकारिक. )
मात्रा-वासनांचे विषय.
माधुलिया-मडकी.
मादळा-मृदंग.
मांदे-समुदाय, मेळा.
मापणें-मोजणें, गणणें.
मारगेली-मार ( वांयां ) गेली.
माव-माया.
माषिकणें-मोल पावणें.
मिनणें-मिळणें, एकत्व पावणें.
मीनती-वियोग.
मुडतर-दैन्य, दुःख, दास्य.
मुरताळणें-वळणें, लवलवणें.
मुडा-पंगु, कुब्ज.
मुल्हारी अ. मुळहारी-बोलावणें, बोलावणारा.
मुसाफा-मुसलमानाचे धर्मग्रंथ.
मुसावणें-ओतप्रत-पूर्णपणें भरणें.
मूळ-बोलावणें, आमंत्रण.
मूळडाळ-मूळ पाळ.
मूळबंद-आरंभीचा बंद, पहिला बंद.
मोकट अ० मोकटीं-मोकळा, अनर्गळ.
मोकळ-रिकामा, निरुद्योगी.
मोड अ० मोडी-आकार, पद्धत. २ गुंता, गोंधळ, घोटाळा.
मोहरी-वाद्य.
मोहोरणें-प्राप्त होणें, शिरणें.
मोळा-ओझें. २ रीत, रिवाज, चाल.
म्हणियारा-सेवक, दूत.
म्हणियें अ० म्हणीयें-काम, कार्य.

म्हनेरा, मनेरा, मनेरी — मन ( अलंकारिक ) २ तगादा.

म्हैसवेलसुरकांडी-सुरकांडी.
म्हैसा-रेडा.

य.

याति-जाति, ज्ञात.
यारी-निकट मित्रता.
यावा-उदय, प्राप्ति.
येसणार-अगत्य.
येह-इह, ह्या.

र.

रंग-वर्ण.
रजा-कामवासना, २ रजोगुणांची प्रेरणा.
रडारोवी-रडारड, आक्रोश.
रवडवणें-भरणें, बरबटणें, २ गुंतवून-जखडून घेणें ( कामांत. )

रया–किंमत, योग्यता, पाड.
रस–भक्तिरस. इ०
रहणी–रीत, चाल. २ ठिकाण.
रळपळ अ. रळफळ–घोटाळा, अव्यवस्था.
रळी–विनोद, थट्टा.
राऊळ–देऊळ.
रांडवडा–शिव्यागाळी.
रातणें–रमणें, रिझणें.
राहडी–राड, चिखलाची भिरबिरी.
रीस–रोष, क्रोध.
रूपडें–सुंदररूप, साजिरें तोंड.
रेमट–लांबट गोष्ट.

ल.

लचाळ–गचाळ, हेंदरा.
लबलाहो–त्वरा.
लवी–लवन.
लहणें–रोकड, २ प्रीति, प्रेम.
लाइ अ. लै–बहुत, पुष्कळ.
लखणीक–लाक्षणिक, २ दर्शनी.
लागपाठ–पाठलाग, त्वरा.
लागभाग–लागबांधा.
लागवरी ( ? लागवडी )–गर्भधारण स्थिति
लागवेग–अतित्वरा.
लागें–लागलेंच.
लाटें–मोठें.
लाडणें–लाडावणें.
लाणी–लावणी. २ मालमत्ता.
लादी–घडीव चीप.
लांस–डाग.
लांसें–डागानें, चिन्हानें.
लाहणें–पावणें–स होणें. उ. तो दंड होतो.
लाहे–तो दंड पावतो किंवा त्यास दंड होतो.
लाहा–मोठा, लठ्ठ.
लाहाणें अ. ल्हाणें–पावणें.
लाहातें–चिरकाळचा लाभ.
लाहो–छंद, श्रोत्रा.
लुगडें–वस्त्र ( सामान्यतः )
लुडा–लुळा.
लोकभांड–लोकांत पुष्कळ बोलून भिकेवर पोट भरणारा.
लोलिंगत–आसक्त, लंपट.
लोवाळ–पुष्कळ लोंकरीचा.

व.

वंचणें–वगळणें.
वजणें–जाणें.
वर–वार ( प्रसवानंतर पडते ती. )
वरदळ–बाह्यरंग, हलकें, निरस.
वरपडला–स्वाधीन झालेला.
वरळा–फोल व धान्य यांची मिसळ, भूस.
वराक–नीच–हलकट.
वरी–पुष्कळ, वरी.
वहिली–चांगली.
वहिलें–लवकर, त्वरित.
वक्षस्थल–छाती.
वा–उवा, वाजविणें.
वाइला–वाजविला.
वाइलें–वाहिलें.
वाकळा–गोदडी.
वाखणें–लवणें, भित्रेपणानें स्वाधीन होणें.
वाखती–खोळ. ( घोंगडी वगैरेची ); पोटाची बखळ; चिंता.
वाखर–एक प्रकारचा लोखंडाचा पदार्थ.
वाखा–बातमी, दुःखें.
वाघुरा–वनांतील पशु धरण्याचा सांपळा, जाळें.
वाज–निरर्थक, व्यर्थ.
वाटुली–वाट, मार्ग.
वाड–वाट, थोर, मोठें.

वाडा-गुरांचा वाडा.
वाडेकोडें-अत्यंत कौतुकानें; अत्यंत.
वाण-वर्ण; माल, जिन्नस; तोटा.
वाणी-तोटा, कमताई.
वाधा-गर्भाशय पोट.
वान-वाण-जिन्नस, पदार्थ.
वार-आवर, निस्तर.
वारणें-संपणें, आटोपणें.
वारिकें-वर बसणारा, स्वार.
वाला-प्रीतिपात्र, आवडता.
वाव-निरर्थक, वाया. आत्मा, रीग.
वावडणें-फडकणें.
वावरणें-फिरणें, हिंडणें, भटकणें,
वावसें-भटके.
वास-मार्ग, वाट, मार्गप्रतीक्षा.
वांसपणें-वरळणें, बडबड करणें.
वाराखानी-निकाल, फडशा, सोडचिठ्ठी.
वायां-व्यर्थ, निष्फळ.
वाह-वाहो-प्रवाह, प्रचार.
वाहाळ-ओढा.
वाटी-मार्ग, कृति.
वाळणें-वाळीत टाकणें, बहिष्कार करणें.
विकल्प-संशय.
विखळ-दुष्ट, दुराचारी, वावगा.
विच्छिन्न-छिन्नभिन्न झालेले.
विताळ-वेताळ.
विंदान-कौशल्य, कारागिरी.
विनटणें-गर्क होणें, निमग्न होणें.
विवंचना-काळजी.
विव्हडणें-विव्हळ होणें, सद्गदित होणें.
विव्हाळ-दुःखाच्या गोष्टी सांगणारा.
विव्हाळक-निरर्थक निष्कारण.
विवसी काळजी, चिंता, चेटकी.
विश्वामित्री-हैस.
विषम-विरुद्ध, प्रतिकूल विलक्षण संकट.
विसंभणें टाकून जाणें, त्याग करणें.
वेचावेच-खर्चवेच खटपट.
वेटणें-वेढण, वेष्टन करणें.
वेठी-बिगारी.
वेल्हाळ-सुंदर.
वेशी मार्ग, आधार.
वेळाईत-कैवारी, साहाकारी.
वैखरी-वाणी, वाचा.
वैरागर-रत्नाची खाण.
वोगर-वाढपी, अन्न वाढणारा.
वोगरणें-अन्न वाढणें.
वोज-स्वच्छता, निर्मलता; चांगुलपणा.
वोडवणें-प्राप्त होणें; मिळविणें.
वोढणें-नेसणें, पांघरणें.
वोरस-स्नेहभरित पान्हा.
वोल्हावणें-भिजणें; भारावणें.
वोसंग-मांडी.
वोसणणें-वरळणें, स्वप्नांत बडबडणें.
वोसपणें-कंटाळणें, उबगणें.
वोळ वळणें.
वोळगणा दास, सेवक.
वोळणें-वळणें.
वोळंव-खोटें, मिष; कौतुक.
वोळपा-छंद, चटक, व्यसन.
व्याली-आई.
व्यासी-व्यासकृति.

**श.**

शर्त-पाणी, तेज, पराक्रम.
शमी-शांत करी.
शादी-बहुरूपी.
शास्त-शासन.
शिखा-शेंडी.
शिराणी-उपभोग; अप्रतिम नवल.

शीक-शिक्षा.
श्वपच-कत्यंत चांडाल.

## स.

संगीत अ. संगीन-यथास्थित, यथायोग्य.
संचीत-नशीब.
संडवणें-सोडवणें, सांडवणें.
सतंत-स्वतंत्र, स्वेच्छाचारी.
संतसंघट्टणें-संताच्या संगतीनें.
संतीं-संतसंबंधीं संगतीनें.
सत्रावी-ज्ञानशक्ति.
संदी-सांद, कोनकोंपरा; अडचण.
संपुट-देव ठेवण्याचें पात्र.
सपश्रुळीत-सुरेख, चांगला.
सपुरता-पूर्ण, समर्थ, सबल.
संत्रस निष्कारण त्रास; टोल. [करणें.
संसांत्वणें अ. संसांत्वणें-समजावणें, सांत्वन
सर अ. सरी--बरोबरी, सारखेपणा.
सरण-चिता.
सरणें-चालणें, लागणें.
सरवदा-डाकोचा.
सरा-दारू, मद्य.
सरिसा सारखा.
संरोवरी-आदरआतिथ्य.
संचरित-वेष्टित, आच्छादित.
संवसाटी-बरोबरी, सारखेपणा.
सवा-कडे, कडून पक्षीं.
सवाद-स्वाद, रुचि.
सळ-अभिमान; आग्रह; छल; वैर.
संहार-नाश.
सहोदर-भाऊ.
सा अ० सहा अ० साही-सहा शास्त्रें.
साउलें अ० सावलें-वस्त्रें.
सांकडें-संकट, अरिष्ट.
सांग--परिपूर्ण, सहा अंगें.
साच अ० साचर-खरें, सत्य; शाश्वत.
साटी-बदला, मोबदला, संगत, सोवत.
साटोवाटी-भरती, भराभर, बदला.
सांडीमांडी-खटपट.
सांडे-नीच.
सांडोवा-कुरवंडी, त्याग.
सांत-सातत्य, लागोपाठ होण्याची स्थिति.
सादर-तयार.
सादवणें अ. सादावणें-शब्द--आवाज करणें.
सान-लहान.
सावडा-भोळा, भोळसर.
सावाधावा-साह्य, मदत.
सामरस्य समरसत्व; ब्रह्म.
सामा-सामान, माल, सामग्री.
सायुज्यता-चतुर्विध मुक्तींतील ईश्वराशीं व जीवाशीं अभेद दाखविणारी मुक्ति
सार-बल, शक्ति.
सारणें-सरणें, आटोपणें; सिद्ध करणें.
सारसे-सरशी, बरोबरी, साम्य. [अंमलदार.
सालभाज्या-साल अखेरचा हिशेब घेणारा
सावया-साह्य करणारा, कैवारी.
सावळ अ. सावळें-लुगडें.
साहे-साह्य, मदत.
सिक-शिक्षा.
सिंचणें-शिंपडणें.
सिंचवणी शिंपडावयाचा पदार्थ.
सितरणें-ठकविणें.
सिदोरी-भाकरी.
सिलें-हत्यारें, शस्त्रें.
सीस-डोकें.
सुडका-चिंधी.
सुतणें-निजणें.
सुताळी-शोध, पत्ता, थांग.
सुतुतू-एका प्रकारचा खेळ.

सुदा-सुदे, सरळ, चांगला.
सुनाट-शून्यरूप, व्यर्थ.
सुपती-निद्रा, गादी.
सुभट-सुरेख, चांदनें, विस्तीर्ण, योद्धा.
सुरकवडी-सुरकुंडीचा खेळ.
सुरवाडिकपणें-सुखदायकपणें.
सुराणी अ. शिराणी-उपभोग, आवड.
सेकीं अ. सेखीं-शेवटीं, परिणामीं.
सेंद-एक कडू फळ. (याचा कषाय करून तळून खातात).
सेल-खेळांतील एक पदार्थ, उत्तम वांटा.
सैर अ. स्वैर-स्वच्छंद, यथेष्ट.
सोपान-सोपें.
सोम-सौम्य.
सोमवल-सोमल.
सोर-नातेवाईक, जार, आकांत.
सोवा-मनांतल्या, गोष्टी.
सोस-उत्कंठा, हाव, हावरेपणा.
सोहळा-शोभा.
सौंदड-एक झाड.
सौंदणी-कुंडी, डाग (परिट ढोर इत्यादिकांची).
सौरस-अभक्ति, प्रसाद, यत्न, आनंद.
सौरी-चौचाल, निलाजरी अशी स्त्री, मुरळ्या.
स्वयंभु-साक्षात्, प्रत्यक्ष.

**ह.**

हत्यारा-हत्या करणारा.
हलरू-गीत, गाणें.
हरी अ. हारी-ओळ, रांग, माळ.
हाऊ-बाऊ.
हाक-हक.
हाकलणें-हाकून देणें, ओरडणें, हाका मारणें.
हाट-बाजर.
हांडोरिया-अज्ञान, अनाडी.
हाततुका-अटकळीचा.
हातसर-गजरा.
हातसोका-हात संवईचा.
हातोफळी-हातोहातीं, तत्काळ.
हाबाहाबा-हायहाय.
हाय-अपेक्षा, उत्कंठा, हाव.
हारंबळणें-हरपणें, सांडणें.
हारास-ऱ्हास, क्षय, हानि.
हारिस-हर्ष, आनंद.
हालमाकलमें-एकमेकांचीं मागचीं पुढचीं.
हाले-मारिले.
हालो-निजध्यास, चिंतन, लाहो.
हिका-हेका, दुराग्रह.
हिंपुटी-कष्टी, दुःखी.
हिमातीचे-धैर्याचे.
हिरोनिया-हिसकावून.
हीनपणा-गरीबपणा.
हुंदकणें-झाडणें, हिसका.
हुबरी एक खेळ.
हेकाड-एककल्ली, हट्टी, हेकड.
हेंगे-इकडे.
हेंड-पशूंचा कळप.
हेंडगा-चिपाडांचा भारा.
हेंदोवणें-हेलकावणें.
हेवा-उत्कट इच्छा, मत्सर.
हेळा-लीला; क्षण, त्वरित.
होड-पैज.

**क्ष.**

क्षणी-नेम मारणारे.
क्षर-नाशवंत, अशाश्वत.
क्षरणें-पाझरणें, वाहणें.
क्षीदक्षीण-हाल, अपेक्षा, दुर्दशा, उदासीन.
क्षीर-अमृत.
क्षेदक्षीण-दिलगीर, दुःखी.
क्षेम-आलिंगन.
क्षेत्रपाळ-सर्वांचा राजा.